व कोणकोणत्या रोगावर हटकून गुण करितात, शिवाय दालचिनी, एलची, यांचे अर्क काढण्याच्या अगदीं सुलभ रीतीची साग्र माहिती दिली आहे. किं. ८५ आणे. शि० ट० हां०

१६ पशुचिकित्सासार.—( प्राकृत ) यांत घोडे, गाई, हत्ती, बैल, वगैरे ग्राम्य पशूंची साग्र परीक्षा ह्म० कोणता घोडा कोणते जातीचा, त्यांच्या खोडी, कोणता घोडा कोणती कामें चांगली करितो, खोडी सोडणें, शिकविणें, तसाच बैलाचा प्रकार, कोणकोणत्या ह्मशी व गाई चांगल्या दूध देतात, दूध फार देण्यास औषध, व त्यांचें संगोपन व त्यांच्या सर्व रोगांची परीक्षा व त्यांजवर रामबाण औषधें दिलीं आहेत. किं० ८५ आणे. शि० ट० हा०

१७ किमया.—यांत सोनें, चांदी वगैरे इंग्रजी व देशी किमया करण्याचे प्रयोग, पालावर देण्याचे सोनें, चांदी वगैरे तऱ्हतऱ्हेचे मुलामे, औतीव पदार्थ करणें, जरमनसिल्व्हर तयार करणें, पात्रावर पारा चढविणें, पाऱ्याचीं भांडी करणें, वगैरे शेंकडों पदार्थ व निरनिराळ्या धातू तयार करण्याच्या सुलभ रीती दिल्या आहेत. कि० ८१० आणे. शि० ट० हा०

१८ शाईचें पुस्तक.—यांत काळ्या, निळ्या, तांबड्या, हिरव्या, जांभळ्या, पारव्या, लाखी, सोनेरी, रुपेरी वगैरे सर्व प्रकारच्या शाया, तशाच छापण्याच्या वगैरे शाया, व त्यांच्या कोरड्या पुड्या बनविण्याच्या सुलभ रीती दिल्या आहेत. कि. ८५ आणे. शि० ट० हां.

१९ रंगारी.—यांत सुताचे व रेशमाचे वस्त्रास व पागोट्यास वगैरे देण्याचे तऱ्हतऱ्हेचे सर्व प्रकारचे कच्चे व पक्के रंग आंबवे व शिकारी पक्के रंग तयार करण्याच्या सुलभ रीती, तसेच केंशांस देण्याचे तऱ्हतऱ्हेचे कलप फारच सोपे ह्मणजे १५ मिनिटांत केंस बांधल्याशिवाय त्यास पक्का रंग चढून काळेभोर होणें वगैरे नवीन प्रयोग घेतले आहेत. कि. ८५ आणे शि० ट० हां०

२० अग्निक्रीडा.—( प्राकृत ) यांत तऱ्हतऱ्हेचें उडविण्याचें दारूकाम ह्म० नळे, चंद्रजोती, फुलबाज्या, चिचुंद्र्या, बाण, हिगणबेटें, लंका करण्याचें व तारे सोडण्याची रंगीबेरंगी दारू इत्यादि दारूकाम तयार करण्याच्या स्वल्प रीती. कि० ८५ आणे. शि० ट० हा०

२१ हुन्नरप्रकाश.—भा० १ ला. यात आगकाड्या व त्याच्या पेट्या, साबण, मेणबत्त्या, मेणकापडें, लेमनेट, गुलाल, कापूर, हिंगूळ, नवसागर, रोगणें, शिला करण्याच्या लाखा, पालिश करण्याचे कागद वगैरे नानाप्रकारचे जिन्नस तयार करण्याच्या सुलभ रीती दिल्या आहेत. कि० ८५ आणे शि० ट० हां०

२२ **हुन्नरप्रकाश.**—भा० २ रा. यांत दांतांस लावण्याची तऱ्हेतऱ्हेचीं मजनें ( मिशऱ्या ) उंदीर, ढेकूण, पिसा, डास, सर्प, कृमी, वगैरे त्रास देणारे प्राणी आपोआप नाहींसे होण्याचे उपाय, खराब आलेलें तूप, साखर मध वगैरे पदार्थ पूर्ववत् चांगले करण्याच्या युक्त्या, पक्षी पकडण्याच्या युक्त्या, नानाप्रकारचे वस्त्रावर पडलेले डाग काढण्याच्या युक्त्या, सर्व प्रकारच्या परीक्षा, वगैरे अनेक प्रयोग घेतले आहेत. किंमत ८५ आणे. शि० ट० हां०

२३ **हुन्नरप्रकाश.**—भा.३रा. यांत इंग्रजी रीतीनें काढण्याचीं सर्व प्रकारचीं अत्तरें, सुगंध तेलें, गुलाबपाणी, व तऱ्हतऱ्हेचे अर्क व तेलें, रुपें, सोनें मोती वगैऱ्यांच्या डागिन्यास देण्याचा उजळा, बगीच्या प्रकरणीं फळें व फुलझाडें तयार करण्याची माहिती, अकालीं फुलें व फळें येण्याचे सुलभ उपाय, वगैरे शेंकडो हुन्नरांची तर कमालच करून सोडली आहे. किं. ८५ आणे शि० ट० हां०

२४ **नेत्रांजन डबी.**—या अंजनानें तडाखा न लागतां डोळे थंडगार पडतात, कंडू, भूर, सारा, पाण्याची गळती, चिकटा, लाली, मस्तकाचा अशक्तपणा, अभ्यासानें किंवा इतर बारीक कामानें डोळ्यास आलेली कडकी व अंधकपणा वगैरे सर्व नेत्ररोगांचा हटकून नाश होतो. डोळे आले असतां या अंजनानें त्वरित बरे होतात. किं० ८१० आणे. शि० ट० हां०

२५ **चातुर्थिकज्वर.**—व सर्व शीतज्वर हे कितीही जुनाट असले तरी एका पुडींत एका दिवसांत खात्रीनें नाश पावतात. हे औषध चार इसमाचे उपयोगीं पडतें. आंत चार पुड्या अनुपानाचे कागदासह असतात. किंमत ८८ आणे. शि० ट० हां०

२६ **प्रवाळभस्म.**—(सूर्यपुटी) धातुस्थानींची कडकी, उष्णविकार, पित्तविकार इत्यादिकांवर किंमत दर तोळ्यास १ रुपया. शि० ट० हं०

२७ **सुवर्णमाक्षिकभस्म**—नेत्ररोग, धातुपुष्टि, वीर्यपतन, ( स्वप्नावस्था ) इत्यादिकांवर किं. दर तो. १ रु. शि. ट. हं.

२८ **लोहभस्म**—रक्तशुद्धि, रक्तवृद्धि, पुष्टता, शक्ति वाढणें, इत्यादिकांवर किंमत दर तो. ३ रु. शि. ट. हं.

ही वरील सर्व पुस्तकें व औषधें आणि याशिवाय इतर आणखी दुसऱ्या प्रकारची सर्व पुस्तकें व पोथ्या वगैरे सर्व ग्रंथ आमच्याकडे खालील पत्त्यावर विकत मिळतील. रोख पैसा पाठवून किंवा व्हाल्यूपेएबलनें मागवावींत.

**पत्ता.**—पुणें पेठ बुधवार फरसखान्याचे बोळांत घर नं १२३

मालक
**बाळाजी सखाराम लाळे किकवीकर.**

# प्रस्तावना.



वद्यशास्त्रावर आजपर्यंत अनेक प्राकृत व संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध व जगमान्य झाले आहेत. परंतु एकाच ग्रंथांत सर्व आवश्यकतेचे विषय असून अल्प किंमतीस मिळण्यासारखा असा एकही ग्रंथ आजपर्यंत मुळीच प्रसिद्धीस आला नाहीं. बरें, जर सर्वच ग्रंथांचा संग्रह करावा तर तसेंही अनुकूल नसतें. यद्यपि अनुकूलता झाल्यास कोणत्या ग्रंथांत कोणते ठिकाणीं कोणता प्रयोग खात्रीचा आहे, हें समजण्यास तर मुळींच साधन नसतें. आजपर्यंत जेवढे ह्मणून वैद्यकावर ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत त्यांतील चौघांचे चार विषय बहुमतानें पसंत झाले आहेत. ते,

॥निदाने माधवः श्रेष्ठः सूत्रस्थाने तु वाग्भटः॥शारीरे सुश्रुतः प्रोक्तश्चरकस्तु चिकित्सिते॥

अर्थ—निदान ह्मणजे परीक्षा याविषयी माधवनिदान श्रेष्ठ आहे. सूत्रस्थानाविषयीं वाग्भट[1] श्रेष्ठ, शारीराविषयी (शरीरांतील संधी, अस्थि, स्नायू वगैरे सर्व आंतील भाग) सुश्रुत ग्रंथकार श्रेष्ठ आणि चिकित्सेविषयीं (औषधी प्रयोग विषयीं) चरक ग्रंथकार हे सर्वांत श्रेष्ठ, अशीं सर्वतोमुखीं गणना झाली आहे. याकरितां त्या त्या ग्रंथकारांचें थोडक्यांत येथें विवेचन करणें रास्त दिसतें. चरक व सुश्रुत हे दोन ग्रंथकार फार प्राचीनकाळचे आहेत. त्यांचे मागें वाग्भट, त्याचे मागें माधव व त्याचप्रमाणें भावप्रकाश, योगतरंगिणी, वंगसेन, शार्ङ्गधर, गुडूच्यादिनिघंट, मदनादिवियोग, सिद्धमंत्र, रत्नाकर, भावप्रकाशांतील निघंट, वैद्यभूषणांतील निघंट, पथ्यापथ्या वगैरे आकरा निघंट, त्या मागून दुसरे वैद्यामृत, लोलिंबराज, त्र्यंबकी असें तर शेंकडो ग्रंथ प्रसिद्धीस आले आहेत. असें असतां इतक्या ग्रंथांतून वरीलच चार ग्रंथ निरनिराळ्या चार विषयांवर श्रेष्ठ काय ह्मणून झाले यांची शंका राहिली. तिचें समाधान असें आहे कीं पाहिले माधवनिदानांतील सर्व रोगाची परीक्षा उत्तम, याचें कारण असें दिसतें की, माधवनांवाचा जो ग्रंथ-

---

१—वाग्भटांतील सूत्रस्थानाचे विषय येणेंप्रमाणे—ज्यास सूत्रस्थान असे ह्मणतात. ते विषय एकदर ३० आहेत १ आयुष्यकाम्य. २ दिनचर्या. ३ ऋतुचर्या. ४ रोगानुत्पादनीय [ रोग न होण्याविषयीं ] ५ द्रव्याद्रव्यविज्ञानीय. ६ अन्नस्वरूप विज्ञानीय. ७ अन्नरक्षा. ८ मात्राशितीय, [ मिताहाराविषयीं ] ९ द्रव्यादि विज्ञानीय. १० रसमेदय. ११ दोषादि विज्ञानीय. १२ दोषभेदीय. १६ दोषोपक्रमणीय, [ दोषाच्या प्रतिकाराविषयीं ] १४ द्विविधोपक्रमणीय. १४ शोधनादिगणसग्रह. १६ स्नेहविधि, १७ स्वेदविधि १८ वमनविरेचनविधि १९ बस्तिविधि २० नस्यविधि. २१ धूमपानविधि २२ गडूषविधि. २१ अश्चोतनाजनविधि २४ तर्पणपुटपाकविधि २५ यत्रविधि २६ शस्त्रविधि. २७ शिरावेधविधि, २८ शल्याहरणविधि. २९ शस्त्रकर्मविधि. ३० क्षाराग्निकर्म विधि, हे सूत्रस्थानचे विषय जाणावेत.

कार होऊन गेला तो चरक, सुश्रुत व वाग्भट वगैरे ग्रंथकारांचे मागून झाला आहे. असें त्या त्या ग्रंथावरून दिसतें. त्या माधवकवीनें बहुतेक प्राचीन वैद्यक ग्रंथांचीं निदानें जी उत्तम प्रचितीस येतात. तेवढ्यांचा सारांश त्या त्या ग्रंथांतून निराळा काढून तो एकवटून त्यानें आपले नवीन श्लोक त्याजवर रचिले आहेत. व ज्या प्रसंगी निदानात भिन्नभाव दिसला नाहीं त्या प्रसंगीं वाग्भटाचे व कांहीं प्रसंगीं इतर ग्रंथकाराचे साग्र श्लोक त्यांत कांहीएक फेरबदल न करितां आपले निदानांत घेतले आहेत. यामुळें माधवाचें निदान सर्वात श्रेष्ठ गणलें आहे असें जाणावें.—सूत्रें हीं वाग्भटाचीच श्रेष्ठ आहेत. याचें कारण असें दिसतें कीं, कांहीं सूत्रें हीं प्राचीन ग्रंथकारांचींच आहेत. परंतु वाग्भटानें त्यांजवर आपली टीका करून खुलासेवार स्वकल्पनेनें श्लोक जुळवून विस्तार केला आहे. त्यामुळें तीं उघड श्रेष्ठतेप्रत पावलीं असें जाणावें. तिसरें शरीर हें मूळ वेदापासून स्वबुद्धीनें सुश्रुतानेंच साग्र प्रकट केलें आहे. त्याजवर दुसऱ्यांनी टीका करावी असा त्यांत मार्गच राहिला नाही. म्हणून शरीराविषयीं सुश्रुत जाणावा. चवथी चिकित्सा म्हणजे सर्व प्रकारच्या औषधी ( ज्यांत धातूपधातु, रसोपरस वगैरे नाहीत ती. ) ही बहुतकरून चरकग्रंथकारानेंच आपल्या स्वबुद्धीनें मोठी सुरेख कल्पिली आहेत. त्यामुळे चिकित्सेविषयीं चरक श्रेष्ठ मानला आहे. सप्तधातु व पारा वगैरे सर्व रसांपासून ज्या औषधी हल्लीं प्रचारात चालल्या आहेत ह्या मूळ आपले देशांतील नसून अन्य देशांतून या वरील चार ग्रंथकारांच्या मागून इतर दुसरें ग्रंथकारांनी प्रगट केल्या आहेत. व त्यावर स्वबुद्धीनें श्लोकांची जुळणी केली आहे व ते ग्रंथ रसरत्नसमुच्चय रसरत्नाकार वगैरे निराळेच झाले आहेत. यापैकीं कांहीं वाग्भटानें केले आहेत परतु ते वाग्भट निराळेच असावेत असें कित्येकांचें ह्मणणें आहे. नंतर त्या दोहोपासून व वनस्पती व धातू असें मिश्र वैद्यक प्रचारांत आलें आहे. त्यामागून नंतर पुष्कळ निरनिराळे ग्रंथकार झाले आहेत. परंतु त्यामध्यें मुख्य हे वरील ४ ग्रंथकार असून त्या प्रत्येकांचा एकेक विषय मिळून चारच विषय वाखाणणीस पात्र झाले असून जगमान्य झाले आहेत. असें जाणून आह्मीं या ग्रंथात त्या चौघांचे चार विषय मुख्य घेतले असून आणखीही दुसरे इतर विषय ज्या ज्या ग्रंथकाराचे अनुभवशीर दिसले ते घेऊन ह्या ४ विषयास त्यांचा मागून जोड दिला आहे. अशी योजना केली आहे. जसें मुंबई, मद्रास व कलकत्ता, या तिन्हीही हायकोर्टाच्या ठरावांचे रिपोर्ट एकवटून मूळ कायद्यास त्यांचा जोड देऊन जसें कायद्याचें १ पुस्तक केले आहे, ह्मणजे तें एकच पुस्तक जवळ असल्यानें सर्व कार्यभाग होतो. हा हेतु मनांत आणून आह्मीं अशी योजना केली आहे की प्रत्येक रोगावर आरंभी कर्मविपाकानंतर प्रत्येक रोगावर व त्याचे शाखेवर प्रथम माधवाचें निदान त्या खाली वाग्भट त्या खालीं योगतरंगिणी वगैरे एकां खालएक मतभेदानें निदानें घेतलीं आहेत. जेथें अगदी एकसारखीच निदानें आहेत किंवा माधवाचेंच साग्र आहे, तेथें मात्र एकच माधवाचें निदान घेतलें आहे. त्याचप्रमाणें चिकित्सेचाही प्रकार जाणावा. तात्पर्य, अशा एकच ग्रंथाच्या संग्रहानें अनेक ग्रंथांचें श्रेय येणार आहे

यांत संशय नाहीं. कारण कर्मविपाकादि सर्व उपयुक्त विषयांची बिलकूल उणीव ठेविली नाही हा ग्रंथ रचण्याचा प्रकार झाला. आतां बहुतेक नामांकित वैद्यांकडून आजपर्यंत ज्या ज्या आनुभविक व भरंवशालायक सूचना महत्प्रयासानें मिळविल्या आहेत, त्या स्वानुभवसिद्ध अशांचें दिग्दर्शन संक्षिप्त रीतीनें पुढें दिलें आहे.

**निदान**—आतां इतकी जरी निरनिराळ्या ग्रंथकारांनीं निदानें सांगितलीं आहेत तरी तीं सर्व लक्षणें प्रत्येक रोगाचेठायी होतात असें नाहीं व हीं तरी निदानें सांगणारांनीं ग्रंथविस्तारभयास्तव साग्र न सांगतां त्याचा मुख्य मुख्य भेद काढून अगदीं संक्षिप्त रीतीनें सांगितलेलीं आहेत. या मानावरून पुढें वैद्यांनीं स्वबुद्धीनें व स्वानुभवानें त्याचें निदान ठरविलें पाहिजे. त्यांत एक मात्र गुरुकिल्ली पक्की ध्यानांत ठेवण्यासारखी आहे ती अशी कीं, प्रत्येक निदानाचे आरंभीचीं एक दोन किंवा ३ लक्षणें ही तर अवश्य व्हावयाचीच. ह्मणजे वातज्वर असतां ज्वर कमजास्त होणें, शोष व निद्रा न येणें, पित्तज्वर असतां तीव्रज्वर, अतिसार, अल्प निद्रा व कफज्वर असतां ज्वराचा वेग मंद असे प्रकार जाणावे. यांत मात्र बहुधा फरक पडत नाहीं. पुढील लक्षणें मात्र केव्हां केव्हां कमीजास्त होतात.

**चिकित्सा**—इचें मान निदानाप्रमाणेंज जाणावें. औषधी प्रयोगांतील पहिल्या एक दोन औषधांवरच बहुधा सर्व प्रयोग अवलंबून असतो. करितां तीं औषधें उत्तम असून खात्रीचीं असावीं. काढे, चूर्णें वगैरे यांस काष्ठौषधी वाणी लोकांचे दुकानांतून विकत आणण्याचा प्रघात पडला आहे. परंतु ती रीत अगदीं वैद्यशास्त्रविरुद्ध आहे असें समजलें पाहिजे. कारण त्यांच्या येथील औषधी सर्व असाव्यातशा मुळीच नसतात असें म्हटलें तरी चालेल. कारण कांहीं कोंवळ्या, कांहीं कीड लागलेल्या, कांहीं हीनवीर्य झालेल्या, कांहीं परीक्षा बरोबर होऊन न आलेल्या, असा अनेक प्रकारचा कमीपणा त्यांत असल्याचा संभव असल्यामुळें त्या व्हाव्या तशा गुणावह होत नाहींत. काष्ठौषधी यांचा उपयोग ६ महिन्यांचे आंत न झाल्यास त्या हीनवीर्य होतात.

दुसरें असें कीं, एखाद्या वनस्पतीचें नांवरूप तर सारखेंच, परंतु देश भिन्नभूमीमुळें अन्य गुण होतात. यद्यपि औषधें जरी खात्रीपूर्वक मिळालीं आणि तीं तयार करण्याचे कामीं यत्किंचित् जरी कमीपणा झाला तरी तीं गुणावह होत नाहींत. कारण, काढे वगैरे तयार करण्याचें काम वैद्याकडे नसतें ह्मणून असा प्रकार होण्याचा संभव असतो. कित्येकांचें ह्मणणें वनस्पतींत गुण राहिला नाहीं. परंतु वास्तविक पाहिलें असतां हा प्रकार वरप्रमाणें हयगईमुळें व औषधीच्या कमीपणामुळें वगैरे घडतो. सारांश, चतुर व कुशल वैद्यास जसें यश मिळतें तसें इतरास मिळणें कठिण. मग ते पढीक असोत किंवा नसोत.

या ग्रंथांत महामारी, बालांचे सर्व रोग, स्त्रियांचे रोग, पाक व पदार्थांचे गुण-

दोष वगैरे विषय घेतले नाहींत. कारण त्या सर्वांवर आम्हीं अनुभवशीर व साग्र माहितींचे निरनिराळे ग्रंथ छापून प्रसिद्ध केले आहे. ते या पुस्तकाचे पृष्ठावर प्रारंभीच दर्शविले आहेत.

या ग्रंथांत जीं निदानें व चिकित्सा घेतल्या आहेत त्या निवडक व बहुत वैद्यांचे अनुभवास आलेलीं व बहुत नामांकित वैद्यानें पसंत केलेले तेवढेच प्रयोग यांत घेतले आहेत. त्यांत अपरिचित वनस्पतींचे व मोठे भानगडींचे व महत्प्रयासानें सिद्ध होणारे असे जे दुरापास्त प्रयोग ते तर मुळींच घेतले नाहींत. कारण तशा औषधी मिळत नाहींत व उगीच कष्ट मात्र होतात. म्हणून अनुभवशीर सगळ्या ठिकाणीं मिळण्यासारख्या व ओळखीच्या अशाच औषधींचा मात्र संग्रह केला आहे असें जाणावें.

विधिपूर्वक औषध दिल्यानें खचित गुण येतो तो असा—प्रथम रोगपरीक्षा करून रोग्याचें व रोगाचें बलाबल पाहून तसे देश कालवर्तमान पाहून त्यास प्रथम दूध, तूप, वगैरे स्नेह पदार्थ पाजून त्याचा कोठा स्निग्ध करून नंतर घाम काढावा. त्यानंतर ओकारीचें औषध देऊन, नंतर पुढें उत्तम प्रकारचें ढाळक द्यावें. अशा प्रकारें रोग्याचें शरीर प्रथम शुद्ध करून नंतर ऋतुपरत्वें औषधाची उत्तम योजना केली असतां गुण कसा येणार नाहीं ? कारण क्षेत्र शुद्ध झाल्याखेरीज बीजारोपण चांगलें व्हावयाचें नाही, ह्मणजे जें होतें तें अगदीं निर्बल होतें. हाच विचार रोग्याचेठायीं जाणावा. परंतु हा क्षेत्रशुद्धीचा प्रकार सांगितला आहे तो सन्निपात, प्राणांतीच्या वेळी अति अशक्त, क्षीण, अति ह्मातारा, बाळक, गर्भिणी वगैऱ्यांस लागू नाहीं असें जाणावें.

रोग उत्पन्न होतांच त्याचें शमन करावें हा उत्तम मार्ग, परंतु सांप्रत असें पाहण्यांत येतें कीं, रोग असाध्य झाल्यावर ( द्रव्याचे अनुकूलतेमुळें म्हणा किंवा हयगईमुळें म्हणा ) मग लोक वैद्यांकडे जातात. मग अर्थात् उपाय जसे लागू पडावेत तसे पडत नाहींत. कारण कांहीं रोग तर असे आहेत कीं, ते उत्पन्न होतांच कष्टसाध्य किंवा असाध्य होतात. व साधारण ग्रंथांतील औषधें सुखसाध्य व कष्टसाध्यरोगांवरील आहेत, असाध्य रोगांवरील नाहींत. कारण एकदां रोग असाध्यस्थितींत गेला मग त्याजवर जरी शतशः उपाय केले व सहस्र औषधी दिल्या, आणि त्या जरी रामबाण असल्या तरी त्यापासून यत्किंचित्‌ही गुण यावयाचा नाही. जसें झाडावरील फळ एकदां सडल्यावर किंवा पिकल्यावर तें अवश्य गळून पडावयाचेंच. मग त्यावर पूर्व स्थितींत म्हणजे अपक्व होण्यास व टणक होण्यास कसा उपाय चालेल. हाच निश्चय रोगाचे ठिकाणी जाणावा. जेवढे ह्मणून रोग औषधानें बरे होतात ते केवळ सुखसाध्य किंवा कष्टसाध्य असतात. सारांश असाध्यरोगावर मुळींच औषध नाहीं. आणि जर चांगला झालाच तर केवळ दैवगति किंवा पूर्व पुण्याई समजली पाहिजे.

रोग्याचे स्थितीकडे लक्ष न पोंचवितां अमुक औषध गुणावह होत नाहीं, असा दोषारोप करणें केवळ अविचाराचें होईल. कारण कांहीं रोग धास्तीनें व शंकेनें असाध्य होतात. परंतु त्यांची धास्ती किंवा शंका त्याच स्थितींत नाहींशी झाली तर ते पुन्हां औषधावांचून साध्यस्थितींत येतात. हा एक निदानाचा पोटभेद समजला पाहिजे. धास्तीनें व शंकेनें जे रोग वाढतात त्यांचें संक्षिप्त वर्णन अतिसार, ज्वर, मोडशी, ( माहामारी ) पांडु, क्षय, मधुमेह, मस्तकरोग, वांति, पोटशूळ, संग्रहणी, हृद्रोग इत्यादि हे रोग धास्तीनें अधिक होतात, आणि शीतपूर्वक ज्वर, ( हिंवताप ) व मेदोरोग, वगैरे कांहीं रोग धास्तीनें व काळजीनें कमी होतात.

जो मनुष्य अगदीं कोमळ अंतःकरणाचा ( भित्रा ) मनाचा धाडस नव्हे अशा मनुष्याचा रोग धास्तीनें वाढतो. मग त्याजवर जरी शेंकडो औषधें दिलीं तरी त्यांपासून त्यास यत्किंचित्‌ही गुण न येता रोग वाढतो. करितां अशा प्राण्याची हरप्रकारानें मनांतील रोगाची धास्ती निघून जाईल असे उपचार व आश्वासन वगैरे देऊन धास्ती मनांतून काढून टाकावी. जसा शोकातिसार शोक नष्ट झाल्याशिवाय शांत होत नाहीं तोच हेतु येथें जाणावा. त्याचप्रमाणें शंका बाळगणाऱ्या मनुष्याचे मनांतील शंका वैद्यानें हरउपायानें काढून टाकावी. यावरून जो वैद्य रोग्यास धास्ती घालतो तो महा अधम समजला पाहिजे. शंकायुक्त रोग्यास मोठें रामबाण जरी औषध दिलें तरी त्यापासून बिलकूल गुण यावयाचा नाहीं. तर येथें कोणी अशी शंका घेईल कीं जर औषध खरें आहे तर शंकेनें त्याचें गुण कसे कमी होतील ? तर यांत काय मोठें आश्चर्य आहे. शंकेनें कित्येक ठिकाणीं विषाप्रमाणें झुरणीस लागून व कित्येक तसेंच प्राणासही मुकले आहेत. “ लालायाः स्पर्शतस्तद्वत्तथाशंकांविषंमतं ” ह्मणजे मनामध्यें कांहींएक विषयाची शंका येऊन त्यापासून वायु कुपित होऊन साऱ्या अंगाला सूज व ज्वरादिक उपद्रव होतात. त्याला प्रत्यक्ष शंकाविष असें म्हणतात. असें पूर्वींचेच धन्वंतरीनें प्रसिद्ध करून ठेविलें आहे.

कांहीं असमंजस वैद्य रोग्यास जवळ जाऊन हा रोग असाध्य आहे म्हणून त्या रोग्याच्या समक्ष त्याचे आप्तवर्गास सांगून लागलेंच निघून जातात. मग काय विचारावें, महिन्यांत मरणार असला तर आठ दिवसांतच धास्तीनें समाप्त व्हावयाचा. याकरितां रोग्याचें असाध्यत्व किमपिही सांगूं नये. याजवर ऋषीचें वाक्य आहे तें असें. ॥ **नब्रूयान्मरणंभिषक्** ॥ अर्थ—ह्मणजे वैद्यानें रोग्याचें मरण सांगू नये. इतकेंच नव्हे परंतु रोग्याचें प्राणोत्क्रमण होईतोंपर्यंत उपाय करावे. असाध्य म्हणून सोडून जाऊं नये. यास प्रमाण—॥ **तावत्प्रतिक्रियाकार्यायावच्छ्वसितिमानवः** ॥ अर्थ—रोगी जोंपर्यंत श्वासोच्छ्वास सोडतो तोंपर्यंत औषध द्यावें, तात्पर्य रोग्याचें औषध बंद करूं नये व त्यास मरण सांगूं नये.

असाध्यरोग केव्हां होतात तें पुढें ठिकठिकाणीं सांगितलेंच आहे. तथापि द्धांत रोग्यास कळूं देऊं नयेत. हे वैद्यशास्त्राचे सिद्धांतच आहेत असें समजावें.

१ अजीर्णापासून मोडशी ( माहामारी ) होऊन वऱ्याच ढाळ ओकाऱ्या किंवा एकदां शक्तिपात होऊन पोट फुगलें, किंवा गार घाम चालला कीं रोगी समाप्त.

२ वृद्ध मनुष्याचा अतिसार असाध्य. तरुण मनुष्याच्या अतिसारास प्रेत कुजल्यासारखी घाण व सूज आली म्हणजे असाध्य. कारण सूज रेचनाशिवाय नाश पावत नाहीं; आणि अतिसारास स्तंभन औषधें पाहिजेत म्हणून.

३ अन्न वर्ज करणारा अपस्मारी वांचत नाहीं.

४ नाभी व वृषण यांस सूज असून मूत्राघात झाला असतां अश्मरी रोगी प्राण सोडितो.

५ फार दिवसांचा आम्लपित्तरोगी साध्य होत नाहीं.

६ वृद्ध, क्षीण, व अन्न वर्ज करणारी हिक्का ह्मणजे उचकी असाध्य.

७ सर्व उदरें उत्पन्न होतांच प्रायः असाध्य जाणावी. त्यांत अन्नद्वेष, सूज आणि अतिसार झाला असतां तात्काळ मरण येतें.

८ ज्यानें अन्न वर्ज केलें, आणि झोंप मुळींच उडाली असा उन्मादरोगी असाध्य.

९ शिश्न गळून गेलेला उपदंशरोगी असाध्य.

१० दाह, शूळ, आणि कंप असा ऊरुस्तंभ असाध्य.

११ मूर्च्छा, दाह, ज्वर व वांति यांनीं युक्त असा कर्णरोगी असाध्य.

१२ मलमूत्र लाल असून सर्वांगास सूज आली असतां कामला असाध्य.

१३ वृद्ध व अति क्षीण पुरुषाचा कास असाध्य.

१४ हात, तळपाय, ओष्ठ, गुह्यस्थान या ठिकाणचें पांढरें कोड असाध्य.

१५ रोग उत्पन्न होऊन एक वर्ष लोटलें व रोगी अति क्षीण झाल्यास गलगंड असाध्य.

१६ अतिशय मोठा गुल्म वाढून वर उचललेला दिसतो. व रोगी अति क्षीण होऊन ज्वर, खोकला, श्वास व सूज हीं लक्षणें झालीं असतां, आणि गुल्म एकदम पोटांत नाहींसा होऊन शक्तिपात झाला असतां तो रोगी तात्काळ मरण पावतो. गुल्म एकदम नाहींसा होतो ह्म-

णून सांगितलें तर त्याची शंका राहते कीं, त्याचें काय होतें, तर त्याचें समाधान असें आहे कीं तो त्यावेळीं सर्व अंगांत वायुरूपें पसरतो त्यामुळें तसा भास होतो.

१७ पिनसादि उपद्रवानें झालेली गंडमाळा असाध्य.

१८ पीडारहित मोठा मर्मस्थानीं झालेला असा ग्रंथि असाध्य.

१९ हात, पाय, किंवा सर्व अंग थंड, गळ्यापर्यंत घाम व केवळ मुखानें श्वासोच्छ्वास सोडणारा किंवा पहाटे तोंडावर मात्र पुष्कळ घाम येतो असा ज्वररोगी असाध्य.

२० अतिक्षीण होऊन ओकारीनें पीडित असा तृषारोगी असाध्य.

२१ रोग्याचें सर्व अंग थंड झालें असतां सर्व प्रकारचे दाह असाध्य.

२२ क्षीण असून सूज, अतिसार, वांति व तृषा, यांनीं पीडित पांडुरोगी असाध्य.

२३ पितृदोषापासून उत्पन्न झालेला मधुमेह असाध्य, बाकीचे कष्टसाध्य.

२४ ज्या भगंदरांतून वायु, मूत्र, व मळ वगैरे येतात तो असाध्य.

२५ मस्तकशूळांत शंखक ३ दिवसांत असाध्य होतो.

२६ ज्वर, सूज व अतिसार यांनीं युक्त मूळव्याधि असाध्य.

२७ जांभळाचे रंगाप्रमाणें रक्त पडणारा रक्तपित्तरोगी असाध्य.

२८ सर्व अंगावर चिरा पडून आंतून लस वाहूं लागली, असतां वातरक्त असाध्य.

२९ सर्व वातरोग उत्पन्न होतांच असाध्य नवीन असला तर कदाचित् साध्य होतो.

३० ज्या रोग्याची वांति मोठे वेगानें होऊन तीस विष्ठेची घाण येते व मूत्राचा दुर्गंध येतो व तृषा, श्वास यांनीं युक्त असा वांतिरोगी असाध्य.

३१ हृदय. नाभी आणि बस्ति यांजवर झालेला आणि ज्याचें मूत्र कोंडतें त्यांचा विद्रधि असाध्य.

३२ शिश्नाचें मांस गळून पडूं लागलें असतां शुकरोग असाध्य.

३३ मांस, बळ व अग्नि क्षीण झालेला शूळरोगी असाध्य.

३४ दुर्बळ झालेल्या श्वासरोग्याचा बिलकूल भरंवसा नसतो.

३५ वारुळासारखें वाढून वर कांटे आलेले श्लीपद असाध्य.

३६ अतिसाराचे असाध्य लक्षणांनीं संग्रहणी असाध्य.

३७ बहुत दिवसांचा व क्षीण पुरुषाचा स्वरभेद असाध्य-

३८ वृषण व उदर यांस सूज आली व अतिसार झाला असतां क्षय असाध्य.

सन्निपातप्रकोप व कफप्रकृतीचा मनुष्य, या दोघांस लंघन सहन होतें, ह्मणजे कितीही उपाशी ठेविलें तरी त्यापासून त्यास भय होत नाहीं. कारण शरीरांत दोष आहेत म्हणून तेच पुढें दोष क्षीण झाल्यावर या दोघांस एक घटकाही लंघन सोसणार नाहीं. हे सर्व विचार या प्रस्तावनेंत सुज्ञांस यथामतीनें श्रवण करवून ग्रंथरचना केली आहे. तरी यांतील दोषाचा त्याग करून गुण ग्रहण करावें ही ग्रंथकर्त्याची विनयपूर्वक सर्वांस प्रार्थना आहे.

हा ग्रंथ तयार करण्याचे कामीं ज्या ज्या नेटिव वैद्यांनीं इंग्लिश डाक्तरांनीं आणि मित्रमंडळींनीं योग्य मदत देऊन वेळोवेळी सूचना केल्या त्यांबद्दल त्यांचा हा ग्रंथकार फारच आभारी आहे.

रंगनाथ सखाराम,

ग्रंथकर्ता.



| विषय. | पृष्ठ. |
|---|---|

## भाग १ ला.


| | | |
|---|---|---|
| १ | शारीरप्रकरण..... .... | १ |
| २ | मनुष्याच्या प्रकृतीचीं लक्षणें | ८ |
| ३ | वैद्यलक्षण... .... ... | ११ |
| ४ | दूतपरीक्षा.. .... .... | १५ |
| ५ | वैद्यास शुभाशुभ शकुन.... | १६ |
| ६ | स्वप्नपरीक्षा... .... .... | १७ |
| ७ | अष्टविधपरीक्षा (नाडी इ.) | १८ |
| ८ | साध्यासाध्य विचार. .... | २२ |
| ९ | कालज्ञान .. .... .... | २३ |
| १० | ज्योतिषअभिप्राय.. .... | २५ |
| ११ | सामुद्रिकलक्षण .... .... | २६ |
| १२ | दिनचर्या.... .... .... | २६ |
| १३ | ऋतुचर्या. ... .... | ३५ |
| १४ | वृद्ध क्षीण दोषाचीं लक्षणें.... | ३७ |
| १५ | सहा रसांचे गुण. .... | ४२ |
| १६ | विरुद्धाशन. .... .... | ४४ |
| १७ | औषधिगण. .... .... | ४६ |
| १८ | औषधीगुण. .... .... | ४८ |
| १९ | देशकाललक्षण .... .... | ५१ |
| २० | औषधीयुक्तायुक्तविचार .... | ५२ |
| २१ | औषधी आणावयाचा प्रकार | ५२ |
| २२ | शुद्ध औषधी घेण्याचा प्रकार.... .... .... | ५३ |
| २३ | औषधिप्रतिनिधि. .... | ५३ |
| २४ | औषधभक्षणाचें प्रमाण.... | ५५ |
| २५ | औषधी तयार करण्याचे प्रयोग. .... .... | ५५ |


| विषय. | पृष्ठ. |
|---|---|


| | | |
|---|---|---|
| २६ | पंचकषाय, हिम, फांट इ. | ५५ |
| २७ | स्नेहपाक. .... .... | ५८ |
| २८ | औषधीसेवनकाळ. .... | ५९ |
| २९ | औषधादिकांचेठायीं मुहूर्त. | ६० |
| ३० | स्नेहविधि. .... .... | ६१ |
| ३१ | स्वेदविधि. .... .... | ६४ |
| ३२ | दोषसंचयावर योजना ... | ६८ |
| ३३ | वमनविधि. .... .... | ६९ |
| ३४ | रेचनविधि. .... .... | ७५ |
| ३५ | बस्तिविधि. .... .... | ८५ |
| ३६ | नस्यविधि. .... .... | ९९ |
| ३७ | धूमपानविधि. .... .... | १०३ |
| ३८ | गंडूषविधि. .... .... | १०५ |
| ३९ | रक्तस्रावविधि. .... .... | १०७ |
| ४० | शिरावेध. .... .... | १०९ |
| ४१ | दंभविधि. .... .... | ११४ |
| ४२ | पोतविधि. .... .... | ११६ |
| ४३ | क्षारविधि. ... .... | ११७ |
| ४४ | त्रिदोषाचा प्रकोप व शम. | ११९ |
| ४५ | अजीर्णपाचन प्रकरण .... | १२० |
| ४६ | रोगशुश्रूषा. .... .... | १२३ |
| ४७ | रोगज्ञानाचे पांच उपाय. | १२४ |


## भाग २ रा.


| | | |
|---|---|---|
| १ | अजीर्ण.... .... .... | १२९ |
| २ | अतिसार ( हगवण ).... | १३५ |
| ३ | अपस्मार ( फेंपरें, घुरें )... | १४५ |
| ४ | अर्बुद ( अवाळूं ). .... | १४८ |

| विषय. | पृष्ठ. |
|---|---|
| ५ अरुचि. .... | ....१५० |
| ६ अश्मरी ( मूतखडा ) | ....१५२ |
| ७ अस्थिभंग.... .... | ....१५७ |
| ८ अंडवृद्धि. .... | ....१५९ |
| ९ आनाह ( मलबद्धरोग ) | ....१६३ |
| १० आमवात ( आमवायु ) | ....१६४ |
| ११ आम्लपित्त. .... | ....१६७ |
| १२ उचकी.... .... | ....१७० |
| १३ उदर.... .... | ....१७४ |
| १४ उदावर्त. .... | ....१८४ |
| १५ उन्माद.... .... | ....१८८ |
| १६ उपदंश (गरमी).... | ....१९४ |
| १७ ऊरुस्तंभ. .... | ....२०५ |
| १८ कर्णरोग. .... | ....२०७ |
| १९ कफरोग. .... | ....२१२ |
| २० कामला. .... | ....२१५ |
| २१ कास ( खोकला ). | ....२१८ |
| २२ कुष्ठरोग ( कोड ) | ....२२५ |
| २३ कृमि ( जंतविकार ) | ....२३१ |
| २४ गलगंड. .... | ....२३४ |
| २५ गुल्म ( वायगोळा ). | ....२३६ |
| २६ गंडमाळा.... .... | ....२४२ |
| २७ ग्रंथी. .... .... | ....२४३ |
| २८ ज्वर ( ताप ) ... | ....२४५ |
| २९ तृषा..... .... | ....२९६ |
| ३० दाह. .... .... | ....२९९ |
| ३१ नारु. ... .... | ....३०१ |
| ३२ नासारोग ( नाकाचे रोग ) | ३०२ |
| ३३ नेत्ररोग.... ... | ....३०६ |
| ३४ पांडुरोग. .... | ....३१२ |
| ३५ पित्तरोग. .... | ....३१८ |
| ३६ प्रमेह (मेह, परमे). | ....३२० |
| ३७ भगंदर.... .... | ....३३४ |
| ३८ मस्तकरोग ( शिरोरोग ) | ...३३७ |
| ३९ मुखरोग.... .... | ....३४३ |
| ४० मूर्च्छा...... .... | ....३५३ |
| ४१ मूत्रकृच्छ्र ( उन्हाळी ) | ....३५५ |
| ४२ मूत्राघात ( मूत गुंतणें ) | ....३५९ |
| ४३ मूळव्याध ( अर्श ) | ....३६३ |
| ४४ मेद ( अंग लठ्ठ होतें तो रोग ). .... | ....३७२ |
| ४५ रक्तपित्त. ... | ....३७४ |
| ४६ वातरक्त ( महारोग ) | ....३७९ |
| ४७ वातरोग ( सर्व वायु ) | ....३८२ |
| ४८ वांति .... .... | ....४०२ |
| ४९ विषरोग.... .... | ....४०६ |
| ५० विद्रधि ... ... | ....४०८ |
| ५१ विसर्प .... .... | ....४११ |
| ५२ विस्फोट.... .... | ....४१४ |
| ५३ व्रणरोग नासरू इ० | ....४१६ |
| ५४ शीतपित्त. .... | ....४२१ |
| ५५ शुक्ररोग. .... | ....४२२ |
| ५६ शूल पोटशूळ .... | ....४२३ |
| ५७ श्वास ( दमा ).... | ....४२८ |
| ५८ श्लीपद ( वारुळ ). | ....४३३ |
| ५९ सूज (शोथ) .... | ....४३५ |
| ६० संग्रहणी.... .... | ....४३९ |
| ६१ स्वरभेद .... .... | ....४४४ |
| ६२ हृद्रोग ... .... | ....४४५ |
| ६३ क्षयरोग.... .... | ....४४८ |
| ६४ क्षुद्ररोग ... ... | ....४५७ |


## भाग ३ रा.


१ सप्तधातूंची शुद्धि व मारण.४५९

२ सप्तउपधातूंची शुद्धि व मारण ४६२

| विषय. | पृष्ठ. |
|---|---|
| ३ पारदविधि. .... | ... ४६६ |
| ४ गंधकविधि. .... | .... ४६९ |
| ५ औषधांची शुद्धि .... | .... ४७१ |
| ६ पुटं देण्याचा प्रकार. | .... ४७४ |
| ७ यंत्रें .... .... | .... ४७४ |
| ८ मात्रा व रसायनें वर्णानुक्रमें .... .... | .... ४७६ |
| ९ गुटिका .... .... | ... ५०३ |
| १० चूर्णें .... .... | .... ५०५ |
| ११ गुग्गुळ .... .... | .... ५१६ |
| १२ घृतें .... .... | .... ५१९ |
| १३ तैलें .... .... | .... ५२३ |
| १४ आसवें व आरिष्टें.. | .... ५३० |
| १५ धातुपुष्टीचीं औषधें. | .... ५३५ |
| १६ अनुपान प्रकरण वर्णानुक्रमानें .... .... | .... ५३७ |
| १७ गुणदोषवर्ग. .... | .... ५७५ |
| १८ पोतविधि. .... | .... ५८१ |
| १९ पारा वगैरे रसायन उतरणें. | ५८१ |
| २० क्षार काढण्याची रीति | .... ५८२ |
| २१ तेल काढण्याचा प्रकार | .... ५८३ |
| २२ गुळवेलीचें सत्व .... | .... ५८३ |

# कठिण शब्दांचा कोश.

अ

अ०—ह्मणजे अथवा.
**अतिसार**—हगवण.
**अग्निदोष**—मंद, तीक्ष्ण, वगैरे जठराग्नी-चे विकार.
**अग्निकर्म**—डाग देणें.
**अग्निदीपक**—अग्नि प्रदीप्त करणारें.
**अजवला**—रानतुळस.
**अजांत्री**—१ वरधारा, २ बोकडी, ३ फंजी ४ ह्मैसवेल.
**अढरूप**—अडूळसा.
**अंगमर्द**—अंग ठेंचल्यासारखी पीडा.
**अतिबला**—मुद्रेच्या जातीची एक वनस्पती आहे.
**अत्यशन**—अधिक भोजन
**अनुवासन**—गुदद्वारास द्यावयाची स्नेहयुक्त पिचकारी.
**अनूप**—जेथें झाडी व पाणी फार आहे असा देश किंवा महामृग, जलचर व मत्स्य हे प्राणी.
**अनुलोमन**—मलादिक यथामार्गांनें जाण्याचा उपाय.
**अनामिका**—करांगुलीजवळचें बोट.
**अन्यद्दुष्कज्वर**—रोज येणारा हिंवताप.
**अदिमंथ**—श्वेत बुबुळावरचा दृष्टिरोग.
**अध्यशन**—पूर्वी खाल्लेलें जिरलें नाहीं, तोंच पुनः दुसऱ्यानें खाणें
**अपाचि**—गंडमाळेचा एक भेद आहे.
**अपस्मार**—फेंपरें, धुरें, मिरगी.
**अपक्क**—कच्चा, चांगला पक्क न झालेला.
**अभया**—हिरडा.
**अभिघात**—धक्का किंवा मार लागणें.
**अभिचार**—करणी, चेटुक.
**अभिष्यंदी**—नेत्रादि स्रोतसांत लाली व स्राव उत्पन्न करणें.
**अभिष्पंदी**—कफकर पदार्थ दहीं वगैरे.
**अभ्यंग**—अंगास तेलादि स्नेह चोळून लावणें.
**अरिष्ट**—औषधांनी सिद्ध केलेलें मद्य.
**अर्दितवायु**—तोंड व हनुवटी यांस वांकडें करणारा वायु.
**अर्म**—पांढऱ्या बुबुळावरून काळ्या बुबुळाकडे पसरणारा एक रोग.
**अर्बुद**—आवाळूं.
**अर्श**—मूळव्याध.
**अवगाहन**—१ बुडविणें, २ प्रवेश.
**अवपीडा**—कुसकरणें, चुरणें.
**अवलेह**—औषधादिकांचे काढे इ० पुन्हा आटवून काकवीसारखें घट्ट करितात तें [ चाटण. ]
**अवष्टंभ**—अवरोध.
**अविदाही**—दाह न करणारे पदार्थ.
**अव्यक्त**—१ चवरहित, २ अस्पष्ट.
**असात्म्य**—१ संवय नसणारें, २ दुर्गंध, ३ न सोसणारा पदार्थ.
**असृग्दर**—रक्तप्रदर, तांबडी धुपणी.
**अश्मरी**—मुतखडा.
**अष्ठीला**—नाभीचे अधोभागीं दगडासारखी गांठ येते तो वायुरोग.
**अक्ष**—१ तोळा वजन, २ बेहडा.

**अक्षीपाक**–डोळे चिघळणें [नेत्रपाक].
**आढक**–४ शेर किंवा २५६ तोळे.
**आग्या**–काचकुहिली.
**आतप सेवन**–ऊन घेणें.
**आध्मान**–पोट फुगणें.
**आनाह**–मलबद्धरोग.
**अपामार्ग**–आघाडा.
**आम**–आवरक्त, अपक्क, कच्चें.
**आमवात**–आमवायु.
**आम्लवर्ग**–कोंकळ [ अमसूल ] चिंच, लिंबू, हरबऱ्याची आंब इत्यादि आंबट पदार्थ.
**आर्तव**–स्त्रीरज [ विटाळ ].
**आर्द्र**–ओलसर.
**आलसक**–महामारीचा एक भेद आहे.
**आवृत**–आवरणानें युक्त, आच्छादित,
**आशय**–१ स्थान, २ अन्नकोश, ३ हेतु.
**आश्चोतन**–डोळ्यांत पातळ औषधाचे थेंब सोडणें.
**आसव**–मद्य १, धान्याम्ल २, औषध व पाणी एकत्र करून तयार केलेलें औषध.
**ओज**–शरीरांतील सर्व धातूंचे सार हे शुक्रधातूपासून उत्पन्न होतें असें मानलें आहे.
**आरग्वध**–थोर वाहवा.
**अंगरस**–ओली वनस्पति कुटून जो रस निघतो तो.
**अंगग्रह**–अंगविक्षेप [ अंग वेडें वांकडें करणें ].
**अंजली**–१ ओंजळ, २–बत्तीस तोळे पर्याय शब्द, मानिका, शराव, आणि अष्टपल.
**अंगुष्ठ**–अंगठा.

इ

**इंद्रजव**–इंद्रजव [ कुड्याचें बीज. ]
**इंद्रवस्ती**–घोट्यापासून वर १२ बोटांवर असलेलें मर्म.
**इंद्रलुप्त**–चाई, टक्कल.
**इंद्रवारुणी**–लघु व थोर कौंडळ, वेलफळासारखीं तांबडीं फळें असतात तीं.
**इंद्रावण**–कडू इंद्रावण याचे वेल असून त्यास वेलफळाएवढीं पिंवळीं फळें येतात तीं अतिशय कडू असतात.
**इ०**–इत्यादि.

उ

**उ०**–उपाय, उदाहरण व उत्तर.
**उत्क्लेद**–मळमळणें, उलटी होईलसें वाटणें.
**उत्तान**–त्वचेपासून फार खोल नव्हे तें.
**उत्सर्ग**–बाहेर काढून टाकणें, झाडा करणें.
**उद्वर्तन**–अंगास उटणें लावणें.
**उपस्थ**–लिंग.
**उद्गार**–ढेंकर.
**उद्वेग**–१ चांचल्य, २ ऊर्ध्व वेग.
**उन्माद**–उन्मत्तवायु.
**उपदंश**–गर्मीचा आजार जो शिश्नास होतो तो [ दुःख भरणें. ]
**उदावर्त**–उदावर्तवायु.
**उपळसरी**–१ कावळी, २ तुंतुणी, ३ पांढरी कावळी.
**उपशम**–शांति.
**ऋद्धि**–मुरडशेंग, [ केवणीच्या शेंगा ] हिच्या अभावी डुकरकंद देखील घेतात.

क

**कटुनिंब**–बाळंतनिंब.

**कटू**—तिखट.
**कनिष्ठिका**—करांगुली.
**कज्जली**—गंधक व पारा एकत्र करून खलून काजळासारखी करितात ती.
**कबाबचिनी**—नाकेशर.
**कमळाक्ष**—कमळकाकडी, कमळबीज.
**करढोक**—एक पक्षी आहे त्यास करकोचाही ह्मणतात.
**कर्णनाद**—कानांत नाद होणारा रोग.
**कर्ष**—दहा मासे.
**कर्शन**—१ कृश करणें, २ लंघन.
**कलश**—भांडें.
**कला**—शरीरांतील पातळ त्वचा.
**कल्क**—ठेंचलेलें ओलें औषध.
**कलौंजी जिरें**—काळें जिरें [शहाजिरें].
**कवचबीज**—कुहिरीचें बीं.
**कवल**—गुळणी, गंडूष, घास.
**कषाय**—१काढा, २ तुरट.
**कळलावी**—खड्यानाग.
**कटिभ**— एक कुष्ठाचा भेद आहे.
**काकजंघा**—१कांग, २ लघुकावळी.
**काकडशिंगी**—जंगली हिरड्याचें फूल.
**काकमाची**—१ काकजंघा, २ लघुकावळी.
**कामला**—कांवीळ, कामीन, हळद्यारोग.
**कामोदीपक**—जीं औषधें शुक्रधातुला वाढवून स्त्रीसंभोगाविषयीं हर्षयुक्त देतात ती.
**काळेंजिरें**—कडूजिरें, रानजिरें.
**काजरा**—कुचला.
**कास**—खोकला.
**कंकरी**—देवबाभूळ, सुरूचे झाडासारखी नीट असते ती.
**कंडरा**—दोरीसारखे पांढरे स्नायू.
**कंठ्य**—कंठास हितावह.
**कंकोल**—कापूरचिनी, शीतळचिनी.
**कांकोली**—ही वनस्पति मिळत नाहीं करितां हिचे अभावीं आस्कंद घ्यावा.
**कांजी**—तुषोदक, धान्याम्ल ( ह्मणजे तांदुळादिकाची पेज काढून एका मडक्यांत घालून त्याचें तोंड बांधून दोन तीन दिवस तसेंच राहुंद्यावें ह्मणजे आपोआप जी पेज आंबते ती.
**कार्श्य**—कृशपणा.
**किलास**—पांढरें कोड.
**किलाट**—ताकाची निवळ.
**कुडव**—१६ तोळे. पर्याय शब्द अंजली, अर्ध शराव, अर्धमान.
**कुमारी**—कोरफड.
**क्रव्याद**—मांसभक्षक प्राणी.
**क्रूर**—१जड, २दुष्ट, ३ निर्दयपणाचें कृत्य.
**कुलीथ**—हुलगे.
**कूष्मांड**—कोहळ्याचें फळ.
**कुष्ठ**—कोड
**कृच्छ्रसाध्य**—कष्टसाध्य.
**क्रिमि**—जंतु, किडे.
**क्लम**—१ पितरोग, २ श्रम, ३ अनायासानें जो श्वास उत्पन्न होतो तो.
**कोल**—सहा मासे.
**कोरकांडें**—कोरफड.
**कोलिस्ता**—तालीमखाना.
**क्लेद**—द्रवांश, जलांश.
**केश्य**—केशाना हितावह.
**कोष्ट**—कांटेधोत्र्याचें मूळ, चोख.
**कोद्रु**—हरीक.
**कोविदार**—बाहावा.
**क्लोम**—पिपासास्थान.
**कोळिंजन**—जुने नागवेलीचेंमूळ.
**कंकुष्ट**—मुरदाडशिंग.

**क्वाथ**—काढा.

**कोकंव**—अमसूल.

ख

**खरसंवळी**—आवईच्या शेंगा.

**खारी**—१६३८४ तोळे.

**खुरासनी तीळ**—काऱ्हळे तीळ, हे दक्षिण प्रांती होतात.

ग

**गलग्रह**—घसा धरणें.

**गरुडवेल**—गुळवेल.

**गरोळ**—गुळवेल.

**गलशुंडी**—टाळूरोग.

**गांगेरु**—गोंधण.

**गुद**—मळविसर्जनस्थान.

**गुदकील**—मूळव्याध.

**गुरु**—जड.

**गुल्फ**—घोटा.

**गुल्म**—वायगोळा, गोळा.

**गोजिव्हा**—पाथ्री.

**गौरव**—१ कफरोग, २ अंग जड होणें.

**ग्राही**—अग्नि प्रदीप्त करणारी औपधें

**ग्रह**—१ वेणें, २ सूर्यादि ग्रह, ३ हेतु, ४ विरोध, ५ दमा.

**ग्रंथि**—गांठ, करट, कैंसतोडें, उठाणूं.

**गंधसार**—१ चंदन, २ कापूरकाचरी, ३ गंधक. ४ मोगरा.

**गंडूष**— चूळ भरून टाकणें.

**ग्रीष्मऋतु**—ज्येष्ठ, आपाढ.

घ

**घोट बोर**—मोठें बोर

च

**चवळाई**—तांदूळजा.

**चतुरूपण**—सुंठ, मिरीं, पिंपळी व पिंपळमूळ-

**चर्मदल**—एक प्रकारचें कुष्ठ.

**चक्षुष्य**—नेत्रांना हितावह.

**चातुर्जात**—दालचिनी, तमालपत्र, एलची व नाकेशर.

**चिकित्सा**—रोगांवर उपाय करणें.

**चिकणा**—लहान व मोठे पानाचा.

**चिरफळ**—तिरफळ.

**चिरुंजी**—चारोळी.

**चिभूड**—गोरखकाकडी.

**चोरख**—पिसोळा, कोट, घोड्याचें मूळ, कोष्ठ.

**चोष्य** – चोखून खाण्याचे पदार्थ.

**चंद्रजोत**—मोगली एरंड.

छ

**छर्दि**—वांति, ओकारी.

**छेदन**—रोग छेदणारी औपधें.

ज

**जंवीर**—इडानिंबू निंबू.

**जयंती**—१ थोर ऐरण, २ टाकळी, ३ हळद, ४ शेवरी, ५ जास्वद.

**जत्रु**—छातीचे मधलें हाड.

**जांगलदेश**—उष्ण आणि ज्यांत झाडें व पाणी नाही असा देश.

**जीवक**—ही वनस्पति मिळत नाहीं म्हणून इचे अभावीं भुईकोहळा. घ्यावा.

**जीवनीय गण**—हरणवेल, कांकोली, क्षीरकाकोली, मेदा, महामेदा, मुद्गपर्णी, जीवक, ऋपभक व जेष्ठीमध या सर्व औषधी मिळून जीवनीयगण होतो.

**जिवंती**—गुळवेल १, मोहाचें झाड २, जीवक ३, हरीतकी ४, जीवंती ५, काकोली६, मेदा७,लघुहरणदोडी८,वांदागुळ९,शमी १०.

ट

टाक—पाव तोळा, ३ मासे.
टेंटू—दिंडा.

ड

डोरली—रानवांगी.

त

तंद्रा—झांपड.
तज—दालचिनी.
तर्जनी—आंगठ्याजवळचें बोट.
तर्पण—डोळ्यांवर पातळ तूप वगैरे औषध धारण करणें.
तालीमखाना—विखरा, कोलिस्ता.
तांदुळजा—चवळाई.
तिक्त—कडू.
तिर्यक्—तिरकस, वांकडा.
तिळवण—कानफोडी.
तुला—४०० तोळे.
त्रिक्—माकडहाड. कमरेचेंहाड.
त्रिकटु—सुंठ, मिरीं, पिंपळी.
त्रिकूट—१ समुद्रलवण, २ वांगडखार ३ पर्वत.
त्रिजात—दालचिनी, तमालपत्र, एलची.
त्रिदोष—वात, पित्त व कफ यांचा समुदाय.
त्रिफळा—हिरडा, बेहेडा, आवळकठी यांच्या बिया टाकून समभाग.
त्रिसुगंध—तमालपत्र, एलची व दालचिनी.
त्रिक्षार—जवखार, सज्जीखार व टांकणखार.
तेड—निशोत्तर.
तोद—१ वायु, २ तीव्र व्यथा.
त्र्युषण—सुंठ, मिरीं व पिंपळी.
त्वग्रोग—त्वचेवर होणारा रोग.

द

दक्षिण भाग—उजवी बाजू.
दद्रु—मंडलकुष्ठ.
दंती—जेपाळाच्या जातीचें एक झाड.
दशमुळ—१ रानगांज्या (सालवण) २ पिठवण, ३ रिंगणी, ४ डोरलीमूळ (मोतरिंगणी), ५ गोखरू, ६ ऐरण [टाकळा नरवेल] ७ टेंटू, ८ पाहाडमूळ, ९ बेल, १० शिवण.
दीपन—अग्नि प्रदीपक, क्षुधा वाढविणारें.
दीपक—अग्निदीपक, क्षुधा वाढविणारें.
दूष्य—वातादिकांनीं दूषित होणारे धातु व मल.
द्रव—१ पातळ पदार्थ, २ घाम.
द्विजिव्हक—नागसर्प,
दुर्जर—अजीर्ण करणारे पदार्थ.
देवडांगरी—इचे वेल असून फळ करटोल्यासारखें असतें व त्याजवर कांटे असतात.
देवदाली—देवडांगरी.
द्रोण—१०२४ तोळे.
द्रोणी—४०९६ तोळे.
द्रोणीचें मीठ—उखर जमिनीवरील मीठ.
द्रोणपुष्पी—कुंभा.
द्वंद्वज—२ दोष एकवटणें.

ध

धमनी—१ नाडी, तंतुकी.
धमासा—कांटेचुबुक.
धातु—सप्तधातु शब्द पहा.
धातुवर्धक—धातूला वाढविणारें.

न

नवज्वर—१ नूतन ज्वर, २ नऊ दिवस मनत राहणारा ज्वर.
नखला—कस्तुरी मृगानीं नखें ज्यापासून अंतर होतो तो.
नस्य—नाकांत औषध घालणें.
नाकाशिकणी—नागचिरणी.

**नागबला**—गोंधन.
**नार**–१ गाभा, २ अंतरसाल,
**नागवेल**–पानवेल (विड्याचे पानाचा वेल)
**निदान**–रोगांचें लक्षण. रोगपरीक्षा.
**निळी**–काळी निर्गुडी.
**निराम**–१ आमरहित, २ पक्व.
**निशोत्तर**–तेड.
**निरुह**–एक प्रकारचा बस्ति.
**निष्क**–४ मासे.
**नेत्र्य**–नेत्रांला हितावह.
**नेत्रवाळा**—काळा वाळा.
**नेवाळी**–१ रानमोगरी, २ कुसरी.

## प

**पटोल**–कडू पडवळ,
**परिषेक**—काढे वगैरे पातळ पदार्थाची घडी डोळ्यांवर ठेवणें किंवा तें वर शिंपणें,
**परिपाक**–पिकणें, पक्व दशेस येणें.
**पल**—४ तोळे
**पलीत**–पांढरे केंस.
**पाक**–पू होणें, परिपाक.
**पाचन**–पचन करणारें औषध, पचविणें, पक्व करणें.
**पान**–पिणें.
**पादचतुष्टय**–१ उत्तम वैद्य, २ चतुर सेवक, ३ उत्तम औषध, ४ रोगी द्रव्यवान् असून आज्ञेंत राहणारा.
**पानात्यय**–अति मद्यपान किंवा त्यापासून होणारा विकार मदात्यय.
**पामा**–पिवळे फोडांची खरूज.
**पाडळ**–पहाडमूळ.
**पाठा**–पहाडमूळ
**पार्श्वशूल**–पाठीचा शूळ.
**पिच्छिल**–तुळतुळीत, खळीसारखा.
**पिटिका**–मधुमेहादि विकारापासून होणारी गळवें, पुळ्या, फुटकुळ्या.
**पिठवण**–भाल, डौला, भद्रशेवरा.
**पित्तल**–पित्तकारक.
**पिपासा**–पाणी पिण्याची इच्छा.
**पिसोळा**–पिवळ्या काटे धोत्र्याचें मूळ, चोख.
**प्लीहा**–पांथरी, कवलु, पाणतिळी, पोटांत डावे बाजूस होतो तो रोग.
**पुटपाक**–ओलें औषध पानांत गुंडाळून वर मातीचा लेप करून फुपाट्यांत भाजून त्याचा रस काढून घेतात तो विधि.
**पुनर्नवा**–घेटोळीमूळ, वसु.
**पुरीष**–मल, विष्ठा,
**पुष्करमूळ**–कोष्ठाचा भेद, पाताळकमळ, कमळणीचा कंद, काश्मीर देशात प्रसिद्ध आहे.
**पेया**–पेज, कण्हेरी, तांदुळाचे १४ पट पाणी घालून वाटीनें प्यावयासारखी उतरून घ्यावी ती.
**प्रतिसारण**–जिव्हादिकांवर कोरडें किंवा ओलें औषध चोळणें.
**प्रतिकार**–उपाय.
**पेशी**–मांसाचा तुकडा.
**प्रत्याख्यान**–खंडन, कापून काढणें.
**प्रतूनि**–वायुरोग.
**प्रकोप**–क्षोभ.
**प्रतिलोमन**–उलट दिशेनें नेणें.
**प्रदर**–तांबडी किंवा पांढरी धुपणी.
**प्रधमन**–एकाद्या औषधीचें चूर्ण नळीनें नाकांत फुकणें (एक नस्याचा भेद आहे.)
**प्रमाथी**–जें औषध दोषांनीं भरलेल्या स्रोतसांत प्रवेश करून आप-

भेदक–सारक, मळ पातळ करणारें.
भेदन–भेद करणारें, फोडणारें.
भेषज–औषध.

म

मद–धुंदी, अम्मल.
मदिरा–एक प्रकारची दारू.
मधुरगण–मधुर औषधांचा गण.
मध्यमा–मधलें बोट.
मक्कल्लशूल–प्रसूतिसंबंधी होणारा शूळ ज्याला वायका वायगोळा म्हणतात तो.
मत्स्यापित्ता–कुटकी.
मत्स्याक्षि–ब्राह्मी, माशाचे डोळ्यासारखी जी वनस्पति असते ती.
मनोवहस्रोत–मनोव्यापार ज्यांतून चालतात अशा नाड्या ( तंतु )
मन्यास्तंभ–मान जखडणारा वायुरोग.
मसूरिका–अंगावरच्या देवी.
महामेदा–मेदा शब्द पाहा.
माजुफळ–मायफळ.
मा. नि.–माधवनिदान.
माषपर्णी–रानउडीद.
मालकांगोणी–करडकांगोणी.
मिथ्याहार–देशकालादि विरुद्ध व कमीजास्त भक्षण करणें.
मिथ्याविहार–अशक्तांनीं बलिष्टाशीं कर्म करणें.
मुद्गपर्णी–रानमूग.
मुरडशेंग–केळणीच्या शेंगा.
मूढवायु–स्तंभ झालेला वायु.
मूढगर्भ–आडलेला गर्भ.
मूत्रल–मूत्रवर्धक.
मूत्रकृच्छ्र–उन्हाळी.
मूत्रशुक्र–लघवींतून धातु जाणें.
मूत्राश्मरी–मुतखडा.
मेद–चरवी, मांदें, लठ्ठ मनुष्य होतो तो रोग.
मेदस्कर–मेद वाढविणारें.
मेढ्र–शिश्न, लिंग.
मेदस्वी–ज्याला मेद फार आहे तो.
मेदा–ही वनस्पति मिळत नाही करितां तिचे अभावी शतावरी ध्यावी.
मेधा–बुद्धि, धारणाशक्ति, विचारशक्ति.
मेध्य–मेधावर्धक, बुद्धिवर्धक.
मेह–मूत्राधिक्य ज्यात आहे असे २० प्रकारचे मूत्रदोष, प्रमेह, परमा.
मेहरी–१ धोदरी, २ सूज, ३ वहीर होणें किंवा मुंग्या येणे.
मोचरस–सावरीचा डिंक
मोतरिंगणी–डोरलीचा भेद, चिचोर्डी.
मोरवेल–भूयपिलु
मोह–बेशुद्ध पडणें.
मंड–दह्याची निवळी, पेज, तांदूळाचे चौपट पाणी घालून कढवून शितावांचून जी पेज काढतात ती.
मंडल–४८ दिवस.
मंडळ–चकंदळ, नायट्यासारखा त्वग्विकार होतो तो, कुष्ठ.
मंथ–पंचकषायांमध्यें कृति पहा.

य

यकृत्–१ काळीज, २ पोटांत उजवीकडे रोग होतो तो.
यवागू–तांदुळाचे सहापट पाणी घालून पात्रावर राहील अशी शिजवून दाट करावी ती पेज.
याप्य–दुःसाध्य, जो असाध्य रोग औषध चालू आहे तोंपर्यंत बरा असतो तो.
यावक–१ शिजलेलें जव, २ लाख, ३ उडीद, ४ कुळीथ, ५ साठी तांदूळ

**यूष**—धान्याचें आठपट पाणी घालून कढवावें आणि वरचें कांट काढून घ्यावें तें.

**योगवाही**—१ ज्या पदार्थाबरोबर द्यावा तदनुरूप कार्य करणारा, २ जशास तसा होणारा ह्मणजे शीतास शीत उष्णास उष्ण.

र

**रक्तार्श**—रक्ताची मूळव्याध.

**रज**—स्त्रियांचा विटाळ, आर्तवस्राव.

**रत्ति**—गुंज.

**रस**—पारा.

**रसायन**—रसादि धातु उत्तम प्रकारें तयार करणें.

**रसांजन**—१ पितळेचें कीट, २ दारुहळदीचा आष्टमांश काढा करून त्यांत शेळीचें दूध समभाग घालून कढवून शुष्क करावें ते.

**राजस**—रजोगुणाचा, विषयी.

**रास्ना**—मुंगुसवेल.

**रानभाल**—पिठवण, डवला, भद्रसेवरा.

**रुक्ष**—१ निस्तेज, २ खरखरीत.

**रुमामस्तकी**—सुरूचे झाडाचा चीक.

**रेचक**—जुलाबाचें औषध.

**रेणूकबीज**—१ निर्गुडीचें बीज, २ मेंदीचें बीज.

**रोध**—अवरोध.

**रोपण**—आंतून भरून आणणें.

ल

**ल०**—लक्षण, लघु.

**लक्ष्मणा**—श्वेतरिंगणी.

**लघु**—लहान, हलकें

**लाघव**—आरोग्य.

**लालास्राव**—लाळ गळणें.

**लावे**—पारवे.

**लीन**—दडून राहिलेला, कोंडलेला.

**लुता**—कोळी.

**लेखन**—१ खरवडणें, २ सूज वगैरे वितळविणारें व दोष आणि सप्तधातू यांना पातळ करणारें.

**लेह**—अवलेह शब्द पहा.

**लोम**—केंस ( अंगावरील लव )

**लंघन**—उपोषण.

व

**वसा**—मेदोधातु, हृदय, मांसस्नेह, चरबी.

**वटक**—गोळ्या, लाडू.

**वमि**—वांति, ओकारी.

**वल्कल**—साल.

**वत्सनाभ**—बचनाग.

**वमन**—वांति, उलटी, ओकारी.

**वयस्थापक**—श्रेष्ठ.

**वरधारा**—म्हैसवेल, वाढता देवदार.

**वर्ण्य**—वर्णकर, कांतिकर.

**वर्ती**—वात, काकडा.

**वर्त्मरोग**—पापण्याचे रोग.

**वर्ध्मरोग**—अंतर्गल, अंडवृद्धि.

**वर्या**—भगर.

**वर्षाऋतु**—श्रावण, भाद्रपद.

**वलि**—अंगावर सुरकुत्या पडतात त्या.

**वसंतऋतु**—चैत्र, वैशाख.

**व्रण**—क्षत, जखम.

**वाजीकरण**—वीर्यवृद्धि करून कामोत्तेजन करणारें औषध.

**वा. भ.**—वाग्भट्ट.

**वातरक्त**—सुनबहिरी, रक्तपिती, महारोग.

**वामभाग**—डावी बाजू.

**वातल**—वाताला उत्पन्न करणारें.

**वातानुलोमन**—वातादिकांना यथामार्गानें नेणारें.

**वाताष्ठीला**—मूत्राघातरोग.
**वामक**—उलटी व वाति करणारे.
**वारुणी**—श्वेतसुरा, नाडी.
**विकल**—दुर्बळ.
**विकासी**—ज्याच्या योगानें शरीर अ-गर्दी पिळून काढल्यासारखें व साधे शिथिल होतात तें.
**विखरा**—तालिमखाना.
**विचर्चिका**—बारीक फोडांची खरूज.
**विदग्धाजीर्ण**—एक प्रकारचें अजीर्ण.
**विद्रधि**—विद्रधिरोग ( गांठी )
**विदारी**—भूयकोहळा.
**विजया**—१ भांग, २ हरीतकी, ३ वे-खंड ४ मंजिष्ठ.
**विदाही**—अति दाह करणारा पदार्थ.
**विबंध**—अडथळा.
**विमल**—१ रुपें, २ पद्मकाष्ठ, ३ रौप्य-माक्षिक, ४ सैंधव, ५ निर्मळ.
**विम्लापन**—जिरवणें ( ग्रंथी वगैरे )
**विरुद्धाशन**—( विरुद्धाहार ) विरुद्धभो-जन, जसें दूध मीठाइ.
**विरेचन**—तीक्ष्ण रेच.
**विलंबिका**—विषूचिकेचा (माहामारीचा) भेद.
**विलेपी**—तादूळ भरडून त्याचे चौपट पाणी घालून यवागूपेक्षां कांहीं घणसर करावी ती.
**विवर्णता**—शरीराचा वर्ण वदलणें(फिकट)
**विशद**—स्वच्छ, पारदर्शक.
**विषमज्वर**—१ कमजास्त होणारा ज्वर २ वीस दिवस सतत राहतो तो ज्वर.
**विष्टंभकारक**—मलबद्धकारक.
**विषमाग्नि**—जो कधीं कधीं अन्न पचवि-तो व कधीं कधी पचवित नाही तो.
**विषमाशन**—अकालीं थोडें किंवा फार खाणें.
**विषूचिका**—पटकी, महामारी.
**विसर्प**—विसाप, इसप व धावरें.
**विस्फोटक**—त्वग्विकार, अंगावर फोड उठतात तो रोग.
**विहार**—पायानें चालणें.
**वीर्य**—१ द्रव्यांतील शीत व उष्ण या गु-णाला कारणीभूत एक तत्त्व, २ शक्ति ३ रेत.
**व्रीहि**—कुसळाचें धान्य (साळी, यव इ.)
**वृक्क**—मूत्रपिंड.
**वृद्धि**—वाढणें, जास्त होणें.
**वृद्धिरोग**—अंडवृद्धि.
**वृषण**—अंड.
**वृष्य**—वीर्यवृद्धिकर, वाजीकरण कामो-त्तेजक.
**ऋषभक**—ही वनस्पति मिळत नाही, स-वब इचे अभावीं भुईकोहळा घ्यावा.
**वेगावरोध**—मलमूत्रादिकांचा वेगरोध.
**वेसवार**—१ गरम मसाला, २ मेथकूट.
**वेळू**—बांबू, कळक.
**वैकल्य**—दुर्बलता.
**वैद्यादिचतुष्पाद**—१ उत्तम वैद्य, २ च-तुर सेवक, ३ उत्तम औषध, ४ आज्ञेंत वागणारा रोगी.
**वैकृत**—अशुभ.
**व्यंग**—कमीपणा, २ वाग ( तोंडावरचा काळेपणा ).
**व्यवायी**—जें औषध पचन न होतां एक-दम विषासारखें सगळ्या शरी-रांत पसरतें तें.

### श

**शकृत्**—मल, विष्ठा.

**शतघृत**—१०० वेळां धुतलेलें तूप.
**शतधौत**—१०० वेळां धुतलेलें.
**शतावरी**—सहस्रमुळी.
**शम**—उपशम, दोष शमणें.
**शमन**—दोषांना सारख्या स्थितींत आणणें किंवा तशा गुणाचें औषध.
**शरदृतु**—आश्विन व कार्तिक.
**शरपुंखा**—उन्हाळी.
**शरभ**—एक जातीचा मृग.
**शराविका**—प्रमेहपीटिका.
**शराव**—मातीचा परळ.
**शरावसंपुट**—एका परळावर दुसरा परळ पालथा ठेवून संपुटासारखें करि-तात तें.
**श्रावणी**—मुंडी.
**शर्करा**—मूत्रद्वारें रेती पडते ती.
**शलाका**—सळई.
**शल्य**—सलणारा पदार्थ ( कंटक वगैरे. )
**शाल्मली**—सावरी, कांटेशेवरी.
**शाण**—अर्ध तोळा.
**शामा**—१ रात्र, २ काळी चिमणी.
**शिंबी धान्य**—शेंगांपासून निघणारें धान्य.
**शितोपला**—खडीसाखर.
**शिरदोडी**—देवभोवरी.
**शिरावेध**—शीर टोंचून रक्त काढणें.
**शिराळी**—दोडकी,
**शिरोवस्ति**—डोक्यावर कांतडें गुंडाळून त्यांत स्नेह धारण करणें.
**शिरोग्रह**—वायुरोह, मस्तकरोग.
**शिरोभिताप**—मस्तकशूळ.
**शीतवीर्य**—थंडवीर्य.
**शिशिरऋतु**—माघ, फाल्गुन.
**शिंगरूफ**—हिंगूळ.
**शुक**—पोपट, राघु.
**शुक्र**—रेत, वीर्य.
**शुक्रल**—शुक्रवर्धक.
**शुक्ति**—शिंपा.
**शुकधान्य**—कुसळ असलेलीं धान्यें.
**शुक्राश्मरी**—शुक्रापासून झालेला मुतखडा.
**शूर्प**—२०२८ तोळे.
**शेतवड**—देवकुंभा व कुंभा.
**शोणित**—रक्तधातु.
**शोथ**—सूज,
**शोधन**—रेचनादि द्वारा शुद्धि करणें.
**शोफ**—सूज.
**श्लीपद**—वारुळ, ( पायांस वारूळ रोग होतो तो. )
**श्यामा**—काळें निशोत्तर, पिंपळी इ०.
**श्लेष्म**—कफ.

**श्वित्र**—पांढरें कोड.
**शंख**—आंख, कानाजवळील भाग.
**शंखपुष्पी**—शंखपुष्पी, उन्हाळी.
**शंखाहुली**—शंखपुष्पी.

## स

**साटक्या साळी**—दोन महिन्यांनीं पिक-णाऱ्या अशा साळी.
**सहज**—जन्माबरोबर आलेलें.
**सन्निपात**—३ दोषांचा एकदम क्षय किंवा कोप.
**सराटे**—लहान गोखरू.
**सर्षप**—मोहरी, राई.
**सद्योव्रण**—आगांतुकव्रण.
**सप्तधातु**—१ सोनें, २ रुपें, ३ तांबें, ४ लोखंड, ५ जस्त, ६ शिसें, ७ कथील
**सप्तधातु**—१ रस, रक्त, ३ मांस, ४ मेद, ५ अस्थि, ६ मज्जा, ७ शुक्र.
**समुद्रलोण**—मीठ.
**सात्म्य**—१ संवय, २ पचनीं पडलेला प-

दार्थ,३ औषधादिकांपासून रोगाचा उपशम.
सातला–निवडुंगाचा भेद,शिकेकई, शेर.
शाखवेल—शेतवड.
सार–सत्वांश.
सारक–रेच करणारें.
सारस–एक पक्षी आहे.
सूत–पारा.
सूक्ष्म–फार बारीक.
सूर्यखार–सोरा.
सोनामुखी–भूयतरवड.
सोरटी माती—गोपीचंदन.
सौवीर—जवाची पेज तयार आटवून केलेली काजी.
सैंधव–शेंदेलोण.
स्तंभ—अंग ओल्या वस्त्रानें गुडाळल्या सारखें होणें, ताठरपणा (ताठणें) अवरोध.
स्तंभक–मलमूत्रादिक बंद करणारा.
स्तंभन–मलादिकांना बंद करणारें.
स्निग्ध–१ ओषट, २ घट्ट, ३ स्नेहयुक्त.
स्नेहन–अंगास तेल तूप वगैरे ओषट पदार्थ लावून चोळून जिरविणें.
स्नेह–तेल तूप वगैरे ओषट पदार्थ.
स्नेहपाक–घृत तेल वगैरे सिद्ध करणें.
स्रोत–पोकळ शिरा, नाक कान वगैरे.
स्वर्य–स्वराला हितकर
स्वरघ्न–स्वर नीट करणारे.
स्वरस–अंगरस.
स्वादु–गोड, रुचिकर.
स्वेद–घाम.
संकर–१ सन्निपात, २ केर, ३ मिश्र.
सतत–नेहमी येणारा, एकसारखा.
संप्राप्ति–दोषापासून रोगोत्पत्ति.
संशोधन–शोधन व वमन इ. रूपानें शरीरांतील दोष बाहेर काढणें.
संसर्ग २ दोषाचा संस्कार, स्पर्श करणे, रत होणें.
संस्कार–क्रियाविशेष विधि,

ह

हंसपादि–रक्त लाजाळू,
हनुग्रह–दांतखिळी बसविणारा वायु.
हलीमक–पांडुरोगाचा एक भेद आहे.
हपुषा–शेरणी.
हरिक–कोद्रू.
हाडजोडी–त्रिधारी कांडवेल.
हिक्का–उचकी.
हिध्मा–उचकी.
हिम–१ शीत, २ अति थंड, ३ शीत काढा, पंचकषाय पहा.
हुलगे–कुळीथ.
हेमंतऋतु–मार्गशीर्ष, पौष.
हृद्य–मनाला प्रिय.
हृल्लास–१ उचकी, २ तोंडांतून कडू पाणी निघणें, ३ हृदयव्यथा.

क्ष

क्षीरकाकोली–काकोली शब्द पहा.
क्षीरवर्ग–ज्या वनस्पतींतून चिक (दूध) निघतो त्या वनस्पती.
क्षीरविदारी–श्वेतभूयकोहळा.
क्षीरीवृक्ष–वड, उंबर, पिंपळ, पिंपरी वगैरे चीक निघणारीं झाडें.
क्षुब्ध–विकोपास जाणें.
क्षुद्बोध–भूक लागणें.
क्षुद्रमोथा–बारीक नागरमोथे.

# वैद्यकलानिधि.

## भाग १ ला.

### मंगलाचरण.

श्लोक.

प्रारंभीं करुणार्णवा गजमुखा श्री शारदेच्या वरा ॥
हेरंबा नत होऊनी विनवितों भक्तासि द्यावें वरा ॥
जावा ग्रंथ सुसिद्धितें सकलही पावोत विघ्नें लया ॥
द्यावी सन्मति दीनवत्सल विभो प्रेमें करावी दया ॥ १ ॥

### शारीर प्रकरण.

वैद्याला शरीराचें विशेष ज्ञान असल्यावांचून निदान व चिकित्सा ही दोन्ही करितां येत नाहींत. यास्तव येथें प्रथम सर्व शरीराचें वर्णन केलें आहे.

**कलादिकांचें कथन**—शरीराचेठायीं रसादि सप्त धातूंचीं जीं स्थानें आहेत त्यांच्या मर्यादाभूत अशा ७ कला आहेत; आणि कोष्ठामध्यें सात आशय ह्मणजे स्थानें आहेत; व रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र असे सात धातु आहेत; व त्या धातूंचे सात मळ आहेत आणि त्या धातूंचे जवळ राहणारे असे सात उपधातु आहेत, व शरीराला त्वचा सात आहेत; वात, पित्त व कफ हे तीन दोष आहेत. आणि शरीराला दोऱ्यासारखीं व वेलासारखीं अशीं ९०० बंधनें आहेत, त्यांना स्नायू असें ह्मणतात. दोनशेंदहा संधी ह्म० सांधे आहेत; आणि शरीराला आधारभूत व बळकट अशी तीनशें अस्थि म्ह० हाडें आहेत. व जिवाचीं आधारभूत अशी एकशें सात मर्में आहेत. दोष, धातु व उदक यांना वाहणाऱ्या अशा सातशें शिरा आहेत; व रस वाहणाऱ्या चोवीस धमन्या ह्म० नाड्या आहेत; व पुरुषाचे शरीरांत मांसपेशी म्ह० मांसांचीं खंडें लांबट अशीं पांचशें आहेत, आणि स्त्रियांना पांचशांहून वीस[1] अधिक आहेत व कंडरा म्ह० मोठमोठे स्नायू सोळा[2] आहेत; आणि पुरुषाचे देहाचेठायीं दहा रंध्रें म्ह० छिद्रें आहेत व स्त्रियांला यांहून तीन छिद्रें अधिक आहेत.

---

१ दोहोस्तनाचे ठायीं पाच पांच आणि योनीचे ठायीं चार, व गर्भमार्गाचे ठायीं तीन, व गर्भस्थानीं तीन याप्रकारें वीस स्थानें जाणावीं. २ दोन पाय मिळून चार, दोन हात मिळून चार, आणि मानला चार व पाठीला चार, या प्रकारें सोळा स्थानें जाणावीं.

**कलांचे प्रकार**—पहिली कला मांसाला धारण करिते ह्मणून तिला मांसधरा असें म्हणतात. दुसरी कला रक्ताला धारण करिते ह्मणून तिला रक्तधरा असें म्हणतात. तिसरी कला मेदाला धारण करिते ह्मणून तिला मेदोधरा असें म्हणतात. यकृत् आणि प्लीहा यांची चवथी कला, या दोहोंचे मध्यें राहते तिला कफधरा असें म्हणतात. आंतड्यांना धारण करणारी जी पांचवी कला[1] तिला पुरीषधरा असें म्हणतात. अग्नीला धारण करणारी जी सहावी कला[2] तिला पित्तधरा असें ह्मणतात. शुक्रधातूला धारण करणारी जी सातवी कला तिला रेतोधरा असें म्हणतात.

**आशयांचे प्रकार**—वक्षस्थळाचेठायीं कफाचा आशय म्ह० स्थान आहे; कफस्थानाचे किंचित् अधोभागी आमाशय[3] म्ह० आमाचें स्थान आहे. नाभीचे वर डावीकडे अग्न्याशय म्ह० अग्नीचें स्थान आहे; व त्या अग्निस्थानाचे वर तीळ आहे त्याला क्लोम असें म्हणतात, तेंच पिपासास्थान होय; अग्निस्थानाचे अधोभागी मळाचा आशय म्ह० स्थान आहे त्या स्थानाला पक्काशय असें म्हणतात. तो पक्काशय वामभागीं आहे आणि त्याचे समीप दक्षिणभागीं चर्मखर्व्वकाकार मूत्राला आधारभूत असा वस्ति[4] आहे व जीव तुल्यरक्त आहे त्या रक्ताचें स्थान ऊर आहे. या प्रकारें सात आशय म्ह० स्थानें जाणावी. आणि पुरुषांपेक्षा स्त्रियांना तीन स्थानें अधिक आहेत. एक गर्भाचें स्थान व दोन स्थनसंबंधी दुधाची स्थानें मिळून तीन स्थानें अधिक जाणावी.

**रसादि सप्तधातूंचें विवरण**—सप्तधातु पित्ततेजेंकरून पाचित होत्साते क्रमेंकरून ते एकापासून एक उत्पन्न होतात. उदाहरण—रसापासून रक्त, रक्तापासून मांस, मांसापासून मेद, मेदापासून अस्थि, अस्थीपासून मज्जा, मज्जेपासून शुक्र, या प्रकारें सप्तधातूंच्या उत्पत्तीचा क्रम जाणावा.

**सात धातूंचे सात मळ**—जिव्हा, नेत्र व गाल, यांचें जल तें रसधातूचा मळ जाणावा. रसधातूला रंजविणारें जे पित्त तें रक्तधातूचा मळ जाणावा. आणि कानांतील जो मळ तो मांसधातूचा मळ जाणावा. जीभ, दांत, काख आणि शिश्नादिक[5] यांचे जे मळ ते मेदोधातूचे मळ जाणावे. नखें हीं अस्थिधातूचा मळ जाणावा. केशलोमादिक ही अस्थीचाच मळ होय. डोळ्यांचा मळ आणि मुखाची स्निग्धता म्हणजे चिकटपणा हे मज्जाधातूचे मळ जाणावे. मुरमांच्या फुटकुळ्या व मिशा या शुक्रधातूचा मळ जाणावा.

---

१ पांचवी कला आतड्याला धारण करीत होत्साती, उदरस्थ मळाचा विभाग करिते यास्तव तिला पुरीषधरा असें ह्मणतात. २ खाद्यपेयादिक चार प्रकारचें अन्न त्याते आमाश यापासून च्युत करून पक्काशयामध्यें नेऊन धारण करिते यास्तव तिला पित्तधरा असे ह्मणतात. ३ आमाशय ह्मणजे ज्यामध्यें अपक्क अन्न राहतें तो. ४ कातड्याचे लहान बादलीसारखा त्या वस्तीचा आकार आहे. ५ आदि शब्देंकरून स्वेद म्हणजे म्हणजे घाम तोही मेदो धातूचा मळ आहे असेंही कोणाचे मत आहे.

**सात उपधातु**—स्तनसंबंधीं जें दूध तें रसधातूद्भव उपधातु जाणावी; आणि रज म्हणजे स्त्रियांस विटाळ होतो तो रक्तधातूचा उपधातु जाणावा. हे दोन उपधातु स्त्रियांस कालविशेषी उत्पन्न होतात आणि नाहींसेही होतात; व शुद्ध मांसापासून उत्पन्न झाला जो स्नेह तो मांसधातूचा उपधातु जाणावा. त्या स्नेहालाच वसा असें म्हणतात. स्वेद म्हणजे घाम, तो मेदोधातूचा उपधातु जाणावा. दांत हे अस्थिधातूचे उपधातु जाणावे. केश हेही मज्जाधातूचे उपधातु जाणावे. ओज हा शुक्रधातूचा उपधातु जाणावा.

**सात त्वचांचें विवरण**—पहिल्या त्वचेचें नांव अवभासिनी ती त्वचा सिध्म[1] रोगाची जागा होय दुसऱ्या त्वचेचें नांव लोहिता ती तिलक[2] व अलक[3] या रोगाची जागा होय. तिसऱ्या त्वचेचें नांव श्वेता ती चर्मदल[4]रोगाची जागा होय. चवथीचें नांव ताम्रा ती किलासकुष्ठ आणि चित्रकुष्ठ यांची जागा होय. पांचव्या त्वचेचें नांव मेदिनी ती सर्व कुष्ठांची जागा होय. सहाव्या त्वचेचें नांव रोहिणी ती ग्रंथी व गंडमाळा आणि गंडमाळेचा भेद अपचीरोग यांची जागा होय. सातव्या त्वचेचें नांव स्थूला ती विद्रधिरोगाची आणि अर्श, भगंदररोग यांची जागा होय. या प्रकारें सात त्वचा सांगितल्या. त्या सर्व सात त्वचा मिळून दोन साळी ( तांदूळ ) प्रमाणें मोठ्या आहेत असें जाणावें.

**वातादि तीन दोषांचा भेद**—शरीरामध्यें वात, पित्त व कफ हे ३ पदार्थ आहेत. ते रसादि सप्तधातूंस दूषित करितात ह्मणून त्याला दोष असें म्हणतात. व तेच शरीर धारण करितात व पोषितात ह्मणून त्यांला धातु म्हणतात. आणि रसादि सप्तधातूंला मलीन करितात, ह्मणून त्यांना मल असें म्हणतात व ते दोष शरीरधारणत्वेंकरून एकेक पांच पांच प्रकारचे झाले आहेत असें जाणावें.

**वायूचें प्राधान्यपूर्वक स्वरूप विवरण**—वात, पित्त व कफ या तीन दोषांमध्यें वायु बलवान् आहे व त्याला मलादिकाचा विभाग करण्याचें आणि पित्त व कफ यांना जिकडे पाहिजे तिकडे नेण्याचें सामर्थ्य आहे व त्या वायूमध्यें रजोगुण फार आहे व तो वायु सूक्ष्म आहे आणि स्वभावेंकरून शीतल, रुक्ष, हलका आणि चंचल असा आहे व तो वायु पांच स्थानाचे ठायीं गमन करीत होत्साता पांच प्रकारचा जाणावा. ती पांच स्थानें व त्यांचीं पांच नांवें क्रमेंकरून सांगतों. मलाशय ह्मणजे पक्वाशय त्याचेठायीं जो वायु राहतो त्याला अपानवायु असें ह्मणतात व कोष्ठामध्यें अग्नीचें स्थान आहे त्या स्थानाचेठायीं जो वायु राहतो, त्याला समानवायु असें म्हणतात. हृदयाचेठायीं जो वायु राहतो, त्याला प्राणवायु असें म्हणतात. कंठाचेठायीं जो वायू रहातो त्याला उदान वायु असें ह्मणतात. आणि सर्व शरीरा-

---

१ कुष्ठाचा एक भेद आहे. २ ३ तिलक व अलक या शब्दांनीं व्यंगादिक दोष जाणावे ह्मणजे तोंडावर जो काळा डाग पडतो तो. ४ चर्मदलरोग हा कुष्ठाचा एक भेद आहे.

चेठायीं व्यापकत्वानें जो वायु राहतो, त्याला व्यानवायु असें म्हणतात. याप्रकारें सर्व वायूंचीं स्थानें व नांवें जाणावीं.

**पित्ताचें विवरण**—पित्त उष्ण, पातळ, निळें व पिंवळें या प्रकारें आहे, त्या पित्तामध्यें सत्वगुण फार आहे आणि त्यामध्यें तिखट व कटु हे रस आहेत, तें पित्त उष्णादि पदार्थांचे योगेंकरून विकृत झालें असतां आंबट होतें. तें पित्त पांच स्थानांचेठायीं राहतें, तीं स्थानें व त्या पित्तांचीं नांवें येणेंप्रमाणें—कोठ्यामध्यें जें अग्नीचें स्थान आहे त्या स्थानाचेठायीं जें पित्त आहे तें पित्त अग्निस्वरूप असून एक तिलप्रमाण आहे तें पित्त त्या जाग्यावरील चार प्रकारच्या[1] अन्नाला पचवितें ह्मणून त्याला पाचक असें म्हणतात; आणि त्वचेचेठायीं जें पित्त राहतें, तें शरीराचेठायीं कांति उत्पन्न करितें व चंदनादिकांचा शीतल लेप व सुगंधी तैलादिकांचे अभ्यंग, आणि स्नानादिक यांना पचवितें ह्मणून त्या पित्ताला भ्राजक असें म्हणतात. व तें पित्त कोठ्यांत डावीकडे प्लीहाचे स्थानी राहून जसे रसापासून रक्ताला उत्पन्न करितें तसेंच उजवीकडे यकृताचे स्थानीं राहून रसापासून रक्ताला उत्पन्न करितें व तें पित्त दृष्टिगोचर आहे त्याला रंजक असें म्हणतात. आणि दोहों नेत्रामध्यें जें पित्त राहतें तें श्वेत, नील, पित्तादि रूपांचें दर्शन करवितें ह्मणून त्या पित्ताला आलोचक असें म्हणतात. जें पित्त हृदयाचेठायीं राहतें तें पित्त मेधा व प्रज्ञारूप बुद्धीला उत्पन्न करितें ह्मणून त्या पित्ताला साधक असें म्हणतात.

**कफाचें विवरण**—कफ हा चिकट, जड, पांढरा, बुळबुळीत व शीतळ असा आहे व त्या कफामध्यें तमोगुण फार आहे. तो मधुर आहे आणि विकृतिप्रत किंवा पक्वतेप्रत पावला असतां खारट होतो, तो पांच स्थानीं राहून देहाची स्थिरता व पुष्टता करितो. आमाचे स्थानीं जो कफ राहतो त्याला क्लेदन असें म्हणतात. मस्तकाचेठायीं जो कफ राहतो त्याला स्नेहन ह्मणतात. कंठाचेठायी जो कफ राहतो त्याला रसन म्हणतात. हृदयाचेठायी जो कफ राहतो, त्याला अवलंबन असें म्हणतात. संधीचेठायीं जो कफ राहतो त्याला श्लेष्मक असें म्हणतात. या प्रकारें कफांचीं नावें व स्थानें जाणावी.

**वात पित्त व कफ यांचीं कर्में**—हे तिन्हीही दोष विकृत झाले ह्म० जीवित हरण करितात. व यथास्थित असले ह्म० जीवन व्यापार चालवितात. ते जरी सर्व शरीरव्यापि आहेत तरी त्यांची मुख्य स्थानें तीन आहेत. नाभीचा खालचा भाग वायूचें मुख्य स्थान; नाभी व हृदय यांचे मधील प्रदेश पित्ताचें मुख्य स्थान; व हृदयाचा वरील भाग हें कफाचें मुख्य स्थान आहे. ते वात, पित्त व कफ हे अहोरात्र व अन्नाचा परिपाककाल यांच्या अंत्य, मध्य व आदि भागांमध्यें अनुक्रमेंकरून प्रबळ असतात, म्ह० उत्तर वयांत, दिवस, रात्र व परिपाककाल यांचे शेवटच्या भागामध्यें वायूचा जोर असतो. मध्य वयांत, दिवस, रात्र व परिपाककाल यांच्या

१ खाद्य, पेय, लेह्य, आणि चोष्य असे चार प्रकारचें अन्न जाणावें.

मध्य भागामध्यें पित्ताचा जोर असतो. पूर्व वयांत दिवसरात्र व परिपाककाल यांच्या पूर्व भागामध्यें कफाचा जोर असतो. वात, पित्त व कफ यांचे योगानें अनुक्रमेंकरून विषमाग्नि, तीक्ष्णाग्नि व मंदाग्नि यांची उत्पत्ति होते. व ते तिन्हीही दोष समान असले म्ह० अग्नीही समान असतो. त्यांच्या योगानें कोठाही अनुक्रमेंकरून क्रूर म्ह० जड, मृदु म्ह० हलका व मध्यम असतो व ते तिन्हीही समान असले म्ह० तोही मध्यमच म्ह० फार जड नाहीं किंवा फार हलका नाहीं असा असतो.

**स्नायूचें लक्षण**—देहाचेठायीं मांस, अस्थि व मेद यांचीं बंधनें आहेत त्यांला स्नायु असें म्हणतात.

**संधीचें लक्षण**—शरीराचेठायीं हस्तपादादि अंगें प्रत्यंगें[1] यांचें जें साधन म्ह० परस्पराचा संयोग त्याला संधी असें म्हणतात. त्या कफेंकरून[2] युक्त असतात.

**अस्थींचें लक्षण**—देहाचेठायीं जीं हाडें तीं सार म्हणजे बलरूप असून शरीराला आधार आहेत.

**मर्माचें लक्षण**—मर्में देहाचे ठायीं बहुधा जिवाचीं आधारभूत आहेत तीं मर्में पांच प्रकारचीं, मांसमर्में आकरा, शिरामर्में एकेचाळीस, स्नायुमर्में सत्तावीस, अस्थिमर्में आठ, संधिमर्में वीस, या प्रकारें एकशेंसात मर्में आहेत असें जाणावें.

**शिरांचें लक्षण**—शिरा ह्या संधी, बंधन करणाऱ्या व वातादि व रसादि सप्तधातू यांतें वाहणाऱ्या अशा आहेत. त्या शिरा स्थूल, सूक्ष्म भेदेंकरून दोन प्रकारच्या आहेत. त्यांचें नाभिस्थान मूळ होय, त्या मूळ शिरा चाळीस आहेत; त्यांमध्यें दहा वातवाहिनी, दहा पित्तवाहिनी, दहा कफवाहिनी व दहा रक्तवाहिनी या प्रकारें चाळीस जाणाव्या. वातवाहिनी, ज्या दहा शिरा आहेत त्यांपासून दुसऱ्या १७५ वातवाहिनी शिरा जाहल्या आहेत, तितक्याच पित्तवाहिनी दहा शिरापासून दुसऱ्या पित्तवाहिनी १७५ व कफवाहिनी दाहा शिरापासून दुसऱ्या कफवाहिनी १७५, रक्तवाहिनी दहा शिरामासून रक्तवाहिनी शिरा १७५ झाल्या आहेत. या प्रकारें ७०० शिरा झाल्या आहेत असें जाणावें.

**धमनीचें लक्षण**—शरीराचे ठायीं रसवाहिन्या ज्या नाड्या आहेत त्या वायूचें धमन करितात म्हणजे वायूला उडवितात म्हणून त्याला धमनी असें म्हणतात. त्या धमन्या चोविस आहेत. त्याचें नाभिस्थान मूळ आहे. त्यांमध्यें १० अधोगामिनी व त्या वात, मूत्र, मळ, शुक्र, स्त्रियांचे ऋतुसंबंधी रज, अन्न, पान, रस, यांतें वाहणाऱ्या जाणाव्या. ऊर्ध्वगामिनी दहा आहेत त्या शब्द, रूप, रस,

---

१ बोटें, कान, डोळे, ओंठ, नाक, हनुवटी. २ जसा गाडा वंगणानें निर्विघ्नपणें चालतो तशा या संधी कफाचे योगेंकरून फिरतात. म्हणजे गाडी फिरण्यास जसें वंगण तसें शरीराचे अवयव हालण्यास कफ हा वंगण आहे असें जाणावें.

गंध, श्वासोच्छ्वास, बोलणें, जांभई, क्षुधा, हंसणें, रडणें इत्यादिकांतें वाहणाऱ्या असून शरीरातें धारण करितात; आणि तिर्यग्गमन करणाऱ्या शिरा चार आहेत, त्यांपासून असंख्यात धमन्या उत्पन्न झाल्या आहेत. त्याहीकरून शरीर जाळ्यासारखें व्याप्त आहे, व त्यांचीं मुखें रोमकुपांनी प्रतिबद्ध आहेत. त्या रोमकुपांनीं रसाचें संतर्पण करितात आणि स्वेदातें वाहतात, व अभ्यंग, स्नानानुलेपनादिक यांचें वीर्य अभ्यंतरी नेतात. या प्रकारें २४ धमन्या जाणाव्या.

**पेशीचें लक्षण**—मांसपेशी ह्मणजे मांसखंडें तीं देहाला बलकारक आणि आधारभूत अशी आहेत.

**स्नायूचें कार्य**—मोठाले स्नायू ते हस्तपादादिक जीं अंगें त्यांचें प्रसारण व आकुंचन याविषयी समर्थ आहेत.

**रंध्राचें विवरण**—नाक, डोळे व कान यांचेठायीं दोन दोन रंध्रें आहेत; आणि शिश्न, गुद, मुख यांचेठायी एकेक रंध्र आहे व मस्तकाचे ठायीं एक ब्रह्मरंध्र आहे. याप्रकारें पुरुषांस दहा रंध्रें आहेत; व स्तनसंबंधीं दोन रंध्रें आणि आणि गर्भमार्गाचेठायीं एक अशी तीन रंध्रें पुरुषांपेक्षां बायकांना अधिक आहेत; आणि मनुष्याचे त्वचेचे ठायी दुसरीं असंख्य रंध्रें आहेत तीं सूक्ष्म आहेत असें जाणावें.

**पुफ्फुसादिकाचें स्वरूप**—हृदयाचे वामभागी म्हणजे डावीकडे प्लीहा व पुफ्फुसही शोणितफेणापासून उत्पन्न असून हृदयनाडिकेला लागलेलें आहे व हृदयाचे दक्षिणभागी म्ह० उजवे बाजूस यकृत या नावाचा एक मांसपिंड आहे.

**तिलाचें लक्षण**–शोणितकिट्टापासून उत्पन्न व दक्षिणभागीं यकृताचे समीप तीळ आहे त्याला क्लोम असें म्हणतात. तो तीळ जलवाहिनी शिराचें मूळ आहे. यास्तव तृष्णा म्ह० तहान तिचें आच्छादन करितो.

**वृक्काचें लक्षण**—वृक्क म्ह० कुक्षिगोलक, तें रक्त आणि मेद यांचा प्रसाद म्ह० सारांश त्यापासून उत्पन्न आहेत. तें कुक्षी गोलक जठरस्थ जो मेद त्याला पुष्ट करितात.

**वृषणलक्षण**—वृषण ( अंड ) वीर्यवाहिनी शिरांचें आधार आहेत, यास्तव पौरुषावह होतात; म्ह० पुरुषत्व देतात. तें मांस, रक्त, कफ आणि मेद यांच्या सारांशापासून उत्पन्न आहेत असें जाणावें.

**लिंगाचें लक्षण**—तें वीर्यद्वारें गर्भाला उत्पन्न करितें आणि वीर्य व मूत्र यांचें मार्गभूत होय. तें लिंग मानेसहवर्तमान हृदयाला बांधणारे असे जे चार मोठे स्नायू आहेत त्याच्या अग्रांनीं झालेलें आहे.

---

१ घोडे आदिकरून खची करितात त्यामुळे त्यांस पुरुषत्व नसतें,हे दृष्टिगोचर मोठें प्रमाण आहे.

**हृद्याचें लक्षण**—तें कमळाचे कळ्यासारखें किंचित् विकसित व अधोमुख असून चेतनेचें म्ह० ज्ञानाचें स्थान होय. आणि ओज म्ह० सर्व धातूंचें जें तेज त्याचें आश्रयभूत आहे.

**शिरा व धमनी यांचा व्यापार**—नाभीचेठायीं राहणाऱ्या अशा शिरा व धमन्या आहेत. त्या संपूर्ण शिरांतें व्यापून रात्रंदिवस वायूच्या संयोगेंकरून रसादि संपूर्ण धातूंला सर्व शरीराप्रत नेऊन शरीराचें पोषण करितात.

**प्राणवायूचा व्यापार**—नाभिस्थ जो प्राणवायु तो हृदयकमलाचे अभ्यंतरीं स्पर्श करून ब्रह्मरंध्राश्रित जें विष्णुपद त्याचेठायीं अमृत आहे त्या अमृताचें पान ह्मणजे प्राशन करावयासाठीं कंठाचे बाहेर निघून मस्तकाचेठायीं प्राप्त होऊन ब्रह्म-रंध्राश्रित तें अमृत त्यांतें प्राशन करून पुनः वेगेंकरून त्याच मार्गानें स्वस्थानीं येऊन संपूर्ण देहातें व जीवांतें संतुष्ट करितो. व जठराग्नीला पाचनशक्ति देतो, असें जाणावें.

**आयुष्याचें व मरणाचें लक्षण**—शरीर आणि प्राण यांचा जो संयोग त्याला आयुष्य असें ह्मणतात. कालेंकरून शरीर आणि प्राण यांचा वियोग झाला असतां त्याला पंचत्व ( मरण ) असें म्हणतात. पृथ्वीचे ठायीं कोणताही प्राणी कोठेंही अमर नाहीं, यास्तव मृत्यूचें निवारण करण्याविषयीं कोणीच समर्थ नाहीं. परंतु वैद्यानें रोगमात्र निवारण करावें. रसादि सप्तधातु व त्यांचे सात मळ आणि वातादि तीन दोष हे न्यूनाधिक झाले असतां शरीराचा नाश करितात व समान असतां सुख, बल, स्वस्थता व शरीराची वृद्धि यातें देतात.

**निद्रादिकांची उत्पत्ति**—तमोगुण व कफ यांहींकरून निद्रा येते. पित्त व तमोगुण यांहींकरून रूपादिकांचें अज्ञान होऊन चेतनारहित मनुष्य पडतो त्याला मूर्च्छा असें ह्मणतात. रजोगुण, पित्त आणि वायु यांहींकरून चक्रावर बसून चाक फिरवून मनुष्याला जशी अवस्था होते तद्वत् जी अवस्था तिला भ्रम असें म्हणतात. कफ, तमोगुण आणि वायु यांहींकरून घटपटादि पदार्थांचें अज्ञान होऊन शरीर जड होतें. व जांभई, ग्लानि हीं लक्षणें होतात; व रोग्यासारखी निद्रा येते, तिला तंद्रा असें ह्मणतात.

**ग्लानीचें लक्षण**—संपूर्ण धातूंचें सारभूत जें ओज त्याचे क्षयेंकरून दुःख, अजीर्ण व श्रम यांहींकरून हस्तपादादिक विकळ होऊन हृदयास पीडा होते. आयास न करितां शरीरास श्रम होतात, व अन्नावर इच्छा होत नाहीं त्याला ग्लानि असें म्हणतात. किंवा कोणी हर्षक्षय असेंही म्हणतात.

**जांभईचें लक्षण**—चेतनेचें स्थान शिथिल झालें असतां मनुष्य एक श्वासातें पिऊन नंतर विस्तीर्ण वदन ह्मणजे मुख पसरीत होत्साता त्याच श्वासातें मुखावाटें बाहेर टाकितो त्याला जृंभा ह्म० जांभई असें म्हणतात.

**शिंकेचें लक्षण**—उदान ह्मणजे कंठस्थित वायु आणि प्राण म्हणजे हृदय-स्थ वायु यांच्या शिराद्वारापासून ऊर्ध्व मस्तकाचे ठिकाणीं संयोग होऊन त्यापासून मस्तकांतून कफाचा स्राव होऊन उभयताचा संयोग होऊन जो शब्द निघतो त्यास शिंक असें म्हणतात.

**ढेकराचें लक्षण**—उदानवायूचा कोप होऊन जे उदानवायूचें ऊर्ध्व गमन होतें व अन्नादिकांचा जो आहार तो स्वस्थानीं जाऊन सुस्थिर राहून वायूचें ऊर्ध्व गमन होतें त्यास ढेकर असें म्हणतात.

---

## मनुष्यांच्या प्रकृतीचीं लक्षणें.

**वातप्रकृति मनुष्य**—दुर्गुणी, हात, पाय वगैरे अवयव फुटीर ह्मणजे चिरा पडलेले, मिशा, नखें व केश हे अल्प असून रुक्ष ह्मणजे निस्तेज असतात. शीत-पदार्थाचा द्वेष करणारा, त्याचें धैर्य, स्मरणशक्ति, बुद्धि, मैत्री, दृष्टि, गति व कृति हे अस्थिर असतात. फार वाचाळ, पित्त, बळ, आयुष्य व झोंप हीं कमी असते. शब्द खोल असतो किंवा बोलतांना अडखळतो किंवा फार जलद बोलतो, किंवा शब्द घोगरा असतो. नास्तिक, खादाड व विलासी असा असून गाणें, हंसणें, पश्वा-दिकांची शिकार करणें म्हणजे त्यास मारणें व तंटे करणें यात गढून गेलेला असतो. मधुर, आंबट, खारट व उष्ण असे पदार्थ त्यास मानवतात व त्यांची त्यास आवड असते. कृश व उंच असतो, चालतांना पाय वाजतात व तो वळकट, जितेंद्रिय व सभ्य नसतो. बायकांस आवडत नाहीं.[१] त्यास फार मुलें होत नाहींत. त्याचे डोळे रुक्ष, मळकट, वाटोळे, वाईट व मढ्यासारखे दिसत असून झोंपेंत अर्धे मिटलेले असतात. तो स्वप्नांत झाडावर व डोंगरावर चढतो व आकाशांत संचार करितो. हलकट, दुसऱ्याचा मत्सर करणारा, चोरटा व पोटऱ्या फार लठ्ठ असतात. कुत्रा,[२] कोल्हा, उंट, गिधाड, उंदीर व कावळा यांचेसारखा त्यांचा स्वभाव असतो. अतिशय जागरणशील, आकृतीनें वाईट, दांत व नखें खाण्याची संवय, व त्यास धैर्य नसतें. अल्प कारणानीं मैत्री सोडतो. परोपकार जाणत नाहीं. स्वप्नात भ्रम पावून विपत्तीत पडतो. त्याला रत्नें, मित्र व धन हीं अल्प असतात; आणि किंचित् विलापपूर्वक अबद्ध असें भाषण करतो, तो वातप्रकृतीचा मनुष्य जाणावा.

**पित्तप्रकृतीचा मनुष्य**—त्यास भूक व तहान फार असते. गोरा असून सर्व अंग उष्ण असतें. हात, पाय व तोंड हीं लाल असतात. शूर, अभिमानी, केशांचा

---

१ स्त्रियांचें समाधान करण्यासारखी त्यास ताकद नसते ह्मणून त्यास आवडत नाहीं. २ कुत्रीं, कोल्हीं, व कावळे हे साधारण ठक असतात ह्मणून हीं नावे त्यास दिलीं आहेत.

वर्ण पिंगट असून ते अल्प असतात. त्यास फुलें, सुवासिक पदार्थ व नटणें फार आवडतें. त्याचें आचरण शुद्ध चांगलें असून पवित्र असतें. आश्रितांची दया करणारा, ऐश्वर्य, साहस, बुद्धि व बल यानी युक्त असतो. शत्रु शरण आले असतां त्याचेही उपयोगी पडतो. बुद्धिमान् व त्याचे संधीबंध व मांस हीं शिथिल असतात. स्त्रियांस आवडत नाही. त्याचें शुक्र व काम अल्प असतो, केंस लवकर पिकणें, अंगास सुरकुत्या पडणे, व निलिका म्ह० काळे चट्टे हे तर त्यास मुख्यत्वेंकरून असतात. तो मधुर, तुरट, कडू व थंड असें अन्न भक्षण करतो, उन्हाचा द्वेष करतो, त्याचे अंगास घाम व घाण फार येते, मळ, मूत्र, खाणें, पिणें राग व ईर्षा हीं त्यास फार असतात. तो स्वप्नांत लाल रंग, तारे तुटणें, वीज, सूर्य व अग्नि ही पहातो, डोळे बारीक, पिंगट व चंचल असे असतात; पापण्यांचे केंश विरळ असून आंखूड असतात. डोळ्यांस थंड पदार्थ लावण्याची प्रीति असते. रागानें व मद्य प्यायल्यानें किंवा सूर्यतापानें तो फार लवकर लाल होतो. आयुष्य व बल मध्यम; विद्वान्, क्लेश ह्म० विपत्ति न सोसणारा, वाघ, अस्वल, वानर, व यक्ष यांसारिखा त्याचा स्वभाव असतो. डोक्यास टक्कल असतें, रागे भरण्यास व प्रसन्न होण्यास उशीर लागत नाही; कुशल, दुसऱ्यावर छाप ठेवून बोलणारा, तेजस्वी, जशास तसें वर्तन ठेवणारा, गमनकाली पीडा पावणारा, व ज्यास धांवतां येत नाही असा मनुष्य पित्तप्रकृतीचा जाणावा.

**कफप्रकृति मनुष्य**—सौम्य, त्याचे साधे, हाडें व मांस हीं पुष्ट, स्निग्ध व घट्ट असतात;. तो भूक, तहान, दुःख, क्लेश व उष्ण यांनीं घाबरा होत नाहीं, बुद्धिमान्, सत्वगुणी, खरें बोलणारा, त्याचे अंगाचा रंग गोरोचन, कमळ, किंवा सोनें, यांसारिखा असतो, हात लांब, छाती रुंद असून पुष्ट, कपाळ मोठें, केंश दाट व काळे, अंग मृदु, शरीर सुंदर असून छाती दंड वगैरे भाग अगदी स्पष्ट व योग्य प्रमाणानें असतात; ओज[1], विषयइच्छा, शुक्र, मुलें व चाकर हीं त्यास पुष्कळ असतात. धार्मिक असून निष्ठुर भाषण कधीही बोलत नाहीं, एकादी गोष्ट फार दिवस मनांत बळकट द्वेषबुद्धीनें ठेवितो; बोलून दाखवीत नाहीं. मदोन्मत्त, चालणें हत्तीसारखें, मेघ, समुद्र, मृदंग व सिंह याच्या शब्दासारखा शब्द ( गंभीर ) असतो, स्मरणशक्ति चांगली असून फार उद्योगी व नम्र असतो, लहानपणी फार रडका व गडबड्या नसतो. कडू, तुरट, तिखट, उष्ण व रुक्ष असे पदार्थ खातो. थोडें अन्न खाऊनही त्यास शक्ति फार असते, डोळ्याचें काळें व पांढरें बुबुळ फारच स्निग्ध, लांब, रुंद व स्पष्ट असून त्यांच्या कडा लाल असतात; पापण्यांस केंस फार असतात; त्याचें बोलणें, राग, खाणें, पिणें व ईर्षा हीं कमी (बाताबेतानें) असतात. आयुष्य व पैसा पुष्कळ असतो. दूरवर विचार करणारा, गोड बोलणारा, भाविक, गंभीर, खोल मनाचा, आंतल्या गाठीचा, उदार, क्षमाशील, संभावित, झोंपाळू, दीर्घसूत्री ( चेंगट ) कृतज्ञ, सरळ, विद्वान्, ऐश्वर्यवान्, भिडस्त व वडील म-

१ तेज.

नुष्याची सेवा करणारा असून त्याची मैत्री स्थिर असते. तो स्वप्नांत ज्यांत कमळ व पक्षी आहेत अशीं तळीं, सरोवरें जलाशय व मेघ पाहतो, ब्रह्मदेव, शंकर, इंद्र, वरुण, गरुड, हंस, ऐरावत, सिंह, घोडा, गाय व बैल यांच्या सारखा ज्याचा स्वभाव असतो. भाग्यवान्, आपत्कालीं धैर्य न सोडणारा असा कफप्रकृति मनुष्य जाणावा.

**द्वंद्वज व सन्निपातज प्रकृति**—वैद्यांनीं दोहों व तीही दोषांचीं लक्षणें जाणून द्वंद्वज व सन्निपातज अशा प्रकृति जाणाव्या.

॥ प्रकोपोवान्यभावोवाक्षयोवानोपजायते । प्रकृतीनांस्वभावेनजायतेतुगतायुषः ॥

**अर्थ**—पूर्वोक्त प्रकृतीचा स्वभावेंकरून प्रकोप, विकार व क्षय हे होत नाहींत, परंतु मनुष्य गतायु होतो त्या काळीं, जी प्रकृति असते त्या दोषांचें प्राबल्य होऊन प्राणी मरण पावतो. जसा विषामध्यें उत्पन्न झालेला किडा त्या विषेंकरून पीडा पावत नाहीं तसे प्रकृतिगत वातादि दोष स्वजन्य मनुष्यांना विशेष बाधीत नाहींत, परंतु स्फुटित[१] कर-चरणादी विकारेंकरून अल्प बाधा करितात. हीं वरील लक्षणें निरनिराळीं सांगितली आहेत. परंतु ही लक्षणें सर्वत्र ठिकाणीं सारखी उतरून अनुभव येत नाही याचें कारण हे वर सांगितलेले गुणदोष कोठें फार असतात व कोठें थोडे असतात व एखादे ठिकाणीं तर फारच थोडे सांपडतात यामुळें अनुभव येण्यास अंतर पडतें. याकरिता सूक्ष्म भेदानें परीक्षा करावी.

**सत्व, रज व तम प्रकृति**—पवित्रता, आस्तिक्य इत्यादि गुणांवरून सात्विक, राजस व तामस या प्रकृति जाणाव्या. यांतही द्वंद्वज व सन्निपातिक मिळून सात प्रकार आहेत. ॥ अनुत्सेकमदैन्यंचसुखंदुःखंचसेवते ॥ सत्त्ववांस्तप्यमानस्तुराजसोनैवतामसः ॥ सात्विक पुरुष सुख झाल्यानें फार अभिमान दाखवित नाहीत, व दुःख झाल्यानें फारसें दैन्यही दाखवित नाहींत. राजस पुरुषास सुख प्राप्त झालें असतां त्यास फारच हर्ष होतो व दुःखानें तो फारच दीन होतो. तामस पुरुषास सुखदुःखाची धड कल्पनाच नसते कारण तो निवळ पाषाणच असतो.

**बालवृद्धादि अवस्था**—वयाच्या तीन भागापैकी सोळा वर्षेपर्यंत बाळपण, त्यांत सप्त धातू, इंद्रियें व ओज यांची वृद्धि होते, सत्तरवर्षेपर्यंत मध्यम वय; त्यात धात्वादिकांची वृद्धि होत नाही. सत्तर वर्षांनंतर वृध्धपण त्यांत धात्वादिकांचा क्षय होतो. म्हणजे ऐकक धातू क्षीण होत जाते व त्यामुळेंच मनुष्य मरण मरतो.

**आयुष्यलक्षण**—स्वतःच्या हातानें ज्याची साडेतीन हात उंची असते त्यास शरीरसुख म्हणजे आरोग्य आणि आयुष्यही पात्र होतात. केस नसणें, केस फार असणें, फार काळेपणा, फार गोरेपणा, फार लठ्ठपणा, फार कृशता, फार उंच असणें व फार ठेंगणें असणें हे आठ निंद्य गुण ज्या पुरुषाचे शरीरांत असतात त्यास

---

१ फुटणें ह्मणजे साधारण पीडा.

आरोग्य व आयुष्य हीं प्राप्त होत नाहीत. केंस तुळतुळीत, मऊ, बारीक, स्थिर, सहज न उपटणारे, त्यांचीं मुळें अनेक, कपाळ उंच असून अर्ध चंद्राकार, आंख फुगलेले, कान लहान असून उभारलेले, मागें पसरट, सुरेख व मांसल डोळ्याचें काळें व पांढरें बुबुळ अगदीं स्वच्छ, पापण्यांस केंस दाट असून बळकट, नाक सरळ, (नकटें नव्हे व मध्यें उंचवटही नव्हे) असून त्याची बोंडी वर आलेली असावी, श्वास मोठा, ओंठ लाल असून पुढें आलेले नसावे, जबडे मोठे असून उंच नसावे, तोंड मोठें असावें, दांत दाट, [ विरळ नव्हे ) पांढरे व सारखे असावे. जीभ लाल, लांब व पातळ, हनुवटी मांसल व मोठी, मान आखूड, जाड व गोल, खांदे उंच व पुष्ट. पोट अंमळ उंच असून बेंबी खोल गेलेली व तिचा भोंवरा उजवीकडे असावा. नखें पातळ, लाल व फुगीर असावी. हातपाय मोठे, स्निग्ध, किंचित् तांबडे व मांसल असावे, बोटें लांब असून त्यांत फटी नसाव्या. पाठ मोठी असून कणा बुजलेला असावा. सांधे घट्ट व बळकट असावे. आवाज गंभीर, वर्ण स्निग्ध व तेजस्वी, स्वाभाविक, कायमचें व रोगादिकांतही फारसे विकार न पावणारें बल असावें. या वर सांगितलेल्या गुणांनी युक्त जें शरीर तें १०० वर्षे वाचतें व त्यास ऐश्वर्य व सर्व प्रकारच्या इष्ट गोष्टी प्राप्त होतात असें जाणावें. या लक्षणांवरून आयुर्ज्ञान सहज लक्षांत येण्यासारखें आहे म्हणून या विषयाची येथें मुद्दाम योजना केली आहे. याचें तात्पर्य असें कीं.—

**॥ दानशीलदयासत्यब्रह्मचर्यकृतज्ञताः ॥**
**॥ रसायनानि मैत्रीच पुण्यायुर्वृद्धिकृद्गणः ॥**

अर्थ—दातृत्व म्हणजे दानशक्ति, सुस्वभाव म्हणजे उत्तम प्रकारचा स्वभाव दया, खरेमणा, ब्रह्मचर्य ( अल्पविषय ) कृतज्ञता म्हणजे उपकार जाणणें, रसायनें म्हणजे साधारण औषधें व मैत्री इतक्या गोष्टी पुण्य व आयुष्य वाढविणाऱ्या आहेत असें जाणावें.

---

## वैद्यलक्षण.

गुरूपासून संपूर्ण वैद्यक शिकलेला, रसायनादि औषधी करण्याविषयीं कुशल, जलद कार्य करणारा, यशस्वी, शुचिर्भूत, लोभरहित, धैर्यवान्, दयाळू, सदाचरणी, अहंकाररहित धर्म करणारा, आळसरहित, देवभक्त, बुद्धिमान् सत्यधर्मानें वागणारा व प्रौढवयाचा व ज्याला एकेक रोगावर पुष्कळ औषधी माहित आहेत अशा लक्षणांनीं युक्त वैद्यास हटकून यश मिळतें. जो वैद्य रोग जाणल्यावांचून औषध देतो, तो औषध जाणणारा जरी असला तथापि गुण प्रारब्ध योगानें येणार. जो वैद्य केवळ शास्त्रमात्र जाणतो आणि औषधें देण्याविषयी चांगला कुशल नाहीं तो वैद्य रोग्याला पाहून मोह पावतो. कारण त्यास समजतें की हा रोग अमुक आहे. प-

रंतु त्याजवर औषध देण्याला त्याचे जवळ तयार नसतें, याकरितां ज्या वैद्याला रोगाची चांगली परीक्षा आहे व संपूर्ण औषधी तयार करण्यामध्यें मोठा कुशल व हुशार असून देश, काळ, विभाग, रोगाचें बलावल जाणणारा अशाच वैद्यापासून रोग्याला आरोग्य प्राप्त होतें यांत संशय नाही.

---

## वैद्यास सूचना.

वैद्यानें क्रूर, साहसी, भित्रा, कृतघ्न, [१]व्यग्र, शोक करणारा, मरणाची इच्छा करणार, ज्याचीं इंद्रियें अगदी विगलित झाली आहेत तो; वैर करणारा, स्वतः वैद्यपणाचा अभिमान बाळगणारा, अविश्वासु, शंका पावणारा, स्वतः औषध प्रकार जाणणारा आणि वैद्याचे आज्ञेंत न राहणारा, अशा प्रकारच्या रोग्याला औषध देऊं नये. कारण त्या औषधाचा परिणाम रोग्याकडून यथास्थित होत नाही. वैद्यानें प्रथम विचक्षणापूर्वक रोगाची परीक्षा करून नंतर औषधाची योजना करावी, रोगी जोंपर्यंत श्वासोच्छ्वास सोडितो तोंपर्यंत औषधादि उपाय करावे. कारण मृतप्राय झालेलाही रोगी उपचार केले असतां दैवयोगानें वांचूं शकेल. रोग्यास आयुष्य असतांही जर उपाय केला नाहीं तर तो मरेल. यास उदाहरण—जसें तेल, वात व अग्नि हीं साहित्यें असूनही वाऱ्याचे योगानें दिवा जातो. तर तेथें असें समजावयाचें की, समई हेंच शरीर, तेल हें आयुष्य आणि वात व दिव्याची जोत हे प्राण. यावरून उघड दिसेल कीं, आयुष्य असतांही त्याचें संरक्षण बराबर केलें नाहीं तर प्राण जातो. अथर्वणशास्त्रकारांनीं [२]एकशेंएक मृत्यु आहेत असें सांगितलें आहे; परंतु त्यांमध्यें एकच कालसंज्ञक म्हणजे प्राण हरण करणारा आहे, बाकीचे आगांतुक मृत्यु आहेत, ते उपचारेंकरून नाहींसे होतात. व शेवटचा कालसंज्ञक मात्र नाहींसा होत नाहीं, म्हणजे टाळला जात नाही. वर सांगितलें आहे की श्वासोच्छ्वास सोडितोंपर्यंत उपाय करावे, परंतु हा

---

१ अतिव्याकुळ २ पूर्वी आश्विनी कुमारादि वैद्याची वैद्यकी फार सतेज चालली त्यामुळे मनुष्य मरण्याचें बंद झालें पुढें यमराजामध्यें व धन्वतरीमध्यें मोठा वाद होऊन तें भांडण परमेष्ठीकडे गेलें. ते म्हणाले धन्वतरी लोक आपल्या औषधाचे जोरानें मनुष्ये मरू देत नाहींत. व यमराजाचा व्यापार बंद पडला हे चांगलें नव्हे करितां त्या दोघाची थोडक्यात समजुत करून धन्वतरीस सांगितलें कीं एकशेंएक मृत्यु आहेत, पैकीं शंभर औषधाने टळतील व शेवटचा एक राहिलेला मृत्यु कोणत्याही उपायानें टळणार नाहीं. आता येथें शंका येते की, असें जर आहे तर औषधाचे वीर्याचें काय होतें तर त्याबद्दल अशी योजना करून ठेविली आहे कीं कात्यायनीस आज्ञा देऊन ठेविली आहे ती अशी कीं, कालसंज्ञक मृत्यस कोणीं औषध दिलें तर त्या औषधाचें वीर्य तात्काळ हरण करीत जावें. मग उघडच झालें कीं, त्यापासून काहींच गुण यावयाचा नाहीं, ती औषधरूपें मृत्तिकाच होय यास प्रमाणही आढळतें ते असें ॥ तानिभेषजवीर्याणिप्रतिघ्नंतिजिघांसया ॥ तस्मान्मोघा. क्रिया सर्वा भवत्येवगतायुष ॥ अर्थ—भूतें व प्रेत गतायु रोग्याला मारण्याच्या इच्छेनें औषधाचें वीर्य हरण करितात. याकरितां संपूर्ण औषध क्रिया व्यर्थ होते. असें पूर्वीच्या ऋषींनीं कथन करून ठेविलें आहे.

प्रकार ज्या ठिकाणीं रोगी असाध्य झाला आहे त्या ठिकाणी लागू नाहीं ह्म० असाध्य रोगास मुळींच वैद्यानें उपचार करूं नये. मग तो रोगी जरी चालता बोलता असला तरी हरकत नाही. आतां हें असाध्यत्व समजण्याकरितां ठिकठिकाणीं असाध्यत्वाचे सिद्धांत दिले आहेत. त्यांतील एक उदाहरण येथें देतों तें असें कीं, वयाच्या ७० वर्षांपुढें सप्तधातू इत्यादिकांचा क्षय होत जातो व पूर्ण क्षय झाला म्हणजे देहाची समाप्ति होते; तर अशा समयीं त्यास मोठें दैदीप्यमान रसायन जरी दिलें तरी तें व्यर्थ जातें. हाच हेतु असाध्य प्रकृतीचे ठायीं जाणावा. वैद्यानें देश, काल, रोगाचें व रोग्याचें बलाबल इत्यादि सर्व लक्षणें पाहून नंतर औषध देण्यास आरंभ करावा. औषधाच्या सेवनाचें प्रमाण निश्चयेंकरून सांगतां येत नाही. याकरितां काल, जठराग्नि, बल, प्रकृति, दोष व देश यांचा सूक्ष्म विचार करून नंतर औषधाचे मानाची योजना करावी. व्याधि उत्पन्न झाल्याबरोबर उपचार सुरु करावा. तो अल्प आहे ह्मणून त्याची उपेक्षा करूं नये, परंतु अतिसार, ज्वर, रक्तपित्त व नेत्ररोग इतक्यांचेठायीं प्रथमतः औषध देऊं नये. कारण या रोगांचे वेग मोठे कठिण आहेत. व ते पक्वदशेंत आल्यावर उपाय करावे. यास पूर्वोक्तग्रंथाचें प्रमाण—

अतिसारे ज्वरे चैव रक्तपित्ते दृगामये । आदौ न प्रतिकुर्वीत व्याधिवेगोहि दुस्तरः ॥

दोषांवांचून व्याधि नाहीं असें जाणून जे दोष व लक्षणें शास्त्रांत सांगितलीं नाहीत तीं दोष व लक्षणें रोग्याच्या उपद्रवावरून जाणावीं व अमुकच रोग आहे असें प्रमाणानें ठरवून नंतर उपचार सुरु ठेवावे. औषध देण्याचा समय प्राप्त झाला नसता दिलें किंवा समयी न दिलें अथवा कमी किंवा जास्त दिलें तर गुणावह होत नाहीं. अल्प विकारावर मोठी क्रिया व मोठ्या विकारावर अल्प क्रिया अगदीं अप्रशस्त, याकरितां जेवढा रोग असेल तेवढी क्रिया करावी. एक औषध देऊन गुण आला नाहीं तर पूर्वीच्या औषधाचें [1]वीर्य शांत झाल्यावर दुसरा उपाय करावा. एकसारख्याच २ क्रिया एकेकाळी करूं नयेत, परंतु त्याच जर भिन्न ( पोटांत औषध देणें व वर लेप अथवा अंजनादि उपाय करणें ) असल्या तर दोषकारक होत नाहींत. शास्त्रामध्यें सर्व सांगितलें आहे तथापि वैद्य सर्व जाणतो असें नाही. याकरितां वैद्यानें स्वतां तर्क चालवून चिकित्सा करावी. जर देश, काल व रोगाचें बलाबल पाहून औषध दिलें असताही गुण न येईल किंवा अवगुण दिसेल तर तें औषध बंद करून दुसरें चालूं करावें. जें औषध रोग्यास भावत नाही तें जरी सशास्त्र प्रमाण आहे तरी देऊं नये. एखादे असाध्य-रोग्यास वैद्याचे मनांतून औषध देण्याचें न-

---

१ दोन प्रहरानीं काढे वगैरे औषधाचें वीर्य शांत होते असें जाणावें ह्मणून दोन प्रहर गेल्यावर दुसरे औषधाची योजना करणें असल्यास करीत जावी. ह्मणजे अपाय न होता गुण येईल परंतु विष व महामारी यासारिखा त्वरित प्राणहरण करणारा रोग असल्यास दोन प्रहर वाट पहाण्याची जरुरी नाहीं तारतम्यानें काम करीत जावें.

सेल तर देऊं नये ही गोष्ट इष्ट आहे; परंतु प्रत्यक्ष त्यास ह्मणजे रोग्यास किंवा त्याचे आप्तवर्गास रोग्याचे मरणाबद्दलची धास्ती किमपिही घालूं नये. व मरण सांगूं नये हें वैद्यानें पक्कें लक्षांत ठेवावें.

**रोगपरीक्षेचा प्रकार**—वातादि दोषांची जी विषमस्थिति त्याचेंच नांव रोग व समानस्थिति तेंच आरोग्य.रोग दोन प्रकारचे निज व आगंतुक.वातादि दोषांपासून जे रोग उत्पन्न होतात त्यांस निज असें ह्मणतात. व बाह्य कारणापासून उत्पन्न होतात त्यांस आगंतुक असें ह्मणतात. या दोहोंत भेद इतकाच की, ज्या रोगांत पहिल्यानें वातादि दोष कुपित होतात नंतर रोग उत्पन्न होतात ते निजरोग. व आगंतुकरोग पहिल्यानेंच बाह्य कारणापासून उत्पन्न होऊन मग वातादि दोषांचा प्रकोप करितात.

रोगाचें अधिष्ठानही २ प्रकारचें आहे, एक शरीर दुसरें मन, ज्वर, रक्तपित्त, अतिसार वगैरे शारीरिक आणि उन्माद अपस्मार, मूर्च्छा, भूतबाधा वगैरे मानसिक होत. करितां शारीरिकरोग औषधानें व मानसिक दोष मनाच्या निग्रहानें शांत करावे. कारण रज व तम हे दोन मनाचे दोष आहेत ह्मणून.

दर्शन, स्पर्शन व प्रश्न यांचेच योगानें रोगाची परीक्षा करावी, असें वाग्भट्टाचें मत आहे. ते म्हणतात—खोकला, प्रमेह, इ० रोग्यांत मल, मूत्र, कफ, वांति, इत्यादिकांचा वर्ण, आकार, प्रमाण वगैरेचें ज्ञान दर्शनानेंच होतें. ज्वर, गुल्म, पांथरी, विद्रधि इ० रोगात उष्णता, कठिणपणा, घनत्व व द्रवत्व इत्यादिकांचें ज्ञान स्पर्शेंकरून होतें. क्षुधा, तृषा, मळमळणें, वेदना, कोठ्याचा जडपणा किंवा हलकेपणा व जन्मापासून जे रोग झाले ते इत्यादि गोष्टींची माहिती रोग्यालाच प्रश्न करून विचारली पाहिजे.

निदान, पूर्वरूप, लक्षणें, उपशय व संप्राप्ति. या पांच साधनांनीं रोगाची परीक्षा करावी. त्याचे प्रकार सविस्तर सांगतों.

**निदान**—निदान ह्मणजे रोगाची कारणें दोन प्रकारची, जवळचीं व दूरचीं, थंड पाण्यानें स्नान करणें, थंड हवेंत निजणें, इ० ज्वराची दूरची कारणें होत. व या कारणापासून वातादि दोष कुपित होणें व कोष्ठगत अग्नीचा ऱ्हास होणें ही ज्वराचीं जवळचीं कारणें होत.

**पूर्वरूप**—पूर्वरूप म्हणजे रोगाचें स्वरूप प्रगट होण्या पूर्वीं जे विकार भासूं लागतात. जसें ज्वर यावयाचा असला ह्मणजे पूर्वीं अग्निमांद्य होतें, अंग जड होतें. डोळ्यांची आग, जांभया हे प्रकार होतात. खुद्द रोगाचीच लक्षणें व्यक्त झाली ह्मणजे त्यासच रूप असें ह्मणतात.

---

१ बहुतेक रोग असे आहेत की ते धास्तीनें अधिक वाढून त्या योगाने रोगी मरण पावतो जसे धास्तीनें रोग अधिक वाढतात तसे उत्तेजनाने कमीही होतात असें जाणावें.

**उपशय**---उपशय म्हणजे निरनिराळ्या औषधान्नविहारापासून रोगाचा जोर कमी होणें, जसें एखादे मनुष्यास पोटशूळ आहे व त्याणीं जर सांगितलें कीं दूध प्याल्यानें तो किंचित् कमी होतो, तर त्याजवरून खात्री समजावी कीं त्याचा विकार पित्तापासून असावा.

**संप्राप्ति**---संप्राप्ति म्हणजे त्या त्या कारणांनीं कुपित झालेले दोष त्या त्या मार्गांनीं संचार करीत एखाद्या स्थानीं प्राप्त होऊन जी रोगाची उत्पत्ति करितात ती जाणावी.

दृष्य, देश, काल, प्रकृति, बल, अग्नि, वय, मनाची स्थीति व नेहमींच्या संवयी यांचे व त्यांचे जे बारीक निरनिराळे भेद यांचें चागलें अवलोकन करून जो दोष व औषध यांचें निरूपण करितो तो चिकित्सेंत कधींही चुकत नाहीं.

शरीराच्या व मनाच्या बलाबलाप्रमाणें व्याधीच्या मोठ्या किंवा लहान स्वरूपाचा अन्यथाभास होतो ह्मणून व्याधीचें खरें स्वरूप जाणण्याविषयीं फार लक्ष पुरवावें. शरीरानें व मनानें बळकट अशा मनुष्याला जरी एखादा मोठा रोग झाला तरी त्याचें स्वरूप लहान दिसतें व अशक्त आणि हावले मनुष्याला जरी एखादा क्षुल्लक रोग झाला तरी त्या रोगानें तो घाबरा होऊन रोगाचें स्वरूप भयंकर दाखवितो व घरांतील सर्व मनुष्यांस घाबरे करितो. याच कारणांनी बहुतेक वैद्यांची चूक होते ती अशी की मोठ्या व्याधीला लहान व्याधि आहे असें समजून व अल्पच दोष असतील असा तर्क करून औषध देतात. मग अर्थातच अल्पवीर्य किंवा अल्प प्रमाणानें एखादें शोधन औषध देऊन रोग अधिकच वाढवितो. कारण तें शोधन अपुरतें ( हीनयोग ) होतें. आतां यांच्या उलट अल्प व्याधि असून अन्यथाभासानें जर त्याजवर एखादें दांडगें शोधन औषध पोंचलें तर तें केवळ मळाचाच क्षय करितें असें नाहीं तर तें शरीराचाही नाश करितें असें जाणावें. यास्तव शास्त्राचा सतत अभ्यास करून सर्व गोष्टीचा सर्व प्रकारें विचार करून अशा रीतीनें औषधाची योजना करावी कीं तें हटकून गुणावह होईल. मुख्यत्वेंकरून विषम व सन्निपातज्वर यांत अज्ञान वैद्यांचे चिकित्सेपासून गुण आला तर तो केवळ रोग्याचे प्रारब्धयोगानें आला असें समजले पाहिजे. कारण अशा ज्वरांची सूक्ष्म रीतीनें चिकित्सा करणें म्हणजे मोठे दुर्घट कर्म आहे असें जाणावें.

---

## दूतपरीक्षा.

**अयोग्य दूत**-रोग्याचे जातीशिवाय अन्य जातीचा, धांवत आलेला, भ्यालेला, त्रासलेला, अभद्र बोलणारा, रोगी, शोकार्त, रडणारा, पापिष्ट, आरक्त, भगवें किंवा काळें वस्त्र नेसलेला, हातांत काठी घेतलेला, नपुंसक, क्षौर केलेला, जटाधारी, क्रूर, घाणेरडा, बायको, दोन मनुष्यें, लंगडा, थोटा, पांगळा, मुका, आंधळा, तांबडें गंध लावलेला,

तेल किंवा चिखल यांनीं माखलेला, जुनें, विटकें, भिजलेलें किंवा एकच वस्त्र घेऊन आलेला, गाढव, उंट किंवा रेडा यांवर बसून आलेला, लांकूड, मातीचें ढेकूळ किंवा दुसरा कांहीं पदार्थ फोडीत फोडीत आलेला, व दुरूनच वैद्यास मोठ्यानें हाका मारणारा, असा मनुष्य वैद्यास बोलावण्यास आला असता वैद्यानें रोग्याकडे जाऊं नये. तसेंच वैद्य निजला असता, अभ्यंग केलें असतां व त्यास कोणत्याही प्रकारचा विटाळ झाला असतां रोग्याकडून मनुष्य बोलावण्यास आला असता; तो रोगी मरणार असें समजावें. त्याच प्रमाणें मध्यरात्रीं, दुपारीं, संध्याकाळीं, सकाळीं, सूर्योदयापूर्वीं व सायंकाळीं सूर्यअस्तमानानंतर, अमावास्या, पौर्णिमा, षष्ठी, चतुर्थी व नवमी या तिथीस, ग्रहणसमयीं, व भरणी, कृत्तिका, आश्लेषा, पूर्वा, आरद्रा, मघा, व मूळ हीं नक्षत्रें असतील त्यावेळीं, वैद्यास बोलावणें आलें असतां वैद्यानें जाऊं नये. जो दूत नाक, स्तन व ललाट याजवर हात ठेवणारा व केंश पसरलेला असा अयोग्य जाणावा.

**योग्य दूत**—रोग्याचे जातीचा, पांढरीं वस्त्रें धारण केलेला, हातांत द्रव्यें घेतलेला, क्षत्रिय अथवा ब्राह्मण, तांबूल भक्षण केलेला, सुशील आणि शुभवचन बोलणारा, सर्व अवयव यथास्थित असलेला, घोडा किंवा बैल यांवर बसून आलेला, पांढरीं पुष्पें किंवा कोणतींही फळें हस्तामध्यें घेतलेला, अशा प्रकारचे दूत रोग्याचे सुखाला कारण होतात.

**दूतप्रश्न**—दूत जी अक्षरें प्रथम बोलेल तीं मोजून निम्मीं करावीं आणि तिहीनीं भागावें. बाकी शून्य राहिलें असतां मृत्यु व अंक राहिला असता रोगी वांचेल. वैद्यानें दूताचे प्रश्नाची अक्षरें मोजून त्यांचे ३ भाग करावे, आणि त्या भागाला ८ यानी भागावें. बाकी सम राहिले असतां मृत्यु व विषम राहिले असतां रोग्यास आरोग्य जाणावें.

**दूतास शकुन**—ज्या दूतास मार्गात भेरी, मृदंगादिक जे सौम्य शकुन ते रोग्यास शुभदायक होत नाहींत. व अंगावर तेल, कुळिथ इत्यादिक जे अशुभ शकुन ते रोग्यास शुभदायक होतात. हें श्रेष्ठाचें मत आहे ह्मणून भरंवसा मात्र ठेवावा; परंतु सिद्धात करूं नये.

---

## वैद्यास शुभाशुभ शकुन.

**शुभ शकुन**—रोग्याकडे जाते वेळेस वैद्याचे उजवे बाजूस हत्ती, खेंचर, यावांचून पुरुषनामवाचक जीव भेटले असतां श्रेष्ठ व डावे बाजूस भालु ( कोल्हा असल इ० ) व व्यायल्या गाईवांचून स्त्रीवाचक श्रेष्ठ जाणावे. वैद्य रोग्याकडे जाण्यास निघाल्यावर वाटेंत प्रथमतः हत्ती, ब्राह्मण, घोडा, बैल, फळ, छत्र, मांस, उदककुंभ, अपत्ययुक्त सुवासिनी, गाई, मोर, विणा, नौबद, मृदंग, शंख, भेरी, यांचे शब्द,

आणि वेदपाठ, स्तोत्रादि पाठ व चाषपक्षी, सिद्ध केलेलें अन्न, राजा, फुलें, कळावंतिण आणि चंदन, हे पुढें आले असतां शुभ जाणावें. कावळे, कबुतरें वगैरे पक्षी व हरिणादि पशु, डावीकडून उजवीकडे गेले असतां चांगलें आणि कुत्रें, सर्प, उंदीर, मुंगूस, मासे, दहीं. दूध, रुपें, लांडगे, बकरें, रडल्यावांचून प्रेत, पेटलेल्या अग्नीच्या ज्वाला, श्वेतवस्त्र आणि ध्वज ही डावीकडे प्रशस्त आहेत. सर्व शकुनांत शकुन हा मुख्य जाणावा की चित्ताच्या उल्हासानें सर्व सिद्धि होतात यांत संशय नाहीं.

**वैद्याला अपशकुन**—रोग्याकडे जाण्यास निघाल्यावर मांजर, घोरपड, सरड, किंवा वानर हे प्राणी आडवे गेले आणि नंतर जरी मंगल पदार्थ पुढें भेटले तरी ते अमंगलकारक होतात असें जाणावें.

---

## स्वप्नपरीक्षा.

स्वप्न बरें किंवा वाईट फल जें पुढें होणार त्याला सुचवितें, यासाठीं स्वप्नाचें लक्षण जाणणें हें योग्य आहे. स्वप्न रात्रीच्या पहिल्या प्रहरीं पडलें असतां त्याचें फल एक वर्षानें, द्वितीय प्रहरी पडलें असतां सहा महिन्यांनंतर, तृतीय प्रहरीं पडलें असतां तीन महिन्यांनंतर, चवथे प्रहरी पडले असता एक महिन्यानंतर, व अरुणोदयीं पडलें असतां दहा दिवसांत फल प्राप्त होतें असें जाणावें. स्वप्न रोग्यास विचारावें; पण त्याचें वाईट फल त्यास कधीं कळवूं नये.

**दुष्ट स्वप्नें**—ज्या पुरुषास काळें वस्त्र नेसलेली व काळ्या चंदनाची उटी लावून काळें कुंकू लावलेली अशी स्त्री स्वप्नांत घट्ट आलिंगन देईल तर तो खचीत मृत्यु पावेल. जो मनुष्य स्वप्नांत हजामत करवितो, लग्न पाहतो, तसेंच आपल्या घरांत नाच चालला आहे असें पाहतो तर तो मृत्यु पावेल. पुरुषानें अथवा स्त्रीनें स्वप्नांत नागवे, संन्यासी व गोसावी इत्यादिक मुडन केलेले, तांबडीं व काळीं वस्त्रें पांघरलेले नाक व कान कांपलेले, पांगळे, कुबडे, खुजे, काळे, हातांत कोणतेंही शस्त्र घेतलेले, चोरादिकांना बांधणारे, व त्याला मारणारे, म्हैस, उंट व गाढव यांजवर बसलेले, इत्यादिकांना पाहिलें असतां ज्याची प्रकृति स्वस्थ आहे त्याला रोग होतो व ज्याला रोग आहे तो मरण पावतो.

**चांगलीं स्वप्नें**—जो मनुष्य स्वप्नांत इंद्रादि देव, राजे, मित्र व ब्राह्मण यांना सजीव पाहतो व गाय, दैदीप्यमान् अग्नि, प्रयागादि तीर्थें, इत्यादिकाना पहातो तो सुख पावतो. जो मनुष्य स्वप्नांत चिखलानें गढूळ झालेल्या पाण्यांतून उतरून गेला, शत्रूच्या समुदायास जिंकिलें व पांढऱ्या रंगानें सारवलेली माडी, बैल, पर्वत, हत्ती, व घोडे इत्यादिकांवर बसलो असे पहातो तो मनुष्य सुख पावतो. जो मनुष्य स्वप्नांत आपल्याला जी स्त्री उपभोगास योग्य नाहीं तिजपाशी गेलो अथवा जें स्थान जाण्यास योग्य नाही त्या स्थानी गेलों असें पाहतो तो व विष्ठेनें अंग भरलें आहे व आपलें

रडणें अथवा दुसऱ्याचें रडणें व आपण मरण पावलों असें पाहतो व कच्चें मांस भक्षण करितो इत्यादिकांना पाहतो तो रोगरहित होतो. ज्या मनुष्याला स्वप्नांत जळू कोणत्याही प्रकारच्या माशा, सर्प इत्यादिक डसतात असें पाहतो व ज्यास स्वप्नांत पांढरीं फुलें, वस्त्रें, मांस, मासे, आंबा वगैरे फळें मिळतात तो रोगी असल्यास निरोगी होईल व निरोगी असल्यास धनलाभ होईल.

**दुष्ट स्वप्नाचा परिहार**—प्रथम सांगितलेलीं दुष्ट स्वप्नें पडल्यास कोणाशीं न बोलतां प्रातःकाळीं स्नान करून सोनें, काळे तीळ व लोखंड हीं दानें करून देवाची स्तुति करावी. आणि रात्रीस देवळांत जागरण करावें. याप्रमाणें ३ दिवस केलें असतां दुष्ट स्वप्नांची बाधा होत नाही.

---

## अष्टविधपरीक्षा, ( नाडी इत्यादि ).

नाडीपरीक्षा ही पूर्वींच्या कोणत्याच प्राचीन ग्रंथांत आढळत नाहीं.ही वरींच शतकें झाल्यावर मागाहून निर्माण झाली असें दिसतें, यावरून ती इतर कोणते तरी दुसरे देशांतून संपादन केलेली असावी यांत संशय नाहीं. सर्वच रोग नाडीवरून समजतात असें नाही परंतु पूर्वींपासून ह्म० नाडीपरीक्षा निघाल्यापासून नाडी पाहण्याचा सांप्रदाय आहे त्याप्रमाणें वैद्य लोक नाडी पाहतात. व तें पाहून डाक्टर लोकही पाहूं लागले आहेत. मग त्यांस काय समजत असेल कोण जाणे.

वैद्य लोक नाडी पाहून रोगाची परीक्षा करितात, आणि रोग्यानें जें जें खाल्लें असेल तें सांगतात असें पूर्वींच्या लोकांचें ह्मणणें आहे व ह्या गोष्टीविषयी लोकांत चांगली प्रसिद्धि आहे परंतु वास्तविक विचार करून पहातां आत्रेयसंहिता, चरक, शुश्रुत, वंगसेन, भेड, वाग्भट आदिकरून महान् महान् ग्रंथांत नाडीपरीक्षेचा कोठें उल्लेख नाहीं. परंतु शार्ङ्गधर चिकित्सासार आदिकरून अलिकडील ग्रंथांत ती पाहण्यांत येते, तिचें वास्तविक ज्ञान व अनुभव असणारे असे वैद्य या पृथ्वीवर थोडेच निपजले असतील. नुसत्या नाडीपरीक्षेवरून ज्यास रोगाचें खरोखर ज्ञान होत असेल त्यास तें केवळ चातुर्यानें किंवा देवतासाक्षात्कारांनीं होत असेल असें मानिलें पाहिजे.

रोग्याच्या परीक्षेचीं स्थानें एकंदर ८ आहेत तीं हीं कीं, १ नाडी, २ मूत्र, ३ मळ, ४ जिव्हा, ५ शब्द, ६ स्पर्श, ७ नेत्र आणि ८ शरीराचा आकार.

**नाडीपरीक्षा**—तैलाभ्यंग, स्नान व भोजन केलेला, क्षुधा व तृषा यांनीं पीडित अशा मनुष्याची नाडी बराबर समजत नाही; ह्मणून प्रातःकाळीं उठून घटकाभर स्वस्थ बसलेला जो त्याची नाडी पाहिजे म्हणजे चांगली समजते. पुरुषांचा उजवा हात व स्त्रियांचा डावा हात लांब सरळ करून रोग्याचे आंगठ्याचे मुळाजवळ वैद्यांनीं आपली तर्जनी ह्म० आपलें आंगठ्याजवळील बोट, मध्यमा ह्म० मधलें बोट

व अनामिका ह्म० करांगुली शेजारचें बोट अशीं तिन्ही बोटें ठेवून वात, पित्त व कफ हे दोष अनुक्रमें जाणावे, ह्म० नाडी तर एकच, परंतु वात अधिक असल्यास तर्जनीखालील नाडी जास्त जोरानें उडते, पित्त असल्यास मधली व कफ असल्यास अनामिके खालील नाडी जास्त उडत असते असा क्रम जाणावा. नाडी पुनःपुनः धरून व सोडून परीक्षा करावी. पूर्वींच्या सांप्रदायानें आणि वैद्यानें आपले अनुभवानें नाडीपरीक्षा करावी. जशी रत्नाची परीक्षा अभ्यासानेंच होते तशी नाडीपरीक्षाही निरंतर अभ्यासानेंच होईल. शिकल्यानें किंवा अन्य उपायानें होणार नाही. फक्त ज्वराची, प्राणांतीची, सशक्त मनुष्याची व अशक्ताची व वात, पित्त आणि कफ मिळून सात नाड्या मात्र समजतात. बाकीच्या रोगाच्या परीक्षा नाडी करून करितां येणार नाहींत असें जाणावें.

प्रातःकाळीं दहा घटकांपर्यंत कफ नाडीचा वेग अधिक असतो. कारण तो कफाचा वेळ आहे ह्मणून. तसेंच मध्यान्ही ह्म० दुपारीं दहा घटकांपर्यंत पित्तनाडी, आणि सायंकाळीं दहा घटकांपर्यंत वातनाडी चालते, याप्रमाणें रात्रींच्याही प्रहराचें मान जाणावें.

**नाडीच्या गतीचीं लक्षणें**—वातविशेष नाडी आंगठ्याजवळील बोटाखालीं वाहते, पित्तविशेषनाडी मध्य ह्म० मधल्या बोटाखालीं वाहते व कफानें शेवटील भाग वाहतो, यावरून दोषत्रय जाणावें. वायूचे वेग विशेष असतां नाडीची गति वांकडी ह्म० सर्प जसा चालतो तशी बोटास भासते. उष्ण वात असल्यास* पित्तकोपाची नाडी उडून उडून ह्म० बेटकुळी, कावळा व चिमणी जसे जमिनीवर चालताना दोन पाय जुळून उड्या मारतात तसें; व कफानें मंदगतीनें ह्म० हंस, पारवे, मोर, कोंबड्याचे गतीसारखी स्थिर चालते. व सन्निपातनाडी फार जलद लावा व तितीरपक्ष्याचे चालीप्रमाणें चालते. **वातपित्त नाडी**—वारंवार बेडकासारखी उडत उडत व लागलीच सर्पासारखी झरझर व वांकडीतिकडी चालूं लागत असून तर्जनी आणि मध्यमा त्या दोहों बोटाखालीं स्पष्ट भासते व तीत उष्णता असते व चक्रगतीनें उडी मारल्याप्रमाणेंही चालते. **वातकफाधिका नाडी**—सर्प व हंस यांच्या मिश्रगतीनें व तर्जनी आणि अनामिका याचेखालीं वांकडी व मंदगतीनें वाहते. **पित्तकफाधिका नाडी**—बेडूक आणि हंस यांच्या मिश्रगतीनें मध्यमांगुली आणि तृतीय आंगुलीच्या खालीं उड्या मारीत मंदगतीनें चालते. **सन्निपातनाडी**—राहून राहून चालते व तिन्हींही अंगुलीचे खालीं व्यक्त भासते. व क्षणात उष्ण व क्षणात थंड अशी व तुटत तुटत, अति त्वरेनें, लांकडाप्रमाणें कठिण आणि स्थिर व वांकडी, क्षणांत हळू व क्षणांत जलद व अति उष्ण, अति मोठा वेग असून ज्वरानें व्याप्त लावा व तीतर पिंगळा, यांच्या गतीसारखी आणि गुंतत गुंतत चालून स्वस्थान सोडून भ्रमते, क्षणात स्थानावर येते. या सर्व सान्निपातिक नाड्या जाणाव्या. **द्विदोषनाडी**—द्विदो-

* सर्व मनगटाच्या नाड्या ओळीनें पाहाव्या. म्हणजे समजेल.

पांचा कोप आला असतां नाडी हळुहळू चालून फिरून लागलीच अरअर चालूं लागते. **सामान्यनाडी**—सामान्य ज्वराचा कोप झाला असतां नाडी उष्ण असून मोठ्या जोराने चालते. कामज्वराची व क्रोधाची मोठ्या वेगानें चालते. चिंता व भय प्राप्त झालेल्या मनुष्याची क्षीण चालते. मंदाग्नि व धातुक्षीण यांची नाडी मंद चालते. रक्तकोपाची नाडी उष्ण असून पाषाणासारखी जड भासते. गर्भिणीची गंभीर ( मंद ) पुष्ट व हलकी अशी भासते. तृषार्त, निजलेला, आळशी, मुर्खा व निजून उठलेला, यांच्या नाड्या फार स्थिर चालतात. मळमूत्रानें व्याप्त आला असतां ज्वराप्रमाणें चालते. **भूतनाडी**—कनिष्ठिकेची चालत असतां भूतोपद्रव; अनामिकेची चालत असतां कुलदेवतेचा क्षोभ व मध्यमेची नाडी चालत असतां समंधिक पीडा जाणावी. **अजीर्णाची नाडी**—अभ्र म्ह० आभाळ चालतें तशी स्थिर रीतीनें व निजलेल्या मनुष्यासारखी व कांहीं कफाचे नाडीसारखी मंद चालते.

**उत्तम प्रकृतीची नाडी**—ज्याचा जठराग्नि प्रदीप्त आहे व ज्यास कोणताच रोग नाही अशा मनुष्याची नाडी अगदीं हलकी व वेगानें सशक्त चालते.

**असाध्यनाडी**—जी नाडी स्वस्थानापासून सुटली ती, व राहून राहून चालते ती, फार क्षीण आणि फार थंड झाली ती, अशा ४ प्रकारच्या नाड्या रोग्याचा प्राणनाश करितात. तशीच तर्जनीची नाडी चालू लागली असतां तीही अंतीची जाणावी. गति सोडून अति त्वरेनें चालली तर रोगी एक दिवसात मरेल. डमरूसारखी चालली तर चवथे दिवशीं मरेल. जर नाडी उष्ण आणि शरीर निस्तेज असून थंड अथवा बहुत ज्वर व शरीर क्षीण व नाडीची गति मंद असेल तर तो रोगी २ दिवसानी मरेल. जी नाडी अत्यंत कापते व किंचित् हालते व नाहीशी होते व पुनः हाताच्या अंगुलीला स्पर्श करिते ती असाध्य जाणावी. ज्या रोग्याची नाडी बहुधा स्थिर असून कधीं कधी विजेसारखी मध्येंच उसाळी मारते, त्या रोग्याचें जीवित एक दिवसपर्यंत, दुसरे दिवशीं मृत्यूच जाणावा. शरीरास थंडपणा, मुखानें फार श्वासोच्छ्वास सोडणें, व नाडी तीव्र दाहयुक्त वाहते त्यांचें १५ दिवस आयुष्य आहे असें जाणावें. नाडी उष्ण, सर्पासारखी वांकडी चालते ती, फार वेगवान् व गळा कफानें दाटला आहे अशा रोग्याचें जीवित दुर्लभ जाणावें. ज्या रोग्याची नाडी पायांत मात्र भासते; हातास भासत नाहीं. आणि ज्याचें मुख वासल्यासारखें व मुखावाटें श्वास चाललेला असतो अशा रोग्याचा वैद्यानें दुरूनच त्याग करावा.

**मूत्रपरीक्षा**—कांचेच्या अथवा काशाच्या पात्रांत पहाटेस रोग्याचें मूत्र, पहिली व शेवटची धार टाकून मधलेंच धरावें. आणि त्यात तेलाचा बिंदू काडीनें टाकावा. बिंदू टाकतांच मूत्रावर पसरला तर साध्य; बिंदु तसाच वर तरंगून राहिला

१ कारण ही कफनाडी आहे व मरणसमयीं कफाचा कोप होतो म्हणून तर्जनीची चालते असे जाणावें.

तर कष्टसाध्य; व तळास जाऊन वर आला आणि छिद्रें दिसलीं किंवा मूत्र काळें, तांबूस अथवा बिंदु तसाच तळास जाऊन बसला, किंवा बिंदु पसरून मूत्राबरोबर मिळून गेला तर रोगी असाध्य जाणावा. वाताधिक्य आहे तर बिंदु टाकतांच पसरतो व मूत्र रक्तवर्ण आणि शीतल असें असतें. पित्ताधिक्यांत बुडबुडे येतात व मूत्र पिंवळें आणि उष्ण असें असतें. कफाधिक्यांत मूत्र पांढरें दिसतें. सन्निपाताचे मिश्रवर्ण धातु व इंद्रियरोग यांचे तेलासारखें ओशट आणि त्रिदोषाचे काळसर आणि मिश्रवर्ण असें असतें. तेलाचा बिंदु मूत्रात टाकतांच मनुष्य सर्प, वानर, विंचु व मांजर यांचेसारखी आकृति झाली किंवा दक्षिण, अग्नेयी, नैर्ऋत्य, वायव्य व ईशान्य या दिशेकडे बिंदु वाढल्यास रोगी असाध्य जाणावा. पूर्व, पश्चिम व उत्तर या दिशेस बिंदु वाढला असतां रोगी वांचेल. बिंदु पसरून त्यांत चाळणीसारखीं छिद्रें पडलीं तर भूतोपद्रव जाणावा. पश्चिम दिशेस बिंदु वाढून सर्पाकृति झाली तर उदररोग जाणावा. मूत्र तुपाचे कण्यासारखें आलें असता जलोदर जाणावा.

**मलपरीक्षा**—वायूचा कोप झाला असतां मल फेंसयुक्त व धूम्रवर्ण व पित्ताचा पिंवळा, हिरवट व गंधीयुक्त; कफाचा श्वेतवर्ण, त्रिदोषांचा सर्व लक्षणानीं युक्त, अजीर्णाचा अति दुर्गंधयुक्त, अजीर्णज्वराचा शितोंड्या पाण्यानें युक्त, जलोदराचा फारच दुर्गंधी व श्वेतवर्ण; क्षयाचा शामवर्ण, आणि प्राणांतींचा दुर्गंधी व तांबूस असून शामवर्ण असा असतो व मिश्रवर्ण मिश्रदोषांनी युक्त आहेत असें जाणावें.

**जिव्हापरीक्षा**—वायूचा कोप झाला असतां थंड, खरखरीत व फुटीर असून पिंवळट दिसते; पित्ताची आरक्तवर्ण असून त्यांत किंचित् शामवर्ण असते; कफाची श्वेतवर्ण, आर्द्र ह्म० ओलसर व चिकट बुळबुळीत अशी असते; त्रिदोषाची काळी, वर काटे आलेली व शुष्क ( कोरडी ) आणि मरणकाळीची खरखरीत असून आंत ओढलेली, फेंसयुक्त, कठिण लांकडासारखी आणि चलनवलनरहित[1] अशी असते.

**शब्दपरीक्षा**—वायूचा कोप झाला असतां शब्द हलका [ हळू ], पित्ताचा कोप असतां शब्द स्पष्ट, कफाचा कोप असतां शब्द जड व घरघरयुक्त आणि त्रिदोषाचा कोप असतां शब्द तिन्ही लक्षणांनी युक्त असा कंठांतून बाहेर निघतो.

**स्पर्शपरीक्षा**—वायूचा कोप असतां अंग खरखरीत व थंड, पित्ताचें ऊन व कफाचें शीतल असें असतें. ज्याचें शरीर क्षणांत थंड, क्षणांत अति उष्ण आणि रोगानें व्याप्त असा रोगी असाध्य जाणावा.

**नेत्रपरीक्षा**—वायूचा कोप असतां डोळे निस्तेज, धूम्रवर्ण, दाहयुक्त, चंचल व भेसूर असे असतात. पित्ताचे पिवळे, तांबूसवर्ण, दाहयुक्त आणि दिवा पहाण्यास असमर्थ असे असतात कफाचे पांढरे, निस्तेज, स्रावयुक्त व चिकट असे असतात. त्रिदोषाचे लाल असून किंचित् काळे व थिजल्यासारखे दिसतात. ज्याचा एक डोळा थिजल्यासारखा असून वटारलेला उघडा दिसतो. आणि दुसरा मिटलेला असतो तो

१ स्तब्ध चलन व वलन रहित.

रोगी एक प्रहरांत मरेल. डोळ्यांतील बाहुली भ्रमिष्ट ह्मणजे स्तब्ध होऊन नेत्र थिजल्यासारखे दिसतात तो रोगी एक दिवसांत मरेल. डोळ्यांतील काळे बुबुळ डोळ्याचे कोरीचे बाजूस जाऊन बसल्यास तो रोगी एक दिवसांत मरेल. जे डोळे भ्रांतिष्टासारखे असून गरगर फिरतात ते भूतोपद्रवाचे जाणावे

**रूपपरीक्षा**—शरीर निस्तेज, विचित्र व काळसर असेल तर वातरोग जाणावा. पीतवर्ण व मुख किंचित् सुजीर असेल तर पित्तप्रकोप जाणावा. कलाहीन मुख असून तेलकट, व डोळे सुजीर आणि विलक्षण चिकटलेले असले तर कफप्रकोप झाला आहे असें जाणावें.

---

## साध्यासाध्य विचार.

वैद्यानें प्रथम रोग्याचे आयुष्याची परीक्षा करावी. कारण आयुष्य असल्यास औषधादिक उपाय सफळ होतात.

**साध्य लक्षण**—मुख तेजस्वी, नाडी सम, स्वर चांगला, अग्नि प्रदीप्त, मस्तकास कंडू, जिव्हा आणि ओंठही आर्द्र [ ओलसर ] हातापायांचें तळवे, ओंठ व हृदय याचेठायी दृढता, चितारहित मन, सुगंधी पदार्थाची इच्छा, शिरा आरक्तवर्ण हीं साध्य लक्षणें होत. पाहणें सौम्य, व्यवस्थित भाषण, हातपाय गार नाहीत, दाह थोडा, तोंडास रुचि, जिव्हा मऊ, नाकांतील श्वास सरळ वाहणें, ज्यांत घाम नाहीं असा ज्वर, असा रोगी व ज्याला निद्रा सुखानें येते, शरीराला उद्योगाची हुशारी व इंद्रियें सुप्रसन्न आहेत तो रोगी निश्चयेंकरून वांचेल.

**असाध्य लक्षण**—अतितीक्ष्ण ज्वर, वडवडणें, नेत्र व नखें लाल अथवा पांढरीं, हातपाय थंडगार, ज्वरक्षीण, मुख निस्तेज, कंठावरोध, उचकी, शरीर भयंकर, दिसणें, मूर्च्छा, भ्रम व कंप ही लक्षणें असतां रोगी असाध्य जाणावा. रात्रीं दाह, दिवसास थंडी वाजणें, घशांत कफ साचणें, तोंडास अरुचि, डोळे लाल, जीभ काळी असा रोगी असाध्य. तोंड सुकणें व कोरडें होणें, अंगावर काळे डाग, दांत काळे होणें, नाकाच्याजवळील जागा थंड, एक डोळा लाल, हातपाय अगदी ढिले होणें, कानाच्या पाळ्या पडणें, थंड अथवा फारच उष्ण श्वासोच्छ्वास चालणें, शरीर थंड, कंप, उद्विग्नपणा आणि कर्तव्याकर्तव्य समजत नाहीं तो असाध्य. थंडी वाजत असून मस्तकास मात्र घाम येतो, अंग चिकट होतें, गळ्यांत कफ असून पडत नाहीं. व हृदयमार्गातही उतरत नाहीं, ही सर्व मरणकाळींचीं चिन्हें जाणावी. जो अनेक तऱ्हेचे शब्द ऐकितो अथवा सांगितलेलें उलट ऐकतो किंवा अकस्मात् ऐकूंच येत नाही असें झालें ह्मणजे त्याचें आयुष्य संपलें असें जाणावें. ज्याला उष्ण पदार्थ थंड लागतात व थंड पदार्थ उष्ण लागतात, शरीर संतप्त असतां थंडी वाजते, स्पर्श किंवा चिमटा घेतला तर समजत नाहीं, शरीराचा रंग बदलतो, गोड पदार्थ कडू व

कडू पदार्थ गोड किंवा मुळींच कोणची रुचि जाणत नाहीं व सर्व विपरीत भासतें तो गतायु जाणावा. ज्याच्या डोळ्यांच्या पापण्या आंत फार ओढल्यासारख्या होतात तो लवकर मरतो. ज्याला निरंतर झोंप येते अथवा सर्वकाळ मुळींच येत नाही व बोलूं लागला असतां मोह पावतो तो असाध्य. जो वारंवार जिभळ्या चाटतो, हातपाय झाडतो, सायंकाळीं भूतप्रेतावरोबर बोलतो तो असाध्य. ज्याच्या सर्व इंद्रियांतून व केंसांच्या छिद्रांतून विषबाधा नसतां रक्त स्रवतें तो तत्काळ मरेल. ज्या रोग्याला उपाय केला तथापि रोग अधिकच वाढतो व मांस आणि बळ क्षीण झालें तो असाध्य जाणावा. औषध दिलें असतां उतार पडत जातो तो सुसाध्य; औषध जोंपर्यंत चाललें आहे तोंपर्यंतच गुण वाटतो तो कष्टसाध्य आणि कोणतेंही औषध लागूं पडत नाहीं तो असाध्य जाणावा.

---

## कालज्ञान.

पुढें येणाऱ्या फळाचें पूर्व चिन्ह जसें फूल, अग्नीचा सूचक धूर पावसाचे सूचक अभ्र, त्याचप्रमाणें अरिष्टें हीं पुढें होणाऱ्या मृत्यूचीं चिन्हें दाखवितात. कारण अरिष्ट चिन्ह झाल्यावांचून मृत्यु नाही. व आरिष्ट चिन्ह झाल्यावर जीवित्व नाहीं. या अरिष्ट चिन्हाची बरोबर माहिती नसल्यास अरिष्ट नसतांनाही तें आहे असें वाटतें. व असतांनाही तें नाहीं असें वाटतें. दोषांची अतिशय वृद्धि झाली असतां अरिष्टाचा भास होतो परंतु त्या दोषाचा शम झाला असतां तीं अरिष्ट चिन्हें नाहींशीं होतात. परंतु त्यांत कांहीं विशेष चिन्हें आहेत तीं झालीं असतां रोगी हटकून मरावयाचाच असा वैद्यशास्त्राचा सिद्धांत आहे असें जाणावें.

**अरिष्ट चिन्हांचीं लक्षणें**—स्नेह लावल्यावांचून ज्याचे केंश व रोम म्हणजे आंखूड केंस स्नेह लावल्यासारखे दिसतात तो, ज्याचे डोळे फार चंचळ, स्तब्ध, खोल गेलेलें, वांकडे तिकडे व संकुचित होतात, तशाच भिवया सकुंचित होऊन खाली पडल्यासारख्या होतात. व पापण्या गळाल्यासारख्या होतात तो, ज्याचें नाक फार विस्तृत, संकुचित, पुळ्यांनी युक्त. सुजलेलें व चिरा पडलेलें असें होतें तो, हे सर्व रोगी एक वर्षाचे आंत मरणार असें जाणावें. ज्याच्या कपाळावर अथवा बस्तीच्या वरच्या अंगीं अकस्मात शिरांच्या रांगा उठतात अथवा बालचंद्रासारख्या आकृति उठतात तो सहा महिन्यानंतर वांचत नाहींत, पाण्यानें स्नान करीत असतां ज्याचे अंगावर कमळाच्या पानासारखें पाणी ठरत नाहीं तो सहा महिने वांचेल. ज्याच्या डोक्यावर व भिवईवर एकाएकीं नवेच भांग व भोंवरें होतात तो निरोगी असल्यास सहा दिवसांनी व रोगी असल्यास तीन दिवसांनीं मरेल. स्नान करून अंगास चंदनाची उटी लाविली असतां पहिल्यानें उर मात्र लवकर वाळतो, बाकीचें सर्व शरीर ओलें असतें तो पंधरा दिवस

वांचावयाचा नाहीं. कारणावांचून व एकदम ज्याचे अंगावर स्वाभाविक निळा तांबडा, इत्यादि वर्ण दिसतो तसेच पुष्टि व ग्लानि, रूक्षता व स्निग्धता हे परस्पर विरुद्ध प्रकार एकदम होतात तो लवकर मरणार असें जाणावें. अतिशय सुरसपणामुळें अंगावर पाढऱ्या उवा, लिखा, वगैरे अतिशय उत्पन्न होतात आणि अति विरसपणामुळें ते आपोआप नाहींसे होतात तो वर्षभर वांचणार नाही. मल, मूत्र, थुंकी, व शुक्र हीं ज्याची पाण्यांत बुडतात किंवा खाकऱ्यात अनेक प्रकारचें रंग दिसतात तो एक महिन्यानें मरेल. आकाशांतील सप्तऋषींच्या जवळचा एक अरुंधतीचा तारा, ध्रुवाचा तारा व आकाशगंगा हीं ज्यास दिसत नाहीत तो एक वर्षानें मरेल. ज्यास मेघाचा गडगडाट, पाण्याच्या प्रवाहाचा शब्द, वीणा, व वेणुवाद्य यांचे शब्द नसतांही ऐकूं येतात व विद्यमान जवळ असताही ऐकूं येत नाहींत व कानांत वोटें घातली असतां ज्यास धुक् धुक् शब्द ऐकू येत नाहींत व गंध, रस व स्पर्श हे ज्यास आहेत त्याच्या विपरीत भासतात किंवा त्यांचें मुळींच ज्ञान होत नाहीं हीं सर्व मरणाचीं चिन्हें जाणावीं. ज्याचे नाकाचा उजवा सूर एक अथवा दोन किंवा तीन दिवस अहोरात्र वाहतो तो मनुष्य तीन वर्षांनी, एक वर्षांनी आणि सहा महिन्यांनी क्रमेंकरून मरेल. ज्याचा डावा सूर दिवसास फार त्वरेनें चालतो व रात्रीस शमतो तो चार दिवसानीं मरेल. ज्याचे डावे हाताची नाडी चालत असतां तुटते व डावा सूर अगदीच बंद होतो तो तात्काळ मरेल—ज्याचें नाक वांकडें झाले आणि नाकाचे सूर बंद होऊन तोंडातून श्वास चालला तर तो दहा प्रहर वांचेल—ज्यास वीर्य सुटायचे संधीस मुतावयास होऊं लागलें व शिंक आली तर तो एक वर्षानी मरेल, ज्यास मळ आणि मूत्र हीं एके काळींच झालीं तर तो एक वर्षानीं मरेल—हात, पाय, व हृदय हीं स्नान केल्यावर लागलींच आपोआप कोरडी होतात तो तीन महिन्यांनी मरेल--कानात वोटें घातली असता ध्वनी ऐकूं येत नाही तो सात दिवसानी मरेल.—जो कृपण असता अकस्मात बहुत दान करूं लागला आणि प्रकृति विपरीत झाली तर तो सहा महिन्यानी मरेल.

---

# ज्योतिष अभिप्राय.

ज्या नक्षत्रीं, ज्या वारी व ज्या तिथीस रोग उत्पन्न होतो त्या नक्षत्रांची व वारांची व तिथीची पीडा किती दिवस हें समजण्याकरितां नक्षत्रांचें कोष्टक व त्यांत एकाखालीं एक असे दोन दोन अंक मतभेदानें दिले आहेत त्यावरून पीडा जाणावी.

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अश्विनी | भरणी | कृत्तिका | रोहिणी | मृग | आर्द्रा | पुनर्वसु | पुष्य | आश्ले. |
| १ | ० | १० | ३ | ५ | ० | ७ | ७ | ९ |
| ९ | ११ | ९ | ७ | ३० | ० | ७ | ७ | ० |
| मघा | पूर्वा | उत्तरा | हस्त | चित्रा | स्वाति | विशाखा | अनुराधा | ज्येष्ठा |
| ० | ३० | २ | १५ | ० | १५ | ६० | २० | १० |
| २० | ० | ७ | १५ | ११ | ० | १५ | स्थैर्य | ० |
| मूळ | पूर्वाषाढा | उ० पा० | श्रवण | धनिष्ठा | शततार० | पूर्वाभाद्र. | उ० भा० | रेवती |
| १० | १५ | १५ | ७ | ३० | १५ | १० | १५ | ८ |
| ९ | ० | २० | ११ | १५ | ११ | ० | ७ | स्थैर्य |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| प्रतिपदा | द्वितीया | तृतीया | चतुर्थी | पंचमी | षष्ठी | सप्तमी | अष्टमी |
| ५ | ३० | ३ | ० | ५ | ५ | ३० | ३ |
| १० | | | | | १० | | |
| नवमी | दशमी | एकादशी | द्वादशी | त्रयोदशी | चतुर्दशी | पौर्णिमा | अमावास्या |
| ० | ५ | ५ | ३० | ३ | ० | ५ | ० |
| | | १० | | | | | |
| रविवार | सोमवार | मंगळवार | बुधवार | गुरुवार | शुक्रवार | शनिवार | ० |
| ३० | ४५ | ० | ८ | ५ | ७ | ३० | |

**मृत्युयोग**—आश्लेषा, शततारका; आर्द्रा, धनिष्ठा, हस्त, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, भरणी, मघा, विशाखा या नक्षत्रांचा व प्रतिपदा, नवमी, चतुर्थी, द्वादशी, अष्टमी, या तिथीचा व रविवार, मंगळवार, शनवार या वारी योग होऊन जर त्या दिवशी रोग उत्पन्न झाला तर तो रोग्यास मारतो.

---

## सामुद्रिक लक्षण.

पुरुषाचे उजवे तळहातावर कनिष्ठिकेपासून तर्जनीपर्यंत अर्धचंद्राकार वांकडी रेषा असते ती अखंड असली तर शंभर वर्षे, मध्यमेपर्यंत सत्तर वर्षे आणि अनामिकेपर्यंत असली तर ५० वर्षे वांचेल. नंतर जसजशी कमी असेल तसतसें त्या मानानें आयुष्य कमी समजावें. रेषेंत फाटे अथवा कातर असली तर त्या ठिकाणीं अपमृत्यु जाणावा. याचप्रमाणें स्त्रियांचा डावा हात पहावा.

---

## दिनचर्या.

**प्रातःकाल**—मनुष्यानें दररोज पहाटेस उठून आयुष्याच्या संरक्षणार्थ संपूर्ण पातक नाशनार्थ परमेश्वराचें ध्यान व स्मरण करीत जावें व निजून उठल्याबरोबर प्रथम दहीं, तूप, आरसा, मोहऱ्या, बेलाची पत्रें किंवा फुलांच्या माळा यांचें दर्शन किंवा स्पर्शन करीत जावें. तें शुभकारक आहे, व ज्यांला फार वाचण्याची इच्छा असेल त्यांनी आपलें मुख प्रथम आरशांत पाहात जावें, ह्मणजे आयुष्यवृद्धि होते; व त्या दिवशीं आळस मुळींच येत नाहीं.

**मलमूत्रांचा त्याग**—प्रातःकाळीं उठून मलमूत्रांचा त्याग केला असतां आयुष्य वाढतें, आणि अवरोध केला असतां नानाप्रकारचे रोग व नानाप्रकारचे उपद्रव होतात, याकरितां मलमूत्रादिकांचा वेग आला असतां दुसरें कांहीं काम करूं नये, आणि स्वतः होत नसता कुंथून मलमूत्र करूं नये.

**हस्तपादप्रक्षालन**—हातापायांला माती लावून चांगले धुवून स्वच्छ करावे, ह्मणजे मळ, श्रम, राक्षसबाधा, यांचा नाश होतो व धातुवृद्धि होऊन नेत्रांला सुख होतें.

**मुखप्रक्षालन**—दंतशोधन चूर्णांनीं दंतमांसाला पीडा दिल्यावांचून हळूहळू दांत घांसावे. कडूनिंब, खैर किंवा बाभूळ याचें काष्ठाला चावून पुढें कुंचासारखें करून त्यानें हळूहळू दांत घांसले असता दात बळकट होतात. किंवा अन्य रीतीनें दांताचें मंजन ह्मणजे दांत घांसण्याची पूड यांनीं दात घांसावेत ह्मणजे दांतांस बळकटी येऊन सुख होतें. मुखप्रक्षालनानें तोंडाची अरुचि व दुर्गंध जाऊन जिव्हा आणि मुख यासंबंधी व्याधि कधीही होत नाहींत. दांत घासल्यानंतर थंड पाण्यानें वारंवार चूळ भरून टाकावी. तेणेंकरून कफ, तहान व मल हे नाश पावतात, व तोंडाची शुद्धि होते. अथवा कोंबट पाण्यानें चूळ भरली असतां कफ, अरुचि, मल आणि दंतजाड्य यांचा नाश होतो, व तोंड हलकें वाटतें. विष, मूर्छा, मद यानी पीडित; व क्षयी, रक्तपित्ती, नेत्ररोगी, मलक्षीणी, व रुक्ष झालेले

रोगी यांनीं चूळ भरूं नये. शीतोदकानें मुखप्रक्षालन केलें असतां तें रक्तपित्त, तोंडावरच्या पुळया, सूज, नीलिकारोग व वांग यांचा नाश करितें; व कोंबट पाण्यानें कफ, वात व मुखशोथ यांचा नाश करितें आणि स्निग्ध आहे.

**नस्यगुण**—नस्याचा नित्याभ्यास असावा आणि नस्य शिरसांच्या तैलादिकांनी करावें. कफ रोगावर प्रातःकाळीं, पित्तव्याधीवर मध्यान्ह काळी, वातरोगावर सायंकाळी द्यावें. असें नस्य केलें असतां मुखाला सुगंध, सुस्वर भाषण, आणि इंद्रियांना स्वच्छता येते,व त्यास वलीपलित, वांग हे रोग कधींही होणार नाहींत.

**अंजनविधि**—सुरमा हा नेत्रांला हितावह आहे याकरितां रोज अंजन करीत जावें ह्मणजे नेत्र सुरेख होऊन चांगलें दिसूं लागतें व नेत्ररोग कधींही होत नाहीत; परंतु रात्रीं जागलेला, श्रमलेला, वांति झाली असतां, भोजनानंतर, ज्वर आले असता, व मस्तकावरून स्नान केलें असतां डोळ्यांत सुरमा घालूं नये.

**आरसा पाहण्याचें गुण**—प्रातःकाळी आरशांत आपलें मुख पाहिलें असतां मंगलकारक, कांतिकारक, पुष्टिकर, बल व आयुष्य यांना देणारें व पाप आणि भिकारपण यांचा नाश करितें; व कर्मे करण्यास सामर्थ्य येतें.

**व्यायाम**—श्रम केल्यानें वातादिदोषांचा क्षय होऊन अग्नि चांगला प्रदीप्त होतो. व गात्रें चांगलीं बळकट होतात. व त्यामुळें रोगही होत नाहीं. केवळ फिरल्यानेंच व्यायाम होतो असें नाहीं; तर इतर प्रकारचे श्रम केले असतां ह्मणजे जोर काढणें, कुस्त्या खेळणें, हातांनीं कोणताही उद्योग करणें यालाच व्यायाम ह्मणतात. असा व्यायाम केला असतां विरुद्धाहार किंवा अजीर्णावर भोजन ही लवकर पचन होतात, अंगावर व तोंडावर बळकट्या पडत नाहीत. अंगाला शिथिलपणा येत नाही व मनुष्य लवकर म्हातारा होत नाही. जो मनुष्य अंगानें स्थूल असेल त्याला किंवा मधुमेही आणि मूत्रातिसारी यांना व्यायामावांचून दुसरें औषध नाहीं असें समजावें. तो व्यायाम बलवानाला आणि स्निग्ध भोजन करणाराला सर्व काळ स्थूलतारूप गुण करितो. व्यायाम हा वसंतऋतु व शीतकाळ ( हेमंतऋतु ) या कालांत विशेषेंकरून करावाच; आणि अन्यकालीही करावा. परंतु तो व्यायाम आपल्या शक्तचनुरूप करावा. अधिक केल्यास त्यापासून रोग मात्र उत्पन्न होतील. ज्या मनुष्याचा अल्प श्रमानेंही श्वासोच्छ्वास मुखावाटें जातो, तोंड सुकतें, किंवा कपाळ, नाक, खांदे, व कांखा यांना घाम येतो तो मनुष्य निम्या बळाचा आहे असें जाणावें.

**व्यायामास अयोग्य**—जेवण होतांच, संभोग होतांच आणि श्वास, खोकला कृशता, क्षय, रक्तपित्त, क्षत, ( व्रण ) व शोष हे विकार असलेला, यानी कधींही व्यायाम करूं नये; व बलवान पुरुषानीं अतिशय व्यायाम केला असता त्यांस खोकला, ज्वर, ओकारी, ग्लानि, तृषा, क्षय, तमकश्वास, आणि रक्तपित्त हे विकार होतात.

**अभ्यंगविधि**—नित्य संपूर्ण अंगाला तेलाचा अभ्यंग करावा ह्मणजे सर्व अंगाला तेल लावून चांगलें मर्दन करावें व नंतर स्नान करावें ह्मणजे पुष्टता येते, व मस्तक, कान, व पाय यास चांगलें तेल चोळावें. तें तेल तिळाचें खोबऱ्याचें व इतर कोणतेंही सुगंधी असलें तरी चालेल. अभ्यंग हा वात, श्रम, व कफ यांचा नाशक आहे- आणि कांति, सुख, निद्रा, वर्ण, मृदुत्व, आयुष्य व दृढपुष्टि यांना करणारा आहे. मस्तकास केलेला अभ्यंग सर्व इंद्रियांस तृप्ति देतो, दृष्टि व पुष्टि यांना करून मस्तकसंबंधीं रोगांचा नाश होतो व त्यापासून केंस मृदु, दाट, पुष्कळ लांब, व काळे असे होतात आणि मस्तक दृढ होतें, ज्यांस अति घाम येत असेल त्यांनी एरंडतेलानें अभ्यंग करून स्नान करीत जावें, ह्मणजे येणारा घाम बंद होईल. कानांत दररोज रात्रीं निजतेवेळीं तेल घालीत गेलें असतां त्यास कर्णरोग कधीही होत नाहीं. व चांगलें ऐकूं येतें, तळपायांना तूप वगैरे चोळलें असता चांगली स्थिरता येते. झोंप लागत नसल्यास लागलीच झोंप लागते. दृष्टि साफ होते व पायांना भेगा पडून फुटत नाही. व चांगलें मृदु होतात, जो मनुष्य फार चालून श्रमला त्याच्या पायाना तेल किंवा तूप लावून चांगलें मर्दन करावें ह्मणजे व्याधि होत नाहीत. तात्पर्य, स्नानाच्या वेळेस अंगाला तेल लावणें हें फार चांगलें आहे कारण जसें वृक्षाच्या मुळाला पाणी घातलें असतां त्याची पानें इत्यादिक वाढतात व टवटवीत आणि तेजदार दिसतात तसेंच अभ्यंगाचे योगानें शरीरातील सप्त धातु वाढतात असें जाणावें. मुखाला अभ्यंग केला असतां नेत्र बळकट होतात, गाल पुष्ट होतात, व मुखावर वांग व पुळ्या वगैरे कांहीं न येतां मुख कमलासारखें सुंदर दिसतें.

**अभ्यंगास अयोग्य**—तरुणज्वरी, अजीर्ण झालेला, रेचक व वांति घेतलेला व ज्याचे गुदास पिचकाऱ्या मारल्या आहेत अशा मनुष्यानें अभ्यंग करूं नये, कारण तरुणज्वरी व अजीर्ण झालेला यानें अभ्यंग केला असता त्याचा व्याधि कष्टसाध्य किंवा असाध्यही होतो व रेचकादिक घेणाऱ्यानी अभ्यंग केला असतां अनेक व्याधि उत्पन्न होतात.

**स्नानविधि**—स्नान हें अग्नि प्रदीप्त करणारें वृष्य, आयुष्य वाढविणारें, तेज व बल यांना देणारें आणि कंडू, मल, श्रम, घाम, झापड, तृषा, दाह व पाप यांचा नाश करितें, अग्नि प्रदिप्त होतो व थंड पाण्यानें स्नान केलें असतां रक्तपित्ताची शांति होते व ऊन पाण्यानें केलें असतां तें बलकारक असून वायु, कफ, यांचा नाश करितें. मस्तकावर फार उष्ण पाणी घेतलें असतां नेत्राला पीडा होते व वातपित्ताची शांति होते. हे मानवहो! नित्य ऊन पाण्याचें स्नान, दुग्धपान किंवा दुधाबरोबर भोजन, तरुण स्त्रिया, ताजे मांस, ऊन ऊन भोजन, तूप, हें प्राण्यास तत्काळिक बळ देणारीं आहेत. वैद्यशास्त्रांत असें सांगितलें आहे की, जो नित्य निश्चयानें आंवळकठीचा कल्क अंगास लावून स्नान करील त्याचे अंगास सुरकुत्या पडणार नाहींत, व त्याचे केंस पांढरे न होतां तो शंभर वर्षें वांचेल.

**स्नानास अयोग्य**—ज्वर, अतिसार, नेत्ररोग, कर्णरोग, वातव्याधि, पोट फुगणें, पडसें व अजीर्ण, हे विकार झाले असतां किंवा जेवल्यावर लागलींच स्नान करूं नये.

**मलीन वस्त्र निषेध**—शहाण्या मनुष्यांनीं मलीन वस्त्र कधीहि धारण करूं नये. केलें असतां अंगास कंडु, उवा, ग्लानि व दरिद्रपणा ह्यांना उत्पन्न करतें व सर्वांस तो मनुष्य अगदीं अप्रिय व त्रासदायक दिसतो. स्वच्छ वस्त्र वापरलीं ह्मणजे त्या मनुष्याच्या मनास आनंद होतो.

**चंदन धारण**—केशर, चंदन, किंवा कृष्णागर यांचें धारण केलें असतां उष्णवात, व कफ यांचा नाश होतो. हें शीतकाळीं हितावह आहे व चंदन, कापूर आणि वाळा यांनी मिश्र केलें असतां सुगंधी व अत्यंत शीत होतें. ह्मणून हें उष्ण काळामध्यें फार हितावह होतें त्याचप्रमाणें चंदन, केशर व कस्तूरी यांनी युक्त केलें असतां तें उष्ण नव्हे व शीत नव्हे असें समधात होतें. ह्मणून हें वर्षाऋतूंत ह्मणजे श्रावण व भाद्रपद ह्या महिन्यांमध्यें हितकारक होतें. सुगंध पदार्थांची उटी अंगास लाविली असतां तृषा, मूर्छा, दुर्गंध, श्रम व दाह यांचा नाश होतो, आणि सौभाग्य, तेज, त्वचेचा रंग, प्रीति, तेज आणि बळ, यांना वाढवितें.

**चंदनधारणास अयोग्य**—जो स्नानाला योग्य नाहीं त्याला चंदन धारण हितकारक होत नाही.

**भोजनविधि**—भोजनसमयीं ब्राह्मण, गाई, अग्नि, सुवर्ण, तूप, सूर्य, उदक, व राजा ह्या मंगलकारक पदार्थांचें दर्शन व त्याना प्रदक्षणा कराव्या ह्मणजे नित्य आयुष्य व धर्म वाढतो. वेळेवर भोजन न मिळालें तर अंग दुखणें, अरुचि, श्रम, झोंपड, नेत्रांना दुर्बळपणा, धातूचा दाह, बलाचा क्षय, हे होतात व आहाररूप, इंधन नसल्यामुळें जठराग्नि मंद होतो. जसा काष्ठहीन अग्नि, आणि अग्नीला आहार मिळाला ह्मणजे त्याला पचन करितो, परंतु न मिळाला ह्मणजे कफादि दोषांना पचवितो व ते दोष संपले ह्मणजे सप्त धातूंना पचवितो; नंतर प्राणाला पचवितो असें जाणावें वेळेवर आहार मिळाला असतां तो मनुष्याला संतुष्ट करणारा, देहधारक, व बल, स्मृति, आयुष्य, शक्ति, वर्ण, तेज, सत्त्व आणि शोभा यांना वाढविणारा असा आहे व त्या प्राण्यास बहुधा कोणताच रोग होण्याची भीति नसते. ज्या वेळेस क्षुधा उत्पन्न होईल तोच सामान्य भोजनाचा काळ जाणावा. मग ती कोणतेही वेळेस उत्पन्न झाल्यास चिंता नाहीं. शहाण्या मनुष्यांनीं भोजन एकांतीं करावें. हलकट मनुष्य, भिकारी, क्षुधित, पापिष्ट, पाखाडी, रोगी, कोंबडें, सर्प व कुत्रें, याची दृष्टि भोजनावर पडली असतां तें भोजन चांगलें पचत नाहीं व समयविशेषीं त्यांनीं जें अन्न पाहिलें त्याची शिसारी येते ह्मणजे त्या अन्नाचा द्वेष होतो. आईबाप, आप्तवर्ग, वैद्य, स्वयंपाक करणारा, हंस, मोर, सारस,

आणि चकोर पक्षी यांची दृष्टि भोजनावर पडली असतां उत्तम जाणावी, कारण वरील पक्षादिकांच्या दृष्टीनें विष दोषांचा नाश होतो. व सर्पादिक दुष्ट प्राण्यांच्या दृष्टीनें विषासारखें तें अन्न अपायकारक होतें. कदाचित् दुष्ट प्राण्यांनी भोजनावर दृष्टी पडल्यास महेश्वर देव व हनुमान यांचें स्मरण केलें असतां दृष्टिदोष नाश पावतात. चांदीचें भोजनपात्र नेत्रांला हितावह, पित्तनाशक व कफ आणि वायु यांना करणारें असें आहे, कास्याचें पात्र बुद्धि व रुचि यांना देणारें व रक्तपित्तनाशक असें आहे. पितळेचें पात्र वातकारक व शूल, कृमी आणि कफ यांचें नाशक असें आहे. लोखंडाचें पात्र सिद्धिकारक व सूज आणि पांडुरोग यांचें नाशक, बलकर, व कामलानाशक असें आहे. दगडाचें पात्र भिकारपण आणणारें असें आहे, पत्रावळीवर भोजन केलें असता रुचिकारक, दीपन, विष व पातक यांचा नाश होतो. पाणी पिण्याचें पात्र ताम्याचें किंवा मातीचें हितकारक आहे. काचेचें पात्र थंड असें आहे. भोजनास बसलें असतां प्रथम क्षीर वगैरे मधुर रस भक्षण करावा. भोजनामध्यें पाहिजे तो रस भक्षण करावा व अंतीं आंबट पदार्थ दही, ताक इत्यादि भक्षण करावें ह्मणजे अन्नाचें चांगलें पचन होतें. अति कढत अन्न भक्षण केलें असता बलनाश करितें व थंड व शिळें अन्न भक्षण केलें असता अजीर्ण करितें. अति जलद भक्षण केलें असतां ग्लानि करितें. जडान्न ( गव्हाची रोटी ) वगैरे अर्ध पोटी भक्षण करावें, लघ्वन्न ( भात, मूग ) वगैरे प्रमाणानें तृप्तीपर्यंत भक्षण करावें. जेवीत असतां फार बोलूं नये. कोणाची निंदा करूं नये व निंद्य गोष्टीही श्रवण करूं नयेत. सदा सर्वकाल थोडी भूक राखून भोजन केलें असतां तें फार हितावह होतें. तहान लागली असतां भोजन केलें तर गुल्म होतो आणि क्षुधा लागली असतां पाणी प्यालें तर जलोदर होतो असा साधारण वैद्यशास्त्राचा नियम आहे. संपूर्ण भक्षण केलेल्या पदार्थांत ज्याचा रस अधिक असेल त्याप्रमाणें गुणदोष होतो. अन्न जिरलें ह्मणजे वायु वाढतो अन्न जिरतेवेळेस पित्त वाढतें व जेवल्यानंतर लागलींच कफ वाढतो असें जाणावें.

**तांबूलभक्षण**—रतिकाळीं,निजून उठल्यावर, स्नान केल्यावर,भोजन केल्यावर, वांति आल्यावर,युद्धामधें,राजा किंवा पंडित याच्या सभेमधें, तांबूल भक्षण करावा, तो तांबूल तीक्ष्ण, उष्ण, रुचिकर, सारक,कडू, खारट,तिखट असा आहे; आणि काम, रक्तपित्त याना करणारा व लघु व वशकारक असा आहे; आणि मुखदुर्गंध, मल, वायु, व श्रम, याचा नाश करितो; आणि मुखाची स्वच्छता, सुगंधता, व कांति याना करणारा आहे; आणि हनुवटी, दंत यांचे मलांचा नाश करितो, व जिव्हेंद्रियाला शोधन करितो. व तोंडांतील फार लाळ सुटणें, व गलरोग याचा नाश करितो. पानाच्या अग्रभागीं आयुष्य, मूलाचे ठायीं यश, मध्यभागी लक्ष्मी रहाते, याकरितां पानाचें मूळ, मध्य व अग्र भक्षण केलें असतां पाप लागतें. व चुरलेलें पान भक्षण केलें असतां आयुष्यनाश होतो. व शिरा भक्षण केल्या असता बुद्धीचा नाश करितात. विडा चावून त्याची प्रथम पिक टाकावी, ती विषा-

सारखी मारक आहे; आणि दुसरी पिंक रेचक व दुर्जर आहे; आणि तिसरी पिंक टाकूं नये गिळून जावी. ती अमृततुल्य हितकारक व जरा व्याधि यांची नाशक आहे. ज्यांला रेच झाले व भूक लागली त्यांणीं तांबूल भक्षण करूं नये, केला असतां देह, दृष्टि, केंश, दंत, अग्नि, कान, कांति आणि बल यांचा क्षय होतो, व शोष, पित्त, वातरक्त, हे विकार होतात; आणि ज्यांचे दांत दुर्बल, व नेत्ररोग, विष मूर्छा, मद यांनीं पीडित उरःक्षती, व रक्तपित्ती यांला तांबूल हित करीत नाहीं.

**शतपदी.**—भोजन झाल्यावर हळू हळू शंभर पावलें चालावें ह्मणजे अन्न शिथिल होतें व मान, मांड्या, कंबर यांना सुख होतें. जेऊन लागलाच बसतो त्याचें दोंद सुटतें. निजलें असतां पुष्टता येते. हळू हळू फिरलें असतां आयुष्य वाढतें; आणि भोजनोत्तर लागलाच धावतो त्याचा मृत्यूच धावतो असें जाणावें.

**शयनक्रम.**—जेऊन उठल्यानंतर शतपदी करावी. नंतर आठ श्वास होईतोंपर्यंत उताणें निजावें, नंतर सोळा श्वास होईतोंपर्यंत उजवे कुशीवर निजावें. नंतर बत्तीस श्वास होईपर्यंत डावे कुशीवर निजावें. नंतर पाहिजे तसें शयन करावें. जंतूंच्या वामभागीं नाभीवर अग्निस्थान आहे याकरितां भोजन केलेलें अन्न जिरण्याकरितां डावे बाजूवर नेहमीं शयन करावें.

**खट्वादि गुण.**—खाटेवर निजलें असतां त्रिदोष नाश होतो. गादीवर निजलें असतां वायु व कफ यांचा नाश होतो. जमिनीवर निजलें असतां अंग स्थूळ होतें. लांकडाचे फळीवर निजलें असतां वायूचा कोप होऊन अंग ताठतें. अन्यमतें जमिनीवर निजलें असतां वातकर, रुक्ष व रक्तपित्त यांचा नाश करितें. चांगलें शय्येवर निजलें असतां प्रियकारक व पुष्टि, निद्रा व धैर्य यातें करितें. आणि श्रम व वायु यांचा नाश करितें व स्त्रीविषयीं इच्छा उत्पन्न होते. शयनसमयीं पायांस तूप वगैरे चोळलें असतां तें मांस, रक्त व त्वचा यांना स्वच्छ करितें व प्रिती आणि निद्रा यांस उत्पन्न करितें. व कफ, वायू, आणि श्रम यांचा नाश करितें. झोंपेंत वारा घेतला असतां तो रुक्ष आहे, व विवर्णता आणि अंगाला ताठवितो, व दाह, पित्त, स्वेद. मूर्छा, व तहान याचा नाश करितो. ग्रीष्मऋतु व शरदृऋतु यांचेठायीं मनुष्यानें सुखानें वारा घ्यावा, कारण या दोन ऋतूंत पित्ताधिक्य असल्यामुळें वायु बाधा करीत नाहीं. इतर ऋतूमधें मनुष्यानें कधीही वारा घेऊं नये; आणि जर सर्व ऋतूंत वरा घेण्याची संवय ठेविली असतां सर्व काळ आरोग्य होतें.

**दिशापरत्वें वायुगुण.**—पूर्वेकडील वायु उष्ण, स्निग्ध आणि पित्त व रक्त याना कोपवितो व दाहक वातकर असा आहे. व श्रमी, कफ झालेला व शोषी यांना हितावह, पौष्टिक व त्वचेचे दोष, मुळव्याध, दातांची कीड, सन्निपात ज्वर श्वास व आमवात यांना कोपवितो. यावरून असें समजावें कीं, ज्यादिवशी पूर्वेकडून वारा वाहूं लागतो त्या दिवशी हे वरील रोग आपोआप जास्त होतात. **दक्षिण वायूचे गुण**—रक्तपित्तनाशक, थंड, बळकर, नेत्रांला हितावह असा आहे

व तो वाताला करीत नाहीं. **पश्चिम वायूचे गुण**—शोषक, बलहारक, व भेद, पित्त, कफ यांचा नाशक व वायूला वाढविणारा असा आहे. **उत्तर वायूचे गुण**—थंड, स्निग्ध, दोषाना कोपविणारा, वातप्रकृतीला ग्लानि करणारा, आणि बलकारक, व मृदु असा आहे.

**निद्रागुण**—मनुष्यानें दिवसा निजूं नये, निजलें असतां कफ होतो याकरतां ज्याला कफाचा आजार आहे त्यानें दिवसां निद्रा घेऊं नये. व ग्रीष्मऋतूवाचून सर्व ऋतूंमध्यें दिवसां निद्रेचा निषेध सांगितला आहे. परंतु ज्यानें दिवसामध्यें निद्रा घेतली नसता वायु कोपतो त्या प्राण्यांनी दिवसा निद्रा घ्यावी आणि व्यायाम व स्त्रीसंग करणारा, मार्गामध्यें फिरणारा, वाहनावर बसणारा, ग्लान, अतिसारी, शूली, श्वासी, हिक्की, वातरोगी, क्षीण, ज्याचा कफ क्षीण झाला तो, बालक, मादक पदार्थ भक्षण करणारा, वृद्ध, अजीर्ण रोगी, रात्रीं जागलेला, आणि उपवासी, यानें दिवसामध्यें यथेच्छ निद्रा केली असता; त्यास बाधा करीत नाहीं. व हितावह होते.

**भोजनानंतर निद्रा केली असतां गुण**—भोजनानंतर निद्रा केली असतां वायूचा नाश व पित्त व कफ यांना करिते व शरीराला पुष्टता देते. पित्तनाश करण्याकरितां निद्रा घ्यावी. आणि वायूचा नाश होण्याकरितां मर्दन करावें, व कफनाशनार्थ वमन, ज्वरनाशार्थ लंघन प्रशस्त आहे; आणि बसून झोंप घेतली असतां ती पुष्टि व रुक्षता याना करीत नाही.

**भोजनोत्तर कृत्य**—भोजनानंतर मनाला प्रिय असे शब्द ( गाणें वगैरे ) स्पर्श, रूप, रस, गध, यांचें सेवन करावें; ह्मणजे अन्न उदरांत चागलें राहतें. याकरितांच राजे वगैरे बडे लोक व लग्न वगैरे कार्याचे ठायी भोजन झाल्याबरोबर प्रथम नाच, त्यानंतर पानसुपारी, अत्तर, गुलाब वगैरे परिपाठ पडला आहे. याच्या उलट ह्म० अप्रिय असे शब्द स्पर्श, रूप रस व गंध ह्मणजे वास हे आणि फार खाणें,व अति हंसणें, ही लक्षणें प्राण्याला ओकावितात. त्याचप्रमाणे भोजनानंतर अति निजणें, अति खाणें, अति द्रवरूप पदार्थाचें भक्षण, शेक घेणें, ऊन घेणें, पोहणें, मार्ग चालणें, वहनावर बसणें, व्यायाम, स्त्रीसंग, धांवणें, झोंबी खेळणें, गाणें आणि अध्यायन करणें, हे जेवल्यानंतर एक घटिकापर्यंत करूं नये.

**अजीर्णाचीं कारणें**—अति जलपान, भोजनावर पुनः भोजन, मलमूत्रादिकांचें वेगधारण, झोंप मोडणें आणि अकाली थोडें जरी अन्न भक्षण केलें तरी तें चांगलें पचन होत नाही. आणि ईर्षा, भय, क्रोध यानी युक्त पुरुषानें, लोभ्यानें, किवा रोगी, भिकारी व द्वेष करणारा, यांनी भक्षण केलेलें अन्न चागलें पचन होत नाही. रात्रीं भोजनाचें अजीर्ण झालें असतां दिवसांत दोन वेळ भोजन करूं नये. रात्री तसेंच राहिलें तर लघुभोजन करावें. याविषयीं सुश्रुत मत सायंकाळचे भोजनाचें अजीर्ण झालें असतां दुसरे दिवशीं जेवला तर अग्निनाश होतो, व रात्रीचे

अजीर्णावर प्रातःकाळीं भोजन विषासारखें होतें. जर प्रातःकाळीं अजीर्णाची शंका राहिली तर बाळहरीतकी, सुंठ व सैंधव यांचें चूर्ण थंड पाण्याशीं घ्यावें आणि भोजनकाळीं अल्प भोजन करावें.

**मार्गसेवनाचे गुण**—मार्ग चालणें हें कफ, स्थूलता व सुकुमारता यांचा नाश करतें आणि बागांत मौजेनें फिरणें हें देहाला पीडा देत नाहीं. व आयुष्य, बल, बुद्धि, अग्नि यांना वाढवितें आणि इंद्रियें हुषार करितें.

**सामान्य नियम**—पागोटें हलकें असावें, तें हितकर होतें, आणि जड असलें तर पित्त व नेत्ररोग यांना करितें. पायात जोडा किंवा वहाणा घालाव्या, त्यापासून नेत्रांला विकार होत नाहीं. नेत्राना हितावह, आयुष्यप्रद, पादरोगनाशक, व वृष्य अशा आहेत. अनवाणी फिरलें असतां अल्पायु होतो. आणि इंद्रियें व दृष्टि यांना विकार होतो. घोड्यावर बसून फिरलें असतां, वायु, पित्त, अग्नि, श्रम, यांना करितें. आणि मेद, वर्ण, व कफ याचा नाश होतो. तें बलीष्ट पुरुषाला योग्य व हितकारक होतें. धूर हा तत्क्षणी कफकर, डोळ्यांस अत्यंत वाईट, मस्तकाला जड करणारा. व वातपित्ताला कोपवणारा असा आहे.

**स्त्रीविचार**—विचारवंतानें आयुष्याचा क्षय होईल या कारणास्तव दिवसाचें स्त्रीगमन करूं नये. जर इंद्रियाच्या स्वाधीन होऊन करणार तर ग्रीष्मऋतु, व वसंतऋतु यांचेठायी करावें. आणि उगीच बसणें हें कफ, स्थूलता, सुकुमारता, सुख, यातें देणारें आहे. प्राणिमात्रास नित्य स्त्रीभोगाविषयीं इच्छा उत्पन्न होते. तो स्त्रीसंभोग न केल्यास मेह, व मेद वाढतात; आणि शरीराला अगदीं सैलपणा येतो. स्त्रीला जोंपर्यंत सोळावें वर्ष होत तोंपर्यंत ती बाला, त्यानंतर बत्तीस वर्षेंपर्यंत तरुणी; आणि बत्तीस वर्षांनतर पन्नास वर्षेंपर्यंत अधिरूढा, पन्नास वर्षांनंतर वृद्धा असें ह्मणतात. तिला संभोगाविषयी आनंद असत नाहीं. विषयी पुरुषाला ग्रीष्मऋतूमध्यें बाला स्त्री हितकर, व मान्य आहे; आणि थंडीचे दिवसात तरुणी स्त्री उत्तम, व वर्षाऋतूमध्यें व वसंतऋतूमध्यें प्रौढा स्त्री उत्तम जाणावी. बाला स्त्री निरंतर भोगिली असतां पुरुषाचें बल वाढविते. तरुणी स्त्री पुरुषाचा शक्तीचा नाश करिते, व नित्य प्रौढ स्त्री भोगिल्यास म्हातारपणा आणिते. ताजें मांस, नवें अन्न, बाला स्त्री, दुधाबरोबर भोजन, घृतभक्षण, व ऊन पाण्याचें स्नान, ही तत्क्षणीं प्राण्याला बल देणारीं आहेत, आणि बासें मांस, वृद्ध स्त्री, प्रातःकाळचें ऊन, ताजें दहीं, प्रातःकाळी मैथुन, व निद्रा ही सहा लागलाच प्राणाचा नाश करणारी आहेत. तरुण स्त्री भोगिल्यानें म्हाताराही तरुण होतो, आणि तरुण पुरुष आपल्याहून अधिक वयाच्या स्त्रीला भोगील तर वृद्ध होतो; आणि स्त्रीला भोगणाऱ्या पुरुषास आयुष्य, तारुण्य, कांति, बल, मासाची वृद्धि, व स्थिरपणा हीं प्राप्त होतात. पुरुषानें हेमंतऋतूमध्यें वाजीकरणादि योगानें यथेष्ट काम सेवावा व शिशिरऋतूत पाहिजे तितके मैथुन करावें, परंतु वसंत व शरदृतु यांत तीन तीन दिवसांनी आणि वर्षा व ग्रीष्मऋतूमध्यें पंधरा दिवसांनी मैथुन करावें. पुरुषानें सर्व ऋतूंत ती-

न तीन दिवसांनीं स्त्रीसंभोग करावा; परंतु ग्रीष्मऋतूंमध्यें मात्र पंधरा दिवसांपूर्वी करूं नये. काम थंडीचा दिवसात रात्रीं, व ग्रीष्मऋतूंत दिवसांस, व वसंतऋतूमध्यें रात्रंदिवस, व वर्षाऋतूंत मेघाच्या शब्दांत; व शरदृऋतूंत सरोवराचेठायीं या पांच ठिकाणीं राहतो. स्नान करून अंगास सुगंध चंदन, व सुगंध पुष्पाच्या माळा यांचें धारण, व धातुवृद्धिकर पदार्थ भोजन, व उत्तम वस्त्र, व अलंकार, व उत्तम वेष यांचें धारण, तांबूलभक्षण, इत्यादिकरून स्त्रीविषयीं, व रतीविषयीं आसक्त; आणि पुत्रेच्छू अशा पुरुषानें उत्तम बिछान्यावर स्त्रीशीं रति करावी. जो फार भोजन केलेला, अधीर, भुकेलेला, व्यथिताग, व तृषार्थ, बालक, म्हातारा, व रोगानें आर्त, व मैथुनानें अधिक रोग वाढणारा अशा पुरुषांनीं मैथुन करूं नये. भुकेला, उद्विग्नचित्त, दोन प्रहरीं, ताहानेला, दुर्बल, क्षयी, असा पुरुष संभोग करील तर, त्याला रोग प्लीहा, घेरी, व मृत्युही होईल. स्त्रीरूपानें सुंदर, गुणवान्, व आपल्या सारिख्या स्वभावाची, सत्कुलीन, अशा स्त्रीशीं आपण सकाम व वाजीकरणानें पुष्ट होऊन युक्तीनें संभोग करावा. रजस्वला, व कामरहित, व मळीन, नावडती, जातीनें व वयानें आपल्याहून श्रेष्ठ, व रोगपीडित, व्यंग, गरोदर, द्वेष करणारी, योनिरोगानें युक्त, आपल्या गोत्रांतली, गुरुस्त्री, विरक्ता, इतक्या स्त्रियांशीं पुरुषानें फार वाईट होईल या शंकेनें गमन करूं नये. गरोदर स्त्रीस सहा महिने भोगावी, नंतर सातव्यांत, व आठव्या महिन्यापासून निषिद्ध ह्मणून पुरुषानें मैथुन करूं नये. मैथुनानंतर स्नान, साखरमिश्रित दूध, व उंसाचा रसाच्या संयोगानें केलेला पदार्थ, व शीतळ वायु, मांसरस, निद्रा, इतके पदार्थ हितकारक आहेत. अति मैथुन केल्यानें पोटशूळ, खोकला, ज्वर, दमा, कृशत्व, पांडु, क्षयरोग, व आणखीही आक्षेपकादिक रोग उत्पन्न होतात रात्रीस जागरण केलें तर, तें रुक्ष, कफदोष, आणि विषपीडा यांचें नाशक आहे. सांगितल्या वेळेस निद्रा केली, तर ती धातूंचें साम्य, व अनालस्य, पुष्टि, कांति, बळ, उमेद, जठराग्नीची दिप्ती यांतें करितें.

**उषःपान**—सूर्योदयकाळीं पूर्वी रात्रीं ठेविलेलें आठ अंजुळी उदक प्राशन करील, त्याचे सर्व रोग; व जरा हे जाऊन सवाशें वर्षेपर्यंत वांचेल. रात्रीच्या चवथ्या प्रहरी पूर्वी सांगितल्याप्रमाणें उषःपान करील त्याचे अर्श, सूज, संग्रहणी, ज्वर, उदररोग, वृद्धपणा, कोष्ठरोग, मेदोरोग, मूत्राघात, व आणखी वायु, पित्त, व कान, गळा, मस्तक, कटिपश्चाद्भाग, नेत्र, याचे रोग, व आणखी वायु, पित्त, रक्त, कफ, यानीं झालेले सर्व व्याधी नाश पावतात. जो मनुष्य पहाटेस उठून नित्य नासिकेनें उदक पितो, तो बुद्धीनें पूर्ण, व डोळे गरुडासारिखे, व अंगाच्या वळकट्या, व म्हातारपणा जाऊन सर्व रोगापासून मुक्त होतो; आणि नाकाच्या छिद्रानें तीन अंजुळी उदक प्राशन केल्यास व्यंगपणा व अंगाच्या सुरकुत्या, पडसें, स्वरभेद, खोकला, सूज, याचा नाश करितें व रसायन आहे, आणि दृष्टि निर्मळ करितें. स्नेहप्राशन, व रक्तशुद्धि केली, व पोट फुगलें, उदरमांद्य, व उचकी, आणि कफ वायु यापासून व्याधि उत्पन्न जाहले असतां उषःपान करूं नये.

---

# ऋतुचर्या.

माघमासापासून पौषापर्यंत दोन दोन महिन्यांचे सहा ऋतु आहेत ते. शिशिर, वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद् व हेमंत. शिशिरादि तीन ऋतूंनीं उत्तरायण होतें व त्याला आदान अशी संज्ञा आहे, कारण त्यावेळीं सूर्य मनुष्याचें बळ प्रतिदिवशीं आकर्षण करून घेतो. त्याकाली सूर्य व वायु मार्ग स्वभावेंकरून अत्यंत तीक्ष्ण, उष्ण व रुक्ष असल्यामुळें ते पृथ्वीच्या सौम्य गुणाचा पाडाव करितात व त्याच कारणामुळें कडू, तुरट व तिखट या रसांना शिशिर, वसंत व ग्रीष्म या ऋतूंमध्यें अनुक्रमेंकरून जोर येतो. वर्षादि तीन ऋतूंमध्यें दक्षिणायन होतें. त्याला विसर्ग अशी संज्ञा आहे. कारण त्या तीन ऋतूंत प्राणीमात्रांना सूर्य बळ देतो. या कालामध्यें चंद्राचें आधिपत्य असल्यामुळें तो बलवान् असतो व सूर्याची शक्ति कमी होते, व गार वारा व पाऊस यांचे योगानें उष्णता कमी होऊन आंबट, खारट व मधुर हे रस पुष्ट व स्निग्ध होतात. शीतकालीं ह्मणजे हेमंत व शिशिर ऋतूंत मनुष्याचें बळ अधिक असतें. ग्रीष्म व वर्षाकालीं कमी असतें व बाकीच्या ऋतूंत मध्यम असतें.

**हेमंतऋतु**—या ऋतूंत थंडीच्या योगानें शरीराचीं सर्व सूक्ष्म छिद्रें आकुंचित होऊन बंद पडल्यामुळें बलवान पुरुषाचा उष्मा आतल्याआंत कोंडला जाऊन जठराग्नि फार प्रदीप्त होतो ह्मणून त्यास नेहमीं इतकें अन्न पुरत नाहीं व अपुरतें मिळाल्यास तो वायूच्या योगानें सर्व शरीरांत शिरून रसादि धातूंचें पचन करितो. ह्मणून हिवाळ्यांत मधुर, आम्ल व लवण या रसांचे यथेष्ट सेवन करावें. या ऋतूंत रात्र फार मोठी असल्यामुळें सकाळी उठतांच भूक लागते ह्मणून पहिल्यानें क्षुधेची तृप्ति करावी व वातहारक तेलांचा अभ्यंग करून टाळूस खुप तेल जिरवावें व कुशल पुरुषाबरोबर कुस्ती खेळून पायांनी अंग रगडून घ्यावें. नंतर रिठा किंवा शिककाई लावून अंगाचा ओशटपणा धुवून काढावा. व उष्ण पाण्यानें स्नान करून आंगास केशर व कस्तुरीचें उटणें लावून उदबत्त्या वगैऱ्यांचा सुगंध धूप करावा. व स्निग्ध मांस रस, सुरामंड, गहु, पिष्ट, उडीद, ऊंस, दूध यांपासून तयार केलेलीं पक्कान्नें व ताजीं अन्नें, वसा, व तेल यांचें सेवन करावें, हातपाय धुण्यास ऊन पाणी घेत जावें. व पांघरावयास लोंकरीची अशीं उबदार वस्त्रें घ्यावीत. ऊन व शेगडी यांचाही योग्य उपयोग करावा. यथेच्छ स्त्रीसंग करावा. याचप्रमाणें शिशिर ऋतूंतही वर्तन ठेवावें.

**वसंतऋतु**—शिशिरऋतूमध्यें संचित झालेला कफ वसंतऋतूंत प्रखर सूर्यकिरणांनी प्रकुपित झाला ह्मणजे जठराग्नि मंद करून अनेक रोग उत्पन्न करितो. ह्मणून या ऋतूंत पहिल्यानें कफाचा नाश करावा. तीव्र वांतीचें औषध द्यावें, नाकांत औषधें सोडीत जावीत. हलकीं व रुक्ष अन्नें व व्यायाम, उटणें व मर्दन इत्यादिकाचे योगानें कफांचा नाश करावा. व स्नानानंतर कर्पूर, केशर चंदन व अ-

गरु इत्यादिकांची सुगंध उटी आंगास लावून जुनेयवें, गहु मध, हरिण, ससा वगैरे जंगल प्राण्यांचें मांस भक्षण करावें. आरिष्टें व असवें हीं सेवन करावी. उंसाची दारू, द्राक्षासव, मधाची दारू, अशीं नानाप्रकारचीं तेजस्वी मद्यें आप्त मित्रासह सेवन करावी. तसेंच सुंठीचें पाणी, खैऱ्याचे गाभ्याचें पाणी, मधमिश्रित पाणी, किंवा नागरमोथ्याचें पाणी यांचेंही सेवन करावें. जेथें दक्षिणकडील थंड वारा झुळझुळ वाहत आहे, पाण्याचे पाट वाहत आहेत, वृक्षाची गर्द छाया, चित्रविचित्र पुष्पवृक्ष दाट पसरले आहेत अशा उपवनामध्यें नानाप्रकारच्या गोष्टी व क्रीडा करण्यामध्यें वसंतऋतूंतील माधान्ह काळ घालवावा. जड, थड स्निग्ध, आंबट व मधुर रस यांचें सेवन करूं नये. दिवसास निजूं नये व फडकें लावून तयार केलेलें थंड पाणी पिऊं नये.

**ग्रीष्मऋतु**—यामध्यें सूर्य आपल्या अति तीव्र किरणांनीं पृथ्वीचे रस आकर्षण करून घेतो. ह्मणून कफ दिवसानुदिवस क्षीण होऊन वायुवृद्धि पावतो. याकरितां या ऋतूंत तिखट, मीठ, आंबट, व्यायाम व उन यांचें सेवन करूं नये. लघु, मधुर, स्निग्ध, शीत व द्रव अशा आहारांचें फक्त सेवन करावें थंड पाण्यानें स्नान करावें व भाजलेल्या सातूंचे पीठ साखर घालून खावें. मद्य मुळीच पिऊं नये, व राहवत नसल्यास थोडें किंवा जल मिश्रित प्यावें नाहीतर तें सूज शैथिल्यता, दाह मोह इत्यादि विकार उत्पन्न करितें. भात, मांसरस, श्रीखंड निरनिराळ्या तऱ्हेची रायती मुरांबे कोऱ्या मडक्यात ठेवून गार केलेली, खोबरें व केळाच्या फोडी घातलेली व किंचित् आंबट अशी सरबतें व पन्हीं यांचें सेवन करावें. गुलाबाचा व कापराचा वास लावलेलें थंडगार पाणी प्यावें. गुलाब अनार व निंबू इत्यादिकांची थंड अशी सरबतें पाणी मिश्र करून पीत जावी. रात्रीचे ठायी शेवया चांदण्यांत ठेवून शीत झालेलें ह्मशीचें दूध व पिठीसाखर यांजबरोबर सेवन करावें. दुपारी थंडगार व ज्या ठिकाणी गर्द छाया आहे त्याठिकाणी आराम करावा पुष्पसेजेवर शय्या करावी, वाळ्याचें थंडगार पाणी प्यावें. वाळ्याचे पडदे लावावे, रात्रौ गच्चीवर किंवा तशा उंच स्थळी चांदण्यात जाऊन बसावें, मोंगरा वगैरे सुगंध फुलांचे हार, गजरे याचा उपभोग घ्यावा. रात्रीचे ठायीं चदनादी सुवासिक पदार्थांची उटी लावावी. पातळ व शुभ्र अशी वस्त्रें नेसावी, पंख्यावर पाणी घालून त्याचा वारा घ्यावा.

**वर्षाऋतु**—शिशिरादि तीन ऋतूंमध्यें मनुष्यांची शरीरें निःसत्व होऊन त्यांचा अग्नि मंद झाला असतां तशांत वर्षाऋतूमध्यें दोषांचा प्रकोप झाल्यामुळें तो अधिकच मंद होतो. आकाश ढगांनी व्याप्त झाल्यामुळें एकदम थंडगार तुषारानें आर्द्र असे वायू सुरु झाल्यामुळें ओल्या जमिनीतून वाफा येऊं लागल्यामुळें आम्लविपाकी व गढूळ पाण्यामुळें, व अग्निमांद्यामुळें या दोषाचा प्रकोप होतो. याकरितां समधात आहार व विहार करावे. ढाळ, व ओकारी याचें औषध देऊन कोठा साफ झाल्यावर जुनें धान्य, मांसरस व मूग वगैऱ्याचें सार, जंगलातील प्राण्यांची

मांसें, आसवें व आरिष्टें, पंचकोल, व पादेलोण घातलेली दह्याची निवळ, पावसाचें व विहिरीचें तापविलेलें पाणी यांचें सेवन करावें व ज्या दिवशीं अगदीच वांबळ पडेल त्यादिवशीं पुष्कळ आंबट, खारट व स्निग्ध पदार्थांनीं युक्त व फार पातळ नसलेलें असें मधुयुक्त भोजन करावें. पायी चालूं नये, नित्य स्नान व सुगंध धारण करावें व थंडी, तुपार व वांबळ जेथें नाहीं अशा माडीवर जाऊन बसावें. नदीचें व ओढ्याचें पाणी. सातूच्या पिठाची पाण्यांत केलेली लापशी, दिवसास निद्रा, आयांस व ऊन यांचें सेवन करूं नये.

शरदृतु—या ऋतूमध्यें पित्ताचा संचय झाला असतो, परंतु बाहेरील गारठ्यामुळें तें पित्त काही विकार करीत नाहीं. किंबहुना त्याच्या योगानेंच तो गारठा सहन होतो व पुढें शरदृतूमध्यें उन्हें पडूं लागलीं ह्मणजे मनुष्याच्या गारठ्याच्या संवयीची शरीरें एकदम संतप्त होऊन पित्तप्रकोप होतो त्याचा उपशम करण्याकरितां कडू रसांनी सिद्ध केलेलें तूप, जुलाब व रक्त काढणें यांची योजना करावी. क्षुधा लागली ह्मणजे जुन्या तांदुळाचा भात, मुगाचें वरण, पडवळाची भाजी, आंवळकठीची व आमसोलाची चटणी, मध, साखर, व जंगलसंबंधीं प्राण्यांचें मांस इत्यादि मधुर, तुरट, कडू व लघु अशा पदार्थांचा आहार करावा. या ऋतूंत दिवसास सूर्यकिरणांनी संतप्त झाल्यामुळें व रात्रीस चंद्रकिरणांनी शीत झाल्यामुळें व अगस्ती नक्षत्राच्या उदयानें विषरहित झाल्यामुळें पाणी निर्मळ व शुद्ध असतें ह्मणून त्याला हंसोदक अशी संज्ञा आहे. ते कफ पित्ताचें शमन करितें व अमृततुल्य असें आहे. चंदन, वाळा, कापूर इत्यादिक सुगंध पदार्थांचीं उटणीं लावून पुष्पमाळा व शुभ्र पातळवस्त्रें इत्यादिक धारण करून अस्तमानी शुभ्र चांदण्यात बसावें. व ऊन घेणें, पूर्वेकडील वारा, दिवसांस निद्रा, मद्य, क्षार, दहीं तेल वसा व आकंठ भोजन याचा त्याग करावा.

**विशेष सूचना**—एका ऋतूचा शेवटला आठवडा व पुढें येणाऱ्या ऋतूचा पहिला आठवडा याला ऋतुसंधी ह्मणतात. ह्या समयास पूर्वविधीचा त्याग करून दुसऱ्या विधीचा जो प्रारंभ करणें तो क्रमानें करावा. तो तो विधी एकदम बंद किवा सुरु केल्यानें त्याची संवय नसल्यामुळें रोग उत्पन्न होतात त्यास असात्म्यजन्य रोग असें ह्मणतात.

---

## वृद्ध क्षीण इत्यादि दोषांचीं लक्षणें.

**सामान्यलक्षण**—निरंतर स्थूल किंवा कृश हे दोन्हीही पुरुष अत्यंत निंद्य होत व मध्यम शरीराचा पुरुष उत्तम जाणावा. याकरिता सुज्ञ व कुशल वैद्यानें स्थूल पुरुषाला कर्शन ( कृश ) आणि कृशाला पौष्टिक उपाय करावे. आणि मध्यकायाचें संरक्षण करावें. मुख्यत्वें शक्ति कायम ठेवावी.

**स्वस्थलक्षण**—दोष, अग्नि, धातु, मल व क्रिया हीं ज्याचीं समान आणि मन, इंद्रियें व आत्मा हे प्रसन्न असतात अशा प्राण्याला स्वस्थ म्हणतात. वैद्यानें दोषाचे समत्वाचा निश्चय करणें तर तो सुप्रकृतीवांचून अन्य हेतूनें करितां येणार नाहीं.

**वातवृद्धिलक्षण**—वायु वाढला असतां कृशता, काळसरपणा, खरखरीतपणा, उष्ण पदार्थांची इच्छा, कंप, पोटफुगी, मळाचा खडा, अशक्तता, निद्रानाश, प्रलाप, भ्रम, ग्लानता हीं उत्पन्न होतात. **वातक्षयलक्षण**--वायु स्वप्राणाहून कमी झाला असतां हातपाय गळाल्यासारखे होतात. कायिक व वाचिक क्रिया कमी होतात. ज्ञानेंद्रियाची व बुद्धिची शक्ति क्षीण होते, अल्प चेष्टा, हळू भाषण हीं लक्षणें होतात. **वातक्षीणवर्धन**--वातक्षीण रोगी तुरट, कडू, तिखट, रुक्ष, शीत व लघु अशीं अन्नें व यव, मूग व सावे यांचे भक्षणाची इच्छा करितो.

**पित्तवृद्धिलक्षण**—पित्त वाढलें असतां मल, मूत्र, नेत्र व त्वचा यांना पिंवळेपणा, इंद्रियांना क्षीणता, थंड पदार्थांची इच्छा, संताप, मूर्च्छा आणि अल्पनिद्रा हीं लक्षणें होतात व क्षुधा, तृषा व दाह याना उत्पन्न करितें. **पित्तक्षय लक्षण**—पित्त क्षीण झालें असतां कफ वाढतो, आणि अग्नि मंद होऊन कांतीचा क्षय होतो. आणि शैत्य उत्पन्न होतें. **पित्तक्षीणवर्धन**--पित्तक्षीण रोगी तीळ, उडीद, कुळिथ, मिष्टान्न पिठाचे पदार्थ, दह्याची निवळी, कडू, आंबट, पदार्थ, ताक, कांजी, दहीं, खारट, उष्ण व तीक्ष्ण पदार्थ यांची इच्छा करितो व रागे भरतो. व दाह करणारे पदार्थ, उष्ण देश व ऊन पाणी यांची इच्छा करितो.

**कफवृद्धिलक्षण**—कफ अधिक वाढला असतां मल, मूत्र, त्वचा, नखें व नेत्र हीं शुभ्रवर्ण, अंगाला जडपणा, अति निद्रा, ग्लानि, संधिनाश, शिथिलपणा, तोंडाला पाणी सुटणें, श्वास, कास, ही लक्षणें होतात. **कफक्षयलक्षण**—कफ क्षीण झाला ह्मणजे संधींना शिथिलता, मूर्च्छा, निस्तेजपणा, दाह, भ्रम व मन कोमळ होतें. **कफक्षीणवर्धन**--कफक्षीण रोगी गोड, स्निग्ध, शीतल, खारट, आंबट व जड पदार्थ दहीं, दूध व दिवानिद्रा यांची इच्छा करितो.

**रसवृद्धिलक्षण**--रसधातु वाढला असता अन्नद्वेष, अंगाला जडपणा, तोंडाला पाणी सुटणें, ओकारी, मूर्च्छा, ग्लानि, भ्रम आणि कफ हीं लक्षणें होतात. **रसक्षयलक्षण**--रसक्षयानें निस्तेजपणा, कंठशोष, त्वचेला बधिरपणा व क्षीणता, ग्लानि व श्रम होतात आणि शब्द सहन होत नाहीं. **रसक्षीणवर्धन**—रसक्षीण रोगी अत्यंत थंड पाणी वारंवार पिण्याची इच्छा करितो, रात्रीं झोंप, थंडी, चंद्र आणि मधुर दहीं इ० भक्षणाची इच्छा करितों

**रक्तवृद्धिलक्षण**--शरीरामध्यें रक्त वाढलें असतां गात्रें व नेत्र हीं आरक्त होतात आणि शिरा फुगतात व विसर्प, प्लीहा, विद्रधि, कुष्ठ, वातरक्त, गुल्म व शरीराला पुष्टि, कावीळ, अंगाला जडपणा, निद्रा, मद, दाह, तोंडावर वांग अग्निमांद्य,

मोह आणि त्वचा, नेत्र, मूत्र, मल हे रक्तवर्ण व गुद, शिश्न मुख यांचा पाक व अर्श-पिटिका, मस, चामखीळ, डोक्यास टक्कल पडणें; अंगमोडे, प्रदर आणि हाता-पायांची आग हीं लक्षणें होतात. हे रक्तवृद्धीपासून झालेले विकार व रक्तस्राव वरेच यांनीं शमवावे. **रक्तक्षय लक्षण**—रक्ताचा क्षय झाला असतां शिरा शिथिल व थंड होतात. अंगाचा वर्ण फिक्कट दिसतो व त्यास खरखरीतपणा येतो. **रक्तक्षीणवर्धन**—रक्तक्षीण पुरुष ऊस; मांसरस, मंथ ( साखर, द्राक्षें व उसाचा रस हे ३ एकत्र झाले ह्मणजे त्यास मंथ असें म्हणतात. ) मध, तूप, गूळ, पाणी, द्राक्षें, थंड व आंबट पदार्थ, डाळिंब आणि रक्तानें सिद्ध केलेले पदार्थ आणि मांस यांची इच्छा करितो.

**मांसवृद्धिलक्षण**—शरीराचेठायीं मांस वाढलें असतां गाल, ओठ, कंबरेचा माज उपस्थ[1], मांड्या, दंड आणि पायांच्या पोटऱ्या यांची वृद्धि होते आणि गात्रांना जड करितें व गंडमाळा, अर्बुद, ग्रंथि, गलगंड, माड्या व पोट यांची वृद्धि, कंठादिस्थानामध्यें अधिक मांस हे विकार उत्पन्न होतात. **मांसक्षय लक्षण**—शरीरांतील मांसाचा क्षय झाला असतां गाल, ओठ, मान, खांदे, छाती, पोट, संधि, उपस्थ, नाकपुड्या आणि पोटऱ्यांचे गोळे याचेठायीं शुष्कपणा येतो व गात्रें रुक्ष, ठणका व नाडीना शिथिलपणा हीं लक्षणें होतात व अगदीं दुर्बळ होतो. **मांसक्षयवर्धन**—मांसक्षीण पुरुष दधिसिद्ध अन्नें, श्रीखंड, केळाची शिकरण इत्यादि पदार्थांचें अति सेवन आणि स्थूल, जड अशीं क्रव्याद मांसें यांची इच्छा करितो.

**मेदोवृद्धिलक्षण**—अंगांतील मेद वाढला असतां पोट, पार्श्व यांची वृद्धि करितो व खोकला. दमा, अंगाला दुर्गंधि व चिकटपणा, थोड्या मेहनतीनें श्रम, तृषा, घाम, गलगंड, ओष्ठरोग मेह. श्वास हे रोग होतात. व माज, पोट, मान, स्तन हे लोंबू लागतात. **मेदक्षयलक्षण**—मेदक्षय झाला असतां कटिप्रदेश बधिर होतो. अंग रोडतें व पाथरी उठते, अंगाच्या संधी शून्य होतात. शरीर रुक्ष होतें आणि स्निग्ध मांस खाण्याची इच्छा होते. **मेदक्षीणवर्धन**—मेदक्षीण रोगी श्रीखंड, शिखरण, इत्यादि मधुर आम्ल यांच्या योगानें झालेले पदार्थ, सिद्ध मांसें, ग्राम्य मांसे, व जलचर मांसे आणि विशेषेंकरून खारट मासे यांची इच्छा करितो.

**अस्थिवृद्धिलक्षण**—अंगामध्यें अस्थि वाढले असतां अस्थींचे ठायी अन्य अस्थी उत्पन्न होतात आणि दांत मोठें विक्राळ होतात. **अस्थिक्षयलक्षण**—अस्थिक्षय झाला असता हाडें दुखतात, शरीर रुक्ष होतें, नखें, दांत केश इत्यादिकांचा पात हे विकार होतात. **अस्थिक्षीणवर्धन**—अस्थिक्षीण पुरुष मांस, मज्जा, अस्थीचा स्नेह याणीं युक्त अन्नाची इच्छा करितो.

**मज्जावृद्धिलक्षण**—शरीरांत मज्जा वाढली असता संपूर्ण अंगें व नेत्र यांना जडपणा येतो, व सांध्यावर कृच्छ्रसाध्य व दीर्घशूल, अरुषी[2] रोग उत्पन्न होतो.

---

१ स्त्री व पुरुष याचे गुह्य स्थान. २ व्रण खवडे वगैरे.

**मज्जाक्षयलक्षण**—मज्जेचा क्षय झाला असतां हाडें पोकळ होतात. भोंड व घेरी येते, शुक्र अल्प होतें, सांधे फुटतात, व हाडांमध्यें ठणका आणि शून्यत्व हीं लक्षणें होतात. **मज्जाक्षीणवर्धन**—मज्जाक्षीण पुरुष गोड, आंबट अशा अन्नाची इच्छा करितो.

**शुक्रवृद्धिलक्षण**—शुक्रधातु वाढला असतां मूतखडा उत्पन्न होतो, शुक्र फार स्रवूं लागतें, आणि संभोगाची अतिशय इच्छा वाटते. **शुक्रक्षयलक्षण**—शुक्राचा क्षय झाला असतां शुक्रपतन होण्यास उशीर लागतो किंवा त्याच्या ऐवजीं रक्त पडतें, वृषणामध्यें अतिशय वेदना होतात, व शिश्नांतून वाफा निघतात. **शुक्रक्षीणवर्धन**—शुक्रक्षीण पुरुष मयुराचें व कोंबड्याचें अंडें, तसेच हंस व सारस यांची अंडी व मासें तशीच गांवांतील जलस्थलज आणि उदकस्थ अशीं मासें यांची इच्छा करितो.

**मलवृद्धि लक्षण**—मळ वाढला असतां नळ फुगतात, पोटांत गुरगुर शब्द, जाड्य व वेदना उत्पन्न होतात. **मलक्षयलक्षण**—मलक्षयानें वायु आतड्यांत गुरगुर शब्द करून वेढून टाकतो व पोटांत चोहींकडे फिरतो किंवा ऊर्ध्व होऊन उरांत पाठींत व बरगड्यांत फार पीडा करितो. व ऊर्ध्व ढेंकर येतात; **मलक्षीणवर्धन**—मलक्षीण पुरुष यवाचें पिष्टान्न यवाचीं उसळ आणि अनेक प्रकारच्या शाखा, मसुरा व उडीद याचे यूप याची इच्छा करितो.

**मूत्रवृद्धिलक्षण**—मूत्र वाढलें असता बस्तिशूल होतो. पोट फुगणें व लघ्वी केली तरी नच केल्यासारखी वाटते, म्हणजे पुन्हां पुन्हा लघवी होईलसें वाटतें.

**मूत्रक्षयलक्षण**—मूत्रक्षय झाला असता लघवी साफ होत नाही. तिचा वर्ण पालटतो किंवा तो रक्तमिश्रित होतो व बस्तीत पीडा होते. **मूत्रक्षीणवर्धन**—मूत्रक्षीणवर्धन रोगी पेज, उसाचा रस, दूध, गूळ, बोरें, पाणी, काकडी, आणि कवंडळ या पदार्थांची इच्छा करितो.

**स्वेदवृद्धिलक्षण**—घाम फार येतो, व अंगास दुर्गंधी व कंडू सुटते.

**स्वेदक्षयलक्षण**—स्वेदक्षय झाला असतां केंश गांळतात किंवा ताठतात ( उभारतात ), त्वचा नेत्र हीं रुक्ष होतात. **स्वेदक्षीणवर्धन**—स्वेदक्षीण पुरुष अभ्यंग, उटणें, मद्य, निर्वात स्थानीं असणें, व निजणें, आणि जड पांघरूण याची इच्छा करितो.

**आर्तववृद्धिलक्षण**—स्त्रियांचें आर्तव वाढलें असतां त्याचा फार दुर्गंधयुक्त स्राव होतो आणि अगमोडे येतात. **आर्तवक्षयलक्षण**—स्त्रियांचे रजाचा क्षय झाला असतां योग्य काळीं ऋतु होत नाहीं. व झाला असतां अल्प होतो आणि योनीमध्यें दुखतें. **आर्तवक्षयवर्धन**—स्त्री, कडू, आंबट, खारट, उष्ण, दाहक, जड अशी अन्नें आणि फळाच्या भाज्या, पन्हीं, इत्यादि पदार्थांची इच्छा करते.

**स्तन्यवृद्धिलक्षण**—स्तन्यवृद्धि झाली असतां स्तन पुष्ट होतात व त्यांतून दुग्ध स्राव वारंवार होतो व स्तनास ठणका लागतो.

**स्तन्यक्षयलक्षण**—स्त्रियांचे दुग्धाचा क्षय झाला असतां दुग्ध मुळींच नाहींसें होतें किंवा अल्प होतें. आणि स्तन म्लान होतात. **स्तन्यक्षयवर्धन**—स्त्रियांचे स्तन क्षीण झाले असतां मद्य, साळींचें अन्न, मांसे, गाईचें दूध, साखर, आंसव, दहीं आणि प्रिय असें अन्न इत्यादिकांची इच्छा कारिते.

**गर्भवृद्धिलक्षण**—पोटांत गर्भ मोठा वाढला असतां पोट मोठें वाढतें आणि त्या स्त्रीला घाम फार येतो व प्रसवकाळीं फार वेदना होतात. **गर्भक्षयलक्षण**—गर्भक्षय झाला असतां कुस उंच वर येत नाहीं व कुशींत गर्भ फिरत नाहीं. **गर्भक्षयवर्धन**—गर्भक्षय झाला असतां हरण, शेळी, मेंढी, डुक्कर, यांचे गर्भपचनादि क्रिया करून तसेंच वसा शुष्क मांसे इत्यादिकांची भक्षणाची इच्छा करिते. ब्राह्मणाची स्त्री रती, स्निग्ध शाल्योदनाची इच्छा ठेविते.

**दोष धातु मल यांचा ऱ्हास**—शरीरामध्यें दोष धातु व मल यांचा नाश करणारे आहार, विहार व भक्षण हे होते आणि पहिलें धातु वाढले ह्मणजे दुसऱ्या धातूला वाढवितात.याकरितां फार वाढलेले दोष, धातु, मल यांचा नाश हितकारक होतो. **क्षय**—धातु, दोष, मल, यांचा शरीराला न माननारी अन्नें व पानें क्रोध, शोक, चिंता, भय, श्रम, अति मैथुन, अत्यशन, रेचकें, वेगधारण, साहस कर्म, आणि अभिघात यांपासून क्षय होतो. **वृद्धि**—ज्या ज्या धातूचा क्षय झाला असेल त्या त्या धातूला वाढविणारें भक्षण, विहार यांचें अति सेवन करावें ह्मणजे तो तो धातु वाढून लवकर मनुष्य त्या त्या धातुक्षयापासून मुक्त होतो.

**बलक्षयनिदान**—मनुष्याचें बल, अभिघात, भय, क्रोध, चिंता, परिश्रम आणि धातूंचा क्षय व शोक, यांनीं क्षीण होतें. बलक्षय झाला असतां अंगाला जडत्व, व स्तब्धपणा, गात्रें म्लान, ग्लानि, कांतीचा बदल, झांपड, निद्रा, आणि वातापासून सूज ही लक्षणें होतात. **बलवृद्धिलक्षण**—जी दोषाला सम करणारी व अग्नीला सम करणारी आणि धातुवृद्धिकर व पुष्टिकारक अशी द्रव्यें ती बलाला वाढवितात.

कोणी पुरुष कृश असतांही बलवान असतो व कोणी स्थूल असूनही अल्प बलवान असतो याकरितां चेष्टांच्या कुशलत्वेंकरून बलाचें अनुमान करावें.

**ओजधातूचा प्रकार**—शुक्रांत सप्तधातूंचें जें उत्तम सत्व किंवा तेज त्याला ओज ह्मणतात. त्याचें मुख्य स्थान जरी हृदय आहे तरी तें सर्व शरीर व्यापितें. तें जीविताला आधारभूत आहे; देहस्थिति त्याजवरच अवलंबून आहे. तें स्निग्ध, निर्मल, सोमात्मक, व किंचित् तांबूस व पिवळे असें आहे. त्याचा नाश झाला असतां जीवाचा अवश्य नाश होतो. तें जोंपर्यंत आहे तोंपर्यंतच जीव आहे, शरी-

रांत घडणाऱ्या निरनिराळ्या व्यापारांना तेंच कारणीभूत आहे. **ओजक्षयलक्षण**—क्रोध, क्षुधा, चिंता, शोक, श्रम, इत्यादि कारणांनी जो ओजाचा क्षय होतो तो क्षय झाला असतां मनुष्य फार भित्रा व दुर्बळ होतो व वरचेवर चिंतेंत निमग्न होतो. इंद्रियांना व्यथा होतें अंगाला विवर्णता येते, उत्साह नाहींसा होतो व शरीर रुक्ष व कृश होतें. **ओजवृद्धि**—स्निग्ध, गोड, वृष्य, दूध, मांसरस, आणि आणखी अशाच पदार्थांनीं ओजधातु वाढते व ओजाची वृद्धि झाली असतां देह उत्साहयुक्त पुष्ट व बलवान् होतो.

**खुलासा**—दोषादिकांची वृद्धि व क्षय वैद्यांना समजण्यास त्यांच्या विपरीत गुणांचा अपकर्ष व उत्कर्ष हे अनुक्रमेंकरून साधनीभूत आहेत. दोषादिकांची वृद्धि ही तर पीडाकारक आहेच, पण त्यांचा क्षय त्याहूनही पीडाकारक आहे. त्या त्या दोषांच्या वृद्धिक्षयांवर चिकित्सा करणें झाल्यास ज्या अन्नाचा द्वेष असेल तें वर्ज करावें व जें प्रिय वाटेल तें विरोधी नसल्यास सेवन करावें. दोष वृद्ध झाले असतां प्रायः तद्विपरित पदार्थावर इच्छा उत्पन्न होते, व ते क्षीण झाले असतां प्रायः-तत्समान गुणांच्या पदार्थावर वासना जाते. ही गोष्ट अज्ञान्यांच्या लक्षांत येत नाहीं. यास प्रमाण.॥कुर्वतेहिरुचिं दोषा विपरीतसमानयोः॥ वृद्धाः क्षीणाश्चभूयिष्ठंलक्षयंत्यबुधास्तुन ॥

---

## सहा रसांचे गुण.

गोड, आंबट व खारट हे रस वायूचा नाश करितात. तिखट, तुरट व कडू हे रस कफाचा नाश करितात. आणि तुरट, कडू व मधुर हे रस पित्ताचा नाश करितात असें जाणावें. याशिवाय बाकीचे रस दोषांला कोपवितात. जे रस वातशामक आहेत परंतु त्यांत जर रुक्षता, लघुता, आणि शीतता हे धर्म आहेत तर ते रस वायूचें शमन करीत नाहीत. जे रस पित्तशामक आहेत परंतु त्यांमध्यें जर तिखट, उष्ण व लघु हे धर्म आहेत तर ते पित्तशमन करीत नाहींत. जे रस कफशामक आहेत परंतु त्यामध्यें जर स्निग्धता, गौरव आणि शीतता हे धर्म आहेत तर ते कफाचा नाश करीत नाहीत. मधुर रस अति सेवन केला असतां ज्वर, श्वास, गलगंड, कृमि, स्थूलता, अग्निमांद्य, मेद, आणि कफ, या रोगांला उत्पन्न करितो. आंबटरस अति भक्षण केला असतां भ्रम, तहान, दाह, तिमिर ह्म० नेत्ररोग, ज्वर, कंडू, पांडुत्व, विसर्प, सूज, विस्फोट आणि कुष्ठ, यांना उत्पन्न करितो. खारटरस अति भक्षण केला असतां नेत्रपाक; नेत्रविकार, रक्तपित्त, सर्वांगावर गांधी, क्षतपीडा, वलिपलित ह्मणजे अकालीं पांढरे केश होणें, डोक्यास टक्कल, कुष्ठ, विसर्प आणि तृषा यांना करणारा असा आहे. तिखटरस अति भक्षण केला असता भ्रांति व दाह याना करितो. मुख, टाळू व ओठ यांचा शोष करणारा, व कंठादिकाचेठायी पीडा व मूर्च्छा, तृषा, कफ यांना करणारा, व

बल आणि शुक्र यांचा नाशक असा आहे. कडूरस अति भक्षण केला असता मस्तकशूळ, मानेचा स्तंभ, श्रम, पीडा, कफ, मूर्च्छा व तहान यांना करितो. आणि बल व शुक्र यांचा नाशक असा आहे. तुरटरस अति भक्षण केला असतां पोट फुगणें व हृदयाचेठायीं पीडा, आक्षेपवायु, इत्यादि करणारा असा आहे. जुन्या साळी मूग, गहूं, मध, साखर आणि जंगलांतील प्राण्यांचें मांस यांखेरीज करून संपूर्ण मधुर पदार्थ कफ करणारे आहेत.—आंवळे व डाळिंब यावांचून सर्व आंबट पदार्थ पित्त करणारे आहेस. सर्वक्षार ह्मणजे लवणें प्रायः नेत्रांला विकार करणारीं आहेत.—सुंठ, पिपळी, लसूण, पडवळ व गुळवेल यांवांचून सर्व तिखट पदार्थ वातकोप करणारे आहेत.—पिंपळी, सुंठ व नागरमोथे यांवांचून प्रायः तिखट पदार्थ धातुनाशक आहेत.—बाळहिरड्यावांचून सर्व तुरट पदार्थ थंड व स्तंभक आहेत.—परंतु कात हा शुक्रधातूचा नाश करणारा आहे.—हे सहा रसांचे सामान्य गुण सांगितले आहेत; परंतु संयोगानें अन्य गुण होतात. उदाहरण—मध आणि तूप हे दोन्ही पदार्थ समसमान करून सेवन केले असतां विषरूप होतात; ह्मणजे तात्काळ विषाप्रमाणें प्राण्यास मारीत नाहींत. तथापि अशक्त व रोगी मनुष्यास पुढें कालेंकरून ते विरुद्ध असल्यानें अपाय करणारे होतात. ह्मणून विरुद्ध पदार्थ कसे होतात ते पुढें सांगितले आहेत.

**मधुरवर्ग**—तूप, सोनें, गूळ, आक्रोड, केळें, नारळ, फालसा, शतावरी, कांकोळी, फणस, खिरणी, बला, अतिबला, नागबला, मेदा, महामेदा, शालिपर्णी, पृश्निपर्णी, मुद्गपर्णी, मापपर्णी, जीवंती, जिवक, ऋषभक, मोहाचीं फुलें, जेष्ठीमध, गोड तोंडलीं, भुईकोहळा, श्रावणी, महाश्रावणी, क्षीरविदारी, वंशलोचन, क्षीरकांकोळी, दुधी, शिवणीची फळें, रानशेवंती, ( दोन जातीची ) दूध, ऊंस, गोखरूं, मध, द्राक्षें, इ० मधुर वर्गात येतात असें जाणावें.

**आम्लवर्ग**—आंवळा, चिच, माहाळूंग, आम्लवेतस, डाळिंब, रुपें, ताक, चुका, अळू, बुखार, दहीं, आंबा, आंबाडा, निंब, कवठ, करवंदें हे पदार्थ आम्ल वर्गात येतात.

**लवणवर्ग ( क्षार )**—सैंधव, पादेलोण, काळेंलोण, बिडलोण, समुद्रमीठ, उखर जमिनीचें मीठ, साबरमीठ, खारीमीठ, शिसें व क्षार हे लवणवर्गात येतात.

**तिक्तवर्ग ( कडूवर्ग )**—कडू पडवळ, ( परवर ) त्रायमाण, वाळा, काळावाळा, चंदन, किराईत, निंब, कुटकी, तगर, आगरू, कुडा, सागरगोटे, हळद, दारुहळद, नागरमोथे, मोरवेल, अडूळसा, पहाडमूळ, आघाडा, कांसें, लोखंड, गुळवेल, धमासा, बृहत्पंचमूळ, रिगणी, रिंगणमूळ, डोरलीमूळ, कडुवृंदावन, अतिविष, व वेखंड हे पदार्थ तिक्तवर्गात येतात.

**कटुवर्ग ( तिखटवर्ग )**—हिंग, मिरें, वावडिंग, पंचकोल, सुंठ, चवक, पिंपळी, पिंपळमूळ, शेवगा, लसूण, पित्त, मूत्र व बिबवा हे पदार्थ कटुवर्गात येतात.

तुरटवर्ग--हिरडा, बेहडा, शिरीष, खेर; मध, कदंब; उंबर, मोती, पोंवळीं, सुर्मा, गेरू, कोंवळें कवठ, खारीक, पद्म, कमळ इ० पदार्थ कषायवर्गांत येतात.

**सामान्य धर्म**--द्रव्यामध्यें रस, वीर्य, विपाक, प्रभाव, यांपैकीं ज्याचा ज्याचा जोर अधिक असेल तो गुण इतरांचा पाडाव करून आपलें काम बजावितो. एकाच द्रव्यांत विरुद्ध गुणाचा समागम आल्यास ज्या गुणाचा अंश जास्त असेल तो हीन गुणांचा पराभव करितो. ( जसें दूध जरी शीतवीर्य आहे तरी त्यांत जे स्नेह गौरव प्राचुर्य त्याचे योगानें तें वातघ्न कार्य करितें, शैत्यामुळें वाताचा प्रकोप होत नाही. ) विपाक समशक्तिक रसाचा पराभव करितो. वीर्य समशक्तिक रस विपाकाचें कांहीं चालूं देत नाही. व ह्या तिहींची शक्ति जरी प्रभावाच्या बरोबर असली तरी तो त्याचा पराभव करितो. हें ह्यांचें स्वाभाविक बल होय. दोन किंवा अधिक पदार्थांचे रसवीर्य विपाक एकसारखे असूनही जो त्यांच्या क्रियेंत भेद आढळतो तो प्रभावामुळें असतो. उदाहरणार्थ—दंती व मनुका ह्या अनुक्रमें चित्रक, जेष्ठमध, यांच्याशी रसवीर्यविपाकानी समान असतांही रेचक आहेत. तसेंच तूप दुधाशीं रसवीर्यविपाकानें समान असूनही दीपन आहे. ही जीं द्रव्यादिकांचीं कर्मे सागितली ती जरी सामान्यतः खरी आहेत तरी प्रत्येक द्रव्याचे घटकावयव कांहीं विचित्र रीतीनें संयुक्त आल्यामुळें त्याचीं कर्मे केव्हां केव्हां ह्या सामान्य नेमाहून भिन्न असतात. उदाहरण—गहूं व यव हे दोन्ही मधुर व जड असून एक वातघ्न ह्मणजे वात हरणारा व दुसरा वातकारक असा आहे. दूध व मांसें तद्वतच असून एक शीतवीर्य व दुसरे उष्णवीर्य आहेत असें जाणावें. यासाठीं प्रत्येक पदार्थाचे गुणदोषांचा विचार सुज्ञानीं करीत जावा.

---

## विरुद्धाशन.

विरुद्धाशन ह्मणजे पदार्थ पदार्थांच्या संयोगानें विपरीत होणारें भोजन. अशा विरुद्ध आहाराचें सेवन केलें असतां कांहीं कालेंकरून किंवा तात्काळ मनुष्याला अपकार करितें. यास्तव मनुष्यांनीं विरुद्ध आहाराचा मोठ्या यत्नानें त्याग करावा. नाहीतर त्यापासून व्याधी आणि इंद्रियांस दुर्बळपणा किंवा मरण ही प्राप्त होतात.

**संयोगानें विरुद्ध होणारे पदार्थ**—सर्व प्रकारच्या भाज्या, कुळीथ, ( हुलगे ) मांसें, मद्य, वेलाचीं फळें, क्षार, मीठ, व चिंच इत्यादि आंबट पदार्थ व मास, नेपती, ( करीर ) वेळूचे कोंब, जाभळें, दही व मध या सर्व पदार्थांचा किंवा यांतील एकाचा दुधाशी संयोग जाहला असता तो विरुद्ध होतो.--ऊन, ऊन, पदार्थ, कोंवळा फणस, दूध, तेल, केळें, आंसव, कोंबडें व हरीण यांचे मांस आणि ताडफळ याशीं दह्याचा संयोग जाहला असता तें विरुद्ध होतें.—तूप, केळें, लाह्या, दूध आणि सातूचें पीठ यांशीं ताकाचा संयोग जाहला असतां तें विरुद्ध होतें.—

मांसे, मांस, गुळ व मुळे यांचे बरोबर दूध भक्षिलें असतां कुष्ठरोगाला उत्पन्न करितें. व भाज्या, जांभळें, मद्य व आसव यांबरोबर दूध प्यालें असतां सर्पासारखें मनुष्यास मारतें.--हरण, तितर, मोर, लावे इत्यादि वनपशूंचीं मांसें, आंवळे, सैंधव, हरीतकी, सुंठ कडू पडवळ व साखर यांजबरोबर दूध प्यालें असतां हितकारक होतें; यावांचून इतर पदार्थांच्या संयोगानें विकार पावतें असें जाणावें.--रात्रींचें दूध दिवसास घेऊं नये, कदाचित प्यालें असतां निजूं नये. जर दूध पिऊन निजलें तर आयुष्याचा नाश होईल. यास्तव दिवसाचें दिवसास व रात्रीचें रात्रीस प्यावें, ह्मणजे त्यापासून अपकार होत नाहीं.--नासलेलें दूध प्यालें असतां कांविळ, पांडुरोग, सूज कुष्ठ इत्यादिक रोग होतात.--रात्रीचें दहीं खाऊं नये. कदाचित् इच्छा असेल तर तूपसाखरेबरोबर खावें किंवा तूप पाण्याशीं अथवा मुगाचे वर्णीशीं किंवा मधाशीं व आंवळकठीशीं खावें परंतु ऊन करून खाऊं नये; त्यांतून रक्तपित्तरोग आणि कफविकार हे ज्यास असतील त्यांनीं तर मुळींच दहीं खाऊं नये.--हेमंत, शिशिर, आणि वर्षाऋतु यांमध्यें रोगरहित मनुष्यानें दहीं भक्षिलें असतां हितावह होतें. आणि शरत्, ग्रीष्म व वसंत या ऋतूंमध्यें प्रायः विकार करितें. या वचनाचा अनादर करून मनास वाटेल तसें दहीं भक्षण केल्यानें ज्वर, रक्तविकार, कुष्ठ, विसर्प, पित्त, पांडुरोग, भ्रम व कांवीळ हे रोग होतात. क्षतरोग, क्षीण, मूर्छा, भ्रम, दाह आणि रक्तपित्तजनित रोग हीं ज्यास झालीं असतील त्यास ताक देऊं नये. आणि उष्णकाळामध्यें तर सर्वथा सर्वांनीं वर्जावें.--मध व तूप समान सेवन केलें असतां विरुद्ध होतें.--घोरपड, तित्तर, लावे, मोर यांचीं मांसें येरंडेल तेलांत तळलीं किंवा त्याची फोडणी दिली असता विरुद्ध होते.--काळेपाठीचा हरण आणि कोंबडें यांचें मांस आसवानें विरुद्ध होतें.कपोत पक्ष्याचें मांस शिरसेलानें विरुद्ध होतें. नानाप्रकारचीं मांसें एकत्र शिजवून खाल्लीं असतां मनुष्याचा प्राण घेतात.--मेंढीचें मांस करडईचे तेलांत तळलें असतां विरुद्ध होतें.--बगळ्याचें मांस मद्य किंवा धान्याच्या घुगऱ्यांनीं विरुद्ध होतें.--तांदुळाचे खिचडीबरोबर दूध किंवा खीर यांचा संयोग झाला असतां विरुद्ध होतें.--तेलाशीं अफू विरुद्ध होते.--दुधभाताशीं मीठ विरुद्ध होतें.--फणसाचे गरे खाऊन त्याजवर विडा खाल्ला असतां विरुद्ध होतो.--दोन वेळ तापविलेला मध, पाणी, तूप, तेल, काढे, भाज्या आणि इतर अन्न हें सेवन केलें असतां विषतुल्य होतें.--जलवासी प्राण्यांचें मांस, उडीद, मध, दूध, मोड आलेलें धान्य, मुळा व गुळ यापैकीं प्रत्येक पदार्थ एकमेकांशीं संयोगानें विरुद्ध होतो असें जाणावें.--राळे, मटक्या, कुळीथ, वर्याचे तांदूळ व वाल हे पदार्थ दुधाशीं विरुद्ध होतात.--उडदाचे वरणाबरोबर मुळा व करडईचे भाजीबरोबर मेंढा हे विरुद्ध होतात.--वांगें भाजलेलें फार ऊन ऊन खाल्लें असतां वातीं व रेच होतात. मुळे घालून केलेलें उडदाचें वरण भक्षण केलें असतां शूळ, आंव, गुल्म रोग यांतें उत्पन्न करितें.--क्षुद्र फणसाचा, तूप, दूध, गूळ, दहीं आणि उडीद यांशीं संयोग झाला असतां विरुद्ध होतें.

व्याया. करणारे, स्निग्ध आहारी ज्याचा अग्नि प्रदीप्त आहे तो, तरुण व वलवान, अशीं जी मनुष्यें त्यांनीं एखादे समयीं विरुद्ध पदार्थांचें सेवन केलें असतांही विलकुल विकार उत्पन्न होत नाहींत. त्याचप्रमाणें सवयीनें व अल्प सेवनानें विरुद्ध आहार फारसे बाधक होत नाहीत. त्यास प्रमाण. ॥ **व्यायामस्निग्धदीप्ताग्निवयःस्थवलशालिनाम् ॥ विरोध्यपिनपीडायै सात्म्यमल्पंचभोजनम् ॥** या प्रकारें विरुद्धाशन प्रकरण संक्षिप्त रीतीनें येथें घेतलें आहे.

---

## औषधीगण.

**अर्कादिगण**—रुई, मांदार, कळलावी, भारंगी, रास्ना, लघुमेढशिंगी, घाणेराकरंज, आघाडा, थोर मालकांगोणी, करंज, किन्हि व हिंगणबेट हा अर्कादि गण, कफ, मेद, विष, कृमि व कुष्ठ यांचा नाशक व विशेषंकरून व्रणशोधक आहे.

**आम्लगण**—जंबीर दोन प्रकारचे, माहाळुंग, मोहोटा, कांकडी, निंवूं, कमेरें, चिंच, रातांवें ( आमसुलें ) आम्लवेतस, ऊंस, हरवऱ्याची आंव, धान्याम्ल, चुका हा आम्लगण जाणावा.

**आरग्वधादिगण**—इंद्रजव, पाहाडमूळ, सागरगोटा, कडूनिंब, गुळवेल, मोरवेल, वेहेकळ, पाहाडमूळ, किराईत, कोरांटा, पर्वर, करंज, घाणेरा करंज, सात्वीण, चित्रक, कारली, गेळफळ, निळा कोरांटा, व घोंटीवोर हा आरग्वधादिगण. वांती, कुष्ठ, विष, ज्वर, कफ, कंडू व प्रमेह यांचा नाश करितो. व दुष्ट व्रणाचें शोधन करितो.

**रुक्षधान्यगण**—कांग चार प्रकारचें, सांवे, चणे ( हरवरे ) तीन प्रकारचे, हरीक दोन प्रकारचे, वंशवीज ( कळकाचें वीज ), शरतृण वीज, करडई, तृणधान्य, नागली, कसई, जोंधळे दोन प्रकारचे, वाजरी हा रुक्षधान्यगण जाणावा.

**कर्ण्यगण**—तिळवण, समुद्रफेस नऊ प्रकारचा,समुद्रास्थि, व त्याच्या शिरा, हा गण कर्णाला हितकारक आहे.

**जिवनीयगण**—हरणवेल, कांकोली, क्षीरकांकोली, मेदा, महामेदा, मुद्गपर्णी, मापपर्णी,जीवक,ऋषभक व जेष्ठमध ह्या औषधांना जीवनीय गण असें ह्मणतात.

**दीपनगण**—तीन प्रकारची पिंपळी, पिंपळमूळ तीन प्रकारचें, एरंड, तेजवळ, कायफळ, भारंगमूळ, पुष्करमूळ, श्वेत व रक्तचित्रक, धने, अजमोदा, चार प्रकारचें जिरें, दोन प्रकारची थोर शेरणी हा दीपन गण आहे.

**न्यग्रोधादिगण**—वड, पिंपळ, औंदुंवर, श्वेत व रक्तलोध, जांभूळ, रान-

जांभूळ, अर्जुनसादडा, पारोसा पिंपळ, कायफळ, पिंपरी, आंबा, वेतस, खिरणीचा वृक्ष, पळस, नांदरुख, बोर, कदंब, टेंभुरणी, जेष्ठमध, व मोहा, हा न्यग्रोधादिगण व्रणाला हितावह, स्तंभक, भग्नसंधानकर, मेदोघ्न व रक्तपित्त, तृषा, दाह व योनी-रोग यांचा नाशक आहे.

**नेत्र्यगण**—दोन प्रकारचें रसांजन, त्रिफळा, श्वेत व रक्त लोध्र, कोरफड, निवळा, हा गण नेत्राला हितकारक आहे.

**पयोवृक्षगण**—रुई दोन प्रकारची, निवडुंग पांच प्रकारचा, शेर दोन प्रकारचा, दूधवेल, वड तीन प्रकारचा, पायरी, उंबर, हाही क्षीरी, वृक्षगणच जाणावा.

**प्रसारणीगण**—चांदवेल दोन प्रकारची, मुंडी, लाजाळु, श्वेत व रक्त पुनर्नवा, श्वेत व रक्त उपलसरी, पांच प्रकारचा माका, दोन प्रकारची नाकशिकणी, दोन प्रकारची ब्राह्मी, लाजाळू भेद, शंखपुष्पी, लघुकाकडी व सुपारी हा प्रसरणीगण जाणावा.

**पाचनगण**—पाषाणभेद, मिरीं, ओंवा, जलशिरस, सुंठ, चवक, गजपिंपळी व जीवक हा पाचगण होय.

**पौष्टिकगण**—चार प्रकारचें वंशलोचन, श्वेत व रक्तचिलक, अष्टवर्ग[१], चोपचिनी, चिल्ह, दालचिनी, नागकेशर, तालीसपत्र, तवकीर, वेखंड, गोखरूं, रोहिणी, कुहिली, व हिरवे मुग हा पौष्टिक गण जाणावा.

**वस्तीगण**—गेळफळ, कुडा, कोष्ठ, देवडांगरी, जेष्ठीमध, वेखंड दशमुळें, देवदार, रास्ना, सातु, बडीशेप, कडू दोडका, कुळीथ, मध, सैंधव व तेड हीं औषधें निरूहबस्तीचे उपयोगीं पडतात.

**लवणगण**—सांबरमीठ, मीठ, सोरा मीठ, बिडलवण, पादेलोण, सैंधव, बांगडखार व द्रोणीचें मीठ हा लवणगण जाणावा.

**वमनगण**—मालकांगोणी, पिसोळा, भांड्याचा कळंक, गेळफळ, माशी व देवडांगरी हा गण वांतीकारक आहे.

**वातहरणगण**—वकाणनिंब, कापशी, श्वेत व रक्तएरंड, दोन प्रकारचें वेखंड, कात्री, व श्वेतनिर्गुडी व हिंग हा वातनाशक गण होय.

**विरेचनगण**—वाहवा, कपिला, कटुकी, कंकोळ, वारुणी, शिवलिंगी[३], नागदवणी, दोन प्रकारची दांती, तीन प्रकारचे टेंटू, दोन प्रकारची सोनामुखी, रेवाचिनी, कडू वृंदावन[२], जेपाळ, हा विरेचनगण जाणावा.

**शिरोबस्तीगण**—वावडिंग, आघाड्याचें बी, त्रिकटु, दारुहळद, राळ, शि-

---

१—जविक, ऋषभक, मेदा, महामेदा, ऋद्धि, वृद्धि, काकोळी, क्षीरकांकोली, २ कडुवृंदावनाचे मुळ, ३—जिचे फळ करवदाएवढें असून आतील बी महादेवासारखी असते.

रीष, रिंगणी, [illegible], शेवगा यांचें बी, मोहाच्या झाडाचा चीक, सैंधव, रसांजन, लहान व मोठी एलची व वाफळी ही औषधें शिरोविरेचनाचे ( नाक वाहण्याचे ) उपयोगीं पडतात.

**क्षारगण**—सज्जीखार, जंवखार, टांकणखार, पादेलोण, पळसाचा खार तिळाच्या कांड्याचा खार, आघाड्याचा खार, हा क्षारगण जाणावा.

---

## साधारण औषधी गुण.

**दीपनऔषधी**—जीं औषधें आंवेचें पाचन करीत नाहींत आणि अग्नि प्रदीप्त करितात ती उदाहरण—बडीशेप व कासविंदा.

**पाचन औषधें**—आंवेचें पाचन करितात आणि अग्नि प्रदीप्त करीत नाहींत तीं उदाहरण—नाकेशर, इंद्रजव. इ०

**दीपन व पाचन औषधें**—जीं औषधें अग्नि प्रदीप्त करितात आणि आंवेचेंही पाचन करितात ती. उदाहरण—चित्रक, पंचकोल, कोंवळें बेलफळ, जिरें, व वरधारा इत्यादि.

**संशमनऔषधें**—जीं औषधें वातादि दोष समान असतां त्यांचा द्वेष व त्यांचें शोधन करीत नाहींत. आणि विषमभाव पावून शरीरांत वृद्धिंगत झालेले जे वातादि दोष त्यांचें मात्र शमन करितें. उदाहरण—गुळवेल. इ०.

**अनुलोमन औषधें**—जीं औषधें वातादि दोष याचा पाक ह्मणजे कोप शांत करून परस्पर बद्ध झाले जे वातादि दोष त्यांना वेगळे वेगळे करून अधोभागीं नेतें अथवा वात, मूत्र, मळ, यांचा जो बंध त्याला ह्मणजे बद्धकोष्ठतेला मोकळें करून अधोभागी नेऊन गुदावाटें पाडितें. तें उदाहरण—बाळहिरडे. इ०

**स्रंसनऔषधें**—पुढें पाक होण्याविषयी योग्य जे वात, मळ, मूत्र, इत्यादि दोष ते कोष्ठाचे ( पाचन स्थानाचे ) आश्रयेंकरून राहिले असतां त्यांचा पाक न करितां त्यांस तें अधोभागी दडपून त्यांना गुदावाटें पाडितें. तें उदाहरण—बहाव्याच्या शेंगेंतला मगज, मेढशिंगी. इ०.

**भेदनऔषधी**—ज्या औषधी वातादि दोषेंकरून अबद्ध अथवा बद्ध असे जे मळमूत्रादिक ते ग्रंथित झाले असतां त्यांचा भेद करून त्यांतें अधोभागीं नेऊन गुदावाटें पाडतात त्या भेदन औषधी जाणाव्या. उदाहरण—कुटकी, कळलापरी, कारलें, वेकू जेपाळ, तूप, पुष्करमूळ, वेहेंडे, बिब्बा, गोमूत्र, रिंगणमूळ, व वायवर्णा इत्यादि.

**रेचनऔषधी**—पोटामध्यें विशेषकरून अन्नादिकांचा ह्मणजे आदिशब्दें-करून मलमूत्रादिकांचा चांगला पाक झाला असतां अथवा कांहीं कच्चें राहिलें असतां त्या अन्नादिकास व वातादिकास पातळ करून त्यास ज्या औषधी अधोभागी नेऊन गुदावाटें पाडतात त्या औषधी रेचक जाणाव्या. उदाहरण—निशोत्तर, दांतीमूळ, तेंड, त्रिफळा, तिधारी निवडुंग, बाहावा, कपिला, पिसोळा, दूध, पादेलोण, जेपाळबीज, शमी, गोमूत्र, कुटकी. इ०

**वमन औषधें**—पक्कदशेंत आलें नाहीं असें, पित्त व कफ यांना हट्टेंकरून बलात्कारानें जें औषध तोंडावाटें ओकवितें तें व मनसंज्ञक जाणावें. उदाहरण—गेळफळ, कडू दुध्या भोपळा, कडू निंब, कडू तोंडलें, वेखंड, सैंधव, कडू वृंदावन, कडू काकडी, कुडा, देवडांगरी इत्यादि.

**संशोधन औषधें**—आपल्या स्वस्थानीं वातादिकांचा जाहलेला जो संचय त्याला ऊर्ध्वभागीं नेऊन त्यातें जें औषध तोंडावाटें व नाकावाटें बाहेर काढितें अथवा त्या संचयाला अधोभागीं नेऊन गुदावाटें ढाळाबरोबर किंवा शिश्नावाटें मूत्राबरोबर काढितें तें औषध देहाचेठायीं संशोधन जाणावें. उदाहरण—देवडांगरी यास देडांगर, कांटेवृंदावन व कुकडवेल अशीं नांवें आहेत, तोंडावाटें ह्म० ओकारीबरोबर व नाकावाटें ह्म० त्या औषधांचें चूर्ण करून नाकांत ओढलें असतां दोष बाहेर पडतात.

**छेदन औषधें**—जें औषध परस्पर एकांत एक मिळालेले असे जे कफादिक दोष त्यांस आपल्या शक्तीनें फोडून वेगळे वेगळे करितें. तें उदाहरण—यवक्षार, सुंठ, मिरीं, पिंपळी, शिलाजीत, बिबवा, रसांजन, वेळू, सुरण इत्यादि.

**लेखनऔषधें**—जीं औषधें रसादि सप्तधातु व वातादिदोष यांचें शोषण करून त्याला पातळ करितात, तीं उदाहरण—मध, ऊन पाणी, वेखंड, यव, [ भाजलेल्या यवाचें पीठ ] कमळाक्ष, कलखापरी, कापूर, कासवदा, गेळफळ, जाभूळ, तिळाचें तेल, डाळिंब, गोमूत्र व रसकापूर इत्यादि.

**ग्राहीऔषधें**—जी औषधें अग्नि प्रदीप्त करितात व आमादिकांचें पाचन करितात व उष्णवीर्य आहेत ह्मणून जलस्वरूप जे कफादिकदोष, धातू व मळ यांचें शोषण करितात तीं, उदाहरण—चित्रक, सुंठ, जिरें, गजपिंपळी, अतिविष, इंद्रजव, कवठ, कमळाक्ष, पित्तपापडा व पोपया इत्यादि.

**स्तंभनऔषधें**—जीं औषधें रुक्षगुणेंकरून व तुरट रसेंकरून युक्त असतात व शीतवीर्य असून पाकानें हलकीं असतात तीं वायूला उत्पन्न करितात ह्मणून तीं स्तंभन जाणावी. उदाहरण—कुडा, टेंटू, काळा वाळा, इत्यादि.

**रसायनऔषधें**—जी औषधें शरीराची जरा व रोग यांस दूर करितात. तीं उदाहरण—गुळवेल, रुद्रवती, गूळ, गुग्गुळ, बाळहिरडे, आस्कंद, दुधाची खीर, कस्तुरी, [illegible] व मुसळी इत्यादि.

**वाजीकरण औषधें**—जीं औषधें शुक्रधातूला वाढवून पुरुषांस स्त्रियाविषयीं व स्त्रियांस पुरुषांविषयीं हर्षयुक्त इच्छा व शक्ति देतात तीं, उदाहरण—नागबला, (हा चिकण्याचा एक भेद आहे,) शतावरी ह्मणजे सहस्रमुळी, साखर, दूध, कवचबीज, ह्मणजे कुहिरीचें बी इत्यादि.

**धातुवृद्धिकर औषधें**—ज्या औषधांपासून शुक्रधातूची वृद्धि होते तीं औषधें शुक्रल जाणावीं. उदाहरण—आस्कंद, सफेत मुसळी. साखर, शतावरी ह्मणजे सहस्रमुळी, अक्रोड, अळंबुखार, गायीचें तूप, उडीद इ०

**धातूला चेतविणारी व उत्पन्न करणारीं औषधें**—दूध, उडीद, गोडंबी, आंवळकठी इत्यादि.

**वाजीकरण औषधांचा निषेध**—शुक्रधातूला चेतविणारी स्त्री आहे व त्या धातूला रेच करणारें मोतरिंगणीचें फळ अथवा रानवांगी ह्मणजे डोरलीं किंवा रिंगणीचें फळ आहे. व स्तंभन करणारें जायफळ आहे. व शोषण करणारे हिरडे आहेत. व कलिंगड हें वीर्याचा क्षय करणारें असें आहे.

**सूक्ष्म औषधें**—शरीराचेठायीं बारीक बारीक रोमरंध्रादिक छिद्रें आहेत. त्यांचेठायीं जी औषधें प्रवेश करितात ती, उदाहरण, सैंधव, मध, कडुनिंब, तिळाचें तेल, एरंडतेल इत्यादि.

**व्यवायी औषधें**—जीं औषधें अपक्व [ पोटांत पाकदशेंत जातांच ] साऱ्या देहाला व्यापून मग मद्य व विष यांचे सारखी पाकाप्रत जातात, ती उदाहरण—भांग, अफू इत्यादि.

**विकासी औषधें**—जी औषधें सर्व अंगाचेसंधींचे बंधनास, शिथिल करून रसादि सप्तधातूंपासून उत्पन्न झालें जें ओज ह्मणजे बळ त्याला शिथिल करितात. ती उदाहरण—सुपारी कोद्रूधान्यें. इ०

**मदकारी पदार्थ**—जो पदार्थ तमोगुण प्रधान असून बुद्धीला आच्छादितो तो. उदाहरण—सुरादिक मद्यें.

**प्राणहारक औषधें**—पूर्वी सांगितली जी व्यवायी, विकासी, सूक्ष्म, छेदी, मदकारी, आग्नेय औषधें या साहींचे गुणेंकरून जें द्रव्ययुक्त असतें तें द्रव्य प्राणहारी जाणावें. उदाहरण—विष, वचनागादिक तें योगवाहीही जाणावें. कारण कोणी आचार्य श्लोकात ह्मणतात "योगवाह्यमृतंविषं" असाही पाठ ह्मणतात त्याचा अर्थ तेंच विष योगवाही ह्मणजे त्याला काही संस्कारविशेषेंकरून ज्या ज्या अनुपानाशी योजिलें त्या त्या अनुपानाचे गुण वाढवून अमृततुल्य होतें.

**प्रमाथी औषधें**—जी औषधें आपल्या प्रभावेंकरून कान, तोंड, नाक, इत्यादिकाचे छिद्रामध्यें कफादि दोषाचा संचय झाला असतां त्या संचयाला दूर करितात ती, उदाहरण—वेखंड, मिरीं इत्यादि.

**अभिष्पंदीपदार्थ**—जो पदार्थ आपल्या पिच्छलगुणेंकरून रसवाहिनी शिरांना जड करितो तो पदार्थ अभिष्पंदी म्हणजे कफकारक जाणावा. उदा०दहीं.

**विदाहीपदार्थ**—जे आंबट ढेंकर, तृषा, दाह यांना उत्पन्न करून फार वेळानें पचन होतात. ते उदाहरण अजमोदा.

**योगवाहीपदार्थ**—ज्या द्रव्याबरोबर ज्या द्रव्यांचा संयोग करावा. त्याचे गुण करितें तें. मध, पाणी, तेल, तूप, पारा, लोह, शिलाजित हे पदार्थ जसे दुसऱ्याचे गुणासारखे आपणही गुण करितात ते.

---

## देशकालक्षण.

ज्या देशांत पाणी पुष्कळ आणि झाडें फार ह्मणजे कोंकण व मावळ या सारखा देश तो थंड असल्यामुळें वात आणि कफसंबंधी पीडा फार होतात. ज्या देशांत पाणी कमी व झाडें थोडी ह्मणजे खानदेश, वऱ्हाड, कर्नाटक अशा देशात उष्णता फार असते ह्मणून अशा देशात पित्तरोग व रक्तविकार फार होतात. या दोन देशाहून जो अन्य देश ह्मणजे मध्यम स्थितीचा नाशीक, पुणें, सातारा, गुजराथ, काश्मीर तो राहण्यास फार उत्तम जाणावा.—मारवाड रेताड व पाण्याची कमताई सबब त्याज्य आहे.

मार्गशीर्ष, पौष, माघ, आषाढ, श्रावण व भाद्रपद या महिन्यांत वात अधिक असतो. आश्विन, कार्तिक, वैशाख व जेष्ठ या चार महिन्यांत पित्तप्राधान्य असतें.—फाल्गुन आणि चैत्र या दोन महिन्यांत पोटामध्ये कृमि ह्मणजे जंत उत्पन्न होतात. व ह्या महिन्यांत थंड पाण्याच्या प्राशनानें कफ उत्पन्न होतो.—ग्रीष्मऋतूंत वायूचा संचय होऊन वर्षाऋतूंत प्रकोप होतो.—वर्षाऋतूत पित्ताचा संचय होऊन शरद्कालीं प्रकोप होतो.—हेमंतऋतूंत कफाचा संचय होऊन वसंतऋतूंत प्रकोप होतो असें जाणावें.—वायु शरद्काळी व पित्त वसंतऋतूंत आणि कफ वर्षाऋतूंत आपोआप शांत होतात. प्रातःकाळी व अस्तमानी कफाचा कोप होतो, दोनप्रहरीं व मध्यरात्री पित्त अधिक होतें.—व तिसरेप्रहरी आणि मध्यरात्रीनंतर वायूचा प्रकोप होतो असें जाणावें. कफाला शत्रूसारखा तीक्ष्ण औषधांनी, वायूला, मित्रासारखा स्नेहद्रव्यांनीं, आणि पित्ताला मधुर व शीतल पदार्थांनी जावयासारखे उपचार करून जिकावें.—कफ कोपला असतां नस्य व वमन, पित्तास रेच, व वातास शोधन बस्ती, व त्रिदोषावर सर्व उपचार करावे.

---

## औषधी युक्तायुक्त विचार.

संपूर्ण कार्याचेठायीं अगदीं नव्या औषधांची योजना करावी. परंतु वावडिंग, पिंपळी, गूळ, धणे, मध व तूप हे पदार्थ एक वर्षाचे जुने घ्यावेत.—गुळवेल, कुड्याची साल; आडूळशाचीं पानें, कडू निंबाचीं पानें, कडू पडवळ, कौडळ, पुनर्नवा, (घेटोळीमूळ) वावच्या, जटामासी, कोहोळा, शतावरी (सहस्रमुळी), आस्कंद, कोरांटा, वडिशेप, एरंडमूळ, प्रसारणी (चांदवेल), शेवग्याचें मूळ ही औषधें सर्वकाळ ओलीं घ्यावीं; परंतु ओली ह्मणून दुप्पट घेऊं नयेत; इतर औषधें ओलीं असतां दुप्पट घ्यावींत.—हिंगूळ खड्याचा, गंधक आंवळेसर, पारा हिंगुळांतील, हिंग भाजका, धोत्रा काळा व वचनाग पांढरा किंवा पिवळा घ्यावा. परंतु लेपांत काळा योजावा. जेथें दूध, दहीं, लोणी, तूप व ताक हे पदार्थ सांगितले असतील त्या ठिकाणी होतां होईतोंपर्यंत गाईचें घ्यावें. व तेल मराठी तिळाचें घ्यावें. गोळ्या चाटणें व हलके पाक ह्मणजे ज्यांत भस्मं वगैरे नाहीत त्यांचे गुण एक वर्षानंतर कमी होतात. चूर्णाचे गुण २ महिन्यानंतर व सिद्ध केलेल्या तेलाचे गुण सहा महिन्यांनंतर आणि सिद्ध केलेल्या तुपाचे गुण एक वर्षानंतर हीनवीर्य होतात असें जाणावें.—आसवें, अरिष्टें आणि सर्व धातूची भस्में व रसायनें ही जितकीं जुनीं होत जातील तितकीं विशेष गुण देणारीं होतात. चूर्ण, तूप व तेल आदिकरून स्नेह पदार्थ आणि चाटणें यांत पांढरा चंदन योजावा. व काढे आणि लेप यांत बहुतकरून रक्तचंदन योजावा. औषधी प्रयोगांत एखादे रोग्याला विरुद्ध असलें ह्मणजे तें त्यास सहन होत नसलें मग तें जरी गणोक्त असलें ह्म० त्या प्रयोगात घेतलें असलें तथापि तें काढून टाकावें. आणि एखादें औषध त्या रोग्याला हितावह असलें तर तें त्या गणांत नसले तरी वैद्यानें आपले स्वबुद्धीनें घालावें ह्म० त्यापासून अहित होणार नाहीं. जेथें औषध सेवनाचा काळ सांगितला नाहीं तेथें प्रातःकाळ, ज्या वनस्पतीचें अंग सांगितलें नाही तेथें मूळ घ्यावें. जेथें प्रयोगात भाग सांगितला नाही, तेथें समभाग व जेथें पात्र सांगितलें नाही तेथें मातीचें भाजलेलें पात्र (मडकें) घ्यावें. एखाद्या प्रयोगात एकच औषध दोन वेळ आलें असेल तर तें दुप्पट घ्यावें.

---

## औषधी आणावयाचा प्रकार.

प्रातःकाळीं उठून शुचिर्भूत होऊन चांगला दिवस पाहून कुलदेवतेचें स्मरण करून व कोणाशी न बोलतां जी औषधें आणावयाचीं असतील तेथें जाऊन त्या औषधाचे उत्तरेकडील मूळ अथवा साल काढून घ्यावी. वारुळावरची, मसणवट्यां-

---

१ याचें कारण असें आहे कीं, त्या भस्मात काहीं कच्चा अंश राहतो तो इतर भस्माबरोबर गंजत जाऊन त्याचेंही भस्म होतें. त्यामुळें जितकीं जुनीं तितकीं गुणकारी जाणावीं.

तील, पाण्याच्या आश्रयांतील, ज्या जाग्यावर गवत होत नाहीं तेथील, चोहाट्यावरचीं, अग्नीनें जळालेलीं, कीड लागलेली आणि थंडीनें करपलेलीं अशीं आणूं नयेत. त्यांजपासून कांहीं गुण येत नाहीं. अश्विन व कार्तिक या दोन महिन्यात साधारण सर्व औषधी रसभरित असतात. ह्मणून सर्व कार्याकरितां या २ महिन्यांत आणून ठेवाव्या. ढाळ व ओकारीविषयीं औषधी वैशाख व जेष्ठ महिन्यांत आणून ठेवाव्या. ज्या झाडाचें थोर मूळ आहे व झाड मोठें आहे त्याच्या मुळावरची साल घ्यावी. ज्या वनस्पतीचें मूळ लहान आहे त्या वनस्पतीचें मूळ घ्यावें अथवा पानें, फुलें, व मुळासुद्धां सर्व अंग घ्यावें उदाहरण–रिंगणी व गोखरूं इत्यादि. कित्येक वैद्यांचे मतें मुळ्या मात्र घ्याव्या. वड आदिकरून पायरी, जांभूळ, पिंपळ इत्यादिक मोठमोठ्या वृक्षांची अंतरसाल घ्यावी. जीं मध्यमवृत्तीचीं झाडें म्ह० असाणा, मोहो, बाभूळ इत्यादिकांची अंतरसाल घ्यावी. कोरफड, नागवेल व तुळस इत्यादिकांचीं पानें घ्यावीं. हिरडा, वेहडा, आंवळकठी व बोरें इत्यादिकांच्या फळावरची साल व त्वचा घ्यावी व बीया टाकाव्या, धायटी, पळस, गुलाब इत्यादिकांचीं फुलें घ्यावी. निवडुंग, रुई, मादार इत्यादिकांचा चीक घ्यावा. चित्रकाचें मूळ, सुरणाचा कांदा, रिगणीचें सर्व अंग, आडूळशाचीं पानें, खैराचा डिक किंवा अंतरसाल किंवा गाभा, कडू निंबाचीं पानें व तीं न मिळाल्यास क्वचित् स्थळीं साल घ्यावी, बेलाचें कोंवळें बेलफळ व बाहाव्याची परिपक्क जुनी शेंग घ्यावी.

---

## शुद्ध औषधें घेण्याचा प्रकार.

धातूपधातु, रसोपरस, विषोपविषें, रत्नोपरत्नें आदिकरून जीं रसायनी औषधें आहेत तीं घेणें झाल्यास सर्वकाळ शुद्ध करून नंतर प्रयोगांत योजना करावी. आणि तसें न करितां अशुद्ध औषधीचें सेवन केलें तर रोग बरा न होता उलटा अपाय मात्र होईल यांत संशय नाही. आतां यांची शुद्धि व मारण कसें करावें. तें पुढें ठिकठिकाणीं स्पष्ट सांगितलें आहे.

---

## औषधी प्रतिनिधि.

जें औषध काढ्यात व चूर्णात मुख्य सांगितलें आहे ह्मणजे प्रथम सांगितलें आहे त्यावांचून बाकीचीं औषधें त्यांचे प्रतिनिधि ( जामीन कांहीं समान व गुणाचे ) सर्वांस मान्य, परंतु मुख्य औषधाचे अभावी दुसरें औषध घेऊं नये. तीं खालीं दाखविलीं आहेत.

---

| औषधी. | प्रतिनिधी. | औषधी. | प्रतिनिधी. |
|---|---|---|---|
| अतिविष.... .... | नागरमोथे. | पित्त ... .... | मासरस. |
| आम्लवेतस .... | आंबट चुका किंवा हरवऱ्याची आंब. | पिपळी .... .... | मिरी. |
| | | पुष्करमूळ. .... | कोष्टकोळिंजन. |
| | | वांवच्या.... .... | टाकळ्याचें बीज. |
| आंसव .... .... | मद्य. | वाळहिरडे. .... | आंवळकठी. |
| कस्तुरी .... .... | जायपत्री, कंकोळ. | विवबे .... .... | रक्तचंदन अ० चित्रक |
| कचोरा .... .... | ग्रंथिपर्णी. | भारंगमूळ .... | रिंगणमूळ. |
| कळलावी. .... | कोष्ठकोळिंजन. | भुईकोहळा .... | आस्कंद. |
| कापूर .... .... | चंदन, रक्तचंदन, नागरमोथे. | मध .... .. | जुना गूळ. |
| | | मोति .... ... | मोत्याची शिप. |
| केशर .... .... | कुसुंबा | मोरवेल ... .... | दालचिनी अ० मंजिष्ठ. |
| कंकोळ .... .... | विलायची, जायपत्री. | रक्तचंदन.. ... | नवा वाळा. |
| खडीसाखर .... | धुवासाखर. | रसांजन ... | दारुहळद |
| खैरसाल.... ... | कडुनिंबाची साल. | रिंगणी .... .. | कडुनिंब अथवा मोतरिंगणी. |
| गजपिंपळी .... | पिंपळमूळ. | | |
| ग्रंथिपर्णी. .... | कोष्ठकोळिंजन | रुपें .... ... | रौप्यमाक्षिक. |
| चवक .... .... | गजपिंपळी. | लोहकांत. ... | पोलाद, अ० तिखें. |
| चित्रक .... .... | दांतीमूळ अ० जेपाळ | वाळा .... .... | नागरमोथे. |
| चंदन .... .... | वाळा अ० कापूर. | वेखंड .... .... | मोरवेल अ० कंकोळ. |
| जाईचीं फुलें .... | लवगा. | शिलाजित ... | सोरा. |
| जायपत्री.... .... | लवंगा | शेळीचें दूध .... | मेंढीचें अ० गाईचें दूध |
| जेष्ठीमध.... ... | धायटीचें फूल. | साखर .... .... | खडीसाखर अ० जुना मध. |
| तगर ... .... | कोष्टकोळिंजन. | | |
| तांदूळ .... .... | जोंधळे. | सुंठ .... .... | आलें. |
| दारुहळद. .. . | हळद. | सुवर्णमाक्षिक .... | सोनगेरू. |
| दूध .... .... | मूग अ० मसुरा. | सोनें .... .... | सुवर्णमाक्षिक अ. लोहभस्म. |
| द्राक्षें .... .. | मोहाचीं फुलें. | | |
| धायटीचें फूल .... | मोहाचें फूल. | सोनें इत्यादिकांचीं भस्में.... | लोहभस्म. |
| नखला .... .... | लवंगाचें पुढील फूल. | | |
| निळें कमळ ... | निशीगंध (गुलछबू). | सचळ .... .... | खातेंमीठ. |
| पाहाडमूळ. .... | सफेत मुसळी. | हिरा ... .... | वैक्रांतमणी. |

## औषध भक्षणाचें प्रमाण.

॥ यतोमंदाग्नयोऱ्हस्वाहीनसत्वनराः कलौ॥ अतस्तुमात्रा तद्योग्याप्रोच्यते सुज्ञसंमता ॥

अर्थ—कलीयुगाचे ठायीं मनुष्य मंदाग्नि, लहान व बलहीन असे झाले आहेत यास्तव त्यांचे उपयोगीं व वैद्यास मान्य असेच औषधाचें साधारण प्रमाण खालीं सांगितलें आहे.—कारण औषधाचे सेवनाचें प्रमाण निश्चयेंकरून कोणासच करिता येणार नाहीं. यास्तव काळ, जठराग्नि, वय, बल, प्रकृति, दोष व देश यांचा फार बारीक रीतीनें विचार करून नंतर औषधाचे मानाची योजना करीत जावी. हीं खालील मानें प्रमाणभूत असून या कलीयुगास मान्य आहेत. परंतु हीं प्रमाणें निकोप, निशक्त व हाडाचा बळकट आणि बलवान अशा मनुष्याचीं जाणावी. याकरितां हें मान मनांत आणून व ज्या रोग्यास औषध द्यावयाचें आहे त्याचें मान मनांत आणून फार सूक्ष्म विचारानें योजना करावी. कारण रोग्याचे प्रकृतीला औषधाचें मान अगदीं कमी किंवा जास्त झालें असतां मुळींच गुणावह होत नाहीं हें वैद्यांनीं पक्कें लक्षांत ठेवावें.

---

## औषधी तयार करण्याचे प्रयोग.

### पंचकषाय.

**पंचकषाय**—अंगरस, कल्क, काढे, हीम व फांट या पांचांस पंचकषाय असें ह्मणतात हे एकाखाली एक गुणांनी हलके जाणावे.

**अंगरस ( स्वरस )**—चांगली उत्तम ओली वनस्पती आणून त्याचवेळी कुटून फडक्यांत गाळून जो रस निघतो त्यास अंगरस ह्मणतात. **प्रकार दुसरा**—सुकलेलें औषध सोळा तोळे आणून चूर्ण करून त्याचे दुप्पट मडक्यांत पाणी घालून त्यांत तें चूर्ण एक रात्र भिजत घालावें. नंतर दुसरे दिवशी प्रातःकाळी हातानें चांगलें कुसकरून तें पाणी गाळून घ्यावें. **प्रकार तिसरा**—जर औषधाचा सुकल्यामुळें स्वरस निघत नाही तर ती सुकलेली वनस्पती आणून थोडी कुटून तिच्या आठपट पाणी घालून मडक्यांत मंदाग्नीवर शिजवून चतुर्थांश राहिल्यानंतर खालीं उतरून तो रस गाळून घ्यावा.

कोणत्याही औषधीच्या स्वरसांत जडपणा अधिक आहे ह्मणून तो रस दोन तोळेपर्यंत सेवन करावा. व सुकलेल्या वनस्पतीचा काढलेला स्वरस किंवा अग्नीवर काढा करून वरप्रमाणें काढलेला स्वरस याची मात्रा तीन तोळेपर्यंत सेवन करीत जावी.

**यवागू**—सोळा तोळे औषध घेऊन थोडें कुटून त्यांत १२८ तोळे पाणी घालून अर्धें पाणी राहितोंपर्यंत कढवून गाळून त्यांत दुसरें द्रव्य तांदुळादिक जे लागेल तें मिळवून फिरून कढवून घणसर करावें त्याला यवागू ह्मणतात.

**विलेपी**—चौपट पाणी घालून कढवून लापशीसारखी घण व चिकट अशी करावी तिला विलेपी ह्मणतात. ती धातूची वृद्धि करणारी, शरीर पुष्ट करणारी, हृदयास हितकारक व मधुर होते ह्मणून पित्ताचा नाश करिते असें जाणावें.

**पानादि कल्पना**—चार तोळे औषध आणून थोडें कुटून त्यांत २५६ तोळे पाणी घालून अर्धे पाणी राहितोंपर्यंत कढवून नंतर गाळून तहान लागली ह्मणजे थोडें थोडें द्यावें. पांढरा मध, गूळ, क्षार, जिरें, लवण, तूप, तेल व इतर चूर्णे हे रसांत घालणें झाल्यास सर्व मिळून सहा मासेपर्यंत घालावें.

**यूष**—कल्काचें औषध साधारण चार तोळे घ्यावें व ज्या प्रयोगांत सुंठ व पिंपळी आहे ते तिखट आहेत ह्मणून चार चार मासे किंवा थोडें कमी घ्यावें. नंतर त्यांचा कल्क करून त्यांत अजमासें एकशेर पाणी घालून कढवून किंचित् घणसर पेजेसारखें करावें त्यास यूष ह्मणतात. हा बल देणारा, कंठास हितावह, हलका व कफनाशक असा आहे.

**पेया ( पेज )**—द्रव्याचे चौपट पाणी घालून पातळ पेजेसारखें व थोडें चिकट होईपर्यंत मंदाग्नीनें कढवावें त्याला पेया ह्मणजे पेज ह्मणतात इचेपेक्षां किंचित् घण असते तिला यूष ह्मणतात. ती पेया फार हलकी असून मलादिकांचें स्तंभन करणारी व धातुपुष्ट करणारी अशी आहे.

**पुटपाक**—पुटपाक व कल्क या दोहोंचेही आंगरस घेतात यास्तव पुटपाकाची कृति सांगतों. ओली वनस्पती आणून कुटून गोळा बांधून नंतर शिवणीचे वडाचे किंवा जांभळीचे किंवा एरंडाचे पानांनी तो गोळा गुंडाळून मग दोन अंगुळ अथवा अंगुष्ठ प्रमाण त्याजवर मातीचा लेप करून नंतर त्या गोळ्याचे खालवर गोंवऱ्या घालून गोळ्याचे लेपाची माती तांबडी होईतोंपर्यंत अग्नि द्यावा. नंतर तो गोळा बाहेर काढून पानें व माती दूर करून आंतील गोळा पिळून रस काढावा. जर कोरडी वनस्पती आहे तर ती पाण्यांत अथवा जें द्रव्य सांगितलें असेल त्यांत वांटून याच रीतीनें कृति करून रस काढावा. याचा रस दोन तोळे सेवन करावा त्यांत मध घालणें झाल्यास एक तोळा, चूर्ण, कल्क व दूध आदिकरून जीं द्रव द्रव्यें आंत घालणें असतील त्यांचें घालण्याचे मान अंगरसाप्रमाणें जाणावें.

**कल्क**—ओलें औषध चटणीसारखें बारीक वांटावें व सुकें औषध असल्यास पाणी घालून पाट्यावर बारीक वांटावें. त्यास कल्क ह्मणतात हा एक तोळा घ्यावा. यांत मध, तूप व तेल ही दुप्पट घालावी, साखर व गूळ ही बरोबरीनें घालावी आणि दूध पाणी आदिकरून पातळ पदार्थ घालावयाचे असल्यास चौपट घालावे.

**काढा**—काढ्यातील सर्व औषधें मिळून चार तोळे असावी. नंतर तीं एकत्र करून थोडी कुटावी व सोळापट पाणी घालून मंदाग्नीनें मडक्यांत शिजवावी आणि अष्टमांश उरवून कोंवट आहे तोंच गाळून घेऊन प्राशन करावा. काढा शिजता-

ना खालीं मंदाग्नि लावावा. अष्टमांश सोसत नसल्यास चार तोळे द्यावा. लहान मुलांस तीन माशांपासून १ तोळ्यापर्यंत द्यावा. काढा हा अन्नरसाचा पाक चांगला झाल्यावर द्यावा. काढ्यांत साखर घालणें असल्यास वात, पित्त व कफ या रोगांवर अनुक्रमें चवथा, आठवा, व सोळावा हिस्सा घालावी. मध घालणें असल्यास त्याच्या उलट ह्मणजे कफावर चवथा हिस्सा, पित्तावर आठवा हिस्सा व वातावर सोळावा हिस्सा घालावा. जीरें, गुग्गुळ, क्षार, त्रिकटू, शिलाजीत वगैरे औषधें तीन मासे घालावी. दूध, तूप, गुळ, तेल, कल्क व चूर्णें वगैरे घालणें असल्यास एक तोळा घालावी. काढा अर्धा उरवावा ह्मणजे रोगाचें पाचन करितो. १२ वा हिस्सा कोठ्याची शुद्धि करितो. ४ हिस्सा घाम काढितो. ६ वा हिस्सा अग्नि प्रदीप्त करितो आणि ८ वा हिस्सा रोगाची शांति करितो. काढा शिजतेवेळीं मडक्याचे तोंडावर झांकण ठेवूं नये.

**हिम**—चार तोळे औषध घेऊन तें चांगलें कुटून त्याचें साहापट पाणी मडक्यांत घालून त्यांत तें औषध मिळवून रात्रीस भिजत ठेवून प्रातःकाळीं तें पाणी त्यांतच हातांनीं चांगलें कुसकरून शुभ्र वस्त्रानें गाळून घ्यावें. हा हिम आठ तोळे घ्यावा. यांत टाकावयाचें औषधाचें मान काढ्याप्रमाणेंच जाणावें.

**फांट**—चार तोळे औषध बारीक कुटून सोळा तोळे पाणी मडक्यांत घालून उष्ण झाल्यावर त्यांत तें औषध टाकून चांगलें ढवळून नंतर तें पाणी वस्त्रानें गाळून घ्यावें, याचें घेण्याचें मान आठ तोळ्याचें आहे. यांत घालावयाच्या औषधाचें मान काढ्याप्रमाणेंच जाणावें.

**मंथ**—हा मंथ फांटाचाच एक भेद आहे ह्मणून येथें सांगतों. चार तोळे औषध घेऊन चांगलें कुटून सोळा तोळे थंड पाणी मडक्यांत घालून त्यांत औषध टाकून चांगलें मंथन करून ह्मणजे घुसळून नंतर तें पाणी गाळून घ्यावें त्याला मंथ ह्मणतात. याचें सेवनाचें मान आठ तोळे जाणावें.

**अवलेह**—औषधांचे काढे, फांटादिक हे फिरून आटवून साखरेचे पाकासारखे घण करितात त्यास रसक्रिया किंवा अवलेह असें ह्मणतात. याचें घेण्याचें मान चार तोळे प्रमाण आहे व त्यात साखर चूर्णाचे चौपट, गूळ चूर्णाचे दुप्पट, आणि पाणी दुध, मूत्र व दुसरे पातळ पदार्थ हे चूर्णाचे चौपट घालावे. या अवलेहाचा पाक चांगला झाल्याची परीक्षा. पाक झाला ह्मणजे तार येते व पाण्यांत टाकला असतां बुडतो, बोटांनी चेपून पाहिला असतां कठिण व चिकट लागतो. व त्या पाकाचा गंध वर्ण व रस हे अपूर्व होतात या अवलेहाचीं अनुपानें दूध, उसाचा रस, पंच मूळाचे काढ्याचा यूष, आडूळशाचा काढा, इत्यादिक आहेत. तो रोग तारतम्य पाहून योजावा.

**आसवें व अरिष्टें**—या दोहोंची तयार करण्याची कृति पुढें आसव व अरिष्ट या प्रकरणांत दिली आहे. त्याठिकाणी पहावी.

**चूर्ण**— चांगलें सुकें औषध आणून बारीक कुटून वस्त्रगाळ करून ठेवावें. तें मोठ्या मनुष्यास सहा माशांपासून एक तोळ्यापर्यंत द्यावें. लहान मुलास एक माशापासून तीन माशापर्यंत तार्तम्य पाहून द्यावें. चूर्णांत गूळ समभाग घालावा. तूप, तेल, साखर, मध व चिकण पदार्थ हे दुप्पट घालावे. दूध, गोमूत्र, पाणी व दुसरे पातळ पदार्थ चूर्णाचे चौपट घालावें. चूर्ण, अवलेह, गोळ्या व कल्क यांचे वर पाणी अथवा दूध प्यावयाचें असल्यास तें पित्त, वात व कफ या रोगांवर अनुक्रमें १२-८- व ४ तोळे घ्यावें. तेणेंकरून औषध पोटावर चांगलें पसरतें. ह्मणजे जसा पाण्यावर तेलाचा बिंदु पडला असतां क्षणांत पसरतो तसें अनुपानाचे जोरानें औषध सर्व अंगभर पसरतें. चूर्णास निंबाचे रसाचीं अथवा दुसऱ्या कोणत्याही रसाची पुटें द्यावयाची असल्यास तें चूर्ण त्या रसांत भिजलें ह्मणजे एक पुट झालें. नंतर तें सुकल्यावर दुसरें पुट याप्रमाणें पुटाचें मान जाणावें. चूर्ण रसांत भिजविल्यावर खल करून पुन्हां पुट द्यावें. असें प्रत्येक पुटास वाळवून खल केल्यानें गुणावह होतें. वाळविणें तें सावलींत वाळवावें तें धातूचे पात्रांत वाळऊं नये मृत्तिकेच्या किंवा दगडाचे पात्रांत वाळवीत जावें.

**गुटिका**—गुळाचा अथवा साखरेचा पाक करून त्यांत चूर्ण टाकून गोळ्या कराव्या. पाक केल्यावांचून गोळ्या करावयाच्या असतां गुग्गुळ शोधून वांटून त्यांत चूर्ण मिळून गोळ्या कराव्या अथवा पाणी, मध दूध, इत्यादिक द्रवद्रव्यें त्यात चूर्ण टाकून गोळ्या कराव्या, साखरेंत गोळ्या करावयाच्या असल्यास चूर्णाचे चौपट साखर घालून कराव्या. गुळांत करावयाच्या असल्यास गूळ चूर्णाचे दुप्पट घ्यावा. गुग्गुळ किंवा मध या दोहोंत गोळ्या करावयाच्या असल्यास तें चूर्णाचे समभाग घेऊन गोळ्या कराव्या. पाणी, रस, मध इत्यादि पातळ पदार्थांत गोळ्या करावयाच्या असल्यास तें चूर्णाचें दुप्पट घेऊन गोळ्या कराव्या. गोळ्याची मात्रा दिड माशापासून नऊ माशांपर्यंत असावी.

---

## स्नेहपाक.

**स्नेहपाक**—[ तेल व तूप सिद्ध करण्याचा प्रकार. ] कल्काचीं जीं औषधें त्यांचे चौपट तेल अथवा तूप घ्यावें, त्या तेलातुपाचें चौपट दूध इत्यादिक पातळ पदार्थ घेऊन सर्वांना एकत्र करून मंदाग्नीनें तें आटवून व तूप व तेल शेष राखावें. तसल्या सिद्ध झालेल्या स्नेहाची मात्रा वातादि रोगावर चार तोळे प्राशन करावी. काढ्याची जी औषधें त्यांचे चौपट पाणी घालून चतुर्थांश काढा उरवून त्यांत तूप अथवा तेल घालून कढवून तेल व तूप शेष राखावें. मृदु द्रव्य असल्यास पाणी चौपट, मध्यास आठपट, व अत्यंत कठिण द्रव्यास पाणी सोळापट घालावें. एक तोळ्यापासून चार तोळ्यांपर्यंत काढा करावयाचा असल्यास पाणी सोळापट घालावें,

चार तोळ्यापासून सोळा तोळ्यापर्यंत करावयाचा असल्यास पाणी आठपट घालावे. पाण्यांत, काढ्यात, किंवा रसांत स्नेह सिद्ध करावयाचें असल्यास त्यांत स्नेहाचे अनुक्रमें चतुर्थांश, षष्ठमांश व अष्टमांश कल्क योजावा. दूध अथवा दहीं किंवा धोन्यादिकाचे रसांत स्नेह सिद्ध करावयाचा असल्यास अष्टमांश कल्क घालावा. कल्काचा पाक चांगला होण्याकरितां स्नेहाचे चौपट आंत पाणी घालावें. स्नेहाचे-ठायीं दूध, गोमूत्रादिक पांच पातळ पदार्थांहून अधिक पातळ पदार्थ घालावयाचे असल्यास ते सर्व स्नेहाचे समभाग घालावे. पांचांहून पातळ पदार्थ कमी असतां चौपट घालावें. काढ्यांत स्नेह सिद्ध करावयाचा असल्यास कल्काची औषधें पाण्यांत वांटून कल्क करून स्नेहांत घालून त्यांत स्नेहाचे चौपट पाणी घालावें. ज्या-स्नेहांत कल्क नाहीं तो स्नेह पातळ पदार्थांत घालून कढवून पातळ पदार्थ जाळून स्नेह शेष राखावा. फुलाच्या स्नेहांत पाणी चौपट घालावें. फुलाचा कल्क स्नेहाचे अष्टमांश घालावा. ( स्नेहसिद्ध झाल्याचीं लक्षणें ) स्नेहात कल्क असतो तो बोटानें चेंपिला असतां त्याची वात होते व तो कल्क अग्नीवर टाकिला असतां फुरफुर करीत नाहीं व तेलाचें पाकावर फेंस आला असतां व तुपाचे पाकावर फेंस येऊन गेला असतां व तो पाक सुगंधानें, रक्तादि वर्णानें व मधुरादि रसानें युक्त झाला असतां तो स्नेह चागला सिद्ध झाला असें जाणावें. ( पाक तीन प्रकारचे मृदू, मध्यम व कठिण त्यांचीं लक्षणें ) स्नेहांत कल्क असतो त्याला पाण्याचा ओलावा राहिला असतां तो मृदुपाक, कल्काला मृदूपणा असून पाण्याचा अंश राहिला नाहीं तो मध्यम पाक; थोडा कोरडा कल्क झाला असता तो कठीण पाक आणि त्यापेक्षां अधिक पाक झाला असतां तो पाक जळका,दाह करणारा आणि निरुपयोगी जाणावा. कच्चया पाकांत पराक्रम राहात नाहीं. तो अग्निमांद्य व शरीर जड करितो. स्नेहाचा पाक नरम झाला असतां तो स्नेह नाकांत नस्य देण्याविषयीं योजावा. मध्यम पाक झाला असतां सर्व कर्माचेठायीं योजावा. कठीण पाक झाला असतां अंगाला लेप करण्याविषयीं योजावा. तूप, तेल, व गुटिकादि हें एका दिवसांत सिद्ध न करितां सर्व द्रव्यें एकत्र करून एकरात्र भिजत ठेवून दुसरे दिवशीं स्नेह सिद्ध करावा. म्हणजे औषधीचा रस त्यांत संपूर्ण येऊन गुणावह होतात.

---

## औषधांचा सेवन काळ.

वैद्यानें रोग्यास बहुतकरून औषध प्रातःकाळींच भक्षण करावयास द्यावें; व अंगरस, कल्क, काढे, फांट व हिम हे तर विशेषेंकरून प्रातःकाळींच द्यावे; मनुष्यास औषध भक्षणाविषयीं पांच काळ आहेत ते हे कीं, किंचित सूर्योदय झाला असतां प्रथम काळ, दिवसांस भोजनसमयीं औषध देणें तो दुसरा काळ, सायंकाळीं भोजनसमयीं औषध देणें तो तिसरा काळ. वारंवार औषध देणें तो चवथा काळ. रात्रीचे ठायीं भोजनोत्तर निजतेसमयीं औषध देणें तो पांचवा काळ जाणावा. प-

हिला काळ—पित्त आणि कफ यांचा प्रकोप झाला असतां पित्ताला विरेचन [तीक्ष्ण रेच ] आणि कफाला वमन तसेंच लेखन ह्मणजे पतलीकरण याविषयीं औषध प्रातःकाळी द्यावें व त्याजवर लागलीच रोग्याला भोजन देऊं नये. **दुसरा काळ**—गुदसंबंधी वायूचा कोप झाला असतां ह्मणजे गुदद्वारानें वायु वरचेवर सरूं लागला असतां भोजनाचे किंचित् आधीं औषध भक्षणार्थ द्यावें व अरुचि उत्पन्न झाली असतां नाना प्रकारचीं अन्नें व नानाप्रकारचीं रुचिकर तोंडीलावणीं याचेबरोबर भोजनांत औषध द्यावें. नाभीसंबंधीं वायूचा कोप झाला असतां व अग्निमांद्य झालें असतां अग्निप्रदीप्त होईल असें औषध भोजनाचेमध्यें भक्षण करावें. सकलशरीरव्यापी व्यान वायूचा कोप झाला असतां भोजनाचे अंतीं भक्षण करावें ( ह्मणजे भोजन झाल्याबरोबर) उचकी आणि आक्षेपवायू किंवा कंपवायू यांचा कोप झाला असतां भोजनाचे पूर्वीं व अंतीं औषध भक्षण करावें. **तिसरा काळ**—कंठसंबंधी उदान वायूचा कोप होऊन स्वरभंगादिक रोग झाले असतां सायंकाळचे भोजनसमयीं प्रथम ग्रासाबरोबर व दोहोंग्रासामध्यें औषध सेवन करावें. हृदयस्थित प्राणवायूचा कोप झाला असतां बहुतकरून सायंकाळचे भोजनांतीं औषध भक्षण करावें. **चवथा काळ**—तृषा, ओकारी, उचकी, श्वास, व विषदोष हे रोग झाले असतां वारंवार अन्नासहित व अन्नरहितही भक्षण करावें. **पांचवा काळ**—मानेच्या मुळाच्या वरच्या भागीं कर्णरोग, नेत्ररोग, मुखरोग व नासिकरोग इत्यादि रोगांविषयीं, प्रवृद्ध वातादिक दोषांचे नाशनाविषयीं व अति क्षीण दोषाच्या वर्धनाविषयीं रात्रीचे ठायीं पाचनरूप व शमनरूप औषध अन्नरहित भक्षण करावें. ज्वरास प्रातःकाळीं, तिसरा प्रहरीं व रात्रीं निजतेसमयीं आणि माहामारीस पाहिजे तेव्हां द्यावें.

---

## औषधादिकांचे ठायीं मुहूर्त.

**ओषधी आणावयास मुहूर्त**—हस्त, अश्विनी, पुष्य, पुनर्वसु अभिजित्, मृग, रोहिणी, अनुराधा, शततारका व स्वाती ही नक्षत्रें आणि अमृतसिद्धियोग, गुरुवार, शुक्रवार, रविवार बुधवार, शुक्लपक्ष, शुभयोग व शुभकरण हें जाणावें.

**औषधीं करण्यास मुहूर्त**—हस्त, अश्विनी, पुष्य, अभिजित्, मृग, रेवती, चित्रा, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, पुनर्वसु, स्वाती व मूळनक्षत्रें. बुधवार, गुरुवार, शुक्रवार व सोमवार हे वार आणि मिथुन, कन्या, धन व मीन ही लग्नें जाणावी.

**औषधीं देण्यास मुहूर्त**—गुरुवार, शुक्रवार व रविवार, मेष, कर्क, तूळ, मकर ही लग्नें व शुभयोग आणि शुभकरण ही असावीत.

**कफावर औषध देण्यास मुहूर्त**—कृत्तिका, पुनर्वसु, हस्त, स्वाती, जेष्ठा आणि श्रवण हीं नक्षत्रें जाणावींत.

**रोग्यास औषध घेण्यास मुहूर्त**—चौथा, आठवा, व बारावा हे चंद्र नसावेत. आणि घातचंद्र, घातवार, घाततिथि, व जन्मनक्षत्र हीं नसावीत. काळराहू पृष्ठभागीं अमावा, व नक्षत्राच्या व तिथीच्या विषघटी, मंगळ, शनी, आणि सोम हे वार नसावे. वैधृती, व्यतिपात, इत्यादिक कुयोग व विष्टयादि कुकरणें नसावीत.

**विरेचन व वमनास मुहूर्त**—मंगळ, रवी व गुरुवार हे उत्तम जाणावे.

**रक्त काढण्यास मुहूर्त**—श्रवण, अनुराधा, मृगशीर्ष हीं नक्षत्रें मंगळवार आणि रविवार हे वार असावेत. व समुद्राचे पाण्यास भरती असावी.

**शूलादिकांवर औषध देण्यास मुहूर्त**—आरद्रा, जेष्ठ, मूळ, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, चित्रा, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, आश्विनी, हस्त अभिजित् आणि पुष्य हीं नक्षत्रें असावी. रविवार, बुधवार, मंगळवार, गुरुवार, व रिक्त तिथि ही सर्व प्रशस्त जाणावी.

**रोग्यास स्नान करण्यास मुहूर्त**—अश्विनी, आरद्रा, पुष्य, पूर्वा, हस्त; चित्रा, अनुराधा, जेष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, पूर्वाभाद्रपदा आणि अभिजित् ही नक्षत्रें आणि रवि, मंगळ, बुध व गुरु हे वार असावे.

---

## स्नेहविधि.

स्नेहश्चतुर्विधः प्रोक्तोघृततैलंवसातथा । मज्जाचतंपिबेन्मर्त्यःकिंचिदभ्युदितेरवौ ॥

*अर्थ*—स्नेह चार प्रकारचे आहेत. ते तूप, तेल, मांसस्नेह, व हाडांचें तेल. हे चार स्नेह यत्किंचित् सूर्योदय झाला न झाला त्यावेळीं प्यावें. या सर्व स्नेहांत तूप व तिळाचें तेल हे दोन्ही श्रेष्ठ जाणावे. तूप ३ दिवस प्यावें. तेल चार दिवस, मांसस्नेह ५ दिवस व हाडांचें तेल सहा दिवस प्यावें. कारण अशा ७ दिवसांनंतर घृतादिक स्नेह प्याले असतां आहारासारखे ह्मणजे नित्य जेवणासारखे होतात. त्यापासून गुण अवगुण कांहींएक होत नाही.

**स्नेहाच्या मात्रेचें प्रमाण**—वातादि दोष, काल, अग्नि, वय व रोग्याचें बलाबल पाहून घृतादिक स्नेहाची पोटांत घ्यावयाची मात्रा ती २ तोळ्यांची कनिष्ठ जाणावी. ३ तोळ्यांची मध्यम व ४ तोळ्यांची मात्रा सर्वांहून श्रेष्ठ जाणावी. स्नेहाची मात्रा प्रमाणाहून अधिक किंवा कमी सेवन केली असतां किंवा अकाळी ह्मणजे भलत्याच वेळीं सेवन केली असतां स्नेह पिऊन मिथ्या आहार व मिथ्या विहार केले असतां त्यापासून सूज, मूळव्याध, डोळ्यावर झापड पडून फार निद्रा व संज्ञेचा नाश होतो. ज्याचा अग्नि प्रदीप्त आहे त्यास ४ तोळे, मध्यम अग्नीस ३ तोळे व मंदाग्नीस २ तोळे स्नेहाची मात्रा द्यावी. ४ तोळ्यांची मात्रा आठ प्रहरांनी पचन होते. ३ तोळ्याची चार प्रहरांनीं पचन होते. व २ तोळ्यांची मात्रा ही दोन प्रहरांनीं पचन होते. स्नेह प्यावयाची २ तोळ्यांची अल्प मात्रा आहे ती जठराग्नि

प्रदीप्त करून स्त्रीसंगाविषयीं इच्छा देते व वातादिक दोषांचा अल्प प्रकोप दूर करिते. ३ तोळ्यांची मात्रा शरीराला पुष्ट करून धातूची वृद्धि करिते व श्रम दूर करिते व जी ४ तोळ्यांची मात्रा आहे ती कुष्ठरोग, विषदोष, उन्माद, भूतादिक ग्रह व अपस्मार हे रोग दूर करिते. पित्ताचा कोप असतां नुस्तें तूप प्यावयास देणें. वायूचा कोप असतां तुपांत सैंधव मिळवून तें द्यावें व कफाचा कोप असतां त्रिकटू व जवखार यांचें चूर्ण तुपात मिळवून तें तूप द्यावें.

**तूप प्यावयास योग्य रोगी**—रुक्ष व उरःक्षतरोग व विषदोष इहींकरून पीडित, वातपित्त विकार आहे तो व ज्याना बुद्धि, स्मृति, धारणा व पाचनशक्ति, यांची इच्छा असेल त्यानी तुपाचें स्नेहपान करावें.

**तेल प्यावयास योग्य रोगी**—कृमि [ जंत ] वायूकरून व्याप्त ज्याचें शरीर आहे तो, कफ व मेदोविकार, ग्रंथि, नाडीव्रण व ज्याला लाघव व दृढता पाहिजे व ज्याचा कोठा जड आहे व अग्नि प्रदीप्त आहे व ज्याच्या प्रकृतीला तेल भावतें त्यांनी तेलाचें पान करावें.

**मांसस्नेह प्यावयास योग्य रोगी**—मल्लादि युद्ध व धनुरादिकांचें आकर्षण इहीकरून पीडित धातु व रक्त ज्याचे क्षीण झाले आहेत तो रोगी व ज्याच्या शरीरांत मोठ्या वेदना आहेत तो, ज्याचा अग्नि प्रदीप्त आहे तो व ज्यास वायुरोग प्रबळ झाला आहे तो अशा रोग्यास मांसाचा स्नेह प्राशनास द्यावा.

**अस्थिस्नेह प्यावयास योग्य रोगी**—ज्याचा कोठा[1] दुष्ट झाला आहे तो दुःख सहन करणारा, वायूनें पीडित व ज्याचा अग्नि प्रदीप्त आहे अशा मनुष्यानीं अस्थीचें तेल किवा तूप प्यावें. तेणेंकरून शरीरास हित होतें.

**स्नेहप्राशनाचा काळ**—शीत काळाचे ठायीं घृतादिक स्नेह दिवसास प्यावे व उष्ण काळाचे ठायीं वातपित्त प्रबळ असता रात्रीस प्यावें, व कफ वायु प्रबळ असतां दिवसास प्यावें.

**स्नेहाचा उपयोग**—कानांत घालण्याविषयीं, अंगास मर्दन करण्याविषयीं, चुळा टाकण्याविषयीं, मस्तक, कान व डोळे यांचे तृप्तीविषयीं बलाबल पाहून तेल किवा तूप योजावें.

**स्नेहाचीं अनुपानें**—तूप पिऊन त्यावर कोंबट पाणी प्यावें, तेल पिऊन त्याजवर यूष प्यावा. मांसस्नेह व हाडांचें तेल पिऊन त्याजवर मंड प्यावा; म्ह० सुखावह होतें. ज्यास घृतादिक स्नेहाचा द्वेष आहे त्यास, बाल, वृद्ध, सुकुमार व नाजूक अशीं मनुष्यें व तृषारोगी अशा मनुष्यास उष्णकाळाचेठायी भाताबरोबर स्नेह द्यावें. नुस्तें पिण्यास देऊ नये.

---

१ आम, अग्नि, मळ, मूत्र, यकृत्, प्लीहा, याचीं स्थाने व हृदय, उदुक, फुफ्फुस याचे समुदायाला कोष्ठ असे म्हणतात, कारण हे पदार्थ कोष्ठाचेठायीं राहतात ह्मणून.

**स्नेहावांचून यवागूपासून सद्यःस्नेहन होतें तें**—तीळ कुटून त्याची कोंद करून त्यांत थोडके तांदूळ मिळवून तूप व पाणी त्यांत घालून चुलीवर कढवून पातळ लापशी करावी तिला यवागू असें ह्मणतात. ती यवागू कोमट कोमट घेतली असतां त्याच वेळेस शरीराचे ठायीं धातु उत्पन्न होते असें जाणावें.

**धारोष्ण दुधापासून तत्काळ धातू उत्पन्न होते**—खडीसाखरेचें चूर्ण तुपांत घालून तें तूप चुलीवर थोडें गरम करून दूध काढावयाचे भांड्यांत घालावें मग त्या भांड्यांत गाईचें दूध काढून त्याचवेळेस गरम गरम आहे तोंच प्यावें. तेणेंकरून त्याच वेळेस शरीराचे ठायीं धातू उत्पन्न होते.

**मिथ्याचारेंकरून स्नेह जिरला नाहीं त्याचा प्रतिकार**—घृतादिक स्नेह पिऊन त्याजवर व्यायामादिक परिश्रम जाहले असतां व कफकारक पदार्थ खाण्यांत आला असतां तेणेंकरून तें स्नेह जिरलें नाही अथवा फार पिण्यात आलें यास्तव जिरलें नाही. अथवा मळाचा अवरोध झाला असतां अशा मनुष्याला उष्ण पाणी देऊन ओकवावें तेणेंकरून अजीर्णाचा दोष दूर होतो. तसेंच स्नेह पिऊन अजीर्णाची शंका झाली असतां सोसेल असें चांगलें कढत पाणी प्यावें ह्मणजे चांगला ढेंकर येऊन अजीर्ण दूर होतें व अन्नावर इच्छा जाते. ज्या मनुष्याची आधीच पित्तप्रकृति त्यांत तो स्नेह प्याला तेणेंकरून त्याचा अग्नि फार तीक्ष्ण होऊन त्यापासून तहान फार वाढली असतां तिचे शमनार्थ चांगलें थंड पाणी प्यावयास द्यावें. व ओकारी करवावी ह्मणजे तहान दूर होते.

**स्नेहपानास योग्य रोगी**—औषधादिकांनीं ज्याचा घाम काढला आहे तो, रेचक औषधेंकरून शोधन केलेला मनुष्य, मद्यपी, स्त्री सेवन करणारे, परिश्रम झालेले मनुष्य, चितातुर, वृद्ध, बालक, कृश, रुक्ष, ज्याचें रक्त व धातू क्षीण झालें आहे तो, वायूनें पीडित, तिमिररोगी, दृष्टिरोग, नाजूक, अशा मनुष्यास स्नेहपानाची योजना करावी. परंतु वृद्ध, बालक, नाजूक, क्षीण, अशक्त स्नेह भावत नाहीं तो. अशा मनुष्यास उष्णकाळाचेठायीं भाताबरोबर घृतादि स्नेह द्यावें. अभ्र असेल त्या दिवशीं मुळींच स्नेह देऊं नये.

**स्नेहपानास अयोग्य**—अति मंद किंवा अति तीक्ष्ण ज्याचा अग्नि आहे तो, अति स्थूल व अति अशक्त, उरूस्तंभ, अतिसार, आमदोष, गलरोग, विष, उदर, मूर्च्छा, वांति, अरुचि, कफ, तरुणज्वर, तृष्णा, अजीर्ण व मद्यविकार यांणीं पीडित, व ज्या स्त्रीला गर्भस्राव झाला आहे व ज्याला नस्य, बस्ती व विरेचन दिलें आहे हे सर्व स्नेहपानास अयोग्य जाणावे. व ज्या दिवशीं अभ्र येईल, त्या दिवशीं स्नेह देऊं नये.

**स्नेह पिऊन स्निग्ध झाल्याचीं लक्षणें**—शरीरांत चांगला वर्ततो. अग्नि प्रदीप्त होतो. मळ चिकण असून मोकळा होतो, शरीर मृदु होऊन चिकण होतें,

व ग्लानिरहित होतें, घृतादिक स्नेहाचें सेवन केलें असतां त्याचे उपद्रव होत नाहीत, शरीर हलकें होतें, व इंद्रियें निर्मळ होतात. व रुक्ष मनुष्याची त्याच्या विपरीत लक्षणें होतात. तात्पर्य, शरीराचेठायीं यथार्थ स्नेह झालें नसतां जो रुक्ष ह्मणजे भस्मरोगी त्यास विपरीत लक्षणें जाणावीं.

**फार स्नेहपान केल्याचे उपद्रव**—जो मनुष्य अन्नाचा कंटाळा करितो, लाळ गळते, गुदाचेठायी दाह होतो व मळाचा भसरा होतो, डोळ्यावर झांपड, अतिसार व शरीर पीतवर्ण होतें, यांस शमन पाण्याचा चतुर्थांश काढा कोंवट द्यावा.

**रुक्षाला स्निग्ध व स्निग्धाला रुक्ष करणें**—रुक्ष मनुष्यास स्निग्ध पदार्थ लोणी काढल्या वेगळे ताकाचा मठ्ठा, व तिळाचा कल्क, व जवाचें सत्व, इहींकरून स्निग्ध करावा. व स्निग्ध मनुष्यास जे रुक्ष पदार्थ ह्मणजे सावे, चणे इत्यादिकेंकरून रुक्ष करावा.

**स्नेहसेवनाचे गुण**—अग्नि प्रदीप्त होतो, कोठा शुद्ध होतो, शरीरांतील रसादि सप्तधातू पुष्ट होतात, इंद्रियाना दृढत्व येतें जरा रहित होतो; व बळ आणि कांति इहींकरून युक्त असतो. व शभर वर्षे वाचतो.

**स्नेहपानाचेठायीं वर्ज पदार्थ**—परिश्रम करूं नयेत, अतिशीत पदार्थ, मळमूत्राचा अवरोध, जागरण, दिवसा झोंप घेणें, थंड व कफकारक पदार्थ व रुक्ष अन्न इतकें वर्जावें.

**स्नेहसेवन करणारास पथ्य**—पुष्कळ मांस घालून केलेला सुरवा त्यात तयार केलेली व तेलाची किवा तुपाची फोडणी दिलेली कण्हेरी, स्नेह आणि काकवी यांनीं युक्त असें तिळकुट, तिळयुक्त खिचडी, घृतयुक्त, व उष्ण आटीव खीर, गूळ घातलेली दह्याची निवळ किवा तूप, तेल,वसा, व मज्जा हे पदार्थ प्रत्येक आठ आठ तोळे घेऊन त्यात आठ तोळे तांदूळ घालून केलेली लापशी असे सात योग सद्यः स्नेहन करणारे आहेत. सर्व लवणयुक्त स्नेहही तसेच आहेत असें जाणावें.

---

## स्वेदविधि.

॥स्वेदश्चतुर्विधः प्रोक्तस्तापोष्मौस्वे दसंज्ञितौ॥ उपनाहो द्रवः स्वेदः सर्वे वातार्तिहारिणः॥

घाम हे चार प्रकारचे आहेत त्यांची नावे, ताप, उष्ण, उपनाह, ह्मणजे वाफ किंवा पाघरुणाचे योगानें जो घाम काढणें तो व द्रव हे चार प्रकारचे घाम वायूची पीडा दूर करणारे आहेत. ताप व उष्ण घाम हे दोन बहुतकरून कफ, चा नाश करणारे आहेत. व उपनाह हा घाम बहुतकरून वायूचा नाश करणारा आहे व द्रव नांवाचा घाम पित्तवायूचा नाश करणारा आहे.

**घामाचा शास्त्रार्थ**—ज्याचे शरीरांत मोठे प्रबळ वायूचा रोग आहे त्याचे अंगांतून फार घाम काढावा. हलका वायुरोग आहे त्याचे अंगांतून थोडा घाम काढावा व मध्यम वायुरोग आहे त्याचे अंगातून मध्यम घाम काढावा.

**रोगविशेषेंकरून घामाचा विधि**—कफाचा रोग असतां रुक्ष पदार्थ जे वालुकादि इही करून घाम काढावा. व कफ वायूचा रोग असतां स्निग्ध व रुक्ष या दोहों पदार्थेकरून घाम काढावा. कफ मेदोयुक्त वायूचा रोग असतां ज्या घरांत आंतील जाग्यात उष्णता असते त्या जाग्यांत बसवून अंगाला सहन होईल अशी थोडी थोडी औषधीचे वाफेनें किंवा शेकानें अथवा पांघरुणानें गरमी द्यावी व सूर्याचे किरण अंगावर द्यावे व कुस्ती करावी, थोडा मार्ग चालावा व कांबळें, धाबळ इत्यादि लोंकरीचें वस्त्रें पाघरावीं व कांहीएक चिंतन करावें उगीच बसूं नये. परिश्रम करावा. व कांहीएक अंगावर भार घ्यावा इतकें उपाय घाम निघण्याविषयीं करावें; ह्मणजे तेणेंकरून कफ मेदोयुक्त जो वायूचा रोग तो दूर होतो.

**ज्याचा पूर्वी घाम काढावयाचा ते**—नस्य, बस्ती व रेच देण्याविषयीं जे योग्य त्याचे अंगाचा पहिल्यानें घाम काढून नंतर नस्यादि उपचार करावे. त्याचप्रमाणें भगंदर, मूळव्याध व अश्मरी रोग यांणी पीडित आहेत अशा रोग्यांचे अंगाचा पहिल्यानें घाम काढून नंतर शस्त्रकर्मेंकरून हे रोग शमवावे. त्याचप्रमाणें ज्या स्त्रीचे पोटातील सल गर्भाचें पतन झालें असतां व मूढ गर्भाचें पतन झालें असतां व नऊ महिन्यानंतर किंवा नऊ महिन्यांचे अलिकडे बाळांत झाली असतां तिचे अंगाचा घाम काढावा. परंतु वाऱ्यास जपावें.

**घाम काढावयाचा देश व काल**—हे चार प्रकारचे घाम मनुष्याचे आहारांचें पचन झाल्यानंतर ज्या जाग्यात वायूचा लेश नसेल त्या जाग्यांत काढावे. औषधादिकेंकरून मनुष्याचे अंगाचा घाम काढला असतां व मोठ्या भांड्यात तेलें घालून त्यात मनुष्य बसविला असतां त्याचे वातादि दोष रसादि सप्तधातूंचे ठायीं रहात होत्साता कोष्ठामध्यें जाऊन ते दोष पातळ होऊन गुदावाटें ढाळ होऊन पडतात.

**ज्यांचा घाम काढूं नये ते रोगी**—अजीर्णानें पीडित, दुर्बळ, प्रमेही, उरःक्षतानें पीडित, तृषा, अतिसार, रक्तपित्त, पांडुरोग, उदररोग, मेदोरोग, गर्भिणी, अति स्थूल, रुक्ष, मूर्छित, जे स्तंभनाला योग्य नाहींत ते, क्षतेंकरून क्षीण, कृश, नेत्ररोग, विसर्प, कुष्ठ, क्षय, वातरक्त, गुदभ्रंश, गुदपाक, कामला, पित्तविकार, क्षुधा, ग्लानि, शोक, क्रोध व भय यांनीं युक्त व ज्यांनी दूध, दही, घृतादि स्नेह व मध याचें सेवन केलें आहे, किंवा विरेचन घेतलें आहे ते, रजस्वला, व बाळांतीण याचे अगाचा घाम काढूं नये. परंतु यांना एखादा भयंकर व्याधि उत्पन्न झाल्यास व तो घाम काढल्यानें साध्य होण्यासारखा असल्यास मात्र यांचे अंगाचा थोडा घाम काढावा. मुख्य शक्तिपात होऊं देऊं नये.

---

१—बेंबीचे वरती चार बोटें तेल येईपर्यंत तेल घालून त्यात रोग्यास बसवावा.

**घाम काढण्यास योग्य रोगी**—श्वास, कास, पडसें, उचकी, पोट फुगणें, मलावरोध, स्वरभेद, वातव्याधि, कफविकार, आमदोष, स्तंभ, ( ताठणें ) जाड्य, अगास, टोंचल्यासारखी पीडा, कंबर, पार्श्व, पाठ, कुस [ बरगड्या ] व हनुवटी हीं ठिकाणें वातानें जखडणें, अंडवृद्धि, खल्लीवात, धनुर्वात, वातकंटक [ पादरोग ] मूत्रकृच्छ्र, अर्बुद, ग्रंथि, शुक्रदोष, व उरुस्तंभ, इतक्या विकारांवर घाम काढणें योग्य आहे व तें खालील चार प्रकारांपैकीं जो योग्य दिसेल त्या प्रकारानें व त्या त्या रोगावरील औषधानें घाम काढावा व वातास जपावें.

**अल्प घाम काढावयाचीं स्थळें**—हृदय, वृषण, व नेत्र, यांचा घाम काढणें तो थोडा काढावा. नेत्रांत व कानांत घाम जाऊं देऊं नये.

**फार घाम निघाल्यापासून उपद्रव**—सर्व संधींना पीडा होते, व तृषा, ग्लानि, भ्रम, रक्तपित्त, हे उपद्रव व अंगावर पुटकुळ्या येतात, यांचे शमनाविषयीं स्निग्ध व शीतळ उपाय करावे मनुष्याचे अंगाचा घाम काढला असता त्या योगानें त्याचे पोटांतील दोष पातळ होऊन गुदावाटें ढाळ होऊन पडले असता त्याचे छातीला सुवासिक चंदनाचा लेप द्यावा, ह्मणजे प्रकृति स्वस्थ होते व जो मनुष्य तेलात बसविला त्या योगानें त्याचे दोष पातळ होऊन गुदावाटे ढाळ होऊन पडले असतां त्याचे डोळ्यांवर कमळाची अथवा केळीची कोंवळी पानें अथवा गुलाबाचीं फुलें थंडाईकरितां ठेवावी ह्मणजे ग्लानि दूर होऊन प्रकृति स्वस्थ होते.

**तापघामाचा विधि**—वाळू,वस्त्र,हात,पोतंड्या,खापर व चिरगुटाचा गेंद,इत्यादि पदार्थ विस्तवावर तापवून मनुष्याचे अंगाचा घाम काढावा. हे सहा प्रकार सांगितले यांची क्रिया कशी करावी ती सांगतो. खैराचे अथवा कणखर लांकडाचे धूमरहित जळजळीत असे निखारे करून त्यांजवर वाळू तापवून ती वाळू सुरती एरंडाचे पानात घालून त्या पानाची पुरचुंडी करून त्या पुरचुंडीनें सहन होईल असें मनुष्याचें अंग शेकावें. तेणेंकरून अंगाचा घाम निघतो,हा एक प्रकार. व निखाऱ्यावर आपले हात ऊन करून रोग्याचें अंग हातांनी शेकावें. व चिरगुटाचा गेंद करून निखाऱ्यांजवळ धरून ऊन करून त्या गेंदाचे योगानें रोग्याचें अंग शेकावें. व नुसतें फडकें निखाऱ्यांजवळ धरून ऊन करून त्या फडक्यानें अंग शेकावें व निखारे खापरांत घालून तें खापर रोग्याचे अंगास शेक लागे असें ठेवावें. ह्या इतक्या उपायेंकरून अंगाचा घाम निघतो.

**उष्माघामाचा विधि**—लोखंडाचा गोळा अथवा विटकर तापवून त्यांजवर थोडा आंबट[1] पदार्थाचा शिडकावा देऊन रोग्यास कांबळें पांघरवून त्या गोळ्यानें अथवा विटकारानें रोग्याचें अंग शेकावें तेणेंकरून घाम निघतो. हा एक प्रकार. अथवा दशमूळादिक अशी जी वायुहारक औषधें त्यांचा काढा अथवा त्या औषधाचा

१—ताक, काजी इत्यादि आंबट पदार्थ

रस ऊन करून, मातीचे घागरींत भरून घागरीचें तोंड बंद करून, घागरीचे कुशीला भोंक पाडून धातूची अथवा लांकडाची किंवा बांबूची दोन हात नळी करावी व त्या नळीला तीन संधी करून तिचें तोंड सहा अंगुळें लांब करावें. नळीचा आकार हत्तीचे सोंडेसारखा करावा. मग ती नळी घागरीचे कुशीचे छिद्रांत बसवून संधी बंद करावा. मग वायूनें पीडित जो मनुष्य त्यानें स्वस्थ बसून अंगाला तूप अथवा तेल लावून लोंकरीचें वस्त्र पांघरून त्याचे आंत त्या नळीचें तोंड घालून अंगाचा घाम काढावा. अथवा मनुष्याचे साडे तीन हात अथवा चार हात लांब जमीन खणून त्यात खैराची लाकडें घालून जाळून कोळसे लवकर बाहेर काढून नंतर ती जमीन दूध व धण्याचें पाणी व ताक अथवा कांजी इहीकरून शिंपून त्या जमिनीवर वायुहारक औषधाची पानें हांतरून त्याजवर रोग्यास निजवून अंगाचा घाम काढावा. या प्रकारें उडीद घेऊन त्यांना थोडी वाफ देऊन अर्धे कच्चे शिजवून त्या तापविलेल्या खाणींत पसरून त्याजवर सुरती एरंड आदिकरून वातहारक औषधांची पानें घालून त्याजवर रोग्यास निजवावा. नंतर कांबळें वगैरे लोंकरीचें पांघरूण चांगलें घालून अंगाचा घाम काढावा. या प्रकारें उष्मासंज्ञक घामाचा विधि जाणावा.

**उपनाह घामाचा विधि**—दशमूळादिक वायुहारक औषधें आणून कुटून चूर्ण करून त्यांत दूध व हरिणादिकांचे मांसाचा स्नेह हे दोन्ही मिळवून थोडें गरम करून वायूनें पीडित जें अंग त्या अंगाला सहन होईल असा जाड लेप करून वस्त्रादिकानें बांधून अंगाचा घाम काढावा. अथवा वायुहारक औषधें आणून कुटून चूर्ण करून ताकांत अथवा कांजींत वांटून त्यात थोडें सैंधव व तिळाचें तेल मेळवून थोडें गरम करून वायूनें पीडित जें अंग त्या अंगाला सहन होई असा दाट लेप करून वस्त्रादिकांनी बांधून अंगाचा घाम काढावा.

**दुसरा प्रकार**—ग्राम्यमांस, जलचरांचें मांस, जीवनीयगणाची औषधें गायींचें दही, कांजी, सज्जीखार, जवखार, बांगडखार, कुळीथ, उडीद, गहूं, आळशी, बडीशेप, देवदार, निर्गुडी, कडू जिरें एरंडमूळ, एरंडबीज, रास्ना, मुळा, शेवगा, बाळांतशेपा, पिंपळी, रानतुळस, पंच लवणें, दाळिंब, चांदवेल, आस्कंद, चिकणामूळ, दशमुळें, गुळवेल व कुहिरीचें बीज ही सारी औषधें किंवा यथालाभ यांतून जी मिळतील ती मिळवून अर्धवट कुटून थोडी उष्ण करून फडक्यांत पोतंडी बांधून त्या पोतंडीनें रोग्याचें अंग शेकावें, तेणेंकरून साऱ्या वायूच्या पीडा दूर होतात. याला माहाशाल्वन प्रयोग असें ह्मणतात.

---

१—त्या घागरीचे तोंडाला बंद करून ती घागर जळजळीत निखाऱ्यावर ठेवावी तेणेकरून त्या नळीवाटे धूर बाहेर चांगला निघतो २—सुरती एरंड, रुई, निर्गुडी इत्यादिकांचीं पानें वातहारक जाणावीं. ३—कोंबडे, बोकड इत्यादिकांचें मांस, ४—कासव, चक्रवाक, मासे इत्यादिकांचें मांस. ५—काकोली, क्षीरकाकोली, जीवक, ऋषभक, मेदा, महामेदा, हरणवेल, जेष्ठमध, रानमूग, रानउडीद, यांना जीवनीय गण ह्मणतात

**द्रव घामाचा विधि**—दशमूळादि वायुहारक औषधांचा काढा करून रोग्याच्या अंगाला तूप अथवा तेल लावून त्याला मोठ्या कढईत अथवा मोठ्या ताठ्याच्या भाड्यांत बसवून तो काढा ऊन ऊन अंगाला सहन होईल अशा बेतानें त्या मनुष्याचे खांद्यावर त्या काढ्याची धार धरावी. ती धार बेंबीच्या सहा अंगुळांवर काढा चढेतोंपर्यंत धरावी. याप्रमाणें तेलाची अ० तुपाची अ० दुधाची धार धरून मनुष्य घर्मयुक्त करावा. याप्रमाणें एका दिवसाआड अथवा दोन दिवसांआड करावें, तेणेंकरून शिरांच्या मुखावाटें व रोमांच्या छिद्रावाटें व नाडीवाटें ते स्नेहाचे पदार्थ शरीराच्या अभ्यंतरी प्रविष्ट होऊन शरीराला तृप्त करून बल उत्पन्न करितात. याविषयी दृष्टांत—झाडाचे मुळाला पाणी घालून घालून जशी झाडें वाढतात तशी तेलादिकात बसविल्यानें मनुष्याच्या रसादि सप्त धातू वाढतात. आणि वायूचा नाश होतो. या उपायापेक्षां वायुनाश होण्याविषयी दुसरा उपाय नाहीं. हा उपाय पराकाष्ठेचा आहे असें जाणावें.

**घाम केव्हां पुरे करावा तो**—अंगातील शूळ व थंडी यांचा शम झाला असता व अग्नि प्रदीप्त झाला असता व अंगाला मृदुपणा आला असता रोग्याचे अंगाचा घाम पुढें बंद करावा.

**घाम काढल्यानंतर उपचार**—ज्या मनुष्याचे अंगाचा घाम काढिला आहे त्यास व ज्याचे अंगाला तेल लाविलें आहे त्यास हलके हलके उष्ण पाण्यानें स्नान घालावें व स्निग्ध कफकारक पदार्थ खावयास देऊं नये व परिश्रम करूं नये. थोड्या वेळांत पचन होणारें अन्न द्यावें.

---

## दोषसंचयावर योजना.

आपल्या स्थानींच दोषांचा संचय होऊं लागला असता कोठ्यामध्यें स्तब्धता, अग्निमांद्य, अगाला, जडता, पिवळेपणा व आळस हे विकार होतात. दोषाचा संचय झाला असतां अन्नद्वेष होतो. संचयकाळींच दोषाला पाडून टाकिलें असतां पुढें ते गति करीत नाहीत, परंतु तेच अस्थानी गेले असतां बलवत्तर होतात. यास्तव प्रथम ओकारी व ढाळक देऊन त्याना पाडून टाकावें. शरदऋतु वसंतऋतु, व वर्षाऋतु यांचेठायीं मनुष्यास वमन आणि रेचन हीं अवश्य द्यावीं. तेणेंकरून प्रकृति साफ राहते. आमाशयगत रोगास वमन व पक्वाशयगत रोगास विरेचन द्यावें, म्हणजे मोठें हितावह होतें.

---

## वमनविधि.

॥ शरत्काले वसंतेच प्रावृटकालेच्च देहिनां ॥ वमनं रेचनं चैव कारयेत्कुशलोभिषक् ॥

**अर्थ**—शरदृऋतु वसंतऋतु व वर्षाऋतु यांचेठायीं मनुष्याना वमन आणि विरेचन ही कुशल वैद्यांनी द्यावी. ह्मणजे प्रकृति चांगली राहते.

**ओकवावयास योग्य रोगी**—बळवंत मनुष्य, कफ रोगानें व्याप्त आहे तो, लाळ गाळतो तो, ओकारीची संवय आहे तो, स्वस्थचित्ती, विषदोषानें व्याप्त, स्तन्यरोग, अग्निमांद्य, श्लीपद, अर्बुद, हृद्रोग, कुष्ठ, विसर्प, परमा, अजीर्ण, विदारिका[1] अपची, कास, श्वास, मळमळणे, पीनस, अंडवृद्धि, अपस्मार, नवज्वर ( तरुण किंवा सामज्वर ) रक्तातिसार, नासापाक, तालुपाक, ओष्ठपाक, कर्णस्राव, द्विजिव्हक[2], गलशुंडे[3], अतिसार, राजयक्ष्मा, कफपित्त, मेदोरोग व अरुचि, अधोगामी रक्तपित्त, ग्रंथी, उर्ध्वभागातील रोग ह्मणजे डोळे, नाक, कान तोंड इत्यादिकांचे रोग, इतक्या रोग्यांस ओकारीचें औषध देऊन ओकवून दोष दूर करवावे.

**ओकवावयास अयोग्य रोगी**—तिमिररोग ( डोळ्याचा रोग ) गुल्म, उदररोग[5], गर्भिणी, स्थूल मनुष्य, कृश, अतिवृद्ध, उरःक्षतेंकरून व मेदेंकरून पीडित मनुष्य, रुक्ष म्ह० निस्तेज, बालक, क्षुधित, निरूहबस्ति दिलेला, उदावर्तरोगी, ऊर्ध्वरक्ती[6], ओकारी सहन न होणारा, निवळ वायूचा रोग आहे तो, पांडुरोग, कृमि ज्यांचा कंठस्वर फुटला आहे तो, सदा दुःखी, दुर्बळ, ऊर्ध्ववात म्ह० उचकी वगैरे मूत्राघात, मूळव्याध, भ्रम[7], ज्यास लवकर वमन लागू होत नाहीं तो, इतक्या प्रकारच्या मनुष्यांस ओकारीचें औषध देऊं नये, जर हे रोगी अजीर्णेंकरून किंवा विषदोषेंकरून किंवा कफेंकरून पीडित असले तर त्याना जेष्ठीमधीचा अथवा मोहाचे सालीचा काढा पाजून ओकवावें. ह्मणजे या काढ्यापासून त्रास न होतां दोष पडून जातील. परंतु अति नाजूक, अति कृश, बाल, वृद्ध व भित्रा या पांचा मनुष्यांस तर ओकारीचें औषध मुळींच देऊं नये ह्मणून पुनः त्यांची नावें सांगितलीं आहेत.

**ओकवावयास साह्य पदार्थ**—ज्या मनुष्यास ओकवावयाचा असेल त्यास पहिल्यानें पोटभर यवागू पाजावी अथवा दूध, ताक व दही पोटभर प्यावयास द्यावी व प्रकृतीला भावत नाहींत असे पदार्थ व कफकारक पदार्थ खावयास देऊन मनु-

---

१—प्रमेहपिटिका क्षुद्ररोग, आडसधी म्हणजे काख वगैरे ठिकाणीं जी गाठ येते ती. २—गडमालेचा भेद आहे ३-पोटात नागीण ह्मणुन एकप्रकारचा रोग होतो तो ४—तालुरोग.

५—यात प्लीहा, यकृत् अष्ठीला वगैरे जितके रोग उदरात होतात तितक्याचा समावेश होतो ६—रक्तपित्ताच्या कोपेंकरून ऊर्ध्व ज्याच्या मुखादिवाटे रक्त पडतें तो ७—पूर्वीचे ग्रंथात भ्रमावर ओकारीचें औषध द्यावें असा पाठ आढळता परतु वाग्भटाचे असें मत आहे कीं, भ्रम झालेल्या मनुष्यास ओकारीचे औषध देऊ नये व तोच पाठ बहुमतानें पसत झाल्यामुळे येथें घेतला आहे असें जाणावे.

ण्याचे दोष उच्चळवावे. नंतर ओकारीचें औषध द्यावें, ह्म० तो चांगला ओकतो. ज्यानें घृतपान केलें आहे त्या मनुष्यास एक दिवसानंतर ओकारीचा प्रयोग केला असतां उत्तम प्रकारचा ओकतो. जितके ह्मणून ओकारीचे प्रयोग आहेत, तितक्यांमध्यें सैंधव अथवा मध याचें मिश्रण करावें; ह्म० हितकारक होतें. व विभिच्छ वमन द्यावें. व पूर्वेस तोंड करून औषध द्यावें.

**ओकारीचे औषधाचें प्रमाण**—काढ्याची सर्व औषधें मिळून १६ तोळे घेऊन थोडी कुटून त्यात ४ शेर [ २५६ तोळे ] पाणी घालून अर्धें पाणी राहीतोंपर्यंत काढा करून ओकारी होण्याविषयी प्यावयास द्यावा. अर्थात् २ शेर एकदम पिवविला जाणार नाही. करितां प्रथम जितका पिववेल तितका प्यावा. व ओकारीचे मधून मधून थोडा थोडा पीत जावा. कल्क, चूर्ण व अवलेह इत्यादि देणें झाल्यास बलावल पाहून देत जावीत. रोग्याचा जीव फार घाबरा होईल इतके फार औषध त्यास देऊं नये.

**शोधन देण्याचें कारण**—शोधन देण्याचे कारण असे आहे कीं, शरीरांत कुपित झालेले वात, पित्त आणि कफ हे दोष जर लंघन आणि पाचन देऊन शमविले तर शरीरांत त्या दोषाचें बिजारोपण असल्यामुळें कांहीं काळानें पुनः कुपित होतात. परंतु जे दोष शोधन देऊन शरीरांतून एकदां काढून टाकले त्यांचा पुनः प्रकोप होत नाही. त्या शोधनाचे प्रकार ३ आहेत. केवळ कफाचा कोप झाला असता किंवा ज्या संयोगामध्यें कफ जास्ती आहे अशा २ दोषांचा किंवा ३ दोषांचा संयोग कुपित झाला असता वमनरूप शोधन द्यावें. तसेंच केवळ पित्त कुपित झालें असतां किंवा पित्त जास्ती असून इतर दोषांचाही कोप झाला असतां विरेचन [तीक्ष्ण रेच] रूप शोधन द्यावें. तसाच केवळ वायूचा किंवा वात जास्त अशा इतर दोषांच्या संयोगाचा कोप झाला असता बस्ति द्यावा; परंतु अगोदर कोठा स्निग्ध करावा

**ओकून पाडावयाचीं औषधें**[3]—कफ अधिक असता पिपळी; गेळफळाच्या

---

१—ओकारीचे औषधामध्यें तूप मिश्र करून वमन द्यावें त्याला बिभिच्छवमन ह्मणतात २—ओकावयाचे औषधाचें मान ४८६, ३२४ आणि १६२ तोळे अनुक्रमें मोठी मध्यम व कनिष्ठ काढ्याची मात्रा जाणावी व कल्क, चूर्ण व अवलेह बारा, आठ व चार तोळे ही मोठी, मध्यम व कनिष्ठ मात्रा आहे ह्मणून पूर्वीच्या ग्रथकारानीं सागितले आहे परतु प्रस्तुत कालमानाच्या सबधानें पाहिलें असता इतक्या मोठ्या मात्रा मूळच घेवविल्या जाणार नाहींत व त्यास सोसणारही नाहींत करिता अल्प प्रमाणानें सहन होतील अशाची योजना करावी

३—वमन देण्याचे आदले दिवशीं मासे, उडीद तीळ, वगैरे कफकारक पदार्थ, खावयास देऊन रात्रीं जागरण न होऊ देता दुसरे दिवशीं सकाळीं अन्न चागलें जिरल्यावर अनशापोटीं किंवा स्नेह चागलें झाले नसल्यास किंचित् घृतयुक्त, भाताची पेज पाजून किंवा बालवृद्ध अशक्त, षढ व भित्रे याना त्या त्या रोगाप्रमाणे मद्य, उसाचा रस, दूध किंवा मासरस आकठ पाजून त्या त्या विकाराला योग्य असें जें वामक औषध कोठ्याच्या तारतम्यानुरूप द्यावें जसें रेचकाचें औषध घेतले असता मधून मधून ऊन पाणी प्याले असता रेच साफ होतात. त्याचप्रमाणें वमनाचेठायीं कफावर

-आंतील बीज, सैंधव यांचें समभाग चूर्ण करून तें सहन होईल अशा मानानें कोंबट पाण्यांत मिळवून प्राशन केलें असतां ओकारीबरोबर कफ पडतो. पित्तदोषाचेठायीं कडूपडवळ, आडूळसा व कडूनिंब याच्या पानांचें समभाग चूर्ण करून थंड पाण्यांत घालून प्राशन केलें असतां ओकारीबरोबर पित्त पडतें. कफ व वायु या दोन दोषांची पीडा असतां नुसत्या गेळफळाच्या बियांचें चूर्ण दुधांत मिश्र करून प्राशन केलें असतां ओकून कफवायूची पीडा दूर होते. अजीर्णाचेठायीं नुसत्या सैंधवाचें चूर्ण कोंबट पाण्यात मिश्र करून प्राशन केले असता ओकून अजीर्णाचे दोष दूर होतात. प्रकार २ रा—मद्य, दूध, उसाचा रस किंवा मासरस पोटभर ह्मणजे आकंठ प्राशन करून नंतर गेळफळाच्या आंतील गोळे, वेखंड व सैंधव यांचें समभाग चूर्ण ऊन पाण्याशी प्राशन करावें. नंतर मळमळ सुटूं लागली म्ह० मुखात बोटें घालून मागेंपुढें सारून वमन करावें; म्ह० मनुष्य चांगला ओकतो. घशांत नखें न लागतील अशी साफ बोटें असावीत.

**ओकारीचे वेगाचें प्रमाण**—ओकारीचें औषध दिलें असतां सात वेगापर्यंत सारे दोष पडून आठव्या वेगास पित्त पडलें असतां ते उत्तम वेग जाणावे. सहावे वेगाचेठायीं पित्त पडलें असतां मध्यम व चवथे वेगाचेठायीं पित्त पडलें असतां कनिष्ठ वेग जाणावे.

**ओकविण्यास बाह्य उपचार**—मनुष्यास ओकारीचें औषध देऊन भुईला गुडघे टेंकून बसवावा आणि एरंडाचें मूळ बारीक व लांब असेल असें घेऊन तें स्वच्छ करून नंतर तोंडात घालून कठाला स्पर्श होईतोंपर्यंत हलके हातानें पुढें मागें सारावें. याप्रमाणें मागेंपुढें सारून वैद्यांनी मनुष्य ओकवावा. व रोग्याचे कपाळाचेठायीं व दोन्ही कुशींचेठायीं हलके हातानें चोळावें. व बेंबीवर व पाठीवर हात ठेवून वर दाबावें. वाति होतेवेळी रोग्याच्या मस्तकाच्या दोन्ही कानसुळांवर दोन हात ठेवून दुसऱ्या मनुष्यानें मागाहून मस्तक थोडे दाबावे. ह्मणजे ओकताना कष्ट होत नाहीत.

**ओकारी फार झाल्याचा प्रकार**—ओकारी फार झाली असता तहान लागते, उचकी व अंग जड होतें, सज्ञेचा नाश होतो, जिभ वांकडी पडते, डोळे

---

मागील पृष्ठावरून पुढें चालू

तीक्ष्ण, उष्ण व तिखट, पित्तावर मधुर व शीत व वाताश्रित कफावर स्निग्ध, आंबट व खारट असे मधून मधून वमन औषध द्यावें पित्त पडेपर्यंत किंवा सुटून जाईपर्यंत वमन करावे. वातीचा वेग अगदींच कमी झाल्यास पिंपळी आवळकठी, शिरस व सैंधव ह्याचा कल्क उष्ण पाण्याबरोबर पिऊन वारवार ओकवावें वाति मूळच न होणें, अडखळत होणें, किंवा ओकून नुसते औषधच पडणे याला वातीचा अयोग म्हणतात त्याच्या योगाने लालास्राव, मळमळणें, कष्ट शरीरावर गाधी उठणे व ज्वर इ० विकार उत्पन्न होतात

१ वमन पक्क होण्यापूर्वीच दोष काढून टाकते व विरेचन पच्यमान, अवस्थेत दोष काढून टाकतें. यास्तव वमनाच्या परिपाकाची वाट पाहू नये

ताठून चंचळ होतात अथवा भ्रम पडतो, हनुवटीचा स्तंभ होतो अथवा पीडा होते, तोंडावाटें लाळ फेंस किंवा रक्त पडतें, वारंवार थुंका येतो, हृदयास व कंठास पीडा होते, शिवाय निरनिराळया रंगाचे तारे दृष्टीस पडतात. कृशता. दाह, कंठशोप, अंधेरी, घेरी, [ चक्कर ] दारुण वातरोग व रक्ताचा स्राव झाल्यामुळें मरणही येतें. व अंगावर गाधी येऊन क्षणामध्यें नाहीशा होतात, त्यांना कंडू असून त्या तांबूस वर्ण असतात

**ओकारी चांगली झाल्याचीं लक्षणें**--हृदय, कठ व मस्तक याचेठायी जे कफादिक दोप असतात ते दूर होऊन त्याची शुद्धि होते, अग्नि प्रदीप्त होऊन अंग हलकें होतें व कफ आणि पित्त दोप हे दूर होतात. आणि त्या प्राण्यास अधिक निद्रा, झापड, तोंडास दुर्गंधी, कंडू, संग्रहणी, व विपदोप हे उपद्रव कधीही होत नाहीत व मन प्रसन्न होतें.

**ओकारी फार झाली असतां उपाय**--ओकारी फार झाली असतां हलकें ढाळक द्यावें. ओकून ओकून जीभ आंत गेली असता मनाला प्रिय असे आंबट, तिखट गोड, खारट असे पदार्थ व तूप आणि दूध हे भाताबरोबर खावयास द्यावें व त्या रोग्याचे पुढें दुसऱ्या मनुष्यानें निंबू, नारिंग, अथवा चिंच त्याला दिसे अशी चोखून खावी ह्मणजे रोग्याचे जिभेला पाणी सुटून ती ठिकाणी येऊन प्रकृति स्वस्थ होते. ओकून जीभ बाहेर आली असता मराठे तीळ व द्राक्षे [ मनुका ] याचा कल्क करून जिभेस लेप करून जीभ आंत न्यावी. ओकून डोळे ताठले असतां त्याच्या डोळयाना हलक्या हातानी तूप लावून डोळे ठिकाणी आणावे ओकून हनुवटीचा स्तभ झाला असतां सर्व अंगाचा घाम काढावा; व कफ वायुहारक नाकात औपध घालावें. ओकून ओकून रक्त ओकूं लागला असता रक्तपित्तावरील उपाय करून रक्ताची वाति बंद करावी. ओकून ओकून फार तहान लागली असता आंवळकठी, रसांजन, वाळा, साळीच्या लाह्या, रक्तचंदन, काळा वाळा या औषधाचा मंथ करून त्यात तूप, मध व साखर घालून प्यालें असता ओकारीपासून तृषादिक जे उपद्रव होतात, ते दूर होतात.

मूग व साटके तांदूळ चार चार तोळे घेऊन एक शेर पाणी घालून कढवून किंचित् घणसर पेजेसारखें करावें. त्याला यूष ह्मणतात. याचप्रमाणें हरणादिकाचे मांसांचा यूष करून देणें. मग सध्याकाळी किंवा दुसरे दिवशी सकाळी सोसेल अशा उष्ण उदकानें स्नान करून भूक लागली ह्मणजे तांबड्या साटक्या साळीचा भात खाऊन पेयादि क्रम चालवावा. तो असा की उत्तम, मध्यम व कनिष्ठ प्रतीचे वमन घेतल्यावर रोग्यानें पेया( पेज ) विलेपी, फोडणी दिलेला किंवा फोडणीवांचून तयार केलेला यूप किंवा मासरस याचें अनुक्रमेंकरून तीन तीन, दोन दोन व एकेक वेळ सेवन करावे. अशा पेयादिकांचा क्रमानें उपयोग केल्यानें अग्नि चागला प्रदीप्त होऊन तो सर्व प्रकारच्या अन्नाचें पचन करितो. याप्रमाणें शुद्ध वाति

झाल्यावर पुनः स्नेह, स्वेद विधि करून कफकाल निघून गेल्यावर कोठ्याच्या, रुक्षारुक्षतेचा चांगला विचार करून रेचक द्यावें.

॥ वमने मदनं श्रेष्ठं त्रिवृन्मूलं विरेचने ॥ नित्यमन्यस्य तु व्याधिविशेषेण विशिष्टता ॥

अर्थ—वांतीविषयीं गेळफळ व रेचकाविषयीं निशोत्तर हीं साधारण सर्वकाळ उत्तम औषधें आहेत. परंतु निरनिराळ्या रोगाच्यासंबंधानें मात्र दुसरी औषधें उत्तम आहेत असें जाणावें. वांतीविषयीं राजविलासी व कष्ट न देणारे असे प्रयोग सांगतों.

**गेळफळ**—गेळफळाच्या झाडावरील उत्तम पक्क जाहलेलीं फळें उन्हाळ्यांत आणून ओल्या फडक्यांनीं पुसून दर्भांनी किंवा गवतांनी गुंडाळून त्याजवर शेणाचा लेप द्यावा. वाळल्यावर तो गोळा धान्याचे राशींत पुरून ठेवावा. नंतर आठ दहा दिवसांनीं तो बाहेर काढून आंतील फळें काढावीं ह्मणजे त्या फळास मद्यासारखा गोड वास येऊन ती मऊ होतात. अशीं जाहलेलीं पाहून उन्हांत वाळवावींत. नंतर फोडून आंतील बिया काढून घ्याव्या. नंतर, दहीं, मध, तूप, व तिळकूट यांत त्या चांगल्या घोळसून उन्हात वाळवून काचेच्या कुपींत बंद करून ठेवाव्या. नंतर त्या बिया जितक्या पाहिजेत तितक्या घेऊन चूर्ण करून रात्रीं जेष्टीमध, भोंकरीची साल, तोंडली, कळंत्र किंवा पांढरा आघाडा यांपैकीं एकाचे काढ्यांत भिजत घालून ठेवाव्या. सकाळीं त्याच काढ्यात चागल्या वाटून गाळून बलाबल पाहून पिण्यास द्याव्या, ह्मणजे बिलकूल इजा न होतां फार चांगली वांति होते. कफज्वर, पडसें, गुल्म, अंतरविद्रधि या रोगांवर पित्त पडूं लागेपर्यंत पुन्हा औषध देऊन ओकवावें. किंवा त्या गेळफळाचे बियांचे चूर्णास त्याच्याच काढ्याच्या पांच चार भावना देऊन त्यात तिसरा हिस्सा त्रिफळ्याचें चूर्ण घालून वरील काढ्याबरोबर, ज्वर, अरुचि, लालास्राव, ग्रंथी, अपची, अर्बुद, उदर, हे रोग जाहलेल्या मनुष्यानें प्यावें. उरात जळजळत असतां, किंवा अधोगत रक्तपित्तावर, त्या बिया घालून शिजविलेलें दूध किंवा त्या दुधांत केलेली तांदुळाची कण्हेरी प्यावी, ह्मणजे इजा न होतां वांति होऊन जळजळ राहते.—कफ, वांति, लालास्राव, व तमकश्वास, या विकारांवर त्या बियांनी सिद्ध केलेल्या दुधाच्या दह्याची निवळ किंवा दहीं द्यावें.—गेळाच्या झाडाची फुलें व फळांतील बीज यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून तें चूर्ण पाण्यांत भिजलेल्या फुलांच्या गजऱ्यावर टाकावें त्यास तें चिकटलें ह्मणजे त्याचा वास घ्यावा. पूर्वीं भाताची पेज किंवा मांसरस पोटभर पाजावा. नतर गजऱ्याचा वास घ्यावा, ह्म० वांति होते. हा उपाय नाजूक मनुष्यास फार हितावह होतो. कारण त्यास कोणतेच प्रकारची इजा व त्रास न होतां सुखानें वांत्या होऊन सर्व दोष निघून पडतात. फळें न मिळाल्यास, फुलें किंवा कोंवळी फळें आणून त्यांचें चूर्ण करून वरप्रमाणें योजना करावी.

**देवडांगरी**—देवडांगरीचीं फळें व अशा प्रकारचीं जी वामक औषधें आहेत त्यांची योजना गेळफळाप्रमाणें केली असतां त्याप्रमाणें गुण होतात. परंतु दे-

वडांगरीचीं फळें विशेषतः ताप, खोकला, दमा, उचकी, वगैरे रोगांवर द्यावींत, फुलें असल्यास त्या फुलांनीं सिद्ध केलेलें दूध द्यावें. फळें आल्यावर त्यांनीं सिद्ध केलेल्या दुधाची कण्हेरी द्यावी. फळावर कुसें म्हणजे काटे आले असतां सिद्ध केलेल्या दुधाची साय व तीं कुसें आली नसल्यास त्यांनी सिद्ध केलेल्या दुधाच्या दह्याची निवळ किंचित् हिरवट, व पिवळट झाली, ह्मणजे त्यांनीं सिद्ध केलेल्या दुधाचें आंबट दही द्यावें, ह्मणजे कफापासून जाहलेली अरुचि, खोकला. पांडुरोग, व क्षय यांना हित करितें.

**कडूदुध्याभोपळा**—कडूदुध्याभोपळा, कडू घोसाळी, कडू दोडकी, यांचे-ही वरील गेळफळाप्रमाणें तऱ्हतऱ्हेचे प्रकार करावे.—चांगली पक्व होऊन सुकले-ल्या देवडांगरीच्या फळाचें एक तोळा चूर्ण, वायु, पित्त, यांनी पीडित जाहलेल्या रोग्यानें दुधाबरोबर प्यावें किंवा दोन अथवा तीन फळें कडू निंबाच्या अथवा कडू पडवळीच्या काढ्यात वाटून तो काढा गाळून प्यावा—किंवा बाहव्याच्या काढ्यांत रात्रीं भिजत घालून सकाळीं कुसकरून गाळून तो काढा प्यावा. हे काढे पित्तकफ ज्वरावर हितावह आहेत.—देवडांगरीच्या फळांचा कल्क किंवा चूर्ण पित्तज्वरावर थंड पाण्यांत व कफवातज्वर व नुसता कफज्वर यावर ऊन पाण्यांत द्यावें—कास, श्वास, विष, वांति व ज्वर यांनीं पिडलेल्या व कफानें बेजार झालेल्या मनुष्यास व ज्याचे डोळ्यांपुढें वरचेवर आंधेरी येते त्यास वाती होण्याकरितां कडू दुध्या भोप-ळ्याचें प्रयोग उत्तम आहेत.—ज्या दुध्या भोपळ्याला फळें व फुलें आली नाहींत त्याच्या कोंवळ्या पाल्यांनी सिद्ध केलेलें दूध पित्ताधीक, पित्तकफज्वरावर द्यावें.—त्याच्या चांगल्या फळांतील गीर काढून त्यात दूध विरजावें त्याचें दही जाहलें ह्म-णजे, तें कफजन्यकास, श्वास, व वांती याजवर योजावें. पांडुरोग, कुष्ठ, व विष यांनी पिडलेल्या मनुष्यानें त्यांतील गीर दह्याचें निवळीबरोबर प्यावा. किंवा त्यांनी सिद्ध केलेलें ताक, मध व सैंधव घालून द्यावें. त्याच्या बियास शेळीच्या दुधाच्या पांच चार भावना देऊन त्याचें चूर्ण विष, गुल्म, उदर, ग्रंथी, गंडमाळा, व श्लीपद या रोगावर त्याच दुधाबरोबर प्यावें. कडू दुध्याच्या रसाच्या सातू-ला पाच चार भावना देऊन त्या सातूचा मंथ कफज्वर, कफकास, कंठरोग व अ-रुची यावर द्यावा. फार दिवसांचा गुल्म, व फार दिवसाचा ज्वर यावर त्याचा कल्क मांसाच्या सुर्व्याबरोबर प्यावा यानें वाती होतांना बिलकुल त्रास होत नाहीं. व मनुष्य अशक्त होत नाहीं. ज्यास फुलाचा वगैरे वास घेण्याचा अभ्यास आहे व जो सुखी व नाजूक असा आहे त्यानें कडू दुध्यांतील गीर व फुलें यांच्या चूर्णात घोळलेल्या फुलाच्या गजऱ्याचा वास घेऊन ओकावें ह्मणजे सुख होतें.

**कडूघोंसाळीं**—खोकला, गुल्म, उदर, कृत्रिम विषजन्य विकार, कफस्था-नगत वायु, कंठगत आणि मुखगत कफ व कफाच्या संचयापासून जाहलेले मोठ-मोठे रोग यावर कडू घोंसाळीची योजना करावी.—तोंडलीच्या, पुनर्नव्याच्या किंवा कासविंद्याच्या रसात एकएक किंवा दोन दोन कडू घोसाळीं कुसकरून प्यावीं.

किंवा त्यांनी सिद्ध केलेल्या दुधांतील तूप किंवा गेळफळादिकांनीं सिद्ध केलेलें तूप प्यावें. हें तिन्हीही प्रयोग उन्मादावर प्रशस्त आहेत.

**कडू दोडकीं**—हीं फार कडू तिक्ष्ण व उष्ण असल्यामुळें, तीं कुष्ठ, पांडुरोग, प्लीहा, सूज, गुल्म, व कृत्रिम विष, इत्यादि रोग शरीरांत मुरलेले असल्यास त्याजवर द्यावीत याचे प्रयोग वामक औषधाचे काढ्यांत योजून घ्यावे.

**इंद्रजव**—नाजूक मनुष्यास, पित्तात्मक, कफात्मक, रक्तात्मक ज्वर, विसर्प, हृद्रोग, वातरक्त, व कुष्ट या विकारावर इंद्रजव द्यावे. शिरसाचा काढा, जेष्टीमधाचा काढा, सैंधव घातलेलें पाणी, किंवा खिचडी, यांबरोबर इंद्रजवाचें चूर्ण सेवन करावें. किंवा इंद्रजवाचे चूर्णास सात दिवस रुईच्या चिकाच्या भावना देऊन तें चूर्ण गेळफळ, देवडांगरी, कडू दुध्या, यांपैकी एकाच्या काढ्याबरोबर प्यावें. ह्मणजे सुखानें वांत्या होतील.

**सूचना**—वामक औषधांतील मुख्य औषधाच्या योगानें हे वरील प्रकार करून दाखविले आहेत हे मूळ धरून याच्याच आधारानें बुद्धिमान् वैद्यानें दुसरेही प्रयोग तयार करावे.

**ओकारीचे ठायीं पथ्य**—साटक्या तांदुळाचा भात, तूप, सैंधव, मुगाच्या दाळीचें वरण, किंवा मुगाचा यूष, किंवा मासरस ( धान्यादिकाचे यूषाप्रमाणें तयार करितात तो ) याजबरोबर साटक्या तांदुळाचा भात सेवन करावा. हें पथ्यास देणें तें ओकारी होण्याची बंद झाल्यावर किंवा तिसराप्रहरचे वेळीं द्यावें.

**ओकारीचे ठायीं अपथ्य**—जड पदार्थ, थंड पाणी, परिश्रम, मैथुन, अंगाला तेल लावणें व रागें भरणें हे विपय ज्या दिवशीं ओकारीचें औषध द्यावें. त्या दिवशीं वर्ज करावें.

---

## रेचनविधि.

॥ शरदृतौ वसंतेच देहशुध्यै विरेचयेत् ॥ अन्यदात्ययिके काले शोधनंशालियेद्बुदः ॥

**अर्थ**—शरदृऋतु व वसंतऋतु याचे ठायी शरीराच्या शुद्धीकरितां मनुष्यास ढाळक द्यावें ह्मणजे देहाची शुद्धि होऊन शरीर चांगलें होतें. उक्तकालाशिवाय दुसरे कालाचे ठायी रोग उत्पन्न झाला असतां त्याकालीही वैद्यानें विचार करून ढाळक द्यावें. पूर्वीं मनुष्याला स्निग्ध करावा ह्मणजे अल्प स्नेह पाजावें. नंतर त्याचें अंगाचा घाम काढावा. नंतर वांति करून ह्मणजे ओकवून उत्तम प्रकारचें विरेचन ह्मणजे तीक्ष्ण रेचन द्यावें. घृतदुग्धादिक स्नेह द्रव्ये पूर्वी प्राशना-

१—वमनानतर ढाळक केंव्हा द्यावे अशी शका प्राप्त झाली असता ग्रथकार भेड, चरक,

स-देऊन मनुष्या [illegible] स्निग्ध केला आहे तो व मातीचा गोळा किंवा विटकर आदि-करून उपायानें अंगाचा घाम काढला आहे अशा मनुष्यास ढाळक द्यावें.

**विशेषेंकरून ढाळक देण्यास योग्य रोग**—पित्तविकार, आमवायु, उदररोग, आध्मान वायु व बद्धकोष्ठ या रोगांचेठायीं विशेषेंकरून ढाळक द्यावें.

**ढाळक देण्याविषयीं जे योग्य ते**—जीर्णज्वर, वचनागादिक विषदोष, वातरक्त, भगंदर, अर्श, पांडुरोग, उदर, ग्रंथी, हृद्रोग, अरुचि, प्रमेह, योनिरोग, गुल्म, प्लीहा, व्रण, विद्रधि, ओकारी, विस्फोट, विषूची, कुष्ठ, कर्णरोग. नासारोग, मस्तकरोग, मुखरोग, गुदरोग, शिश्नाचेठायीं उपदंशादिकरोग, यकृत्, सूज, नेत्ररोग, कोष्ठगतकृमि, सोमल क्षारजन्यविकार, वातरोग, शूळरोग, मूत्राघात, वांग, तिमिर, पोटशूल, शुक्रदोष, वातरक्त, उर्ध्वगामी रक्तपित्त, मलावरोध, इतक्यांतून एकाद्या रोगेंकरून व्याप्त जे मनुष्य ते ढाळक देण्याविषयीं योग्य जाणावे.

**ढाळक देण्याविषयीं जे योग्य नाहीत ते**—बाल, वृद्ध, अति स्निग्ध मनुष्य उरःक्षतेंकरून क्षीण मनुष्य, भयेंकरून युक्त, श्रीमंत, तृषित, स्थूळी, गर्भिणी, नवज्वरी, नूतन बाळंत स्त्री, मंदाग्नि, मदात्यय, शल्येंपिडित, रुक्ष, तरुण ज्वर, गुदपाक अधोगामी रक्तपित्त, अतिसार. क्षय, ज्याना पिचकारी दिली आहे तो. इतक्या मनुष्यांना सुज्ञ वैद्यांनीं ढाळक देऊं नये.

**मृदु, मध्यम व क्रूर कोष्ठांचीं लक्षणें**–ज्या मनुष्याचा कोठा पित्तानें फार व्याप्त आहे त्याचा कोठा मृदु असतो. ज्याच्या कोठ्यांत फार कफ आहे त्याचा कोठा मध्यम असतो. ज्याचे कोठ्यात वायु फार आहे त्या मनुष्याचा कोठा क्रूर ह्मणजे फार जड असतो. त्यास स्वल्प औषधांनीं एकाएकी रेच लागू होत नाहीं ह्मणून क्रूर कोष्ठ ढाळकाविषयीं दुःखदायक आहे; ह्मणजे ढाळक दिलें तरी लवकर लागू होत नाहीं. याकरिता मृदु कोष्ठास मृदु औषध, मध्यमास मध्यम व क्रूर कोष्ठास तीक्ष्ण रेचन द्यावें.

---

मागील पृष्ठावरून पुढें चालू

सुश्रुत व वाग्भट इत्यादिक याचा असा अभिप्राय आहे कीं व मन देऊन सहा दिवस झाल्यानतर मग लागोपाठ तीन दिवस स्निग्ध करावा. नतर तीन दिवस अगाचा घाम काढावा. नतर पुन्हा तीन दिवस लघु भोजन देऊन सोळावे दिवशीं रेचन द्यावे. कोठा स्नेहरहित झाला असल्यास दहा दिवसानीं पुन्हा देहाला स्वेदन व स्नेहपान करवून पहिल्या खपेची चूक किंवा उणीव चागली लक्षात आणून योग्य असेल तें रेचक द्यावे कफावर वमन, पित्तावर विरेचन, व वातावर बस्ति योजावा. साबण व ऊन पाणी याचे योगानें जसा वस्त्रापासून मळ निर्मुक्त होऊन निघून जातो. तसाच स्नेहस्वेदादिकाचे योगानें शरीरापासून मल निर्मुक्त होऊन शोधनानें तो बाहेर काढला जातो वाळलेलें लाकुड जसें लवविलें असता मोडतें, तसेच स्नेहस्वेदनावाचून शोधन दिलें असता शरीरही नाशाप्रत जातें असें जाणावें.

१—काच, नख, केश, काटा, लाकडाची धलपी, पत्रावळीची चोय व अशाच प्रकारची इतर वस्तु शरीरात राहून त्यापासून जो पीडित मनुष्य होतो तो शल्यार्दित जाणावा

**मृदु मध्यमादि कोष्ठांचेठायीं औषधांची योजना**—ज्याचा कोठा मृदु आहे त्यास द्राक्षें ( मनुका ) दूध व एरंडेल ही एकत्र करून ढाळक द्यावें. ज्याचा मध्यम कोठा आहे त्यास निशोत्तर, कुटकी व बाहाव्याचे शेंगेंतला मगज या औषधांचा काढा करून मध घालून द्यावा. ज्याचा कोठा क्रूर आहे त्यास तिधारी निवडुंगाचें दूध, पिसोळा अथवा कांटेधोत्रा, जेपाळबीज, कडुवृंदावनाचें मूळ अशा तीक्ष्ण औषधाची योजना करून ढाळक द्यावें.

**ढाळकाचें प्रमाण**[1]—ढाळकाचे वेग ३० होऊन शेवटच्या ढाळांत कफ पडूं लागला असता ती उत्तम मात्रा जाणावी. २० वेग होऊन कफ पडूं लागल्यास ती मात्रा मध्यम जाणावी. आणि १० वेग होऊन अंती कफ पडूं लागल्यास ती हीन मात्रा जाणावी. त्याचप्रमाणें ढाळक होण्याविषयीं ८ तोळे काढा दिला असतां उत्तम ढाळक, ४ तो० काढा दिला असता मध्यम व २ तो० दिला असतां तें ढाळक कमी जाणावें. कल्क, गोळ्या व चूर्णें ही प्रत्येक मधातुपातून मिळवून ढाळक

---

१ हल्लीं या प्रमाणानें कोणी ढाळकाची मात्रा देत नाहींत फार झालें तर वरप्रमाणें १० वेगांची कनिष्ठ मात्रा देतात. व कोणी कोणी तर ५।४ ढाळ झाले नाहींत तोंच ढाळ सहन होत नसल्यामुळें लागलींच दहींभात किंवा तुपभात खाऊन ढाळ बंद करितात. व झोंप घेतात त्या योगेंकरून ढाळकाचें मान बरोबर लागू न होता पुढें अगास कडू. अगावर फुटकुळ्या येणें वगैरे उपद्रव होतात. करिता बलाबल पाहून ढाळ चांगले होऊं द्यावे. नंतर भोजन करावें एक शेर मल पडला ह्मणजे कनिष्ठ, दोन शेर पडला ह्मणजे मध्यम, आणि तीन शेर पडला असता उत्तम ढाळक जाणावें. हीं पूर्वीचीं जुनाट मानें आहेत ज्याला अशक्ततेमुळें व दोषबाहुल्यामुळें दोषाचा परिपाक होतांच आपोआप रेच सुरु होतात, त्याला रेचकाच्या औषधांच्या ऐवजीं सारक पदार्थ खावयास दिले ह्मणजे झालें. ज्याला अशक्तता कृशता किंवा अल्पच विकार आहेत व ज्याचा कोठा पूर्वीं नुकताच च एकावर शुद्ध केला आहे किंवा ज्याच्या कोठ्याची बरोबर परीक्षा झाली नाहीं त्यास सौम्य व अल्पच औषध द्यावें तेच एकाहून अधिक वेळा दिलेलें बरें परतु एकदम पुष्कळ व मोठें तिव्र रेचक देणें हें धोक्यास कारण होतें दुर्बळ मनुष्याचे दोष प्रचलित असून अल्प असल्यास त्याचें शमन करावें. व फार असल्यास सौम्य रेचक वारवार देऊन त्याचें हळू हळू शोधनच केलें पाहिजे नाहींतर ते नेहमीं त्रास देतात किंवा प्राण घेतात. ज्याचा अग्नि मंद व कोठा जड आहे त्याला पहिल्यानें अग्नि प्रदीप्त करण्याकरितां व कफवाताचा नाश करण्याकरिता क्षार व लवणयुक्त घृतें देऊन मग शोधन द्यावें. ज्याचें शरीर रुक्ष व वात बहुत कोठा जड व अग्नि प्रदीप्त व ज्याना व्यायामाची संवय आहे त्याना विरेचन दिलें असता ते लागू न होता तसेंच जिरतें ह्मणून त्याना पहिल्यानें बस्ति द्यावा किंवा तीक्ष्ण विरेचन औषधानीं युक्त अशी वात गुदद्वारात धारण करण्यास द्यावी व तेणेंकरून थोडी मलशुद्धि करावावी. व मग स्निग्ध रेचन द्यावे याप्रमाणे मलप्रवृत्ति सुरु झाली म्ह० स्निग्ध रेचकाचे सयोगानें मलाचा अनायासानें उत्सर्ग होतो. विष, अभिघात, पिटिका, कुष्ठ, सूज विसर्प, कावीळ, पाडु व मेह हे विकार ज्याना आहेत त्याना विरेचन देण्यापूर्वीं अल्पच स्नेह द्यावें व या सर्वांना स्नेहमय विरेचन म्ह० एरडेल इत्यादिकात द्यावें. व ज्याना स्नेहविधीचा चागला सस्कार झाला आहे त्या सर्वांला रुक्ष रेचक द्यावें. व वमनादि कर्मांच्या मध्यतरीं प्रत्येक खेपेस स्नेहस्वेदाची योजना करावी व सर्व कर्मे सपल्यानतर शक्ति आणण्याकरिता स्नेहाची योजना करावी

होण्याविषयीं द्यावीं अथवा वय व रोग्याचें तारतम्य पाहून दोन किंवा चार तोळे प्रमाण काढा द्यावा.

**ढाळकाचेठायीं औषधं**—पित्ताधिक्य असतां निशोत्तराचें चूर्ण करून द्राक्षाचे[1] रसांत किंवा मनुका याचे काढ्यांत घालून द्यावें किंवा गुलकंदांत द्यावें किंवा गुलाबकळी अथवा वडिशेप इत्यादिकांचे काढ्यांत द्यावें. कफाचा प्रकोप असतां त्रिफळ्याचे काढ्यांत समभाग गोमूत्र घालून चांगलें मिळवावें. नंतर त्यांत त्रिकटूचें चूर्ण घालून द्यावें; ह्मणजे त्या योगेंकरून ढाळकाबरोबर सर्व कफ पडून जातो. जो मनुष्य वायूनें पीडित आहे त्याला निशोत्तर, सैंधव व सुंठ यांचें चूर्ण करून त्यास निंबूरसाची पुटें देऊन तें चूर्ण द्यावें किंवा पुटें न देतां तें चूर्ण अरण्यसंबंधी हरणादिकाचे मांसरसांत ह्म० त्या मांसाचा यूप करून त्यांत तें चूर्ण घालून ढाळक होण्यास द्यावें. एरंडेल तेलाचे दुप्पट त्रिफळ्याचा काढा आंत मिळवून त्यात मध घालून एकजागीं करून प्राशनार्थ द्यावें किंवा एरंडेल तेल दुधात मिश्र करून द्यावें. तेणेंकरून ढाळ लवकर होतात.

**ऋतुभेदेंकरून ढाळकाची योजना**--निशोत्तर, इंद्रजव, सुंठ, व पिपळी, यांचें चूर्ण द्राक्षाचा रस व मध यांत मिळवून ढाळक होण्याविषयी वर्षाऋतूंत द्यावें. निशोत्तर, धमासा, नागरमोथे, उत्तम पाढरा चंदन व जेष्टीमध या औषधाचें चूर्ण करून द्राक्षाचे रसात किंवा मनुकाचे काढ्यांत मिळवून शरद्कालचेठायीं द्यावें. हें ढाळक शीतल आहे असें जाणावें. निशोत्तर, चित्रकमूळ, पाहाडमूळ जिरें, देवदार वेखंड, पिसोळा, कांटे धोत्रा, यांचें चूर्ण करून उष्ण पाण्यांत घालून हेमंतऋतूचेठायीं द्यावें. पिंपळी, सुंठ, सैंधव, वरधारा, व निशोत्तर यांचें चूर्ण मधांत कालवून शिशिर व वसंतऋतु यांचे ठायी चाटावें. नुसत्या निशोत्तराचें चूर्ण साखरमिश्रित ढाळक होण्याविषयी ग्रीष्मऋतूंत द्यावें.

**सुखेंकरून ढाळ होण्याविषयीं अभयादिमोदक**—हिरडेदळ, मिरे, सुंठ, वावडिंग, आवळकठी, पिपळी, पिपळमूळ, दालचिनी, तमालपत्र, नागरमोथे, हीं दहा औषधें समभाग घ्यावीत. व दांतीचें[2] मुळ ह्मणजे दांतुणीचे मूळ तें तीन भाग निशोत्तर आठ भाग, साखर, सहा भाग, याप्रमाणें भाग घेऊन साऱ्यांचें चूर्ण करून मधांत मिळवून एकेक तोळ्याच्या किंवा ६ मासे वलाबल पाहून गोळ्या कराव्या. मग तो एक मोदक प्रातःकाळाचे ठायी ढाळ होण्याविषयी भक्षण करावा. त्याजवर थोडें थंड पाणी प्यावें आणि जोंपर्यंत ढाळ होतात तोंपर्यंत उष्ण पदार्थांचें सेवन करूं नये, व पान आणि आहार विहार ह्मणजे श्रमादिक यांचेठायी

---

१ ओल्या द्राक्षाचा रस न मिळाल्यास मनुक्याचा काढा करून त्या रसाऐवजीं द्यावा.

२ जेपाळाच्या जातीचें एक प्रकारचे झाड आहे. दांती ही वनस्पति काळे शेतांत असते. जिचें मूळ लहान मुलास दांत निघतात तेव्हा गळ्यात बाधीत असतात. हें झाड मोठें नसतें. मोगली एरंडाप्रमाणें पानें लहान असतात. त्याचे मुळीनें जुलाब होतात.

सर्वकाळ नियमित असावें. तेणेंकरून विषमज्वर, अग्निमांद्य, पांडुरोग, खोकला, भंगदर, कुष्ठ, गुल्म, अर्श, गलगंड, भ्रम, उदर, विदाह, ( पित्तरोग हातापायांचा दाहा होतो तो ) कवळू, प्रमेह, राजयक्ष्मा, नेत्ररोग, वातरोग, पोटफुगी, मूत्रकृच्छ, अश्मरीरोग, व पाठ, पार्श्व, कंबर, मांड्या, पोटऱ्या, उदर यांचेठायीं ज्या पीडा होतात त्या, हे सर्व रोग दूर होतात. या मोदकाला अभयादि मोदक असें ह्मणतात. हा अभयादि मोदक निरंतर सेविला असतां पलित ह्मणजे मनुष्याचे अकाली पांढरे केस होतात ते येणेंकरून काळे होतात. व हा मोदक उत्तम रसायनरूप आहे असें जाणावें.

**नाराचरस**—पारा, टांकणखाराची लाही व मिरी ही सर्व समभाग आणि गंधक त्या तिहींचे समान व सुंठ तीन भाग, जेपाळाचें बीज नऊ भाग, खलांत घालून दोन प्रहर खलून पानांत घालून गोवऱ्यांच्या अग्नीवर थोडें शिजवावें. नंतर काढून ठेवावा. हें औषध एक गुंज घेऊन सुमारें दोन मासे पिठीसाखरेंत मिश्र करून सेवन करावें व वर थोडें थंड पाणी प्यावें ह्मणजे रेच होतात आणि ऊन पाणी प्यालें असता रेच बंद होतात. पथ्य नुस्तें अदमोरें दहीं व भात. बाकी वर्ज्य.

**द्वितीय नाराचरस**—जेपाळबीज, पारा, गंधक, सुंठ. मिरी, पिपळी व टांकणखाराची लाही हीं सर्व समभाग घेऊन बारीक खल करावा. मात्रा दोन गुंजाप्रमाण तूपसाखरेंत द्यावी. वर थंड पाणी प्यावें. ह्मणजे मलसंग्रह, आनाह वायु आमशूळ, वेलाज्वर ह्मणजे अंतकाळींचा मोठा ज्वर यांचा रेचानींच नाश होतो.

**इच्छाभेदीरस**—सुंठ, मिरीं, पारा, टांकणखाराची लाही, व गंधक हीं सर्व समभाग घेऊन व त्या सर्वांचे तिप्पट आत शुद्ध जेपाळबीज, घालून आल्याच्या रसात खल करावा. गोळी गुंजप्रमाण साखरेबरोबर द्यावी व वर थोडें ऊन पाणी प्यावें. ह्मणजे सुखानें रेच होऊन सर्व दोषांचा नाश होतो.

**द्वितीय इच्छाभेदीरस**—पारा, गंधक, सुंठ, मिरी, जेपाळबीज व चित्रकमूळ ही सर्व समभाग घेऊन सूक्ष्म खल करावा. मात्रा एक किंवा दीड गुंज बलाबल पाहून द्यावी. वर थोडें उष्ण पाणी प्यावें, ह्मणजे प्रबल मलाचा नाश होऊन संपूर्ण रोगांचें हरण होईल.

**अन्य उपाय**—हिरडे दळ व पिपळी, हीं समभाग घेऊन त्यांचें उष्णोदकाशीं द्यावें हें रेचन सर्व ऋतूंत श्रेष्ठ असून सर्व दोषांचा नाश करितें. मेढशिंगीचें चूर्ण एक तोळा किंवा सोसेल इतकें घेऊन त्यांत किंचित् सैंधव मिळवून उन पाण्याशीं रात्रीं निजतेवेळीं सेवन करावें. ह्मणजे प्रातःकाळीं सुखानें रेच होतात. शुद्ध पारा १, गंधक २, टांकणखाराची लाही १, मिरी १, सुंठ तीन व शुद्ध केलेलें जेपाळबीज ८, याप्रमाणें भाग घेऊन खलांत घालून सूक्ष्म कज्जली करावी. व गुंजप्रमाण मात्रा घेऊन साखरेंत मिश्र करून सेवन करून वर थोडें कोंबट

पाणी प्यावें. म्हणजे रेच होऊन गुल्म, अष्ठीला, उदररोग व ऊर्ध्ववात यांचा नाश होऊन अग्नि प्रदीप्त होतो.

**ढाळकास साह्य करणारे उपचार**—मनुष्याला ढाळकाची मात्रा दिल्यावर त्याचे डोळ्यांला थंड पाणी लावून डोळे पुसावे. आणि कांहीं एक सुगंध वास घ्यावयास अर्गजादिक द्यावें. व भक्षणास विडा द्यावा, म्हणजे उत्तम प्रकारचे ढाळ होतात.

**ढाळ झाल्यानंतर वागण्याचा प्रकार**—ढाळ झाल्यानंतर वाऱ्यात बसूं नये. मलमूत्रांचा वेग धारण करूं नये. झोंप घेऊं नये. थंड पाण्याला अगदीं स्पर्श करूं नये. शौच्याला देखील कोंवट पाणी नेत जावें व ढाळाचे मधून मधून थोडें कोंबट पाणी वारंवार पीत जावें म्हणजे चांगले साफ ढाळ होतात.

**ढाळाबरोबर जे पदार्थ पडतात ते**—ओकारीचें औषध घेतलें असतां त्यापासून कफ, पित्त व जें औषध घेतलें असेल तें जसें ओकारीवाटे पडतें तसें ढाळक घेतलें असतां त्यापासून पित्त, कफ, मळ व औषध गुदावाटे बाहेर पडतें.

**ढाळ चांगले झाले नसतां जे उपद्रव होतात ते**—ढाळ जर चांगले झाले नाहींत तर मनुष्याचे नाभीचेठायीं स्तब्धता, कुक्षीचेठायीं शूल, मळ आणि वायु यांची अप्रवृत्ति, शरीराचेठायीं कंडू व मंडलें हीं उत्पन्न होतात. व अंगाला जडपणा, दाह, अरुचि, पोटफुगी, भ्रम व ओकारी हे उवद्रव होतात. याकरितां ज्या मनुष्याला चांगले ढाळ झाले नाहींत त्याला आरग्वधादि पाचन देऊन आवेचें पाचन करावें. नंतर त्याला तूप प्यावयास देऊन त्याचा कोठा स्निग्ध करून फिरून दुसरे दिवशी ढाळक द्यावें. तेणेंकरून सारे उपद्रव दूर होऊन जठराग्नि प्रदीप्त होतो आणि अंग हलकें होतें.

**ढाळ फार झाले असतां जे उपद्रव होतात ते**—मनुष्याला फार ढाळ झाले असतां मूर्छा, गुदाचेठायीं पीडा व शूल, हे उपद्रव होतात. कफ फार पडतो,

---

१ उरात व पोटात साफ नसणें, अरुचि, कफपित्ताचा स्वस्थानापासून निर्गम, कडू, दाह, पिटिका, पीनस व वाताचा आणि मलाचा अवरोध, हीं रेचक लागू न झाल्याचीं लक्षणें जाणावीं. यथायोग्य रेच झाल्यावर रोग्याला धुम्रपान खेरीज करून सर्व वमनोक्त उपचार करावे. मग वमनाचे मनुष्याप्रमाणेंच पेयादि क्रम चालवून ७ दिवसानीं नेहमींप्रमाणें जेवण करावें. अग्निमांद्य, अशुद्ध कोठा, व दोषजन्य अशक्तता हे विकार असून ज्यानें रेचक घेतलें आहे त्यानीं ते जिरल्याचीं लक्षणें न दिसल्यास व तो स्वता कृश नसल्यास त्यांनीं लंघन करावें म्ह० तेणेंकरून स्नेह, स्वेद व संशोधन औषध याच्या योगानें दोष स्वस्थानापासून निघून आतल्याआत कोंडून राहिल्यामुळे जे विकार व्हावयाचे ते होत नाहींत संशोधन, रक्तमोक्ष, स्नेहन व लंघन याच्या योगाने अग्नि मंद होतो. यास्तव पेयादिकांची योजना करावी २—हा आरग्वधादि गण औषधीगणांत आहे तो पहावा

व मांसाचे धुवणासारखें व मद्यासारखें व पाण्यासारखें असें गुदावाटें रक्त पडतें. वाग्भटाचार्यांचें ह्मणणें मल, पित्त, कफ व वात यांचा एकामागून एक उत्सर्ग झाल्यावर ह्मणजे निघून पडल्यावर मग श्लेष्मपित्तरहित पांढरें, काळें, मांस धुतलेल्या पाण्यासारखें किंवा चरबीच्या तुकड्यासारखें असें रक्तयुक्त पाणी पडूं लागतें. व गुदभ्रंश, ( कुल्ला बाहेर पडणें ) तृषा, भ्रम, डोळे खोल जाणें हे व अतिवमनापासून होणारे विकार, उत्पन्न होतात. याजकरितां फार ढाळ झाले असतां मनुष्याला थंड पाण्याचें स्नान घालावें, रोगी फार अशक्त असल्यास हातपाय मात्र थंड पाण्यांत कांहीं वेळ बुडवून ठेवावे. व तांदुळाच्या धुवणांत मध मिळवून प्यावयास देऊन हलकी ओकारी करवावी. आळ्याची साल गाईचे दह्यांत बारीक वांटून त्या कल्काचा नाभीचेठायी लेप करावा ह्मणजे ढाळ बंद होतात. नुस्तें शेळीचें दूध प्यालें असतांही ढाळ बंद होतात. नुस्तें तूप पाजलें असतांही ढाळ बंद होतात. साठे तांदुळाचा भात समभाग तूप घालून द्यावा. डाळिंबादिकरून शीतळ व ग्राहक अशा पदार्थांच्या सेवनानेंही ढाळ बंद होतात.

**चांगले ढाळ झाल्याचीं लक्षणें**—देहाला हलकेपणा, चित्ताचेठायीं प्रसन्नता, वायूचें स्थानीं गमन, इ० लक्षणें झाली असतां त्याला चांगले ढाळ झाले असें जाणून त्यास रात्रीचे ठायी पाचन[1] द्यावें.

**ढाळकाचे गुण**—इंद्रियांना बळ येतें, बुद्धि प्रसन्न होते, जठराग्नि प्रदीप्त होतो व धातु आणि वय यांना स्थिरपणा येतो.

**ढाळकाचे ठायीं पथ्य**—ढाळ झाल्यानंतर पथ्यास साळ्या तांदुळांचा भात तुपाबरोबर किंवा दह्याबरोबर सेवन करावा. मुगाची यवागू करून प्यावी. अरण्यसंबंधीं हरणादिकांचे मांसरस, किंवा कोंबड्याचे मांसरस ह्मणजे ह्मणजे यूष करून त्याबरोबर भात खावा. याशिवाय वरकड पदार्थ वर्ज.

**ढाळकाचेठायीं अपथ्य**—ज्या दिवशीं ढाळक घेतलें असेल त्या दिवशीं फार वारा घेऊं नये, थंड पाणी, तैलाभ्यंग, अजीर्णकारक पदार्थ भक्षण धूम्रपान परिश्रम व मैथुन यांचें सेवन करूं नये.

**राजविलासी ढाळकें**—एक चांगला पाण्याचा नारळ घेऊन त्यास भोंक पाडून त्यांत शुद्ध केलेल्या जेपाळाच्या सोललेल्या बिया तोंडापावेतों भराव्या, व आंत पाणी तसेंच असूं द्यावें. नंतर त्याजला लांकडाची बळकट खुंटी मारून त्याजवर मातकापड करून तो नारळ उकिरड्यांत पंधरा दिवस पुरून, नंतर काढावा व त्यांतील नारळाच्या पाण्यासुद्धां खोबरें व जेपाळ एकत्र बारीक वांटल्या नंतर तें एका स्वच्छ कांचेच्या पात्रात भरून ठेवावें. मग जेव्हां रेचक घेणें असेल तेव्हां त्याचा लेप फक्त बेंबीवर करावा; ह्मणजे थोड्या वेळांत ढाळ होऊ लागतात.

---

१ एरंडमूळ, सुंठ व धणे यां औषधांचा काढा करून पाचनार्थ द्यावा.

ढाळ बंद करणें जाहल्यास लेप धुऊन टाकावा ह्मणजे झालें. लेप देणें तो बेंबीचें छिद्र सोडून त्या छिद्राचेसभोंवती चार अंगुळप्रमाण जाड देऊन त्याजवर एरंडाचें अथवा नागवेलीचें पान ठेवून फडक्यानें गच्च बांधावा; ह्मणजे बिलकूल त्रास न होतां सुखानें रेच होतात. हें राजविलासी ढाळक आहे, याचा अनुभव घेऊन पहावा. या कृतीनें नाजूक व सुकुमार मनुष्यास मात्र ढाळ होतात, असें जाणावें.

**प्रकार दुसरा**—उत्तम नवा सुरवारी हिरडा, घेऊन त्याचें वस्त्रगाळ चूर्ण करावें व त्यास प्रथम तिधारी निवडुंगाच्या चिकाची सावलींत सातपुटें द्यावीत. नंतर रेवाचिनीच्या शिऱ्याचें पाणी करून सात पुटें द्यावीत. नंतर कडूवृंदावनाच्या रसाची सात पुटें देऊन सर्वांचे मागून गोमूत्राची सात पुटें देऊन तें चूर्ण कुपींत भरून ठेवावें. व जो नाजूक व सुकुमार मनुष्य असेल त्याचे दोन्ही मनगटांवरील शिरांस तें चूर्ण बरेच वेळ चोळावें ह्मणजे चोळता चोळता ढाळ होण्यास सुरवात होते. याप्रमाणें जितके ढाळ सोसतील तितके वेळापर्यंत प्रत्येक ढाळाचे अंतीं वरप्रमाणें चोळीत जावें. किंवा हें चूर्ण गोमूत्रात कालऊन त्याचा नाभीवर चांगला दाट लेप दिला असताही रेच होतात.

**प्रकार तिसरा**—रेवाचिनीचा शिरा, व सुरवारी हिरड्याचें दळ, हे दोन्ही समभाग घेऊन या दोहोंचा गोमूत्रांत चांगला खल करून सुमारें दोन तोळ्यांची चकती करून नाभीवर ठेवावी व तिजवर थोडें थोडें गोमूत्र जसजसें जिरेल तसतसें सोडीत जावें व दोन्ही हात व दोन्ही पाय वस्त्राचा बोळा ऊन करून त्यांनी शेकीत जावें. ह्मणजे एक प्रहरानें ढाळ होण्यास सुरवात होते. ढाळ पुरेसे वाटल्यास नाभीवरील चकती काढून टाकावी व पथ्यास तुपभात खावा.

**प्रकार चवथा**—कित्येक मनुष्यें अशी आहेत की त्यास कसेंही तीव्र ढाळकाचें औषध दिलें तरी ढाळ होत नाहींत व तें ढाळाचें औषध पोटात जाऊन बसलें ह्मणजे पोट फुगतें. अशा प्रसंगीं वैद्यांनीं पक्कें मनात समजावें कीं, औषधानीं कोठ्यांतील मळ पातळ केला परंतु तो बाहेर निघण्यास गुदाचे द्वारीं अवरोध होत आहे; तेणेंकरून आंतील मळ बाहेर येऊं शकत नाहीं अशा प्रसंगी खारा साबण किंवा शिकेकाई पाण्यांत उगाळून त्याचा एका शुभ्र फडक्यास लेप देऊन तें फडकें वैद्यानें आपले मधले बोटावर मधोमध ठेवावें. व नंतर तें बोट फडक्यासह रोग्याचे गुदात थोडा वेळ घालून ठेवावें. इतक्यानेंही मळ बाहेर आला नाहीं तर पुन्हा वरीलप्रमाणें फडक्यास लेप देऊन कृति करावी ह्मणजे रोग्याचे कोठ्यांतील सर्व मळ बाहेर येतो. सन्निपात किंवा विषमज्वरांत रोग्यास मळ होत नसल्यास व त्याचें पोट फुगलें असल्यास, देश, काल, व बलाबल पाहून वरील उपचार केल्यास मळाची प्रवृत्ति होते व तेणेंकरून रोग्यास सुख होतें.

**प्रकार पांचवा**—कित्येक मनुष्यांस मलशुद्धीचें औषध घेणें भावत नसेल व मलशुद्धि साफ होत नसेल तर त्यांनी नेमानें रात्रीं निजतेवेळीं नुसतें पाणी चतु-

थेंश आटवून कोंबट कोंबट असेल तों आंतपाव किंवा पावशेर निजतेवेळेस नेमानें पीत जावें. यास आरोग्य करणारें उदक असें ह्मणतात. हें पाचक, ग्राहक व दीपक असें असून, साधारण श्वास, कास, कफ, मळमळ. मलबद्धता, वातरोग, पांडुरोग, गुल्म, शूल, मूळव्याध, उदररोग,व सुज, यांचा नाश करितें व हें सर्वकाल हितकारक आहे असें जाणावें.

॥ कषायामधुरारुक्षाविपाकेकटुकात्रिवृत् ॥ कफपित्तप्रशमनीरौक्ष्याच्चानिलकोपनी ॥

अर्थ—निशोत्तर हें तुरट, गोड व रुक्ष असून त्याचा विपाक तिखट आहे व तें कफ आणि पित्त यांचें शामक असून रुक्षपणामुळें वायूला कुपित करितें. याकरितां निरनिराळ्या योगांत पडलें असतां सर्व रोगांचा नाश करितें.

निशोत्तर—त्याचें मूळ काळें व किंचित् लाल असें दोन प्रकारचें आहे. त्यांत आरक्तवर्ण हें सुखावह, विकाररहित व उत्तम आहे. तें नाजूक मनुष्य, लहान मूल, वृद्ध व ज्याचा कोठा हलका आहे त्यास मोठें हितावह आहे. काळें तेड मूर्छा, मोह, उरांत खरचडल्या सारखी पीडा व घशांत टोंचणीसारखी पीडा करणारें असें आहे. परंतु तीक्ष्ण व त्वरित रेच करणारें असल्यामुळें ज्याचा कोठा जड, दोष फार, व जो क्लेश सोसणारा आहे अशा रोग्यास प्रशस्त जाणावें. फार खोल व सरळ गेलेलें, गुळगुळीत असें तेडाचें मूळ आणून आंतील लांकूड टाकून देऊन वरील साल मात्र वाळवून ठेवावी. पुढें जेव्हां जरूर लागेल त्यावेळीं त्या सालीचें चूर्ण किंचित् सुंठ व सैंधव घालून वातरोगावर आंबट पदार्थाबरोबर द्यावें. पित्तरोगावर तूप, मध व साखर घालून दूध, द्राक्षाचा रस, उसाचा रस, शिवणमुळाचा काढा किंवा त्रिफळ्याचा काढा यांतून एकाबरोबर द्यावें. कफावर पंचकोलादिक कफनाशक चूर्णे बेतानें घालून गोमूत्रातून द्यावें. निशोत्तराचा कल्क व काढा यांचा केलेला लेह थंड झाल्यावर साखर, मध, दालचिनी, वेलची, व तमालपत्र ही घालून द्यावा. हें मधुर रेचक आहे. सन्निपातज्वर, स्तंभ, तहान व दाह यांनीं पीडित झालेल्या मनुष्यांनी रानतुळशीचें बीज, वंशलोचन, भूयकोहळा, खडीसाखर व निशोत्तर यांचें चूर्ण तूप व मध यांजबरोबर चाटलें असतां चांगले सहज रेच होतात. उसाचें कांडें मध्यें चिरून त्यात निशोत्तराचे चूर्णाचा लेप करावा. नंतर पुटपाकविधीनें भाजून तो रस सेवन केला असता विकाररहित रेच होतात. वावडिंगाच्या आंतील दाणे, त्रिफळा,जवखार व पिपळी हीं सर्व समभाग व या सर्वांच्या निम्मे निशोत्तराचें चूर्ण आंत मिळवून मध व तूप किंवा गुळाबरोबर सेवन केलें असतां सुखानें रेच होऊन गुल्म, प्लीहा, उदर, कास, हालीमक, अरुचि व दुसरे कफवातजन्य पुष्कळ विकार याचा नाश होतो. त्रिकटु, तमालपत्र, वेलची, दालचिनी, नागरमोथे, वावडिंग, व आंवळकठी ही सर्व समभाग व या सर्वाइतकें निशोत्तर व निशोत्तराइतकी साखर यांच्या मधात गोळ्या कराव्या व बलाबल पाहून द्याव्या त्या मूत्रकृच्छ्र, ज्वर, वांति, कास, क्षयरोग, श्रम व धातूंची क्षीणता,

दाह, पांडुरोग, अग्निमांद्य, व सर्व प्रकारचे विषविकार यांजवर प्रशस्त आहेत. याचे योगानें मळमूत्र साफ होतें.

**बाहावा**—बाल, वृद्ध, उरःक्षती, क्षीण व नाजुक मनुष्य यांस विशेषतः बाहाव्याचा मगज रेचनाकरिता द्यावा; कारण तो सौम्य असून त्यापासून कांहीं अपाय होत नाहींत. चांगल्या परिपक्व शेंगा पाहून त्यांतून लठ्ठ लठ्ठ, अशा निवडून काढून सात दिवसपर्यंत वाळूंत पुरून ठेवाव्या. नंतर बाहेर काढून वाळवाव्या. नंतर थोडा शेक देऊन आंतील मगज काढून स्वच्छ बरणींत घालून नीट झांकून ठेवावा. जरुरी लागेल तेव्हां उपयोग करीत जावा. दाह व उदावर्त याणीं पीडित झालेल्या चार वर्षांपासून बारा वर्षांपर्यंतचे मुलांस बलाबल पाहून तो मगज मनुकाच्या काढ्याबरोबर द्यावा ह्मणजे सुखेंकरून रेच होतात. किंवा बाहाव्याच्या मगजाचा हिम, दह्याची निव्वळ, आंवळ्याचा रस, किंवा निशोत्तराचा कल्क यांतून एकाबरोबर द्यावा ह्मणजे चांगले ढाळ होतात.—दांतीमुळाच्या काढ्यांत बाहाव्याचा मगज व जुना गूळ घालून एक्या बरणींत घालून तोंड बंद करून ती बरणी महिना पंधरा दिवस जमिनींत पुरून ठेवावी. नंतर तें आरिष्ट रेचनाविषयीं द्यावें.

**लोध**—लोधाच्या मुळावरील साल काढून टाकून अंतरसाल घ्यावी. मग ती वाळवून चूर्ण करून त्याचे तीन भाग करावे. पैकीं दोन भागांचा काढा करून गाळावा व त्या लोधाच्या काढ्याच्या त्या तिसऱ्या भागाला भावना द्याव्या. नंतर दशमुळाच्या काढ्याच्या भावना द्याव्या. नंतर तें चूर्ण वाळवून ठेवावें. त्यांपैकीं एक तोळा चूर्ण दह्याची निव्वळ, गोमूत्र, किंवा आंवळकठीचा काढा यांतून एकाबरोबर द्यावें. लोधाचा कल्क व काढा साखर व तूप घालून लेह करावा तोही उत्तम रेचक आहे.

**तिधारी निवडुंग**—हा दोषांचा जबरदस्त संचयही त्वरित फोडून काढतो. व यापासून जे विकार होतात ते मोठे त्रासदायक असतात करिता ज्याचा कोठा हलका आहे तो अशक्त, मूल, ह्मातारा व फार दिवसांचा रोगी त्यास हें रेचक देऊं नये.—गुल्म, उदर ( पानथरी वगैरे ) विष, त्वग्रोग, ( खरूज वगैरे ) मधुमेह, पांडुरोग, दूषीविष, सूज, व दोषज उन्माद या रोगांवर याची योजना करावी. ज्यास तीक्ष्ण व पुष्कळ कांटे असतात तो निवडुंग उत्तम जाणावा. दोन तीन वर्षांचा जून निवडुंग पाहून माघ महिन्याचे अखेर कापून त्याचा चिक काढावा. नंतर त्यांत बृहत्पंचमूळाचा किंवा रिंगणी व डोरली याचा काढा घालून एका जागीं कालवून निखाऱ्यावर सुकवून त्याच्या गोळ्या करून त्या दह्याची निवळ किंवा गोमूत्र यांतून एकाबरोबर द्याव्या. ह्मणजे उत्तम प्रकारचे रेच होतात. त्रिकटू, त्रिफळा, निशोत्तर, व दांतीमूळ यांच्या चूर्णास निवडुंगाच्या चिकाच्या सात भावना देऊन तें चूर्ण गुळाच्या पाण्याबरोबर द्यावें ह्मणजे ताबडतोब रेच लागूं पडतात.

**दांतीमूळ**—हें झाड जेपाळापैकींच एका जातीचें लहान आहे. याचें मूळ

किंचित् तांबडें, काळें, तीक्ष्ण, उष्ण व त्वरित लागू पडणारें, विकासी, जड, वायूला वाढविणारें व पित्त आणि कफ यांना पातळ करणारें असें आहे. त्या मुळास मध व पिंपळी यांचा लेप करून तो सुकल्यावर दर्भांत किंवा मोळांत वेष्टन करून वर पुटपाकासारखा मातीचा लेप द्यावा. नंतर तो गोळा निखाऱ्यांत भाजावा. व आंतील मूळ काढून पुन्हां वाळवावें. अग्नीच्या व सूर्याच्या तापानें त्याची विकासिता नाहींशीं होते. ज्याचें शरीर कफानें थलथलीत झालें आहे, गुल्म, प्रमेह, उदर व ज्यास कृत्रिम विषजन्य विकार झाले आहेत अशा रोग्यानें त्या मुळाचें चूर्ण बलाबल पाहून दह्याची निवळ, मदिरा, ताक, पिलूंचा रस किंवा आसव याबरोबर घ्यावें.

हिरडे—निशोत्तराचे जसें योग सांगितले आहेत त्याचप्राणें हिरड्याचे योग करावे.

---

## बस्तीचा विधि.

॥ बस्तिर्द्विधानुवासाख्यो निरूहश्चततः पर ॥ यः स्नेहैर्दीयतेसःस्यादनुवासननामकः ॥
॥ कषायक्षीरतैलैर्योनिरूहः सनिगद्यते ॥ बस्तिभिर्दीयते यस्मात्तस्माद्बस्तिरितिस्मृतः ॥

अर्थ—अंडकोशादिकेंकरून गुदाचे ठायीं ज्याच्या पनळ्या ( पिचकाऱ्या ) मारतात त्याला वस्ति ह्मणतात. तो बस्ति अनुवासन, आणि निरूह असा दोन प्रकारचा. त्यामध्यें तूप व तेल इत्यादि स्नेहें करून पिचकाऱ्या मारतात त्याला अनुवासन बस्ति ह्मणतात, व काढे, दूध तेल हे एकत्र करून ज्या पिचकाऱ्या मारतात त्याला निरूह बस्ती ह्मणतात. या दोहो बस्तींमध्यें जो अनुवासन बस्ति आहे तो प्रथम सांगून नंतर निरूह व उत्तरबस्ति सागतों. त्या अनुवासन बस्तीचा भेद मात्रा बस्ति आहे. त्या मात्राबस्तीचे स्नेहादिकांची मात्रा आठ किंवा चार तोळे जाणावी. या प्रकारें बस्तीचे चार भेद जाणावे. वाताधिक दोषावर किंवा केवळ वातावर बस्ति हितकारक आहे तो सर्व प्रकारच्या चिकित्सेमध्यें श्रेष्ठ आहे परंतु बस्तिची क्रिया करण्यास मोठा चतुर वैद्य पाहिजे.

---

१ कुसुंबा वगैऱ्याचे पाण्यापासून जसें वस्त्र, रंगीत द्रव्यमात्र आकर्षण करून घेतें तसा बस्ती स्नेहस्वेदादिकानीं द्रवीकृत जो देह त्यापासून फक्त दोषाना आकर्षण करून घेतो, सप्तधातूना बिलकूल इजा करीत नाहीं शाखागत, कोष्ठगत, मर्मगत, ऊर्ध्वजत्रुगत, व सर्वांग व्यापक असे जे रोग त्याच्या उत्पत्तीला वायु जितका कारणीभूत आहे तितके दुसरें काहीच नाहीं, कारण मलमूत्र, कफ, पित्त इत्यादि दोषाचे जे सचय त्यांचे जे चलनवलन किंवा एकाच ठिकाणीं कोंडून राहणें ह्या क्रिया त्याजवरच अवलबून आहेत, असा जो वायू तो अतिशय वृद्धिगत झाला असतां त्याला शमविण्याकरिता बस्तीवाचून दुसरें कोणतेच औषध नाहीं. यास्तव बस्तीला कोणी कोणी वैद्यक्रिया असे ह्मणतात व कित्येकाच्या मतें तर सर्वच चिकित्सा बस्तींत येते. ह्याच सिद्धात निजातु विकाराला कारणीभूत जें रक्त त्याचें शोधन करणारा जो शिरावेध त्यालाही लागू आहे याप्रमाणे वाग्भटाने आपलें सूत्रस्थानात मत दिलें आहे.

**अनुवासन वस्तीस योग्य**—रुक्ष ह्मणजे स्नेहपानरहित व ज्याचा अग्नि प्रदीप्त आहे तो व केवळ वातरोगी अशा मनुष्यास अनुवासन वस्ति द्यावा.

**अनुवासनवस्तीस अयोग्य**—कुष्ठ, मेह, स्थूल मनुष्य व उदर, अजीर्ण, उन्माद, तृषा, शोक, मूर्छा, अरुचि, भय, श्वास, खोकला व क्षय इहींकरून पीडित मनुष्यास अनुवासनवस्ति देऊं नये.

**नळीचें प्रमाण**—गुदाचे ठायी पिचकाऱ्या मारावयाची नळी ती सुवर्णादि धातूची किंवा बांबूची; देवनळाची, हस्तीदंताची, शिंगाची किंवा काचेची असावी. वस्तीची नळी एक वर्षाचे आंतील मुलास पांच अंगुळें एका वर्षापासून सहा वर्षेपर्यंत सहा अंगुळे लांब, सहापासून सहापासून बारावर्षेपर्यंत आठ अंगुळें व बारावर्षानंतर बारा अंगुळें प्रमाण लांब असावीं सहा अंगुळाचे नळीचें छिद्र मुगाचे दाण्याएवढें, आठ अंगुळाच्या नळीचें छिद्र लाखेच्या दाण्याप्रमाणें व बारा अंगुळ प्रमाण नळीचें छिद्र रानबोराचे आठीप्रमाणें असावें. सोळावे वर्षीं भिजलेल्या वाटाण्याएवढें व एकविसाव्या वर्षी रानबोरा एवढें असावें. ती नळी चिकण असून गाईचे शेपटासारखी करावी त्या नळीचें मूळ रोग्याच्या आंगठ्याइतकें मोठें व अग्रभागी करांगुलीइतकें जाडी असून तिचें तोंड वाटोळें करावें. त्या नळीचे तीन भाग करून चवथे भागी मुळाचेठायीं दोन कर्णिका (चकत्या) कमळपत्रासारख्या करून हरणादिकांचे अंडाचा वस्ति येथें योजून त्या कर्णिकेशी बस्तीला दोहों बंधनेंकरून बांधून संधी मिळवावा.

**वस्तीचा प्रकार**—हरीण, बोकड, डुक्कर, बैल किंवा टोणगा यांच्या अंडाचा वस्ति करावा. तो न मिळेल तर यांच्याच अंगाच्या कातड्याचा करावा. नंतर बोर व तरवड इत्यादिकांचे सालीचे काढ्यांत रंगविलेला असून मृदु, चिकण व बळकट असा असावा.

**व्रणवस्तीचें प्रमाण**—व्रण शोधनाविषयीं जो वस्ति योजावयाचा त्याची नळी आठ अंगुळ प्रमाण लांब, मृदू व तिचें छिद्र मुगाइतकें मोठें असावें.

**वस्तिसेवन काळ**—वसंतऋतूचेठायीं स्नेहवस्ति ह्मणजे अनुवासन वस्ति तो सायंकाळी योजावा. व ग्रीष्मऋतु, वर्षाऋतु, शरदऋतु याचे ठायीं रात्रीस

---

१ मनुष्याला प्रथम ढाळक देऊन ७ दिवस गेल्यानंतर बळ आल्यावर त्याला भोजन देऊन नंतर अनुवासनवस्ति योजावा वमन दिल्यापासून १५ दिवसानीं विरेचन (तीक्ष्ण रेच) व विरेचनापासुन १५ दिवसानीं निरूहण द्यावें. व त्यानंतर लागलेंच अनुवासन देणे व विरेचनानंतर ७ दिवसानीं देणे

२ वाग्भटाचे मत असें आहे कीं, नळीचें प्रमाण ७ वर्षापासून ११ वर्षेपर्यंत ७ अंगुळें, १२ वर्षापासून १५ वर्षापर्यंत ८ अंगुळें, १६ वर्षापासून १९ वर्षापर्यंत ९ अंगुळें व २० वर्षापासून पुढें १२ अंगुळें नलिकेचा परिघ मुळस्थानीं एक अंगुलप्रमाण, पुढे सातव्या, बाराव्या, सोळाव्या वर्षी व त्याच्या पुढे २१ वर्षापर्यंत दर वर्षास पावपाव.अंगुळ वाढवीत जावें ह्मणजे २१ वे वर्षी त्याची मर्यादा पुरी ३ अंगुळें होते.

योजावा व रोग्यास फार स्निग्ध भोजन देऊन अनुवासनबस्तीचा प्रयोग करूं नये, तेणेंकरून मद व मूर्छा हें उत्पन्न होतात. फार रुक्ष भोजन देऊन बस्तीचा प्रयोग केला असतां बल व कांति यांची हानी होते.

**बस्तीच्या मात्रेचें प्रमाण**—अनुवासन व निरूहबस्ति यांची अल्प मात्रा झाली असतां त्यापासून चांगलें कार्य होत नाहीं व फार मात्रा झाली असतां आनाहरोग, ग्लानि व अतिसार हे रोग उत्पन्न होतात. ज्याच्या आंगांत चांगली शक्ति आहे त्याची अनुवासनबस्तीची मात्रा चोवीस तोळे जाणावी. मध्यम बळाची बारा तोळे व कनिष्ठ बलाची सहा तोळे जाणावी. शतावरी व सैंधव यांचें चूर्ण अनुवासनबस्तीचेठायीं घावयाचें त्याची मात्रा जी सहा मासे प्रमाण ती उत्तम, चार मासे मध्यम व दोन मासे प्रमाण ती मात्रा कनिष्ठ जाणावी.

**बस्ति घावयाचा प्रकार**—अनुवासनबस्तीविषयीं जो योग्य मनुष्य त्याच्या अंगाला तेल लावून उष्ण पाण्यानें अंगाचा हलका घाम काढून त्याला यथाशास्त्र भोजन देऊन ह्मणजे तांदुळाची पातळ कण्हेरी करून पाजून अमळ इकडे तिकडे हिंडवून त्याला मुतावयाला व शौच्याला होत असल्यास बसवून व वायु सरत असल्यास सरवून नंतर बस्ति योजावा. त्याचा प्रकार त्याला डावे कुशीवर निजवून डावा पाय लांब पसरून उजवा पाय आखडवून धरावा आणि गुदाचेठायीं तूप लावून चांगलें स्निग्ध ह्मणजे ओशट व बुळबुळीत करून बस्तीची नळी बस्तिमुखाचे ठायीं दोऱ्यांनीं बांधून त्या नळीला गुदाचेठायीं ठेवावी आणि कुशल वैद्यांनीं ती नळी डावे हातानें धरून उजवे हातानें मध्यम वेग करून पिचकाऱ्या माराव्या. हा प्रयोग चालला असतां जांभई,खोकला व शिंकादिक तीं रोग्यास येऊं देऊं नयेत. तीस अंक ( दाणे मोजणारे लोक माप करते वेळेस एक दोन असे मोजतात इतक्या अवकाशानें मोजावें. ) मोजीपर्यंत पिचकाऱ्या माराव्या आणि स्नेह अभ्यंतरी प्राप्त झाला ह्मणजे शंभर अंक सावकाश मोजीतोंपर्यंत त्यास उताणें निजवावें. पिचकाऱ्या मारल्यावर रोग्याकडून हस्तपादादिक सर्व गात्रें ढिले सोडून लांब करवावें. तेणेंकरून रसादिक धातु आपल्या स्थानाप्रत जातात. व रोग्याच्या हातापायांच्या तळव्याना तीन वेळ हलक्या हलक्या चापट्या माराव्या. तशाच मांड्याचेठायीं व कटिपश्चाद्भागाचेठायीं तीन वेळ चापट्या मारून त्याला पलंगावर बसवावा. या प्रकारचा विधि झाल्यावर रोग्यानें स्वस्थ निद्रा करावी.

**बस्ति चांगला झाल्याचीं लक्षणें**—गुदाचे आंत जो स्नेह गेला तो वायु व मळ यांसहवर्तमान उपद्रवावाचून लौकर बाहेर आला असता त्या मनुष्यास बस्तिकर्म चांगलें झालें असें जाणावें

**स्नेहविकार दूर होण्याविषयीं उपाय**—गुदावाटे स्नेह विशेष बाहेर आला असतां आणि जर मनुष्याचा अग्नि प्रदीप्त आहे तर त्याला सायंकाळीं जुनें अन्न ( एक वर्षाचे जुने तांदूळ किंवा साटक्या साळी ) यांचा भात करून तो कि-

चित् नेहमींच्या आहारापेक्षां कमी असा पथ्यास द्यावा. आणि अनुवासित मनुष्य जो त्याला दुसरे दिवशी कोमट पाणी प्यावयास द्यावें अथवा धणे व सुंठ यांचा काढा करून द्यावा. तेणेंकरून स्नेहाचा विकार दूर होतो.

**पिचकाऱ्यांचें प्रमाण**—पूर्वोक्त विधीकरून वातादिक दोषांचेठायीं सहा, सात, आठ किंवा नऊ वेळ पिचकाऱ्या माराव्या व त्या पिचकाऱ्यांचे अंतीं निरूह-बस्ति योजावा. प्रथम पिचकारी मारली असता तो बस्ति वंक्षण ( अडसंधी ) यांच्या द्वारें शरीराचेठायीं सेवन करितो ह्मणजे धातु वाढवितो. दुसरी पिचकारी दिली असता मस्तकांतील वायुरोग हटतो. तिसरी दिली असतां शरीराचेठायीं बळ व कांती हीं येतात. चवथ्यानें व पांचव्यानें पिचकारी मारली असतां रस व रक्त यांची वृद्धि होते. सहाव्यानें व सातव्यानें मारली असता मांसाला व मेदाला स्निग्धपणा येतो. आठव्यानें व नवव्यानें पिचकारी मारली असता शुक्रधातूला स्निग्धपणा येतो. आठरा पिचकाऱ्या मारल्या असता शुक्रधातुगत जे दोष त्यांचा नाश होतो. जो मनुष्य छत्तीस पिचकाऱ्यांचें सेवन करितो त्याला हत्तीसारखें बळ येऊन वेगानें अश्वाला देखील जिंकील आणि देवासारखी कांति होईल.

**अनुवासन व निरूह बस्ति योजण्याचा प्रकार**—रुक्ष असून जो फार वायूनें पीडित मनुष्य त्याला वैद्यानें दिवसादिवसाचेठायीं स्नेह बस्ति द्यावा. ह्मणजे स्नेहाच्या पिचकाऱ्या नित्य माराव्या. स्निग्ध व स्थूलादिक मनुष्य त्यास निरूह-बस्ति तो दिवसादिवसाचेठायीं द्यावा. तेणेंकरून रोग दूर होतो. रुक्ष मनुष्य जो त्यास बस्ति थोडा द्यावा. ह्मणजे स्नेहाची हलकी पिचकारी मारावी. परंतु रोगी बहुत दिवस वाचावयाचा आहे तर स्निग्ध मनुष्य जो त्यास निरूहबस्ति थोडा द्यावा. स्निग्ध मनुष्याचे गुदावाटें पिचकाऱ्या मारल्यावर लागलाच स्नेह बाहेर येतो. आंत ठरत नाहीं याकरितां स्नेहबस्ति देऊन लागलाच निरूहबस्ती द्यावा. असें पालटून दोहो प्रकारचे बस्ती द्यावे.

**स्नेह बाहेर येत नाहीं त्याचे उपद्रव व उपाय**—ढाळक व वमन इत्यादिक देऊन ज्या मनुष्याची शुद्धि केली नाहीं त्याचे गुदावाटें मळमिश्रित, जर स्नेह बाहेर आला नाही तर शरीराला शिथिलपणा, पोट फुगणें, शूल, श्वास, पक्काशयाचेठायीं जडपणा, हे उपद्रव होतात ते दूर होण्याविषयीं तीक्ष्ण असा निरूहबस्ती योजावा. किंवा तीक्ष्ण औषधें करून युक्त अशी वात करून गुदांत घालावी ह्मणजे वायु अधोगामी होऊन मळमिश्रित स्नेह गुदावाटें बाहेर येईल अशा रीतीनें योजना करावी. व त्याचप्रमाणें तीक्ष्ण ढाळक व तीक्ष्ण नस्येंही योजावीत. स्नेहाची पिचकारी गुदांत घातल्यावर गुदाचा संपूर्ण भाग व्यापून राहिली होत्साति अथवा मनुष्याचा रुक्षपणा आहे ह्मणून गुदाचा एक देश व्यापून राहिली होत्साति शूलादिक उपद्रव करीत नाहीं ती पिचकारी ह्मणजे स्नेहबस्ति तो बहुत वेळ तसाच ठेवावा. स्नेहाची पिचकारी मारली असतां जो स्नेह बाहेर येत नाहीं

त्याला दोन वेळ पिचकाऱ्या मारून स्नेह बाहेर येईसें करावें व जो स्नेह अहोरात्रींतही बाहेर येत नाहीं त्याला ढाळ देऊन बाहेर काढावें.

**अनुवासनतेल**—गुळवेल, एरंडमूळ, करंजसाल, भारंगमूळ, अडूळसा, रोहिसतृण, शतावरी, कोराटा, व कावळी, ही नऊ औषधें प्रत्येक चार चार तोळे, आणि सातू, उडीद, आळशी, बोरांचें बीज व कुळीथ हीं पांच औषधें प्रत्येक आठ आठ तोळे. हीं सारी एकत्र करून थोडी कुटून त्यांत पाणी चौसष्ट शेर घालून सोळा शेर राहितोंपर्यंत काढा करून त्यांत तिळाचें तेल चार शेर घालावें आणि जीवनीय गणाची औषधें चार चार तोळे घेऊन चूर्ण करून त्या तेलांत घालून फिरून कढवावें, आणि काढा आटवून तेल राहिलें, ह्मणजे खाली उतरून तें तेल गाळून घ्यावें. याला अनुवासन तेल असें ह्मणतात. हें तेल संपूर्ण वायूंचे रोग दूर करितें असें जाणावें.

**सूचना**—वस्ति कर्मामध्यें दोषरूप कांही विपर्यास झाल्यास त्यापासून सर्व प्रकारचे रोग उत्पन्न होतात, असें जाणावें. अन्नपान आणि विहारादिक यांचें आचरण जसें स्नेहपानाचेठायीं सांगितलें आहे, तसेंच सर्व प्रकारें या स्नेहबस्तीचेठायीं करावें.

॥ निरूहवस्तिर्बहुधाभिद्यतेकारणांतरैः ॥ तैरेवतस्यनामानिकृतानिमुनिपुंगवैः ॥

**अर्थ**—निरूहवस्ति कारणभेदेंकरून अनेक प्रकारचा होतो आणि जसजशी कारणांची नामें असतील तसतशी त्याचीं नामें होतात. उदाहरण उत्क्लेशनबस्ति, दोषहरबस्ति, दोषशमनबस्ति, इत्यादिक नामें जाणावी. या वस्तीचें दुसरें नाव आस्थापन असें आहे. ह्मणजे त्याचा अर्थ दोष व रसादिक धातु यांना आपल्या आपल्या स्वस्थानीं बसवितें. व वातादिक दोष अथवा रोग याना दूर करितें ह्मणून त्याला निरूह ह्मणतात.

**निरूहवस्तीचें मान**—हा बस्ति देण्याविषयीं काढ्याचें प्रमाण सव्वाशेर उत्तम, एक शेर मध्यम, व पाऊण शेर कनिष्ठ मान जाणावें.

**निरूहवस्तीविषयीं योग्य**—वातरोग, उदावर्तरोग, वातरक्त, विषमज्वर, मूर्छा, तृषा, उदरें ( जलोदर खेरीज करून ) आनाह, मूत्रकृच्छ्र, अश्मरी, बहुत

---

१—वाग्भटाचे मत असें आहे कीं, गुल्म, प्लीहा, निवळ अतिसार, जीर्णज्वर, पटसे, शुक्र, वात व मळ याचा अवरोध व अंतरगल या रोगावर निरूहबस्ति द्यावा. व जे निरूहवस्तीला योग्य आहेत त्यानाच अनुवासनबस्ति द्यावा. व निरूहबस्तीला योग्य नाही त्याला अनुवासनबस्ति देऊं नये तसेच पांडुरोग, कावीळ, मेह, पिनस प्लीहा अतिसार, गुरुकोष्ठ ( आहारावांचूनही पोट जड वाटणें ) कफोदर, अभिष्यंद, कृशता, स्थूलता, कृमी, उरस्तंभ विष, कृत्रिम विष, अपची, श्लीपद व गलगंड या विकाराना व अनशापोटींही देऊं नये.

दिवसांचें प्रद ( धुपणी ). अग्निमांद्य, मधुमेह खेरीज करून बाकीचे सर्व प्रमेह शूल, आम्लपित्त व हृद्रोग हे निरूहबस्ति देण्यास योग्य जाणावे.

**निरूहबस्तीस अयोग्य**—फार स्निग्ध मनुष्य, ज्याचे ऊर्ध्वगामी दोष झाले आहेत तो, उरःक्षतेंकरून पीडित, कृश, आध्मान ( पोट फुगणें ) ओकारी, उचकी, अर्श, खोकला, श्वास, गुदाचेठायीं पीडा, सूज, आमातिसार, मोडशी, कुष्ठ, गर्भिणी स्त्री, मधुमेही व जलोदरी, ज्यानें वमन, विरेचन व नस्य घेतलें आहे तो, बद्धोदर, क्षतोदर, नुकतेंच भोजन केलेला व ज्याचे कोठ्यांत अल्प मल आहे तो. यांना निरूहबस्ति देऊं नये.

**निरूहबस्ति देण्याचा प्रकार**—रोग्यास मुतावयास व शौच्यास होत असल्यास जाऊन येण्यास सांगून त्याचे कोठ्यांत वायूचा फुगारा असला तर तो वायु सरत असल्यास सरवून कोठा शुद्ध करून त्याचे अंगाला तूप किंवा तेल लावून थोडा अंगाचा घाम काढून त्याला भोजन न देता दोन प्रहरीं घरामध्यें जसा ज्या रोगावर बस्ति द्यावयाचा असेल तसा स्नेहबस्तीचे विधानेंकरून निरूहबस्ति द्यावा ह्मणजे तेलादिकांच्या पिचकाऱ्या गुदावाटें माराव्या. नंतर हें कर्म झाल्यावर तो निरूह बाहेर येण्याकरितां दोन घटकांपर्यंत उकीडवें बसावें. तितक्या वेळांत तो निरूह बाहेर आला नाहीं तर त्याला शोधन देऊन बाहेर येईल असा करावा. तीं शोधनाचीं औषधें जवखार व गोमूत्र, निंबूचा रस व सैंधव हीं चार औषधें एकत्र करून गुदाचेठायीं पुन्हां निरूहबस्ति योजावा ह्मणजे निरूह बाहेर येतो.

**उत्तम निरूहबस्तीचें लक्षण**—ज्याला निरूहबस्ति दिला त्याचे मळ, पित्त कफ आणि वायु हे क्रमेंकरून गुदावाटे बाहेर आले असता शरीराला हलकेपणा येतो. मनाला संतोष, अंगाला घाम व चिकटा व रोगाचा नाश हीं लक्षणें होतात. असें जाणावें.

**निरूहबस्ति चांगला झाला नाहीं त्याचीं लक्षणें**—ज्याला निरूहबस्ति दिला आणि त्या बस्तीचा बाहेर येण्याचा वेग अल्प झाला असता मळ व वायु हे जितके बाहेर यावयाचे तितके न आले आणि मूत्राचेठायीं पीडा, शरीराला जडपणा, व अरुचि हीं लक्षणें झाली असतां निरूहबस्ती चांगला झाला नाहीं असें जाणावें

**निरूहबस्तीचें प्रमाण**—निरूहबस्ति दोन तीन अथवा चार वेळ जसा दोष

---

१—वाग्भटाचे मत पहिल्या वर्षी चार तोळे असून पुढे बारा वर्षांपर्यंत दर वर्षास चार तोळेप्रमाणे व पुढे आठरा वर्षांपर्यंत दर वर्षास आठ तोळेप्रमाणे वाढवावे म्हणजे आठराव्या वर्षी ९६ तोळ्याचे ( सुमारें सव्वा शेराचें ) मान होते व हे मान सत्तर वर्षांपर्यंत कायम राखून नतर ८० तोळ्याचे मान ठेवावे. अनुवासनाचें प्रमाण त्या त्या व याला निरूहबस्तीच्या चतुर्थांश असावें पिचकाऱ्या मारल्यानतर रोग्यास पाय पसरण्यास सागून उशी द्यावी व हातरूण तीन फेऱ्यापर्यंत गुडाळावे व त्याच्या खोटावर ( कुल्यावर ) तीन वेळ ताडन करून तेल लावून वेदनार्थ अग रगडावें, तेणेकरून स्नेह लवकर परत येत नाही जर लवकर परत आला तर पुन्हा दुसरा स्नेहबस्ति द्यावा.

असेल तसा योजावा. वातरोग असतां स्नेहयुक्त एक वेळ, पित्तरोग असतां दुग्धयुक्त दोन वेळ, व कफरोग असता कषाय ( हिरडे, आंवळकठी इत्यादि ) कटु [ सुंठ, मिरीं इत्यादी ] रुक्ष [ कुळीथ जव इ० ] इत्यादि पदार्थांचे काढे करून किंचित् उष्ण अशा काढ्यानें तीन वेळ बस्ति द्यावा. किंवा पित्त व कफ वायु इहीं करून पीडित मनुष्याला दूध व यूष व रस ह्मणजे मांसरस यांचे क्रमेंकरून वस्ती द्यावे. नंतर अनुवासनवस्ती द्यावा. सुकुमार ह्मणजे नाजूक, वृद्ध, बालक यांना मृदूबस्ती द्यावा ह्मणजे हलक्या पिचकाऱ्या माराव्या. जास्त व जोरानें मारल्यास त्यांचे आयुष्याचा नाश होतो. प्रथम दोष उचंबळत अशा औषधांचा बस्ती द्यावा. व मध्यें दोषनाशक अशा औषधांचा बस्ति द्यावा. व अंतीं संशमनीय ह्मणजे आपले स्वस्थानी दोष बसत असा बस्ति द्यावा.

**दोष उचंबळण्याचा बस्ति**—एरंड्याचें बीज, मोहाची साल, पिंपळी, सैंधन, वेखंड व शेरणीचीं फळें, ही सहा औषधें समभाग घेऊन वांटून कल्क करून दोष उचंबळण्याकरितां हा उत्क्लेशन बस्ती योजावा.

**दोषहारक बस्ति**—शतावरी, जेष्टीमध, बेलफळ व कौठ ही चार औषधें समभाग घेऊन कांजीत बारीक वांटून त्यांत गोमूत्र मिळवून त्यानें पिचकाऱ्या माराव्या ह्मणजे वातादि दोषाचे शमन होतें.

**शोधनबस्ति**—निशोत्तरादिक जीं शोधन ह्मणजे रेचक द्रव्यें त्यांचा काढा करून व त्याच औषधाचा कल्क त्या काढ्यात मिळवून त्यात थोडें सैंधव घालून युक्तीनें रवीनें मंथन करून गाळून नंतर त्यानें पिचकाऱ्या माराव्या.

**दोषशमनबस्ति**—वाघांटीचें मूळ अथवा राळे, मोहाची साल, नागरमोथे, रसांजन, ही चार औषधें समभाग घेऊन दुधांत बारीक वांटून गाळून त्यानें पिचकाऱ्या माराव्या.

**लेखनबस्ति**—त्रिफळ्याचा काढा करून त्यांत गोमूत्र, मध व जवखार घालून ऊषकादिक गणाचे औषधाचें चूर्ण त्यात मिळवून लेखन ह्मणजे मेदोरोगाचें जें कृशीकरण त्याविषयीं बस्ति द्यावा.

---

मागील पृष्ठावरून पुढे चालू

कारण स्नेह तेथे काहीं वेळ न राहिल्यास त्याचे कार्य होत नाहीं. स्नेह परत आल्यावर रोग्यास भूक लागल्यास लघुभोजन द्यावें स्नेह परत येण्याची अगदी शेवटची मुदत एक प्रहराची याहून उशीर लागल्यास मरण येते. करिता तत्काळ स्नेहक्षार, गोमूत्र याची स्निग्ध, तीक्ष्ण व उष्ण अशी एक पिचकारी तावडतोब मारावी व एक औषधाची वात करून ती गुदात घालावीं, पोट शेकावे एकदम त्यास भिववावे पिचकारीचें औषध आपोआप परत आले ह्मणजे पुन २ री ३ री ४ थी किंवा कोठा निर्दोष होण्याला जितक्या अवश्य असतील तितक्या पिचकाऱ्या माराव्या.

१—खारी माती, मोरचूत, हिंग, हिराकस, पाटरा हिराकस, सैंधव व शिलाजीत हा ऊपकादि गण, मूत्रकृच्छ्र, मूतखडा, गुल्म, कफ व मेदोरोग याचा नाश करतो.

**बृंहणबस्ति**—सफेतमुसळी, गोखरूं, कवचबीज ह्मणजे कुहिरीचें बीज इत्यादिक जी धातुवर्धक द्रव्यें त्यांचा काढा करून त्यांत मोहाची साल द्राक्षे, डाळिंबें इत्यादिक मधुर द्रव्यें जी त्यांत कल्क तूप, व मांसरस हीं सारीं घालून बलवर्धन होण्याविषयीं बस्ति योजावा.

**पिच्छिलबस्ति**—बोरीची साल, नारिंगें, भोकरीची साल, सावरीची साल, धमासा, व सुंठ ही सहा औषधें समभाग घेऊन दुधांत वांटून त्यान बोकड, मेंढा व हरीण यांचें रक्त मिश्रित करून कुशल वैद्यानें दोष पातळ होण्याविषयीं बस्ती योजावा. या बस्तीचें प्रमाण ४८ तोळ्यांचें आहे.

**निरूहणमालेचा विधि**—प्रथम सैंधव १ तोळा व मध १६ तोळे, या दोहोंचें एके जागी मर्दन करून नतर त्यांत तूप अथवा तेल २४ तोळे प्रमाण घालून एका जागी मिळवून त्यात कल्काची जी औषधें सागेन त्याचा कल्क करून त्या स्नेहांत मिळवावा. अथवा त्या कल्काचा काढा करून तो स्नेहांत मिळवून बस्ति द्यावा. हा बस्तीचा साधारण विधि जाणावा विशेषविधि तर वातरोग असतां मध १६ तोळे व स्नेह २४ तोळे हे एकत्र करून बस्ति योजावा. पित्तरोग असतां मध १६ तोळे व स्नेह बारा तोळे एकल करून बस्ति योजावा. कफरोग असतां मध २४ तोळे व स्नेह १६ तोळे एकत्र करून बस्ती द्यावा.

**मधुतैलक बस्ति**—एरंडाचे मुळाचा काढा ३२ तोळे, मध व तेल हीं प्रत्येक १६ तोळे, बडिशेप व सैंधव हीं २।२ तोळे, ही सारी एकजागी करून रवीनें घुसळावी, याला मधुतैलक बस्ति ह्मणतात. याचा बस्ति योजिला असता मेदोरोग, गुल्म, कृमि, कवलू, मळ, उदावर्त व वायु याचा नाश होतो. आणि बल, कांति, स्त्रीविषयी प्रीति व धातूची वृद्धि यांना देतो व अग्नि प्रदीप्त होतो. मध, तूप व दूध हीं ८।८ तोळे, शेरणी आणि सैंधव ही दोन एकेक तोळा घेऊन बारीक वांटून एकत्र कालवून बस्ति द्यावा, ह्म० जठराग्नि चांगला प्रदीप्त होतो.

**युक्तरथ बस्ति**—एरंडमुळाचा काढा करून त्यात मध व तेल घालून सैंधव, वेखंड, पिपळी व गेळफळ या ४ औषधाचें समभाग चूर्ण त्या काढ्यांत मिळवून बस्ति द्यावा. हा बस्ति सर्व रोगांवर हितकारक आहे असें जाणावें. बृहत्पंचमुळांचा काढा करून तेल व पिपळीचें चूर्ण, सैंधव, मोहाचा नार (गाभा) अ० जेष्टीमध यांचें बारीक चूर्ण त्या काढ्यात घालून बस्ति द्यावा. हा बस्ति सर्व रोगांवर द्यावा.

**पथ्य**—पिचकाऱ्या घेणाऱ्या मनुष्यानें ऊन पाण्यानें स्नान करावें, दिवसा निद्रा घेऊं नये, अजीर्णकारक पदार्थ भक्षण करूं नये व दुसरी सर्व आचरणें स्नेहबस्तीसारखी करावी.

॥ अतःपरं प्रवक्ष्यामिबस्तिमुत्तरसंज्ञित ॥ द्वादशांगुलकंनेत्रं मध्येचकृतकर्णिकं॥ मालतीपुष्पवृत्ताभं छिद्रंसर्षपानिर्गमं ॥

अर्थ—यानंतर उत्तरबस्तीचें प्रमाण सांगतों. नळी १२ अंगुळ लांबीची असून गोपुच्छाकार व गोल तोंडाची असावी. तिच्या मध्यभागीं व मूळभागी एकेक चकती बसविलेली असावी. ती गुळगुळीत सुवर्णादि धातूची केलेली असावी. कुंद किंवा जाई यांच्या फुलाच्या देंठाएवढी व मजबूत असून तिचें तोंड एक शिरसाचा दाणा मावण्याजोगें असावें. त्या नळीला जो बस्ति जोडावयाचा तो लहानसा व नाजूक असून औषधांचें मान २ तोळे किंवा वयादिकांच्या अनुरोधानें किंचित् कमी किंवा जास्त असावें, त्याचा विधि येणेंप्रमाणें.–रोग्याला स्नान व स्नेहबस्तिविधींत सांगितल्याप्रमाणें भोजन घालून एका गुडघ्याइतक्या उंच व मृदु कोंचावर सरळ व सुखानें बसवावें.मग शिश्न उठलें ह्मणजे तें सरळ धरून त्यांत पहिल्यानें मार्ग शुद्ध्यर्थ एक बारीक सळई घेऊन तिला तूप लावून हळूच घालावी. सळईनें मार्ग साफ झाल्यावर बस्तीची नळी सेवनीला (शिवणीला) अनुलक्षून शिश्नमुळांपर्यंत किंवा एक अंगुळ प्रवेश करूड गुदबस्तीप्रमाणें निष्कंप ह्म० हात न हालविता घालावी. मग पिचकारी दाबून आंत स्नेह घातल्यावर स्नेहबस्तीत सांगितल्याप्रमाणें क्रम सुरु ठेवावा. या विधीनें ३ किंवा ४ बस्ति देऊन इतर व्यवस्था अनुवासन बस्तीप्रमाणें ठेवावी.

**स्त्रियांस बस्ति देण्याचा विधि**—स्त्रियांचे गर्भाशयाचें द्वार आर्तवकाळी मात्र ( विटाळाच्या चवथ्या दिवसापासून १६ दिवसपर्यंत ) उघडें असतें व ह्मणूनच स्नेह ग्रहण करण्यास योग्य असतें.ह्मणून याच कालांत त्यांना उत्तर बस्ति द्यावा. परंतु योनिभ्रंश, योनिशूळ, शास्त्रोक्त योनिरोग व प्रदर वगैरे दारुण प्रसंगीं ऋतुसमय नसतांनाही तो देण्यास हरकत नाही. स्त्रियांच्या उत्तरबस्तीची नळी १० अंगुळें लांब असून तिचें तोंड एक मुगाचा दाणा मावण्याजोगें असावें. व ती प्रौढ स्त्रियांच्या योनिद्वारांत ४ बोटें व मूत्रकृच्छ्रादि विकारांत मूत्रद्वारांत २ बोटें घालावीं. मुलीच्या मूत्रद्वारात घालणें झाल्यास ती एकच बोट घालावी. [ मुलींच्या योनिद्वारांत उत्तरबस्तीचा उपयोग करण्याचें मुळींच कारण नाही. ] प्रौढ स्त्रियाना उत्तरबस्ति देण्याचें मध्यम मान चार तोळे व मुलीना दोन तोळे जाणावें. ज्या स्त्रीस उत्तरबस्ती द्यावयाचा असेल तिला गुडघे वर करून व मांड्या आकुंचित करून उताणी निजवावी मग पिचकारी द्यावी. एका अहोरात्रींत ३।४ पिचकाऱ्या द्याव्या. याप्रमाणें ३ दिवस करावें. रोजच्या रोज स्नेहाचे प्रमाण वाढवावें व ३ दिवस सोडून पुनः ३ दिवस करावें. कांही वैद्यांचें मत असें आहे की, बस्ति देताना स्त्रीला उताणी निजवून तिचे गुडघे वर उचलून धरून नंतर तो स्नेह बाहेर न येईल अशी पिचकारी मारावी.

**बालकास बस्ति देण्याचा प्रकार**—बालकास मूत्रकृच्छ्र विकार झाला असता वैद्यानें निःशंकपणें हात न कापविता बारीक नळी योजून हलका हलका त्या नळीचा शिश्नाचे आत एक अंगुळप्रमाण प्रवेश करून पिचकारी मारावी. नंतर ती हळुहळु पिचकारी बाहेर काढावी.

**शोधनद्रव्येंकरून बस्तीचा विधि**—मूत्रकृच्छ्रादिक जे रोग त्याचेठायीं

शोधनद्रव्यें जीं एरंडेल तेलादिक जी औषधें त्याचा समुदाय जो इहींकरून योनि-मार्गाचेठायीं बस्ति द्यावा, ह्म० पिचकाऱ्या माराव्या अथवा फलवर्ति ह्म० एरंडबी-जादिक जी औषधें त्यांची घट्ट वात करून अथवा सुताची वात करून त्या वातीला एरंडबीजादिक जी औषधें त्यांचा चोपड करून ती वात योनीचेठायीं योजावी, जर त्या वातीच्या अधोभागीं बस्तिस्थान आहे तें विदग्ध ह्म० विकृत झालें असतां उंबर वड आदिकरून क्षीरवृक्ष जे त्यांचा काढा करून त्याचा अथवा थंड दुधाचा बस्ति योजावा; ग्ह० बस्तिस्थान शुद्ध होतें. आणि हा बस्ति शुक्रधातूसंबंधी ज्या पीडा होतात त्या व स्त्रियास विटाळशीपणासंबंधीं ज्या पीडा होतात त्यांतें दूर करितो. व ज्या मनुष्याला प्रमेह आहे त्यांना उत्तरबस्तीचा क्वचितही उपयोग होत नाहीं. उत्तरसंज्ञकबस्ति स्नेहबस्ती करून उत्तम प्रकारें योजिला असतां त्याचें लक्षण क्रमें-करून शुक्रधातूसंबंधी ज्या प्रमेहादिक पीडा त्या दूर होतात. गुदाचे ठायीं तूप लावून रोग्याचे अंगुष्ठप्रमाण चांगली घट्ट वात करून मळ होण्याविषयीं एरंड बीजा-दिक जीं रेचक औषधें त्यांचा त्या वातीला लेप करून गुदाचेठायीं योजावी.

**बस्तीचा सामान्य व विशेष प्रकार**—चिकणामूळ, गुळवेल, त्रिफळा, रास्ना व दशमुळें ही चार चार तोळे, गेळफळें ८ व बकऱ्याचें मांस१००तोळे, याचा पाण्यात चतुर्थांश काढा करून गाळून त्यांत ओंवा, गेळफळ, वेलकाचरी, कोष्ठ, वेखंड, वडीशेप, नागरमोथे व पिंपळी यांचा कल्क व गूळ, मध, तेल, तूप, व सैं-धव घालून किंचित ऊन करून त्याचा बस्ति द्यावा. हा सर्व रोगांचा नाशक अ-सून निरोगी मनुष्यासही हितावह आहे. तसाच जीवन व पौष्टिकही आहे. ज्या ज्या बस्तीच्या औषधांत कल्क सांगितला नाही त्या सर्व ठिकाणी हा वरील कल्क घालीत जावा. जेष्ठमध, लोध, चंदन, वाळा, पाढरें व निळें कमळ यांनीं सिद्ध केलेल्या गाईच्या दुधांत साखर, मध, तूप, आणि जीवनीय गणाच्या औषधांचा कल्क घालून थंड झाल्यावर त्याचा बस्ति द्यावा. हा सर्व प्रकारचे पित्तविकाराचा नाश करणारा श्रेष्ठ आहे. नाजुक मनुष्याकरिता बस्ती देण्याचा प्रकार—दूध १६ तोळे, मध ८ तोळे, तेल ८ तोळे व तूप ८ तोळे हे एकत्र करून रवीनें घुसळून त्याचा बस्ती द्यावा. हा वातनाशक असून शक्ति व वर्ण वाढविणारा असा आहे. तेल, सुरेची निव्वळ, मध व तूप हीं प्रत्येक आठ आठ तोळे बिल्वादि पंचमूळाचा काढा १६ तोळे, कुळिथाचा काढा १६ तोळे, ही सर्व एकत्र करून बस्ति द्यावा, ह्मणजे वायूचा नाश होतो. कडू पडवळ, वाळांतनिंब, रोहिसगवत रासना व साल्वीण या प्रत्येकाचा काढा आठ आठ तोळे, तूप आठ तोळे व शिरसाचा कल्क यांचा बस्ती अभिष्यंद, कृमि, कुष्ठ व प्रमेह याचा नाश करितो. तेल, गोमूत्र, दह्याची निवळ व आवट काजी ही आठ आठ तोळे व शिरसाचा कल्क याचा बस्ति मळवरोध व आनाह यांचा नाशक आहे. शिरदोडी, उंसांचा रस, साल-वण, रास्ना व भुईकोहळा या प्रत्येकाचा काढा आठ आठ तोळे, मध ८ तोळे, तूप आठ तोळे, व पिंपळीचा कल्क याचा बस्ति शुक्रवर्धक आहे.

**सर्व ऋतूंत देण्याचे बस्ति**—सर्व ऋतूंत देण्यास योग्य, अनुभवसिद्ध, अपायरहित, पुष्कळ फळ देणारे, सुखावह व शक्ति आणि पुष्टि करणारे असे बस्ति सांगतों.—मध व तेल समभाग, सैंधव एक तोळा, बडीशेप दोन तोळे व एरंडमुळाचा काढा याचा निरूहबस्ति द्यावा. ह्मणजे प्रमेह, अर्श, कृमि, गुल्म व अंडवृद्धि यांचा नाश होतो व हें रसायन आहे. यांतच जेष्ठीमधेचा कल्क घातला असतां नेत्राला सुखावह व रक्तपित्त नाशक होतो. नागरमोथे, वासनवेल, गुळवेल, एरंडमूळ, चिकणामूळ, रास्ना, पुनर्नवा, मंजिष्ठ, बाहावा, वाळा, त्रायमाण, बेहेडा, कुटकी व लघुपंचमूळ हीं प्रत्येक चार चार तोळे आणि आठ गेळफळें याचा ५१२ तोळे वजनी पाण्यात चतुर्थांश काढा करून गाळून त्यात २५६ तोळे दूध घालून पुन्हां दूध शेप राहितोंपर्यंत आटवावें. नंतर त्याचें चतुर्थांश जंगल मांसाचा सुरवा घालावा, तसेंच तूप, मध, सैंधव जेष्टिमध, बडीशेप, गव्हला, इंद्रजव, आणि रसांजन यांचा कल्क घालून किंचित् उष्ण बस्ति द्यावा. हा बस्ति मांस, अग्नि, बळ व शुक्र याना वाढवितो. वातरक्त, मूर्छा, मेह, अर्श, गुल्म, मलमूत्राचा अवरोध, विषमज्वर, विसर्प, अंडवृद्धि, आध्मान, प्रवाहिका, अंडसंधि, मांड्या, कंबर, कुशी, मान, कान, व डोकें यातील शूल, प्रदर, उन्माद, सूज, कास, मूतखडा, व वात कुंडलिका हे रोग दूर करितो. हा नेत्रास हितावह आहे. व यापासून पुत्रप्राप्ति होते. व सर्व बस्तीत श्रेष्ठ व रसायन असा आहे.

**सामान्य औषधें**— बडीशेप, करंज व कांजी वगैरे आम्ल पदार्थ यांणी सिद्ध केलेलें तेल वायूवर बस्ति देण्यास योग्य आहे. किंवा सैंधव तापवून लाल करून तेलांत टाकावें, त्याणें तापलेल्या तेलाचा बस्तीद्यावा ह्मणजे वाताचा नाश होतो. हरणदोडी, गेळफळ, मेदा, मुंडी, जेष्टीमध, चिकणामूळ, बडीशेप, ऋषभक, पिपळी, पांढरी कावळी, शतावरी, कवचबीज, क्षीरकांकोळी, काकडशिंगी, कचोरा व वेखंड यांचा कल्क, तेल, तूप, व त्या तेलतुपाच्या चौपट दूध, एकत्र सिद्ध करावें. याचा बस्ति, पौष्टिक, वातपित्तनाशक, शक्ति, शुक्र व अग्नि यांचा वर्धक, स्त्रियांचे रजाचा व पुरुषाचे शुक्राचे विकार दूर करणारा व पुत्र देणारा असा आहे. बिल्वादि पंचमूळानीं किंवा इतर कफनाशक औषधांनी सिद्ध केलेलें तेल कफनाशक आहे. तसेंच गेळफळें व त्यांचें आठपट आम्ल पदार्थ घालून तयार केलेलें तेल कफावर अनुवासन देण्यास उत्तम आहे. मृदु बस्ती देऊन तो बाहेर न येईल तर दुसरा तीक्ष्ण बस्ति द्यावा. तीक्ष्ण बस्तीनें हल्लक झाल्यास स्निग्ध, मधुर थंड व सौम्य असा बस्ति द्यावा. प्रसंगानुसार गोमूत्र, पिलूचीं फळें, चित्रक, सैंधव, क्षार व शिरस यांनी बस्ति तीक्ष्ण करावा. व तूप आणि दूध घालून त्यास सौम्यपणा आणावा शक्ति, काल, रोग, दोष व प्रकृति यांचा वारंवार विचार करून तदनुरूप त्या त्या रोगनाशक औषधाच्या वर्गानीं सिद्ध केलेला बस्ती दिला असता तो ते ते रोग दूर करितो. उष्णानें पीडित झालेल्यास शीत व शीतानें पीडित झालेल्यास किंचित् उष्ण असे व त्या त्या रोगास योग्य औषधी घालून कल्पनेनें बस्ती-

ची योजना करावी. शोधनसाध्य रोगावर बृंहण वस्ति देऊं नये. मेदस्वी, कुष्ठ व मेह यांनी पीडित अशा रोग्यास शोधन द्यावे. क्षयरोगी, उरःक्षत झालेला, अशक्त, मूर्छित, ज्याचें शरीर शुष्क व वमनविरेचनादिकांनी शुद्ध झालें आहे व ज्याचें आयुष्य दोषांच्या हातीं आहे, ह्मणजे दोष काढले असतां ज्यास मरणाची भीति आहे अशा रोग्यास शोधन वस्ती देऊं नये

**निरूहवस्तीचे अपायावर चिकित्सा**—ज्याचें शरीर स्निग्ध, स्वेदन झालें नाही व ज्याचा कोठा जड आहे त्याला थंड स्नेह व सैंधवहीं ज्यात कमी घातली आहेत असा केवळ पातळ किंवा दाटच वस्ति दिला असतां तो दोपास चाळवून बाहेर काढण्याविषयी समर्थ नसल्यामुळें दोष तसेच राहतात. त्यामुळें वायू व मलमूत्राचा अवरोध, नाभी व बस्ति यांत शूळ व दाह, उरांत चिकटा. गुदांत सूज, कंडू व गांठी, विवर्णता, चैन न पडणें व अग्निमांद्य हे विकार होतात. याजवर गुदांत औषधाची वात घालणें, घाम काढणें व योग्य वाटल्यास रेचक हे उपाय करावे. अथवा बेलमूळ, तेंड, देवदार, जव, बोरं, कुळीथ, सुरा वगैरे द्रव पदार्थ व पूर्वी सांगितलेला सर्व वस्तीस सांगितलेला कल्क यांचा वस्ती दिला असतां दोष दूर होतात. दोपानी व्याप्त, रुक्ष व क्रूर असा कोठा असून त्याजवर कमी जोराचा वस्ती दिला असता तो दोपानी कोंडला जाऊन त्यास बाहेर येण्यास वाट न सांपडल्यामुळें तो वायूस कोंडतो. नंतर वायूचा मार्ग बंद होऊन तो उलटला ह्मणजे आध्मान, मर्मपीडा, गुद व कोठा यांत जळजळ, अंड व अंडसंधी यांत ठणका हे विकार करितो; व हृदय वेदनेनें व्यापून चोहीकडे धावतो. त्याजवर नाभी व कंबरेच्या पृष्ठभागचे अंगास तेल लावून शेकल्यावर गुदांत औषधाची वात घालावी. बिल्वादि पंचमूळाचा काढा व पिलूची फळें व शिरस यांचा कल्क याचा बस्ति द्यावा. अथवा सरळ देवदार व देवदार यांनी सिद्ध केलेल्या तेलाचा अनुवासन वस्ति द्यावा.—बस्ति दिल्यावर वेगांचा अवरोध केल्यानी किंवा फार वस्ति दिल्यानें, लवण, व स्नेह यांनी रहित, थंड, थोडा किंवा ज्यात औषधें थोडीं, किंवा सौम्य असा वस्ति दिल्यानें तो वायूच्या जोरानें वर फेंकला जाऊन तोंड व नाक यातून बाहेर पडतो व मूर्च्छा, उम्हासे, ताहान व दाह इत्यादि विकार होतात. त्यास मूर्च्छा आली असता तोंडावर थंड पाणी शिपडावें व शुद्धीवर आल्यावर ग्लानि जाईपर्यंत वारा घालावा, त्याकडून प्राणायाम करवावा पाठ, कुशी व पोट ही हात ऊन करून त्यांनी खाली उतरत उतरत रगडावी. शेंडी धरून उचलून झोके द्यावे. व क्रूर प्राण्याकडून किंवा इतर साधनांनी त्यास भिववावें; ह्मणजे वस्ति खाली येतो. न मरे इतक्या बेतांनी हातांनी किंवा वस्त्रानें गळा दाबावा, कारण प्राण व उदानवायू यांस कोंडले ह्मणजे अपानवायूचा मार्ग मोकळा होऊन तो वस्तीस लागलाच खाली ओढितो. कोष्ट व सुपारी याचा कल्क कांजीबरोबर पाजावा. कारण तो उष्ण, तीक्ष्ण व सारक असल्यामुळें वस्तीचें अनुलोमन करितो. निशोत्तर व हिरडेदळ याचा कल्क गोमूत्राबरोबर प्राशन केला असतां अनुलोमन होतें. दोष प-

काशयांत असल्यास शेक द्यावा. आणि नंतर जव, बोरें व कुळीथ हीं गोमूत्रांत शिजवून त्यांचा कल्क व दशमूळाचा काढा यांचा निरूहबस्ती द्यावा. दोष उरांत राहिल्यास बिल्वादि पंचमूळाचा बस्ती द्यावा. दोष डोक्यांत गेला असेल तर नस्य व सौम्य धूम्रपान करावें. व पांढऱ्या मोहऱ्या गोमूत्रांत किंवा पाण्यांत वांटून डोक्यावर थापाव्या —अति स्वेदित मनुष्यास अतिशय उष्ण, तीक्ष्ण, आंबट, किंवा दाट, बस्ती दिला असतां किंवा दोष अल्प व कोठा हलका असून पुनः पुनः बस्ती दिला असतां अति योग होऊन पोट दुखूं लागतें; याचीं लक्षणें व चिकित्सा विरेचनाच्या अति योगाप्रमाणें आहेत.—क्षार, आंबट, तीक्ष्ण, उष्ण, व लवण असा बस्ती किंवा पित्तविकार झालेल्या मनुष्यास दिलेला बस्ती गुदाचा दाह, खरवडणें व क्षत करीत, परिस्राव उत्पन्न करितो. नंतर करपलेलें रक्त पडतें. आणि अनेक वेळा फार जोरानें अनेक वर्णांनें युक्त असें पित्त पडतें. वारंवार बेशुद्ध होतो. अशा विकारावर रक्तपित्त किंवा रक्तातिसारनाशक उपाय करावे. दाहादिकांवर निशोत्तराचा कल्क, मनुकांच्या काढ्याबरोबर द्यावा; ह्मणजे पित्त मळ व वायू यांचें हरण करून दाहादि विकार दूर करितो. रेच झाल्यानंतर, साखर घालून निवालेली तांदुळाची कण्हेरी पाजावी. फार रेच होऊन मळ कमी झाल्यास उडदाच्या काढ्याबरोबर मुगाच्या घुगऱ्या खाऊं घालाव्या. व पिण्याकरितां दही किंवा सुरा द्यावी.

**अनुवासन बस्तीचे अपायावर चिकित्सा**—वायूवर थंड व थोडा, पित्तावर फार उष्ण, कफावर मृदु, फार जेवला असतां गुरु ह्म० जड, तसाच मळाचा संचय झाला असतां कमी जोराचा, स्नेहबस्ति दिल्यास वातपित्तादिकानी आवृत झाल्यामुळें किंवा त्याचा जोर कमी झाल्यामुळें तो बाहेर येत नाहीं. स्तंभ ह्मणजे अंग ताठणें, मांड्या गळणें, आध्मान, ज्वर, शूळ, अंगमर्द, पार्श्वशूल व पिळवटल्या सारखी पीडा, हे विकार झाले असतां वायूनें स्नेह आवृत झाला असें जाणावें.त्याजवर रास्ना, पिपळी व देवदार यानीं सिद्ध केलेलीं तैलें, गोमूत्र, पंचमूळाचा काढा, सौवीर, सुरा,बोरें, कुळीथ व यव यांनी तयार केलेले स्निग्ध, आम्ल, लवण, व उष्ण असे निरूह बस्ती द्यावे ह्मणजे तो स्नेह बाहेर येतो. संध्याकाळीं जेवल्यावर रास्ना, पिंपळी व देवदार यानी सिद्ध केलेल्या तेलाचा अनुवासनबस्ती द्यावा. पित्तानें स्नेह आवृत झाला असतां तहान, अंगाचा दाह, तावडेपणा, मोह, विवर्णता, अंधेरी व ज्वर हे विकार होतात. त्याजवर गोड व कडू निरूह बस्ति देऊन त्यास बाहेर काढावा. झांपड, हिव, ताप, आळस, लालास्राव, अरुचि, जडत्व, मूर्च्छा व ग्लानि हीं लक्षणें झाली असतां स्नेह कफानें आवृत झाला आहे असें जाणून सुरा व गोमूत्र यांत तयार केलेलें गेळफळाचें तेल आठपट आम्ल पदार्थ घालून सिद्ध केलेले तुरट, कडू व तिखट असे निरुहबस्ति देऊन त्यास बाहेर काढून टाकावें. वांति, मूर्च्छा अरुचि, ग्लानि, शूळ, निद्रा, अंगमर्द व दाह इ० आमाची लक्षणें झाली असतां स्नेह अति भोजनानें आवृत झाला असें जाणावें. त्याजवर तिखट औषधाचे काढे व

सैंधवादिकांचीं चूर्ण देऊन त्याच्या आमाचें पाचन करावें. सौम्य रेचक द्यावें व आमाजीर्णावर सांगितलेली सर्व चिकित्सा करावी. मळ, मूत्र व वायु यांचा अवरोध, वेदना, जडत्व, पोट फुगणें व उरांत जखडल्यासारखें होणें, या लक्षणांवरून स्नेह मळानें आवृत झाला आहे असें जाणून स्नेह, स्वेद, गुदांत वात घालणें, बिल्वादि पंचमूळांनीं सिद्ध केलेले निरुह व अनुवासनबस्ति यानीं त्यास बाहेर काढावा. तसेंच उदावर्तावर जी चिकित्सा सांगितली आहे तिची योग्य रीतीनें योजना करावी. जेवला नसतां किंवा गुद सुजलें असतां किंवा फक्त कण्हेरी प्याला असतां स्नेह बस्ति दिला तर त्याला वरून अन्नाचे दडपण नसल्यामुळें तो जोरानें वर शिरतो. आणि कंठाच्या व नासिकादिकांच्या छिद्रांतून तो बाहेर येतो त्यावर गोमूत्र, काळे व अरुण तेड यांचा काढा व जव, बोरें आणि कुळिथ यांचा कल्क यांनीं तयार केलेला निरूह व त्यानींच सिद्ध केलेल्या तेलाचा अनुवासनबस्ति द्यावा. स्नेह घशांतून येत असल्यास त्याजवर श्वासावरोध, गळा बेतानें दाबणें, रेचक, वांति बसविणारे उपाय करावे. अपक्व स्नेहाचा बस्ति कधींही देऊं नये. कारण तो स्नेह गुदास चिकटून तहान, मोह, कंडू, सूज हे विकार उत्पन्न करितो. त्याजवर तीक्ष्ण निरुहबस्ति व रुईच्या पानाच्या रसानें सिद्ध केलेल्या तेलाचा बस्ति द्यावा. बस्तींतील वायु न काढतां बांधला किंवा सगळेंच द्रव्य आंत घातलें तर त्यामुळें वायु आंत शिरून क्षुब्ध होऊन शूळ व टोंचणी उत्पन्न करितो त्यावर गुदास तेल लावून शेकावें व वातनाशक अन्न खावें. बस्ति घाईनें दाबला किंवा घाईनें नळी बाहेर काढली किंवा घाईनें आत सारली तर कंबर, गुद, पोटऱ्या व बस्ति याना स्तंभ ह्मणजे ताठणें, ठणका व फूट हीं लागतात. त्याजवर वातनाशक भोजन, स्वेद, अभ्यंग व बस्ति द्यावे. बस्ती दाबीत असतां मध्यें सोडला( दाब काढला ) तर त्यामुळें गुदांत वायु कुंठित व बलवान् होऊन छातीत व डोक्यात वेदना उत्पन्न करितो व मांड्या गळतात. त्यावर बिल्वादि पंचमूळांचा काढा, गोमूत्र व गेळफळ आणि श्यामादिक गण यांचा कल्क या सर्वांचा बस्ति द्यावा.फार जोरानें बस्ती दाबला तर कोठ्यांतच राहतो ( बाहेर येत नाही ) किंवा घशांत येतो त्यावर बस्ति, रेचक किंवा गळा दाबणें वगैरे हे उपाय करावे. वमनादिकांनी शुद्ध होऊन शरीर, शक्ति व अग्नि ही ज्यांची क्षीण झाली आहेत तो मनुष्य कोंवळया अंड्याप्रमाणें किंवा भरलेल्या तेलाच्या भांड्याप्रमाणें आहे. ह्मणून वैद्यानें त्यास कांहींएक कुपथ्य न करूं देतां मोठ्या प्रयत्नानें सांभाळावें. प्रथम त्यास मधुर वमनास आवडणारे असे पदार्थ द्यावे. नंतर आंबट, खारट पदार्थ, नंतर पुनः गोड कडू आणि त्यानंतर तुरट व तिखट पदार्थ द्यावे. याप्रमाणें एकमेकाविरुद्ध रसांचा उपयोग उलटून पालटून करावा व स्निग्ध आणि रुक्ष याचाही पाळीनें उपयोग करावा आणि अशा

---

१—काळें निशोत्तर, लहान मोठी दंती, लोध सुपारी, पाढरा तेड, साखवेल, शिकेकई, पिंवळा धोत्रा, इंद्रावण, आघाडा, कपिला, गुळवेल, करज, बोकडी, बाहवा, शेवगा, ऊस व पिलूचीं फळे हा श्यामादि गण गुल्म, अरुचि, विष, कफ, हृद्रोग व मूत्रकृच्छ्र याचा नाश करतो

रीतीनें क्षीण झालेल्या मनुष्यास नीट करावा. त्यास सर्व सोसूं लागेल व शक्ति कायम झाली ह्मणजे तो [ वमनादिकांनीं शुद्ध होऊन कृश झालेला मूळच्याप्रमाणें ] हुषार झाला असें जाणावें.

---

# नस्यविधि.

॥ नस्यंतत्कथ्यतेधीरैर्नासाग्राह्यं यदौषधं ॥ नावनंनस्यकर्मेतितस्यनामद्वयंमतं ॥

**अर्थ**—जें औषध नाकांत घालावयाचें त्याला नस्य ह्मणतात. त्या नस्याचीं नांवें नावन आणि नस्य अशीं दोन आहेत व या नस्याचे पोटभेद दोन-एक रेचन आणि एक स्नेहन त्यांमध्यें रेचननस्य तें कर्षण जाणावें ह्मणजे वातादि दोषांचें छेदन करणारें होय. व जें स्नेहन तें बृंहण जाणावें ह्मणजे धातुवृद्धि करणारें होय.

**नस्याचा काळ**—कफाच्या नाशनाविषयीं नाकांत औषध प्रातःकाळीं घालावें, पित्ताचे नाशनाविषयीं दोन प्रहरीं व वायूचे नाशनाविषयीं सायंकाळीं घालावें. व रोगाचें फार बळ असेल तर रात्रीहि घालावें.

**नस्याचा निषेध**—भोजन केल्यावर लागलीच अभ्र आलें असतां व लंघन केलें असतां घालूं नये. नूतन पिनसरोग, गर्भिणी स्त्री, विषदोष, अजीर्णेंकरून पीडित, बस्ती दिलेला, तूप तेल इत्यादिक स्नेह, पाणी, मद्य, यांचें सेवन केलेला, क्रोधिष्ट, शोक व तृषा यांणीं पीडित, बाल, वृद्ध, वात, मूत व मल यांचा निरोध करणारा, स्नान करावयाचें आहे तो मनुष्य, व ऐंशी वर्षांपलीकडील मनुष्य व सात वर्षांअलीकडील बाल इतक्यांना नस्य देऊं नये.

**रेचननस्याचा विधि**—जें रेचनाविषयीं औषध नाकांत घालावयाचें तें ओंवा, मोहऱ्या इत्यादिकांचें तीक्ष्ण तेल काढून नाकात घालावें. अथवा तीक्ष्ण औषध जें त्यासह स्नेह सिद्ध करून अथवा तीक्ष्ण औषधांचा काढा अथवा रस त्यांत स्नेह सिद्ध करून नाकांत घालावा. रेचनाविषयीं नाकाचे दोहों छिद्रांत मिळून औषधाचे आठ बिंदू घातले असता ती उत्तम मात्रा जाणावी, सहा बिंदूंची मध्यम, व चार बिंदूंची कनिष्ठ मात्रा जाणावी. नस्यकर्माचे ठायीं जें तीक्ष्ण औषध असेल तें चार मासे योजावें, हिंग, एक यव प्रमाण, सैंधव माषप्रमाण ह्मणजे पांच गुंजा, दूध, आडीच तोळे, पाणी ३ तोळे, साखर, दाळिंब इत्यादिक मधुर द्रव्यें जीं तीं प्रत्येक एकेक तोळा नाकांत घालावीं.

---

१—नाक हें शिरोद्वार होय ह्मणून त्या द्वाराने घातलेले औषध शिरासबधीं सर्व भागांत पसरून तेथील सर्व रोगाचा नाश करितें

२—वेखड, कोष्ठ, इत्यादिक तीक्ष्ण औषधें स्नेहात म्ह० तूप अथवा तेल यात सिद्ध करून नाकात घालावीं.

**विरेचननस्याचे भेद**—याचे भेद दोन, एक अवपिंड व एक प्रधमन असे जाणावे. हे मस्तकाचे रेचाविषयी योजावे. तीक्ष्ण औषधें ह्मणजे सुंठ, मिरें व वेखंड इत्यादिक औषधें पाण्यात वाटून कल्क करून बारीक वस्त्रानें पिळून जो रस निघतो त्याला अवपिड ह्मणतात. व सहा अंगुळें प्रमाण लांब आणि सरळ अशी नळी करून त्यामध्यें तिखट ह्मणजे सुंठ, वेखंड, पिपळी इत्यादिकांचें तीखट चूर्ण करून तें चूर्ण आठ मासे प्रमाण घालून तोंडाचे वाऱ्याने नाकांत फुंकावें त्याला प्रधमन असें ह्मणतात.

**रेचन व स्नेहननस्याविषयीं योग्य**—ऊर्ध्वजत्रुगतरोग, कफसंबंधीं स्वराचा क्षय, अरुचि, पडसें, मस्तकशूळ, गलरोग, गलगंड, अभिष्यंद, ग्रंथी, पिनसं[1], अपस्मार व कुष्ठ या रोगांचे ठायीं रेचकनस्य हितकारक जाणावें. व भित्रा मनुष्य सुखी, क्षतपीडित स्त्री, कृश मनुष्य व बाल, वृद्ध याचे ठायीं स्नेहयुक्त नस्य द्यावें.

**अवपीडन नस्यास योग्य**—गलरोग, व सन्निपात, फार झोंप, विषमज्वर, मनोविकार, कृमिरोग, यांचेठायी अवपीडन नस्य योजावें.

**प्रधमन नस्यास योग्य**—अत्यंत वाढलेले दोष ह्मणजे मूर्छा, अपस्मारादिक व संज्ञा नष्ट झाली आहे असे सन्यासादिक रोग याचेठायी अत्यंत तीक्ष्ण असें नस्य नाकांत फुंकावें.

**रेचन नस्य**—सुंठ कोंवट पाण्यांत उगाळून त्यांत गूळ मिश्र करून नाकांत घालावी, व पिपळी आणि सैंधव ही कोंवट पाण्यांत उगाळून नस्य द्यावें, तेणेंकरून डोळे कान, नाक, मस्तक, हनुवटी, मान, भुज व पाठ याचेठायी ज्या पीडा होतात त्या दूर होतात मोहाचे लांकडाची अंतरसाल ह्मणजे गाभा, पिंपळी, वेखंड, मिरें व सैंधव ही औषधें कोंवट पाण्यात वाटून नस्य द्यावें ह्मणजे अपस्मार, उन्माद, सन्निपात, अपतंत्रकवायु यापासून संज्ञा ह्मणजे ज्ञान नष्ट होतें तें दूर होऊन मनुष्य लवकर सावध होतो. सैंधव व शेवग्याचें बीज, पाढऱ्या मोहऱ्या व कोष्ट ही औषधें बोकडाचे मुतात वाटून नस्य द्यावें; तेणेंकरून तंद्रा ह्मणजे डोळ्यावर झांपड पडते ती दूर होते व पूर्वोक्त अपस्मारादि रोगही दूर होतात.

**बृंहण नस्य**—बृंहण ह्मणजे धातु वृद्धि करणारें असें नस्य, त्या बृंहणनस्याचे भेद दोन, मर्श, व प्रतिमर्श हे स्नेहनाविषयीं योग्य जाणावे. त्या मध्यें मर्शनस्याची तर्पणी[2] मात्रा जाणावी. ती आडोच तोळे प्रमाणाची मुख्य मात्रा होय, सवा तोळ्याची मध्यम, व पाउण तोळ्याची हीन मात्रा जाणावी. आणि ती मात्रा दोषाचें बलाबल पाहून मनुष्याला वस्त्रादिकांनी वेष्टन करून एकेका नाकपुडीत दोन अथवा तीन वेळ अथवा एक दिवसाआड किंवा दोन दिवसांआड तीन दिवसांआड अथवा पांचवे किंवा सातवे दिवशी घालावी.

---

१—नाकातील कृमि. २—धातवादिकाची तृप्ति करणारी जी मात्रा तिला तर्पणी ह्मणतात.

**नस्य अधिक झालें असतां अवगुण**—मर्शन नस्याची मात्रा धात्वादिकांची तृप्ति करणारी आहे तिचें आधिक्य होउन दोषांचा उत्कर्ष झाला असतां व मस्तकाचे विरेचनाविषयीं विरेचनसंज्ञक नस्याची मात्रा आहे तिचें आधिक्य होऊन मस्तकांतील मेदादिकांचा क्षय झाला असतां त्यापासून अनेक प्रकारच्या पीडा होतात. त्यामध्यें ज्या दोषांचे उत्कर्षनिमित्त पीडा होतात त्या दूर होण्याविषयीं ओकारीचें व ढाळाचें औषध द्यावें. व क्षयानिमित्त ज्या पिडा होतात त्या दूर होण्याविषयीं बृंहण औषध ह्मणजे धातुवृधि करणारें औषध नाकांत अथवा पोटांत द्यावें.

**बृंहण नस्यास योग्य**—मस्तकरोग, नासारोग, नेत्ररोग, सूर्यावर्त, अर्धशिशी, दंतरोग, दुर्बळ मनुष्य, मान, खांदे व बाहु यांच्या ठायींच्या पीडा, मुखशोष, कर्णनाद, वातपित्तसंबंधी विकार, पलितरोग, ह्मणजे अकाली मनुष्याचे पांढरे केश होतात तो, मस्तकाचे व मिशाचे केश गळून पडतात तो, इंद्रलुप्त रोग, या सर्व रोगांचेठायीं तूप आदिकरून जे मधुर पदार्थ आहेत त्यांचें नस्य द्यावें.

**पक्षघातादिकांवर नस्य**—उडीद, कवचबीज, रास्ना, चिकणामूळ, एरंडमूळ, रोहिपतृण व आस्कंद याचा काढा करून त्यांत भाजका हिंग व सैंधव घालून कोंवट कोंवट त्या काढ्याचे नस्य द्यावें. तेणेंकरून कंपसहित पक्षघातवायु, आर्दितवायु, मन्यास्तंभवायु व अवबाहुक वायु हे दूर होतात.

**नस्याच्या मात्रेचें प्रमाण**— तूप तेल आदिकरून जे स्नेह पदार्थ त्यांमध्यें दोन पेरें बुडत अशी तर्जनी (आंगठ्याजवळचें बोट) बुडवून बाहेर काढून त्या पेरापासून जो बिंदु खाली पडतो त्याला बिंदुमात्रा ह्मणतात. अशा आठ मात्रांचा एक शाण ह्मणजे चार मासे होतात. ती चार माशाची मात्रा ह्मणजे आठ बिंदु मर्शननस्याचेठायीं द्यावे. आणि प्रतिमर्शन नस्याचेठायी दोन बिंदु सोडावे.

**प्रतिमर्शननस्याची वेळ**—याच्या वेळा प्रातःकाळ, तोंड धुतल्यावर, घरांतून बाहेर निघत असता, परिश्रमाचेअंती, मार्ग चालून आल्यावर, मैथुनाचेअंती, मळमूत्र विसर्जनाचेअंती, अंजन घातल्यावर, ग्रासाचे व भोजनाचेअंती, दिवसां निजून उठल्यावर, ओकारीचे अंती, व सायंकाळीं असें जाणावें. मनुष्याला नस्य दिलें असता अल्प शिंक येऊन तो स्नेह तोंडांत उतरला असता तो मनुष्य प्रतिमर्शन नस्यानें तृप्त झाला असें जाणावें. तो तोंडात उतरलेला स्नेह थुंकून टाकावा.

**प्रतिमर्शन नस्यास योग्य**—धातुक्षीण मनुष्य, तृषा व शोष यानीं पीडित, बाल व वृद्ध, ऊर्ध्वजत्रुजरोग ( मानेच्या मुळाचे ऊर्ध्वभागीं जे रोग होतात ते सर्व रोग ) त्वचेला शिथिलपणा येतो तो, पलितरोग, हे सारे रोग प्रतिमर्शनस्यंकरून दूर होतात. व चक्षुरादि इंद्रियांना बळ येतें.

**वलीपलितावर नस्य**—बेहेडे, कडूनिंब, शिवण, हिरडे, भोकर व आंवळी इतक्यांच्या बियांच्या आंतल्या गोळ्यांचें तेल वेगळें वेगळें काढून एकेकाची वेगळी

वेगळीं नस्यें द्यावीं ह्मणजे अकाळीं पांढरे केंस होतात ते तरुण अवस्थेसारखे काळे निश्चयेंकरून होतात.

**नस्यास स्थान**—वायु व धुराळा नसेल अशा स्थानीं मनुष्यांनीं दंतधावन व धूमपान करून कपाळ व गळा शुद्ध करून घर्मयुक्त करावे. नंतर बिछान्यावर उताणें निजवून मस्तक थोडें लोंवतें ठेवून हातपाय लांब पसरून वस्त्रानें डोळे झाकावे. वैद्यांनी रोग्याचें नाक उंच उचलून धरून जें नस्य घालावयाचें तें कोंवट कोंवट असून त्याची धार एकसारखी घालावी. व तें नस्य सोन्यारुप्याचें पात्र किंवा शिंप अथवा फडक्याचे बोळ्यानें पिळून नाकांत घालावें. औषध नाकांत गेल्यावर मस्तक कांपवूं नये. कोप करूं नये, व भाषण करूं नये, शिंक येऊं देऊं नये, हंसूं नये, जर असें आचरण केलें नाहीं तर स्नेह मस्तकाचे आंत चांगला जात नाहीं व खोकला, पडसें, मस्तक व नेत्र यांना पीडा इत्यादि उपद्रव होतात. नस्याचें धारण पांच, सात किंवा दहा अंकेंपर्यंत करावें. नंतर बसून नाकातून तोंडात जो द्रव उतरतो तो समोर न थुंकतां बाजूस थुकावा. नस्य कर्म झाल्यावर मनाला संताप येऊं देऊं नये, धुरळ्यांत बसूं नये, क्रोध करूं नये, झोप येऊं न देतां शंभर अंक मोजीतोंपर्यंत स्वस्थ उताणें निजावें. याप्रकारें विरेचन नस्याचे अंती तळपाय, हात, खांदे, कर्ण इत्यादि भागाला मर्दन करावें. नंतर कंठ शुद्धचर्थ कोंवट पाण्याच्या गुळण्या कराव्या.

**उत्तम शुद्धीचीं लक्षणें**—नस्येंकरून मस्तकाची चांगली शुद्धि झाली असतां शरीर हलकें, मनाची शुद्धि, मुख, नाक, कर्ण, व गुद यांचें शोधन होतें, मस्तकरोग दूर होतात. अंतःकरण व चक्षुरादिक इंद्रियेंही प्रसन्न राहतात.

**हीनशुद्धीचीं लक्षणें**—अंगास कंडू व चिकटपणा ही लक्षणें होतात. व मुख, नाक, कर्ण, गुद इत्यादिक बहिर्मार्ग यांतून कफाचा स्राव होतो.

**अति शुद्धीचीं लक्षणें**—नस्येंकरून मस्तकाची फार शुद्धि झाली असतां मस्तकाचे आंतील मगज त्याचा नासिकादिकावाटें स्राव होऊं लागतो. वायूची वृद्धि होते. इंद्रियाना विभ्रम होतो. व मस्तक शून्य होतें. याप्रकारें मस्तकाची अल्प शुद्धि किंवा फार शुद्धि झाली असता कफ वायुहारक अशीं नस्यें द्यावी. व चांगली शुद्धि झाली असता त्याचे नाकांत तुपाचें नस्य द्यावें. नस्येंकरून मनुष्याचें

---

१—दाण्याचें माप मोजतात त्या वेळीं सावकाशीनें व दमानें मोजतात त्याचप्रमाणें येथे मान धरावें. वातजन्य शिरोरोग, उचकी, अपतानक, मन्यास्तंभ, स्वररोग, इतक्या रोगावर प्रति दिवशीं सकाळीं व सध्याकाळीं नस्य द्यावें. इतर विकारावर एका दिवसाचे अतरानें द्यावें, नस्याची मर्यादा ७ दिवसपर्यंत जाणावी नस्य अर्धवट लागू झाल्यास रोग वाढतो व अति झाल्यास कृशत्व येतें वाग्भटाचें मत असे आहे कीं, ७ वर्षापूर्वी व ८० वर्षानंतर नस्य देऊं नये १८ वर्षांचे पूर्वी धूम्रपान करू नये व ५ वर्षाच्या पूर्वी गुळण्याचा उपयोग करू नये १० वर्षाच्या आंत व ७० वर्षानंतर वमन व विरेचन देऊं नये

मस्तक फार स्निग्ध झालें असतां कफाचा स्राव, मस्तकाला जडपणा, व इंद्रियांना भ्रांति हीं लक्षणें होतात. यांचे ठायीं रुक्ष पदार्थांचें नस्य द्यावें. अभिष्पंदी म्हणजे ह्मशींचें दहीं आदिकरून कफकारक पदार्थही भक्षण करूं नये. व चांगलें शिष्ट आचरण ठेवावें.

॥ वमनंरेचनंनस्यंनिरूहमनुवासनम् ॥ एतानि पंचकर्माणि कथितानि मुनीश्वरैः ॥

**अर्थ**—वमन १, रेचन २, नस्य ३, निरूहवस्ती ४, व अनुवासनबस्ती ५, या पांचांना पंचकर्में असें मुनी ह्मणजे मननशील ह्मणतात.

---

## धूमपानविधि.

॥ धूमस्तुषड्विधः प्रोक्तः शमनोबृंहणस्तथा ॥ रेचनः कासहाचैव वामनोव्रणधूपनः ॥

**अर्थ**—धूमाचे भेद, शमन, बृंहण, रेचन, कासहा, व वमन व व्रणधूम असे सहा प्रकार आहेत.

**धूमपानास अयोग्य**—दमलेला, भित्रा, दुःखेंकरून पीडित, बस्ती दिलेला, रेच घेतलेला, रात्रीचेठायीं जागरण करणारा, तृषा, दाह, व तालु शोष यांणीं पीडित, उदर, मस्तकरोग, तिमिर, ओकारी, रक्तविकार, पित्तविकार, ऊर्ध्ववात, कंठरोग व आध्मान [वायूनें पोट फुगतें तो रोग] उरःक्षत, प्रमेह, व पाण्डुरोग, गर्भिणी, रुक्ष, क्षीण, दूध, मध, तूप, आसव ह्मणजे मद्य, अन्न, दहीं व मांस यातें भक्षण केलेला, बाल, वृद्ध, व दुर्बल मनुष्य यांणीं धूमपान करूं नये.

**धूमाचे उपद्रवावर उपाय**—धूमपानेंकरून उपद्रव झाला असता त्यास तूप प्यावयास द्यावें, नस्य, अंजन व तर्पण द्यावें. उसाचा रस, द्राक्षें, दूध, साखर पाणी अथवा मधुर आणि आंबट पदार्थ हे भक्षणास द्यावे.

**धूमसेवनकाल**—बारा वर्षांपासून ऐंशी वर्षांपर्यंत करावें. धूमाची योजना चांगली झाली असतां श्वास, खोकला, पडसें, मान, हनुवटी व मस्तक याचे ठायीं पीडा होतात त्या व कफवातसंबंधी विकार हे सारे दूर होतात. व चक्षुरादिक इंद्रियें वाचा व अंतःकरण इहींकरून प्रसन्न राहतो. आणि केश, दांत, मिशा व दाढी यांना बळ येतें

**धूमाचा सामान्य विधि**—ऊर्ध्वजत्रुगत कफवातसंबंधीं विकार न होऊं देण्याकरितां व उत्पन्न झाले त्यांच्या नाशाकरिता हित आहार विहार करणाऱ्या मनुष्यानें नित्य धूमपान करावें. स्निग्ध, मध्यम व तीक्ष्ण असे धूमपानाचे तीन भेद असून ते अनुक्रमेंकरून वातजन्य, वातकफजन्य व कफजन्य विकारांवर यो-

जावे. शिंक, जांभई, मलमूत्रोत्सर्ग, मैथुन, शस्त्रकर्म, व दंतधावन, ह्यानंतर मृदु ह्मणजे स्निग्ध धूम्रपान करावें. वरील प्रसंगीं व सकाळीं, भोजनोत्तर व नस्य घेतल्यावर, मध्यम धूमपान करावें. नस्य, अंजन, स्नान वमन यानंतर विरेचन धूम्रपान करावें. धूमाची नळी बस्ति नलिकेप्रमाणें धात्वादिकांची केलेली असून तींत तीन कणे असावे व ती सरळ असून तिचें छिद्र मूळस्थानीं अंगुष्ठ प्रमाण व अग्रभागीं बोराच्या आठोळी एवढें असावें. तिची लांबी तीक्ष्ण, मृदु व मध्यम धूमपानास अनुक्रमें चोवीस, बत्तीस व चाळीस अंगुळें प्रमाण असावी. धूमपान करणें तें सरळ बसून तिकडेच चित्त लावून तोंड उघडें ठेवून पाळीपाळीनें एकेक नाकपुडी झाकून दुसरीनें धूर ओढावा. याप्रमाणें प्रत्येक नाकपुडीच्या तीन पाळया कराव्या.—नाकांतील व डोळ्यांतील दोष स्वस्थानापासून चलित झाले असल्यास पहिल्यानें नाकानें धूर ओढावा. तसें नसल्यास त्याना चाळविण्याकरिता तोंडानें धूर ओढावा. धूर सोडणें तो नेहमीं तोंडानें सोडावा. नाकानें सोडल्यास डोळ्यांना इजा होते. तीन वेळ धूर घेऊन तीनदां सोडला ह्मणजे एक धूमपानासारखें होतें, अशी दर वेळेला तीन धूमपानें करावी. स्निग्ध किंवा मृदु धूमपान दिवसातून एकदांच करावें. मध्यम धूमपान दोन वेळा, तीक्ष्ण धूमपान तीन किंवा चार वेळ करावें.

**मृदु धूमपानाचीं औषधें**—आगरू, गुग्गुळ, नागरमोथे, दगडफूल, जटामांसी, काळा व पांढरा वाळा, दालचिनी, रेणुकबीज, जेष्ठमध, बेलफळाचा मगज, एलवालूक, गंधाबीरोजा, राळ, रोहिषगवत, मेण, केशर, उडीद, जव, तीळ, नारळ, बदाम, इत्यादि.

**मध्यम धूमपानाचीं औषधें**—लाख, बाफळी, कमळ, निळें कमळ, वड, उंबर, पिंपळ, पिंपरी व लोध याची साल, साखर, जेष्ठमध, बाहावा, पद्मकाष्ठ, मंजिष्ठ इत्यादि.

**तीक्ष्ण धूमपानाचीं औषधें**—करडकागोणी, हळद, दशमुळें, मनशीळ, हरताळ, लाख, त्रिफळा, कोष्ठ, तगर व वावडिंग इ०

**धूमवातीची कृति**—एक १२ बोटें लांब गवताची अगर लव्हाळ्याची काडी घेऊन गवताची मिळाल्यास अहोरात्र पाण्यांत भिजत घालावी मग वर सांगितलेलीं औषधें पाण्यांत बारीक वांटून त्यांचा त्या काडीवर पाच वेळ लेप द्यावा. ती अशी कीं, आगठ्याइतका जाड व यवाच्या आकाराची होईल अशी करावी. नंतर ती सावलीत वाळवून आंतील काडी काढून टाकावी. तिचा उपयोग करते वेळेस तिला घृतादि स्नेह लावून चिलमीत घालून ओढावी.

**धूमपानाचें साधन**—खोकल्याकरिता धूमपान करणें तें एक सच्छिद्र शरावसंपुट [ तोंडाशी तोंड लावून एकावर एक ठेविलेले २ परळ ] घेऊन त्याच्या छिद्राला ८ किंवा १० बोटें लांब नळी लावून त्या नळीवाटें धूर ओढावा. खैराचे

किंवा बोरीच्या लांकडाचे निखारे त्या शरावसंपुटांत घालून त्याजवर धूम द्रव्याचें स्नेहयुक्त चूर्ण किंवा त्याची गोळी ठेवून धूर निघणारा तेथून धूर शरावसंपुटाच्या नळीतून ओढावा.

**धूमपानाचे गुण**—धूमपान करणाराला, कास, श्वास, पिनस, स्वरभेद, नाकातोंडाची दुर्गंधि, तोंडाचा चिकटपणा, केसांचे विकार, तोंड, कान, डोळ्यांचा स्राव, कडू, ठणका, जाड्य, तंद्रा व उचकी हे विकार होत नाहीत.

---

## गंडूषविधि.

॥ चतुर्विधःस्याद्गंडूपःस्नेहिकःशमनस्तथा । शोधनोरोपणश्चैवकवलश्चापितद्विधः ॥

अर्थ–गंडूप ह्मणजे द्रव पदार्थेकरून चूळ भरून टाकण्याचा प्रकार याचे ४ प्रकार आहेत ते असे–स्नेहिक, शमन, शोधन व रोपण या भेदेंकरून जाणावा. कवल ह्म० तोंडात पदार्थ घालून चवळण्याचा प्रकार याचेही ४ प्रकार आहेत. स्निग्ध आणि उष्ण, अशा पदार्थांनी चूळ भरणें ते स्नेहिक गंडूप जाणावा. तो वायूचेठायी योजावा. मधुर आणि शीतळ या पदार्थेंकरून प्रसादन ह्म० शमनगंडूप जाणावा. तो पित्ताचेठायी योजावा तिखट, आंबट, खारट व उष्ण या पदार्थेंकरून शोधनगंडूष जाणावा. तो कफाविषयी योजावा. तुरट, कडू, व मधुर या पदार्थेंकरून रोपणगंडुष जाणावा, तो कोवट कोंवट अशा व्रणाचेठायी योजावा. या प्रकारें कवलही ४ प्रकारचा जाणावा. काढे आदिकरून जे द्रव पदार्थ त्या पदार्थेंकरून तोंड पूर्ण भरून येई असा आणि इकडे तिकडे फिरवितात येईना अशी चूळ भरून टाकणें त्याला गंडूष ह्मणतात. कल्कादि पदार्थ तोंडात इकडून तिकडे फिरत असे भरणें त्याला कवल ह्मणतात. गंडूषाविषयीं जे काढे आदिकरून द्रवद्रव्य त्याचेठायी चूर्ण सहा मासे द्यावें. व कवलाचे ठाय़ी कल्क १ तोळा प्रमाण योजावा. गंडूष व कवलादिकांचें ९ वर्षानंतर ग्रहण करावें मनुष्यानें स्वस्थ चित्तेंकरून बसून रोग दूर होण्याविषयीं कपाळ, गळा व मुख याचेठायी थोडा घाम येईतोंपर्यंत ३ अथवा ९ अथवा ७ गंडूप करावे, अथवा दोष दूर होईपर्यंत करावे. किंवा कफानें तोंड भरून येईतोंपर्यंत अथवा दोषाचें छेदन होईतोंपर्यंत किंवा नेत्र नाक यांचा स्राव सुटेपर्यंत गंडूप धारण करावें.

**वातरोगावर स्नेहन गंडूष**—तिळाचा कल्क, पाणी, दूध व तिळाचें तेल आदिकरून स्नेह पदार्थ स्नैहिक गंडूप वातरोगावर योजावे.

**पित्तरोगावर शमनगंडूप**—तीळ, निळें कमळ, तूप, साखर व दूध हे पदार्थ एकत्र करून त्यात मध घालून गंडूप करावे. ह्म० पित्तसंबंधी हनुवटी व मुख यांचेठायीं जो दाह होतो, तो दूर होतो.

**व्रणावर गंडूष**—मधाच्या गंडूषानें तोंडांतील व्रण, चट्टे व दाह आणि तहान हे विकार दूर होतात.

**विषादिकांचेठायीं गंडूष**—विषदोष, क्षारादि जन्य विकार, अग्निदाहजन्य विकार याचेठायीं तूप अथवा दूध यांचे गंडूष करावे.

**दांत हालतात त्याजवर गंडूष**—तिळाचें तेल व सैंधव एकत्र करून गंडूष केला असता दात हालतात ते घट्ट होतात.

**मुखशोषावर गंडूष**—कांजीचे गंडूष केले असतां मुखशोष व मुखाला विसरपणा येतो त्यांचा नाश होतो.

**कफावर गंडूष**—सैंधव, त्रिकटू व मोहऱ्या याचें चूर्ण आल्याच्या रसांत मिळवून गंडूष केले असता कफदोष दूर होतात. किंवा त्रिफळ्याचें चूर्ण मधांत मिळवून त्याचे गंडूष केले असतां कफ व रक्तपित्त हे विकार दूर होतात.

**मुखपाकावर गंडूष**—दारुहळद, गुळवेल, त्रिफळा, द्राक्षें, जाईचा पाला व धमासा ही औषधें समभाग घेऊन त्यांचा काढा करून त्याचे सहावा भाग मध आंत घालून काढा थंड करून त्याचे गंडूष करावे. तेणेंकरून त्रिदोषजन्य जो मुखपाक तो दूर होतो.

**कवलाचा प्रकार**—माहाळुंगाचे फळाचे आंतील केशर, सैंधव व त्रिकटु ही औषधें एकत्र करून याचा कवळ केला असतां तोंड जड होतें तें कफवातजन्य आरोचक हे दूर होतात.

**प्रतिसारणाचे भेद**—ज्या औषधाचा गंडूप त्याच औषधाचें प्रतिसारण जाणावें. व कवलही त्याच औषधाचा जाणावा. कल्क अवलेह व चूर्ण या भेदेंकरून प्रतिसारण ३ प्रकारचें, ती मुखरोगी मनुष्यें जी त्यास जसा दोष असेल तसें बोटाच्या अग्रानें घेऊन जिभेला व सगळ्या तोंडभर चोळावें.

**प्रतिसारण चूर्ण**—कोष्ठ, दारुहळद, लाजाळू, पाहाडमूळ, कुटकी, मंजिष्ठ, हळद, नागरमोथे व लोध ही औषधें समभाग घेऊन चूर्ण करून जिभेला व साऱ्या तोंडात बोटाचे अग्रानें घेऊन चोळावें तेणेंकरून दाताचे हिरड्यातून रक्त पडतें तें, दाताचे ठायीं पीडा होते ह्मणजे दांत हलतात व दुखतात ते, सूज व दाह हे सर्व विकार दूर होतात.

**गंडूषयोग**—गंडूषादिकांचा हीनयोग झाला असता कफाचें आधिक्य होतें, मधुरादिक रसाचे ज्ञान होत नाही, अन्नादिकांवर अरुचि होते. गंडूषादिकांचा फार योग झाला असता मुखाचा पाक होतो व शोष आणि तहान हीं लक्षणें हो-

---

१—तोंडात बारीक पुरळ येऊन चट्टे वगैरे पडतात

तात. गंडूपादिकांचा चांगला योग आला असतां व्याधीचा नाश, अंतःकरणाचे-ठायीं संतोष, मुखाचेठायीं निर्मळपणा, हलकेपणा, रसनादिक इंद्रियाचेठायीं प्रसन्नता हीं लक्षणें होतात.

**गंडूषाचे गुण**—मान, डोकें, कान, तोंड व डोळे यांचे रोग, तोंडाला मळमळ व पाणी सुटणें व तोंड कोरडें पडणें, कंठरोग, तंद्रा, अरुचि, पीनस, व मुखपाक हे रोग विशेषेंकरून गंडूषानें साध्य होतात असें जाणावें.

---

## रक्तस्रावविधि.[1]

॥ शोणितंस्रावयेज्जंतोरामयंप्रसमीक्ष्यच ॥ प्रस्थंप्रस्थार्धकंवापिप्रस्थार्धार्धमथापिवा ॥

मनुष्याचे शरीराचेठायीं रक्तजन्य कुष्ठादिक जे त्वचेचे रोग त्यांतें अवलोकन करून शरीरांतील रक्त काढावें. त्याचें प्रमाण ५८ अथवा २९ किंवा १४ तोळे जाणावें.

**त्रिदोषादिरक्ताची लक्षणें**—वायूनें दुष्ट झालेलें रक्त, आरुण वर्ण, फेंसासारखें, रुक्ष, कर्कश, हलकें. शीघ्र गमन करणारें व पातळ असें होतें आणि सुया टोंचल्यासारखी पीडा देतें—पित्तकरून दुष्ट झालेलें रक्त पीतवर्ण, हरितवर्ण, शामवर्ण, आमगंधी, उष्ण चाचल्यरहित असें होतें, व तें माशा आणि मुग्या याच्या खाण्याच्या उपयोगीं पडत नाहीं.—कफानें दुष्ट झालेलें रक्त स्पर्शेकरून फार शीतळ भासतें व स्निग्ध असून गेरूचे रंगासारखें दिसतें व मासाचे बारीक बारीक ग्रंथीसारखें होतें व घण ह्मणजे दाट व मंद गमन करणारें असें होतें.—द्विदोषाचें दोहों दोषांनी युक्त असतें.—त्रिदोषेंकरून दुष्ट त्याला पूवासारखा वास येतो. व सर्व दोषांनी दुष्ट झालेलें रक्त कांजीसारखें दिसतें.—विशेषेंकरून त्रिदोषानें व विषानें दुष्ट झालेलें रक्त कृष्णवर्ण ह्मणजे काळें होतें व ऊर्ध्वमार्गी होऊन नाकातून पडतें. व विशेषेंकरून कुष्ठाला उत्पन्न करितें.—अंगातील निर्विकार व उत्तम रक्ताचा वर्ण लाल सुरेख असून तें पातळ असतें.

**रक्त काढण्यास योग्य रोगी**—दाह, सूज, ज्याचे अंगाचा पाक व शरीर आरक्तवर्ण असा मनुष्य, नाकातून रक्त पडणारा मनुष्य, वातरक्त, कुष्ठ, पीडायुक्त असून जिंकावयास अशक्य असा वायु, मर्मस्थानाचे रोग श्लीपद, विषाने दुष्ट झालेलें असें रक्त, ग्रंथी, अर्बुद, गंडमाळा, अपचि, क्षुद्ररोग, रक्तादिमंथरोग, ( नेत्रामध्यें होतो तो ) फार दाह करणारा रोग, स्तनरोग, गात्राला शिथिलपणा,

---

१—हे शिरा वेधण्याचे प्रयोग केवळ पुस्तक पाहून मुळींच करिता येणार नाहींत गुरुकडून चांगली माहिती करून घेऊन त्याचे आज्ञेनें त्याचे समक्ष बहुत वेळा हे प्रयोग केल्याशिवाय स्वतन्त्र एकदम करू नयेत.

शरीराला जडपणा येतो तो, रक्ताभिष्पंद, झांपड, ज्याचा देह. नाक व मुख दुर्गंधयुक्त आहे तो, कालखंडरोग [ यकृत् ] कवलु, विसर्प, विद्रधि, अंगावर फुटकुळ्या होणे, कान, ओंठ, नाक व तोंड याचा पाक व दाह, मस्तकपीडा, उपदंश, व रक्तपित्तरोग इतके रोग रक्त काढण्याविषयीं योग्य जाणावे. इतक्या रोग्यांचें रक्त शिंगानें, जळवांनी, अथवा तुंबडीनें अथवा शीर वेधून रक्त काढावें. किंवा तें फासण्यानें काढावें.

॥ गृण्हाति शोणितं श्रृंगं दशांगुलमितं बलात् ॥ जलौकाहस्तमात्रंच
तुंबीचद्वादशागुलं ॥ पदमंगुलमात्रेणशिरासर्वांगशोधिनी ॥

शिंग लाविलें असतां ते आपल्या बळेंकरून दहा अंगुळ प्रमाण रक्त ओढून घेतें, जळू लावली असतां एक हात प्रमाण, तुंबडी बारा अंगुळ प्रमाण, फांसणी एक अंगूळ प्रमाण शरीरातील रक्त ओढून घेतात व शिरेस वेध केला असतां ह्मणजे शीर टोंचली असतां सर्व अंगाचे रक्ताचें शोधन होतें. वायूनें दुष्ट झालेलें रक्त शिंगानें, पित्तानें दुष्ट झालेलें रक्त जळवानी, व कफानें दुष्ट झालेलें रक्त तुंबडीनें काढावें. आणि दोहों दोषेंकरून अथवा तीही दोषेंकरून दुष्ट झालेलें जें रक्त तें युक्तीनें शिरावेधून अथवा फांसण्या मारून काढावें.

**जळवांनीं रक्त काढण्याचा प्रकार**—ज्या मनुष्यास दु:ख सोसण्याची संवय नाही व जो नाजूक अथवा कृश त्याचें रक्त विशेषेंकरून जळवा लावून काढावें. ज्या स्वच्छ पाण्यात उत्पन्न होतात अशा लहान व वाटोळ्या जातीच्या जळवा आणून हळदीचा कल्क घातलेल्या पाण्यात किंवा ताकांत घालाव्या. पुन्हां पाण्यांत घालून सावध झाल्यावर त्या ज्या जागी लावावयाच्या असतील तेथें तूप अथवा माती किंवा स्त्रियाचें दूध लावून अथवा शस्त्रानें रक्त काढून त्याठिकाणी लावाव्या, रक्त पिऊं लागून त्यांचा पुढला भाग उंच दिसूं लागला ह्मणजे त्याजवर बारीक वस्त्र पाघरूण घालावें. मिसळलेल्या शुद्ध व दुष्ट रक्तातून जळू पहिल्यानें दुष्ट रक्त पिते. यास उदाहरण—" हंसोयथाक्षीरमिवांबुमध्यात्. "—जसा हंसपक्षी दूध व पाणी एकत्र केलें असतां त्यातून दुधच मात्र पितो. तसें —जळु लावलेल्या जागीं, शूल अथवा कंडू उत्पन्न झाल्यास त्या जागचें दुष्ट रक्त निघालेंसें जाणून ती जळू तेथून सोडवावी. सोडविण्याकरिता तिचे तोंडावर किंचित् हळदीची पुड टाकावी ह्मणजे ती आपोआप ती जागा सोडते. अशा एक वेळा लावलेल्या जळवाचा उपयोग पुन्हां सात दिवसपर्यंत करूं नये.—दुष्ट रक्ताचा स्राव बरोबर न झाला तर व्रणाचे तोंडावर हाळद गूळ व मध एकत्र करून लावावा. ह्मणजे अवशिष्ट दुष्ट रक्त राहिलें असेल त्याचा स्राव होऊं लागतो. नंतर शतधौतघृत दंशावर लावावें आणि थंड लेप द्यावे.—दुष्ट रक्त निघून गेल्यावर थोडेच वेळानें रोग व ठणका कमी होतो.—स्वस्थानापासून निघालेलें अशुद्ध रक्त व्रणांशयांत राहून, दुसरे दिवशी शिळें झाल्यामुळें पाकोन्मुख ह्मणजे पिकूं लागल्याची

स्थिति त्यास येते, ह्मणून पुन्हां दुसरे दिवशीं जळवा लावून तेथील रक्त काढून टाकावें.—एका जागी जमलेलें रक्त फासण्यानीं काढावें.—गोठलेलें जळवा लावून काढावें.—साचून स्थिर झालेलें शिंगादिकानी काढावें. आणि सर्व शरीरांतील रक्त बिघडलें असतां शिरा वेध करून रक्त काढावें. रक्त काढल्यावर थंड लेप केल्यामुळें वायूचा प्रकोप होऊन पीडा, कंडू व सूज उत्पन्न होते त्यांजवर तूप ऊन करून त्याची घडी ठेवावी.

---

## शिरावेध प्रकरण.

### ॥ शिरासर्वांगग्राहिणी ॥

शिरावेध केला असता सर्व अंगाच्या रक्ताचें शोधन होतें.

**शुद्ध रक्ताचे लक्षण**—गोड, किंचित् खारट, सम उष्ण फार दाट नव्हे असें असून मंजिष्ठाचा काढा, मेंढ्याचें व सशाचें रक्त यासारखें लाल जें रक्त असतें तें शुद्ध जाणावें. सर्व शरीराची स्थिति त्याजवरच अवलबून असते. हें रक्त बहुधा पित्तकर व कफकर पदार्थांच्या सेवनानें बिघडतें. व बिघडलें असतां विसर्प, विद्रधि, प्लीहा, गुल्म, अग्निमांद्य, ज्वर, मुखरोग, नेत्ररोग, शिरोरोग (मस्तकशूळ इत्यादी) मद, तृष्णा, तोंडास खारटपणा, नानाप्रकारची कुष्ठें, वातरक्त, रक्तपित्त, तिखट व आंबट ढेंकर आणि भ्रम हे विकार उत्पन्न होतात.जे रोग सुसाध्य असून शीत, उष्ण, स्निग्ध, रुक्ष, इत्यादी प्रकारच्या औषधानी त्यांची चिकित्सा केली असतांही नाश पावत नाहीत तर तें रक्त प्रकोपापासून झाले आहेत असें जाणावें. त्या रोगांवर अतिशय कुपीत आलेल्या रक्ताचा स्राव करण्यासाठी शिर वेधावी.

**शिरा वेधण्यास अयोग्य रोगी**—सोळा वर्षांचे आतील बालक, सत्तर वर्षांपेक्षां जास्त वयाचा मनुष्य, ज्याचें एकदा रक्त काढले आहे तो, कृश, अर्श, घाम काढलेला, वातरोगी, गर्भीण व बाळांतीण, अजीर्ण, रक्तपित्त, श्वास, कास, अतिसार, उदर, वांति, पांडुरोग, सर्वांगसूज, क्षतक्षयानें क्षीण, आघातादिकानी सप्तधात क्षीण झालेला, भित्रा, दमलेला, मद्यपानानी शुष्क झालेला, मार्ग चालण्यानें किंवा स्त्रीसंयोगानें दमलेला, फार वांती व रेच झालेला, निरूह व अनुवासन बस्ति दिलेला षंढ, क्षय, मोठा ज्वर, आक्षेपवायु, पक्षघात, मूर्छा व तहान याणीं पीडित व उपवासी यांचा शिरावध करू नये कारण यांचें रक्त काढलें असता धातू क्षीण होऊन देहाचा नाश होतो. परंतु बालक्षीणादिक पूर्वी सांगितलेले त्यास अति उपद्रव देणारा व्याधी किंवा मृत्युकारक विद्रध्यादिक रक्तस्राव साध्य मनुष्याचें जळवा लावून रक्त काढावें. व वमनादि पंचकर्में केल्यावर शिरा वेधूं नये. बांधल्यावाचून शीर वेधूं नये फुगलेली शीर वेधूं नये. तसेंच मोठ्या जीवावरचे रोगाशिवाय अतिशय थंडीत; अतिशय ऊन असता, मोठ्या झपाट्यानें वारा सुटला असता व ढग आले असतां व पाऊस पडत असतां शीर वेधू नये. हे वरील रोगी विषप्रयोगाने व्याप्त झाले असतां मात्र शिरा वेधून रक्त याढावें.

शरीराला जडपणा आतो तो, रक्ताभिष्पंद, झांपड, ज्याचा देह. नाक व मुख दुर्गंधयुक्त आहे तो, कालखडरोग [ यकृत् ] कवलु, विसर्प, विद्रधि, अंगावर फुटकुळ्या होणे, कान, ओंठ, नाक व तोंड याचा पाक व दाह, मस्तकपीडा, उपदंश, व रक्तपित्तरोग इतके रोग रक्त काढण्याविषयी योग्य जाणावे. इतक्या रोग्यांचें रक्त शिंगानें, जळवांनीं, अथवा तुंबडीनें अथवा शीर वेधून रक्त काढावें. किंवा तें फासण्यानें काढावें.

॥ गृण्हाति शोणितं श्रृंगं दशांगुलमितं बलात् ॥ जलौकाहस्तमात्रंच
तुंबीचद्वादशागुलं ॥ पदमंगुलमात्रेणशिरासर्वांगशोधिनी ॥

शिंग लाविलें असतां ते आपल्या बळेंकरून दहा अंगुळ प्रमाण रक्त ओढून घेतें, जळू लावली असता एक हात प्रमाण, तुंबडी बारा अंगुळ प्रमाण, फांसणी एक अंगूळ प्रमाण शरीरातील रक्त ओढून घेतात व शिरेस वेध केला असतां ह्मणजे शीर टोंचली असतां सर्व अंगाचे रक्ताचें शोधन होतें. वायूनें दुष्ट झालेलें रक्त शिंगानें, पित्तानें दुष्ट झालेलें रक्त जळवांनी, व कफानें दुष्ट झालेलें रक्त तुंबडीनें काढावें. आणि दोहों दोषेंकरून अथवा तीही दोषेंकरून दुष्ट झालेलें जें रक्त तें युक्तीनें शिरावेधून अथवा फांसण्या मारून काढावें.

**जळवांनीं रक्त काढण्याचा प्रकार**—ज्या मनुष्यास दुःख सोसण्याची संवय नाही व जो नाजूक अथवा कृश त्याचें रक्त विशेषेंकरून जळवा लावून काढावें. ज्या स्वच्छ पाण्यात उत्पन्न होतात अशा लहान व वाटोळ्या जातीच्या जळवा आणून हळदीचा कल्क घातलेल्या पाण्यात किंवा ताकांत घालाव्या. पुन्हां पाण्यांत घालून सावध झाल्यावर त्या ज्या जागी लावावयाच्या असतील तेथें तूप अथवा माती किंवा स्त्रियाचें दूध लावून अथवा शस्त्रानें रक्त काढून त्याठिकाणी लावाव्या, रक्त पिऊं लागून त्याचा पुढला भाग उंच दिसूं लागला ह्मणजे त्याजवर बारीक वस्त्र पाघरूण घालावें. मिसळलेल्या शुद्ध व दुष्ट रक्तातून जळू पहिल्यानें दुष्ट रक्त पिते. यास उदाहरण—" हंसोयथाक्षीरमिवांबुमध्यात्. "—जसा हंसपक्षी दूध व पाणी एकत्र केलें असता त्यातून दुधच मात्र पितो. तसें —जळु लावलेल्या जागी, शूल अथवा कंडू उत्पन्न झाल्यास त्या जागचें दुष्ट रक्त निघालेंसें जाणून ती जळू तेथून सोडवावी. सोडविण्याकरिता तिचे तोंडावर किंचित् हळदीची पुड टाकावी ह्मणजे ती आपोआप ती जागा सोडते. अशा एक वेळा लावलेल्या जळवाचा उपयोग पुन्हा सात दिवसपर्यंत करूं नये.—दुष्ट रक्ताचा स्राव बरोबर न झाला तर व्रणाचे तोंडावर हाळद गूळ व मध एकत्र करून लावावा. ह्मणजे अवशिष्ट दुष्ट रक्त राहिलें असेल त्याचा स्राव होऊं लागतो. नंतर शतधौतघृत दंशावर लावावे आणि थंड लेप द्यावे.—दुष्ट रक्त निघून गेल्यावर थोडेच वेळानें रोग व ठणका कमी होतो.—स्वस्थानापासून निघालेलें अशुद्ध रक्त व्रणांशयांत राहून, दुसरे दिवशीं शिळें झाल्यामुळें पाकोन्मुख ह्मणजे पिकूं लागल्याची

स्थिति त्यास येते, ह्मणून पुन्हां दुसरे दिवशीं जळवा लावून तेथील रक्त काढून टाकावें.—एका जागीं जमलेलें रक्त फासण्यांनीं काढावें.—गोठलेलें जळवा लावून काढावें.—साचून स्थिर झालेलें शिगादिकानी काढावें. आणि सर्व शरीरांतील रक्त बिघडलें असता शिरा वेध करून रक्त काढावें. रक्त काढल्यावर थंड लेप केल्यामुळें वायूचा प्रकोप होऊन पीडा, कंडू व सूज उत्पन्न होते त्यांजवर तूप ऊन करून त्याची घडी ठेवावी.

---

## शिरावेध प्रकरण.

### ॥ शिरासर्वांगग्राहिणी ॥

शिरावेध केला असतां सर्व अंगाच्या रक्ताचें शोधन होतें.

**शुद्ध रक्ताचें लक्षण**—गोड, किंचित् खारट, सम उष्ण फार दाट नव्हे असें असून मंजिष्ठाचा काढा, मेंढ्याचें व सशाचें रक्त यासारखें लाल जें रक्त असतें तें शुद्ध जाणावें. सर्व शरीराची स्थिति त्याजवरच अवलंबून असते. हें रक्त बहुधा पित्तकर व कफकर पदार्थांच्या सेवनानें बिघडतें. व बिघडलें असतां विसर्प, विद्रधि, प्लीहा, गुल्म, अग्निमांद्य, ज्वर, मुखरोग, नेत्ररोग, शिरोरोग (मस्तकशूळ इत्यादी) मद, तृष्णा, तोंडास खारटपणा, नानाप्रकारची कुष्ठें, वातरक्त, रक्तपित्त, तिखट व आंबट ढेंकर आणि भ्रम हे विकार उत्पन्न होतात.जे रोग सुसाध्य असून शीत, उष्ण, स्निग्ध, रुक्ष, इत्यादी प्रकारच्या औषधानी त्यांची चिकित्सा केली असतांही नाश पावत नाहींत तर तें रक्त प्रकोपापासून झाले आहेत असें जाणावे. त्या रोगांवर अतिशय कुपीत झालेल्या रक्ताचा स्राव करण्यासाठीं शिर वेधावी.

**शिरा वेधण्यास अयोग्य रोगी**—सोळा वर्षांचे आतील बालक, सत्तर वर्षांपेक्षां जास्त वयाचा मनुष्य, ज्याचें एकदा रक्त काढलें आहे तो, कृश, अर्श, घाम काढलेला, वातरोगी, गर्भीण व बाळांतीण, अजीर्ण, रक्तपित्त, श्वास, कास, अतिसार, उदर, वांति, पांडुरोग, सर्वांगसूज, क्षतक्षयानें क्षीण, आघातादिकानी सप्तधात क्षीण झालेला, भित्रा, दमलेला, मद्यपानानी शुष्क झालेला, मार्ग चालण्यानें किंवा स्त्रीसंयोगानें दमलेला, फार वांती व रेच झालेला, निरूह व अनुवासन बस्ति दिलेला. षंढ, क्षय, मोठा ज्वर, आक्षेपवायु, पक्षघात, मूर्छा व तहान यांणीं पीडित व उपवासी याचा शिरावध करूं नये कारण यांचे रक्त काढलें असता धातू क्षीण होऊन देहाचा नाश होतो. परंतु बालक्षीणादिक पूर्वी सांगितलेले त्यास अति उपद्रव देणारा व्याधी किंवा मृत्युकारक विद्रध्यादिक रक्तस्राव साध्य मनुष्याचें जळवा लावून रक्त काढावें. व वमनादि पंचकर्में केल्यावर शिरा वेधूं नये. बाधल्यावाचून शीर वेधूं नये फुगलेली शीर वेधू नये. तसेंच मोठ्या जीवावरचे रोगाशिवाय अतिशय थंडीत; अतिशय ऊन असता, मोठ्या झपाट्यानें वारा सुटला असता व ढग आले असता व पाऊस पडत असतां शीर वेधू नये. हे वरील रोगी विषप्रयोगानें व्याप्त झाले असतां मात्र शिरा वेधून रक्त याढावें.

**शिरा वेधाचें पूर्व कृत्य**—ज्या मनुष्याची शीर वेधावयाची असल तो बलवान् असावा. व त्याला पूर्वी अभ्यंग व स्नेहपानानें शरीर स्निग्ध करून स्नेहयुक्त मांसरस व भात भक्षण करून अग्नीच्या तापानें अथवा सूर्याच्या उन्हानें खिन्न झाल्यावर मुडा हात उंचीच्या जाग्यावर त्यास बसवावें. डोक्याभोंवती केसाच्याखाली मऊ वस्त्र गुंडाळावें, गुडघ्यावर हाताची कोपरें ठेवून दोन्ही हातांत वस्त्राच्या घड्या घेऊन त्यांनी मानेचे दोन्ही भाग खूप चेपावे आणि रोग्यानें दांत खावे, मोठ्या जोरानें खोकावे, व गाल फुगवावे, दुसऱ्या एका मनुष्यानें त्याच्या पाठीमागें उभे राहून मानेभोंवती वस्त्र गुंडाळून त्यास बांधावें. बांधतेवेळी डाव्या हाताची तर्जनी शेवट खोंचण्याकरिता आंत ठेवावी. हा बाधण्याचा प्रकार तोंडांतील जागेच्या खेरीज करून डोक्यांतील बाकीच्या शिरा वेधण्याविषयी होय—नंतर वैद्यानें ज्या जागी शिरावेध करावयाचा असेल तेथें मधल्या बोटाचें अग्र अंगठ्याच्या अग्राजवळ ठेवून तें ( मधलें बोट ) जोरानें कांही वेळ झाडावें—स्पर्शानें किंवा अंगठ्यानें दाबून ती शीर उठली आहे असें पाहून शिरेच्या बरोबर मध्यावर डाव्या हातानें शीर धरावी आणि हात न कापता शस्त्राच्या पानावर वरच्याप्रमाणें मधलें बोट अंगठ्यावरून झाडून शीर टोंचावी आणि नंतर ती अंगठ्यानें दाबून पिळावी—हा प्रकार हाडावरील शीर वेधण्याचा झाला. आतां नाकाजवळील शीर वेधावयाची असल्यास नाकाचे बोंडीवर अंगठ्यांनी दाबून व्रीहीमुखाव वेधावी—जिभेच्या खालची शीर वेधणें झाल्यास जीभ उलटी वर दुमडून तिचें अग्र वर दांतांनी धरल्यावर दाबून वेधावी—मानेच्या संबंधाची शीर वेधण्यासाठी स्तनांच्यावर बांधावें—दंडाची ( भुजाची ) शीर वेधावयाची असतां जेथें वेधावयाची असेल त्या स्थानाच्या वरच्या अंगास पट्टा बांधण्याच्या पूर्वी कुशीपासून मर्दन करावें व मुठीत दगड धरण्याविषयीं त्यांस सांगावें. तसेंच हात गुडघ्यावर ठेवून लाव करवावे—हाताची शिर वेधावयाची असता सुखासनावर बसलेल्या रोग्यास हात लांब व सरळ करण्यास सागून वेध्यस्थानापासून वर चार अंगुळावर पट्टा बांधावा व त्या मनुष्यानें मुठीत आंगठा घालून ती घट्ट आवळावी—दोन्ही भुजांनी खाबादिकांस वेळखा मारण्यास सागून त्याप्रमाणें केल्यावर कुशी [ पार्श्व ] ची शीर वेधावी—शिश्न ताठ उभें राहिलें असतां त्याची शीर वेधावी—गुडघा ताठ करून पाय लांब केल्यावर पोटाची शीर वेधावी.—पायाची शीर वेधण्यासाठी जमिनीवर पाय साफ ठेवून गुडघ्यापासून घोट्यापर्यंत दोन्ही हातानी खूप दाबल्यावर त्या पायावर दुसरा पाय किंचित् आकुंचित करून ठेवावा. आणि हाताप्रमाणेंच वेध्य स्थानापासून चार बोटावर पट्टा बांधून शिरावेध करावा.—ज्या स्थानाबद्दल सांगितलें नाही त्यास्थानी याचप्राण तजवीजीनें पटा बाधावा—मांसल भागावर शिरावेध करण्यासाठी व्रीहीमुख ह्मणजे शस्त्रभाताच्या साळी इतकें आत भोंसकावें. हाडावरील शीर तोडण्यास शस्त्र अर्धायव भोंसकावें.

**शिरोत्थापनाचा प्रकार**—ज्या मनुष्याच्या शिरा वेधावयाच्या आहेत,त्या-

ला वैद्यांनीं धीर देऊन सूर्याकडे तोंड करून मुंडा हात उंच तिवई किंवा अन्य साधन करून त्याजवर पाय खालती सोडून आणि यत्किंचित् आटोपून उकीडव्या सारखा बसवावा. नंतर वस्त्र, नवार, किंवा तशा प्रकारचा वस्त्राचा पट्टा घेऊन मस्तकाला फार गच्च न होई व हात पाय सैल न होत असें बांधून मर्म सोडून सांगितल्याप्रमाणें शस्त्र घेऊन रक्त काढावें. व त्या रोग्याचे दोन्ही कोपर गुडघ्याचे संधीचे वरती ठेवावे आणि आंगठा आत सांपडून मुठी मिटवाव्या किंवा हातांत वस्त्राचा बोळा देऊन तो रोग्यास घट्ट धरण्यास सांगावा व मानेभोंवतीं वस्त्राचा पट्टा गुंडळावा व दोन बोटें रुंदीची कापडाची घट्ट पट्टी घेऊन तिनें कोपराच्चा संधीवर तीन अगुळें जागा टाकून घट्ट बाधावी व दुसऱ्या मनुष्यानें त्या रोग्याचे पाठीमागें उभें राहून त्या पट्टीची दोन्ही टोंकें आपले डावे हातानें धरून उभें राहावें. नंतर त्याला वैद्यानें आज्ञा करावी कीं शिराचें उत्थापन झालें पाहिजे ह्मणजे शिरा नीट उठलेल्या दिसल्या पाहिजेत. याकरितां उजव्या हातानें फार घट्ट न होई व फार सैल न होई असें यंत्रवेष्टन करावें. आणि रक्त चांगलें स्रवण्यासाठी पृष्ठ मध्याचेठायी यंत्र चांगलें आवळावें. ज्याला शिरा वेध करितात त्याचें मुख वायूकरून पूर्ण भरवावें, व तोंडावाटें श्वासोच्छ्वास होऊ देऊं नये याप्रकारें उत्तमांगागत शिराचा वेध शस्त्रानें करावा. परंतु मुखातील शिराशिवाय इतर उत्तमांगगत शिरांचा जाणावा.

**रोगावर शिरावेध**—( १ ) पाददाह, वातरक्त, पादहर्ष, विपादी[१], वातकंटक आणि नखुर्डे या रोगांवर पायाच्या आंगठ्याच्या बेचक्यापासून २ बोटांवर जवाच्या अग्राप्रमाणें शिर वेधावी. ( २ ) विश्वाची व गृध्रसी वातरोगाचेठायी गुडघ्याचे वरती किंवा खालती ४ बोटें सोडून शिर वेधावी. ( ३ ] गलगंड व गंडमाळा यांजवर माडीची शीर वेधावी. ( ४ ] शिरोरोग व नेत्ररोग यांवर कपाळाची अथवा डोळयाच्या बाहेरील कोंपऱ्याजवळची किंवा नाकाजवळची शीर वेधावी. ( ५ ) कर्णरोगावर कानापासून निघणारी शीर वेधावी. [ ६ ] नासारोगावर, नाकाच्या बोंडशीची शीर वेधावी. ( ७ ) पीनसरोगावर नाकाची किंवा कपाळाची शीर वेधावी. [ ८ ] मुखरोगावर रोगानुरूप जीभेजी, ओठाची, हनुवटीची किंवा टाळूची शीर वेधावी. [ ९ ] जत्रूच्या वरल्याभागी ग्रथी झाले असतां स्थानपरत्वें मान, गळा, कानसूल ( शंख ) व डोकें याच्या शिरा वेधाव्या. [ १० ] उन्माद रोगावर, ऊर डोळ्याचा बाहेरचा कोपरा व कपाळ [ ललाट ] याच्या शिरा वेधाव्या. ( ११) अपस्मारावर, हनुवटीच्या सांध्यावर किंवा हनुवटीची किंवा दोन भिवयांच्या मधून जाणावी शीर वेधावी. [ १२ ] विद्रधि व कुशीतील उसण यांजवर कुशींतील काख व स्तन यांच्यामधील शीर वेधावी. [ १३ ] तृतीयक ज्वरावर त्रीकसंबंधीं[२] शीर वेधावी [ १४ ] चातुर्थिक ज्वरावर खांद्याचे आतील शीर उजवी किंवा डावी वेधावी [ १५ ] शूलयुक्त प्रवाहिकेवर कंबरेपासून वर दोन

---

१ कुष्ठरोग किंवा पायास चिरा पडतात तो रोग  २ त्रिक ह्म० कटी प्रदेश

बोटावरची शीर वेधावी. [ १६ ] शुक्ररोग व शिश्नरोग यांवर शिश्नाचे मधील शीर वेधावी. [ १७ ] अपची रोगावर इंद्रबस्तीचा ( पोटरीचा गोळा, घोट्यापासून बारा अंगुळें वरील भाग ) खाली दोन अंगुळावर शीर वेधावी. [ १८ ] मांडीच्या शूळास घोट्यापासून वर चार बोटावर शीर वेधावी परंतु अपची उत्पन्न होतांच वेधावी. [ १९ ] गुडघी रोगावर घोट्यापासून वर चार बोटांवर शीर वेधावी. ( २० ) क्रोष्टुशीर्ष, खंज, पंगु इत्यादी वातरोगाचे ठायी पोटरीचे इंद्रमर्माचे खालची शीर वेधावी. [ २१ ] प्लीहा रोगावर कोपराचे संधीजवळ बाहुमध्याचेठायींची शिरा अथवा करांगुली आणि अनामिका या दोहोंमधील शीर वेधावी. तशीच यकृत्, कफोदर, कफजनक श्वास, कफावृत वायुजन्यकास आणि श्वास यांचेठायीं उजव्या हाताची शीर वेधावी, परंतु यकृताचे पूर्व अवस्थेमध्यें ह्मणजे यकृत् उत्पन्न होतांच वेधावी. ग्रंथकार गई ह्मणतात की, कास, श्वास हे अल्प असतां त्याचा मार्ग मोकळा करावयासाठी मात्र शिरावेध सांगितला आहे हे अति वाढले असता शिरावेध करूं नये, कारण श्वास,कासयाविषयी शिरावेधाचा निषेध पूर्वी केला आहे. [ २२ ] मूत्रवृद्धि ह्मणजे बहु मूत्र अति वाढला असतां वृषणाच्या दोहो बाजूच्या शिरा वेधाव्या आणि नाभीचे अधोभागी शिवणीचे डावेबाजूवरीलही शीर वेधावी.

**सूचना**—वर सांगितलेल्या शिरा प्रयत्नेंकरून शोधून काढून वेधाव्या. परंतु त्या शिरा नच दिसतील तर मर्में सोडून त्यांच्या त्यांच्या जवळच्या जाग्यांतील दुसरी शीर वेधावी. बरोबर शिरा वेध झाला असता शिरेंतून रक्ताची धार वाहते; परंतु पट्टा सुटला असता धार वाहत नाही. अधिक वेध झाला असतां धार वाहते वेळीं शब्द होतो, आणि मोठ्या प्रयासानें रक्त बंद होतें. भीति, घेरी येणें, पट्टा सैल होणें, शस्त्र बोथट असणें, अति भोजन, कृशपणा, मलमूत्रादिकाचा वेग येणें, व पूर्वी स्वेदन न करणें ही रक्तस्रावबरोबर न होण्याची कारणें होत.—रक्तस्रावबरोबर झाल्यास वावडिंग, त्रिकटू, हळद, तगर, घेरोसा, सैंधव व तेल ही सर्व एकत्र मर्दन करून त्याचा शिरेच्या तोंडावर लेप द्यावा. योग्य रीतीनें रक्तस्राव झाला असतां तेल व सैंधव किंचित् ऊन करून शिरेच्या तोंडावर लावावें.—कुसुंब्यांतून जसा प्रथम पिवळा रंग बाहेर पडतो त्याप्रमाणें प्रथम नासलेलें रक्त बाहेर पडतें—बरोबर रक्तस्राव होऊन आपोआप बंद झाला असता फक्त शुद्ध रक्तच शिल्लक राहिलें असें जाणून पुनः रक्त काढूं नये. रक्तस्राव होते वेळी रोग्याला मूर्छा आली असता पट्टा सोडून पंख्यानें वारा घालून सावध झाल्यावर पुनः रक्तस्राव करावा. पुन्हां मूर्च्छा आली तर दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशीं रक्तस्राव करावा.—अति बलवान जरी पुरुष आहे तरी त्याचें रक्त एकंदर अर्धशेरापेक्षां जास्त काढूं नये. कारण रक्ताचा स्राव फार झाला असता मृत्यु येतो किंवा मरणो-

१ पोटरीचा गोळा.

न्मुख होतो. अथवा भयंकर वातरोग, तहान, तिमिर, श्वास, खोकला, उचकी, दाह अंधत्व, व पांडुरोग, मस्तकपीडा आणि धनुर्वात हे रोग होतात.

**रक्तस्रावानंतर विधि**[1]—रक्तस्राव झाल्यावर हळुहळू पट्टा सोडून थंड पाण्यानें ती जागा धुवावी व शिरेच्या तोंडावर तेलाचा बोळा देऊन वर पट्टी बांधावी. अशुद्ध रक्त पुन्हां संध्याकाळी किंवा दुसऱ्या दिवशीं काढावें. ज्याचें रक्त अत्यंत दुष्ट झालें असेल त्यास स्नेहपानानें चांगला स्निग्ध करून १५ दिवसांनी पुनः रक्त काढावें.—नासलेलें रक्त किंचित् शरीरांत शिल्लक राहिलें तरी हरकत नाहीं. कारण त्यापासून रोग बळावत नाही म्हणून थोडे रक्त शिल्लक ठेविलें तरी चालेल. परंतु अतिस्राव मात्र करूं नये. तें शिल्लक राहिलेलें दुष्ट रक्त तुंबडी व जळवा यांनीं काढावें. किंवा थंड उपचार, रक्तपित्तरोगावरील चिकित्सा, वमन, विरेचनादि शोधन व लंघन या उपायांनीं तें रक्त शुद्ध करावें.

**रक्तस्राव बंद करण्यास उपाय**—शरीरांतून प्रमाणापेक्षां फार रक्त येऊं लागलें असतां तें बंद करण्याविषयी लोध, राळ, व रसांजन या तिहींचें समभाग चूर्ण अथवा सातू आणि गहूं याचें चूर्ण अथवा आघाडा, धमासा व गेरू या तिन्हींचें चूर्ण अथवा सापाचे कातीचें चूर्ण अथवा सोवळ्याचें वस्त्र व चिरगुटें या दोहोंची राख या औषधातून जी समयविशेषीं मिळतील तीं शिरेच्या तोंडावर दडपून बांधून त्या व्रणावरच चंदनादिक शीत लेपादि उपचार करावे ह्मणजे रक्त बंद होतें. जर इतक्या उपायानेंही रक्त बंद न होईल तर तीच शीर वरच्या किंवा खालच्या अंगीं जवळच पुन्हा वेधून लागलेंच शिरेचें तोंड तापलेल्या सळईनें डागावें. अथवा टांकणखारादि अग्निरूप जे खार त्या खारांचा लेप करावा.

**शस्त्रयोजना**—मांसल शरीर ह्म० पोट, कुल्ले, याचेठायी शीर वेधून रक्त काढावयाचें असल्यास यवप्रमाण शस्त्र योजावें. व इतर स्थळीं अर्धा यव प्रमाण योजावें. फार हाडकळ प्रदेशसंबंधी शीर वेधावयाची असल्यास साळीच्या टोंकाएवढें शस्त्र योजावें.

**शिरावेधकाळ**—वर्षाकाळीं, अभ्र नसेल त्या दिवशीं, ग्रीष्म ऋतूमध्यें, ज्या दिवशीं फार उष्णता नसेल त्या दिवशीं, अथवा तृतीय प्रहरानंतर, थंड वेळीं, रक्त काढावें. हेमंतऋतूंत ज्या दिवशी थंडी असेल त्या दिवशीं परंतु या ऋतूत रक्त काढणें तें रोग जर प्राणहारक आहे तरच काढावें अन्यथा काढू नये, येथें हेमंत ग्रहण सामान्य शीतकाळाचें बोधक असें जाणावें. सर्व ऋतूंत रक्त काढण्यास शरत्काळ श्रेष्ठ आहे.

---

१—रक्त काढल्यावर व्रणस्थानाचे ठायीं पित्ताचा कोप झाला असतां चंदनादिक शीतल उपचार करावा. वायूचा प्रकोप होऊन व्रणस्थानीं पीडायुक्त अशी सूज आली असतां तूप थोडें गरम करून त्या ठिकाणीं लावावें.

**पथ्य**—रक्त काढल्यापासून क्षीण झाला असतां त्यानें हरीण, ससा, मेंढा, काळें हरीण, व बोकड यांचे मांसरस प्यावे. आणि साठे तांदूळ, गाईचे दुधांत घालून खीर करून खावी अथवा गाईचे दूध प्यावें. किंवा दूधभात खावा.

**अपथ्य**—परिश्रम, मैथुन, क्रोध, थंड पाण्यानें स्नान करणें, बहुत वारा घेणें, एकच धान्य खाणें, दिवसास निजणें, जवखारादिक खार, आंबट व तिखट, पदार्थ हे वर्ज्य करावे आणि शोक, व वादविवाद करणें, बहुत भोजन करणें हें शरीरात चांगलें बळ येईतोंपर्यंत करूं नये, व सर्व काळ नियमितपणानें असावें.

---

## दंभविधि ( डाग देणें. )

डाग देणें हें सर्व चिकित्सेमध्यें श्रेष्ठ आहे. कारण हें असाध्य रोगावरील

---

१—डाग देणे तें लोखड किंवा सोनें याची शलाका किंवा कोयती विस्तवात तापवून चागली लाल झाल्यावर रोग्यास डोळे मिटण्यास सागावे. ज्याठिकाणीं डाग देणे असेल तेथें प्रथम त्या जाग्यावर थोडी राख चोळावी नतर फार हुशारी करून डाग द्यावा. सन्निपात वगैरे वायू तात्काळ प्राणहरण करणाऱ्या रोगाशिवाय इतर वरील रोगावर जेथे डाग देण्यास सागितलें आहे त्याठिकाणीं अग्निडागाच्या ऐवजीं बिब्व्याच्या नुसत्या तेलाचे डाग दिले असता रोग शाति होते. परतु जो भित्रा, नाजूक, कृश, व ज्यास यातना सहन होत नाहीत, त्य सच मात्र बिब्व्याच्या डागाची योजना करावी अग्निडाग देणे हे श्रेष्ठ आहे, कारण डाग देऊन बरे झालेले रोग पुन्हा उत्पन्न होत नाहींत व औषध क्षार व शस्त्र याणी बरे न झालेले रोग डागाने बरे होतात. डाग देणे ते फक्त चर्मच भाजलें जाऊन धूर व कर्पट वास येईपावेतो द्यावे अति खोल देऊ नये क्षार लावण्यास जे अयोग्य सांगितले आहेत त्यास दभाक्रिया करू नये दभक्रियेचे सुदग्ध, हीनदग्ध, अति दग्ध व तुच्छदग्ध असे चार प्रकार आहेत सुदग्ध ह्मणजे चागले भाजणे, हीनदग्ध, अर्धवट डाग देणे, अति दग्ध ह्मणजे फार भाजणे आणि तुच्छदग्ध ह्मणजे नुसते पोळणें किंवा क्षुद्रदाह करणे सुदग्ध जाहलें ह्मणजे तूप व मध लावून थड व स्निग्ध लेप करावे किंवा सम्यक् दाहा जाहला असता रक्त बद झाल्यावर शब्दयुक्त लस येऊ लागते व ती जखम पिकलेल्या ताडफळासारखी किंवा पारव्यासारखी अस्मानी रंगाची असून तो व्रण लवकरच भरून येतो. व वेदनाही कमी होतात तेंच हिनदग्ध किंवा अति दग्ध झाले असता त्याचीं लक्षणे चुकीने केलेल्या दभासारिखे होतात तुच्छदग्ध ह्मणजे साधारण क्षुद्रदाह किंवा पोळलें असता त्या जागेवरील त्वचा निराळ्या रगाची होऊन फोड न येता अतिशय आग होते तीच जागा हिनदग्ध जाहली तर त्या जागेत दाह, जळजळ, आणि फोड येतात. तेच अति दग्ध जाहली असता मास लोंबू लागते, दाह, व त्या जागेतून वाफा निघाल्यासारखे वाटणें, वेदना फार होणें, मकोच, शिरादिकाचा नाश, तहान, मूर्छा, व्रण खोल जाणें व मृत्युही येतो. अति दग्ध जाहले असता पित्त विसर्पावर सागितलेल्या औषधानीं दाह शात करावा हीनदग्ध जाहले असता प्रथम थड व उष्ण आणि नतर शीत उपचार करावे. सम्यक् दाह जाहला असता वशलोचन, पायरीची साल रक्तचदन, गेरु, व गुळवेल, तूप, याचा लेप करावा. नतर पित्तविद्रधीवर सागितलेली क्रिया करावी तुच्छदग्ध जाहल्यास अग्नीने शेकावे व उष्ण औषधें वर लावावीं व उष्ण उपचार करावे. कारण थड उपचारानीं रक्त दाट जाहल्यामुळें वेदना फार होतात; तेंच उष्ण उपचारानीं पातळ जाहलें म्ह० सुख होतें.

औषध आहे. शस्त्रकर्म आणि क्षार या उपायांनीं साध्य न होणाऱ्या रोगांचा प्रतिकार डाग दिल्यानें होतो. डाग देणें ते कित्येक रोगांस त्वचेपर्यंत, कित्येक रोगांस रक्तापर्यंत, कित्येक रोगांस मांसापर्यंत व कित्येक रोगास अस्थिपर्यंत देण्याचे क्रम आहेत असें जाणावें. रोगानें क्षीण झालेल्या मनुष्यास डाग दिल्यानें त्याचा प्राण व्याकुळ होण्याचा संभव असतो. यास्तव कोणत्याही रोगावर डाग देणें झाल्यास अनुभव घेतलेल्या वैद्यानें फार विचार करून डाग द्यावा.

**अतिसार व संग्रहणीवर**—नाभीचे सभोंवती तीन अंगुळें जागा सोडून कांसवाचे पादाग्रासारखें वाटोळे चार डाग द्यावे, आणि पांचवा डाग नाभीचेखालीं तीन अंगुळें जागा सोडून चार अंगुळें लांबट असा आडवा एक डाग द्यावा.

**अपस्मार व धनुर्वातावर**—दोन्ही आंखांवर दोन, मानेवर एक, ब्रह्मांडावर एक व दोहो पायांवर दोन मिळून सहा डाग द्यावे.

**अंडवृद्धीवर**—मनुष्याचे डावे वृषणाला सुज आली असली तर उजवे हाताचे आंगठ्याची शीर डागावी. व उजवे वृषणाला सूज आली असतां डावे हाताचे मुळाची शीर डागावी, किंवा वामभागी वृद्धि असेल तर दक्षिण पादांगुलीचे जवळ पांच अंगुली धरून लांबट एक डाग द्यावा. व दक्षिणभागी असेल तर उजव्या पायाचे अंगुलीजवळ पूर्ववत् एक डाग द्यावा. आणि दोहों पायांचे गुडघ्याभोंवताले लहान लहान पांच डाग द्यावे.

**उदरावर**—शोफोदर, व जलोदर यांजवर नाभीचे सभोंवतीं अंगुष्ठ मात्र जागा सोडून वळ्यासारखा वाटोळा एक डाग द्यावा. व दोहों कुशीवर लांबट असे दोन डाग उभे द्यावे.

**उन्मादावर**—अपस्माराप्रमाणें डाग द्यावे.

**कटीवायूवर**—(कंबरेंतील वायूवर)कंबरेचे दोहों मणक्यावर दोन डाग द्यावे.

**कामलेवर**—डाव्या हाताच्या अंगुष्ठापासून रोग्याची टीचभर जागा सोडून अर्ध चंद्राकृति असा एक डाग द्यावा.

**गुल्म व उदर, शूल यांजवर**—पानथरीप्रमाणें एकावर एक असे दोन डाग द्यावेत.

**नेत्ररोगावर**—दोहों आंखांवर दोन दोन लहान लहान डाग द्यावे.

**पान्थरीवर**—रोगाचे मध्यभागी एकावरएक असे दोन डाग द्यावे.

**पांडुरोगावर**—नाभीचे सभोंवती अगुष्ठ मात्र जागा सोडून वळ्यासारखा वाटोळा एक डाग द्यावा व दोहो कुशीवर लांबट असे दोन डाग द्यावे.

**मस्तकशूळावर**—सन्निपाताप्रमाणे डाग द्यावे.

**मोडशीवर**—लोखंडाची कोयती अथवा उलथनें तापवून पायाचे तळवे, ओरपावे, तेणेंकरून रसवाहिन्या व कफवाहिन्या ज्या शिरा त्याचा संकोच होऊन अग्नि प्रदीप्त होतो. आणि मोडशी दूर होते. परंतु पाय ओरपण्याचेपूर्वी तळव्यांस रास चोळावी, नंतर पाय ओरपावे व लागलींच जमिनीवर पाय दाबण्यास सांगावें.

**विद्रधीवर**—हृदयाचे मुळावर एक अंगुळ जागा सोडून वर्तुळ एक डाग द्यावा. व विद्रधीवर ह्मणजे त्या गोळ्यावर चार अंगुळ प्रमाण लांबट असा एक आणि पाठीवर जेथें दारूण पीडा असेल तेथें वर्तुळ असा एक मिळून तीन डाग द्यावे. परंतु हे अंतरविद्रधीवर द्यावे असें जाणावें.

**शैत्यावर**—मस्तकरोगाप्रमाणें डाग द्यावा.

**सन्निपातज्वरावर**—दोन्ही आखांवर भिवईपासून दोन अंगुळें जागा सोडून वर्तुळ दोन डाग द्यावे व नासिकाग्रापासून टीचभर जागा टाकून ब्रह्मांडावर वर्तुळ असा एक डाग द्यावा. आणि जत्रुस्थानीं मानेच्या दोन्ही शिरा धरून लांबट असा मध्यभागीं एक डाग द्यावा.

**क्षयावर**—ब्रह्मांडीं एक, जत्रुस्थानीं दोन, हृदयाचे मध्यभागीं लांबट आडवा असा एक, व सभोंवतीं फांसोळ्यांतून व वर्तुळ असे चार, आणि उदरावर चार मिळून १२ डाग द्यावे. श्वास, कास, हृद्रोग, यांजवर हृदयावर सांगितल्याप्रमाणें पांच डाग द्यावे.

**सूचना**—याशिवाय पुढें रोग प्रकरणांत समयविशेषीं ठिकठिकाणी रोगावर डाग देणें सांगितले आहेत त्याप्रमाणें योजना करीत जावी.

---

## पोतविधि.

पोत घेण्याचा प्रकार असा आहे कीं एक मोठें हाळकुंड घेऊन पेटवून तें गुडघ्याचे डोळ्यापासून खालीं चार अंगुळावर हाडूक सोडून बाजूस त्यानें डाग द्यावा. नंतर त्या डागावर लोणी लावून त्याजवर हळदीची गोळी बसवावी, आणि दहा घडी वस्त्र करून त्याजवर लावावें आणि दुसऱ्या फडक्यानें बाधावें आणि त्या घडीचे आंत कसलें तरी मऊ पान बांधावें ह्मणजे एक दोन दिवसांत तो डाग वाहूं लागतो. नंतर शिशाची गोळी अगर व्याधिहारक वनस्पतीच्या लाकडाची गोळी बसवावी. याप्रमाणें सहा, तीन किंवा दोन महिने तो डाग वाहूं द्यावा व गुण आला ह्मणजे सोडून टाकावें. पोत घेतल्यावर इच्छेस येईल तो पदार्थ भक्षण करावा. व जितके वावडे पदार्थ आहेत तितके खावेत. अंती रेच द्यावे. पोत पुरुषाच्या बाहूला व पायाला द्यावा. आणि स्त्रियाला पायाचे नळीचे पोटरीवर द्यावा. रोगी स-

शक्त असो किंवा अशक्त असो त्यानें विचारानें पोत घ्यावा. ह्मणजे आरोग्यासिद्धि होऊन अग्निमांद्य, अजीर्ण, वायुरोग, गलग्रह, पोटाची फुगवटी, व बाहू, कंबर, पाय यांच्या ठिकाणीं वातरोग होतो, तो यांच्या नाशनार्थ वरप्रमाणें पोटरीवर द्यावा. व कान, नेत्र, आंख, नाक, मस्तक, व तोंड यांचे व्याधीवर हात व मान याठिकाणीं पोत द्यावा.

---

## क्षारविधि.

सर्व शस्त्रें व उपशस्त्रें यांमध्यें क्षारकर्म श्रेष्ठ आहे. कारण ज्या ठिकाणीं शस्त्र चालवितां येत नाहीं अशा विषमस्थानींही तो छेदन, भेदन, पाटन इत्यादि कामें करितो. तसेंच शस्त्रानें साध्य न होणाऱ्या अशा अतिशय कष्टसाध्यरोगांवर (लेपार्थ) आणि अर्शादि रोगांवर पोटांत देण्याच्याही उपयोगी पडतो.

**क्षारास योग्य रोगी**—मूळव्याध, अग्निमांद्य, मूतखडा, गुल्म, उदर व विष इत्यादि रोगांवर तो पोटांत द्यावा. आणि मस, कोड, बाहेरचे मूळव्याधीचे मोड, कुष्ठ, त्वचेची बधिरता, भगंदर, अर्बुद, ग्रंथी व दुष्ट नाडीव्रण इत्यादि रोगांवर क्षाराचा लेप करावा. तसाच नाकांतील मोडावरही क्षाराचा उपयोग करावा.

**क्षारास अयोग्य काळ**—शिशिर, हेमंत, ग्रीष्म व वर्षा या ऋतूंत ज्या दिवशीं अभ्र असेल त्या दिवशीं दोन्हीही प्रकारानी (लेप व पोटांत घेणें) क्षाराचा उपयोग करूं नये.

**मध्यम क्षार तयार करण्याची रीति**—बाहवा, केळ, देवदार, लघुराळेचा वृक्ष, तिधारी निवडुंग, पळस, मांदार ( रुईचा भेद ) कुडा, अर्जुनसादाडा, रुई, घाणेरा करंज, साधा करंज, कण्हेर, काकजंघा ( कांगोचें झाड ) आघाडा, ऐरण, चित्रक व लोध याची झाडें, खांद्या व मुळें पानें इत्यादि सर्व ओलीं आणून त्याचे बारीक बारीक तुकडे करावे. त्याचप्रमाणें कडू दोडकी, कडू घोसाळी, देवडांगरी, व कडू दुध्या भोपळा, सातूच्या काड्या व तुस [ कोंडा ] या सर्व पदार्थांच्या निवांत स्थानी दगडावर निरनिराळ्या राशी करून ठेवाव्या. व राशींत चुनखडे घालावे. नंतर तिळाचे दांडे ह्मणजे काड्या पेटवून त्यांणीं त्या राशी पेटवाव्या. नंतर चुना निराळा काढून त्या सर्व पदार्थांची राख एकंदर सहा शेर घेऊन ती पांच शेर पाणी व पांच शेर गोमूत्र आंत घालून एका मोठ्या वस्त्रानें गुळगुळीत लाल पातळ व तीक्ष्ण होईपर्यंत अनेक वेळा गाळावी. नतर तें क्षाराचें पाणी एका लोखंडाच्या पात्रांत घालून चुलीवर ठेवून खाली जाळ लावावा व पळीनें ढवळावें. तें आटूं लागलें ह्मणजे त्यांतून सोळा तोळे पाणी दुसऱ्या एका लोखंडाच्या भाड्यांत घेऊन त्यांत तें निराळें काढून ठेविलेले चुनखडे, शिपा, खडू व शंख वारंवार तापवून लाल

करून विझवावे आणि मग त्याच पाण्यांत बारीक वांटून त्या सर्व क्षारोदकांत घालावें. तसेंच कोंबडें, मोर, गिधाड, कंक [ बगळा ] व पारवा यांची विष्ठा, बारीक करून त्यांत घालावी. तसेच पशु व पक्षी यांचें पित्त, हरताळ, मनशीळ, सैंधव ही त्यात घालून चोहोंकडून पळीनें ढवळावें. त्यांतून वाफेबरोबर बुडबुडे येऊं लागले ह्मणजे खालीं उतरावें. थंड झाल्यावर लोखंडाच्या भांड्यांत घालून सातूच्या राशींत त्या भांड्याचें तोंड बांधून सात दिवस ठेवावें. हा मध्यम क्षार होय.

**मृदुक्षार तयार करण्याची कृति**—मृदु क्षार करावयाचा असला ह्मणजे शिंपादि पदार्थ अनेक वेळां तापवून फक्त त्या पाण्यांत विझवावें व तें वांटून आंत घालूं नये. फक्त त्या पाण्यांत विझवावें ह्मणजे झालें.

**तीक्ष्ण क्षार**....तीक्ष्ण क्षार करावयाचा असल्यास मध्यम क्षाराप्रमाणें तयार करून त्यांत आणखी कळलावी, दांतिमूळ, चित्रक, अतिविष, वेखंड, सज्जीखार, पिसोळा हिंग, घाणेऱ्या करंजाची पाने, मुसळी व बीडलोण हीं औषधें बारीक करून घालावीं. सातूच्या राशीत सात दिवस पुरून ठेविल्यानंतर मध्यम मृदु तीक्ष्ण अशा तिन्ही क्षारांचा उपयोग करावा.

**क्षाराची रोगावर योजना**—वात, कफ व मेद यांपासून झालेल्या अतिवृद्ध, अर्वुदादिकांवर तिक्ष्ण क्षाराचा उवयोग करावा. तेच विकार मध्यम असले ह्मणजे त्यांजवर मध्यम क्षाराची योजना करावी.—पित्तजन्य व रक्तजन्य अर्शावर [ मोडावर ] मृदु क्षाराचा उपयोग करावा. व नाकातील मोडावरही मृदु क्षाराचाच उपयोग करावा.

**क्षाराचे धर्म**—किंचित् तीक्ष्ण, मृदु गुळगुळीत, बुळबुळीत लवकर पसरणारा, पाढरा, भाड्यांत ठेविल्यानें ज्यात काही दिवसांनीं तळी शिखराकार सांखा जमतो असा सहज शात होणारा, स्त्रावन करणारा, अतिशय वेदना न करणारा, असा दशगुणात्मक क्षार, शस्त्र व अग्नि या दोहोंची कामें करितो. क्षार शरीरास लाविला असता त्या भागास जोरानें ओढून घेतल्यासारखी व दाबल्यासारखी वेदना करून जिकडे तिकडे पसरून दोषास मुळापासून उपटून टाकितो. त्याचें कार्य झाल्यावर वेदना नाहीशी होऊन तो आपोआप थंड होतो क्षार पात्रांत घालून ठेविल्यावर वाळला असतां त्याची क्षीणता वाढविण्यासाठी त्यात पुन्हां राखेचें पाणी घालावें.

**क्षार लावण्याचा प्रकार**—क्षारानें साध्य होणाऱ्या रोगास क्षार लावण्यासाठीं तो रोग प्रथम कापावा किंवा खरवडावा किंवा त्यांतून स्त्राव करवावा. नंतर सळईस कापूस गुंडाळून त्या सळईनें वर क्षार लावून शंभर अंक मोजीपर्यंत तसाच ठेवावा.—मूळव्याधीवर क्षार लावल्यानंतर सळईवर हात ठेवून तिचें तोंड झांकावें. पापण्यांच्या रोगावर क्षार लावणें असल्यास डोळ्याच्या पापण्यावर दुमडून आंतील

लाल भाग बाहेर आला ह्मणजे काळ्या भागावर वस्त्राचा बोळा ठेवून लाल भागावर कमळाच्या पानाप्रमाणें पातळ लेप करावा.—ह्मणजे पडकेंस वगैरे रोग नाहींसे होतात. नाकांत मूळव्याधीसारखे कोंब येतात त्यांवर क्षार लावावयाचा असतां रोग्यास सूर्याकडे तोंड करून बसवावा व नाकाची बोंडी वर दाबून कमळाच्या पानाइतका पातळ लेप करून पन्नास अंकपर्यंत तसाच ठेवावा. नंतर लागलाच कापूस गुंडाळलेल्या सळईनें क्षार पुसून टाकून चांगलें दग्ध झालें असें पाहून तूप व मध एकत्र करून त्याजवर लावून दूध, दह्याची निव्वळ यानें धुऊन त्याच पदार्थांत तूप घालून मधुर व शीत करून त्याचा लेप करावा. स्राव होण्यासाठी अभिष्यंदि पदार्थांचें सेवन करावें. रोगाचें मूळ बळकट असल्यामुळें क्षार लावून जाळली असताही जर रोग गळून पडेल तर त्यावर कांजीचा खमीर [ धान्याम्लाच्या तळीं जो घनभाग असतो तो ] जेष्ठीमध व तीळ यांचा लेप करावा.

**जळालेल्या व्रणावर उपाय**—क्षार लावलेल्या ठिकाणीं तिळाचा कल्क, जेष्ठीमध व तूप यांचा लेप करावा ह्मणजे व्रण भरून येतो. सम्यक् दाह झाला असतां पिकलेल्या जांभळासारखा रंग येतो व तेथें खळी पडते. वरील प्रकार न होतां लाली, शूळ व कडूं इत्यादिक झालीं असतां दुर्दग्ध झालें असें जाणावें.—दाह अति झाला ह्मणजे रक्त वाहूं लागतें व मूर्छा, दाह व ज्वर इत्यादि विकार उत्पन्न होतात.—तोच गुदस्थानी झाला असतां विशेषेंकरून मल व मूत्र याचा अवरोध किंवा अति प्रवृत्ति होते, पुरुषत्व नाहींसें होतें किंवा गुद गळून पडल्यामुळें रोगी मरतो. नाकात अतिदाह झाला तर मधील पडदा फाटतो किंवा आकुंचित होतो. व पदार्थांचा वास मुळींच येत नाहीसा होतो.—कर्णादिकांत अतिदाह झाला असतां अशींच लक्षणें होतात.

**क्षारानें झालेल्या दाहावर उपाय.**—अशा ठिकाणीं विशेषेंकरून आंबट पदार्थांनी परिशेक (त्या पदार्थात फडकें भिजवून वर घड्या ठेवाव्या) तसेंच मध, तूप व तीळ यांचा लेप करावा. कारण आम्लरस स्पर्शानें शीत आहे. उदाहरणार्थ दहीं आणि त्याच्याशी क्षाराचा संयोग झाला असतां क्षार मधुर होतो. यासाठीं विशेषेंकरून आंबट पदार्थांनींच दाह शमवावा.

---

## त्रिदोषाचा प्रकोप व शम.

सर्व रोगांचें कारण कुपित झालेले दोष आहेत. व दोष प्रकोप होण्याचें कारण अनेक प्रकारचें अहितसेवन होय.

**वायूचा कोप व शम**—मलमूत्रांचा अवरोध किंवा ते बळानें करणें, पहिलें अन्न जिरलें नसून लागलींच दुसऱ्यानें भोजन किंवा वेळ टळल्यावर भोजन, जागरण,

---

१ ह्मशींचे दहीं इ०.

ओरडणें, व्यायाम, तिखट, कडू, तुरट व रुक्ष हे पदार्थ भक्षण, चिंता, भीति, स्त्री, गमन, शोक, लंघन, थंड पदार्थ सेवन, जखम होणें, पाण्यांत फार पोहणें, निरशन, ओझें वाहणें, झाडावरून पडणें, फार मार्ग चालणें, वारंवार मैथुन, फार वांति, फार रेच अति रक्तस्राव, पूर्वेकडील वारा, आणि पर्जन्य येण्याचे दिवस इतक्या कारणांनीं वायु कुपित होतो. लक्षण—अंगाला खरखरीतपणा, संकोच, ठणका, शूळ, काळेपणा, अंगग्रह, चेष्टानाश, स्पर्शाचें अज्ञान, शैत्य, निस्तेजपणा, आणि शोष हीं वायूची कर्मे होत. शमन—स्निग्ध, उष्ण, जड, वृष्य, बलकर, खारट, गोड, आंबट, तेल, ऊन, ऊन पाण्यानें स्नान, अभ्यंग, मांस, मद्य, अंग रगडणें, घाम काढणें, नस्य, शयन, बसणें इ० वायूची शांति करितात.

**पित्ताचा कोप व शम**—तिखट, आंबट, मद्य, खारट, विदाही, तीक्ष्ण, क्रोध, सूर्यताप, अति भय, श्रम, शिळ्या व वाळलेल्या भाज्या, अजीर्णकारक भक्षण, उडीद, तीळ, कुळिथ, मत्स्य, मेंढ्याचें मांस, गाईचें दहीं व ताक, उपवास, स्त्रीसंग. तहान व भूक यांचा निरोध आजि पाऊस जाण्याचे दिवस, दुपारीं, मध्यरात्रीस व भोजनाचा पचन काळ इ० कारणांनीं पित्ताचा प्रकोप होतो. लक्षण—अत्यंत श्रम, घाम, अंगावर लाली, दुर्गंधपणा, अंगाला ओलसरपणा, मुखादिकांचा पाक, अंगावर गांधी, बडबड, मूर्च्छा, भ्रम आणि दाह इ० लक्षणें होतात. शमन—कडू, गोड, तुरट, थंड वारा, छाया, रात्र, पाणी, चांदणें, भुयार, कारंजीं, कमळें, स्त्रियांचें आलिंगन, तूप, दूध, रेचक, अंगावर पाण्यादिकाचें सिंचन, रक्तस्राव आणि शीतळ असे लेप इ० पित्ताची शांति करितात.

**कफाचा कोप व शम**—जड पदार्थ, मीठ, आंबट, मधुर, स्निग्ध, उडीद, तीळ, अभिष्पंदी ( दहीं ) थंड व पातळ पदार्थ, दिवसास निद्रा, निचेष्ट बसणें, भोजनोत्तर काल, मासे, मांस, आंबा, चिकण पदार्थ, तीळ, अजीर्ण, उसाच्या रसाचे पदार्थ, दुधाचे व तृप्तिकारक पदार्थ, रात्रीच्या व दिवसाच्या पहिल्या भागांत व जेवल्याबरोबर लागलींच व वसंतऋतु इ० कारणांनीं कफाचा प्रकोप होतो. लक्षण—शरीरास पांढरेपणा, थंडपणा, जडपणा, कंडू, चिकटपणा, वृद्धपणा, सूज काम लवकर न होणें, इत्यादि लक्षणें होताह. शमन—रुक्ष, क्षार, तुरट कडू, तिखट, व्यायाम, लालास्राव, स्त्रीगमन, मार्गगमन, युद्ध, जागरण, जलक्रीडा, पायानें रगडणें, धूम्रपान, ताप, मस्तकरेच, वांति, घाम काढणें, आणि पेंड बांधणें इत्यादि कफाची शांति करितात.

---

## अजीर्णपाचन प्रकरण.

अजीर्ण पाचन ह्मणजे ज्या पदार्थाचें अजीर्ण झालें असेल किंवा होण्यासारखें असेल तर त्याजवर त्याचे पुढें दाखविलेले पदार्थ भक्षण केले असतां त्यामुळें पदार्थापासून

अजीर्ण होत नाहीं. जसें उसाच्या रसांत थोडा आल्याचा रस घालून सेवन केलं असतां तो रस बाधत नाहीं. कदाचित् त्या रसापासून अपकार जाहल्यास त्याजवर शक्ति पाहून आल्याचा रस प्राशन केला म्हणजे उसाच्या रसापासून झालेले विकार [ अजीर्ण ] तात्काळ दूर होतात.

---

अळवाचे भाजीस—तांदुळाचें धुवण.
अलुक [ पिंड आलु ] याजवर हरीक म्हणजे कोद्रू अथवा सुंठीचा काढा.
आंवळ्यास—बकुळीची बी.
आबाड्यास—शिळें पाणी.
आंबे अथवा आंब्याचा रस यास—संचळ, दूध अथवा तांदूळजा.
आंव जाहल्यास—सुंठ व धणे.
आमसुलास—नागरमोथे.
उंबरावर—शिळें पाणी.
उडदावर—धोत्रा, एरंडमूळ अथवा खडीसाखर.
उसास—आलें.
उष्णास—शीत.
कवठास—बडीशेप.
करंज्यास—पिंपळमूळ.
करवंदास—आकाशवेल-
कर्णरोगास—तिळाचें तेल.
कण्हेरीस—पिंपळमूळ.
काजीस—मुगाचा यूष.
कारल्यास—पांढरें शिरस.
कांगास—मध, अथवा दह्याची निवळ,
कापूर, केशर व कस्तुरी यांस—समूद्र फेस.
कुचल्यास—पांढरे शिरस.
कुळिथास—तिळाचें तेल अथवा दह्याची निवळ.
कळास—तूप.
कोहळ्यास—काकडी, करंजबीज अथवा ऐरणीचें मूळ.
कोद्रू म्हणजे हारीक यांस—कोहळ्याचे रसांत गूळ घालून द्यावा.
खजुरास—सुंठ, मिरी.
खडीसाखरेस—सुंठ.
खाज्यास—पिंपळमूळ.
खिचडीस सैंधव.
खिरीस मुगाचें कढण.
गव्हांस—काकडी अथवा धोत्रा.
घारग्यास—ओंवा, आजमोदा किरमाणी ओंवा अथवा पिंपळमूळ.
घास गिळत नसल्यास व घशांत अडकत असल्यास—आल्याचा रस व भात कालवून खावा.
घृताचे अजीर्णावर—इडलिंबू, निंबू, पिंपळी व ताक.
घोरपडीचे मांसास—एरंडेल.
चारोळ्यास—उन पाणी, हरीतकी किंवा मिरीं.
चाकवतास—कातांचें पाणी.
चिंचेवर—तिळाचें तेल अथवा चुना.
चुन्यास—तिळाचे तेलानें चूळ भरणें.
जायफळ व जायपत्री—यास समुद्रफळ.
जाभळास—सुंठ.
जिलबीवर—पिपळमूळ.
दाळीवर—कांजी.
डुकराचे मांसावर—जवखार.
ताडफळास—मिरीं.
तांदुळास—दूध अथवा पाणी.
तांबूलावर—दह्याची निवळ.
ताकावर—कडू निंबाचें बी.

तांदुळज्यास–पांढरे शिरस,
तिखटास–तूप, तेल, अथवा दूध.
तूप, तेल इत्यादिकास–कांजी अथवा मुगाचा यूष.
दाळीवावर–वकुळें.
दूध ह्मशीचें यांजवर–सैंधव किंवा शंखभस्म.
दूध गायीचें याजवर–शंख भस्म.
दुधास–ताक.
दह्यास–शंखभस्म.
दुध्या भोपळ्यास–शिरस किवा पळसाचा क्षार.
द्राक्षास–सुंठ अथवा भद्रमोथा.
धोत्र्याचे विषास–दूध, साकर.
नारळास–तांदुळाचें धुवण.
नारिंगावर–गूळ अथवा हरीक.
नागवेलीचे पानावर–समुद्रफेंस.
नारळाचे पाण्यावर–समुद्रफळ.
नाकाचे रोगास–शीतोदक.
नेत्ररोगास–स्त्रीदूध.
पंचकर्म ह्मणचे रेचन, वमन, नस्य, पूर्व वस्ती व उत्तरवस्ती यांजपासून विकार झाल्यास–सुंठ व धमासा यांचा काढा द्यावा.
पडवळावर–पाढरा शिरस.
पापडावर–शेवगा.
पाण्याचे अजीर्णावर–सोनें, रुपें, हें सात सात वेळां तापवून पाण्यांत विझवून तें पाणी द्यावें.
पिष्टान्नावर पाणी.
पिपळीवर–ओंवा.
पोह्यावर–ओंवा अथवा पिपळी.
फणसास–केळें अथवा आंब्याची कोय.
फालशावर–निंबोळ्या अथवा मिरीं.
फेणीस–लवंगा अथवा शेवग्याचें बी.

बकुळास–बकुळीचें मूळ.
बेलफळास–निंबोळ्या.
बोरावर–ऊन पाणी.
भोपळ्यास–करंजबी अ० ऐरणीचें मूळ.
मद्यावर–तूप, साखर, गेरु, चंदन बकुळी.
मधास–हरीतकी.
महाळुंगास–बकुळी अथवा लवण.
मत्स्यास–बीडलोण, धोत्र्याचीं पानें व भाजलेल्या मत्स्यास–ओंवा.
मटक्यास–दह्याची निवळ.
मांसावर–काजी अ० आंब्याची कोय.
मुगास–धोत्रा.
मुळ्यास–पांढरे शिरस.
मांड्यास–पिंपळमूळ.
मोहऱ्यास–खैराचा काढा.
राळ्यास–दह्याची निवळ.
लसुणावर–दूध.
लाह्यास–बकुळाचें मूळ.
लाडूस–पिपळमूळ.
वर्यास–शिरस, मध, दह्याची निवळ.
वड्यास–निंबू अथवा मसाला.
वमनास–साखर.
वाग्यावर–वर्याप्रमाणें.
वाटाण्यांस–धोत्र्याचीं पानें.
वालांस–मंथ.
वेळूचें कोंब्रास–पांढरें शिरस.
शिगाड्यावर–सुंठ, भद्रमोथा.
शिखरिणीस–त्रिकटु, लवंगा.
शिरसास–काताचें पाणी.
साखरेवर–भद्रमोथा.
साव्यास–दह्याची निवळ.
सुरणास–गूळ.
सुंठीस–नागरमोथा.
सुपारीवर–समुद्रफेण, लसूण, पाणी किंवा रानशेणीची राख यांचा वास घ्यावा.

| | |
|---|---|
| हरबऱ्यास—धोत्रा. | क्षाराचे अजीर्णावर—आंबट पदार्थ किंवा तांदुळाचें धुवण. |
| हरिकास—कोहळ्याचा रस. | |

# रोगशुश्रूषा.

मनुष्य रोगानें ग्रस्त होऊन अगदीं बिछान्यावर निजून राहतो. त्या वेळी त्याची शुश्रुषा चांगली ठेविल्यास तो त्या रोगापासून लवकर सुधारतो. याकरितां ती शुश्रूषा कशी ठेवावी ती थोडक्यांत येथें सांगतों.

रोग्याची खोली झाडून सारवून अगदी स्वच्छ ठेवावी. पांघुरणें वरचेवर पालटीत जावींत. अंगांत स्वच्छ कपडे घालीत जावे, मळकट व घाणेरडी वस्त्रें अगदीं ठेवूं नयेत. त्याच प्रमाणें बिछाना दररोज एक दोन वेळा चांगला झाडून त्याजवरील कपडे स्वच्छ ठेवावे. रोग्याचे खोलींत घाणेरडीं भांडी, पिकदाण्या व समया ठेवूं नयेत. त्या वरचेवर साफ करून ठेवाव्यात. रोगी पाहील अशा रीतीनें अन्न शिजवूं नये. समाचारास आलेल्या माणसांची फार गर्दी व घोटाळा होऊं देऊं नये. त्यापासून रोग्यास त्रास होऊन रोग वाढतो. इकडून तिकडे वाऱ्याचा प्रवाह होई अशा प्रकारची रोग्याची खोली असावी. त्याखोलीत सूर्याचे कीरण रोग्याचे अंगावर कांहीं वेळ पडे असें करावें. ह्मणजे त्या पासून रोग्यास गुण येतो. कारण ज्या ठिकाणीं झाडाची छाया असून सूर्य किरण पडत नाही त्या ठिकाणी वनस्पती वगैरे झाडें अगदीं निर्जीव उगवतात हें सर्वांच्या पाहण्यांत आहेच. केरोसेन तेलाचा दिवा त्या खोलीत ठेवूं नये. तो फार घातक आहे. करितां खोबरेल किंवा मेणबत्तीचा अथवा तुपाचा दिवा लावावा.—रोग्यास निरनिराळे तऱ्हेचे २ बिछाने असावेत. वात व कफ रोग्यास लोंकरीची वस्त्रें असावी, पित्तविकार, क्षय, कास व जीर्णज्वर यास कापसाचीं, वस्त्रें असावीं.—रोग्याचे नजरेस आरसा केव्हाही पडूं देऊं नये.—इतर चित्रांच्या तऱ्हतऱ्हेच्या तसबिरा असल्यास उत्तम—रोग्यास जेवण घालते वेळी एकदम ताट वाढून सर्व पदार्थ त्याचे पुढें नेऊं नयेत.—पूर्वीं थोडे दाखवून मग जसजसे लागतील तसतसे न्यावे—ह्मणजे त्याचें सर्व लक्ष काय पदार्थ येतात इकडे लागतें.—रोग्याचे पथ्यास जपत जावें—पथ्य देण्याची जी वेळ असेल त्यापूर्वी ५ मिनिटें तयारी ठेवीत जावी, नाहीं तर त्यास राग येऊन रोग वाढतो.—रोग्याचे जेवण्याचे वेळी बिलकूल गडबड होऊं देऊं नये व कोणी मनुष्य तिकडे जाऊं नये. शांतपणानें जेवण होऊं द्यावें.—रोग्यास वेळेवर पथ्यास न मिळाल्यामुळें आजपर्यंत अनेक रोगी मरण पावले. रोग्याजवळ शहाण्या आणि मोठ्या धूर्त मनुष्यांनीं नेहमी असावें—खरा काळजीनें व मेहनत घेऊन शुश्रूषा करण्यात जो मनुष्य कुशल असतो तो रोग्याचे आरोग्यतेस कारण होतो. एरवीं दुसऱ्या अविचारी मनुष्यापासून व मुलाच्या गों-

गाटापासून त्रास पावतो.–रोग्यास बिलकूल धूर न लागेल अशी तजवीज ठेवावी.–सांसर्गिकरोग कागदास किंवा कपड्यास फार दिवस चिकटून राहतो. करितां या दोहोंबद्दल फार सावधगिरी ठेवावी.—रोग्याचे खोलींत इतर खाण्याचे जिन्नस बिलकूल ठेवूं नयेत.—दार उघडण्याचा, किरकिरण्याचा आवाज, धडा धडा पावलें टाकीत रोग्याजवळ जाणें, हरएक प्रकारचा गोंगाट, मोठ्यानें भाषण, व त्याचे शेजारीं उगीच गप्पा मारीत बसणें इ० प्रकारानी रोग्यास त्रास होतो--वाईट वार्ता, रोग्याचे समक्ष बोलूं नये व कोणत्याही रीतीनें त्यास राग येईल असें वर्तन करूं नये. रोग्याचे खोलींत उगीच तमाशा पाहण्यास ज्याचा संबध नाहीं अशीं बायकामुलें भरतात, त्याजपासून रोग्याचा आजार मात्र जास्त वाढतो. कारण त्यांत खरे मित्र फार थोडे असतात. अशापासून मात्र रोग्यास त्रास होत नाही.—रोग्यास कोणी भेटण्यास आला की, त्यास त्रास झालाच, परंतु तो बोलून दाखवीत नाही.—पत्रांतील वाईट मजकूर किंवा कोणतीही वाईट गोष्ट त्यास कोणीच सांगूं नये. कारण त्याचे मनास धक्का बसून रोग जास्त वाढतो.—रोग्याचें मन स्वस्थ राहील व त्याला कोणत्याही प्रकारची आशा उत्पन्न होईल असें करणे त्याचे निरोगीपणास कारण होतें. वैद्यानें विचारलेल्या प्रश्नाचीं उत्तरें भलतीच देण्यापेक्षा त्यासंबंधानें आपण गैरमाहित आहों असें सांगणें चांगलें होईल.—आजारी मनुष्याचा रोग कमी झाल्यास त्यास शक्ति येण्याकरितां जितका हवा पालटल्यानें गुण येतो तितका दुसरा कशानेंही येत नाही.—दुखण्यांत शेजाऱ्यापाजाऱ्या बगैऱ्यांच्या सल्लचानें औषध देण्यापेक्षां योग्य व सुजाणत्या वैद्यापासून उपचार करणें चांगलें हितावह होतें. याचें कारण ज्याचें काम तोच चांगलें करूं शकतो.

---

## रोगज्ञानाचे पांच उपाय.

॥ निदानंपूर्वरूपाणिरूपाण्युपशयस्तथा ॥ संप्राप्तिश्चेतिविज्ञानंरोगाणांपंचधास्मृतं ॥

निदान ह्मणजे उत्पत्ति कारण, तें दोन प्रकारचें, एक समीपचें व दुसरें दूरचें, ज्वरादिकांना उत्पन्न करणारे असे जे वातादि कुपित दोष ते समीपचें कारण, व कफादिकाला उत्पन्न करणारे जे वसंतादिक ऋतू ते दूरचें कारण. पूर्वरूप, जृंभा, आलस्यादि, रूप, अंगसंतापादिक उपशय ह्मणजे औषधादिकेंकरून रोग्यास सुख होतें तो, संप्राप्ति ह्मणजे रोगदोषाचें यथार्थ लक्षण. असे रोग विशेष ज्ञानाचे पांच प्रकार मुनींनी सांगितले आहेत.

**निदानाचे पर्याय शब्द**—निमित्त, हेतु, आयतन, प्रत्यय, उत्थान आणि कारण हे निदानाचे पर्याय शब्द, शास्त्रव्यवहारार्थ, मुनीनी सांगितले आहेत.

**पूर्वरूप**—ज्या लक्षणांनी उत्पन्न होणाऱ्या व्याधीचें ज्ञान होतें त्या लक्ष-

णास प्राग्रूप असें ह्मणतात. तें सामान्य आणि विशेष या भेदानें दोन प्रकारचें आहे. सामान्य प्राग्रूप ह्मणजे वातादि दोषांचें आधिक्य नसतां उत्पन्न होणारा जो व्याधि त्या व्याधीचें ज्ञान ज्या लक्षणांनी होतें तें. विशेष प्राग्रूप ह्मणजे व्याधि अल्प असल्यामुळें जी थोडथोडीं लक्षणें दिसून येतात तीं.

**रूप**—तेंच प्राग्रूप स्पष्ट झालें असतां त्यास रूप ह्मणतात. त्याचे संस्थान, व्यंजन, लिंग, लक्षण, चिन्ह आणि आकृति हे पर्यायशब्द आहेत.

**उपशय व अनुपशय**—हेतुविपरीत, व्याधिविपरीत व हेतुव्याधिविपरीत, हेतुविपर्यस्तार्थकारी, व्याधिविपर्यस्तार्थकारी व हेतुव्याधिविपर्यस्तार्थकारी अशीं औषधें, अन्नें, आणि विहार, यांचा जो हितकारक उपयोग त्याला रोगाचा उपशय ह्मणतात. याचा व्याधिसात्म्य हा पर्याय शब्द आहे. आणि औषधादिकांचा अहितकारक जो उपयोग त्याला अनुप शय ह्मणतात. याचा व्याध्यसात्म्य हा पर्याय शब्द व्यवहारार्थ सांगितला.

**हेतुविपरीत**—ह्मणजे रोगोत्पत्ति कारणाला विरुद्ध औषध अन्न आणि विहार, जसें शीतज्वरावर शुंठ्यादि औषधें, व श्रम आणि वायूपासून झालेल्या रोगास मांसरस व उत्तम भोजन इत्यादि अन्नें, आणि दिवा निद्रेपासून झालेल्या पडशास रात्रींचें जागरण इत्यादि विहार.

**व्याधिविपरीत**—ह्मणजे केवळ रोगालाच विरुद्ध. जसें अतिसारावर स्तंभन पहाडमूळ, अफू इत्यादि. विषावर शिरीष, कुष्ठावर खैर इत्यादि; आणि मेहावर हाळद ही औषधें, व अतिसारावर स्तंभन, मसूरा, मेथ्या इत्यादि अन्नें; आणि उदावर्तावर कुंथणें, व गुरु, मंत्र देवता इत्यादि विहार.

**हेतुव्याधिविपरीत**—ह्मणजे निदान व रोग याना विपरीत. जसें वायूपासून झालेल्या सुजेवर दशमूलादि वातनाशक, व शोथनाशक औषधें; वातकफ संग्रहणीवर ताक; वातकफ नाशक आणि संग्रहणी नाशक; व शीतज्वरावर पेज इत्यादि अन्नें आणि स्निग्ध अशा दिवा निद्रेपासून झालेल्या तंद्रेवर रुक्ष असें रात्री जागरण इत्यादि विहार.

**हेतुविपर्यस्तार्थकारी**—ह्मणजे निदानापासून झालेल्या व्याधीस निदानसदृशगुण कारक. जसें पित्तप्रधान व्रणशोथावर पित्तकारक व उष्ण असा पेंड बांधणें. हें औषध; आणि पिकणाऱ्या व्रणाच्या सुजेवर विदाहकारक अन्न, आणि वातोन्मादावर त्रास देणें हा विहार.

**व्याधिविपर्यस्तार्थकारी**—ह्मणजे ओकारीवर वांतिकारक गेळफळ इत्यादि औषधें; आणि अतिसारावर रेचकारक दूध इत्यादि अन्नें व वांतीवर वळानें ओकारी करणें इत्यादि विहार.

**हेतुव्याधिविपर्यस्तार्थकारी**—ह्मणजे अग्नीनें भाजल्यावर अगरूचा लेप, अथवा विषावर विषनाशक, विष इत्यादि औषधें; व मद्याच्या उन्मादावर मादक मद्यपान, इत्यादि अन्नें; आणि आमापासून झालेल्या मूढ वातावर पोहणें इत्यादि विहार.

**संप्राप्ति**—वातादिदोष कुपीत होऊन ते आपआपल्या नाडीमार्गानें शरीरांत प्रवेश करूं लागले ह्मणजे तेणेंकरून जो रोग उत्पन्न होतो त्यास संप्राप्ति असें ह्मणतात. तिचे पर्याय शब्द जाति आणि आगति असें आहेत.

**संप्राप्तीचे भेद**—संख्या, विकल्प, प्राधान्य, बल, आणि काल, यांच्या विशेषानें सप्राप्तीचे भेद होतात. संख्या विशेष ह्मणजे जसा ज्वर आठ प्रकारचा तसे असतात.

**विकल्प व प्राधान्य**—कोणत्याही व्याधीमध्यें वात, पित्त, आणि कफ या दोषातून कोणत्या एखाद्या दोषाचें, अथवा दोषाचें प्राधान्य असून त्या दोषांतून कोणता एखादा दुसरा दोष गौणत्वानें त्या प्रधान दोषांशीं सहचारी आहे. हें जें जाणणें त्यास विकल्प असें ह्मणतात. व्याधीमध्यें जो व्याधि स्वातंत्र्यानें अगर पारतंत्र्यानें विशेष असतो त्यास मुख्य अथवा प्रधानव्याधि असें ह्मणतात.

**रोगाचा बलाबल विचार**—निदानादिक संपूर्ण पांच अवयवांनी व्याधि व्याप्त झाला असतां तो व्याधि बलवान् जाणावा. आणि न्यून अवयवानीं व्याप्त असतां अबल जाणावा. रात्र, दिवस, ऋतु आणि भक्ष्य यात कफ, पित्त आणि वात हे दोष आरंभी, मध्यें व अंती जाणून त्यावरून व्याधिकालाचा निश्चय करावा. वाग्भटानें ऋतूच्या बदली आयुष्य घेतलें आहे.

**निदान पंचकाचा उपसंहार**—याप्रमाणें येथें निदानाचा अर्थ सांगितला. तोच पुढें प्रत्येक रोगाचा विस्तार करून सागतो. कुपित झालेले जे वात, पित्त आणि कफ हे दोष, ते सर्व रोगास कारण आहेत वातादि दोषांचा प्रकोप होण्यास अपथ्य सेवन हें कारण होय. व पुढें होणाऱ्या व्याधीचें निदान होण्यास पूर्वरोग ही कारण होतो. जसें उदररोगापासून सूज, रक्तपित्तापासून ज्वर, रक्तपित्त व ज्वर यापासून दमा, पडश्यापासून खोकला, खोकल्यापासून धातुक्षय होतो, व तो धातुक्षय उरःक्षतास व क्षयास कारण होतो. याप्रमाणें पूर्वी एक रोग स्वतंत्र असून दुसऱ्या रोगाला कारण होतो, व कित्येक रोग दुसऱ्या रोगास उत्पन्न करून आपण शात होतात. जसें कांवीळ पाडुरोगाला उत्पन्न करून आपण शांत होते असें जाणावें.

---

# वैद्याचें कृत्रिम.

कांहीं द्रव्यलोभी वैद्य एकादा पैसेकरी इसम पाहून कोणत्या एखाद्या रीतीनें त्याचे खाण्यांत कृत्रिम पदार्थ जाई अशी तजवीज करितात म्हणजे तो पदार्थ सेवन केल्यापासून अमुकच तासांत किंवा अमुक दिवसांत अमुक भयंकर रोग उत्पन्न व्हावयाचाच नंतर वैद्यबुवाकडे आल्यास वैद्यबुवा सांगतात कीं, " हा रोग असाध्य आहे खरा परंतु तुह्मी जर चांगला पैसा खर्च कराल तर आह्मी प्रयत्न करून पाहूं " असें सांगून कांहींएक रक्कम ठरवितात. नंतर त्यास लागलींच उतार देतात, मग अर्थात् रोग आपोआप शांत होतो. याप्रमाणें कित्येक वैद्य असतात. दुखण्याचे चढउतारास ते काय देतात हें मात्र आह्मी सांगूं शकत नाहीं. उदाहरणार्थ— संग्रहणीरोग. रोगी अशक्त झाला आहे असें पाहून भांग भाजून तिचे चूर्णाची गोळी गुळांत करून त्या रोग्यास अस्तमानीं खाण्यास देतात. तेणेंकरून संग्रहणीस कांहीं शम होतो; परंतु रात्री दिव्याचे उजेडानें भांगेचा अम्मल येऊन वायु झाल्याप्रमाणें तो रोगी वरळूं लागतो व बाहेर उठून पळून जावयास लागतो. मग घरांतील मनुष्यास असें वाटतें कीं, रोग्यास वायूचा झटका झाला आहे व ते घाबरतात व वैद्यास लागलेंच बोलावून आणितात. मग तो जे पैसे मागेल ते कबूल करणें भाग पडतें. नंतर वैद्यबुवा भांगेचा उतार देतात. त्या योगानें तो कृत्रिम वायु लागलाच दूर होतो. मग भाविक लोक वैद्याची मोठी तारीफ करून त्यास द्रव्यद्वारा वगैरे खुष करितात. नुस्ती औषधीची गोळी देतात. परंतु ती भांग आहे असें ते सांगत नाहींत. उतार दहीभात दिला कीं कृत्रिम वायु लागलाच उतरून जातो असें जाणावें.

# भाग २ रा.

## अजीर्ण.

॥ अजीर्णं त्रिविधं प्रोक्तं विष्टब्धंवायुनामतं ॥
॥ पित्ताद्विदग्धं विज्ञेयं कफेनामं तदुच्यते ॥
॥ विषाजीर्णं रसोत्पन्नं दोषैःस्यादलसस्त्रिधा ॥
॥ विषूचीत्रिविधाप्रोक्तादोषैः सास्यात्पृथक्पृथक् ॥
॥ दंडकालसकश्चैवएकैवस्याद्विलंबिका ॥

**अर्थ**—अन्नाचा परिपाक होत नाहीं व अन्न जिरत नाहीं त्याला अजीर्ण ह्मणतात. तें तीन प्रकारचें आहे. वायूपासून जें अजीर्ण होतें त्याला विष्टब्धाजीर्ण ह्मणतात. पित्तापासून होतें त्याला विदग्धाजीर्ण ह्मणतात. कफापासून होतें त्याला आमाजीर्ण ह्मणतात. चवथें अजीर्ण अन्नाच्या रसापासून होतें त्याला विषाजीर्ण ह्मणतात. वात, पित्त आणि कफ या तीन दोषांच्या वेगळ्या वेगळ्या लक्षणेंकरून अलसकरोग तीन प्रकारचा तो अजीर्णापासूनच होतो. तशीच विषूची (माहामारी) वातादि दोष भेदानें वेगळी वेगळी तीन प्रकारची तिला मोडशी असें ह्मणतात. दंडकालसक आणि विलंबिका हे दोन रोग त्या मोडशीचे भेद आहेत. त्याला प्रचारात महामारी असें ह्मणतात.

**कर्मविपाक**—जन्मलग्नापासून षष्ठस्थानीं गुरु असेल तर लोकनिंदित, कृपण, बंधुयुक्त, स्त्रीवियोगी, अग्निमांद्य, रोगी, स्त्रैण (जार) असा होतो. अन्न चोरणारा, गोमांस भक्षण करणारा, व्याज वट्टा करून निर्वाह करणारा, विनाकारण दुसऱ्यास विषप्रयोग करणारा, अग्नि त्याग करणारा, इत्यादिकास अजीर्ण रोग होतो. **परिहार**—गुरुपीडा परिहारार्थ, दानें, जप, हवन, वस्त्रदान, सुवर्णदान इत्यादि करावें. उपोषणें करावीं, अग्निरश्मी या मंत्राचा दहा सहस्र जप करावा. अग्निसूक्ताचा जप, श्री सूक्तजप, ब्राह्मणभोजन, अग्नीची मूर्ती सुवर्णाची करून तिचें दान करावें; गोप्रदानें इत्यादि करावीं. ह्मणजे रोगाची शांति होते.

**अजीर्णाचें कारण ( मा० नि० )**—फार पाणी पिणें, अकाली भोजन करणें, मलमूत्रादिकांचा वेगरोध करणें, झोंपेचा मोड होणें, किंवा ज्या मनुष्यास दिवसां निजण्याची संवय नाहीं त्यांनी दिवसां झोंप घेणें, ह्या कारणांनी जेवणाच्या वेळेवर जरी हितकारक थोडें आणि सोसेल असेंही अन्न भक्षण केलें तरी तें चांगलें पचन होत नाही. याशिवाय तृषा, भय, क्रोध यांनी व्याप्त झालेला, लोभ, शोक आणि दैन्य म्हणजे भिकारपणा यांनी पीडलेला आणि मत्सरयुक्त अशा पुरुषानीं

भक्षण केलेलें अन्न परिपक्क होत नाहीं. याशिवाय जो अविचारी, खाण्याचा लोभी व जे गुरासारखें फार खातात त्यांनाही अनेक रोगांना कारणीभूत असें अजीर्ण होतें.

**अजीर्णाचें सामान्यलक्षण**—ग्लानि, अंगाला जडपणा, मूर्छा, बडबड, वांति, तोंडाला पाणी सुटणें, भोंवळ, अपानवायूचा प्रतिबंध, मलमूत्रांचा रोध, किंवा अतिप्रवृत्ति, व पोट फुगणें हे उपद्रव होतात, किंवा मरणही येतें. या अजीर्णाचे चार भेद आहेत ते वर सांगितलेच आहेत. जठराग्नि कफाधिक्यानें मंद, पित्ताधिक्यानें तीक्ष्ण, वाताधिक्यानें विषम होतो. आणि तिघांच्या साम्येंकरून सम होतो. असा चार प्रकारचा जठराग्नि जाणावा.

**आमाजीर्ण (मा० नि०)**—अंगाला जडता, मळमळ, तोंडाला पाणी सुटणें, कोरड्या ओकाऱ्या किंवा जें अन्न खाल्लें तें कच्चेंच वांतीवाटें पडणें, गाल, व डोळे याना सूज, आणि जसें अन्न खावें तसे ढेकर, हीं लक्षणें होतात. हें अजीर्ण कफापासून होतें. **उपाय**–(१) वेखंड व सैंधव यांचें चूर्ण उष्ण पाण्याशीं द्यावें त्यानें वांति होईल. नंतर धणे व सुंठ यांचा काढा द्यावा; ह्मणजे आमाजीर्णाचा नाश होऊन बस्तीचें शोधन होईल. ( २ ) लवगा व बाळहिरडे यांचा काढा सैंधव घालून रेचनार्थ द्यावा. ( ३ ) गुळाबरोबर सुंठ, किवा पिपळी अथवा बाळहिरडे किंवा डाळिंब भक्षण करावें; ह्मणजे आमाजीर्ण, मूळव्याध, व मलावष्टंभ यांचा नाश होतो.

**विदग्धाजीर्ण ( मा० नि० )**—भ्रम, तहान, मूर्छा, पित्तापासून दाह, तुंबडी लागल्यासारखी वेदना, असे अनेक विकार, धुरकट व आंबट असे ढेकर, व घाम येणें हीं लक्षणें होतात. हें पित्तापासून होतें. **उपाय**—( १ ) थंडगार पाणी प्यावें. ( २ ) प्रातःकाळीं भोजनाचेपूर्वी निद्रा केली असता पाषाण जरी भक्षण केले तरी जिरतात.

**विष्टब्धाजीर्ण ( वा० भ० )**—शूळ, पोट फुगणें, काम करण्याविषयीं अशक्तता उत्पन्न होतात व अनेक वातसंबंधी, पीडा, मल व वायु याचे गतीचा रोध, अंग ताठल्यासारखें होणें, मोह, आणि आमवातासारख्या कळा, हीं लक्षणें होतात. हें अजीर्ण वायुपासून होतें. **उपाय**—(१) घाम काढून वर मिठाचें पाणी पिण्यास द्यावें, आणि पोट शेकावें.

**विषाजीर्ण (मा० नि०)**—अन्नद्वेष, हृदयाला अस्वस्थता, उरांत दुखतें व अंगाला जडता, हीं लक्षणें होतात. हें अजीर्ण अन्नरसापासून होतें. **उपाय**—( १ ) दिवसां झोंप घेऊन लंघन करावें आणि वाऱ्यावर बसूं नये. ( २ ) हिंग, सुंठ, मिरी, पिपळी, व सैधव, हीं औषधें पाण्यांत उगाळून ऊन करून पोटावर लेप द्यावा.

**सर्व प्रकारचे अजीर्णावर उपाय**—( १ ) वावडिंग, बिबवा, चित्रक,

हिरडे, व सुंठ यांचें चूर्ण तूप व गूळ यांत द्यावें; ह्मणजे मंदाग्नीचा नाश होऊन वडवाग्नीसारखा अग्नि होतो. ( २ ) हरीतकी व पिंपळी यांशीं युक्त संचळखाराचें चूर्ण अथवा दह्यावरोबर संचळखार अथवा ऊन पाण्याबरोबर जशी दोषांची गति असेल त्याप्रमाणें यांतून एक द्यावे; ह्मणजे चार प्रकारचें अजीर्ण, मंदाग्नि, अरुचि, आध्मानवायु, गुल्म, व शूळ, यांचा लवकर नाश होतो. ( ३ ) अग्निमुखरस द्यावा. ( ४ ) अग्निमुखचूर्ण द्यावें. ( ५ ) भास्करलवणचूर्ण द्यावें. ( ६ ) बृहच्छंखवटी द्यावी. ( ७ ) रामबाण रस द्यावा. ( ८ ) पारा ४ तोळे, गंधक ४, हिरडेदळ ८, सुंठ १२, पिंपळी १२, मिरीं १२, सैंधव १२ व भांग १६ तोळे, या सर्वत्रांचें चूर्ण करून निंबूरसाचीं उन्हामध्यें सात पुटें द्यावीं. हा अजीर्णारी रसदीपन व पाचन आहे, हा भक्षण करून दुप्पट जेवलें तरी त्याला पचन करून रेचनही करितो. ( ९ ) बाळहरीतकी, सैंधव, पिंपळी व सुंठ यांचें चूर्ण करून पाण्यांत कालवून कल्क करून प्यावा. तेणेंकरून वात, पित्त व कफ यांचा प्रकोप दूर होतो. आणि अजीर्ण मोडून अन्नाचें पचन होतें. व अग्नि प्रदीप्त होतो. ( १० ) सैंधव १, पिपळमूळ २, पिंपळी ३, चवक ४, चित्रक ५, सुंठ ६, बाळहिरडे ७, येणेंप्रमाणें भाग घेऊन चूर्ण करावें. हें घेतलें असतां अजीर्णाचा नाश होऊन अग्नि प्रदीप्त होतो. ( ११ ) शेरणी, हिरडेदळ, आंवळकठी, त्रायमाण, पिंपळी, चवक, निशोत्तर, निवेडुंग[१], कुटकी, वेखंड, सैंधव व संचळ या औषधाचें चूर्ण करून उष्णोदकांत किंवा गोमूत्रांत किंवा दाळिंबाचे रसांत किंवा त्रिफळ्याचे काढ्यांत अथवा जंगलांतील हरणादिकांचे मांसरसांत द्यावें, परंतु ज्या रोगास जें अनुपान उपयोगीं पडेल तसें द्यावें, तेणेंकरून अजीर्ण, कवळू, गुल्म, सूज, मूळव्याध, हलीमकरोग, कावीळ, पांडुरोग, कुष्ठ, पोटफुगी, उदररोग, हे सर्व दूर होतात. ( १२ ) वाताधिक्यानें किंवा पाण्यापासून अजीर्ण झालें असतां ओंवा शक्तीप्रमाणें सहा मासे घेऊन ऊन पाण्याबरोबर थोडा चावून गिळावा. ( १३ ) मोहऱ्या सुमारें पाव तोळापर्यंत घेऊन त्यास थोडा चुना लावावा आणि पाण्याचे घोटावरोबर गिळाव्या. या योगानें नळाश्रित वात, अजीर्ण व पाण्याचा विकार हे शमन होतात. ( १४ ) लसूण, सुंठ, मिरी, पिंपळी व पादेलोण, हीं समभाग बारीक वांटून गुळात कालवून वालाएवढ्या गोळ्या कराव्या आणि नित्य एक तोळा तुपात एक गोळी कालवून भोजनापूर्वी सेवन करावी, असें केल्यानें अजीर्णबाधा होत नाहीं. तथापि मिताहार तर ठेविलाच पाहिजे. ( १५ ) सागरगोट्याचा गीर, इंद्रजव, हिंग भाजका, ही तिन्ही औषधें एकत्र करून चूर्ण करावें. त्यांत तितकेंच सैंधवाचें चूर्ण मिश्र करून निंबाचे रसांत भिजवून गोळा करावा, आणि गोळ्या एरंडाचे ओल्या पानास एरंडेल तेल लावून त्या पानांत तो गोळा बांधून मातकापड करावें आणि फुपाट्यांत वाफ देऊन काढून नंतर ओलसर आहे तोंच बोराएवढ्या

१ काडे निवडुंगाचें सुकलेल्या लाकडाचें चूर्ण किंवा त्याचा चिक थोड्या प्रमाणानें सर्व चूर्णास लाऊन तें चूर्ण सावलींत वाळवून ठेवावे नंतर उपयोगात आणावे लाकूड आळून राख घ्यावी.

गोळ्या करून ठेवाव्या. प्रातःकाळीं किंवा रात्रौ किंवा निजतेवेळीं एक गोळी ऊनपाण्याशीं भक्षण केली असतां कृमि, अजीर्ण, नळविकार, हे शमन होऊन अन्नपचन होऊन मलशुद्धि चांगली होते आणि क्षुधा लागते. (१६) पिकलेल्या अननसाचे बारीक तुकडे करावे आणि त्यावर मिरें व सैंधव यांची पूड घालून खाल्लें असतां सर्व प्रकारचे अजीर्णाचा नाश होतो. ( १७ ) ओंवा ८८॥. अच्छेर, सुंठ २ तोळे, मिरीं २, पिंपळीं २, खाँतें मीठ २, बांगडखार २, सैंधव २, बिडलोण २, संचळ २, जवखार २, टांकणखार २, सज्जीखार २, येणें प्रमाणें तोळे घेऊन सर्वांचें चूर्ण करून एक कोहळ्याचें फळ घेऊन त्याची देठापसली एक चकती काढून आंत हे चूर्ण कोंडून चांगलें भरावें नंतर काढलेली चकती पुन्हा जागचे जागी बसवावी. नंतर तो कोहळा एके कोरे मडक्यांत बसवावा. नंतर वर मडकें झांकण ठेवावें. या प्रमाणें दोन महिने तें मडकें तसेंच राहूं द्यावें. नंतर तो कोहाळा बाहेर काढावा म्हणजे अगदीं सडल्या सारखा होतो तो सावलींत वस्त्रावर घालून सुकवावा. नंतर कुटून त्याचें चूर्ण करून ठेवावें आणि दररोज सांजसकाळ सहासहा मासे उनपाण्यांत सेवन करीत जावें. म्हणजे अजीर्णापासून होणारी ओकारी, अग्निमांद्य, अजीर्ण, पोट फुगणें, कर्पट व अतिशय दुर्गंधयुक्त ढेंकर येणें, पोटशूळ, वांति बरोबर अपक्क अन्न पडणें, उदर संबंधी वात वगैरे अजीर्णांपासून उत्पन्न होणाऱ्या सर्व रोगांचातात्काळ नाश होतो. हें औषध एका मागून साधूपासून मोठ्या प्रयत्नानें मिळविलें आहे हें तयार करण्यास थोडें अवघड वाटतें, परंतु रामबाणाप्रमाणें गुण करितें. ( १८ ) निरगुडीचे पाल्याचा रस आदमासें ६ मासे काढून त्यांत थोडें मीठ खलून दिलें असतां तत्क्षणीं अजीर्णाचा नाश होईल ( १९ ) चित्रकाचे मूळाचें चूर्ण ९ मासे गुळाबरोबर घ्यावें म्हणजे अजीर्ण दूर होऊन अग्नि प्रखर होतो (२०) पारा १, गंधक १, टांखणखार १, बचनाग १, व मिरीं ८ भाग यांचा लिंबूरसांत एक दिवस चांगला खल करून गोळ्या मुगाएवढ्या कराव्या. एक एक गोळी आल्याचे रसात देत जावी. म्हणजे शूळ, अरुचि विषूचिका ( महामारी ), अग्निमांद्य, कफ वायु व अजीर्ण यांचा नाश होतो व तोंडास चांगली रुचि येते. (२१) शंखवटी द्यावी म्हणजे अजीर्ण दूर होतें. हें औषध वैद्यांनीं तयार करावें. रसायन वेत्त्यांनीच रसायनें करावी नाहींतर चूक होईल. ( २२ ) सुंठ, मिरीं, पिंपळी, ओंवा, सैंधव, जिरें, शहाजिरें, व भाजका हिंग हीं सर्व औषधें समभाग घेऊन चूर्ण करावें. याला हिंग्वष्टक चूर्ण असे म्हणतात. या चूर्णाला तुपाचा हात लावून भोजनसमयीं भाताचे पहिल्या पाच चार घासांबरोबर खावें. नंतर भोजन करावें; म्ह० अग्निमांद्याचा नाश होऊन चांगला अग्नि प्रदीप्त होतो व तोंडास रुचि येऊन अरुचि दूर होते, अन्नाचें पचन होतें व सर्व प्रकारची अजीर्णें दूर होतात.

**जठराग्नीचे प्रकार** ( सुश्रुत )---जठराग्नीचे विकार चार प्रकारचे आहेत. वातदोषेंकरून विषमाग्नि, पित्तदोषेंकरून तीक्ष्णाग्नि, कफदोषेंकरून मंदाग्नि व वातपित्त या दोन दोषांपासून भस्माग्नि जाणावा.

**विषमाग्नीचें लक्षण**( सुश्रुत )—कधीं अन्नाचें पचन होतें व कधीं होत नाहीं तो.

**तीक्ष्णग्नीचें लक्षण** ( सुश्रुत )—भोजनावर लागलींच दुसरें भोजन केलें तरी सुखेंकरून पाक होतो तो तीक्ष्णाग्नि जाणावा.

**मंदाग्नीचें लक्षण** (सुश्रुत)—थोडें भोजन केलें असतांही पाक होत नाहीं तो.

**भस्मकाग्नीचें लक्षण** (सुश्रुत)—भूक फार लागते, ह्मणून वारंवार अन्न भक्षण करितो. व तें पचन होतें परंतु अंगाला लागत नाहीं, आणि शरीर कृश होतें. तो भस्मकाग्नि जाणावा. त्यालाच भस्मकरोग असें ह्मणतात.

**भस्मक रोगाचे कारण** (सुश्रुत)—गांजा, हिंग, गंधक, ताम्रभस्माचें अतिसवन व काकमांस, मांजराचें मांस इत्यादि तीक्ष्ण पदार्थांचे भक्षणानें पित्त अति कुपित होऊन तीक्ष्णाग्नि उत्पन्न होतो. आणि कितीही भक्षण केलें असतां त्याचें पचन न होता भस्म होऊन नेहमीं अग्नि प्रदीप्त असतो तोच भस्मक रोग जाणावा. तो वात, पित्त, कफ, हे क्रमेंकरून वृद्धि, अतिवृद्ध आणि क्षीण झालेअसतां उत्पन्न होतो.

**भस्मक रोगाचें असाध्यलक्षण** ( सुश्रुत )—तृषा, दाह, दुर्बळपणा, मूर्छा, भोजन केलें असतां शमतो व तें अन्न जीरलें असतां क्षुधित होतो. ही लक्षणें झाली असतां मृत्यु येतो असें जाणावें.

**भस्मकनिदान** [ चरक ]—ज्या मनुष्याचा कफ क्षीण झाला तो, पित्ताला साह्य होऊन स्वस्थानींच अग्नीला अति उग्र वाढवितो, तो अग्निवायूच्या साह्यानें देहाला रुक्ष करितो. आणि आपल्या क्षीणपणानें वारंवार भक्षित अन्नाला पचवितो. अन्नपानानंतर रक्तादिक धातूला पचन करवितो तेणेंकरून दुर्बळपणा, रोगमृत्यु यांना करितो. हा रोगी अन्न खाल्लें ह्मणजे स्वस्थ होतो व अन्न जिरलें ह्मणजे पुन्हां व्याकुळ होतो. आणि अति अग्नि वाढला असतां तृषा, खोकला व मोह हे व्याधी होतात भक्षिलेलें अन्न शीघ्र पचन करून जलदीनें रसादि धातूंचा नाश करितो. व भक्षण केलेल्या पदार्थांचे क्षणांत भस्म होतें ह्मणून याला भस्मकरोग असें ह्मणतात.

**भस्मकावर उपाय**[ १ ]—जड व स्निग्ध अशीं अन्नें, जड पदार्थ, थंड पदार्थ, आणि पित्तशामक उपचार करावेत. या रोगाला अजीर्ण झालें तरी वारंवार भोजन द्यावें. नाहींतर अग्नीला भोजन न मिळाल्यामुळें रोग्याचा नाश करितो. ( २ ) एकेचाळीस दिवस प्रातःकाळीं पिकलेलीं केळी खाववतील तितकीं तुपाशीं खावीं, ह्मणजे तीं संपूर्ण अग्नीची तीव्रता व भस्मक रोग यांचा नाश करितात, व अग्निमांद्य करितात यांत संशय नाहीं. ( ३ ) आघाड्याचें बीज सडून त्याची दुधांत क्षीर करून द्यावी. ( ४ ) पांढरे तांदूळ, पांढरें कमळ, आणि शेळीचें दूध यांची ह्मशीचे दुधांत क्षीर करून तूप घालून बारा दिवसपर्यंत नुस्ती द्यावी. ( ५ )

बोराचे बीजामधला मगज पाण्यांत वांटून प्राशन करावा. ( ६ ) ह्मशीचें दूध, तूप, केळें यांचें सेवन ठेवून दिवसां यथेच्छ निद्रा करावी. ( ७ ) बोरीची अंतरसाल पाण्यांत वांटून पिण्यास द्यावी. ( ८ ) वारंवार दुधाची क्षीर करून ती भक्षण करावी व तिजवरच राहावें ह्मणजे अग्नि मंद होतो. ( ९ ) उंबराची साल स्त्रीचें दुधांत वांटून द्यावी. ( १० जड, स्निग्ध, शीतल असें अन्न भक्षण करावें; पित्तनाशक रेच द्यावें. ( ११ ) ह्मशीचें दूध व तूप आणि दहीं भक्षावें. ( १२ ] दूधभात खावा. ( १३ ) दुधांत एरंडेल द्यावें किंवा तूपांत द्यावें. ( १४ ) केळीच्या काल्यांचें पाणी प्यावें. ( १५ ) उंबराचें मूळ दुखवून त्यांतून जें पाणी पडेल तें पित जावें दुसरें पाणी देऊं नये. याप्रमाणें सात दिवस घेतलें असतां भस्मक रोगाचा नाश होतो.

**भस्मकरोगावर पथ्य**—गव्हाची पोळी घृतमिश्रित, शाळू, जोंधळ्याची भाकरी किंवा कण्या, केळाची शिखरण, खाज्या, करंज्या, घृतयुक्त खिचडी, सर्व करारच्या खिरी, चिरोटे, तांदूळाचे पिठाचे पदार्थ, चण्याच्या पाटवड्या, खापरपोळी, मोहोनभोग, मोड आलेलें धान्य, चुर्म्याचे लाड, उडदाचें वरण, शेवया, ऊंस, अंजीर, पिकलेलें कवठ, करडईची भाजी, टरकाकडी, काकवी, कांदा, केळें, खजूर, गवारीच्या शेंगा, नवा गूळ, घोसाळी, कलिंगड, ह्मशीचें दूध, ताक, दही, तूप, द्राक्षें, दुध्या भोपळा, थंड पाणी, सर्व प्रकारचे जड पदार्थ, पक्के उंबर इत्यादी सेवन करावें.

**भस्मकरोगावर अपथ्य**—जितके ह्मणून लघु ह्मणजे हलके पदार्थ, दीपन पाचन पदार्थ, भस्मकाला देऊं नये, तर अग्निमंद करणारे पदार्थांची योजना करावी.

**अजीर्णावर पथ्य**—मंदाग्नि, अजीर्ण, विषूचिका ( महामारी ), आणि भस्मकरोग, हे व्याधि जर कफाधिक्य आहेत तर पूर्वी वमन द्यावें.—पित्ताधिक्य असले तर मृदूरेच द्यावे आणि वाताधिक्य असले तर त्या रोग्याचा घाम काढावा. नंतर औषधोपाय करावें. नाना प्रकारचा व्यायाम, जुन्या तांबड्या जाड साळीचा वेळलेला भात, किंवा तांदूळ भाजून केलेला भात, हरण, ससा, व बारीक जातीचे मांसे, यांचें मांसरस, शेवग्याच्या शेंगा, चाकवत, कोंवळा मुळा, पडवळ, कोंवळीं वांगीं कारली, करटोली, चुका, मेथी, यांच्या भाज्या, मीठ, तिखट, तेल, हिंग, तूप, ताक, दही, लोणी, मद्य, उष्ण पाणी, दीपन, व लघु असे पदार्थ, तळलेला लसून, पुदिना, आंवळे, डाळिंब, निंबू, मुगाचें वरण, काकडी, महाळुंग, धणे, जिरें इ० सेवन करावें.

**अजीर्णावर अपथ्य**—तीक्ष्ण रेच, मळमूत्राच्या वेगाचें धारण, जागरण, रक्तस्राव, मलावष्टंभ करणारे पदार्थ, सर्व प्रकारच्या खिरी व दाळी, खर्वस चारोळ्या, वाईट पाणी, विरुद्धान्न आणि सर्व जडपदार्थ, खजूर, तांबूल, पन्हें, स्नेहपदार्थ, मिष्टान्न, जांभूळ व आळू इ० पदार्थ अजीर्णावर सेवन करूं नयेत.

सूचना—महामारी हा एक अजीर्णाचा एक भेद आहे. परंतु हल्लीं प्रचारांत तो अगदीं निराळा मानतात. याकरतां त्या रोगांवर साग्र निदान व चिकित्सा घेऊन पटकी या नांवाचें निराळेंच पुस्तक छापून आह्मीं प्रसिद्ध केलें आहे तें पहावें.

---

## अतिसार ( हगवण ).

॥ एकैकशः सर्वशश्चदोषैरामेनशोकतः ॥ दोषावस्थानैकरूपाभवंत्यर्तिप्रतिक्षणं ॥

वातातिसार, पित्तातिसार, कफातिसार, सन्निपातातिसार, आमातिसार, आणि शोकातिसार याप्रमाणें अतिसाराचे सहा भेद आहेत. या अतिसारामध्यें प्रति क्षणीं निरनिराळ्या दोपांचा संबंध होतो तो सूक्ष्म रीतीनें जाणावा. द्वंद्वज अतिसारव्याधी स्वभावानें होत नाहीत. सुश्रुतानें आमातिसार न सांगतां भय व शोक हे दोन सांगून सहा संख्येची बेरीज पुरी केली. त्यानें आमातिसाराचा अंतर्भाव सन्निपातातिसारांत केला आहे आणि येथें भयातिसार वातजामध्यें गणला असें जाणावें. याशिवाय आणखीही अतिसाराचे सूक्ष्म भेद आहेत ते पुढें सांगितले आहेत.

**कर्मविपाक**—जन्मकाळीं शनिग्रही बुध असून रवीची दृष्टि बुधावर असल्यास सर्व जनांस प्रिय, बहुभक्षक, अतिसाररोगयुक्त, निष्ठुर कर्में करणारा, व प्रिय भाषण करणारा असा पुरुप उत्पन्न होतो. अथवा शनीच्या अंतरगत राहु असेल तर शस्त्रपीडा, ज्वर, अतिसार, शत्रुसमागम, अर्थनाश, अथवा षष्ठमस्थानीं चंद्र किंवा शुक्र यांतून कोणी असेल तर किंवा मंगळ अष्टमस्थानीं असेल तर अतिसार हा रोग होतो. **परिहार**—बुध मंत्राचा जप, तीळ, आणि अपामार्ग समिधांनीं हवन, सुवर्णदान, सुवर्णधारण, इत्यादिक करावें; राहुपीडापरिहार होण्यास राहूमंत्राचा जप, काळे तीळ, दूर्वा, समिधांनीं हवन, राजावर्तमणी इत्यादि धारण करावें. पूर्व जन्मामध्यें ग्रहाग्नीचा किंवा अग्निप्रियांचा त्याग केला असतां अथवा वापी, कूप, तलाव, यांचा नाश केला असता जन्मांतरीं अतिसार रोग होतो. **परिहार**—अग्निरश्मी या मंत्राचा दहासहस्र जप अथवा पूर्वोक्त मंत्रानें तिलघृतांचें दहासहस्र हवन, सुवर्णदान, किंवा अग्नि प्रतिमा करून तिचें पूजन करून ब्राह्मणांस दानें द्यावीं; तेणेंकरून अतिसार रोग दूर होतो, या प्रकारें दैविक प्रतिकार जाणावा.

**अतिसाराचें कारण** ( मा. नि. )—प्रमाणापेक्षां अधिक खाणें, किंवा स्वभावतः जड पदार्थ (उडीद इत्यादि) भक्षणानें अतिस्निग्ध, अतितीक्ष्ण, अतिउष्ण, अत्यंत पातळ, आणि अत्यंत स्थूळ (ज्याचे अवयव कठीण) उदाहरण—लाडू घीवर

---

१—विहीर. २ आड.

इत्यादि. अत्यंत ... (स्पर्शानें किंवा वीर्यानें) विरूद्ध(जसें क्षीरमत्स्य इत्यादिक)अध्यशन (पूर्व दिवसाचा आहार जीर्ण झाल्यावांचून जेवणें) अपक्वान्न, रोजची जेवणाची वेळ सोडून अन्य वेळीं थोडें किंवा फार खाणें अशा भोजनानें स्नेह, स्वेदादि पंचकर्मांचा अतियोग केल्यानें किंवा हीनयोग केल्यानें स्थावरादिदूषीविष भक्षणानें, भयानें, शोक केल्यानें, नासके पाणी, तसेंच मद्य यांच्या प्राशनानें अथवा निर्दुष्ट पाणी आणि मद्य याचें अत्यंत प्राशन केल्यानें, सात्म्य ऋतु वदलल्यानें, जलांत क्रीडा करण्यानें, मळमूत्रादिकांचे वेगधारणानें, कृमींच्या उपद्रवानें, ( कृमीमुळें पक्वाशय आणि आमाशय दुष्ट होतात ) किंवा कृमिजन्य वायूच्या कोपानें मनुष्यास अतिसार ( ढाळ, हगवण ) रोग होतो.

**अतिसाराची संप्राप्ति**—रस, जल, मूत्र, स्वेद, कफ, पित्त, व रक्त हे अब्धातु क्षुधित होऊन अग्नीला मंद करून मलमिश्रित होतात. आणि वायूनें अधोभागीं नेलें ह्मणजे गुदावाटें पडतात.

**अतिसाराचें पूर्वरूप ( मा० नि० )**—हृदय, नाभी, गुद, पोट, कुशी, इतक्या ठिकाणी सुया टोचल्यासारखी पीडा, हात, व पाय गळणें, अपानवायूचा रोध, पोट फुगणें, अन्नाचा पाक बरोबर न होणें, हीं अतिसार व्हावयाचा असला ह्मणजे पूर्व चिन्हें होतात.

**शास्त्रार्थ**—अतिसारी रोग्याला पूर्वी लंघन हितकारक आहे. तें पाचन करितें. नंतर तहान इत्यादिक उपद्रव असतां मुगाचा यूष, ताक, धणे, जिरें व सैंधव ही एकजागी करून द्यावीं. त्याला षंडगयूष ह्मणतात. हा अग्निदीपक, सग्रहणीनाशक व अरुचि, ज्वर, आणि भसऱ्याची हगवण यावर श्रेष्ठ आहे. क्षीण, वाळ, वृद्ध व गर्भिणी यांना झालेल्या अतिसारावांचून अपक्व व वाढलेल्या अतिसारावर स्तंभन देऊं नये ह्मणजे वंद करण्याचा उपाय करूं नये अतिसार हा वहुत करून पित्तावांचून होत नाहीं, याकरिता पित्ताधिक्य व ज्वरातिसार यांजवर लंघन करू नये. त्याला पाचनकषाय भोजनावरोबर द्यावा. अतिसार, ज्वर, रक्तपित्त, व नेत्ररोग यांचेठायी प्रथमतः वंद होण्याचे उपाय करूं नयेत. कारण यांचे व्याधीचा वेग, फार कठिण असतो. तो कमी झाला ह्मणजे उपचार करावा. आम पक्व करण्याची क्रिया सोडून दुसरी अतिसारावर क्रिया हितकारक होत नाहीं. यासाठीं सर्वातिसारांचेठायी आम पक्व आहे की नाहीं हें पहावें. ( १ ) धणे, वाळा, वेलफळ नागरमोथे व सुंठ यांचा काढा आमशूलनाशक, ग्राही, रेचक, दीपन आणि पाचन असा आहे. वाग्भटाचें मत. जेव्हां संचित झालेले वातादि दोष अर्धवट पक्व

१—वातादि अतिसाराच्या लक्षणानीं युक्त असा मळ ( विष्ठा ) पाण्यात टाकिला असता आम जड आहे ह्मणून बुडतो व तो फारच दुर्गंधयुक्त व बुळबुळीत असतो त्याला आम ही संज्ञा आहे त्याच्या विपरीत ज्याचीं लक्षणे असतात आणि शरीराला विशेषेकरून लाघव असते त्याचा मळ पक्व झाला ह्मणून समजावे.

झालेल्या आहाराशीं मिश्रित होऊन अतिसार उत्पन्न करितात तेव्हां अत्यंत उत्क्लेश झाल्यानें प्रवृत्त होऊन ते स्वताहाच बाहेर निघून जात असतात ह्मणून त्यांवर औषध न देणें हेंच औषध आहे. ह्मणजे त्याजवर मुळींच औषध दिलें नाहीं तरी चालेल. परंतु आमातिसारावर पूर्वी स्तंभक औषध देऊं नये. तसेंच आध्मान, जडपणा, शूल, व अंगास ओलसरपणाचा भास हे विकार असून शौचास कुंथत होत असेल तर रेच करणारे हिरडे त्याला प्राणदाते होतात ( हिरड्याचें चूर्ण द्यावे ) जेवणाची योग्य वेळ झाली ह्मणजे व रोगी भुकेनें अगदीं व्याकुळ झाला ह्मणजे त्यास लघु अन्न बेतानें खाण्यास द्यावें, असें केल्यानें त्यास लवकर अन्नावर रुचि होते, अग्नि प्रदीप्त होतो. व शक्ति येते. तसेंच ताक, कांजी, कण्हेरी, सातूचें तरवणी, सुरा, व द्राक्षासव यापैकीं जे पदार्थ रोग्यास हितावह होतील, ते द्यावे. नंतर दीपन, स्तंभक[1], व पाचक अशा औषधानें खाण्याचे पदार्थ तयार करून खाण्यास द्यावे.

**वातातिसार ( मा० नि० )**—तांबडा, फेंसयुक्त, रुक्ष, थोडथोडा, वारंवार, व अपक्क असा मळ पडतो. व ढाळ होते वेळीं शब्द होतो; आणि पोटांत मुरडा होऊन गुरगुर असा शब्द होतो.

**वातातिसार ( बा० भ० )**—पाणी व मलमिश्रित थोडें थोडें सशब्द, शूलयुक्त, अडखळत, रुक्ष, फेसाळ, पातळ किंवा घट्ट, करपलेल्या गुळासारखें आंवेसहित, वारंवार शौचास होतें. गुदात कातरल्यासारखी पीडा होते, तोंडास, कोरड, गुदभ्रंश, रोमांच उभे राहणें, व रोगी कुंथतो, हीं लक्षणें होतात.

**वातातिसारावर उपाय**—( १ ) इंद्रजव, नागरमोथे, धायटीचीं फुलें, कोंवळें बेलफळ, लोध, सुंठ, आणि मोचरस याचें चूर्ण गूळ व ताक याशीं द्यावें; ह्मणजे तें मोठ्याही अतिसाराचा तात्काळ नाश करील यांत संशय नाहीं. ( २ ) कुड्याचे सालीचा चतुर्थांश काढा करून त्यात नागरमोथे, वावडिंग, पादेलोण, सैंधव, धायटीचीं फुलें व पिंपळी यांचें चूर्ण समभाग घालून थोडें दूध आंत टाकावें. आणि अग्नीवर दाट होईतोंपर्यंत शिजवून थंड झाल्यावर त्यांत मध घालून द्यावें; ह्मणजे हा कुटज अवलेह अतिसार, मूळव्याध, संग्रहणी, भगंदर, श्वास, व मेह यांचा नाश करितो. ( ३ ) सुंठ, धायटीची फुलें, सावरीचा डिंक व ओंवा याचें चूर्ण ताकाशी द्यावें; ह्मणजे उग्र अशा अतिसाराचा नाश होतो. ( ४ ) नागरमोथे, सुंठ व इंद्रजव याचा काढा द्यावा.

**पित्तातिसार लक्षण ( मा० नि० )**—पिवळा, निळा किंवा थोडा तांबडा असा मळ होतो, आणि तहान, भोंवळ, सर्वांगाचा दाह, गुदाचे ठिकाणी पुरळ, हीं लक्षणें होतात.

---

१—कोंवळें बेलफळ, कचोरा धणे, हिंग, आमसूल, डाळिंबाची साल, पळस, शेरणी, जिरें, ओवा, बिडलोण, सैंधव, लघुपंचमुळें, सुंठ, पिंपळमूळ, पिंपळी, चवक, चित्रक, व वासनवेल इत्यादि.

**पित्तातिसार लक्षण ( वा० भ० )**—पिंवळें, काळें, पोपटी रंगाचें व हिरवें, रक्तमिश्रित, अतिशय दुर्गंधयुक्त असें शौच्यास होतें. व तहान, मूर्छा, घाम, दाह, शूल, गुदांत आग होणें व गुदपाक ही लक्षणें होतात.

**पित्तातिसारावर उपाय**—( १ ) कुड्याच्या मुळयाची साल, मायफळ, सुंठ, व तमालपत्र, यांचा काढा मध घालून द्यावा. ( २ ) कावळें बेलफळ, इंद्रजव, नागरमोथे, काळा वाळा, व अतिविष, यांचा काढा आमसहित पक्कातिसाराचा नाश करितो. ( ३ ) कायफळ, अतिविष, नागरमोथे, कुड्याची साल, व सुंठ यांचा काढा मध घालून द्यावा. ( ४ ) लोकनाथरस चार गुंजांपर्यंत द्यावा व मागाहून तांदुळाचें धुवण प्यावें ( ५ ) चिकणामूळ, धायटीची फुलें, बेलफळ, पादेलोण, बिडलोण, व दाळिंबाचे फळावरची साल, याचे चूर्ण तांदुळाचे धुवणाबरोबर मध घालून द्यावें; ह्मणजे पित्तातिसार व शूल, यांचा त्वरित नाश होतो.

**कफातिसारलक्षण ( मा० नि० )**—पांढरा, घट्ट, कफमिश्रित, आमगंधी, आणि थंड असा मळ पडतो. व त्या मनुष्याचे अंगावर रोमांच उभे राहतात.

**कफातिसारलक्षण ( वा० भ० )**—घट्ट, चिकट, तंतुयुक्त, पांढरें, स्निग्ध, अपक्क, कफयुक्त, जड, घाणेरें, अडखळत, वारंवार मुरडा होऊन, थोडें थोडें कुथून शौच्यास होतें. व तो मनुष्य झोंपाळू व आळशी असा होतो, अन्नद्वेष, रोमांच उभे राहणें, मळमळ, बस्ति, गुद व पोट हीं जड व शौच्यास झालें असताही न झालेंसें वाटणें हीं लक्षणें होतात.

**कफातिसारावर उपाय**—( १ ) प्रथम लंघन व पाचन हितकारक होतें. ह्मणून धणे व सुंठ यांचा काढा पाचनार्थ द्यावा. ( २ ) चवक, अतिविष, कोष्ठ, कोंवळें बेलफळ, सुंठ, कुड्याची साल, इंद्रजव, बाळहिरडे, यांचा काढा वातो व कफातिसार यांचा नाश करितो. ( ३ ) हिंग, पादेलोण, त्रिकटु, हिरडेदळ, अतिविष व वेखंड यांचें चूर्ण ऊन पाण्याबरोबर द्यावें.

**त्रिदोषातिसारलक्षण ( मा० नि० )**—डुकराच्या चरबीसारखा अथवा मांस धुतलेल्या पाण्यासारखा आणि वातादि दोषांची जीं लक्षणें सांगितली त्या सर्व लक्षणांनी युक्त असा हा त्रिदोषोद्भव अतिसार कष्टसाध्य जाणावा.

**त्रिदोषातिसारावर उपाय**—( १ ) कुड्याच्या ताज्या मुळ्या आणून स्वच्छ धुवाव्या आणि त्याजवरील फक्त साल काढून घ्यावी ती साल बारीक कुटून दोन दिवसपर्यंत पाण्यांत भिजत ठेवावी आणि तिसरे दिवशीं त्यांतच आणखी पाणी घालून दोन प्रहरपर्यंत अग्नीवर काढ्याप्रमाणें शिजवून सालीच्या चूर्णाचें अंगाबरोबर पाणी राहिले ह्मणजे अग्नीवरून उतरून काही वेळ तें पात्र निवत ठेवावें. नतर हातांनं आंतील साल चोळून चुरून चुरा पिळून टाकून अर्काप्रमाणें राहिलेलें पाणी गाळून घ्यावें, नतर त्यात एकशेर पाण्यास एक मासा आफू याप्र-

माणें कालवून तें पाणी पुन्हां अग्नीवर ठेवून दाट होईतोंपर्यंत आटवावें. नंतर तो रांधा एका तूप लाविलेल्या परातींत काढून घ्यावा आणि लवंग, जायफळ, मायफळ, वावडिंग, हिंग, सुंठ, अजमोदा, अतिविष, जायपत्री, केशर, नाकेशर, वाळा, अक्कलकाला, मुरडशेंग, डिकेमाली, वेखंड, पळसपापडी, डाळिंबाचे फळावरील साल, हीं औषधें त्या रांध्याच्या मानानें नेमस्त घेऊन कुटून बारीक वस्त्रगाळ पूड करून ती त्या रांध्यात घालून गोळा तयार करावा आणि हातास तूप लावून वालप्रमाण गोळ्या कराव्या, आणि ती गोळी अतिसार, संग्रहणी, पांडुरोग यांजवर द्यावी, लहान मुलास भसऱ्याची हगवण, कडकी, कृशत्व यांजवरही योजावी. पांडुरोगावर फक्त शेळीचे मूत्रांत अथवा गोमूत्रांत गोळी उगाळून द्यावी. अतिसारास ताकाचे निवळींत किंवा गोड दह्यांत अथवा सुंठीचे काढ्यांत किंवा तुपांत या अनुपानाशी द्यावी. ( २ ) कुड्याचे सालीचा काढा करून गाळून त्यांत अतिविषाचें चूर्ण अष्टमांश अथवा चतुर्थांश घालून पुन्हा अग्नीवर ठेवून घट्ट करून त्याचें चाटण द्यावें. ( ३ ) कुड्याची ओली साल आणून तात्काळ वांटून तांदुळाचे धुवण घालून गोळा करावा आणि जांभळीचे पानानें वेष्टन करून सुतानें बांधावा. त्याजवर दाट चिखलाचा लेप देऊन मंदाग्नीनें भाजून काढावा. नंतर निवाल्यावर वरील चिखल काढून आंतील औषध खलबत्त्यांत घालून कुटून त्याचा रस काढावा तो मध घालून द्यावा; ह्मणजे सर्व प्रकारचे अतिसाराचा नाश होतो. ( ४ ) चिकणामूळ, अतिविष, नागरमोथे, सुंठ, वाळा. धायटीची फुलें, कुड्याची साल, इंद्रजव व बेलफळ यांचा काढा सर्व अतिसाराचा नाशक आहे.

**भय व शोकातिसार** [मा. नि.]—ज्याचें धन व बंधु इत्यादिकांच्या नाशामुळें शोक करणारा आणि शोकामुळेंच ज्याचें अन्न तुटलें आहे. ( ह्यावरून त्याला धातुक्षय देखील होईल हें सांगितलें ) अशा प्राण्याचे नेत्रावाटें आश्रु गळतात आणि उष्मा ह्मणजे शोकजन्य देह, तेज तो बाष्पोष्मा कोठ्यांत शिरून अग्नीला मंद करून त्याच्या रक्ताला क्षोभवितो. मग तें रक्त गुदावाटें पडतें. त्याचा रंग तांबडे गुंजेसारखा असतो. तें मळमिश्रित, गंधरहित किंवा दुर्गंधयुक्त असें असतें. सर्वांच्या मतें हा अतिसार वातपित्तजनित आहे. शोकापासून झालेला अतिसार चिकित्सा करण्यास फार कठिण, कारण शोकशांति झाल्यावांचून केवळ औषधानें गुण येणें कठिण आहे ह्मणून वैद्यांनी हा कष्टसाध्य आहे ह्मणून सांगितला. वर सांगितलेल्या संप्राप्तीचा हा मात्र कष्टसाध्य व दुसऱ्या प्रकारच्या संप्राप्तीचा ह्मणजे शोकज अतिसार मात्र सुखसाध्य जाणावा.

**भय व शोकातिसार लक्षण** ( वाग्भट )—भीतीनें व शोकानें चित्त क्षुब्ध झालें असतां पित्तयुक्त वायु मळास पातळ करितो. नंतर लवकर लवकर उष्ण पातळ व पाण्यावर तरणारा असा मल होतो. व त्यांत वातातिसार व पित्तातिसार याच्या सारखी लक्षणें असतात.

**भय व शोकातिसारावर उपाय**—(१) सालवण, चिकणामूळ, बेलफळ, धणे, कोष्ठ, सुंठ, वावडिंग, अतिविष, नागरमोथे, दारुहळद, पाहाडमूळ व कुड्याची साल यांचा काढा मिऱ्यांचें चूर्ण घालून द्यावा. तो शोकातिसाराचा नाश करितो. ( २ ) वातातिसाराचे उपचारही यांजवर करावे.

**आंमातिसारलक्षण** [ मा. नि. ]—अन्न न जिरल्यामुळें वात, पित्त व कफ हे स्वमार्ग सोडून कोष्ठांत जातात. आणि त्याचा क्षोभ करून रक्तादि धातू आणि पुरीषादि मळ वारंवार गुदावाटें बाहेर सारतात. त्याचा रंग तऱ्हेतऱ्हेचा असतो व त्यांत मुरडा फार होतो. याला सहावा अतिसार ह्मणतात.

**आमातिसार लक्षण** (वाग्भट)—मळ दुर्गंध व जड असल्यामुळें पाण्यांत बुडतो, पोटांत गुडगुड शब्द, पोट दुखणें, फुगणें तोंडास लाळ सुटणें हीं लक्षणें होतात.

**आमातिसारावर उपाय**—( १ ) धणे व सुंठ याचा काढा दीपन व पाचन असा आहे. ( २ ) बडीशेप, सुंठ, धणे, वाळा, हिरडे, व आंवळकाठी हीं सर्व समभाग घेऊन चूर्ण करून तुपांत तळून पहिले दिवशी उन पाण्याबरोबर द्यावें. व दुसरे दिवशीं ताकाशी द्यावें. (३) चित्रकमूळ, पिपळमूळ, वेखंड, कुटकी, पाहाडमूळ, इंद्रजव, बाळहिरडे व सुंठ याचा काढा, आमातिसार, कफातिसार, पित्तातिसार व वातातिसार यांचा नाश करितो. ( ४ ) सुंठ, मिरीं, पिंपळी, अतिविष, हिंग, वेखंड, संचळ व बाळहिरडे यांचें चूर्ण उन पाण्याबरोबर द्यावें. ह्मणजे मोठ्याही आमातिसाराचा नाश होईल. ( ५ ) सुंठ, मिरीं व भाग यांचें समभाग चूर्ण थंड पाण्याशीं द्यावें; ह्मणजे शूळ व आमातिसार यांचा नाश होईल. याजवर दहींभात पथ्यास द्यावा. ( ६ ) भाग, साखर, साखरुंड, जिरें व दहीं हे पदार्थ एकत्र करून द्यावे ह्मणजे ते आमातिसार याचा फार जलद नाश करितात. ( ७) एक भाग दूध व तीन भाग पाणी यांत थोडे नागरमोथे टाकून पाणी आटेतोंपर्यंत कढवावें. व दूध शेष राहील तें प्यावें. ह्मणजे आमयुक्त शूळाचा नाश होतो. (८) सोनामुखी २ तोळे, बागडखार ३ मासे, लकडी रेवाचिनी ३ मासे, शेंदेलोण ३ मासे, पादेलोण ३ मासे व सज्जीखार ३ मासे, या सर्वांचें चूर्ण करून त्यातून चार मासे घेत जावें व वर उन पाण्याचा घोट घेत जावा. (९) बडीशेप ४ तोळे, कंकोळ एक तोळा, खडीसाखर ४ तोळे, खसखस ६ मासे, जायफळ ३ मासे, या सर्व औषधाचे चूर्ण करून त्यातून चार मासे तुपात द्यावें; ह्मणजे रक्तमिश्रित आमाशाचा नाश होईल.

**रक्तातिसार** (मा. नि.)—पित्तातिसार झाला असतां किंवा व्हावयाचा अ-

---

१—बाल, वृद्ध, गर्भिणी व कृश यास वायूपासून किंवा पित्तापासून झालेला आणि ज्यामध्यें धातु व बलही क्षीण आणि अनेक दोषानीं युक्त असा जरी आम आहे तथापि बंद करावा पाचन देऊं नये पाचन दिलें असता मरण येईल. यास प्रमाण—आमोपिस्तंभनीय

सतां जर पित्त करणारीं द्रव्यें पुष्कळ आणि निरंतर खाल्लीं तर मोठा भयंकर रक्तातिसार उत्पन्न होतो. त्याच्या तांबडचा, काळया वगैरे रंगांनीं वातादिक दोष जाणावे, कोणीं असें ह्मटलें आहे कीं, रक्तजही अतिसार आहे तो सातवा ह्मटला तर षट्कत्व संख्येला बाध येईल ह्मणून हा पैत्तिकाचाच एक अवस्थाभेद जाणावा.

**रक्तातिसारावर उपाय**—( १ ) गाईचे दुधाचें दहीं केल्यावांचून लोणी काढून तें मध व खडीसाखर मिश्र करून द्यावें. (२) काळे तिळाचें चूर्ण एक भाग, पिठीसाखर दोन भाग व शेळीचें दूध चार भाग असें एकत्र करून द्यावें; ह्मणजे रक्त बंद होतें. ( ३ ) बाळहिरडे व जिरें समभाग घेऊन थोडे भाजून त्याचें चूर्ण करून तांदुळाच्या धुवणाशी द्यावें. ( ४ ) डाळिंबाची साल व कुड्याची साल यांचा काढा मध घालून द्यावा. (५) कुड्याची साल, अतिविष, बेलफळ, वाळा व नागरमोथे, याचा काढा आमसंबंधी शूळ, रक्तातिसार व फार दिवसाचे दुसरे अतिसार या सर्वांचा नाश करितो. ( ६ ) तांदुळाचे धुवणात उत्तम सुवासिक चंदन उगाळून त्यांत निमा मध व पिठीसाखर घालून द्यावें ह्मणजे रक्तातिसार दाह व शोष याचा नाश होतो.

**रक्तातिसारावर पथ्य**—जुन्या मोठ्या तांदुळाचा भात, गाईचें शेळीचें तूप, दूध, दही व ताक, पिठीसाखर, जांभळें, थंड पाणी, ही पथ्यास सेवन करावी.

**ज्वरातिसार लक्षण** ( भा. प्र. )—हा अतिसार ज्वरापासून उत्पन्न होतो. वर ज्वर व अतिसार या दोघावर लंघन सांगितलें आहे तें लंघन ज्वरातिसारावर विशेषेंकरून करावें.

**ज्वरातिसारावर उपाय**—( १ ) सुंठ, गुळवेल, वाळा, रक्तचंदन, कुड्याची साल, नागरमोथे व किराईत यांचा काढा द्यावा ह्मणजे ओकारी, दाह, तृषा, सूज व ज्वरयुक्त अतिसार याचा नाश होतो. ( २ ) सुंठ. अतिविष, नागरमोथे, किराईत गुळवेल, कुड्याची साल व कडू निंब याचा नाश काढा संपूर्ण ज्वर व सपूर्ण अतिसार यांचा नाश करितो. ( ३ ) इंद्रजव, देवदार, कुटकी, व गजपिंपळी याचा किंवा गोखरूं, पिंपळी, धणे, बेलफळ, पाहाडमूळ व ओंवा याचा काढा ज्वरातिसार आणि विशेषेंकरून दाह यांचा नाश करितो.

**ज्वरातिसारावर पथ्य**—लंघन, जुन्या साटक्या साळीचा भात किंवा कण्हेरी, तुरीचें किंवा मुगाचें वरण, तांदुळजा व चुका यांची भाजी, डाळिंब व तापवून निवालेलें पाणी हें पथ्यास द्यावें.

**पक्वातिसारलक्षण** ( सुश्रुत )—मागें सांगितलेल्या वातादिक अतिसाराच्या लक्षणानी युक्त असा मळ पाण्यांत टाकिला असता आम जड आहे ह्मणून बुडतो.

व तें फार दुर्गंधयुक्त व अत्यंत बुळबुळीत असतें त्याला आम ही संज्ञा आहे. ह्याच्या विपरीत ज्यांचीं लक्षणें असतात आणि शरीराला विशेषेंकरून लाघव असतें त्याचा अतिसार पक्व झाला ह्मणून समजावें.

**पक्वातिसारावर उपाय**—( १ ) कुड्याची साल व अतिविष यांचें चूर्ण मधाशीं घेतलें असता फार दिवसांचा पक्वातिसार व रक्तपित्त यांचा नाश होतो. [ २ ] पद्मकाष्ठ, मंजिष्ठ, जेष्टीमध, बेलफळ व उंबरांचें हिरवें फळ, ही सर्व एकत्र वांटून कल्क करून त्यांत तांदुळाचें धुवण घालून तो कल्क प्राशन करावा.

**प्रवाहिकालक्षण** [ मा. नि, ]—अपथ्य सेवन करणाऱ्या मनुष्याचा कुपित झालेला वायु सांचलेल्या कफाला मलमिश्रित करून वारंवार गुदद्वारानें पाडतो, कुंथलें असतां थोडा थोडा मल पडतो. या रोगास प्रवाहिका असें ह्मणतात. प्रवाहिका आणि अतिसार यांचे धर्म सारखेच आहेत ह्मणून अतिसारामध्यें प्रवाहिका सांगितली. परंतु अतिसारामध्यें नानाप्रकारचे द्रवधातु पडतात आणि प्रवाहिकेमध्यें केवळ कफ पडतो इतकाच कायतो भेद आहे.

**प्रवाहिकेवर उपाय ( भसरातिसार )**—( १ ) हिंग, सुंठ, वावडिंग, व संचळ याचें चूर्ण थंड पाण्याशी द्यावें. (२)कोंवळें बेलफळ व मिरी यांचा काढा गूळ व तिळाचें तेल घालून द्यावा.तो तीन दिवसांत फार दिवसाच्याही प्रवाहिकेचा नाश करितो. ( ३ ) तेल, तूप, दहीं, मध, अतिविष, सुंठ, आणि राब हीं एकत्र करून द्यावीं.

**सर्वातिसारावर उपाय**—( १ ) आंब्याची अंतरसाल, दह्याशीं वांटून घेतली असतां दाह व अतिसार याचा नाश होईल. ( २ ) अजमोदा, मोचरस, आलें व धायटीचीं फुलें याचें चूर्ण पाण्यावाचून गाईचे घुसळलेले दह्यांत कालवून प्यावें, तेणेंकरून गंगेच्या प्रवाहासारखा प्रवाह ज्या अतिसाराचा आहे तोही बंद होईल. ( ३ )कुटकी, अतिविष, पाहाडमूळ, वेखंड, व कोष्ठ यांचा काढा द्यावा (४) बेलाची व आंब्याची साल यांचा काढा मध व साखर घालून द्यावा ( ५ ) हिंगूळ, बचनाग मिरी, टांकणखार व पिपळी या सर्वांचें बारीक चूर्ण करून ठेवावें. इंद्रजव व कुड्याची साल या दोहोंचें चूर्ण एक तोळा घेऊन त्यांत हें औषध दोन गुंजा मिळवून एकंदर मधात कालवून चाटण करून द्यावें; म्हणजे त्रिदोषातिसाराचा नाश होतो. पथ्य—गाईचे दह्याशी भात अथवा तूपभात अथवा ताकभात द्यावा व थंड पाणी प्यावें. रात्री थोडी भांग भाजून गुळांत गोळी करून खाण्यास द्यावी. (६)लघुगंगाधर अथवा वृद्ध गंगाधर चूर्ण द्यावें ( ७ ) सुंठ व जायफळ ही समभाग व दुप्पट अफू आणि या सर्वासमान हिरव्या दाळिंबाचे दाणे ही सर्व एक जागीं करून कच्चे दाळिंबात भरून मातकापड करून पुटपाकविधीनें पाक करून, नंतर त्या सर्वांचा खल करून बोराच्या आठोळीएवढ्या गोळ्या बांधाव्या व एक गोळी ताकाबरोबर द्यावी. (८) थोर बाभळीचे पानांचा अंगरस किंवा कुड्याचे सालीचा अंगरस घेतला असतां

सर्व अतिसारांचा नाश होतो. ( ९ ) खापरांत मंदाग्नीवर अफू भाजावी व थोडी खाण्यास द्यावी; या सारखें पक्कातिसार शमविणारें दुसरें औषध नाहीं. ( १० ) मौक्तिकभस्म दोन गुंजाप्रमाण कापराचा वास लावून जायफळाचें चूर्णबरोबर द्यावें ( ११ ) जायफळ, आफु, टांकणखार, गंधक व जिरें ही समभाग, आणि यां सर्वांसमान कोंवळ्या डाळिंबाच्या बिया ही सर्व एकत्र खलून कोंवळ्या डाळिंबांत घालून वर कणकीचा लेप देऊन निखाऱ्यांत भाजावें. नंतर वरील लेप काढून आतील औषध खलून वालप्रमाण गोळ्या कराव्या व बलाबल पाहून द्याव्या म्हणजे अतिसाराचें स्तंभन होऊन दीपन व पाचन व होतें. ( १२ ) कोंवळें बेलफळ, सुंठ, नागरमोथे, धणे व वाळा यांचा काढा मोचरसाचें चूर्ण घालून द्यावा; म्हणजे आमसहित सर्व अतिसारांचा नाश होतो यांत संशय नाही (१४) राळेचें चूर्ण सहा मासेपर्यंत दह्यांत द्यावें; म्हणजे तात्काळ अतिसाराचा नाश होतो. [ १५ ] इंद्रजव, नागरमोथे धायटीचीं फुलें, कोंवळें बेलफळ, लोध, सुंठ, व मोचरस ही सर्व समभाग घेऊन चूर्ण करून ताक व गुग्गुळ यांत द्यावें. (१६) काप्या आंब्याची ओली साल व काप्या फणसाची ओली साल आणून पाणी घालून कल्हईच्या किंवा कांचेच्या पात्रांत पांच तोळे पर्यंत रसकाढावा. व तें पात्र रोग्याच्या तोंडाशीं धरून त्या मध्यें संध्येच्या अर्धी पळी चुन्याची निवळ ओतून तात्काळ पाजावें,जलदीनें न पाजल्यास त्याचा गोळा होईल. हें मिश्रण पोटांत जातांच रेच बंद होतात व मळ घट्ट होतो. हें औषध दिवसांतून दोन वेळ प्रमाणें एक दोन दिवस करावें म्हणजे उत्तम प्रकारें गुण येतो. [ १७ ] कुड्याचें मूळ, अतिविष, बेलफळ, वाळा, व नागरमोथे यांचा काढा आम, शूल आणि रक्त यासहित फार फार दिवसाचे अतिसाराचा नाश करितो [ १८ ] धोत्र्याचे फळाचा स्वरस सुमारें एक तोळा बलाबल पाहून घेतला असतां दुस्तर अतिसाराचा नाश होतो. कईफ आल्यास उतार दहीभात खावा [ १९ ] गुळवेल, पहाडमूळ, काळावाळा, बेलफळ, नागरमोथे, वाळा, सुंठ पद्मकाष्ठ, रक्तचंदन, कुडेसाल, धणे, किराईत, व अतिविष, यांचा काढा द्यावा; म्हणजे ज्वर, तृषा, अरुचि, ग्लानि, दाह, मळमळ, मुरडा आणि सूज यानी युक्त अतिसारचा नाश होतो. [ २० ] कुड्याचे सालीचा चतुर्थांश काढा करून स्वच्छ गाळून घ्यावा. त्याचा पुन्हा मंदाग्नीनें पाक करून त्यांत नागरमोथे, बिडलोण, इंद्रजव, संचळ, सैंधव, धायटीचें फूल, व पिंपळी याचें चूर्ण घालून साधारण घट्ट झाल्यावर खाली उतरावें व थंड झाल्यावर त्यात मध घालून द्यावा. हा वत्सकावलेह दुःसाध्य अतिसार, मुरडा, मूळव्याध, संग्रहणी, भगंदर, श्वास, प्रमेह, व वांति याचा नाश करितो.

**शोफातिसार**—या अतिसारांत सर्वांगावर सूज येते; याजवर उपाय—( १ ) देवदार, अतिविष, पाहाडमूळ, वावडिंग, नागरमोथे, मिरीं व कुड्याची साल यांचा काढा करून द्यावा. (२) पहाडमूळ, अतिविष, कुड्याची साल, नागरमोथे, दारुहळद, वावडिंग व मोचरस यांचा काढा प्रातःकाळी द्यावा. ( ३ ) देवदार, कुड्याची साल, वावडिंग आणि मिरी याचा काढा करून दिला असतां सूजयुक्त

अतिसार दूर होतो. ( ४ ) किराईत, नागरमोथे, गुळवेल, सुंठ, चंदन, वाळा, व इंद्रजव, यांचा काढा सूजयुक्त अतिसार, आणि विशेषकरून ज्वर, याचा नाशक आहे.

**शोफातिसारावर पथ्य**—या अतिसारावर ज्वरातिसाराप्रमाणें पथ्य करावें.

**गुदभ्रंश**—गुदभ्रंश ह्मणजे शौच्याचे वेळी अशक्ततेमुळें गुद बाहेर पडतें त्याजवर उपाय—( १ ) बारीक शंखाचें मांस शिजवून त्यांत तेल व मीठ घालून गुदाला तेल लावून त्या मांसानें शेक द्यावा. ( २ ) चुका, बोरें, दहीं, निंबूं, यवखार व सुंठ यांचे काढ्यात तूप घालून पचन करून सिद्ध करावें तें तूप प्राशनास दिलें असतां गुदभ्रंशाचा नाश होतो; यात संशय नाही. ( ३ ) वावडिंग, समुद्रफेंस, पांढरा कात व मायफळ यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून तें बाहेर पडलेल्या कुल्यावर चागलें बसवावें व आंत दाबून वर लगोटी घालावी. ह्मणजे अवश्य गुण येतो. ( ४ ) मायफळाचा काढा करून त्यांत तुरटीचें चूर्ण घालून त्यांनीं गुद धुवीत जावें.

**असाध्यलक्षण** [ मा. नि. ]—पिकलेल्या जांभळच्या रंगासारखें, काजळासारखें, काळें, तांबडें, पातळ, तूप, तेल, चरबी, मज्जा, दूध, दही आणि मांस धुतलेलें पाणी यांच्या रंगासारखें अथवा निळ्या व शेंदरी रंगाचें, नानाप्रकारचे रंगाचें, तुळतुळीत, मोराच्या पिसांवर जसे चांदवे असतात तसे धातुस्नेहानें चांदवे त्यावर असतात, घट्ट मुड्याचे दुर्गंधासारखें,व कुजक्या घाणीसारखें पुष्कळ असें पुरीष [ मळ ] पडतें आणि रोग्यास तृषा, दाह, अन्नद्वेष, दमा, उचकी, मूत्र बंद होणें, बरगड्याचे हाडांस ठणका, मनाला मोह, अस्वस्थता, इंद्रिय मोह, हीं लक्षणें होतात. त्याच्या गुदाच्या वळ्या पिकतात, बडबडणें, गुद मिटत नाही, क्षीण झालेला, अत्यंत आध्मानानें युक्त, अंगावर सूज आलेला आणि गुदाचेठायीं पाक करणारें, पित्त विद्यमान असतां त्याच्या शरीरातला उष्मा नाहीसा झालेला ह्मणजे अंग गार पडलें आहे अथवा ज्याचा अग्नि नष्ट झाला आहे तो; व सूज, शूल, ज्वर, तृषा, श्वास, खोकला, अन्नद्वेष, वांति, मूर्छा, उचकी यांनी पीडित व वृद्ध मनुष्य असला तर बहुतकरून त्या अतिसारानें मरण पावणार असें जाणावें.

**साध्य लक्षण** [ मा. नि. ]—शौच्यावांचून मुतावयास होणें, वायू चांगला सरतो, क्षुधा लागते, पोट हलकें वाटतें, ही रोग बरी होण्याचीं चिन्हें जाणावीं,

**सर्व अतिसारांवर पथ्य**—वांति, लंघन, झोंप घेणें, जुन्या तांबड्या साळीचा भात, तुरी व मसुराचें वरण, ससा, व हरीण याचें मासरस, तिळाचें तेल बकरीचें व गाईचें तूप, दूध दहीं, ताक, गाईचें लोणी, ताजें केळफूल, चुका, तांदुळजा यांच्या भाज्या, अनारसे, जुन्या मोठ्या तादूळाची कण्हेरी, साळीच्या लाह्या, पुदीना, पिकलेली जांभळें, कवठ, डाळिंब, पिठीसाखर, वातातिसारावर तापवून

निवालेलें पाणी, पित्तातिसारावर थंड पाणी व कफातिसारावर ऊन पाणी द्यावें. धणें, बोरें, तांदूळजा, मध, बारीक जातीचे मासे, तुरट पदार्थ, केळें, मध, आंवळकठी, अफु, जिरें, इ० सेवन करावें.

सर्वातिसारावर अपथ्य—स्नान, अभ्यंग, जड व स्निग्ध असें भोजन, व्यायाम, विस्तवाजवळ शेक घेत बसणें, सर्व प्रकारचें नवीन धान्य, उष्ण पदार्थ, मैथुन, चिंता, अंजन, रात्रौ जागरण, धुमपान, नस्य, गहूं, उडीद, वाटाणे, पावटे, शेवगा, आंबा, स्निग्ध भोजन, खापरपोळी, पुरणपोळी, जडान्न, तांबूल, उंस, गूळ, मद्य, द्राक्षें, लसूण. आंवळे, वाईट व शिळें पाणी, पाले भाज्या, क्षार, आंबट पदार्थ, नारळ, मीठ, काकडी, आणि क्रोध, संताप, रक्त काढणें, सुपारी, कोहळा, पांढरा तांबडा भोपळा, कस्तुरी, वाफारा, जव, सर्व सुरणादि कंद, शेवगा, तळ्याचें पाणी, इत्यादि वर्ज.

---

## अपस्मार.

तमः प्रवेशः संरंभो दोषोद्रेकहतस्मृतिः ॥ अपस्मारइति ज्ञेयो गदो घोरश्चतुर्विधः ॥

अर्थ—अंधारांत शिरल्यासारखें होणें, डोळे वेडेवांकडे फिरविणें, दोषाच्या उद्रेकानें ज्ञान नष्ट होणें, ही लक्षणें ज्या रोगात होतात असा हा भयंकर अपस्मार रोग चार प्रकारचा आहे. ह्याला लोकांत फेंफरें, मिरगी, किंवा धुरें असें ह्मणतात.

कर्मविपाक—स्वामिहत्या, गुरुहत्या, वडिलाशीं प्रतिकुळ वागणें, ब्राह्मणाचा श्वास कोंडणें, इत्यादि कारणानीं अपस्माररोग होतो.

परिहार—चांद्रायण प्रायश्चित्त करावें. "सदसस्पति" या मंत्रानें हवन करावें, हिरण्यदान, विनायकप्रतिमेची पूजापूर्वक दान, इ० करावी.

पूर्वरूप ( मा. नि. )—अपस्मार व्हावयाचेपूर्वी हृदयास कंप, शून्यपणा, कांहीं सुचत नाहीं, चिंता, मूर्च्छा, मोह, आणि निद्रानाश हीं लक्षणें होतात.

---

१—अपस्मार ह्मणजे स्मृति नष्ट होणें तो चिंता, शोक व भय इत्यादिकानीं बुद्धि व सत्व याचा नाश झाला असता त्यामुळे चित्तास धक्का बसून उत्पन्न होतो ( याची संप्राप्ति असी ) उन्मादोक्त कारणानीं वातादि शरीर व रक्त आणि तम हे मानसिक दोष कुपित होऊन त्यानीं धैर्याचा किंवा सत्व गुणाचा नाश करून हृदय सज्ञावाहक ( मनोवह ) स्रोतें व्यापलीं ह्मणजे तो उत्पन्न होतो. ( त्याचें सामान्य लक्षण )

२—शुद्ध प्रतिपदेस एक द्वितीयेस दोन याप्रमाणें घास वाढवून पौर्णिमेस १५ व वद्य प्रतिपदेस १५ द्वितीयेस १४ याप्रमाणे कमी ग्रास करून आमावास्येस १ ग्रास याप्रमाणे सत्व अन्न ईश्वरार्पण करून सेवन करणें यांस चाद्रायणवृत्त ह्मणतात.

**वातजअपस्मार लक्षण** ( मा. नि. )—अंग थरथर कांपणें, दांत खाणें, तोंडाला फेंस, श्वासोच्छ्वास मोठ्यानें टाकणें, आणि अरुणवर्ण व कृष्णवर्ण अशीं प्राण्यांची रूपें पाहतो.

**वातजअपस्मार लक्षण [वाग्भट]**—मांड्या कांपत व पुन्हां पुन्हां धडपडत मूर्छित होतो. व भेसूर रडत रडत सावध होतो, डोळे सुजल्याप्रमाणें वर येतात, श्वास लागतो, तोंडांतून फेंस येतो, कांपतो, डोक्यास हिस्के देतो, दांत खातो, मान फुगते, चोहोंकडे वेडे वांकडे हातपाय टाकतो, बोटें वळतात, डोळे, त्वचा, नखें व तोंड हीं रुक्ष, काळसर व ताबूस होतात. त्याच्या डोळ्यापुढें काळे, व चंचळ पुरुष, विद्रूप व विकृतमुख असे दिसतात.

**पित्तापस्माराचें लक्षण [ मा. नि. ]**—तोंडाचा फेंस, अंग, तोंड आणि डोळे हीं पिंवळीं होतात, तो पिवळें आणि तांबडें असें रूप पाहतो, तृषायुक्त व उष्ण असून, अग्नीनें व्याप्त झालेलें असें जगत् पाहतो.

**पित्तापस्माराचें लक्षण [वाग्भट]**—वारंवार फेंफरें येतें, व पुन्हां पुन्हां सावध होतो, तोंडाचा फेंस, डोळे, तोंड व त्वचा हीं पिंवळी होतात. भुईवर आपटतो. त्यास डोळ्यांसमोर पेटल्यासारखें व सारवल्यासारखें दिसतें व तहान लागते.

**कफजअपस्मारलक्षण [ मा. नि. ]**—डोळे, तोंडाला फेंस, अंग व तोंड हीं पांढरीं होतात, अंग गार असतें, अंगावर रोमाच उभे राहतात, जड होतो, आणि पांढरे पदार्थ पाहतो. हा अपस्मार फार वेळानें शांत होतो.

**कफजअपस्मार लक्षण [वाग्भट]**—फार वेळानें फेंफरे येतें, व आल्यावर सावध होण्यासही फार वेळ लागतो, लाळ फार येते, चेष्टा कमी करितो, डोळे, नखें व तोंड हीं पांढरी होतात. व त्यास सर्व पांढरें दिसतें.

**सन्निपातजअपस्मार लक्षण [ मा. नि. ]**—वर सांगितलेली सर्व लक्षणें झालीं म्हणजे त्रिदोषज अपस्मार जाणावा. हा असाध्य आहे. व जो क्षीण पुरुषाला होतो तो व जीर्ण झालेलाही असाध्य जाणावा.

**सर्व अपस्मारांवर उपाय**—(१) कोहळ्याचे फळाचे रसात जेष्ठमध उगाळून द्यावा, म्हणजे तीन दिवसांत अपस्माराचा नाश होतो. (२) वेखंड, गुळवेल, त्रिकटू, मोहाचा डिंक, रुद्राक्ष, सैंधव, रिंगणीचें फळ, समुद्रफळ, व लसूण ही सर्व समभाग पाण्यांत एकत्र वाटून त्याची गोळी सुकवून ठेवावी व ती पाण्यात उगाळून नस्य करीत जावें ह्म० अपस्मार, वायु, कफ, मस्तकशूळ, बडबड, तंद्रा, भ्रम, जाड्य, मोहो, सन्निपात, कर्णरोग, पीनस, हालीमक व अस्थिभंग यांचा नाश होतो. ( ३ ) तूप, सैंधव व हिंग ही एकेक तोळा, आणि गोमूत्र १२ तोळे एकत्र करून शिजवावें, मूत्र आटलें म्हणजे तूप सिद्ध झालें, तें सेवन केल्यानें अपस्मार व हृद्रोग याचा नाश होतो. [ ४ ] ब्राह्मीच्या रसात वेखंड, कोष्ठ, शंखपुष्पी, व जुनें तूप

घालून सिद्ध करून प्राशनार्थ द्यावें. [५] वेखंड, वाहावा, घाणेरा करंज, आंवळकठी, हिंग, गठोणा, व वारीक गोखरू यांच्या कल्कावरोवर तूप सिद्ध करून प्राशनार्थ द्यावें. ( ६ ) कल्याणघृत द्यावें. ( ७ ) शंखाहुली, वेखंड व कोष्ठकोळिंजन यांचें चूर्ण तूप व ब्राह्मीचा रस एकत्र शिजवून रस आटला म्हणजे तूप सिद्ध झालें त्याच्या सेवनानें फार दिवसांचा अपस्मार व हृद्रोग यांचा नाश होतो. ( ८ ) एक भाग तूप व आठरा भाग कोहळ्याचा रस याप्रमाणें घेऊन तूप सिद्ध करावें व जेष्ठमधाच्या चूर्णावरोवर द्यावें. ( ९ ) गाईच्या शेणाचें पाणी, दहीं, महाळुंग, दूध व गोमूत्र यांच्याबरोबर सिद्ध केलेलें तूप चातुर्थिक ज्वर, उन्माद, अंगग्रह, व अपस्मार यांचें नाशक आहे. [ १० ] मनशीळ, रसांजन व पारव्याची विष्ठा, यांचे अंजनानें अपस्मार व उन्माद नाश पावतात. [ ११ ] शिरसाचें तेल, शेळीचे मुतांत सिद्ध करून त्याचें अभ्यंग करावें. [ १२ ] मालकांगोणी, कडूनिंब, गोडा शेवगा, व दालचिनी, यांचा काढा व गोमूत्र यांचेबरोबर तेल सिद्ध करून नित्य अभ्यंग करीत जावें. ( १३ ) शेवगा, कोष्ठ, वेखंड, जिरें, लसूण, त्रिकटू व हिंग ही सर्व समभाग शेळीचे मुतांत घालून त्यांत तेल सिद्ध करून त्याचें नस्य द्यावें. [ १४ ] रोग्याला त्यावेळी एखाद्या क्रूर पशूकडून भिवविला असतां अपस्मार दूर होतो. [ १५ ] वेखंड व सुंठ यांचें चूर्ण मधांत द्यावें हें फार उत्तम आहे. ( १६ ) रोगोद्भव झाला परंतु स्मृति नष्ट झाली नाही इतक्यांत रिठ्याच्या फेसाचें अंजन करावें. यानें डोळ्यांस त्रास होऊन लाल होतात, याकरितां एक-दोन दिवस पुढें डोळ्यांत लोणी काजळाप्रमाणें घालीत जावें. [ १७ ] कोहळ्याचा रस आणि माहाळुंगाचा रस समभाग घेऊन त्याचे सोळावा हिस्सा गाईचें तूप एकत्र करून अग्नीवर सर्व रस आटवून तूप शेष राहितोंपर्यंत कढवावें आणि तें तूप रोज सांजसकाळ एकएक तोळा घेऊन त्यांत सुमारें तीन मासे जेष्टीमधेची पूड कालवून सात दिवस घेतल्यानें सर्व अपस्मारांचा नाश होतो. ( १८ ) पंचकोल, मिरीं, वावडिंग, पिंपळी, त्रिफळा, धणे, जिरें, सैंदेलोण, बिडलोण, व अजमोदा यांचें चूर्ण उष्णोदकांत द्यावें; म्हणजे अपस्मार, कफ, वात, दमा, विष, अग्निमांद्य, मूळव्याध व संग्रहणीरोग यांचा नाश होतो. ( १९ ) गाईचे शेणाचा रस, दूध, दहीं व गोमूत्र यांनी सिद्ध केलेलें तूप याचें सेवनानें अपस्मार, ज्वर, उन्माद व कामला यांचा नाश होतो. ( २० ) शतावरीच्या मुळ्याचें चूर्ण गाईच्या दुधांत द्यावें. ( २१ ) ब्राह्मीचा रस मधांत द्यावा. किंवा कोष्ठाचा काढा मधांत द्यावा.

**अपस्मारावर पथ्य**—रेच, वांति, जुन्या साटक्या साळीचा भात, मुगाचें वरण, गव्हाची पोळी, जुनें तूप, गाईचें दूध, चाकवत, शेवगा व पडवळ, यांची भाजी, डाळिंब, मनुका, आवळ्याचे पदार्थ, द्राक्षें, आंवळ्याचा मोरंबा, साळीच्या लाह्या, स्नान, भय दाखविणें, धीर देणें, तिळाचें तेल, अंजन, नस्य, धमकावणें, वोध करणें, अगस्त्याच्या शेंगा, तांबूल, थंड पाणी, हीं पथ्यें सेवन करावीं.

**अपस्मारावर अपथ्य**—चिंता, शोक, भय, क्रोध, अद्भुत पदार्थांचें द-

र्शन, मद्य, मांसे, विरुद्ध अन्न, तिखट, उष्ण, व जड असें भोजन, अति स्त्रीगमन, आयास, संपूर्ण पालेभाज्या, तोंडलें, उडीद, तुरी, व तहान, निद्रा आणि क्षुधा यांच्या वेगाचें धारण हें वर्ज्य करावें.

---

## अर्बुद.

॥ वातात्पित्तात्कफाद्रक्तान्मांसादपिचमेदसः ॥ षड्विधंस्यात्तथार्बुदम् ॥

**अर्थ**—अर्बुदरोग सहा प्रकारचा—वातार्बुद, पित्तार्बुद, कफार्बुद. रक्तार्बुद, मांसार्बुद व मेदोर्बुद याप्रकारें सहा प्रकारचा अर्बुदरोग जाणावा.

**कर्मविपाक**—पूर्वजन्मीं अभक्ष भक्षण करणारा अथवा विधवेचेठायीं गमन करणारा त्यास अर्बुदरोग होतो. **परिहार**—चांद्रायणें, कृच्छ्रातिकृच्छ्र सुवर्णदान. ब्राह्मणभोजन इत्यादि करावीं.

**संप्राप्ति** ( मा. नि. )—शरीराच्या कोणत्याही भागावर दुष्ट झालेले दोष मांसरक्ताला दूषित करून वाटोळा, स्थिर, मंद, पीडायुक्त, मोठा, खोल, मूळ गेलेला, चिरकालानें वाढणारा व पिकणारा असा मांसाचा गोळा उत्पन्न होतो त्याला अर्बुद असें ह्मणतात.

**वातार्बुद** ( सुश्रुत )—अर्बुदाचे गाठीस ताण बसणें, टोंचणी व फुट लागणें, एका ठिकाणाहून दुसरे ठिकाणीं त्याचें चलन होणें, कारणावांचून कमीजास्त होणें, पखाली सारखा फुगणें व फोड आला असतां त्यातून काळसर रंगाचें रक्त वाहणें ही लक्षणें होतात.

**पित्तार्बुद** ( सुश्रुत )—अर्बुदाचा वर्ण पिवळा किंवा लाल असतो. हा लवकर पिकतो, यांत दाह होतो व फोडला असतां कढत रक्त येतें.

**कफार्बुज** ( सुश्रुत )—कठिण, वेदनारहित, थंड, त्वचेच्या वर्णाचा, व कंडूयुक्त असून फोड पिकला असतां त्यांतून दाट पूं येतो.

**रक्तार्बुद** ( मा. नि. )—दुष्ट झालेला दोष शरीरामध्यें रक्ताला संकोचित करून पीडित करून मासाचा गोळा उचलवितो. तो यत्किंचित् पिकणारा, व किंचित् स्रावयुक्त आणि मांसांकुरांनी व्याप्त आणि लवकर वाढणारा असा असतो, यापासून निरंतर रक्त वाहात असतें. हें रक्तार्बुद असाध्य आहे. तो अर्बुदपीडित रोगी रक्तक्षयाच्या उपद्रवांनी पीडित झाल्यामुळें पांढरा फटफटीत होतो.

---

१—वाग्भटानें यास हा अर्बुदाशिवाय आणखी तीन प्रकारचे अर्बुद ह्मणजे अस्थिजन्य, शिराजन्य व व्रणजन्य असे तीन प्रकार जास्त सांगितले आहेत परंतु ते शरीराचे भागजन्य आहेत ह्मणून त्या चारांतच ते आहेत. असें जाणावें

**मांसार्बुद** ( मा. नि. )—मुष्टिप्रहारादिकेंकरून अंग पीडित झालें असतां दुष्ट झालेलें मांस सूज उत्पन्न करितें, तें दुखत नाहीं, तुळतुळीत, अनन्यवर्ण, न पिकणारी, दगडासारखी कठिण, न हालणारी अशी असते, ज्या मनुष्याचें मांस दुष्ट झालें आहे. व जो नित्य मांस खाणारा आहे, त्याला हें अर्बुद होतें. हें असाध्य होय.

**मेदोर्बुद** ( सुश्रुत )—मेद वाढणारे पदार्थांनी मेद वाढून वायूनें तें मांसांत किंवा त्वचेंत नेलें असतां तो फार स्निग्ध, मऊ, थलथलीत व कफजग्रंथीच्या लक्षणांनीयुक्त असा असतो. रोगी क्षीण झाला म्हणजे तो अर्बुदही क्षीण होतो. रोगी पुष्ट झाला म्हणजे तो अर्बुदही मोठा होऊं लागतो, फोडला असतां तांबडा, काळसर किंवा पांढरा असा घट्ट पूं त्यातून निघतो.

**साध्यासाध्यविचार** ( मा. नि. )—स्रावयुक्त, मर्माचे ठिकाणीं झालेले, किंवा नासादि स्रोतसाचे ठिकाणी झालेलें, किंवा जें स्थिर असतें तें, असाध्य. याचप्रमाणें एके काळी किंवा एकामागून एक अशीं दोन अर्बुदें शेजारीं शेजारीं होतात तीही असाध्य. कफ अधिक असतो त्यामुळें किंवा मेद पुष्कळ असतो त्यामुळें दोष स्थिर असल्यामुळें, व दोषाचें ग्रंथन झाल्यामुळें सर्व प्रकारचीं अर्बुदें स्वभावतः पिकत नाहींत, असें जाणावें.

**सर्व अर्बुदांवर उपाय**—( १ ) ग्रंथी व अर्बुद यांमध्यें प्रदेश, हेतु आकृति, दोष आणि दूष्यें हीं एकच आहेत. याकरिता अर्बुदावर ग्रथिरोगावरील चिकित्सा करावी. वातार्बुदावर घाम काढावा, किंवा तुंबडीनें रक्त काढावें; पित्तार्बुदावर घाम काढावा, व रेचनाविषयी औषधें द्यावी; कफार्बुद, रक्तार्बुद आणि मांसार्बुद यांजवर रक्त काढून ओकारी व ढाळाचें औषध देऊन कोठा शुद्ध करून नंतर व्रणावरचे उपाय करावे. मासार्बुदावर सद्योव्रणावरची औषधें योजावी. (२) व विशेषेंकरून त्रिफळ्याचा काढा गुग्गुळ घालून द्यावा. ( ३ ) जवखार, वावडिंग, गंधक, आणि लोणी हे पदार्थ सरडाचे रक्तांत खलून अर्बुदावर लेप करावा. ( ४ ) हाळद, लोध, पतंग, गूळ, वेरोसा व मनशीळ हे पदार्थ एकत्र मधांत खलून लेप करावा.

**पथ्य**—वाति, रेच, घाम काढणें, नस्य, धूमपान, शिका काढणें, डाग देणें, क्षाराचा उपयोग करणें, लंघन, लेप, जुने तुपाचें प्राशन, जुन्या तांबड्या साळी, यव, मुगाचें वरण, पडवळ, तादूळजा, पोकळा व करटोली यांच्या भाज्या, गव्हाची पोळी, रुक्ष व तिखट पदार्थ, संपूर्ण दीपन औषधें, गुग्गुळ, गाईचें तूप, तापवून थंड झालेलें पाणी हे पदार्थ सेवन करावे.

**अपथ्य**—दूध, व उसापासून होणारे सर्व पदार्थ, पिष्टान्न, आंबट, मधुर, जड व कफकारक, असे पदार्थ अर्बुद रोग्याला देऊं नयेत.

---

# अरुचि.

॥ पंचैवारोचकाज्ञेयावातपित्तकफैस्त्रिधा ॥ सन्निपातान्मनस्तापात् ॥

अर्थ—अरोचक रोग पांच प्रकारचा—वातारोचक, पित्तारोचक, कफारोचक, सन्निपातारोचक व मनानाला दुःख होऊन त्या संतापानें होतें तें, याप्रकारें पांच प्रकारचा अरोचकरोग जाणावा.

कर्मविपाक—जन्मकाळीं तृतीय स्थानीं गुरु असतां मनुष्य लोक निंदित, कृपण, बाधवयुक्त, स्त्रैण ( जारकर्म करणारा ) पापकर्म करणारा, व अरोचक रोगांनी पीडित असा होतो. परिहार—बृहस्पतीचा जप, होम, व दान करावें.

पूर्वकर्मविपाक—श्रद्धाविरहित कर्म करणें, द्रव्य पुष्कळ असून दान न करणें, व क्रोधिष्टपणा, इत्यादि पूर्वजन्मार्जित कारणांनी अरोचकरोग व शूलरोग हे होतात. परिहार—कृच्छ्रातिकृच्छ्र, चांद्रायणें, प्रति दिवशी ब्राह्मणास मिष्टान्न भोजन, होम, तीर्थयात्रा, जप, सुवर्णदान, इत्यादि करावें. ह्मणजे रोगाचें निरसन होतें.

अरुचीचें कारण ( मा. नि. )—मनाला किळस येणारें अन्न, रूप, व गंध ( वास ) या कारणानें उत्पन्न होतें.

वातारोचक ( मा. नि. )—वायूच्या अरोचकानें दांत आंबतात, आणि तोंड तुरट होतें, व हृदयांत शूळ व वेदना ही लक्षणें होतात. यांजवर—वेखंडाचे काढ्याची वांति देऊन ओकवून नंतर स्नेह ( तूप तेल ) आंबट रस व मद्य यांतून एका बरोबर पिपळी, वावडिंग, जवखार, रेणूकबीज, भारंगमूळ, रास्ना, वेलदोडे, हिंग, सैंधव व सुंठ यांचें चूर्ण एकत्र करून द्यावें.

पित्तारोचक ( मा. नि. )—पित्तदोषानें तोंड कडू, तिखट, दुर्गंधयुक्त आंबट, उष्ण, व स्वादहीन होऊन तहान, दाह आणि तुंबडी लागल्याप्रमाणें पीडा ही लक्षणें होतात. याजवर—गूळ, पाणी व जेष्ठीमध याचें वमन द्यावें. आणि सैंधव, साखर, मध व तूप यांचा लेह करून द्यावा.

कफारोचक ( मा नि. )—कफ दोषानें तोंड खारट, गोंडीळ, चिकट होऊन शरीर व मुख हे गार जड आणि बांधल्यासारखें ह्मणजे खावत नाही व आंतून कफानें सारवल्यासारखें हृदयात शूळ आणि वेदना, तोंडांतून कफाचा स्त्राव इत्यादि लक्षणें होतात. याजवर—कडू निंबाच्या पानाला पाण्याचा हाबका देऊन रस काढावा, त्याचे वमन देऊन नंतर बाहाव्याचे काढ्यांत ओंव्याचे चूर्ण व मध घालून द्यावें किंवा वातारुचीवर जें चूर्ण सांगितलें तें द्यावें.

**सन्निपातारोचक** ( मा. नि. )—यांत वात, पित्त व कफ या तिहींचीही लक्षणें होतात. व अन्नद्वेप व तोंड अनेक रसयुक्त होतें

**सामान्यारोचक** (मा. नि.)—शोक, भय, अति लोभ, क्रोध, अहृद्य व घाणेरडा गंध ( वास ) यापासून झालेल्या अरोचकामध्यें तोंड स्वाभाविक असतें ह्मणजे वात जातिकाप्रमाणें तुरट वगैरे असत नाहीं. वैगुण्य ह्मणजे मनाची व्याकुळता, मोह, जडत्व, या लक्षणांनी आगांतून आरोचक जाणावें. क्षुधा असतां जेवणाला सामर्थ्य नसतें याला अरुचि ह्मणावें. आवडतें अन्न दिलें तरी खाववत नाहीं त्यास अन्नाभिनंदन ह्मणावें. अन्नाचें स्मरण, श्रवण, दर्शन आणि वास यांस त्रासतो त्याला भक्तद्वेप ह्मणावें. याप्रमाणें हा रोग तीन प्रकारचा आहे. तरी चरक व शुश्रुत या ग्रंथकारानीं अरोचक शब्दांनी त्याचा संग्रह केला आहे. याचा चवथा प्रकार असा आहे कीं, अन्नावर वासनाच होत नाहीं, त्याला भक्तच्छेद ह्मणतात. तो कुपित, भयार्त व ज्वरित अशा रोग्यांचा असाध्य जाणावा.

**सर्व प्रकारचे अरुचीवर उपाय**–(१) अंतःकरणास कोणत्याही हर उपायानें हर्ष उत्पन्न करणें, व आश्वासन देणें हे उपचार करावे. (२) प्रकृतीस मानवेल तसे नानाप्रकारचे भक्ष पदार्थ पक्वान्नें, आमट्या, सांबारी, भाज्या, कोशिंबिरी, चटण्या, लोणचीं, पंचामृत, गुळांबे, रायती, पन्ही, श्रीखंड, मुरांबे इत्यादि अंतःकरणास सुख देणारे असे पदार्थ सेवन करावे; ह्मणजे तोंडास रुचि येते. ( ३ ) अजीर्णनाशक औषधें सेवन केल्यानें अरुचि दूर होते. ( ४ ) वावडिंगाचें चूर्ण एक तोळा व मध ४ तोळे यांची गोळी तोंडांत धरावी व द्रव गिळीत जावा ह्मणजे असाध्य जरी अरुचि असली तरी तिचा जलद नाश होतो. ( ५ ) अन्नावर ज्यास अरुची होते त्यानी चिंचेचें सरबत, गूळ, पाणी, दालचिनी, वेलदोडे व मिरीं घालून सारखें करावें त्याचे बरोबर भोजन करावें. ( ६ ) निंबूरस एक भाग, साखरेचें पाणी ६ भाग घेऊन त्यांत लवंगा व मिरीं यांची पूड नेमस्त टाकून पन्हें करावें. हें वातनाशक, अग्नि प्रदीप्त करणारें, रुचिकारक व सर्व आहाराचें पाचक असें आहे. ( ७ ) खांडव चूर्ण द्यावें. ( ८ ) आंवळकठी, चिच, द्राक्षें, दाळिंब, जिरें, पादेलोण, गूळ व मध हें सर्व पदार्थ अरुचीचा नाश करितात. [ ९ ] सुंठ, मिरी, पिपळी, कवठ, साखर व पादेलोण याची गोळी करून द्यावी, ह्मणजे अरुचि दूर होऊन जठराग्नि प्रदीप्त होतो. [ १० ] दाळिंबाचे रसांत वावडिंगाचें चूर्ण घालून तो रस तोंडांत धरावयास द्यावा ह्मणजे असाध्य अरुचीचा नाश होतो. ( ११ ) साखर १ तोळा, मध ४ तोळे व जिऱ्याचें चूर्ण सहा मासे एकत्र करून तोंडांत धरण्यास द्यावें. ( १२ ) कवठाचा गीर, त्रिकटू चूर्ण, मध व साखर यांत मिळवून तोंडात धरावें.

**अरुचीवर पथ्य**—रेचक, वमन, स्नान, अगस्त्याच्या शेंगा, करडईची भाजी, धूमपान, साटक्या साळीचा भात, गव्हाची पोळी, मूग व तांबड्या तुरी यांचें वरण,

ससा व हरिणाचें मांस, तांबडा भोपळा, कांकडी, कोंवळे मुळे, वांगीं, शेवगा, पडवळ, सुरण, मेथी, कारली, गांजर, काळा घेवडा, घोळ, करटोलीं, चाकवत, चुका. व धेंडशी, गाईचें दूध, ताक, दहीं, निंबू, साखर, उडीद, जोंधळे, पुदीना, सैंधव, मिठ, लोणी, हिंग, अमसूल, अळुनुखार, आलें, आंवळे, पिकलेलें कवठ, बोरें, रोग्याचे इच्छेनुरूप पदार्थ अल्प अल्प देत जावे. दोडकी, पांढरा कांदा, गाईचें तूप, तवकीर, तांदूळजा, तोंडली, धणे, मटक्या, फुटाणे, वाटाणे. नागवेल, उनपुदीना, ब्रह्मी, गोडंबी, दुधिया भोपळा. भांग. महाळुंग, लवंगा, लसूण, पोकळा, शिंगोडे, शेळीचें दही, लोणी, गाईचें ताजें लोणी, इत्यादि पथ्याम सेवन करावें.

**अरुचीवर अपथ्य**—तहान, ढेंकर, क्षुधावरोधन यांचे वेगाचें धारण, अप्रिय अन्न, रक्त काढणें, क्रोध, लोभ, भय, शोक, दुर्गंध आणि विद्रूप पदार्थांचें दर्शन, दुधाची क्षीर, केळें, तांबूल, कोहळा, थंड पाणी, इत्यादि पदार्थ वर्ज्य करावे.

---

## अश्मरी ( मूतखडा. )

॥ वातपित्तकफैस्तिस्रश्चतुर्थी शुक्रजाऽपरा ॥
॥ प्रायः श्लेष्माश्रयाःसर्वा अश्मर्यः स्युर्यमोपमाः ॥

**अर्थ**—वात, पित्त व कफ यांपासून ३ व चवथा शुक्रापासून अश्मरीरोग ( मुतखडा ) होतो. ह्या अश्मरी बहुतकरून कफाश्रित असतात. " यमोपमा, ह्मणजे चांगली चिकित्सा न झाली तर त्या अवश्य प्राण घेतात.

**कर्मविपाक**—जन्मकाळीं गुरुस्थानी बुध असून त्याजवर रवीची दृष्टि असेल तर पुढें त्या प्राण्यास प्रमेह व अश्मरीरोग होतात. **परिहार**—बुधाचीं दानं, जप व हवन इत्यादि करावी.

**पूर्वकर्मविपाक**—जन्मांतरी परस्त्रीगमन केलें असता अश्मरी ह्मणजे मुतखडा हा रोग होतो. **परिहार**—कृच्छ्रत्रय, प्रायश्चित्त व सुवर्णदान इत्यादि करावी.

**संप्राप्ती** ( मा. नि )—ज्या वेळेस वायु बस्तीतलें शुक्रयुक्त किंवा पित्तयुक्त मूत्र किंवा कफाला सुकवितो तेव्हां अश्मरी [ मुतखडा होतो ] जसें गाईच्या पित्तामध्यें गोरोचन जमतें तसें बस्तीमध्यें शुक्रादिक गोठून [ थिजून ] खडा होतो. बाळपित्याचे रेतांत विकार असतां संभव झाला तरी होतो. बहुतेक मुतखडे बाळपणींच १६ वर्षांचे आत होतात. व नंतर जे होतात ते स्वतःचे शुक्रदोषानें होतात.

**पूर्वरूप** [ मा. नि. ]—बस्ति फुगणें, बस्तीच्या आसपास अत्यंत पीडा होणें, मुताला बोकडाच्या मुताची घाण, मूत्रकृच्छ्र, ज्वर आणि अरुचि हे उपद्रव पूर्वी होतात.

**अश्मरीचें सामान्य लक्षण** [ मा. नि. ]---नाभी, शिवण आणि बस्तीचें अग्र यांच्या ठिकाणी शूल व अश्मरीच्या योगानें मुताचा मार्ग कोंडला ह्मणजे मुताची धार फाटते. अश्मरी मूत्रमार्गापासून पलिकडे गेली ह्मणजे मूत्र होण्यास कष्ट होत नाहीत आणि मूत्र स्वच्छ पाण्यासारखें होतें. अश्मरीच्या योगानें बस्तीमध्यें क्षत झालें असतां रक्तमिश्रित मूत्र होतें. व मुततांना जोर केला तर फार क्लेश व पीडा होते. हें सामान्य लक्षण होतें.

**वाताश्मरी** [ मा. नि. ]---वाताश्मरींत अतिशय तिडका लागल्यामुळें रोगी व्याकुळ होतो, दांत खातो, कांपतो, शिश्नाचें मर्दन करितो, बेंबी दाबतो व रात्रंदिवस दुःखानें ओरडतो, आणि मूत्र होण्यासाठीं कुंथूं लागला म्हणजे वायु सरून मूत्र सुटतें. वारंवार मुताचा थेंब थेंब होतो व त्याचा मुतखडा नीलवर्ण, रुक्ष, असून त्याजवर कांटे असतात याजवर--( १ ) वायवर्ण्याचे मुळाचा काढा त्याचेच मुळाचें चूर्ण घालून द्यावा. ( २ ) यव, बोरें, कुळीथ व निवळीचें बियांचे चतुर्थांश काढ्यांत तूप सिद्ध करून द्यावें.

**पित्ताश्मरी** [ मा. नि. ]---पित्ताच्या अश्मरीनें बस्तीमध्यें आग होते, आणि क्षारानें जसा काय दाह होत आहे अशी वेदना होते. बस्तीवर हात ठेविला तर कढत लागतो आणि अश्मरी बिब्यांतील गोंडबी एवढी लाल, पिवळी किंवा काळी असते. याजवर--(१) पाषाणभेदाचा काढा शिलाजीत व साखर घालून द्यावा. (२) एरंडमूळ, रिंगणीमूळ, डोरलीमूळ, गोखरूमूळ व तालिमखान्याचें मूळ यांचा कल्क गोड दह्याबरोबर प्यावा, त्यानें मुतखडा फुटतो.---

**कफाश्मरी** [ मा. नि. ]---कफाच्या अश्मरीनें बस्ति टोंचल्यासारखा, थंड व जड होतो. आणि अश्मरी मोठी, गुळगुळीत, आणि मधेच्या रंगासारखी किंचित् पिवळी, पांढरी अशी असते. याजवर--[ १ ] शेवग्याची साल वायवर्ण्याची साल, याचा काढा जवखार घालून द्यावा. [ २ ] विकारानुरूप औषधांचे क्षार यांनीं सिद्ध केलेलीं दुधें व कण्हेऱ्या याची योजना करावी. [ ३ ]करंज, अंकोल, निवळी, साग व कमळ यांच्या बियांचा कल्क व गूळ ऊन पाण्यांत घालून प्यावें; हें बारीक मुतखडे पाडण्याविषयी फार उत्तम आहे.

**सूचना**---या पूर्वोक्त त्रिदोषज अश्मरी बहुतकरून बालकासच होतात असें वर सांगितलें आहे. कारण त्यांचा आहार जड, मधुर, शीत व स्निग्ध असा असतो व त्या अश्मरीचा आश्रयभूत बस्ति अल्प आणि त्यांचा संचय अल्प यामुळें ओढून काढण्याविषयीं कठिण पडत नाहीं.

**शुक्राश्मरी** [ मा. नि. ]---ही शुक्रधारणानें मोठ्या मनुष्यासच होते. कारण तो मनुष्य मैथुनास प्रवृत्त होऊन स्थानापासून सुटलेल्या शुक्राचें धारण करितो त्या स्थानापासून सुटलेलें शुक्र पुरतें मैथुन न केल्यामुळें व न पडलेल्या शुक्राला वा-

यु शिश्नाच्या व वृषणाच्यामध्यें आणून शोषितो. त्या शुष्क आलेल्या शुक्राची अश्मरी बनते. तिच्या योगानें बस्तिशूळ, उन्हाळ्या, आणि वृषणाला सूज येते. ती उत्पन्न होतांक्षणींच तो खडा ज्या जागीं जमतो तेथें शुक्र येऊन त्या खड्यास मिळतें. व अशा क्रमानें तो खडा वाढतो. ती उत्पन्न झाल्यावर तिची जागा चोळली असतां ती शुक्रांतच नाहींशी होते. अश्मरी हीच सिकता व शर्करा होते असें जाणावें. शर्करा आणि सिकता यामध्यें लहान मोठेपणानें भेद आहेत. मोठी होते ती शर्करा आणि बारीक वाळूचे कणासारखी खरखरीत पडते ती सिकता होय. याजवर—( १ ) तीळ, आघाडा, केळें, पळस व जव यांचा खार सर्व शर्करा-व मुतखडे यांजवर मेंढीच्या दुधांत किंवा मुतांत प्यावा. ( २ ) नाचण्याचें पीठ मध घालून मेंढीच्या दुधाबरोबर सात दिवस प्यालें असतां मुतखड्याचे बारीक बारीक तुकडे होऊन तो मुताबरोबर पडून जातो. ( ३ ) शतावरीच्या मुळ्यांचा रस आणि त्याच्या बरोबर गाईचें दूध एकत्र करून प्यावा; ह्मणजे फार दिवसाची जरी अश्मरी असली तरी तिचा लवकर नाश होतो. ( ४ ) जवखार व गूळ यांनीं युक्त पळसाचे फुलांचा काढा प्यावा तो शुक्राश्मरीचा नाश करितो. ( ५ ) उंबराची मुळी गाईच्या दुधांत उगाळून शिश्नावर लेप द्यावा व ती मुळी दुधांत उगाळून साखर घालून पिण्यास द्यावी; ह्मणजे मुतखडा पडेल. ( ६ ) उंबराचे मुळाचा रस ६ तोळे काढून त्यांत साखर घालून देणें ह्मणजे एक प्रहरांत मुतखडा पडेल.

**शर्कराश्मरी** ( मा. नि. )—वायु वस्तीमध्यें अनुलोमन असतां वायूनें ती थोडी थोडी फुटली ह्मणजे मूत्राबरोबर बाहेर पडते. आणि वायु प्रतिलोमन झाला असतां बंद होते. ती मूत्रमार्गात येऊन बसली ह्मणजे नानाप्रकारचे दुर्बळपणा, ग्लानि कृशता, कुक्षिशूल, अरुचि, पांडुरपणा, उष्णवात, तृषा, हृदयपीडा, ओकारी इत्यादि उपद्रव होतात. यांजवर—( १ ) करंज, अंकोल, निवळी, साग व कमळ यांच्या बियांचा कल्क व गूळ ऊन पाण्यांत घालून तें प्यावें. हें शर्करा ह्मणजे बारीक मुतखडे पाडण्याविषयीं फार उत्तम आहे. ( २ ) हिंग, वेलदोडे, दूध आणि तूप हे एकत्र करून प्यालें असतां मूत्राश्मरी व शुक्राश्मरी यांचें नाशक आहे. ( ३ ) जुनें मद्य पिऊन गाडीत किंवा घोड्यावर बसून खूप वेगानें जावें; ह्मणजे त्याचे योगानें अंग खिळखिळें होऊन शर्करा व मूतखडा हे तात्काळ गळून पडतात. ( ४ ) शेवग्याचे मूळाचा काढा दिला असतां मूतखडा विरघळून पडतो.

**शर्करेचें असाध्य लक्षण** ( मा. नि. )—ज्याची नाभी आणि वृषण सुजलें असेल व मूत गुंतलें आहे आणि वेदना होत आहेत अशा पुरुषाला शर्करा व सिकतायुक्त अश्मरी मारिते.

**सर्व प्रकारचे अश्मरीवर उपाय**—(१) पारा १ भाग व गंधक २ भाग पांढरे वसू-

चे रसांत एक दिवस खल करून भूधर यंत्रांत पक्क करावें. नंतर त्याचे बरोबरीनें पाषाणभेदाचें चूर्ण आंत मिळवून ठेवावें व बलाबल पाहून देत जावें; ह्मणजे हटकून गुण येतो. (२) आंवळीच्या कोंवळ्या पाल्याचा स्वरस तिळाचें तेल घालून प्रातःकाळीं प्यावा; ह्मणजे अति दारुण वाढलेल्या अश्मरी रोगाचा नाश होतो. (३) रिंगणीचा स्वरस मध घालून प्राशन केला असतां दारुण अश्मरी रोग आणि भयंकर मूत्रकृच्छ्र यांचा नाश होतो. (४) गोखरु, एरंडाची पानें, पाषाणभेद, व सुंठ यांचा काढा जवखार घालून दिला असतां अश्मरीचा नाश होतो. (५) शिलाजीत मधांत द्यावा. (६) गोखरूचें चूर्ण समभाग जवखार घालून सेवन करून वर थोडें थंड पाणी प्यावें. (७) तिळाचा क्षार मधांत द्यावा; ह्मणजे मुतखडा झडून पडेल. (८) इंद्रजव न निशोत्तर यांचें चूर्ण तांदुळाचे धुवणांत अथवा दुधांत द्यावें. (९) पाषाणभेदाचे काढ्यांत शिलाजीत किंवा सोरा अथवा साखर घालून द्यावी. (१०) हळदीचें चूर्ण गूळ घालून तूषोदकाबरोबर द्यावें; ह्मणजे मोठ्या दुर्धर अश्मरीचा नाश होतो. (११) कोहळ्याचा रस हिंग व जवखार घालून द्यावा; ह्मणजे बस्ति व शिश्न यांचा शूल, मूतखडा व शर्करा यांचा तात्काळ नाश होतो. (१२) भुइकोहळा, गोखरु, जेष्टीमध, व नागकेशर यांचा काढा मध व पाऱ्याचें भस्म घालून द्यावा. (१३) आलें, जवखार, हीरडेदळ, दारुहळद व कडू शेवग्याची साल हीं सर्व शेळीचे दुधांत वांटून गाळून तो स्वरस प्यावा; ह्मणजे मूत्राश्मरी फुटून पडते. (१४) शिरदोडी गाईचे दुधांत वाटून दोन दिवस प्रातःकाळी प्यावी; ह्मणजे अश्मरी फुटून जाते (१५) वायवर्ण्याची साल, सुंठ व गोखरु, यांचा काढा थंड झाल्यावर जवखार व गूळ घालून द्यावा; ह्मणजे मूत्राश्मरी, शर्करा, मूत्रकृच्छ्र व मूत्राघात यांचा निश्चयानें नाश होतो. (१६) सुंठीचा काढा, हळद व गूळ घालून जो प्राशन करील त्याची फार दिवसाची शर्करा फुटून लिंगावाटें पडेल.

**वाग्भटाचें मत**—ह्यावरील अनुभवसिद्ध औषधांनीं मूतखडा जर फुटून गळून गेला नाहीं तर सांगितल्याप्रमाणें राजा, रोगी, व त्याचे आप्तवर्ग यांस विचारून त्याची परवानगी घेऊन वैद्यानें मोठ्या सावधगिरीनें शस्त्र क्रिया करावी. (शस्त्रक्रिया न केली तर रोगी खास मरणार असें असल्यास) शस्त्रक्रिया करणारा वैद्य मोठा कुशल असून पूर्ण माहितगार व ज्यास असल्या क्रियेंत अनेक वेळां यश मिळालें आहे अशा वैद्याकडून शस्त्रक्रिया करावी. वरप्रमाणें आज्ञा घेतल्यावर रोग्यास स्नेहपानानें स्निग्ध करून रेचक देऊन किंचित् कर्षण करावें. शस्त्रक्रिया करावयाचे दिवशी त्यास जेवण घालून त्याजकडून पुण्याहवाचनादिक करवावें. अंगास तेल लावून घाम काढावा. नंतर त्यास सुमारें एक हात उंचीच्या चौरंगावर दुसऱ्या एका मनुष्याच्या मांडीवर ढुंगणाखालीं वस्त्राची चुंबळ देऊन उताणें

१—कच्चे जव भरडून मातीच्या पात्रात पाणी व ते कोंड्यासहित घालून तोंडाला मुद्रा देऊन कांहीं दिवस ठेवावे ह्मणजे त्यास तूषोदक ह्मणतात.

निजवावें. नंतर रोग्याचें कोंपर व गुडघे आकुंचित करून ज्याच्या मांडीवर तो निजला आहे त्यानें तें वस्त्रानें घट्ट बांधावें. नंतर रोग्यास धीर देऊन त्याच्या बेंबीच्या भोंवतीं खाली व विशेषतः डावेकडे तेल लावावें व मुठीनें दाबून दाबून मुतखडा खालीं न्यावा. नंतर डावे हाताची तर्जनी ह्मणजे अंगठ्याजवळील बोट व मधलें बोट यांची नखें काढून त्यास तेल लावून शिवणीच्या धोरणानें गुदांत घालून ती वांकवून त्यांनीं गुद व शिश्न याच्या दरम्यान मुतखडा आणावा. तसाच बस्ति ह्मणजे मूत्राशय साफ राखावा. ह्मणजे त्यास ताण बसूं देऊं नये व सुरकुत्या पडूं देऊं नयेत. मग त्या बोटांनी तो खडा वर दाबावा. तो गाठीसारखा वर दिसूं लागला ह्मणजे शिवणीपासून डावे बाजूस एक यव अंतर सोडून मुतखड्याचे मानानें शस्त्रानें शिरा वांचवून चिरून उत्तम तोंडाची सांडसी घेऊन तिनें तो खडा फुटूं न देतां सगळा धरून युक्तीनें बाहेर काढावा. स्त्रियांचा बस्ति गर्भाशयास लागून असल्यामुळें व्रणांतील उंचवट्याप्रमाणें उजवे बाजूस शस्त्र टाकावें ह्मणजे त्याचा रोख खालीं असावा. असें न केल्यास मूत्रमार्ग कापला जाऊन मूत्रस्रावीव्रण होईल. पुरुषांनाही मूतमार्ग कापला गेल्यास मूत्रस्रावी व्रण होतो. आणखी असें आहे की मुतखडा काढण्याकरिता एकीकडूनच बस्तीस व्रण केला असतां तो मात्र बरा होतो. परंतु तो बस्तीच्या दोहों अंगांस झाल्यास बरा होत नाहीं.—मुतखडा काढल्यावर ऊन पाण्यानें भरलेल्या पिपांत रोग्यास बसवावें ह्मणजे त्याचा बस्ति ( मूत्रस्थान ) रक्तांनी भरत नाही-कदाचित् भरलाच तर शिश्नातून क्षीरवृक्षांच्या काढ्याची पिचकारी मारावी.—नंतर मूत्र शुद्ध करणारी क्रिया करावी. ती अशी की त्यास तीन दिवसपर्यंत व्रणास मध व तूप लावून तृप्त होईपर्यंत गूळ खावयास घालून दररोज दोन वेळां मूतशोधक औषधांच्या काढ्यांत सिद्धि केलेली किंचित् उष्ण कण्हेरी तूप घालून द्यावी. नंतर दहा दिवस दुधात बराच गूळ घालून त्या दुधाबरोबर थोडा भात भक्षण करावा. क्षीरवृक्षाच्या काढ्यानें व्रण धुवून त्याजवर पुंडरीक वृक्ष, मजीष्ट, जेष्ठीमध, व पठाणीलोध याच्या कल्काचा लेप करावा. वरील औषधे व हाळद याच्या कल्कात सिद्ध केलेलें तेल व्रणास लावीत जावें. दहा दिवसपर्यंत व्रण शेकावा, शेकल्यावर सात दिवसांनी मूत्र जर शिश्नांतून न जाईल तर व्रण डागावा आणि मूत्र स्वमार्गी येण्यास ज्यात पुष्कळ गोड औषधें आहेत असें त्यास उत्तरबस्ति द्यावें.—मूत्रवह धमन्या, शुक्रवह धमन्या, बस्ति, वृषण, शिवण, गुद, मूत्रमार्ग व योनी यांस मूतखडा काढतांना शस्त्राचा धक्का लागू देऊं नये.—शस्त्राची जखम चांगली बुजाल्यावरही एक वर्षपर्यंत त्या रोग्यानें डोंगरावर चढूं नये, घोडा वगैरे वहानावर बसूं नये, झाडावर चढूं नये, स्त्रीगमन करूं नये, गाडीत बसूं नये व पाण्यांत पोहूं नये.

**अश्मरीवर पथ्य**—इंद्रियजुलाब, रेचक, वमन, लंघन, घाम काढणें,

१—लकडी रेवाचिनी, पळसाचीं फुलें, वेलदोडे

स्नान अंगावर पाणी शिंपणें, जुन्या साटक्या साळीचा भात, मुगाचे दाळीचें वरण, कुळीथ, गव्हाची पोळी, जोंधळ्याची भाकरी, तांदूळजा, यव, काकडी, तवकीर, सावे, कोद्रू, तुरी, धेंडसें, सैंधव, कोहळा, तापवून निवालेलें पाणी, गाईचें दूध, व तूप, पोकळा, गोड ताक, भेंडचा, दुध्या भोपळा, गिलकी, हे पथ्यास सेवन करावें.

अश्मरीवर अपथ्य—मल, मूत्र, आणि शुक्र यांचे वेगाचे रोध, मलावष्टंभ करणारे व जड असे पदार्थ विरुद्धाशन रुक्ष पदार्थ, वातुळ पदार्थ, तांबूल, ऊन किंवा शके घेणें, उष्ण पदार्थ, मार्ग चालणें, जागरण, व श्रम करणें इत्यादि वर्ज करावें.

---

## अस्थिभंग.

**अस्थिभंगाचें कारण व लक्षण** (सुश्रुत)—उंच ठिकाणाहून पडलें असतां किंवा आघात झाला असतां इत्यादि कारणानें हाडें मोडतात. त्याचे दोन प्रकार आहेत. एक पहिला प्रकार सांध्यात हाडें मोडणें, ह्मणजे हाड सांध्यापासून निखळणें व दुसरा प्रकार साध्याशिवाय हाड मोडणें, पहिल्यांत अवयव लांब किंवा आखूड करवत नाहींत व सांधा सुटतो व दुसऱ्यांत अतिशय सूज कोणत्याही अवस्थेंत अवयव असला तरी फार वेदना व तो अवयव थोडासुद्धां हालविण्याची शक्ति नसणें आणि चेपलें तर शब्द होणें, ही संक्षेपानें लक्षणें सांगितलीं आहेत.

**अस्थींचीं लक्षणें** ( सुश्रुत )—तरुण अस्थि वाकतात; नळ्या मोडतात, कपालास्थि तडकतात ( चिरतात ) व बाकीच्या अस्थि बहुधा फुटतात.

**साध्यासाध्यविचार** ( सुश्रुत )—कपाळाच्या कवट्या वेगवेगळ्या झाल्या किंवा अगदी चुरडल्या तर असाध्य. त्याचप्रमाणें शंखांत व मस्तक आणि पाठ यांच्यामध्यें व दोन्ही स्तनांच्या दरम्यान हाड मोडलें तर तें असाध्य होतें. कंबरेंतील कपाल अस्थी मोडलें किंवा सांध्यापासून सरलें किंवा अगदींच साफ निखळलें अथवा ठेंचल्यामुळें त्याचा चुराडा झाला असेल तर असाध्य जाणावें. ज्या हाडाचे पुष्कळ बारीक बारीक तुकडे झाले आहेत. ज्याला हातानें स्पर्श केला असतां शब्द होतो. जेंथें मोडका हाडाचा तुकडा हाडाच्यामध्यें शिरतो तें असाध्य. किंवा आघात लागून मोडलेलें, थोडेंच शिल्लक राहिलेलें, व वर चढलेलें, अथवा बाहेर ज्यांत व्रणही झाला आहे, किंवा मज्जेंत बुडालेलें अशा प्रकारानें मोडलेलें हाड आणि कृश, अशक्त व वातूळ पदार्थ नेहमीं भक्षण करणारे व अल्प अन्न खाणारे यांचें हाड मोडलें असतां बरें होणें फार कठिण असतें. ३० वर्षाचे आतील उमरीचें मनुष्याचें हाड जरी प्रथम असाध्य वाटलें तरी दीर्घ उपायानें व पौष्टिक प्रयोगानें किंवा बकरा आणि हरीण यांचें तर्जे हाड जुळतें तसें वृद्धाचें जुळत नाहीं.

अस्थिभंगावर उपाय—( १ ) जें अस्थि खालीं सरलें असेल तें हळू हळू नीट रीतीनें वर सारावें. व जें वर सरलें असेल तें युक्तीनें खालीं आणावें किंवा बाजूस चढलें असेल तर ओढून जागचे जागीं ठेवून साफ करावें. आणि तुटून खालीं सरलें असल्यास वर दाबून बसवावें. ताणणें, दाबणें, वर करणें, चामडें बांधणें, अथवा साधा पट्टा बांधणें इत्यादि सांधा जुळविण्याच्या उपायानें शरीराचे चल किंवा अचल सांधे न हालेसे बसवून वर मऊ फडकी तुपांत भिजवून गुंडाळावी. आणि नंतर वर कळंब, उंबर, पळस, अर्जुनसादडा, राळ्याचा वृक्ष, यांच्या रुंद, पातळ चिवट, व गुळगुळीत किंवा त्याच प्रकारच्या बांबूच्या कांबी सभोंवती लावून फडक्याच्या पट्ट्यांनीं फार आंवळूनही नाही व फार सैलही नाहीं त्याच प्रमाणें पट्ट्याचा एक वेढा आवळलेला व एक वेढा सैल असें न बांधतां सारख्या रीतीनें बांधावें, सैल बांधल्या कारणानें सांधा बसावा तसा घट्ट बसत नाही आणि जर फार घट्ट बांधला तर अतिशय कळ लागून दाह, पाक आणि सूज हे विकार उत्पन्न होतात. (२) कांडे निवडुंगाचा चीक एका लोंकरीच्या फडक्यावर जाड पसरून त्याजवर शेंदूर टाकावा. आणि त्या शेंदूरावरून विशेष भार न घालतां बोट फिरवावें ह्मणजे तो त्या चिकांत मिसळतो. नंतर आस्थिभंग झालेल्या जागेवर तो चिकाचा पट्टा बसवून त्यावरून लोंकरीच्या चौघडी फडक्याची घडी बसवून त्यावरून रोग्याच्यानें मोठ्या संकटानें अशा प्रकारें रुंदवट नाडीचे घट्ट फेऱ्याजवळ फेरा घेऊन बांधून ठेवावें. हा पट्टा सात दिवसात कोणत्याही प्रकारचा आस्थिभंग असला तरी त्वरित बरा करितो. (३) ओल्या नारळाचें खोबरें किसून किंवा खवणीनें खऊन त्यांत ओंवा, भिलावे, मीठ व हळद हे अदमासानें थोडे थोडे घालून पुन्हां एकजागी कुटावें. नंतर तें मिश्रण तव्यावर गरम करून पट्टा बांधावा. हा योग सामान्य प्रकारचें हाड वगैरे ठेंचल्यास हितावह होतो. ( ४ ) घाण्यातून ताजें काढलेलें तिळाचें तेल ऊन आहे तोंच त्यांत वातनाशक औषधाचें चूर्ण मिळवून त्याचें सेवन करावें. (५) फार थंड लेप आणि सेचनें कांहींवेळ एकसारखीं करावी. ( ६ ) पहिलारु गाईचें दूध मधुर औषधें घालून कढवावें व निवाल्यानंतर तूप व लाखेचें चूर्ण घालून रोज सकाळी द्यावें. ( ७ ) बृहत् ( मोठ्या ) पंचमुळाच्या काढ्यानें सिद्ध केलेल्या दुधाचें सेचन करावें. ( ८ ) उन्हाळ्यांत तीन दिवसांनी हिवाळ्यांत सात सात दिवसांनीं व बाकीच्या ऋतूंत ५।५ दिवसांनी किंवा मोडलेल्या भागाच्यासंबंधानें ज्या वेळेस योग्य वाटेल त्या वेळेस बंद सोडीत जावा. ( ९ ) हाड मोडलें असून बाहेर व्रण पडला असेल तर तुरट पदार्थांच्या कल्कांत बरेंच तूप व मध हीं एकत्र करून त्याचा व्रणावर लेप द्यावा. आणि वरील प्रमाणें उपचार चालू ठेवावे. ( १० ) व्रणांत लोंबणाऱ्या मांसांत मध आणि तूप एकत्र करून त्या व्रणावर लाऊन तें मांस जागचेजागी जुळवून बसवावें आणि वर पट्टा बांधावा. तें व्रण चांगलें भरत आलें ह्मणजे गव्हला, धायटीचीं फुलें, कायफळ, लोध आणि लाजाळू यांची किंवा नुसतीं धायटीची फुलें व लोध याचें चूर्ण वर दडपावें. फार दिवस भग्नाची चिकित्सा न केल्यामुळें मोकळें राहिलेलें किंवा सांधे निखळलेलें

असें हाड तेल लावून शेकून मऊ करून योग्य कल्पनेनें तें जुळवावें. व वरीलप्रमाणें पट्टा बांधावा. सांधा सोडून दुसरे कोणत्याही प्रदेशांत हाड मोडलें असेल तें हाड वांकडे-तिकडें बांधलें गेल्यामुळें जाड होऊन भरून आलें तर पुन्हां तें युक्तीनें मोडून वरील सांगितलेलें क्रियांची योजना करावी. ( ११ ) वातव्याधीवर सांगितलेले स्नेह भग्नावर नस्य, पान, अनुवासन व अभ्यंग करावें स्नेह शक्तिवर्धक आहे. तसेंच बस्तिकर्म करावें. आणि जेणेंकरून सांध्यांतील मांसाचा किंवा शिरांचा अगर कोणत्याही स्नायूचा पाक होणार नाहीं अशी तजवीज ठेवावी. कारण पाक झाला असतां सांधा बांधला जात नाहीं. वर सांगितल्याप्रमाणें व्यवस्थेशीर चिकित्सा झाल्यास बालावस्थेंतील सांधा एक महिन्यांत जडतो, तरुण अवस्थेंतील सांधा दोन महिन्यांनंतर जडतो. आणि वृद्ध वयांतील सांधा तीन महिन्यानंतर उत्तम जडतो. उर, कंबर पोटऱ्या, मांड्या वगैरे यांतील हाडें मोडली असल्यास रोग्यास फळीवर उताणा निजवून त्याचा मोडलेला अवयव हालूं नये ह्मणून एका मांडीच्या दोन बाजूंनें दोन याचप्रमाणें पोटरीच्या दोन बाजूंस दोन व तळपायाशीं एक अशा ५ खुंट्या मारल्या ह्मणजे मोडलेला अवयव हालत नाहीं. नंतर पट्टा बांधून वरीलप्रमाणें चिकित्सा करावी.

**अस्थिभंगावर पथ्य**—जुन्या साटक्या साळीचा भात, मसुरा, मूग, तांबड्या तुरी यांचें वरण,तूप, तिळाचें, पडवळ,कोंवळे मुळे, वांगी, करटोलीं,भेंड्या, तांदुळजा यांच्या भाज्या, मधुर पदार्थ, साखर, हरिण व ससा यांचे मांस, आंवळकठी, थंड पाणी, करंज्या, शेवया, गव्हाची पोळी, मध, दूध, व पौष्टिक पदार्थ; हे पथ्यास सेवन करावे.

**अस्थिभंगावर अपथ्य**—आंबट, खारट, व तिखट, हे रस, मीठ, मैथुन, ऊन घेणें, व्यायाम करणें, रुक्ष पदार्थ, श्रम, मोठ्यानें बोलणें, स्त्रियांचें अवलोकन, दिवसास निद्रा, रात्रीस जागरण, फिरणें, फार शोक, विरुद्धाशन, वाईट उदक पिणें, विडा, पालेभाज्या, मांसे, इ० वर्ज करावें.

---

## अंडवृद्धि ( अंतर्गल ).

॥ दोषास्रमेदोमूत्रांत्रैः सवृद्धिः सप्तधागदः ॥ मूत्रांत्रजावप्यनिलोद्धतुभेदस्तुकेवलं ॥

**अर्थ**—तो वृद्धिरोग वातादिदोप ३,रक्त १, मेद १,मूत्र १, आणि आंतडें १ यांनीं सात प्रकारचा होतो. मूत्रज आणि अंत्रजवृद्धि हे तरी वायूपासूनच होतात; परंतु त्यांचें कारण मात्र वेगळें आहे तें पुढें सांगितलें आहे.

**कर्मविपाक**—मीनलग्नीं रवी असून त्याजवर मंगळाची दृष्टि अथवा शुक्रयुक्त वृश्चिक लग्न अशा समयीं जन्म होईल, तर वृषणरोग, गुह्यरोग, स्त्री जारि-

णी, दरिद्री इत्यादि होतात. **परिहार**—रवि, शुक्र यांचीं दानें, जप, होम, इत्यादि करावी.

**पूर्वकर्मविपाक**—सुनेच्या ठिकाणीं वाईट कर्म करणारा, वृपणरोगी होतो. तसेंच निरापराधी जे सेवक त्यांचे हस्त, पाय तोडणारा हाही वृपणरोगी होतो. **परिहार**—कृच्छ्राब्द प्रायश्चित्त, रुद्रसंहितेचा दहा सहस्र जप, इत्यादि करावें.

**संप्राप्ति** ( मा. नि. )—कुपित झालेला अधोगमनशील, व शोथ आणि शूल उत्पन्न करणारा वायू कुक्षीमध्यें संचार करीत असतां आडसंधींतून अंडांत येऊन अंडाची वाट ( गोळी ) आणि कोश ह्मणजे वरील त्वचा किंवा पिशवी याच्या वाहणाऱ्या धमन्या ह्मणजे नाड्या यांना दुष्ट करून अंडाची ( दोहोंकडची किंवा एक बाजूची वृद्धि करितो ) त्यास अंडवृद्धि ह्मणतात.

**वातजवृद्धि** ( मा. नि. )—वायूनें भरलेली पिशवी जशी हाताला लागते तसा हा लागतो. रुक्ष, आणि कारणावांचून दुखूं लागतो. याजवर—( १ ) आल्याचा रस मध घालून द्यावा

**पित्तजवृद्धि** ( मा. नि. )—पित्तजवृद्धि पिकलेल्या उंबरासारखा असून त्यांत दाह व पाक असतो व हातास कढत लागतो. याचप्रमाणें रक्तजवृद्धीचीं लक्षणें जाणावी. याजवर—( १ ) पांढरा चंदन, जेष्टीमध, वाळा, कमळ, व निळें कमळ ही दुधांत वांटून वर लेप करावा. ( २ ) पंच वल्कल ह्मणजे वड, पिंपळ, उंबर, पायरी आणि पिंपरी यांच्या साली तुपांत वांटून लेप करावा आणि त्या पांच प्रकारच्या सालींचा थंड हिम करून परिषेक[१] करावा.

**कफजवृद्धि** ( मा. नि. )—तो हातास गार लागतो व त्यास कंडू सुटते, वेदना कमी असते व तो स्निग्ध, कठिण व जड असतो. याजवर—( १ ) पुनर्नवा, एरंडबीज, तीळ आणि जव यांचें चूर्ण कांजींत घालून ऊन करून वृषणावर लेप द्यावा. ( २ ) वेखंड आणि मोहऱ्या यांचा पाण्यांत वांटून सुखोष्ण असा लेप करावा. ( ३ ) दारुहळदीचा काढा गोमूत्र घालून द्यावा. ( ४ ) त्रिकटू व त्रिफळा, यांचा काढा जवखार व सैंधव घालून द्यावा; ह्मणजे त्वरित गुण येतो.

**रक्तजवृद्धि** ( मा. नि. )—काळे फोड असून बाकी लक्षणें पित्तजवृद्धीसारखीं असतात. याजवर—( १ ) वारंवार जळवा लावून रक्त काढावें; व शीतळ असे लेप देऊन न पिकेल अशी तजवीज ठेवावी आणि वारंवार मध व साखरेसहित निशोत्तराचा काढा देत जावा.

**मेदजवृद्धि** ( मा. नि. )—हा कफवृद्धीसारखा मृदु व पिकलेल्या ताडगो-

१—वर सिंचन करावें किंवा फडक्यास लावून वर त्याची घडी बसवावी.

ळ्यासारखा ह्मणजे पिंवळा, आणि वाटोळा, असा असतो. याजवर—( १ ) ज्या ठिकाणीं मेद वाढला असेल, त्या स्थानावर वाफारा देऊन निर्गुडी इत्यादिकांचा लेप करावा.

मूत्रजवृद्धि ( मा. नि. )—मूत कोंडण्याची ज्याला संवय असते त्याला हा विकार होतो. तो चालू लागला असता पाण्यानें भरलेल्या पखालीसारखा डबकडबक हालतो व वाजतो, थोडासा दुखतो, हाताला मऊ लागतो, त्यापासून मुतावयास साफ होत नाही, आणि अंडाची झोळी ह्मणजे पिशवी खालीं लोंबून इकडे, तिकडे हेलकावे वसतात. याजवर—( १ पूर्वी वाफारा देऊन वस्त्रानें गुडाळावें व अंडाच्या शिवणीच्या बाजूस खालचे अंगास साळीचे कुसाएवढ्या शस्त्रानें वेध करावा ह्मणजे टोंचावें. आणि जी अंडवृद्धि अंडाचे गोळ्यापर्यंत गेली नाही तिजवर वातज अंडवृद्धीवरचा उपाय करावा. व डागही हितकारक आहेत. ज्या अंडवृद्धीमध्यें फुगारा, कळ, ताठरपणा, हीं लक्षणें असतात तिची उपेक्षा केली असता अंड दाबलें ह्मणजे त्यातील वायु कों, कों, शब्द करीत वर जातो आणि सोडला ह्मणजे पुन्हां वायु उतरल्यामुळें अंड फुगतें.

आंत्रजवृद्धि ( मा. नि. )—वायु वाढणारे आहाराचें भक्षण केल्यानें, थंड पाण्यांत बुडी मारल्यानें, मलमूत्रादि वेगाचा अवरोध केल्यानें,बळानें, वेग प्रवृत्त केल्यानें, ओझें वाहिल्यानें, अति मार्ग चालल्यानें, वेडेंवांकडे, अंग हालविल्यानें, व दुसऱ्या काही क्षोभ करणाऱ्या कारणानें वायु कुपित होऊन ज्यावेळी लहान आंतड्याचा थोडासा भाग दुमडून त्यास त्याच्या स्थानापासून खाली नेऊन अडसंधींत गाठीसारखी सूज उत्पन्न करितो. मग त्या सुजेची उपेक्षा केली असतां तें आंतडें अंडांत जाऊन अंडाची वृद्धि होते. त्यांत पोटफुगी, मलाचा अवरोध, आणि वेदना ही लक्षणें असतात, त्यावर दाबिलें असता गुरगुर शब्द करीत वायु आंत जातो. व सोडल्यावर पुन्हा फुगवीत वृपणात येतो. ह्या विकारास अंतर्गल असें ह्मणतात. त्याची लक्षणें वातवृद्धीसारखीच असून तो असाध्य आहे. ( १ ) जेथें तो उचवटा आला असेल तेथें डाग द्यावा. ( २ ) स्नेहपान, रेचकें, व अनुवासन बस्ति, यानीं जर अंतरवृद्धि, बरी झाली नाही तर प्रथमतः बस्तिकर्म करून वायूचा मार्ग बंद होण्याकरिता वर सांगितल्याप्रमाणें डाग द्यावा. ( ३ ) करंगळी शेजारचे बोटावरची शीर डागावी. व ज्या अंगास रोग असेल त्याच बाजूच्या करंगळीची व अनामिकेची शीर डागावी, परतु वातव्याधि विशेष असेल तर ही क्रिया करावी.

सर्व वृद्धीवर उपाय—( १ ) त्रिफळ्याचा काढा गोमूत्र घालून द्यावा.

---

१—सुंठ, मिरीं, लसूण, आंबेहळद, हिंग, दालचिनी, व कडु निंबाचा पाला हीं औषधें एकत्र वाटून त्याचा वाफारा द्यावा व सोसल्यास वर लेपही करावा, व तो फडक्यानें बांधून टाकावा.

( २ ) पारा २, गंधक २, व सुवर्णमाक्षिक भस्म ४ तोळे खलून हरीतकीच्या काढ्याच्या ३ भावना देऊन नंतर एरंडेल तेलाची एक भावना द्यावी. आणि वालप्रमाण गोळी करावी. ती गोळी हरीतकीचें चूर्ण ३ मासे व एरंडेल एक तोळा एकत्र करून त्यांत अथवा हरबऱ्याचे काढ्यांत किंवा हिरडा व नवसागर यांचे चूर्णाबरोबर किंवा नुसते एरंडेलात द्यावी. (३) शिरस व वेखंड हें कांजींत वाटून लेप करावा. ( ४ ) पायाचें अंगठ्याचे मधोमध त्वग्भेद होईपर्यंत डाग द्यावा तो असा की उजवीकडे वृद्धि असली तर डावे आंगठ्याला व डावेकडे असली तर उजवे आंगठ्याला. ( ५ ) बाळहिरड्याचें चूर्ण ४ मासे एक तोळा एरंडेलांत द्यावें. (६) ऊन पाण्याची धार वृषणावर धरावी. ( ७ ) चिकण्याचे काढ्यांत एरंडेल घालून द्यावा, तेणेंकरून आध्मान, शूल यांनी युक्त जी अंडवृद्धि तिचा नाश होतो. ( ८ ) रास्ना, गुळवेल, चिकणा, जेष्टीमध, गोखरु, व एरंडमूळ यांचा काढा एरंडेल घालून द्यावा. ( ९ ) चिकण्याचे काढ्यांत एरंडेल घालून पचवून तेल सिद्ध करावें. आणि त्यांत दूध घालून द्यावें. तें आध्मान,शूल,यांनी युक्त अंडवृद्धीचा नाश करितें.

**वर्ध्मरोग** ( भा. प्र. )—वातादिदोषांनीं क्षुभित झालेला वायु बारीक आतड्यांचे अवयव वेगळे वेगळे करून स्वस्थानापासून खाली नेऊन वंक्षण संधींत जातो आणि ग्रंथीसारखी सूज उत्पन्न करितो. त्याला वर्ध्मरोग [वळ] असें ह्मणतात. तो ज्वर, शूल, कृशपणा यांनीं युक्त असतो. यांजवर—( १ ) हिरडे, पिंपळी व सैंधव यांचें चूर्ण एरंडेल तेलांत परतून सेवन करावें. तें अत्यंत वर्ध्मरोग नाशक आहे. ( २ ) वर्ध्मरोग पिकला असता त्याजवर व्रणावरची क्रिया करावी. ( ३ ) बेलमूळ, कंवठीचें मूळ, टेंटूमूळ, रिंगणमूळ, डोरलीमूळ, निशोत्तर, घाणेरा करंज, शेवगा, सुंठ, त्रिवळे, पिंपळी, पिंपळमूळ, मिरी, पंच लवणें, यवक्षार, अजमोदा, कचोरा, यांचें चूर्ण करून तें कांजी, गरम पाणी, किंवा दह्याच्या मठ्याशीं द्यावें. (४) गोखरू, सैंधव, सुंठ, नागरमोथे, देवदार, वावडिंग, व पाषाणभेद, याचें चूर्ण करून त्यांत लोहभस्म घालून तुपाबरोबर सेवन करावें.

**कुरंटकरोग** ( सुश्रुत )—अति चिकट, जड, व आंबट, अशा पदार्थांचे सेवनानें वृद्धि पावलेला असा दोष वंक्षण संधीचेठायीं ग्रंथीरूप सूज उत्पन्न करितो. हा रोग फक्त लहान मुलास होतो ( लहान मुलाचा वळ ) यांजवर—( १ ) गाईचे तुपांत सैंधव घालून सात दिवस द्यावें, व तितकेच दिवस सैंधव चूर्ण तूप व पाणी यांत खलून किंचित् उष्ण करून त्याचा कुरंटकावर वारंवार लेप करीत जावा. ( २ ) तांदुळाचे धुवणांत करंजाचे मूळ उगाळून त्याचा लेप कुरंट व गंडमाळा याजवर द्यावा. ( ३ ) तांदळाचें धुवणांत भारंगमूळ उगाळून त्याचा लेप कुरंटक व गंडमाळा याजवर द्यावा. ( ४ ) एरंडेलात लघुइंद्रावणीचें मूळ उगाळून त्यात गाईचें दूध घालून द्यावें. ( ५ ) वाझ करटोलीचा कांदा पाण्यांत उगाळून लेप करावा. ( ६ ) हरीतकी गोमूत्रांत शिजवून एरंडेलांत भाजावी व तिचें चूर्ण सैंधव घालून कोमट पाण्याशीं द्यावें. तें फार दिवसांच्या कुरंटकाचा नाश करितें.

**अंडवृद्धीवर पथ्य**—रेच, वांति, रक्त काढणें, घाम काढणें, जुन्या तांबड्या साळीचा भात, मूग व तुरी यांचें वरण, गव्हाची पोळी, तूप, शेवगा व पडवळ यांची भाजी, लसूण, तांबूल उन पाणी, ताक, एरंडेल, गांजर, मध, इत्यादी पथ्यास द्यावें.

**अंडवृद्धीवर अपथ्य**—दही, उडीद, पिष्टान्न, कदान्न, जड पदार्थ मल व शुक्र यांचे वेगाचा अवरोध, पाठीवर बसून जाणें, व्यायाम, मैथुन, अति खाणें, मार्ग चालणें, उपास करणें, जंगलांतील पशुपक्षी यांचें मांस इत्यादी वर्ज करावें.

---

## आनाह ( मलबद्धरोग ).

॥ आनाहोद्विविधः प्रोक्त एकः पक्वाशयोद्भवः ॥
॥ आमाशयोद्भवश्चान्यः प्रत्यानाहः स कथ्यते ॥

**अर्थ**—आनाह रोग दोन प्रकारचा—एक पक्वाशयांत होऊन पोट फुगवितो व दुसरा आमाशयांत होतो त्याला प्रत्यानाह असें ह्मणतात.

**आनाहाचें लक्षण** ( मा. नि. )—आम किंवा मळ क्रमानें फार दिवस सांचून वायूनें वारंवार विरुद्ध होऊन स्वमार्गानें चांगले प्रवृत्त होत नाहींत. आमापासून झालेल्या आनाहामध्यें तहान, पडसें, मस्तकाचा दाह, आमाशयांत शूळ, जडपणा, हृदय ताठल्यासारखें होणें, ढेंकराचा प्रतिबंध, कंबर, पाठ, मळ आणि मूत्र यांचा स्तंभ, शूळ, मूर्छा, आणि मळाची वांति, व श्वास हीं लक्षणें होतात. पक्वाशयामध्यें आनाह झाला असतां आळस व रोगोक्त लक्षणें हीं होतात.

**असाध्य लक्षण** ( मा. नि. )—तहानेनें पीडित, क्लेश पावलेला, क्षीण, शूलयुक्त, आणि मळाची वांति होणारा अशा रोग्याला सोडावें.

**आनाहावर उपाय**—( १ ) तेड, हिरडा व पिंपळी यांचें चूर्ण करून व निवडुंगाचे चिकाची भावना द्यावी. नंतर त्याच्या गोळ्या गोमूत्राबरोबर खाल्या असतां आनाहाचा निश्चयानें नाश होतो. ( २ ) दांतीमूळ, गेळफळ, पिंपळी, बीडलोण, कोष्ट, कोळिजन आणि घेरोसा यांचें समभाग चूर्ण गोमूत्र आणि निंबाचा रस यांत शिजवून तें मिश्रण फडक्यास लावून त्याची आंगठ्याप्रमाणें वात करावी आणि तुपांत भिजवून गुदात ठेवावी; ह्म० तिडकेसहित आनाहाचा नाश करील ( ३ ) चित्रक व देवदार यांचा किंवा जाडी पिंपळी व सुंठ यांचा कल्क दुधाबरोबर एक महिना सतत खावा आणि पथ्यानें रहावें; ह्मणजे निश्चयानें आनाहांचा नाश होतो. ( ४ ) हिंग, मध व सैंधव एकत्र करून खलून फडक्यास लावून त्याची वात करून शेकावी. नंतर तुपांत भिजवून गुदात घालावी; तेणेंकरून आनाह व उदावर्त रोग नाश पावतात. ( ५ ) उदावर्त व आनाह यांमध्यें कारण

व कार्यें हीं समान आहेत यास्तव याजवर उदावर्तावरीलही क्रिया करावी. ( ६ ) धणे, बाळहिरडे, हिंग, पुष्करमूळ, सैंधव, बीडलोण, कांचलोण, ओंवा, यवक्षार व वावडिंग हीं सर्व समभाग आणि निशोत्तर २ भाग यांचें वस्त्रगाळ चूर्ण उष्ण पाण्याशीं द्यावें; ह्मणजे आनाह, आठ प्रकारचीं उदरें, व विड्बंध यांचा नाश होतो.

**आनाहावर पथ्य**—रेच, अभ्यंग, घाम काढणें, जुन्या साटक्या तांदुळाचा भात, मुगाचें व तुरीचें वरण, खिरण्या, कोंवळे मुळे, घोळूची भाजी, गव्हाची पोळी, कुळीथ, हिंग, तीळ, काजू, तांदूळजा, एरंडतेल, ऊन किंवा तापवून निवालेलें पाणी तूप इत्यादी पथ्यास द्यावे.

**आनाहावर अपथ्य**—मलमूत्राचे वेग धारण, वमन, जांभळें, काकडी, बटाटे, रताळीं वगैरे कंद, जडान्न, पिठाचे पदार्थ व मलावष्टंभ करणारे पदार्थ, दाळी, अळूं, इ० पदार्थ वर्ज करावे.

---

## आमवात ( आमवायु ).

॥ चत्वारश्चामवाताः स्युर्वातपित्तकफैस्त्रिधा ॥ चतुर्थः सन्निपाताच्च ॥

**अर्थ**—वातामवात, पित्तामवात, कफामवात व सन्निपातामवात असा चार प्रकारचा आमवायु जाणावा.

**कर्मविपाक**—जन्म लग्नापासून अष्टमस्थानी गुरु असेल तर आमवात रोग होतो. **परिहार**—बृहस्पतीची दानें, जप, हवन इत्यादी करावी.

**पूर्वकर्मविपाक**—अग्निविषयी जो कधी यथाविधीनें हवन करीत नाहीं त्यास आमवात रोग होतो. **परिहार**—दहा सहस्र गायत्री जप, तीळ व घृताचें हवन व सुवर्णदान इत्यादी करावीं.

**आमवाताचें कारण** ( मा. नि. )—विरुद्ध आहार आणि विरुद्ध चेष्टा करणारा, मंदाग्नि, मेहनत न करणारा, स्निग्ध अन्न खाऊन लागलीच मेहनत करणारा, अशा पुरुषाचा आम ह्मणजे अन्नरस वायूचे योगानें कफस्थानी जातो. तेथून तो अत्यंत कफानें दूषित होऊन तदनंतर धमनीप्रत शिरतो. नंतर तो अन्नरस ह्मणजे आमवात, कफ व पित्त दूषित करून स्रोतसात भरून टाकतो. तो नानातऱ्हेच्या रंगाचा व अत्यंत बुळबुळीत असा होतो मग ते वातकफ एका कालीं कुपित होऊन त्रिकसंधीत जाऊन शिरतात. आणि शरीर ताठून टाकतात या रोगाला आमवायु किंवा आमवात असें ह्मणतात.

**आमवाताचें सामान्य लक्षण** ( मा. नि. )—अंग मोडून येणें, अन्नद्वेष, तृषा, आळस, जडपणा, ताप, अन्न न जाणें, अंगाला घोदरी, अंग दुखणें, अरोचक, विंचू चावल्यासारखी अतिशय व्यथा होणें, हीं लक्षणें होतात.

**आमवात अत्यंत वाढल्याचीं लक्षणें** ( मा. नि. )—हा आमवायु ज्यावेळेस वाढतो त्यावेळेस सर्व रोगामध्यें दुःखदायक होतो. हात, पाय, मस्तक, घोटें, त्रिक, गुडघे, माड्या, यांच्या संधीमध्यें वेदनायुक्त सूज करितो. आणि ज्या ज्या ठिकाणीं आम जातो त्या त्या ठिकाणी विचवानें नांगी मारल्यासारखी वेदना होते. हा रोग अग्निमांद्य, तोंडाला पाणी सुटणें, अन्नद्वेष, जडपणा, उत्साह नाहींसा होणें, तोंड फिक्कें पडणें, दाह व पुष्कळ मुतावयास होणें, कुशीमध्यें कठिणपणा, शूल, दिवसांस निद्रा, रात्री जागरण, तृषा, ओकारी, भ्रम, मूर्छा, उर दुखणें, मळशुद्धि न होणें, जाड्य, आंतड्यांत कुरकुर शब्द, आणि पोट फुगणें व अन्य उपद्रव ह्मणजे कलायखंजादिक वातरोग ह्यांस करितो.

**वातामवात** ( सुश्रुत )—यांत विशेषेंकरून शूळ जास्ती होतो.

**पित्तामवात** ( सुश्रुत )—यांत दाह व आरक्तवर्ण होतो.

**कफामवात** ( सुश्रुत )—शीतळपणा, जडपणा व कंडूयुक्त असतो.

**सन्निपातामवात** ( सुश्रुत )—यांत तिन्ही दोषांचीं मिश्र लक्षणें होतात.

**साध्यासाध्य विचार** ( मा. नि. )—एक दोषांनीं साध्य, द्विदोषांचा कष्टसाध्य आणि सर्व देहावर सूज पसरली असता किंवा तिन्ही दोषाचीं लक्षणें झाली असतां असाध्य जाणावा.

**सर्व प्रकारचे आमवातांवर उपाय**—( १ ) वेखंड, वडिशेप, वायवर्ण्याची साल, पुनर्नवा, देवदार, कचोरा, गोखरू, प्रसारणी ( चादवेल ), सुंठ, थोर ऐरण, मुंडी, शतावरी व गेळफळ हे सर्व पदार्थ समभाग घेऊन कांजींत बारीक वांटून ज्या ठिकाणी कळा असतील त्या ठिकाणी लेप करावा. व त्याजवर विड्याची वगैरे पानें बसवून फडकें बांधावें; ह्मणजे कष्टसाध्य आमवात असला तरी त्याचा नाश होतो, यांत संशय नाहीं. (२) सुंठ आणि गोखरू यांचा काढा नित्य प्रातःकाळीं सेवन केला असतां आमवात व कटिशूळ याचा नाश करतो. आणि हा पाचकही आहे. ( ३ ) पारा ४ भाग, गंधक ३ भाग आणि सर्वांचा सोळावा भाग बचनाग घेऊन या सर्वांचा चित्रकाच्या काढ्यात खल करून वालप्रमाण गोळी द्यावी; ह्मणजे अपस्मार, उन्माद, सर्वांगवात, एकांगवात, आमवात, हनुस्तंभ, इ० सर्व प्रकारचे वातरोगांचा हा वातविध्वंसनरस नाश करितो यात संशय नाहीं. ( ४ ) रास्ना, एरंडमूळ, शतावरी, कोरांटा, धमासा, गुळवेल, आडुळसा, देवदार, अतिविष, हरीतकी, नागरमोथे, कचोरा, व सुठ याचा काढा, कंबर, मांड्या, माकडहाड, पोटऱ्या, पायांचे घोटे व गुडघे या ठिकाणचें दारुण आमवाताचा नाश करितो यात संशय नाही. ( ५ ) त्रिबवे, तीळ व हिरडेदळ, याचें चूर्ण गुळाबरोबर खावें; अथवा सुठगूळ खावा. (६) पारा, गंधक, त्रिफळा, चित्रक व गुग्गुळ हे क्रमवृद्धीनें घेऊन एरंडाचे पानाचे अथवा मुळाचे रसांत खलून गोळी करावी ती बलाबल पाहून एरंडेलाशी द्यावी. वर

ऊन पाणी प्यावें, आणि दूध व मूग वर्ज करून पथ्य द्यावें; ह्म० अवश्य आमवाताचा नाश होतो. ( ७ ) रास्ना ३ भाग व एरंडमूळ, आडूळसा, धमासा, कचोरा, दारुहळद, चिकण्याचें मूळ, नागरमोथे, सुंठ, अतिविष, वाळहिरडे, गोखरू, बाहवा, बडिशेप, धने, आस्कंद, पुनर्नवा, गुळवेल, पिंपळी, वरधारा, शतावरी, वेखंड, कोरांटा, चवक, रिंगणी व डोरली हीं सर्व एकेक भाग घेऊन त्यांचा अष्टमांश काढा करून ध्यावा. पिण्याचे समयीं सुंठीचें चूर्ण आंत घालून प्यावा, ह्म० सर्व वातरोग विशेषेंकरून आमवात, पक्षाघात, आर्दितवायु, कंपवायु, कुब्जत्ववायु, संधिगतवायु व जानु, जंघा व अस्थि यांतील वायु, गृध्रसी, हनुग्रह, ऊरुस्तंभ, वातरक्त, विश्वाची, कोष्टुशीर्ष, हृद्रोग, मूळव्याध, योनिरोग, शुक्ररोग, मेढ्रगतवात, वांझपणा इतक्यांवर प्रशस्त आहे. स्त्रियास यासारखें लाभ देणारें दुसरें औषध नाहीं. हा महारास्ना नामें काढा प्रथम ब्रह्मदेवानें उत्पन्न केला आहे असें जाणावें. ( ८ ) रक्त्याबोळ व हिंगूळ ही दोन्ही समभाग घेऊन गाईचे दुधांत खलून वालप्रमाण गोळी एरंडेलांत द्यावी. ( ९ ) काडेचिराईताचा हिम करून त्यांत आरतीकापूर, शिलाजीत व मध थोडे थोडे घालून ७ दिवस द्यावा, ह्म० आमवात व गरमीचे योगानें धरलेले सांधे दुरुस्त होतात. ( १० ) एक मोठी रोटीसुपारी चांगली घेऊन रात्रौ पाण्यांत भिजत घालावी, पहाटेस पाट्यावर बारीक वांटून जुन्या चिंचेच्या पाण्यांत केलेल्या घट्ट बलकामध्यें ती वांटलेली सुपारी ठेवून तें तसेंच गिळावें. आणि वरती वारंवार ऊन पाण्याचा घोट घेत जावा. ह्मणजे उत्तम प्रकारचे ढाळ होऊन सर्व शरीराचे संधीचे वायू दूर होतात यांत संशय नाहीं. ( ११ ) पांच तोळे खड्या हिंगूळ घेऊन पांढरे स्वच्छ बारीक वस्त्रांत बांधावा आणि अर्धशेर गाईचे दुधांत दोलायंत्रामध्यें बांधून तें दूध चांगलें खरपूस तापवून खालीं उतरून दूध अमळ गरम आहे तोंच प्राशन करीत जावा. याप्रमाणें चौदा किंवा एकवीस दिवस सेवन ठेविलें असतां संधिरोगापासून मुक्त होतो. प्रत्येक वेळीं हिंगूळ तोच घेत जावा, दूध मात्र नवीन घेत जावें. पथ्य—दूध, साखर, तूप, पोळी, बाकी वर्ज. ( १२ ) दशमुळाचा काढा एरंडेल घालून द्यावा.

**आमवातावर पथ्य**—रेच, घाम काढणें, लंघन, स्नेहपान, जुन्या साटक्या साळीचा भात, तुरीचें वरण, ताक, कुळीथ, ससा, हरीण यांचें मांस, लसूण, वांगें, पडवळ, शेवगा, कारलीं, चुका, व कोंवळा मुळा याच्या भाज्या, अमसूल, निंबू, ऊन पाणी, मद्य, एरंडेल, गोमूत्र, तिखट पदार्थ. व तूप इ० पथ्यास द्यावें.

**आमवातावर अपथ्य**—दहीं, मासे, गूळ, ह्मशीचें दूध, उडीद, वाईट पाणी, पूर्वेचा वारा, विरुद्धान्न, मलमूत्रांचा वेगरोध, जाग्रण, विषमाशन, जड व कफकारक पदार्थ क्षार, मूग, व थंड पाणी हे पदार्थ वर्ज करावे.

---

## आम्लपित्त.

॥ आम्लपित्तंत्रिधाप्रोक्तंवातेनश्लेष्मणातथा ॥ तृतीयंश्लेष्मवाताभ्याम् ॥

अर्थ—वातज, कफज, व कफवातज असें तीन प्रकारचें आम्लपित्त जाणावें.

**आम्लपित्ताचें कारण** ( मा नि. )—विरुद्ध ( क्षीरमत्स्यादि ) आंबलेलें अन्न, आंबट, दाह करणारें, पित्त वाढविणारें असें अन्नपानाचें सेवन केल्यानें वर्षादि ऋतूंचेठायीं स्वकारणांनीं सांचलेलें पित्त नासतें त्याला आम्लपित्त ह्मणतात.

**आम्लपित्ताचें लक्षण** ( मा. नि. )—अन्न न पचणें, आयासावांचून श्रम होणें, मळमळ सुटणें, कडू व आंबट ढेंकर येणें, अंग जड होणें, घशांत जळती लागणें, व व अन्नद्वेष होणें, हीं लक्षणें होतात. आम्लपित्त एक अधोगत व दुसरें ऊर्ध्वगत असें दोन प्रकारचें आहे.

**अधोगत आम्लपित्त** ( मा. नि. )—आम्लपित्त अधोगत झालें असतां तृषा दाह, मोह, [ इंद्रिय मनोमोह ] मूर्छा, घेरी, मळमळ, अंगाला गांधी, अग्निमांद्य, कानाला घाम, अंगास पिवळटपणा, ही लक्षणें होऊन गुदावाटें काळें, तांबडें, दुर्गंधी व अनेक वर्णांचें पित्त पडतें

**ऊर्ध्वगत आम्लपित्त** ( मा. नि. )—ऊर्ध्वगत आम्लपित्तानें हिरवें, पिंवळें, काळें,निळें, तांबूस,लाल,अत्यंत आंबट,मांस धुतलेल्या पाण्यासारखें,अत्यंत बुळबुळीत व कफमिश्रित, स्वच्छ, खारट, तुरट. वगैरे रसयुक्त असें पित्त मुखावाटें वांतिरूपानें पडतें. कधीं कधी जेवलेलें अन्न विदग्धावस्थेंत आलें असता अथवा जेवणापूर्वी कडू, आंबट अशी ओकारी होते, व ढेंकरही तसाच येतो, व गळा, कुशी व ऊर हीं जळजळतात व डोकें दुखतें.

**वातज आम्लपित्त** ( मा. नि. )—कंप, बडबड, मूर्छा, अंगाला मुंग्या येणें, अंगग्लानि, पोट दुखणें, डोळ्यापुढें अंधेरी येणें, भ्रांति पडणे, इंद्रिय मनोमोह, रोमांच उठणें, ही लक्षणें होतात.

**कफयुक्त आम्लपित्त** ( मा. नि. )—कफाचा वेडका पडणें, शरीरास अत्यंत जडपणा, अन्नद्वेष, थंडी वाजणें, अंगाला ग्लानि, अग्निमांद्य, ओकारी, तोंडास. चिकटपणा, कंडू, बलनाश, आणि झोंप येणें, हीं लक्षणें होतात.

**कफवातयुक्त आम्लपित्त** ( मा. नि. )—हें दोहों दोषांच्या लक्षणांनीं मिश्र असतें.

**कफपित्तज आम्लपित्त** ('मा. नि. )—भ्रम, मूर्छा, अरुचि, वांति, आळस कपाळ दुखणें, तोंडाला पाणी सुटणें, तोंड गोड, हातापायांची आग, अंगाला कड-

१—तेलकट व तळलेले पदार्थ मजीं वगैरे.

की, अन्नद्वेष, ज्वर, कंडू, गांधी, शतशः पिटिका आणि अविपाकादि अनेक उपद्रव, ही लक्षणें कफपित्तापासून होतात.

साध्यासाध्यविचार (मा.नि.)—हा आम्लपित्त रोग नवा असला तर यत्नानें साध्य होतो; फार दिवसाचा असला तर कष्टसाध्य होतो; आणि पथ्यानें वागणाऱ्या मनुष्याचा रोग फार दिवसाचा जरी असला तरी यत्नानें साध्य होतो.

सूचना—आम्लपित्त वातसंबंधी आहे, अथवा कफसंबंधी आहे किंवा केवळ कफयुक्त आहे असें वातादिकांच्या लक्षणांनीं बुद्धिमान् वैद्यानें जाणावें. कारण हे आम्लपित महामोहक आहे. याचें ज्ञान फार दुर्लभ आहे असें जाणावें. ऊर्ध्वगत आम्लपित्तावर वांतिरोगाचा भास होतो, आणि अधोगतावर अतिसाराचा भास होतो. यामुळें अति सूक्ष्मरीतीनें परीक्षा करावी.

सर्व प्रकारचे आम्लपित्तावर उपाय—( १ )आम्लपित्ताला प्रथम कडू पडवळ व कडू निंब यांचे काढ्याबरोबर गेळफळाचे आंतील बियानें चूर्ण द्यावें. नागली वांति झाल्यानंतर रेच होण्याकरितां मधांत निशोत्तरानें चूर्ण द्यावें; नंतर स्नेहपान ह्मणजे नुस्तें तूप पिण्यास द्यावें; नंतर अनुवासनबस्ति द्यावा. याप्रमाणें क्रमानें चांगलें शोधन करूनही जर दोषशांति झाली नाहीं तर थंड उपचार करून रक्त काढवावें. ( २ ) कडू रसानी युक्त अन्न व पान द्यावें. ( ३ ) साखर व मध घालून साळीच्या लाह्या भक्षण कराव्या. ( ४ ) जव, गहू, यांचे पदार्थ व लाह्यांचें पीठ साखरेनें मिश्र करून सेवन करावें. असें भोजन केल्यानंतर पोटांत अन्न नासून आंबट ढेंकर येऊं लागल्यास कोमट पाण्यांत सैंधव किंवा गेळफळाचें चूर्ण घालून वांति करवावी.( ५ )जटामासी, गुळवेल, व थोररिंगणी, यांचा काढा मध घालून द्यावा, ह्मणजे आम्लपित्त, श्वास, कास, ज्वर आणि ओकारी यांचा नाश होतो. ( ६ ) पिपळीचें चूर्ण मधांत द्यावें ( ७ ) सुंठ, मिरीं, पिपळी, त्रिफळा, नागरमोथें, वावडिंग, वेलदोडे, व तमालपत्र, हीं सर्व समभाग घेऊन सर्वांचे बरोबर लवंगा घेऊन जें चूर्ण होईल त्यांत त्याचे दुप्पट तेंडोंचें चूर्ण घेऊन सगळे चूर्णाबरोबर साखर घेऊन सर्व एकत्र करून रावलेल्या मडक्यांत ठेवून भोजनाचे पूर्वीं आठ मासे प्रमाणानें खाऊन वरती थंड पाणी प्यावें किंवा नारळाचें पाणी प्यावें. आहार यथेष्ट करावा. दुधभात जेवावा, ह्मणजे आम्लपित्त, शूल, मूळव्याध, प्रमेह, मूत्राघात व मूत्राश्मरी, यांचा नाश होतो. याला अविपत्यकर चूर्ण म्हणतात हें अगस्तिमुनीनें सांगितलें आहे. ( ८ ) काडलेले सातु, आडूळशाची पानें, ओले आंवळे ते न मिळाल्यास आंवळकठी, दालचिनी, तमालपत्र, वेलदोडे याचा काढा मध घालून द्यावा; ह्मणजे हटकून आम्लपित्ताला शमवील. ( ९ ) कोहळ्याचा रस ४० तोळे, गाईचें दूध ४० तोळे व आवळकठीचें चूर्ण ३२ तोळे, हीं सर्व एकत्र करून मंदाग्नीनें पचन करावें. गोळा होईतोंपर्यंत पाक करावा आणि आंत ३२ तोळे साखर घालावी व एकजागीं करून बरणींत घालून ठेवावें. नंतर त्यांतील औषध दोन तोळे प्रातःकाळीं

व दोन तोळे तिसरा प्रहरीं असें दुवक्त सेवन करीत जावें; ह्मणजे रक्तपित्त, आम्लपित्त, दाह, तृषा, आणि कामला यांचा नाश होतो. ( १० ) मनुका, हरीतकी, पिपळी, धमासा व खडीसाखर, हीं सर्व औषधें समभाग घेऊन त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून तें मधांत द्यावें; ह्मणजे कफ, गळ्यांतील जळजळ, आम्लपित्त, तृषा, आणि ज्वर यांचा नाश होतो. ( ११ ) कडू पडवळ, कडू निंब, व गुळवेल यांचा काढा मध घालून द्यावा; ह्मणजे घोर दाहयुक्त आम्लपित्त आणि अनेक प्रकारचें रक्तपित्त यांचा तात्काळ नाश होतो. ( १२ ) कफपित्तनाशक उपचार करावे. ( १३ ) गूळ आणि कोहळा किंवा खडीसाखर आणि आंवळकठी द्यावी. ( १४ ) ज्या आम्लपित्तरोग्यास आपलें शरीर जळतेंच की काय असें वाटतें, ह्मणजे इतका दाह होतो, त्यावेळेस त्याच्या दोषाची शांति रेचक किंवा वमन या खेरीज अन्य कोणत्याही उपायानें होणार नाही. ( १५ ) रिंगणी, गुळवेल, व आडूळसा, यांचा काढा मध घालून द्यावा, तो दमा, खोकला, वांति आणि ज्वर यांनी युक्त आम्लपित्ताचा नाश करितो. ( १६ ) सूतशेखर अनुपान योजून द्यावा. ( १७ ) पानपिंपळीचे दसपट पाणी घालून चतुर्थांश काढा करून त्या समान तूप घालून सिद्ध करावें. हें नारायण घृत आम्लपित्तनाशनाविषयी श्रेष्ठ आहे. ( १८ ) गूळ, दूध व पिंपळी यांचे कल्कांत सिद्ध केलेलें तूप द्यावें. ( १९ ) कडू पडवळ, आडूळसा, गुळवेल व माका याचा काढा मधाशी द्यावा हा फार उत्तम आहे. ( २० ) गोरखचिंचेचा मगज ९, शेवग्याचा रस ४, माक्याचा रस ४ कवठाचा गीर ८ व आल्याचा रस १८ भाग या सर्वांचा एकत्र खल करून बोराच्या आठोळीप्रमाणें गोळ्या करून ठेवाव्या. नित्य एक गोळी आल्याचा रस व खडीसाखर, यांत अथवा नारळाच्या पाण्यांत द्यावी. ( २१ ) काडे चिराईत, लोणी, त्रिफळा, कडू पडवळ, आडूळसा, गुळवेल, पित्तपापडा व माका यांचा काढा मध घालून द्यावा. ( २२ ) मोरचुताची लाही किंवा भस्म अर्धगुंजप्रमाण मधाशी सात दिवस द्यावें. (२३) मुळ्याचा रस, माक्याचा रस, मध व वावडिंगाचें चूर्ण आणि खडीसाखर हीं प्रत्येक सहा मासे एकत्र करून खावी; ह्मणजे मोठ्याही दुर्घट आम्लपित्ताचा समूळ नाश होतो. ( २४ ) गोरखचिंचेंतील मगज आमसूल आणि चिंच हे पदार्थ समभाग घेऊन थोड्या पाण्यांत काही वेळ भिजत घालावे नंतर ते हातानें चांगले कवळून कल्हईचे पात्रांत तयार करून ठेवावें. आम्लपित्त रोगी झोंपेंत असतां झोंप न मोडता त्याचे उघडलेले तोंडात युक्तीनें दोन तीन थेंब टाकीत जावे. याप्रमाणें तीन दिवस किंवा तीन रात्र केलें असतां आम्लपित्त व त्यापासून होणारी वांती हृदयांतील दाह व जळती तोंडांस पाणी सुटतें तें, या सर्वांचा खात्रीनें नाश होऊन अन्नपचन होतें व आम्लपित्ताचा नाश होतो. ( २५ ) काडेचिराईत व माका यांचा काढा मध घालून द्यावा.

**आम्लपित्तावर पथ्य**—वमन रेचन, जुन्या साटक्या साळीचा भात. मुगाचें वरण, गव्हाची पोळी, यव, तापवून निवालेलें पाणी, साखर, करटोली, कारलीं,

वेताचे कोंब, ...कवत, पडवळ, पोकळा व तांदुळजा यांच्या भाज्या, आंवळे, पिक-लेलें कवठ, डाळिंब, मनुका, खजूर, गाईचें दूध, तुप, मध, महाळुंग, द्राक्षें, निंबू आंवळकठी, मधुर अन्न व मधुर फळें इ० सेवन करावी.

**आम्लपित्तावर अपथ्य**—वांतीचा वेग धारण, तेलकट, आंबट, खारट, तिखट असे पदार्थ, जडान्न, दही, पांढऱ्या तुरी, मद्य, कुळीथ, शेळीचें दूध, तीळ, उडीद, उन घेणें, मीठ, केळफूल, अति उष्ण पदार्थ इ० वर्ज करावें.

---

## उचकी. ( हिक्का )

॥ अन्नजांयमलांक्षुद्रांगंभीरांमहतींतथा ॥ वायुःकफेनानुगतः पंचहिक्काः करोतिहि ॥

**अर्थ**—वायु कफानें युक्त झाला ह्मणजे अन्नजा, यमला, क्षुद्रा, गंभीरा आणि महती अशा पांच प्रकारच्या उचक्या उत्पन्न करितो.

**कर्मविपाक**—ज्या ग्रहाच्या योगानें कास श्वास रोग प्राप्त होतात त्याच ग्रहाच्या योगानें उचकीरोग होतो. **परिहार**—ही श्वासकासोक्त जाणावा.

**पूर्वकर्मविपाक**—जो स्नान केल्यावांचून, जप केल्यावाचून अथवा वैश्वदेव केल्यावांचून जेवतो त्याला हिक्कारोग होतो. **परिहार**—कृच्छ्र चांद्रायणें, तामग्रीवणां या सूक्ताचा जप, सुवर्णदान, अन्नदान इ० करावीं.

**उचकीचें कारण** ( मा. नि. )—विदाही, जड, विष्टंभी, पोट फुगविणारीं. रुक्ष व पडसें आणणारीं अशी भोजनें केल्यानें, थंड पाणी प्यायल्यानें, थंड अन्नाचें भक्षण, थंड पाण्याचें स्नान, नाकातोंडांत धूर शिरल्यानें, तसाच ऊन, वारा, आयास, ओझें उचलणें, अति मार्गगमन, मलादिकाचा वेग धारण, या कारणांनीं उचकी, श्वास, खोकला हीं उत्पन्न होतात. त्याचप्रमाणें पूर्वरूप, संख्या, स्वभाव व स्थान ही श्वासाप्रमाणेंच असतात.

**उचकीचें लक्षण** [ मा. नि. ]—हृदयस्थ वायु कंठदेशस्थ वायूला मिळून यकृत, प्लीहा आणि आंतडीं हीं तोंडापर्यंत ओढतोच की काय असा वर येतो; ह्मणजे वारंवार विलक्षण शब्दयुक्त मुखावाटें बाहेर निघतो. हा वायुरोगाचे संबंधानें त्वरित प्राणनाश करितो.

**अन्नजा** [ मा. नि. ]—पाणी आणि अन्न ही अत्यंत सेवन केली असतां वायु अकस्मात पीडित होऊन उर्ध्वगति होऊन जी उचकी करितो ती.

**अन्नजा** (वाग्भट)—रुक्ष ह्मणजे निस्तेज ज्यांत कस नाहीं तें, तीक्ष्ण, ओबडधोबड, असात्म्य, अशी अन्नें व पानें घाईनें व अति सेवन केल्यानें वायु पीडित

होऊन उचकी उत्पन्न करितो, ईंत वेदना नसते, इचा शब्द मंद असून शिंकेबरोबर येते. व ती सात्म्य[१] अशा अन्नपानानें शांत होते. **उपाय**—( १ ) कुटकीचें चूर्ण ३ मासेपर्यंत मधांत द्यावें. ( २ ) हाळद, मिरीं, द्राक्षें ( मनुका ) गूळ, रास्ना, पिंपळी व कचोरा यांचे चूर्णाचा तिळाचे तेलांत लेह करून द्यावा; तो श्वास व प्राणहारक अशी उचकी यांचा नाश करितो.

**यमला** ( मा. नि. )—जी हिक्का फार वेळानें एकदम दोन वेगांनीं येते, आणि डोकें व मान यांस कांपविते ती.

**यमला लक्षण** (वाग्भट)—आहाराचा पाक होऊं लागण्याच्या सुमारास बऱ्याच वेळानें दुहेरी वेगानें जी उचकी उत्पन्न होते व पाक झाल्यावर वाढते, तिला यमला, वेगणी व परिणामवती असें ह्मणतात. हिच्यांत मान व डोकें यांस कंप होतो, पोट फुगतें, तहान फार लागते, मनुष्य बडबतो, त्यास वांति व अतिसार होतात, डोळे पाण्यानें भरून येतात, व जांभया येतात. **उपाय**—( १ ) हिंग, पादेलोण, जिरें, बीडलोण, पोखरमूळ, चित्रक व काकडशिंगी यांणीं सिद्ध केलेली कांजी श्वास व उचकी यांजवर द्यावी.

**क्षुद्रा** ( मा. नि. )—ही उचकी फार उशिरानें आणि मंद वेगानें येते, व जत्रुमूल ह्मणजे मानेच्या शिरापासून उत्पन्न होते ती.

**क्षुद्राल०** ( वाग्भट )—श्रम केल्यानें वायु किंचित् कुपित होऊन ही उचकी जत्रुमूळापासून उत्पन्न होते. हिचा वेग अल्प असतो, वेदना नसते, श्रम केले ह्मणजे वाढते व भोजनांनी कमी होते. **उपाय**—( १ ) आंवळकठी, पिंपळी व सुंठ यांचा काढा साखर घालून द्यावा, तो प्राणहारक उचकी असली तरी तिचा नाश करितो.

**गंभीरा** ( मा. नि. )—जी हिक्का नाभीपासून प्रवृत्त होऊन गंभीर शब्द करणारी, तहान, ज्वर, अनेक उपद्रवयुक्त व भयंकर होते ती.

**गंभीरालक्षण** ( वाग्भट )—पक्वाशयापासून किंवा नाभीपासून महती उचकीप्रमाणेंच जी उत्पन्न होते ती. इचीं लक्षणें महतीप्रमाणेंच असतात. आणि हीत जांभया येतात, व मनुष्य हातपाय ताणून आळस देतो. तिच्या मागून गंभीर असा शब्द होतो. **उपाय**—( १ ) कडू पडवळीच्या अंगरसांत किंवा काढ्यांत मध व सुवर्णभस्म दिलें असतां अति कठिण, अशा पांच प्रकारच्या उचक्याचा नाश होतो. (२) लाह्यांचें पीठ सैंधव घालून द्यावें. (३) शेळीचें दूध तापवून त्यात सुंठीचें चूर्ण घालून द्यावें. ( ४ ) माहाळूंगाचें रसांत सुंठ, आंवळकठी

१—पथ्यकारक

व पिंपळी यांचें चूर्ण व मध घालून चाटण करून द्यावें. ( ९ ) मोरांच्या पिसांची राख व पिंपळीचें चूर्णही मधाशी वारंवार चाटीत गेलें असता मोठी प्रबळ उचकी, श्वास व फार कठिण अशी ओकारी यांचा नाश होतो.

**महती** ( मा. नि. )—मर्मे ह्मणजे मुख्यत्वेंकरून नाभी, बस्ति, इत्यादि मर्मे यांस पीडा करणारी, सर्वकाळ प्रवृत्त होते. आणि सर्व गात्रें कंपित होतात तिला महती ह्मणजे महाहिक्का म्हणतात.

**महती** ( वाग्भट )—ज्यास महती उचकी झाली आहे त्याच्या भिवया व आंख ताठतात, डोळे पाण्यानें भरून चंचल होतात. सर्व शरीर स्तब्ध होतें, वाणी, स्मृति व ज्ञान ही नाहीशी होतात. अन्नमार्गाचा अवरोध होतो, मर्मास आघात झाल्यासारखें होतें, पाठीकडून मनुष्य वांकतो, व तोंडास कोरड पडते. हिला महामूला, महाशब्दा ( हिचा शब्द मोठा असतो ) व महावेगा ( वेग मोठा असतो ) व महाबला अशीं इच्या लक्षणावरून नावें होतात. उपाय—( १ ) त्रिकटू, धमासा, कायफळ, ओंवा, पुष्करमूळ, व काकड शिंगी, याचे चूर्णाचें मधांत चाटण करून द्यावें; ह्मणजे उचकी, खोकला, कफ व श्वास यांचा नाश होतो. ( २ ) सैंधव पाण्यांत मिळवून नस्य द्यावें; ह्मणजे तें संपूर्ण प्रकारच्या उचक्याचा नाश करितें.

**असाध्यलक्षण** ( मा. नि )—उचकीनें ज्याचा देह ताणल्यासारखा होतो, दृष्टि ऊर्ध्व होते, आणि मोह पावतो तो, क्षीण होतो तो, अन्नद्वेषी, आणि वारंवार उचकी देतो तो, हे दोघे उचकीचे रोगी आणि ज्यास गंभीरा, व महतीहिक्का झाली आहे ते दोघे वैद्यानें सोडावे. तसेंच ज्याचे दोष अत्यंत साचले आहेत व अन्न तुटल्यानें जो कृश झाला आहे व अनेक व्याधीनी ज्याचा देह क्षीण झाला आहे व वृद्ध मनुष्य, अति मैथुन करणारा, अशा पुरुषास यापैकी जी उचकी उत्पन्न होईल ती तात्काळ त्याचें जीवित हरण करील. त्यात अन्नजा व क्षुद्रा ह्या साध्य, महती व गंभीरा असाध्य, आणि यमला सर्व लक्षणानी युक्त असली तर असाध्य. सर्व रोग मारक आहेत खरे तरी उचकी व श्वास जशी आपली क्रिया फारच जलद करितात तसे इतर कोणतेही करीत नाहींत, कारण उचकी व श्वास हे प्राण सोडतेवेळी मनुष्याच्या शरीरात बिऱ्हाड करूनच असतात ह्मणजे श्वास व उचकी झाल्याशिवाय बहुधा प्राण जात नाही.

**यमिकेचें असाध्यलक्षण** ( मा. नि. )—बडबड, शूळ, मोह, तृषा, या लक्षणांनीं युक्त झालेली यमिका तात्काळ प्राणहरण करिते.

**यमिकेचें साध्यलक्षण** ( मा. नि. )—बलवान्, प्रसन्न मनाचा, ज्याची धातू आणि इंद्रियें स्थिर आहेत अशा पुरुषाची यमिका साध्य जाणावी.

**सर्व प्रकारच्या उचक्यांवर उपाय**--( १ ) मिरीं व जवखार यांचें चूर्ण उन पाण्याशीं द्यावें. ( २ ) भारंगमूळ व सुंठ यांचें चूर्ण उन पाण्याशी द्यावें. ( ३ ) पित्तकफात्मक श्वास व उचकी यांजवर वंशलोचन, पिपळी, जेष्ठीमध, सुंठ व तूप हे एकत्र करून त्यांची गोळी बलाबल पाहून द्यावी. ( ४ ) ज्याचा कफ वाढला आहे त्यास आस्कंदाची राख मधांत द्यावी म्हणजे कफ व उचकीचा नाश होतो. ( ५ ) तेजवळादि घृत द्यावें. ( ६ ) सुंठ, भारंगमूळ व पादेलोण यांचें चूर्ण उन पाण्याशीं द्यावें. ( ७ ) सुंठ ६, पिंपळी ५, मिरें ४, विड्याचीं पानें ३, दालचिनी २, व वेलदोडा १ याप्रमाणें भाग घेऊन चूर्ण करून बरोबरीनें साखर घालून सेवन केलें असता मूळव्याध, अग्निमांद्य,खोकला,अरुचि,श्वास कंठरोग, हृद्रोग व उचकी यांचा नाश होतो. ( ८ ) कंवठीचा किंवा आंवळ्याचा अंगरस मध व पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा; ह्मणजे श्वास व उचकी यांचा नाश होतो. ( ९ ) खजूर [ खारीक ] पिपळी, मनुका, व साखर हीं समभाग घेऊन त्यांत मध व तूप घालून लेह करावा तो श्वास व उचकी यांचा नाश करितो. [ १० ] निर्गुडीचें बी व पिपळी, या दोन औषधाचा काढा करून त्यात भाजलेला हिंग मिळवून प्यालें असता पांच प्रकारची उचकी दूर होते. [ ११ ] महाळुंगाचे रसात मध व संचळ घालून द्यावें. [ १२ ] धमाशाचा काढा मध घालून द्यावा. [ १३ ] सुवर्णमाक्षिक भस्म मध व तूप यांत देणें. [ १४ ] सुंठ शेळीच्या दुधांत शिजवून तें दूध प्राशन करावें. [ १५ ] सुंठ, पिंपळी, व आंवळकठी यांचें चूर्ण मधावरोबर चाटावें. ( १६ ) सुंठ, बाळहिरडे व पिपळी याचें चूर्ण मध व साखर यांशी द्यावें. [ १७ ] सुंठ, साखर, भारंगमूळ, व पादेलोण यांचे चूर्ण द्यावें; ह्मणजे श्वास व उचकी याचा नाश होतो. [ १८ ] आश्चर्यकारक गोष्टी सांगाव्या. [ १९ ] पिंपळमूळ, जेष्ठीमध, गूळ, आणि गाईचें शेण व घोड्याची लीद यांचा दाट काढा करून त्यात. मध व तूप घालून वारंवार चाटला असतां उचकी, अंगस्फुरण, व खोकला याचा नाश होतो. [ २० ] आलित्याचें नस्य द्यावें. [२१] उडीद व हाळद याचें चूर्ण व ताग हे निर्धूम अग्नीवर घालून त्याचा धूर प्राशन केला असना किंवा चिलमीत घालून ओढलें असता श्वास, ऊर्ध्ववात, खोकला, गलरोग आणि सर्व प्रकारच्या उचक्या यांचा त्वरित नाश होतो. [२२] सुवर्ण, मोती ताम्र, व लोहकांत या तिन्हींचें भस्म, दोन गुंजा, माहाळुंगाचा रस, मध व पादेलोण, यांच्यावरोबर एक वेळ भक्षण केलें असता शंभर उचक्याचा नाश होईल. मग पांच प्रकारचे उचक्यांची काय कथा.

**उचकीवर पथ्य**--वमन, रेचन घाम काढणें, नस्य, धूमपान, निद्रा, जुन्या साटक्या साळीचा भात, तुरीचें वरण, कुळीथ, यव, गव्हाची पोळी, हरण, ससा यांचे मांस, उन पाणी, पिकलेलें कवठ, लसून, पडवळ, कोंवळे मुळे यांच्या भाज्या, मद्य, भिती, व क्रोध, उत्पन्न करणें मुख्य उदानवायु मोकळा होऊन ढेंकर सुखानें येतील. असा उपचार करावा, वाहतें पाणी, इ० पथ्यें जाणावी.

**उचंकीं अपथ्य**--मल, मूत्र, वायु, ढकर, व खोकला यांच्या वेगाचें धारण, आयास, विरुद्धान्न, मलावष्टंभक पदार्थ, दाह करणारे पदार्थ, रूक्ष व वातकफकारक पदार्थ थंड व जड, अशी अन्नें व पानें, थंड पाणी, पावटे, उडीद, मांस, शेळीचें दूध, मोहऱ्या, आंबट पदार्थ, कंद, भोपळा तेलकट पदार्थ इ० वर्ज करावें.

---

# उदररोग.

॥ पृथक्‌दोषैः समस्तैश्चप्लीहबद्धक्षतोदकैः ॥ संभवंत्युदराण्यष्टौतेषांलिंगं पृथक्‌ श्रुणु ॥

**अर्थ**—पृथक् दोषेंकरून ( वात, पित्त, कफ )सन्निपातानें ( सन्निपातोदर ) प्लीहोदर, बद्धोदर, क्षतोदर, आणि जलोदर, मिळून ८ प्रकाराची उदरें होतात त्यांची लक्षणें वेगवेगळीं सांगतों.

**कर्मविपाक**—जन्मसमयीं सिंहलग्नस्थ, चंद्र असतां अथवा रवी ग्रहीं चंद्र असतां उदर रोग, स्त्रीद्वेष, तृषा आणि क्षुधा इत्यादिकांनीं पीडित होतो. अथवा चंद्र षष्टमस्थानीं, रवीं शुक्रस्थानी असेल तर जलोदर, नेत्ररोग, नाना तऱ्हेचे क्लेश, बंधनें इत्यादिक प्राप्त होतात. **परिहार**—सूर्य, चंद्र यांची दानें, जप, होम इत्यादि करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—ब्रह्मा, विष्णु, महेश, यांस जो मनुष्य निरनिराळे आहेत असें समजतो त्यास उदर रोग होतो. अथवा गुरुपत्नीकडे वक्र दृष्टीनें पाहतो, त्यासही उदररोग होतो. **परिहार**—महादेवावर सहस्र कलशांनीं अभिषेक करावा. अग्निपूजा, सहस्र ब्राह्मणभोजन करावें, कृच्छ्रातिकृच्छ्र चांद्रायणें, सुवर्णदान इत्यादि करावी.

**उदररोगाचें कारण** ( मा. नि. )—अग्नि मंद झाला असतां सर्वच रोग होतात. आणि उदरें तर बहुतकरून होतातच. कारण अग्निमांद्य हें त्रिदोषमिश्रित आहे. आणि अजीर्णानें, मलीन अन्नांनीं आणि मलसंचयानें वातादि दोष वाहणारीं आणि उदक वाहणारीं स्रोतसें रुद्ध करून आणि वाढवून प्राणवायु, अग्नि आणि अपानवायु, यांजला अत्यंत दुष्ट करून मनुष्यास उदर उत्पन्न करितात.

**सर्व उदरांचें सामान्य लक्षण** ( मा. नि. )—आध्मान, चालण्यास सामर्थ्य नसणें, दुर्बलता, अग्निमांद्य, सूज, अंगग्लानि, वायूचा व मळाचा अवष्टंभ, दाह, तंद्रा हीं लक्षणें सर्व उदरांत होतात. वर सांगितलेल्या ८ प्रकारांशिवाय आणखीही कांही प्रकार आहेत, ते हे की यक्रुतोदर, शोफोदर, नागोदर, यांत नागोदर स्त्रियांलाच होतें. कारण शुक्रधातु व रक्त याचे संयोगकाळीं वायु त्या गर्भाचा आकार सर्पासारखा करून पोट फुगवितो. नंतर तो गर्भ कदाचित् आपले इच्छेंकरून मुरडा होऊन पडतो अथवा पोटांत जिरतो.

**वाग्भटाचें मत**—उदरानें पीडलेल्या मनुष्याची डाळू व ओंठ हीं कोरडीं पडतात. पाय, हात व पोट ही सुजतात, अवयवांचा व्यापार, शक्ति, व आहार हीं कमी होतात. कृश, पोट फुगणें, प्रेतासारखी कळा येणें, भूक न लागणें, कोणत्याही प्रकारचें अन्न खाल्लें असतां जळजळ होऊन तें अन्न फार उशीरानें पचणें, अन्न जिरलें किंवा नाहीं हें न समजणें, पोटभर जेवलें असतां तें न सोसणें, हळु हळु शक्ति कमी होत जाणें, थोडासा व्यायाम झाला असतांही दम लागणें, मळाचा संचय होणें व त्याची बाहेर प्रवृत्ति न होणें, पायांस सूज, वस्तींत वेदना, लघु व थोडें किंवा मुळींच न खाल्लें तरी पोटास तडस लागणें, पोटावर तुळतुळीतपणा व शिरा उत्पन्न होणें, कोणताही उदर पाणी सांचण्यापूर्वी लाल आणि सूजरहित असून फारसें जड नसणें, त्याजवर शिराची जाळीं पसरलेलीं असतां, पोटांत नेहमीं गुडगुड शब्द होतो. वायु हा हृदय, कंबर, नाभी व अडसंधी यांत वेदना उत्पन्न करून नाभी व आंतडें यांस ताठून जोर करून नाहीसा होतो. व शब्द करीत करीत गुदांतून बाहेर येतो. मलाचा अवरोध होतो. मूत्र थोडें होतें. अग्नि फारसा मंद नसतो, अन्नाविषयीं खायखाई नसते व तोंड बेचव नसतें.

**वातोदर** ( मा. नि. )—हात, पाय नाभी आणि कुशी यांच्या ठिकाणीं सूज, सांधे ढिले पडणें, कोरडा खोकला अंग मोडून येणें, कंबरेपासून जड वाटणें, मळ सांचणें, त्वचा, नेत्र, इत्यादिक काळी, तांबडीं होणें, पोट अकस्पात निमित्तावांचून लहान मोठें होणें, चोहीकडे काळ्या शिरा उमटणें, पोटांवर टिचकुली मारली असतां भरलेल्या पखालीसारखा शब्द होणें, ह्या उदरांत वायूशूल करून फिरतो. व गुरगुर शब्द करितो. इत्यादि लक्षणें होतात. **उपाय**—( १ ) घृताचें पान, स्नेह, स्वेद आणि विरेचन द्यावें, यांनी ग्लानि आली असतां वस्त्रानें उदरवेष्टन करावें. ( २ ) सैंधव, पिपळी व मिरी यानीं युक्त तक्र प्यावें. ( ३ ) दशमुळाच्या काढ्यात एरंडेल घालून प्यालें असतां वातोदर, शोफोदर आणि शूल याचा नाश होतो. ( ४ ) शेळीचें कोंवळें दूध पिण्यास द्यावें. ( ५ ) मीठ, पादेलोण, सैंधव, जवखार, ओंवा, पिपळी, चित्रकमूळ, सुंठ, हिंग आणि वावडिंग यांचें चूर्ण तुपाशीं भक्षण करावें ह्मणजे वातोदर, गुल्म अजीर्णावर भोजन, वायूचा प्रकोप, संग्रहणी, अर्श, पांडुरोग आणि भंगदर याचा शीघ्र नाश होतो. ( ६ ) बाळहरीतकी व रक्तरोडा या दोन औषधांचा काढा करून त्यांत पिपळीचें चूर्ण व जवखार घालून द्यावा. तेणेंकरून वातोदर, गुल्म, यकृत्, प्लीहा, ( पोटांत डावे बाजूस कवलु होतो तो ) इत्यादि रोग दूर होतात. ( ७) त्रिफळ्याचा काढा गोमूत्रांत घालून द्यावा; ह्मणजे वातोदराचा नाश होतो.

**पित्तोदर** ( मा. नि. )—ज्वर, मूर्च्छा, दाह, तहान, तोंडाला कडूपणा, भ्रम, अतिसार, त्वगादि, नख, नेत्र, यांस पिवळटी, हिरव्या, पिंवळ्या व तांबड्या शिरांनी व्याप्त व घामानें ओलसर, कढत असून जळजळीत असें पोट होतें. आंतून धूर

निघाल्यासारखें वाटणें, हाताला मऊ लागणें, लवकर पाक होणें ह्मणजे जलोदरत्वाप्रत पावतें आणि त्याला व्यथा फार होते. **उपाय**—( १ ) सालवण, पिठवण, रिंगणमूळ, डोरलीमूळ, गोखरू, यांचा दुधांत काढा करून प्यावा. ( २ ) रक्तरोड्याची साल आणि हिरडेदळ यांचा गोमूत्रांत कल्क करून प्यायलें असतां सर्व प्रकारची उदरें, प्रमेह, मूळव्याध, कृमि याचा त्वरित नाश होतो. ( ३ ) पिठवण, चिकणमूळ, रिंगणमूळ, लाख आणि सुंठ यांचा दुधांत काढा करून सेवन करावा.

**कफोदर** ( मा. नि. )—हातापायांचे ढगळे पडतात, स्पर्श कळत नाहीं, सूज येते, अंग जड होतें, झोंप येते. वांति होईलशी वाटते, अरुचि होते, श्वास लागतो, खोकला, त्वगादि पांढरीं होतात, पोट निश्चळ, तुळतुळीत व पांढऱ्या रेषांनीं व्याप्त व मोठें होतें, त्याची वृद्धि फार वेळानें होते. कठिण व गार लागतें व जड आणि स्थिर असतें व ग्लानि येते. **उपाय**—( १ ) शेरणी, त्रिफळा, पिसोळा ह्मणजे कांटेधोत्रा, निवळीचें बी, त्रायमाण, कुटकी, शिकेकाई, निशोत्तर, वेखंड, सैंधव, बिडलोण व पिंपळी यांचें चूर्ण करून तें डाळिंबाचा रस, त्रिफळ्याचा काढा, गोमूत्र अथवा ऊन पाणी यांतून एकाबरोबर घेतलें असतां हातपाय गळणें, सर्व प्रकारचीं गुल्में, सर्व प्रकारचीं उदरें, प्लीहा, पांढरें कोड, कुष्ठ, अजीर्ण, हातपाय गळणें, विषमाग्नि, हलीमक, अर्श, सूज, कामला, पांडुरोग वात, पित्त व कफ हे दोष रेचांनीं त्वरित नाश पावतात. ( २ ) नारायणचूर्ण द्यावें. ( ३ ) जवखार ४ मासेपर्यंत बलाबल पाहून १ अगर २ तोळे एरंडेल तेलांत द्यावा. ( ४ ) सुंठ, मिरीं, पिपळी, जिरें, अजमोदा, चित्रक व हपुषा ( थोर शेरणी ) यांचें चूर्ण एक तोळापर्यंत ताकांत द्यावें. ( ५ ) पिपळीचे कल्कानें सिद्ध केलेलें तूप पाजून नंतर निवडुंगाचे चिकाचें रेचक द्यावें. नंतर त्रिकटू, गोमूत्र एरंडेल यांच्या काढ्यानें अनुवासनबस्ति द्यावा व लोहकिट्ट, शिरस, आंवळकाठीचें बीज हीं पाण्यांत वाटून त्याचा उदरावर जाड असा लेप द्यावा. व कुळिथाचे काढ्यांत सुंठ, मिरी व पिपळी घालून त्यास भोजन द्यावें. व ऊन पाण्यात फलाणीचा कपडा भिजवून त्यानें पोट शेकावें. ( ६ ) नुसता गोमूत्राचा अष्टमांश काढा करून द्यावा. ( ७ ) एरंडेल व गोमूत्र एकत्र करून द्यावें.

**सन्निपातोदर** [मा. नि.]—दुष्ट चालीच्या स्त्रिया ज्या पुरुषास नखें, केंश, मूत्र विष्ठा आणि विटाळ हीं कालवून अन्नपानांत देतात अथवा ज्यात शत्रु विषप्रयोग करितात त्यास किंवा दुष्टांबु [ उदक ] ज्यांत सविष प्राणी, गवत, मुळ्या व पानें वगैरे कुजलेलीं आहेत असें उदक आणि दूषीविष, ह्मणजे मंदविष यांचें सेवन झालें असता त्या योगानें रक्त आणि वातादि दोष लवकर कुपित होऊन अत्यंत भयंकर त्रिदोषात्मक उदर उत्पन्न करितात. तें शीतकाळीं किंवा गार वारा सुटतो त्यावेळीं अथवा ज्या दिवशीं पावसाची झड असेल त्या दिवशी विशेषेंकरून कोप पावतें आणि जळतें. कारण त्याच वेळेस दूषित विषाचा कोप होत असतो. तो रोगी नि-

रंतर विषयोगानें मूर्छा पावतो पांडूर वर्ण व कृश होतो. आणि आयास केल्यानें पाण्याचा शोष लागतो याला दूष्योदर ( रक्ताला दुष्ट करून अथवा परस्पर दोष दूषित होऊन उदर होतें तेंच दूष्योदर ) ह्मणतात. यांत पाणी फार लवकर सांचतें.

उपाय—( १ ) सन्निपात उदरावर फारशी शक्ति क्षीण झाली नसेल व अग्नि फारसा मंद झाला नसेल तर प्रत्याख्यान करून [बहुधा रोगी जगणें दुरापास्त आहे, परंतु उपाय करून पाहतों असें सांगून ] जो दोष विशेष वाढला असेल त्याच्या अनुरोधानें पुढील उपाय करावे. ( १ ) जेपाळ व द्रंवंती यांच्या फळांचें तेल पिण्यास द्यावें. ( २ ) ज्या उदरावर औषध चालत नाही त्याजवर विशेषतः त्रिदोषात्मक उदरी रोग्याच्या आप्तास विचारून व परवानगी घेऊन गुंज, कौडळ व कण्हेर यांची मुळें पाण्यात वांटून तो कल्क मद्याबरोबर द्यावा. ( ३ ) कांडे निवडूंगाच्या चिकांत पिपळ्या सात दिवस भिजत घालाव्या. नंतर त्यांचें चूर्ण करून खावें व मधुर आहार करावा. या योगानें उदररोग नाश पावतो. ( ४ ) सुंठ, हिरडे, बेहेडे व आंवळकठी हीं प्रत्येक ६४ तोळे यांचे काढ्यात २९६ तोळे तेल व ताकाची निवळ हे पदार्थ एकत्र करून तें तेल सिद्ध करावें. तें प्राशन केलें असतां संपूर्ण प्रकारची उदरें व कफ, वायु यापासून झालेला गुल्म यांचा नाश होतो. (५) निर्गुडीचे पाल्याचे रसांत बाळहिरड्याचें चूर्ण व गोमूत्र घालून प्राशनार्थ द्यावें. (६) दोष निघून गेल्यावर त्यास थड पाण्यानें स्नान घालून दूध किंवा कण्हेरी पाजावी. आणि नंतर निशोत्तर, ब्राह्मी, चाकवत, शरपुंखा ह्मणजे उन्हाळी किंवा गोडा चाकवत यांच्या रसात यांच्याच भाज्या कराव्या. आणि मीठ तेल व तूप कांहींएक न घालतां आळणी अर्धवट शिजलेल्या भाज्या खाव्या, अन्न खाऊं नये व तहान लागली असता त्याचाच रस प्यावा. याप्रमाणें एक महिनाभर करावें. याप्रमाणें भाज्यांनीं दोष निघून गेल्यावर एक महिन्यानंतर रोगी अशक्त झाला असतो, ह्मणून शक्ति आणणारें उंटिणीचें दूध काही दिवस द्यावें.

प्लीहोदराचें कारण व लक्षण—( मा. नि. ) ( पान्थरी ) विदाही ह्मणजे

---

१—उदर चिरून आतील पाणी व दोष काढणे

२—मोगलीएरंडाच्या जातींपैकी एक झाड आहे

३—फार जेवलें असून अश्वादिकावर बसून जाणें व दुसऱ्या काहीं क्रियानीं क्षोभ झाल्यामुळें, तसेंच अति मैथुन, अतिशय काम करणे, अतिशय चालणे व वमनरोग यानीं कृश झाला असता डाव्या कुशींतील कवलु स्थानापासून ह्मणजे यात कवलू किंवा पान्थरी ह्मणून जो रोग होतो त्याची कारणें सांगताना मुख्य कारणाकडे मुळीच लक्ष दिलें नाहीं. पान्थरी जी वाटते ती प्राय हिवतापात पाणी अनियमित प्याल्यापासून कधीं कधीं सतत ज्वरापासून क्वचित् प्रसगीं यकृत् झालें असल्यास स्वस्थानापासून पानथरीचा भ्रंश झाला असल्यास ह्मणजे स्वस्थानापासून सुटली असल्यास वाढते किंवा रसादिकापासून वाटलेले रक्त तिला वाढविते. ती प्रथम आठळीसारखी फार कठिण असून नतर कासवाचे पाठीप्रमाणें कुशीत हळु हळू वाढून उदर उत्पन्न करिते. पोट अरुण वर्णाचे होतें किंवा त्याचा रग दुसऱ्या तऱ्हेनें बदलतो व त्यावर निळ्या पिवळ्या रेवा उमटतात. तसेंच श्वास, कास, तहान,

दाह करणारे पदार्थ, आणि अभिष्पंदी ( दहीं इत्यादि ) स्रोतःस्रावक अशीं अन्नें निरंतर सेवन करणाऱ्या पुरुषाचें अत्यंत दुष्ट झालेलें रक्त आणि कफ वाढून प्लीहा ( कवळू ) ची वृद्धि करितात. ह्या उदराला प्लीहोदर ( पान्थरी ) ह्मणतात. हें पोटांत डावेकडे वाढत असतें. ह्या अवस्थेमध्यें रोगी फारच गळून जातो, अंगांत बारीक ज्वर असतो, अग्नि मंद असतो आणि कफ, पित्तोवर लक्षणें यांत असतात. बळ क्षीण होऊन पांढरा फटफटीत होतो. उपाय--( १ ) शेवग्याचे सालीचा काढा सैंधव, चित्रक व पिंपळी याचें चूर्ण घालून द्यावा ( २ ) बोरीची पानें, तेल घालून वांटावीं व त्याचा लेप पान्थरीवर करावा. नंतर वर मुसळानें दाबावें ही कृति चालू असतां नुसतें दूध पिऊन रहावें ह्मणजे पान्थरीचा नाश होतो. ( ३ ) पळसाचा क्षार व जवखार एकत्र करून गोमूत्र किंवा त्रिफळ्याचे काढ्यांत द्यावा. ( ४ ) पिकलेल्या आंब्याचा रस मध घालून द्यावा. ( ५ ) देवदार, पळसपापडी, रुईचें मूळ, गजपिंपळी, शेवग्याची साल, व आस्कंद हे पदार्थ गोमूत्रात वांटून वर लेप करावा; ह्मणजे सर्व उदरांचा नाश होतो. ( ६ ) प्लीहावर डाग द्यावा, हा उत्तम उपाय जाणावा. ( ७ ) समुद्रांतील शिंपेचा क्षार, जवखार, व सैंधव हीं औषधें गाईच्या दह्यांत दिली असतां प्लीहेचा व सर्व उदर रोगांचा नाश होतो. ( ८ ) स्नेह, स्वेद, रेचक इत्यादि उपचार करावें आणि डाव्या हाताच्या कोंपराच्या आंतील बाजूस शिरावेध करावा. आणि यकृताच्या नाशाकरितां वरप्रमाणें उजव्या हाताचा शिरावेध करावा. किंवा मनगटांत हाताची शिरा वेधावी. ( ९ ) मध व पिंपळी घालून ताक द्यावें. ( १० ) सैंधव २० तोळे, हळद २० तोळे, मोहऱ्या २० तोळे, यांचें चूर्ण ४०० तोळे ताकांत एका कल्हईच्या भाड्यांत घालून त्याचें तोंड चागलें बांधून ३ दिवस ठेवावें. नंतर बलाबल पाहून २१ दिवस दोन्ही सांज देत जावें; ह्मणजे पांथरीचा नाश होईल. ( ११ ) लसूण, पिंपळमूळ व हिरडेदळ याचे चूर्णावर गोमूत्राचा घोट प्यावा. ( १२ ) सैंधव, पिंपळी, चित्रक, शिलाजीत व जिरें

---

मागील पृष्ठावरून पुढे चालू

तोंड बेचव, पोट फुगणे, शूल, ज्वर, पाडूरोग, वांति मूर्छा, वेदना, दाह व मोह हे विकार होतात, त्यात वातादि वेगाची गति उलटणे ( उदावर्त ) शूल व पोट फुगणें, ही लक्षणे झालीं असता वातज प्लीहा जाणावी मोह, तहान आग होणे व ज्वर ही लक्षणें असता पित्तप्लीहा जाणावी. जडपणा, अरुचि व कठिणपणा हीं असलीं ह्म० कफजप्लीहा जाणावी हे वाग्भटाचे मत आहे.

१—रोग्यास उताणे निजवून पान्थरीवर तीन पदरी ओल्या फडक्याची घडी घालावी आणि डाग देणे असेल तेवढ्या प्रमाणाची खापरखुटी लाल होईपर्यंत तापवून चिमट्यानें धरून त्या फडक्याचे घडीवर न हात कापवितां व न भीता युक्तीनें तीन अंक मोजण्याचे अवकाशात ठेवून उचलावी आणि घडी काढून टाकावी ह्मणजे त्या जागी फोड येऊन फुटून वाहतो नतर वातूळ पदार्थ सेवन करीत जावें आणि तो डाग काही दिवस वाहू द्यावा मग अग्निदग्ध व्रणावरची चिकित्सा करावी अथवा रोग झालेल्या जाग्यावर पाच अगुळे लाब आणि अडीच अगुळे रुद असा भिलाव्याचा लेप द्यावा. पहिलाच लेप देऊन चागला फोड आसल्यास ठीक नाहीं तर दुसऱ्यानें त्याच जागीं लेप लाऊन तो फोड काहीं दिवस वाहू द्यावा. नतर शामक उपचार करावे

यांचें चूर्ण शेवग्याच्या सालीच्या रसाशीं द्यावें; ह्मणजे मोठी जरी प्लीहा असली, तरी तिचा तात्काळ नाश होईल. ( १३ ) रुईचीं पानें व सैंधव मडक्यांत घालून तोंड बंद करून जाळावें व तो खार दह्याबरोबर द्यावा. ( १४ ) उन्हाळीच्या मुळाचा कल्क ताकाबरोबर प्राशन करावा, तो फार दिवसांचे प्लीहेचा नाश करील. ( १५ ) पादेलोण, जवखार, मीठ, बागडखार, सैंधव, टांकणखार व सज्जीखार हे समभाग एकत्र एकत्र त्याचें चूर्ण रुईच्या व निवडुंगाच्या चिकांत भिजवून ३ दिवस उन्हांत ठेवावें. नंतर त्याचा रुईच्या पानास लेप देऊन तीं पानें मडक्यांत भरून संधिलेप करावा. व मातकापड करून मध्यम पुट द्यावें. स्वांगशीत झाल्यावर काढून चूर्ण करून त्यांत त्याचे निमे सुंठ, मिरी पिंपळी, वावडिंग, मोहऱ्या, त्रिफळा, चवक व भाजलेला हिंग यांचें चूर्ण मिळवावें; याला वज्रक्षार असें ह्मणतात. हा अग्नि व बल पाहून ताकाशीं द्यावा; ह्मणजे सर्व प्रकारची उदरें, सूज, गुल्म, अष्ठीला, अग्निमांद्य अरुचि, प्लीहा व यकृत् याचा नाश होतो, ( १६ ) कणीक व मीठ समभाग रुईच्या चिकांत गोळा करावा. व रानगोंवऱ्यात जाळून राख करावी. ती वस्त्रगाळ करून शिळे पाण्यांत दररोज सकाळीं दोन मासे प्रमाण ७ दिवस देत जावी. ( १७ ) एक तोळा शंखाचे तुकडे रात्री शेराचे चिकांत भिजत घालावे. व दुसरे दिवशीं एक गोंवरी कोरून त्यांत ते तुकडे ठेवावे. वर दुसरी गोंवरी ठेवून अग्नि द्यावा. तें भस्म एक वाल किंवा दोन वाल प्रमाण ऊन पाण्यात द्यावें. ( १८ ) हिंगणबेट ४ भाग, ओंवा ४, खुरासनी ओंवा ४, सागरगोट्याचा मगज ४, ३ वर्षांचा जुना गूळ ८, गाईचें लोणी १२ व समुद्रफळ १ भाग, ही सर्व एकत्र खलून लहान सुपारीएवढ्या गोळ्या कराव्या. दररोज सकाळीं एक गोळी खावी. याप्रमाणें १४ दिवस सेवन करावी. (१९) टांकणखाराची लाही ३ मासे, बाळहिरडे एक तोळा, आंबेहळद एक तोळा, काळाबोळ ३ मासे, यांचें वस्त्रगाळ चूर्ण करावें. व मोरवेलीचें पानाचा किंवा नागवेलीचें पानाचा रस दूध शिपून काढावा. त्या रसांत हें चूर्ण मर्दन करून चार मासे प्रमाणाच्या गोळ्या बांधून ४२ दिवस सेवन कराव्या. ( २० ) केशर दोन मासे, जायपत्री एक मासा, टाकणखाराची लाही ३ मासे, यांची पूड करून ठेवावी. व दूध शिंपून काढलेला मोरवेलीच्या किंवा नागवेलीच्या पानांचा रस किंवा गोमूत्र या ३ अनुपानांपैकीं एका अनुपानांत देत जावें.

**यकृतोदर** [ मा. नि. ]—उजव्या बाजूला जें यकृत् ह्मणजे काळीज असतें तें रोगयुक्त झालें असतां प्लीहोदरासारखेंच उदर होतें. या उदरामध्यें उदावर्त, शूल, आनाह या लक्षणांनी वात, मोह, तृषा, ज्वर, दाह यांनीं पित्त, आणि जडता अरुचि, कठिणपणा यानी कफ, अशा क्रमानें दोषसंबध जाणावा. ते नेहमी काळजापासून सुटून निराळें असतें. उपाय—[ १ ] प्लीहेवर ज्या औषधी सागितल्या आहेत त्या सर्व यकृतावर योजाव्या. [ २ ] पिपळीचा कल्क तूप व चौपट दूध, एकत्र करून तें अग्नि व बळ पाहून द्यावें.

**बद्धगुदोदर** [ मा. नि. ]—ज्या पुरुषाचें आंतडें उपलेपी बुळबुळीत अ-

न्नांनीं [ शाकादिक ] अथवा बारीक बारीक खड्यानी दाटलें जातें त्या पुरुषाचा दोषयुक्त मळ हळूहळूं आंतड्याच्या नळीमध्यें जसा केरसुणीनें झाडलेला केर कोंपऱ्यांत सांचतो तसा साचतो. त्याच्या गुदामध्यें तो मळ गुंततो. तो मोठ्या कष्टानें ह्मणजे कुंथल्यानें थोडा थोडा बाहेर येतो. तें उदर हृदय आणि नाभी यांच्यामध्यें मोठें होतें. त्या उदराला बद्धगुदोदर असें म्हणतात. गुदाच्या वरती आंतडे बांधल्यासारखें होतें. म्हणून बद्धगुदोदर होतें, असें चरकानें सांगितलें आहेत.

**बद्धगुदोदर लक्षण** [ वा. भ. ]—पापण्याचे केंस व इतर केंस अन्नाबरोबर खाल्ले असतां त्यामुळें किंवा मूळव्याधीच्या मोडांनीं किंवा वातादिकांचे वेग फिरविल्यामुळें अथवा दुसऱ्या आंतड्यास चिकटन राहणाऱ्या पदार्थांनीं गुद बंद झालें असतां अपानवायु कुपित होऊन मळ, पित्त व कफ यास कोंडून उदर उत्पन्न करितो. त्यामुळें दाह, तहान, ज्वर, शिंका, खोकला. श्वास, माड्या गळणें, डोकें, हृदय, नाभी व गुद यांत वेदना होणें, मलावरोध, अरुचि व वांति हे विकार होतात. पोटांत वायु, निचेष्ट होऊन राहतो, पोट स्थिर होतें. पोटावर निळ्या व तांबूस शिरा व रेघा उठतात, किंवा त्या मुळींच नसतात, बेंबीच्या वर पोट गाईच्या शेपटासारखें होतें. त्यास बद्धोदर म्हणतात हे उदर पंधरा दिवसानी असाध्य होतें. **उपाय**—( १ ) मुरदाड शिंगाचें चूर्ण बलाबल पाहून उष्णोदकाशी सेवन करावें ह्मणजे आठ प्रकारच्या उदरापासून मुक्त होतो. ( २ ) त्रैलोक्यडंबर रस द्यावा. ( ३ ) तीक्ष्ण औषधानें रेचन द्यावें. संपूर्ण वातनाशक क्रिया करावी. गुदामध्यें अनेक प्रकारचे काकडे करून घालावे. घाम काढून अनुवासन बस्ति द्यावा. तीक्ष्ण औषधें, तेल व सैंधव यांनी युक्त निरूहणबस्ति द्यावा. उदावर्तनाशक असून वातनाशक असणारे सर्व उपाय करावे. ( ४ ) थोरशेरणी, ओंवा, जिरें आणि सैंधव यांचें चूर्ण द्यावें.

**क्षतोदर** ( मा. नि. )—कंटकादि शल्य अन्नात मिसळून पोटात गेलें ह्मणजे पक्काशयांतून विलोम ( वांकडें तिकडें ) गेलें असता आंतड्याला भोंक पडतें, तें सरळ गेलें तर आतड्यांना भोंक पडत नाहीं. अथवा जांभई व अत्यशन केल्यानें आंतडें फाटतें. त्या आंतड्यापासून गळलेल्या पाण्यासारखा स्राव पुन्हा गुदावाटें पाझरतो, पोंट बेंबीच्या वरती मोठें होतें टोंचल्यासारखें व भेदवत् पीडेनें अत्यंत व्यथित होतो. याला परिस्रावीउदर असें ह्मणतात.

**क्षतोदर** ( वाग्भट )—अन्नाबरोबर अस्थ्यादिशल्यें खाल्ली असता त्यामुळें किंवा अतिशय जेवल्यामुळें आंतडें फाटतें किंवा त्याचा पाक होतो. त्या भोंकांतून अपक्क अन्नरस मलासह बराच बाहेर पडतो. व त्याहून थोडा गुदांतून बाहेर येतो.त्यास प्रेतासारखी घाण असून तो बुळबुळीत, पिवळा, व लाल असतो. जो पोटांत स्रवतो तो सर्व पोटभर पसरून भयंकर उदर उत्पन्न करितो. पोट बेंबीच्या खालीं वाढते. त्यांत पाणी फार जलद उत्पन्न होतें. कुपित झालेल्या त्रिदोषाची

चिन्हें असतात. श्वास, तहान व भ्रम हे विकार होतात. यास छिद्रोदर, क्षतोदर किंवा परिस्त्रावीउदर असें ह्मणतात. उपाय–(१)स्वेद शिवाय करून बाकी कफोदराप्रमाणें सर्व चिकित्सा करावी. उदरांत पाणी जमलें की काढावें. याप्रमाणें रोग्याचें मरण लांबणीवर टाकीत जावें. कारण हा रोग दुःसाध्य आहे. या उदरावर व इतर संपूर्ण उदरांवर वैद्यानें रोग्याची व त्याचे आप्ताची, राजाची आणि गुरूची आज्ञा घेऊन नंतर शस्त्रानें वेध करावा. वैद्यानें रोग्याचे प्राणाचा निश्चय सांगून त्याची आज्ञा घेऊन नंतर उदराला वेष्टन करून नाभीच्या खाली चार अंगुळावर बाजूस वेध करावा. अंगुलीमध्यें भाताच्या कुसासारखें अणकुचीदार शस्त्र घेऊन त्यानें वेध करून त्या छिद्रांत द्विमुख नळी घालून त्यांतून पाणी काढावें. एकेच दिवशीं संपूर्ण दोष काढूं नयेत. काढले असता खोकला, श्वास, ज्वर, तृषा, गात्रभंग, कंप, अतिसार आणि पूर्ववत् उदर भरणें हे विकार होतात. याकरितां तिसरे किंवा पांचवे दिवशी पूर्ववत् पुनः पुन्हा उदक काढावें. उदक काढल्यानंतर व्रणांत दोष प्रवेश होण्यापूर्वीं तेल व मीठ यांनी रक्तासह रेशमी वस्त्रानें किंवा चर्म यानी घट्ट वेष्टन करून बांधावें.

**जलोदर** ( मा. नि. )—स्नेहपान केलेला अथवा अनुवासन बस्ति घेतलेला, वमन घेतलेला, किंवा ढाळक घेतलेला, अथवा निरूहणबस्ति घेतलेला असा पुरुष थंड पाणी पिईल तर त्याची उदक वाहणारीं स्त्रोतसें तात्काळ दुष्ट होतील. तीं उदकवह स्त्रोतसें स्नेहानें उपलिप्त झाली असतां पहिल्याप्रमाणें ( अन्नरस उपस्नेह पाझरून बाहेर येऊन उदर उत्पन्न करितो.) जलोदर होतें तें उदर वरून तुकतुकीत दिसतें. पोट मोठें होतें, बेंबीजवळ फार उंच होतें, चोहोंकडे तिडका लागतात, पाण्यानें पोट अगदीं भरल्यासारखें होतें. जशी पाण्यानें भरलेली पखाल डळमळते, हालते, डबकडबक वाजते तसें पोट वाजतें त्याला जलोदर असें ह्मणतात.

**जलोदर लक्षण** (वाग्भट)—जो स्नेहपानादि क्रिया केल्या असता एकाएकी थंड पाणी पितो, तसेंच अग्नि मंद असून क्षिण असून कृश असून जो अतिशय पाणी पितो त्याचा पाण्यानें मिश्र झालेला कफ व वायु उदर वाहणारे मार्ग बंद क-

---

१—बद्धोदर व छिद्रोदर या दोहोंत रोग्याचे शरीर स्निग्ध व स्विन्न (स्वेदन) करून नाभीच्या खालीं डावेकडे चार अगुळे अतर सोडून चार बोटें लाब पोट फाडावें. नतर त्या केलेल्या छिद्रातून आतडीं पोटातून बाहेर काढावीं बद्धोदरात त्या आतड्यात केस, मळ, काहीं चिकट पदार्थ दगड वगैरे जें काही अडकलें असेल तें युक्तीने बाहेर काढावें व छिद्रोदरात शल्य बाहेर काढून टाकावा. नतर क्षतोदरात आणि बद्धोदरात त्या आतड्याच्या छिद्रास मोठे काळे मुगळे डसवावे ते डसले ह्मणजे त्याचीं डोकीं कायम ठेवून बाकी शरीरें कातरून काढावीं. व आतड्यास मध व तूप लावून तीं जागच्याजागीं मोठ्या युक्तीनें जशीं काढलीं असतील तशींच बसवावीं. आणि बाहेरचा व्रण शिवून त्यावर जेष्ठमध व काळी माती याचा लेप करून बाधावे. नतर निवात स्थळीं वातघ्न स्नेहाने भरलल्या पिपात त्याला बसवावें व अन्न न देता दूध द्यावे.

रून पोटांत राहून उदकाच्या स्थानांतून तेंच पाणी वाढवून उदर करितात. त्यांत गुदस्राव, वेदना, खोकला, दमा व अरुचि हे विकार होतात. पोट अनेक रंगांच्या शिरांनीं युक्त असतें व तें पाण्यांनी भरलेल्या पखालीसारखा हातास स्पर्श लागतो. व त्यावर बोटानें मारलें असतां पखालीवर मारल्यासारखाच आवाज होतो. व दाबलें असतां आंत पाणी भरल्यासारखें दिसतें व पखालीप्रमाणें हालतें. हें फार मोठें, स्निग्ध व स्थिर होतें. व बेंबी उफराटते. **उपाय**—( १ ) जलोदरात वातघ्न तेलें अंगास चोळून प्रथम त्यास स्नान घालावें, नंतर काखेपर्यंत पोटास वस्त्र गुंडाळावें आणि बद्धोदर व छिद्रोदर यांवर सांगितलें ठिकाणी व्रीहीमुखशस्त्रानें एक बोटभर वेध करावा. त्या छिद्रामध्यें पक्षाच्या पिसांची किवा धातूची नळी घालून अर्धे पाणी काढावें. नंतर ती नळी काढून तेल व सैंधव व्रणावर लावून बांधून पोटास वस्त्र गुडाळावें. पुढे तिसरे किवा चवथे दिवशी सरासरी सोळा दिवसपर्यंत थाबून थाबून पाणी काढावें. पोट जसें जसें सैल होत जाईल तसें तसें त्याच्या पोटाचें वस्त्र घट्ट बांधीत जावें. या रीतीनें सर्व पोटांतील पाणी निघाल्यावर त्यास उपास घालून स्नेह व सैंधव यांनी मिश्रित कण्हेरी द्यावी. किंवा रेचक देऊन उदक काढावें, उदक गेल्यावर पोट फुगलें असतां स्नेहविधि, बस्तिकर्म यांनी उपचार करावे. व पाणी निघून गेल्यानंतर लंघन करून घृत व मीठ यावाचून पेज द्यावी. पुढें सहा महिने नुस्ते दुधावर रहावें. पुढें तीन महिने दुधांत शिजविलेली कण्हेरी खावी. पुढें तीन महिने जुने सावे व हारीक याचा थोडासा भात दुधाशीं किवा सुरन्याशीं घृताशिवाय आळणी खावा. कोद्रू, सावे, दूध, लघु अन्न व किंचित् लवण याप्रमाणें उपचार केलें असतां व वागलें असतां एक वर्षानें जलोदर जिंकलें जातें. ( २ ) कासाळूचा कादा एक तोळा ताकाशी द्यावा. ( ३ ) त्रिकटु व मीठ याचें चूर्ण घालून ताक प्यावें. ( ४ ) त्रिकटू, सैंधव व जवखार यानी युक्त ताक प्यावें. (५) पिपळी, मिरीं, ताम्रभस्म व हाळद ही समभाग घेऊन त्या सर्वांसमान जेपाळाचें बीज घेऊन त्या सर्वांस कांडेनिवडुंगाचे रसांत खलून बलाबल पाहून द्यावें, म्हणजे जलोदराचा नाश होईल यात संशय नाही.

**शोफोदर** ( सुश्रुत )—पोट गरोदर स्त्रीप्रमाणें मोठें दिसून सर्वांगास मोठी सूज उत्पन्न होते व रोगी ताठल्यासारखा दिसतो. **उपाय**—( १ ) बेलमूळ, चिकणामूळ आलें आणि सुंठ यांचे काढ्यात व कल्कात सिद्ध केलेलें घृत शेळीच्या दुधाशी द्यावें, तें संग्रहणी, सूज, अग्निमांद्य, अरुचि यांचा नाश करण्याविषयी बहुत श्रेष्ठ आहे. ( २ ) त्रिफळ्याचें चूर्ण गोमूत्रांत द्यावें. ( ३ ) गोमूत्र प्राशन करून दुधभात खावा.

**साध्यासाध्य विचार** (मा. नि.)—सर्व प्रकारचीं उदरें जन्मतः प्रायः अत्यंत कष्टसाध्य म्हणून बोलतात. बलवान् पुरुषाला नवीन झालेलें आंत पाणी झालें

१—कुसळाचे धान्य.

नसेल तर मोठ्या प्रयत्नानें साध्य होतें, पाणी न झालेल्या उदराचें लक्षण चरकांत सांगितलें आहे, व जातोदक लक्षणही चरकांत सांगितलें आहे तें असें. कुक्षीची अत्यंत वृद्धि, शिरा अंतर्धान पावणें, आणि पोटांत भरलेल्या पखालीप्रमाणें क्षोभ आणि स्पर्श होतो. बद्धगुदोदर पंधरा दिवसांपुढें असाध्य होतें तसेंच सर्व प्रकारची उदरें पाणी झालें ह्मणजे नाशकारक होतात. आणि छिद्रोदर हें प्राय नाशक होतें. कदाचित् शल्य किंवा शस्त्र चिकित्सा पाहिजे तशी झाली तर उदक आलेलें छिद्रोदर किंवा बद्धगुदोदर साध्य होतें. हें प्रायः पदानें सुचविलें.

**असाध्य लक्षण** ( मा. नि. )—डोळयांस टापशी, शिश्न वांकडें झालें असेल, पोटाची त्वचा क्लेदयुक्त व पातळ, बल, रक्त, मांस आणि अग्नि हे ज्याचे क्षीण झाले असतील त्याला सोडावें. बरगड्या फुटणें, अन्नद्वेष, सूज, अतिसार, यांणीं पीडलेला, रेच दिला असता ज्याचें पोट पुन्हां भरतें अशा उदरी रोग्याला वैद्यानें सोडावें.

**सर्व प्रकारचे उदरांवर उपाय**—( १ ) साठे साळीचे तांदुळास गोमूत्राची भावना देऊन त्याची दुधांत कण्हेरी करावी. ती यथेच्छ पाजून नंतर उसाचा रस पोटभर पिण्यास द्यावा. असें केलें असतां वायु, पित्त व कफ आपापले स्थानी जाऊन उदर बरें होतें. ( २ ) सर्व उदरांत रेचन, वमन व पाचन द्यावें. उदरें बहुशा मलपुरीत असतात, याकरितां त्यांना शोधन हितकारक आहे. ह्मणून दुधाशी किंवा गोमूत्राशी वारंवार एरंडेल प्राशन करावें. ( ३ ) मलाकांगोणीचें तेल नित्य दुधाशी प्राशन करावें. ( ४ ) समुद्रांतील शिंपीचा खार, जवखार व सैंधव हे सर्व समभाग घेऊन गाईच्या दुधाबरोबर द्यावे. ( ५ ) देवदार, पळसाचीं फुलें रुईचीं मुळें, गजपिंपळी, शेवग्याची साल व आस्कंद, ही सर्व समभाग गोमूत्रांत वांटून उदरावर लेप द्यावा. ( ६ ) नारायणचूर्ण द्यावें. ( ७ ) रुईचा चीक ८ तोळे, कांडे निवडुंगाचा चीक २४ तोळे, हरीतकी, पांढरे निशोत्तर. वाहाव्याचे शेंगेंतला मगज, पांढरे गोकर्णीचें मूळ, लघुनिळी, तेड. जेपाळबीज, साखवेल आणि चित्रकमूळ हीं चार चार तोळे घेऊन यांचे काढ्यांत व कल्कांत ६४ तोळे तूप घालून पचन करावें. याचे जितके बिंदू प्यावे तितके रेच होतात. हे कुष्ठ, गुल्म, उदावर्त, सूज, भगंदर आणि आठ प्रकारची उदरें यांचा नाश करितें. हे घृत अंगास लाविलें असतांही रेच होतात.

**उदररोगावर पथ्य**—तीक्ष्ण रेच, लंघन, तांबड्या जुन्या साळीचा भात, सोलीव मुगाचें वरण, जुने कुळीथ, यव, हरीण, ससा याचें मांस, मद्य सैंधव, उडीद, ताक, लसूण, पडवळ, करटोली, दोडकी, पाथ्री, व शेवगा यांच्या भाज्या, शेळी हैस, व गाय यांचें दूध, तूप आणि मूत्र, लघु, तिखट, अग्निदीपक अशीं अन्नें, काजू, एरंडतेल, हिंग, मध, इ. पथ्यें जाणावीं.

**उदररोगावर अपथ्य**—धूमपान, अति जलपान, शिरावेध, वांति, मार्गगमन, दिवसास निद्रा, मेहनत, पिठाचे पदार्थ ( लाडू वगैरे ) मासे, पालेभाज्या,

तीळ, दाह क. गारें अन्न, मीठ, सर्व प्रकारच्या डाळी, विरुद्धान्न, वाईट पाणी, जडान्न, विष्टंभकारक अन्न, घामाचा अवरोध, गूळ, तेल, गाडी, घोडे, वगैऱ्यावर बसून जाणें, भाकरी, हे पदार्थ वर्ज करावे.

---

## उदावर्त.

॥ वातविण्मूत्रजृंभास्त्रक्षवोद्गारवमींद्रियैः ॥ क्षुत्तृष्णोच्छ्वासनिद्राणांधृत्योदावर्तसंभवः ॥

**अर्थ**—वायु, विष्ठा, मूत्र, जांभई, नेत्राश्रू, शिका, ढेकर, वांति, शुक्र, क्षुधा, तृषा, उच्छ्वास आणि निद्रा ह्या तेराजणांच्या वेगधारणानें उदावर्तरोग उत्पन्न होतो. तेराचा नियम केल्या त्याहून वेगळे क्रोध, लोभ, मन, इत्यादि त्यांचे वेग धारण केल्यानें रोगोत्पत्ति होत नाहीं. कारण यांचें आकलन स्वास्थ्याला हेतु आहे. सर्व उदावर्तांमध्यें मुख्य कारण वायूच आहे. उदावर्ताची निरुक्ति अशी आहे की " उद्भूतेनवेगविधारणेन आवृत्तस्यवायोरावर्तनमुदावर्त्त "

**कर्मविपाक**—जन्मकाळीं पापग्रहाच्या मध्यगत चंद्र अथवा सप्तमस्थानीं शनि असतां उदावर्त, श्वास, विद्रधि, गुल्म, कवळू आध्मान इत्यादिकरोग होतात. **परिहार**—चंद्र आणि शनी यांची दानें, जप, होम इत्यादिक करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—ब्राह्मणांचे क्षेत्रांचा नाश, तळाव, कूप, यांचा नाश, इत्यादि केल्यानें आध्मान, उदावर्त, ज्वर, अरूचि दाह इत्यादि रोग दूर होतात.

**वातनिरोधजन्य** ( मा. नि. )—अपानवायूचे वेगाचा अवरोध केला असतां वायु, मळ, मूत्र, हीं बंद होतात, पोट फुगतें. कळम येतात आणि पोटामध्यें वातजन्य पीडा होते. व दुसरे रोग [ तोदशूलादि पीडा ] होनात. **उपाय**—[ १ ] स्नेहपान, स्वेद, बस्ति, विरेचन, अभ्यंग, व गांवांतील व जळवासी प्राण्यांचे मांसरस, एरंडेल, मद्य, कोंवळे मुळे, आलें, माहाळुंग इत्यादि सेवन करावी.

**पुरीषनिरोधजन्य** [ मा. नि. ]—मळाचा वेग कोंडला असतां गुडगुड शब्द, शूल, गुदामध्यें कातरल्यासारखी पीडा, मळाचा अवष्टंभ म्हणजे खडा, ऊर्ध्व वायूचे ढेकर, अथवा मळ, तोंडावाटें निघणें, [मळाची वांति होणें] ही लक्षणें होतात. **उपाय**—[ १ ] बस्ति, घाम काढणें, अभ्यंग, पाण्यांत पोहणें, रेच, स्नान हे हितकारक होतात.

**मूत्रनिरोधजन्य** ( मा. नि. )—मूत्राचा रोध केला असता बस्ति ( मूत्राशय ) आणि शिश्न यांचे ठिकाणीं शूळ, उन्हाळी लागणें, मस्तकशूळ, पीडेनें गात्रें नम्र होणें, अडसंधी जखडणें, ही लक्षणें होतात. **उपाय**—[ १ ] दूध व पाणी एकत्र करून प्यावें. [ २ रिंगणीचा स्वरस अथवा अर्जुनसादड्याचा काढा द्यावा.

[ ३ ] एरंडाचें बीज पाण्यांत वांटून सैंधव घालून प्यावें. [ ४ ] साखर, उसाचा रस, अथवा द्राक्षाचा रस व दूध हें द्यावें [ ५ ] मूत्रकृच्छ्र किंवा अश्मरी यांवरील सर्व उपचार करावे.

**जृंभानिरोधजन्य** ( मा. नि. )—जांभईचा अवरोध केला असतां मानेच्या शिरा आणि गळा हे ताठतात. आणि वातजन्य विकार मस्तकांत होतात. तसेंच नेत्ररोग, नासारोग, मुखरोग आणि कर्णरोग हे तीव्र होतात. **उपाय**—( १ ) स्नेहन, स्वेदन व हिक्कानाशक औषधें द्यावीं.

**नयनोदकनिरोधजन्य** ( मा. नि. )—आनंदापासून अथवा शोकापासून आलेलें डोळ्यांतलें आंसु ढाळणाऱ्या मनुष्यास, मस्तकाला भार, नेत्ररोग आणि पडसें, हीं वळकट होतात. **उपाय**—( १ ) डोळ्यांतून पुष्कळ पाणी पाडवावें. नंतर स्वस्थ निजावें. व चांगल्या गोष्टी सांगाव्या.

**शिंकानिरोधजन्य** (मा. नि.)—शिंकेचा प्रतिबंध केला असता मान ताठते, कपाळ दुखतें, अर्धे तोंड वाकडें होतें, अर्धशिशी होते,आणि सर्व इंद्रियें दुर्बळहोतात. **उपाय**—( १ ) तीक्ष्ण पदार्थांचा वास किंवा नस्य, सूर्याकडे पाहणें, काकडे वगैरे नाकांत घालून शिंका काढणें, भोजनोत्तर घृतपान, मानेवरच्या भागास अभ्यंग, घाम काढणें, धूमपान इ० करावें.

**उद्गारनिरोधजन्य** [ मा. नि. ]—ढेंकराचा प्रतिबंध केला असतां कंठ व तोंड भरल्यासारखें होतें, अत्यंत टोंचल्याप्रमाणें पीडा होतें. अव्यक्त भाषण, [ बोबडी वळणें ] वायूची अप्रवृत्ति आणि वायूपासून उत्पन्न होणारे असे भयंकर विकार [ हिक्कादिक ] होतात. **उपाय**—( १ ) वातनाशक घृत योजावें. व ऊर्ध्वभागाला लावावें. स्नेह व स्निग्ध पदार्थ अग्नींत टाकून त्याचा धूर प्राशन करावा.

**छर्दिनिरोधजन्य** ( मा. नि. )—ओकारीचा अवरोध केला असतां अंगाला कंडू सुटते, गांधी येतात, अरुचि, वांग ( तोंडावर काळसर डाग ), सूज, पाण्डुरोग, ज्वर, कुष्ठ, मळमळ आणि विसर्प हे रोग दूर होतात. **उपाय**—( १ ) वमन, लंघन, विरेचन, तैलाभ्यंग, बस्तिशुद्धिकर औषधांचा काढा चतुर्थांश दूध घालून द्यावा. भोजन करून ओकवून टाकावे. नस्य, धूमपान, रक्तमोक्ष इ० करावें.

**शुक्रनिरोधजन्य** ( मा. नि. )—मैथुनकाळीं रेतस्खलन होऊं दिलें नाहीं' अथवा अन्य प्रकारानें शुक्राच्या वेगाचा रोध केला असतां मूत्राशयांत सूज येते' व कळ लागून मूत्र बंद होतें, शुक्राश्मरी होते, शुक्राचा वारंवार स्राव होतो. असे नानाप्रकारचे विकार होतात. **उपाय**—( १ ) शुक्राश्मरीवरील उपाय करावे. बस्तिकर्म, अभ्यंग, ऊन पाण्यानें स्नान, कोंबड्याचें मांस, साळी, मद्य व दूध द्यावें. आणि तरुण[1] स्त्रियांशी मैथुन करावें.

---

१—सोळा वर्षांपासून तीस वर्षांपर्यंत तरुण स्त्री अशी संज्ञा आहे.

**क्षुधानिरोधजन्य** [ मा. नि. ]—भुकेचा अवरोध केला असतां तंद्रा, अंग मोडून येणें, अरुचि, श्रम आणि दृष्टीला मंदता हे रोग होतात. **उपाय**—[ १ ] स्निग्ध, उष्ण, लघु, रुचिकारक, अल्प, हितकारक, असें भोजन करावें. आणि सुगंधी पुष्पांचा वास घ्यावा.

**तृषानिरोधजन्य** ( मा. नि. )—तहान मारली असतां घशाला व तोंडाला कोरड, कानांनीं ऐकूं येईनासें होतें आणि हृदयांत पीडा हे विकार होतात. **उपाय**—( १ ) शीत उपचार करावें. ( २ ) कापराचा किंवा वाळ्याचा वास लावलेलें गार पाणी थोडें हळू हळूं प्यावें.

**श्वासोच्छ्वासनिरोधजन्य** ( मा. नि. )—दमलेल्या मनुष्याचा उसासा बंद केल्यानें हृद्रोग, मूर्छा अथवा गुल्म हे रोग होतात. **उपाय**—( १ ) मांसरसास हित मसाल्याचा घृतमिश्रित भात खावा व विश्रांति घ्यावी.

**निद्रानिरोधजन्य** ( मा. नि. )—झोंपेचा मोड झाला असतां जांभया, अंगमोडे, आळस नेत्र व मस्तक याना अति जडपणा आणि झांपड हे विकार होतात. **उपाय**—( १ ) शर्करायुक्त दूध प्यावें, आणि उत्तम शय्या, पाय रगडणें व तूप लावून चोळणें, प्रिय गोष्टी, अशा प्रकारानें झोंप घ्यावी.

**रुक्षादिकुपितवातज** (मा. नि.)—रुक्ष, तुरट, तिखट, आणि कडू अशा भोजनांनीं कोष्ठगत वायु कुपित होऊन तात्काळ उदावर्त रोग उत्पन्न करितो. आणि वायु, मळ, मूत्र अश्रु, कफ आणि मेद यांना वाहणाऱ्या स्रोतसास, [ मार्गास ] व्याप्त करून टाकितो आणि मळाचा शोष करितो त्यामुळें रोगी हृदयबस्ति या ठिकाणच्या शूळानें बेजार होतो. अस्वस्थपणा, यांनी पीडतो. मळ, मूत्र, आणि वात हीं कष्टांनी होतात आणि श्वास, खोकला, पडसें, दाह, मोह, तृषा, ज्वर, वांति, उचकी, शिरोरोग, मनाला भ्रांति, मद ऐकूं येणें, व वातकोपापासून आणखीही पुष्कळ विकार होतात. **उपाय**–[१] रुक्ष अशी अन्नें व पानें, विरेचन, बस्ति शुद्धीकरअशी औषधें द्यावी [ २ ] चौपट पाणी घालून दूध द्यावें. [ ३ ] लसूण व मद्य यांचें मिश्रण करून प्रातःकाळी प्राशन करावें. तें गुल्म, उदावर्त व शूळ यांचा नाश करितें व बलाची वृद्धि करितें. [ ४ ] खडीसाखर ४ तोळे, तेड १ तोळा, पिपळी २ तोळे, याचें चूर्ण भोजनाचे पूर्वी मधाबरोबर एक तोळा चाटावें; ह्मणजे खडा होऊन शौच्यास बंद होतें. तें साफ होऊन उदावर्ताचा नाश करील. [ ५ ] दांती मूळ, गेळफळ, पिपळी, बीडलोण, कोष्ठ, कोळिंजन व गहू याचें चूर्ण गोमूत्र व निंबूरस यांत शिजवून तें मिश्रण फडक्यास लावून त्याची अंगुष्ठप्रमाण वात करून तुपात भिजवून गुदांत ठेवावी, ह्मणजे तिडीक व आनाह यांचा नाश करील. [ ६ ] त्रिकटू, सैंधव, शिरस, वेरोसा, कोष्ठ, कोळिंजन, गेळफळ, याचें चूर्ण मधांत किंवा तुपांत भिजवून गुदद्वारांत वात करून घालावी, ह्मणजे आनाह, उदावर्त, उदर व गुल्म यातें शांत करितें यांत संशय नाही. [ ७ ] हिंग, मध व सैंधव एकत्र ख-

रून फडक्यास लावून त्याची वात करून शेकावी, नंतर तुपांत भिजवून गुदात घालावी. [ ८ ] बाळहिरडे, जवखार, अक्रोड व तेड याचें चूर्ण तुपाबरोबर सेवन करावें.

**सर्व उदावर्तांवर उपाय**—( १ ) सुंठ, मिरीं, पिंपळी, सैंधव, पादेलोण, बीडलोण, हिरडा, बेहेडा, आंवळकटी, दांतीमूळ, विवे व चित्रकमूळ, ही औषधें ठेंचून ती गोमूत्रांत कालवून मातीच्या परळांत घालून वर दुसरा परळ झांकण घालून मातकापड करून आच द्यावी. धूर बाहेर जाऊं देऊं नये, नंतर तो क्षार तुपांत कालवून प्यावा आणि भाताबरोबर खावा आणि स्निग्ध भोजन करावें; ह्मणजे उदावर्त, मळ व वायु याचा अवरोध, मूळव्याध, गुल्म, पाण्डुरोग, उदर, कृमि, मूत्रावरोध, मूतखडा, सूज, हृद्रोग, संग्रहणी, मेह, कवलु, शूल, पोट फुगणें, श्वास व कास हे रोग बरे होतात ( २ ) बाळहिरडे, मोरवेल, जवखार व निशोत्तर यांचें चूर्ण तुपाबरोबर प्यावें ह्मणजे गुल्म व आनाह यांसहित उदावर्ताचा नाश होतो. ( ३ ) लेंड्या पिपळ्या ४ घेऊन बारीक वांटाव्या व दोन तोळे पाण्यांस कालवून तें पाणी गाळून घ्यावें व रोग्याचें बलाबल पाहून त्या पाण्यासमान तूप घालून प्राशन करावें ह्मणजे उदावर्त व गुल्म याचा नाश होतो. ( ४ ) हिंग, वेखंड, बीडलोण, सुंठ, जिरें, हिरडेदळ, पोखरमुळ, कोष्ठ व कुळिजन हे पदार्थ क्रमवृद्धीनें घेऊन त्याचें चूर्ण करून द्यावें; ह्मणजे उदावर्त, गुल्म, आनाह आणि विपूचिका यांचा नाश होतो.(५) जेपाळबीज, पारा, गंधक, सुंठ, मिरी पिपळी, टांकणखार याचें चूर्ण तीन दिवस खलांत घोटावें आणि मासाभर चूर्ण तूपसाखरेंत द्यावें; ह्मणजे आनाह, उदावर्त, गुल्म, क्षय व रक्तविकार यांचा नाश होतो.

**उदावर्तांवर पथ्य**—रेच, घाम काढणें, बस्तिकर्म, अभ्यंग व यवान्नें द्यावी, वातोदावर्ताला मलमूत्राचे रेचक, कोंबडे, बकरें, व मासे यांचें मांसरस, मद्य, गाईचें दूध, तूप, चाकवत, कोंवळे मुळे, मूत्रवेगजनित उदावर्ताला तिन्ही प्रकारचे बस्ति, घाम काढणें, अभ्यंग, स्नान, तूप चोळणें इत्यादिक करावींत. निद्रावेगज उदावर्तावर गाईचें दूध साखर घालून प्राशन करावें. क्रोधजनित उदावर्तावर बस्ति, अभ्यंग, स्नान, कोंबड्यांचें मांस, साळीचा भात, मद्य व दूध द्यावें आणि तरुण स्त्रिशी मैथुन करावें.

**उदावर्तावर अपथ्य**—मल, मूत्र, यांच्या वेगांचा रोध, सर्व प्रकारच्या डाळी, हारीक, जांभळें, काकडी, वेळूचे कोंब, पिठाचे पदार्थ, विष्टंभकारक पदार्थ, विरुद्ध पदार्थ, जडान्न, तुरट पदार्थ, वमन तूप व आंबट पदार्थ इ० वर्ज करावे.

---

१—असे उदावर्तावर जें औषध घेणें तें प्रात काळी शौचमुखमार्जन करून घ्यावें व त्यावर तासभर निद्रा करावी नतर स्नान उष्णोदकाने करून भोजन करावें. म्हणजे उदावर्त ३ दिवसात शमतें.

## उन्माद ( उन्मत्तवायु. )[1]

॥ उन्मादाः षट्समाख्यातास्त्रिभिर्दैपैस्त्रयश्चते॥ सन्निपाताद्विषाज्ज्ञेयः षष्ठोदुःखेनचेतसः॥

अर्थ—उन्मादरोग सहा प्रकारचा त्याचीं नांवें. वातोन्माद, पित्तोन्माद कफोन्माद, सन्निपातोन्माद, विषाच्या सेवनेंकरून होतो तो, व धन बांधवादिकांचे नाशेंकरून मनाला दुःख होऊन होतो तो दुःखोन्माद. उन्माद ह्मणजे वातादि दोष प्रवृद्ध होऊन आपला नित्याचा मार्ग सोडून अन्य मनोवाहिनी नाडीत जाऊन चित्तविभ्रम करितात. यास्तव या रोगाला उन्माद (उन्मत्त वायु ह्मणतात.)

**कर्मविपाक**—जन्मसमयीं बुधस्थानी सूर्य असून त्याजवर गुरूची दृष्टि असेल तर शस्त्रप्रहारांनीं शरीर विदीर्ण होणें, दूत कर्म करणें, प्रवास, सुरूपता अथवा शुक्रकर्कलग्नी असतां किंवा चंद्रकर्कलग्नस्थ वृषभींचा अथवा लग्नगत असता अशा समयी जन्म झाल्यास उन्मादरोगी, नीच, बधीर, हातापायानें पंगू मुका असा होतो. अथवा तृतीयस्थानी किंवा नवमस्थानीं शनी असेल तर तो पुत्रहिन, सुखहीन मतिमंद उन्मादरोगयुक्त, अत्यंत दीन असा पुरुष होतो. **परिहार**—जे जे ग्रह असतील त्यांची दानें, जप, हवन इत्यादि करावी ह्मणजे शम होतो.

**पूर्वकर्मविपाक**—मदानें किंवा गर्वानें आई, बाप, गुरु, वृद्ध यांचा उपहास ( मानहानि ) छळ करणें, दुसऱ्याचें द्रव्य हरण करणें, निषिद्ध पदार्थाचा अंगीकार करणें, शास्त्र जाणणारा असून अज्ञानासारखें दुसऱ्यास फसविणें, मी ज्ञानी आहें असा गर्व बाळगणें इत्यादिकांपासून उन्मादरोग होतो. **परिहार**—"सदसस्पति" या मंत्राचा जप, होम, "कयानश्चित्र" या सुक्ताचा जप, हिरण्य, मध, द्रव्य याची दानें करावी या प्रकारें दैविक प्रतिकार जाणावा.

**उन्मादाचें कारण** ( मा. नि. )—विरुद्ध, दुष्ट, विषयुक्त, अमंगळ, अशी भोजनें, देव, गुरु, ब्राह्मण याचा तिरस्कार, भय आणि हर्ष यांच्या योगानें मनाला धक्का बसणें आणि विषम चेष्टा ह्म० वेडें वाकडें चालणें. आणि बलवान् पुरुषाशी झोंबी खेळणें इ० कारणानी अल्प सत्वगुणी पुरुषाचे वातादि दोष कुपित होऊन बुद्धीचें राहण्याचें ठिकाण असें जें हृदय ह्म० मन त्याला दुष्ट करूत मनोवह स्रोतसांत राहून मनुष्याच्या अंतःकरणास मोहित करितात.

**उन्मादाचें कारण** ( वाग्भट )—अहित अन्न व पान तसेंच विकृत ज्यात कांहीं विकार उत्पन्न झाले आहेत. असात्म्य, मळयुक्त व विषमान्न यांचा उपयोग केल्यानें दुःखीं व कमी धैर्याच्या मनुष्यास एकाद्या रोगाच्या जोरानें, क्षीण मनु-

---

१—कोमळ मनाचा, विरश्रीमान्, चचल मनाचा पित्तप्रकृतीचा व आपत्वाद सहन न करणारा अशा प्रकारचे मनुष्याच्या मनास प्रपचसबधीं किंवा इतर कारणानें धक्का बसून मस्तक फिरून जातें व त्यामुळें मनास वाटेल ते तो शब्द उच्चारितो.

प्यास विषम चेष्टा केल्यानें, पूज्यांच्या पूजेंत उलटापालट झाल्यास मानसिक व्याधि, विष, व उपविष, यांनी मन विथरून गेल्यास या सर्व कारणानीं धैर्यादि कमी होऊन हृदयांत दोष कुपित होऊन बुद्धीस भ्रम करून मनोवह स्रोताचे मार्ग बंद करून उन्माद उत्पन्न करितात. त्यामुळें बुद्धिज्ञान व स्मरणशक्ति नाहींशी होऊन मनुष्य सुखदुःखास मुकून व ज्याचा हाकणारा नाहींसा झाला अशा रथाप्रमाणें मनुष्यास कमी करितो. काय केलें पाहिजे, काय करावयाचें आहे याचा विचार न करितां उगाच इकडे तिकडे भटकत फिरतो.

**उन्मादाचें लक्षण** ( मा. नि. )—भ्रमिष्टपणा, मनाला चंचळपणा, दृष्टि-चकित, भयशीलता, असंबद्धभाषण, हृदयशून्य, ह्म० विचारशक्ति नसणें, हें उन्मादरोगाचें सामान्य लक्षण होय.

**वातोन्माद** ( मा. नि. )—रुक्ष, अल्प आणि शीत असें अन्न, रेच, वांति, धातुक्षय आणि उपवास या कारणानी अत्यंत वाढलेला वायु, चितादिकांनीं युक्त आलेल्या मनास अत्यंत दुष्ट करून बुद्धि आणि स्मृति यांस सत्वर नाहींशा करतो. हंसण्याचें कारण नसतां हंसणें, किंचित हास्य, नृत्य, गीत आणि भाषण हीं देखील प्रसंग नसतां करणें, हातानें वेडे चाळे करणें, रडणें आणि शरीर खरखरीत व कृश आणि तांबूस होणें आणि आहाराचा परिपाक झाला असतां व्याधीचा जोर जास्त होतो. हें वातज उन्मादाचें लक्षण जाणावें.

**वातोन्माद लक्षण** ( वाग्भट )—अंग कृश, अप्रसंगी रडणें, ओरडणें, मोठ्यानें हंसणें, गालांतले गालांत हंसणें, नाचणें, गाणें, वाजविणें, अंग वेडें वांकडें करणें, बोटें मोडणें, वेणू वाद्य व विणा यासारखें परंतु वेसुरांत वारंवार गाणें, तोंडांतून फेंस येणें, एकसारखें हिंडणें, एकसारखें पुष्कळ वेळ बसून राहणें, पुष्कळ बडबडणें, भलत्याच वस्तूनी शरीरास अलंकार करणें, ज्यावर बसून जावयाचें नाही त्यानें जाण्याचा प्रयत्न करणें, खाण्याच्या पदार्थावर इच्छा असणें, पण ते मिळाले असता त्याचा तिरस्कार करणें, डोळे सुजून वर आल्यासारखे व लालसर होणें व अन्न जिरल्यावर विकार जास्त होणें ही लक्षणें होतात. **उपाय**—( १ ) वातोन्मादांत पहिल्यानें स्नेहपान द्यावें, परंतु दोषामुळें स्रोतांचे मार्ग बंद झाले असल्यास स्नेहयुक्त व सौम्य रेचक द्यावें. (२) चुक्याचा रस समभाग गूळ घालून द्यावा.

**पित्तोन्माद** ( मा. नि. )—अर्धे कच्चें, तिखट, आंबट, दाह करणारें, आणि उष्ण अशा भोजनानें साचलेलें पित्त, तीव्रवेग होऊन अजितेंद्रिय पुरुषाच्या हृदयात राहून पूर्ववत् अति उग्र उन्माद तात्काळ उत्पन्न करितें. तेंणकरून असहनशीलता, तिरसटपणा, नग्नत्व, भय पावणें, पळणें, अंगाला उष्णता, राग येणें, सांवलीत बसणें, शीतान्न आणि शीतजलाची इच्छा आणि पिवळटपणा ही लक्षणें होतात.

**पित्तोन्माद लक्षण** ( वाग्भट )—भीति, राग, हातात ढेंकूळ वगैरे घेऊन

किंवा मुठी वळून मारण्याकरितां लोकांच्या मागें धांवणें, वर्ण पिंवळा होणें, अग्नि, ज्वाला, नक्षत्रें व दिवे नसतांना दिसणें, एखाद्या वस्तूकडे भयचकित नजर लावणें. **उपाय**—( १ ) प्रथम स्निग्ध व स्विन्न करून वमन व विरेचन आणि शिरोबस्ति व शिरोविरेचन हीं द्यावीं. असें केल्यानें शरीर शुद्ध होऊन मन प्रसन्न होतें. ( २ ) कांजी गूळ घालून प्यावी.

**कफोन्माद** ( मा. नि. )—तृप्तिजनक पदार्थ भक्षण करून आयास न करणाऱ्या पुरुषाचा पित्तयुक्त कफ हृदयात अत्यंत वाढून बुद्धि, स्मृति आणि चित्त यांची शक्ति नाहीशी करितो. आणि मोहित करून उन्मादरूप विकार उत्पन्न करितो. तेणेंकरून वाणीचा व्यापार ह्मणजे बोलणें वगैरे बंद होतें. अन्नद्वेष, स्त्री आवडते, एकांतवास, झोंप फार येते, ओकारी होते, तोंडातून लाळ वाहते, जेवल्यावर व्याधीचा जोर होतो. नखें, त्वचा, मूत्र ही पांढरी होतात.

**कफोन्माद लक्षण** (वाग्भट)—अरुचि, नाकांतून शेंबूड वाहणें, घाणेरडेपणा, स्वच्छपणाचा तिटकारा, तोंड सुजणें, व रात्रीं व जेवताच रोगाचा जोर वाढणें. **उपाय**—( १ ) पित्त उन्मादावरील उपचार करावे. (२) दहीं गूळ घालून प्यावें.

**सन्निपातोन्माद** (मा. नि.)—जो उन्माद वातादि तिन्ही दोषांनी व त्यांच्या संपूर्ण कारणांनी होतो तो सन्निपातजन्य उन्माद फार भयंकर होय. त्यामध्यें दोषांची सर्व लक्षणें होतात- याला विरुद्ध चिकित्सा करावी लागते असा हा उन्माद वैद्यांनी सोडावा. कारण हा असाध्य आहे. **उपाय**—(१) तीक्ष्ण नस्य व अंजन करावें. ( २ ) अंगास उटणें लावावें.

**शोकोन्माद** ( मा. नि. )—चोरांनी, राजपुरुषांनी, अथवा शत्रूंनी तसेंच दुसऱ्या कोणी पुरुषांनी, त्रासवलेला, अथवा धन, बंधुनाशानें त्रास पावलेला, अशा पुरुषाचें अंत:करण बळकट दुखावलें असतां त्यास, अथवा इष्ट स्त्रीशीं संभोग करण्यास इच्छिणाऱ्या अशा पुरुषाच्या मनाला भयंकर विकार उत्पन्न होतो. तेणेंकरून तो नानातऱ्हेचें बोलतो, मनातील गुह्य गोष्ट बोलतो, त्याचें ज्ञान विपरीत होतें. तो गातो, हंसतो आणि रडतो ह्मणून तो अत्यंत मूर्ख होऊन जातो.

**शोकोन्माद ल०** ( वाग्भट )—द्रव्य व स्त्री वगैरेंचा नाश होऊन दुःसह दुःखानें मनुष्यास वेड लागतें आणि त्यांत भुताचा संबंध असतो, त्यामुळें मनुष्य फिकट व दीन होतो. वारंवार त्यास मूर्छा येते, हाय हाय ह्मणून विलाप करितो. रडतो व एकाएकीं मरतो. ज्याचा नाश झाला असेल त्याचे गुणवर्णन करितो. शोकानें त्याचें मन फार खिन्न झाल्यामुळें नेहमीं चिंता करितो, अंथरुणावर नेहमीं जागा असतो, व इकडे तिकडे विळावतो ( झोंप येत नाहीं )

**विषोन्माद** ( मा. नि. )—डोळे तांबडे होतात, बल व इंद्रियें आणि श-

रीराची कांति नष्ट होते, अत्यंत दीन होतो. त्याचे तोंडावर काळिमा येते, आणि संज्ञा नाहीशी होते.

**असाध्यलक्षण** ( मा. नि. )—ज्यानें तोंड खालीं घातलें आहे अथवा वर केलें आहे व ज्याचें मांस आणि बळ हीं क्षीण झाली आहेत, आणि ज्याची झोंप उडालेली आहे, असा मनुष्य व तोंड काळें पडणें, कांति, शक्ति व इंद्रियें, ( चक्षुरादि इंद्रियांची शक्ति ) नाहीशी होणें, वेग गेला असता भ्रमिष्टासारखा असणें, व डोळे लाल असणें असा मनुष्य या उन्मादरोगानें नाश पावतो.

**भूतोन्माद** (सुश्रुत)—भूतोन्माद वीस प्रकारचा त्यांचीं नांवें—देवग्रह ह्मणजे गणमातृकादिक १, दानव ह्मणजे पापबुद्धि असे असुर २, गंधर्व ह्मणजे देवगायकादि ३, त्याचाच भेद किन्नर ४, यक्ष ५, पितर ह्मणजे अग्निष्वात्तादिक ६ गुरु ७, प्रेत ८, गुह्यक ९, वृद्ध १०, सिद्ध ११, भूत १२, पिशाच १३, जलादि देवता १४, नाग १५, ब्रह्मराक्षस १६, राक्षस १७, कूष्मांड राक्षस १८, कृत्या १९, वेताळ २० याप्रकारें वीस प्रकारचे देवतादि ग्रह सांगितले आहेत. त्यांतून ज्या ग्रहाचा शरीरांत संचार होऊन त्याचे चेष्टेसारख्या मनुष्य चेष्टा करितो त्याला भूतोन्माद ह्मणतात. **उपाय** ( १ ) अस्वल, कोल्हा, यांचे केंस, लसूण, साळी, वेखंड, हिंग, बकरीचें मूत्र यांचा धूर द्यावा, ह्मणजे मोठाही बलवान् ग्रह शांत होतो.

**देवग्रह** ( **गणमातृकादि** ) ( मा. नि. )—मनुष्य सार्वकाळ संतुष्ट असून शुचिर्भूत असतो, दिव्य पुष्पांचा गंध सेवितो, त्याचे डोळ्यांवर झांपड नसते, सर्वकाळ सत्य आणि संस्कृत असें भाषण करितो, तेजस्वी असून स्थिरदृष्टि असते, वर देणारा, ब्राह्मणांवर प्रीति करणारा, इत्यादि लक्षणेंकरून युक्त असतो.

**दानव** ( **असुर** ) ( मा. नि. )—धर्मयुक्त असून ब्राह्मण, गुरु, देव यांची निंदा करतो, वक्रदृष्टि असून भयरहित असतो, अन्नपानेंकरून तृप्ति पावत नाही, दुर्बुद्धि इत्यादि लक्षणेंकरून युक्त असतो.

**गंधर्व** ( मा. नि. )—सर्वकाळ संतुष्ट असतो, पुष्प, फळ, जलाशय इत्यादिकरून जे युक्तवन व उपवन त्याचेठायीं क्रीडा करावयास इच्छितो, आणि निंदारहित जो आचार त्यानें युक्त असतो. गायन, गंध, फुलें इहीकरून संतुष्ट होतो. चांगला नांचतो, हलका शब्द असून चांगलें मंजुळवाणें हास्य करितो.

**किन्नर**—यांची लक्षणें गंधर्वग्रहासारखी जाणावी.

**यक्ष** ( मा. नि. )—नेत्र आरक्त व चांगले बारीक असून तांबडी अशीं वस्त्रें नेसावयास इच्छितो, मोठा गंभीर दिसतो, झरझर चालतो, थोडें भाषण करितो, सहनशीळ, तेजस्वी त्याला मी काय द्यावें असें बोलतो.

**पितर** ( **अग्निष्वात्तादिक** ) ( मा. नि. ) तो दर्भावर पितरांचे उद्देशेंकरून पिंडदान व जलदान करण्याचें अनुकरण करितो ह्मणजे तशी क्रिया करितो, आणि त्याचें अंतःकरण भ्रांत असतें, अपसव्य वस्त्र नेसतो, अथवा डाव्या हातानें कर्म करितो. व मांस, तीळ, गूळ, दूध, याचे भक्षणाविषयीं इच्छा धरितो, व पितृभक्त असतो.

**गुरु**—गुरु ह्मणजे ब्राह्मणादिक वडील यांचा शाप होऊन त्यापासून मनुष्यास उन्माद होतात, त्यांची लक्षणें प्रेत, गुह्यक, वृद्ध, सिद्ध व भूत यांची लक्षणें अनुमानेंकरून जाणावी.

**पिशाच** ( मा. नि. )—पिशाच ह्मणजे भुताचा भेद आहे, तें शरीरसबंधी रक्तमांस खातें ह्मणून त्याला ह्मणतात. या पिशाचसंबंधीं जो उन्माद होतो, त्याचेठायी मनुष्य वर भूज उचलून धरितो, कृश आणि निस्तेज होतो, बडबड फार करितो, दुर्गंधयुक्त, व अमंगळ असा असतो. सर्व कर्माविषयीं फार चंचळ असतो. फार खातो, लोक नाहींत अशा वनांत फार करून विरुद्ध चेष्टा करीत होत्साता रडत फिरतो.

**जलादिदेवता**—जलदेवता, व स्थलदेवता यांचीहि लक्षणें अनुमानेंकरून जाणावी.

**सर्पग्रह** ( मा. नि. )—या रोगानें ग्रस्त रोगी एखादे वेळेस जमिनीवर उरानें सर्पासारखें गमन करितो, व ओंठावरील जागा जिभेनें सर्पासारखी चाटतो, कोपिष्ट असून गूळ, मध, व दूध यांचे भक्षणाची इच्छा करितो.

**ब्रह्मराक्षसग्रह** ( सुश्रुत )—याचेठायी रोगी मनुष्य, देव, ब्राह्मण, गुरु, वेद व शास्त्र, यांची निंदा करितो आणि आपल्या शरीरास पीडा करितो, व त्याचा वेष ब्रह्मराक्षसासारखा होतो.

**राक्षसग्रह** ( मा. नि. )—यांनी पीडित जो उन्मादरोगी तो मांस, रक्त, व नानाप्रकारचीं मद्यें, याविषयी प्रीति धरितो, निर्लज्ज होतो ह्मणजे गुह्यस्थान वस्त्ररहित झालें तरी शंका पावत नाहीं, दयारहित असतो, मोठा शूरपणा दाखवितो, रागीट असतो, बलवंत असून रात्रीचेठायीं फार फिरतो, चांगल्या कर्माचा द्वेष करितो, असें जाणावें. व कूष्मांड राक्षस, कृत्या, व वेताळ यांची लक्षणे अनुमानेंकरून जाणावी.

**सर्व प्रकारचे उन्मादांवर उपाय**—( १ ) चिकण्याचा रस द्यावा. (२) शरीराला मोहऱ्याचें तेल लावून रोग्यास उन्हांत थोडा वेळ बांधून ठेवावें. ( ३ ) सुंठ, मिरी, पिंपळी, हिंग, वेखंड शिरसाचें बी, सैंधव व मोहऱ्या, ही सर्व औषधें गोमूत्रांत वाटून गोळी करून पाण्यांत अंजन करावें; ह्मणजे उन्माद व चातुर्थिक ज्वर यांचा नाश होतो. ( ४ ) मनशीळ, रसांजन व पारव्याची विष्ठा याचें पा-

ण्यांत अंजन करावें. (५) शंखाहुली, शेतवड, वेखंड, कोष्ट व कोळिंजन यांचें चूर्ण तूप व ब्राह्मीचा रस एकत्र करून शिजवून तूप शेष राहिलें ह्मणजे द्यावें. (६) हिंग ८ तोळे, संचळ ८ तोळे, त्रिकटू ८ तोळे, तूप ५१२ तोळे व तुपाचे चौपट गोमूत्र घालून तूप सिद्ध करावें तें उन्माद, भूतग्रह व अपस्मार याचा नाश करितें. (७) काम, क्रोध, शोक, भय, हर्ष, क्षमा व लोभ, यापासून उत्पन्न झालेले उन्माद, ते त्याचे प्रतिद्वंद्वी जे काम शात्यादिक यांनी निवारण करावे. जसे कामज्वर कामशांतीनें शात होतो याप्रमाणेंच जाणावें. (८) वातोन्मादावर स्नेहपान, पित्तोन्मादावर विरेचन व कफोन्मादावर वमन हितकारक आहे. (९) अपस्मारावर जी औषधें सागितलेली ती सर्व उन्मादावर द्यावी. कारण दोन्हीही रोगांत दोष आणि दूष्यें ही एकच आहेत. (१०) उत्तम गोष्टीनें आश्वासन द्यावें. (११) इष्ट वस्तूचा नाश झाला ह्मणून सांगावें. (१२) उन्मादरोगानें ज्याचें मस्तक फिरलें असेल त्याचे मस्तकास कानापुढील आखास आणि मानेच्या दवणशिरास जळवा लावून लागोपाठ २ दिवस रक्त काढावें त्या न मिळाल्यास वर सागितलेल्या जागीं बिब्व्याच्या तेलाच्या फुल्या घालाव्या. (१३) अद्भुत चेष्टा, कोरड्याचा मार द्यावा, एकांत स्थानीं बांधून त्रास द्यावा. गारोड्याकडील दांत पाडलेला साप आणून एकदम त्याचे अंगावर झोंकून द्यावा. ह्म० तेणेंकरून एकदम भीति उत्पन्न होऊन मनुष्य शुद्धीवर येतो. (१४) तापलेलें लोखंड त्याचे जवळ नेऊन तोंडांत घालण्याचें किंवा डागाचें भय दाखवावें. (१५) कुचक्या मासाची धुरी द्यावी. (१६) काम, क्रोध, भय हर्ष व ईर्षा इ० मनोविकार उत्पन्न करण्याच्या तजविजी कराव्या. आणि जल, अग्नि, वृक्ष, पर्वत व कठिण जागा आणि विहिरी यांपासून त्याचें संरक्षण करावें. कारण ही स्थानें सद्यः प्राणहारक आहेत. (१७) ब्राह्मीचा रस, वेखंड, कोष्ठ, कोळिंजन, श्वेतविष्णुक्रांत व नागकेशर यांचें चूर्ण समभाग करून त्याचें नस्य, अंजन किंवा पान इतक्यास योजिलें असतां उन्माद, अपस्मार, व भूतोन्माद इ० रोग दूर होतात. (१८) श्वेतफुलाचा चिकणा ३॥ तोळे घेऊन त्याचे चूर्णांत दूध घालून तें दूध आघाड्याच्या मुळासहित कढवून थंड करून नित्य प्रातःकाळी देत जावें. (१९) त्रिकटू, दारुहळद, मंजिष्ठ, काळे व पाढरे शिरस ही औषधें पाण्यात वाटून गोळी करून ठेवावी व पाण्यांतच उगाळून नस्य व अंजन करीत जावें; म्ह० उन्माद व ग्रहपीडा आणि अपस्मारांचा नाश होतो. (२०) कल्याणघृत द्यावें. (२१) पारा, गंधक, मनशीळ आणि या सर्वांबरोबर धोत्र्याचें बीज ही सर्व एकत्र खलून नंतर वेखंड व रास्ना याचे पृथक् पृथक् काढे करून त्यांच्या सात सात भावना द्याव्या. नंतर चूर्ण करावें. हा उन्माद गजकेसरी

१—सर्वांत उत्तम हे कीं, मानेच्या मागील खोलव्यात शिरा चुकवून पोत द्यावा. व तो पांच चार महिने वाहू द्यावा. व मस्तकाचा मेंदु वाढण्यास बदामाचा शिरा किंवा पाक देत जावा. व सर्व काळ आनंदात राहील अशी तजविज ठेवावी. म्हणजे उन्माद जाऊन विचार व शांति उत्पन्न होते.

तुपावरोबर एक मासापर्यंत बलाबल पाहून देत जावा; ह्मणजे मोठ्या जलदीनें उन्माद, अपस्मार, भूतोन्माद व ज्वर याचा नाश करील. ( २२ ) पारा, गंधक, हळद, मनशीळ, लोहभस्म, सुर्मा व ताम्रभस्म हीं सर्व समभाग घेऊन शेळीच्या मूत्रांत खलावे. नंतर सर्वांचे दुप्पट गंधक घेऊन लोहपात्रांत घालून हीं वरील औषधें त्यांत पचवावीं. नंतर एक मासा औषध घेऊन तुपाबरोबर खावें. तेणेंकरून अपस्मार व उन्माद यांचा नाश होतो. हें औषध सेवन केल्यावर त्रिकटू व हिंग या दोहोंचें चूर्ण तुपाबरोबर खावें, अथवा मनुष्याचे मूत्रांत पादेलोण घालून तें प्यावें. हा भूतभैरव रस सर्व भूतोन्माद यावर धोत्र्याच्या ९ बिया आणि तूप याबरोबर द्यावा.

**उन्मादावर पथ्य**—जुन्या साटक्या साळीचा भात, मूग व तांबड्या तुरी, यांचे दाळीचें वरण, गव्हाची पोळी, जोंधळ्याची भाकर, धारोष्ण दूध, साखर, पडवळ, चाकवत व तांदूळजा यांची भाजी, तूप, मटक्या, पेरू, खरबूज, द्राक्षें, पिकलें कवठ, कोहळा, फणस, पावसाचें पाणी, नारळ, थंड पाणी इ० सेवन करावें.

**उन्मादावर अपथ्य**—मद्य, विरुद्धाशन, शिळें अन्न, उष्ण पदार्थांचें भक्षण, निद्रा, भूक, तहान व शिंकाचे वेगाचें धारण, कडू व तीक्ष्ण पदार्थ, व्यायाम, कारलें, पालेभाज्या इ० वर्ज कराव्या. भूतोन्मादास उन्मादाप्रमाणेंच पथ्य करावें, परंतु नस्य, अंजन, क्रूर कर्म हीं भूतोन्मादास करूं नयेत.

---

## उपदंश ( गरमी ).

॥ मेढ्रे पंचोपदंशाःस्युर्वातपित्तकफैस्त्रिधा ॥ सन्निपातेनरक्ताच्च ॥

**अर्थ**—वात, पित्त, कफ, सन्निपात व रक्त या भेदेंकरून पाच प्रकारचा उपदंशरोग होतो.

**कर्मविपाक**—शुक्राच्या महादशेंत चंद्राची अंतरदशा प्राप्त झाली असता नखरोग, दर्शनरोग, ( नेत्ररोग ) शिश्नरोग ( गरमी ) कामला, हे रोग प्राप्त होतात. **परिहार**—चंद्राची दानें, जप, होम इत्यादि करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—मातृगमन करणारा जो त्यास गरमी, शूळ हें रोग होतात. **परिहार**—कुबेराची सुवर्ण मूर्ति करून तिचें पूजनपूर्वक दान करावें किंवा विषयाचा नियम एकपत्नीव्रत वगैरे नेम करावा.

**उपदंशाचें कारण**—हाताच्या अभिघातानें, नख, दांत लागल्यानें, मैथुनानतर न धुतल्यानें, अत्यंत रति केल्यानें, योनिदोषानें, घाणेरड्या पाण्यानें धुतल्यानें, ज्या स्त्रिया बहुत पुरुषांशी संग करितात अशा स्त्रियांशी संग झाल्यानें, दुःख भरलेली अथवा जिचे योनीत अन्य कारणानें निरंतर गरमी ह्मणजे उष्णता अ-

सते अशा स्त्रीशीं संग झाल्यानें, दीर्घ, कर्कश, असा केंसांनीं दुष्ट किंवा रोगोपद्रवानें दुष्ट जी योनि तिचे दोषेंकरून, रजस्वला, बाळंतीण यांशीं गमन करणें, तीक्ष्ण पदार्थांचें सेवन किंवा स्त्रीशीं मुळीच गमन न करणें, अविचारानें स्त्रीगमन करणें, विषम, मलीन व बारीक असा जिचा योनिमार्ग आहे तिशीं किंवा पश्वादिकांशीं मैथुन केल्यानें, जिची इच्छा नाहीं अशी स्त्री, अगम्य ह्मणजे भगिनी वगैरेंशीं संग केल्यानें लिंगवृद्धि होण्यासाठीं तीक्ष्ण लेप करणें, इंद्रियास इजा देणें, विषारी लेप लावणें, शुक्रवेगाचा अवरोध, फार वेळ घर्षण, अत्यंत कठिण ज्याचा स्पर्श आहे अशा इंद्रियाशीं घर्षण, इत्यादि सर्व कारणानीं किंवा थोड्या कारणांनीं उपदंश ह्मणजे गरमी रोग उत्पन्न होतो. हा रोग सांसर्गिक आहे ह्मणजे ज्या पुरुषांस किंवा स्त्रियांस उपदंश झाला असेल त्यांचें उच्छिष्ट अन्न, पाणी किंवा इतर उच्छिष्ट पदार्थ सेवन केल्यानें अथवा त्यांनी परिधान केलेलें वस्त्र ज्यावर लशींचे वगैरे डाग असें वस्त्र निरोगी मनुष्यानें नेसून स्नान केल्यानें किंवा व्यथींत मनुष्यानें ज्या ठिकाणीं लघवी केली असेल त्या जागीं निरोगी मनुष्यानें लघवीस बसल्यानेंही हा रोग उत्पन्न होतो. कोणी त्यास वलांडा भरला आहे असें ह्मणतात. याशिवाय जे पुरुष झोंपेंत असतांना स्वप्नावस्था होते व त्या वेळेस इंद्रियप्रक्षालन न केल्यामुळें ते रेतबिंदू इंद्रियांत तसेच राहून त्या जागी चट्टे होतात. आणि अति उष्ण पदार्थ सेवन केल्यामुळें प्रमेहादिक व्याधि उत्पन्न होऊन धातु विकृत होते. व त्यापासूनही उपदंश रोग होतो. घोड्यावर बसून अथवा प्रखर उन्हांत पुष्कळ वेळ फिरून लागलेंच स्त्रीशी गमन करणें; बंदेज ठेवणारीं पारदादि रसायनें व गुटिका सेवन करणें कारण त्यात कच्चेपणा राहिल्यानें उपदंश रोग उत्पन्न होतो असें जाणावें.

**वातोपदंश** ( मा. नि. )—शिश्नावर काळे फोड उठून त्यांना टोंचणी, फुट, आणि स्फुरण हीं होतात. शिश्नास सूज, अनेक प्रकारच्या वेदना, शिश्न ताठतें व त्वचा फाटते हीं लक्षणें होतात.

**पित्तोपदंश** ( मा. नि. )—पिंवळे फोड येतात व त्यांतून पाणी वाहतें, आग होते, रक्तानें मासासारखे तांबडे फोड येतात. सूज व पिकलेल्या उंबराप्रमाणें कठिण तिडीक हीं लक्षणें होतात.

**कफोपदंश** ( मा. नि. )—पांढरे दाट व मोठाले फोड येतात, कंडू, सूज आणि दाट पू वाहतो, कठिण, तुळतुळीत जाड स्पर्शानें थंड अशीं लक्षणें होतात.

**सन्निपातोपदंश** ( मा. नि. )—या उपदंशात नानाप्रकारचे स्राव व वेदना होतात, हा त्रिदोषज उपदंश असाध्य आहे. अंडास सूज, तीव्र वेदना, लवकर पिकणें, फाटणें व किडे पडतात हीं लक्षणें होतात.

**रक्तोपदंश** ( सुश्रुत )—रक्तस्राव, ज्वर, श्वेत फोडांनीं युक्त असतो हीं लक्षणें होतात.

तोंड इतक्या ठिकाणीं कालिमा येऊन चट्टे पडतात, अंगांतील रक्त बिघडतें, त्या योगानें पुढें महारोग अथवा कुष्ठरोग परिणामीं उत्पन्न होतो.

**उपदंशयुक्त स्त्रीचीं लक्षणें**—ज्या स्त्रियांस उपदंश विकार असतो त्यांची साधारण बाह्य लक्षणें अशी असतात कीं ओठ व हिरड्या यांचा रंग फिकट असणें, ओंठ शुष्क असणें, डोळे वटवटीत, धूम्रवर्ण, आणि आंत ओढलेले असणें, डोळ्यांच्या पापण्याखालीं किंचित् कालिमा भासणें, उरःस्थान तप्त असणें, धडकी, कृशता, मुखावर निस्तेजता, क्वचित् चालते वेळीं विपर्यास, मलीनता, तोंडावर पिवळेपणाची छाया युक्त धोदरी, ही लक्षणें ज्या स्त्रियेला असतील तिला उपदंश आहे असें जाणावें.

**असाध्य लक्षण ( मा. नि. )**—ज्या उपदंशानें मांस गळलेलें आहे, आणि कृमींनीं शिश्न खाऊन टाकलें, अंड मात्र अवशेष राहिलें, तो रोगी वैद्यानें सोडावा. उपदंश होताक्षणीच जो मूर्ख पुरुष विषयासक्त होऊन उपचार करीत नाही त्याचें शिश्न कांही दिवसानी सुजून किडे पडून गळून जातें, त्यामुळें रोगी मरतो.

**सर्व प्रकारचे उपदंशावर उपाय**—( १ ) या रोगावर प्रथम ढाळकाचें औषध देऊन नंतर दुसरे दिवशी मूत्रढाळ द्यावा. नंतर तिसऱ्या दिवशीं औषधाची योजना करीत जावी.

**मळशुद्धीचें औषध**—(१) त्रिफळ्याचा काढा एरंडेल घालून द्यावा. ( २ ) निशोत्तर चूर्ण साखरमिश्रित द्यावें. ( ३ ) रेवाचिनीचा शिरा गुंजप्रमाण सुपारीएवढ्या गुळात घेऊन वर कोंबट पाण्याचा घोट ध्यावा. याशिवाय पाहिजे असल्यास प्रथम ढाळकाचे प्रयोग सांगितले आहेत त्यांतून योजना करावी. पथ्य तूपभात किंवा दहीभात.

**मूत्रढाळ**—( १ ) एक शेर दुधांत एक शेर पाणी घालावें. नंतर त्यांत सोन्याची पूड २ मासे व सोनकावीची पूड सहा मासेपर्यंत घालून तें चांगलें ढवळून उभें राहून पोट भरेपर्यंत प्यावें व हळू हळू व्यायाम करावा. बसूं नये, ह्मणजे इंद्रियजुलाब होऊन त्या योगानें गरमी व परमा वाहून जातो. राहिलेल्या औषधाचें मिश्रण प्रत्येक लघवीचेअंती पोटभर पीत जावें. ( २ ) पळसाची सुकलेली फुलें आठ तोळे घेऊन त्यात २ शेर पाणी घालून वर झांकण ठेवून त्या झांकणांत पाणी घालून मंदाग्नीवर चार वाफा येईतोंपर्यंत कढवावें. नंतर फुलें पिळून काढून तें पाणी गाळून त्यांत २ मासे सोन्याची पूड घालून शक्तीप्रमाणें पीत जावें, ह्मणजे मूत्रढाळ होऊन लघवी साफ होते. ( ३ ) पाणी न घालतां दूध दोन शेरपर्यंत घेऊन कल्हईचे भांड्यात तापवावें. चांगलें खरपुस तापलें ह्मणजे त्यात २ मासे तुरटीची पूड घालावी. या योगानें तें दूध नासून चोथापाणी होतें. नंतर तें पाणी गाळून घेऊन चोथा टाकून द्यावा. नंतर त्या पाण्यांत वेलदोड्याची पूड ६ मासे व अदमासानें पिठीसाखर थोडी

घालून तें थंड झाल्यावर वरप्रमाणें पित जावें. ह्मणजे मूत्रढाळ होतील. ( ४ ) एक शेर दुधांत दोन शेर पाणी घालावें नंतर सोन्याची पूड २ तोळे, व लकडी रेवाचिनीची पूड १ तोळा घालून सर्व एक जागीं करून प्रथम पोटभर प्यावें व प्रत्येक लघवीचेअंती राहिलेलें पीत जावें, ह्मणजे इंद्रियजुलाब होऊन गरमी व परमा वाहून जाईल. पथ्य दूधभात. हें पथ्य वरील सर्व मूत्रढाळांवर करावी.

**बदावर उपाय**--किती एक वैद्यांचें मत असें आहे कीं, बदाचा उद्भव होऊन तें साधारण जोरास लागलें असतां तें पिकविण्याचे उपचार करून जळवा लावून किंवा फांसण्या मारून अथवा सळईनें त्यांतील दूषित रक्त काढून त्याचा जोर कमी करावा. आणि तें बरें होण्याविषयींचे उपचार करावे; ह्मणजे पुढें अन्य व्याधीचा उद्भव होत नाहीं. किंवा बद उत्पन्न होतांच ओढें व लेप लावून बसवून टाकावें. जें बद चोळवटून ताठरतें त्याला दोन दोन मोठ्या जळवा लावाव्या, आणि त्या जळवाची मुखें ह्मणजे रक्त काढण्याकरितां केलेलीं रंध्रें ह्म० छिद्रें पिकवून त्या द्वारें आंतील रक्त काढून टाकावें व शामक उपचार करावे. बदावर लेप---( १ ) उत्तम मध ४ भाग व कळीचा चुना ३ भाग एकत्र चागले मिश्र करून त्याचा लेप बदावर द्यावा; व वर शेंदूर बसवावा. ( २ ) चांफ्याचा चीक लावावा. ( ३ ) रुईची मुळी आणून पाण्यात लेप द्यावा; ह्मणजे कसाही बद असला तरी नाश होतो. (४) पिपळीचा चीक व गंधाबिरोजा एकत्र खलून बदावर लेप द्यावा, ह्मणजे तो फुटून नाहींसा होतो. ( ५ ) मुरदाडशिंग, गूळ, शेंदूर, कळीचा चुना व कोंबड्याचे अंड्यातील बलक हे सर्व समभाग घेऊन त्यांचा बदावर लेप करावा. ( ६ ) कोंबड्याचे अंड्यांतील बलक, कळीचा चुना व शेंदूर ही सर्व एकत्र करून लेप करावा. व विटकरीचा टोला तापवून फडक्यात गुंडाळून सोसेल तितका शेक द्यावा. ( ७ ) उंबराचा चीक, धूप व काजूची बी हीं उगाळून लेप द्यावा; ह्मणजे ३ दिवसांत गांठ बसून गुण चांगला येतो. ( ८ ) आळशीचे किंवा गव्हाचे पोटीस दुधांत करून त्यांत हळदीची पूड घालून वरचेवर बदावर बांधीत जावें. ( ९ ) चुना व बिबवा एकत्र वाटून त्याची पट्टी बदावर बाधावी. ( १० ) शेंदूर व रेवाचिनीचा शिरा बारीक करून फडक्याला लावून पट्टी द्यावी. ती ओढून धरून बदास बसविते.

**चांदी, चट्टे व बद यांवर मलम**--( १ ) गाईचें लोणी २॥ तोळे, उत्तम सफेता १ तोळा व कापूर ३ मासे, या सर्वांचें एकजागी मलम करून गर्मीचे चट्टे फोड, खरूज, विस्फोटक व बदाचे व्रण इ० सर्व प्रकारचे व्रणांनर लावावें. ( २ ) पाढरी सुपारी जाळून तिची काळी राख, पांढरा कात व मुरदाडशिंग ही सर्व समभाग लोण्यात खलून तें मलम व्रणांवर लावीत जावें. ( ३ ) त्रिफळा कढईत जाळून त्याची काळी राख मधात खलून लेप करीत जावा. (४) मुरदाडशिंग व राळ फार बारीक खलून ती पूड चट्ट्यावर, बसवीत जावी. ( ५ ) खडीसाखर, पांढरा कात, गंधक आणि वंशलोचन ही एकेक तोळा व मुरदाडशिंग ॥· तोळा या सर्वांचा

मधांत खल करावा. आणि तें मलम लावीत जावें; ह्मणजे असाध्य स्थितींत जरी उपदंशसंबंधीं चट्टे असले तथापि निःसंशयानें बरे होतात. ( ६ ) पांढरा कात, वेलची दाणे, मुरदाडशिंग, कापूर व सफेता हीं सर्व समभाग घेऊन काजळाप्रमाणें बारीक खलून दिवसांतून ३।४ वेळ चट्ट्यावर दडपून लावीत गेलें असतां लवकर गुण येतो. ( ७ ) रसकापूर, मुरदाडशिंग व गोपिचंदन ही पाण्यांत खलून गोळ्या कराव्या व तुपांत गोळी उगाळून गर्मीचे चट्ट्यास लावीत जावी. ( ८ ) त्रिफळ्याचे काढ्यानें चट्टे वगैरे व्रण धुऊन टाकावे, किंवा त्याच काढ्याची पिचकारी देऊन व्रण धुवावा. अथवा तुरटीची लाही पाण्यांत विरघळून त्यांत थोडा कात घालून त्याची पिचकारी द्यावी. ( ९ ) मोगलीएरंडाच्या बियाचें तेल जितकें जुनें मिळेल तितकें घेऊन कापसाच्या चकत्या त्यांत भिजवून व्रणावर ठेवीत जाव्या. व वर त्याच तेलाचे थेंब सोडीत रहावें. अस्तमानीं ती चकती काढून टाकावी. व पूं पुसून काढून वरप्रमाणें दुसरी पट्टी बसवीत जावी. हा उपाय फार उत्तम आहे. ( १० ) घोसाळीचे पानाचा रस एकशेर त्यांत गाईचें किंवा शेळीचें जुनें तूप अर्धशेर घालून कल्हईचे पात्रात घालून मंदाग्नीनें तूप शेष राहीतोंपर्यंत कढवावें. नंतर त्यांत मोहाचें मेण ९ तोळे टाकावें. तें मेण तुपांत चागलें मिळाल्यावर खाली उतरावें. नंतर एका परातींत पाणी भरून त्या पाण्यांत तें तूप ऊन आहे तोंच गाळून ओतावें. ह्मणजे एक प्रहरानें पाण्यावर सर्व औषध जमून राहते. नंतर तें वरील औषध घेऊन पातळ चौघडी कपड्यावर ठेवून त्याजवर तसाच कपडा घालून हलक्या हातानें दाबावें; ह्म० आंतील पाण्याचा अंश निघून जातो. नतर तें मलम डबींत भरून ठेवावें. नंतर चांदी, चट्टे, बदाचीं क्षतें व अशाच प्रकारचा अन्य कोणताही व्रण मोठा असाध्यही असला तरी तो तात्काळ भरून येतो यांत संशय नाही. हें मलम दिवसातून पांच चार वेळ लावीत जावें. ( ११ ) व्रण पाण्यानें किंवा त्रिफळ्याचे काढ्यानें धुतल्यावर हिराकशीचें वस्त्रगाळ चूर्ण वर दडपावें. ( १२ ) पांढरा कात १ तोळा, संगजिरा १ तोळा, चिकण सुपारी १ तोळा, या तिन्ही औषधाची निरनिराळी पूड करावी. नंतर काशाचे ताटात गाईचें लोणी २॥ तोळे व ३ मासे रसकापराची बारीक पूड घालून काशाच्या वाटीनें घोटावें. त्याचा एकजीव झाल्यावर त्यात कात, सुपारी व संगजिरा या तिहींची पूड घालून तें मलम चागलें घोटून ठेवावें. फार घट्ट झाल्यास थोडें आणखी लोणी घालावें व डबींत भरून ठेवावें. व तें चट्टे, चादी वगैऱ्यास लावीत जावें. हें अगदीं रामबाण आहे. मोगलीएरंडाचा चीक लोखंडाचे तव्यावर काढावा व त्यांत प्रातःकाळचा पारोसा थुंका मिश्र करून त्याच तव्यावर त्या मिश्रणांत रसकापराचा खडा थोडा उगाळावा व त्याचा लेप लावीत जावा, ह्म० हटकून कसाही व्रण असला तरी त्याचा खात्रीनें नाश होतो.

---

१—हे मलम प्रतीवर्षी भाद्रपदमासीं एकदां करून ठेविलें ह्मणजे वर्षभरपर्यंत उत्तम रीतीनें काम करितें.

**लिंगवर्तिउपदंश**--शिश्नावर मांसाचे कोंब, एकावर एक उगवून कोंबड्याच्या शेंडीसारखे कोशाच्या आंत मण्यावर किंवा सर्व संधीवर होतात. कोणी यास लिंगार्श म्हणतात. ही त्रिदोषजन्य आहे ह्मणून वेदनायुक्त व बुळबुळीत असते. **उपाय**—( १ ) लिंगार्श कापून क्षारानें किंवा अग्नीनें भाजून नंतर उपदंशाप्रमाणें; चिकित्सा करावी. ( २ ) रसांजन, मोरचुत, शिलाजीत, हरताळ व मनशीळ, ही सर्व समभाग वांटून लेप करावा; ह्मणजे मांसाकुरानें झालेल्या लिंगवर्तीचा नाश होतो. ( ३ ) लिंगवर्तीवर व्रणाप्रमाणें सर्व उपचार करावे. ( ४ ) क्षारानें घर्षण करून हिराकसाचे चूर्णाचा लेप करावा; ह्मणजे लिंगवर्तीचा जोर कमी होतो. ( ५ ) प्रथम झालेले अंकुर मुळाबरोबर खरडून टाकावे ह्मणजे त्यांतून रक्तस्राव होऊं लागतो. त्याजवर तावडतोब कळीच्या चुन्याची कोरडी पूड दडपून बसवावी. आणि एक बारीक फडकें त्याजवर ठेवून तें सभोंवतीं गुंडाळून बांधून ठेवावें. ह्मणजे रक्त बंद होऊन चुन्याची वाफ मोडाचे मुळांत पोंचते. दुसरे दिवशीं त्या चुन्याची खपली काढावी ह्मणजे पुन्हां रक्त येऊं लागतें. त्याजवर पुन्हां वरप्रमाणें चुना बसवावा. याप्रमाणें दोन तीन दिवस करून शेवटीं बसविलेला चुना दोन दिवस तसाच ठेवून तिसरे दिवशी ती घट्ट झालेली खपली उपटून काढली असतां थोडी इजा होते, परंतु त्या अंकुराचीं मुळें उपटून येतात. त्यावेळी त्या क्षतांतून फार रक्त जाऊं नये ह्मणून पाण्याची पट्टी बांधावी किंवा दुसरीं शिरा वेध प्रकरणांतील रक्तप्रवाह बंद होणारीं औषधें योजावीं. याप्रमाणें रक्त बंद होऊन त्या जागेची खपली जाऊन खांच भरून आली ह्मणजे रोगाचा नाश होतो.

**सर्व उपदंशांवर उपाय**—( १ ) कडू पडवळ, कडू निंब, त्रिफळा व काडेकिराईत याचा काढा द्यावा. ( २ ) आंब्याच्या सालीचा स्वरस २ तोळे त्यात शेळीचें तूप ४ तोळे घालून प्रातःकाळी प्राशन करावें. दिवस सात (३) शुद्ध पारा विवा, पिपळी, पिपळमूळ, आक्कलकारा, जायपत्री, वंगभस्म, व लवंगा ही सर्व समभाग जुन्या गुळात खलून वालप्रमाण गोळ्या साजसकाळ द्याव्या ह्मणजे सर्व प्रकारचे उपदंशाचा नाश होतो. ( ४ ) मुरदाडशिंग १, कोष्ठ १, व मोरचुत ॥ तोळा याचा आल्याच्या रसात खल करून वालप्रमाण गोळी आल्याचे रसात सांजसकाळ देत जावी. त्याजवर मधुर, आंबट, मासे, दूध, व कोहळा हे पदार्थ सेवन करूं नयेत. ( ५ ) तीन मासे शुद्ध गंधकाचें चूर्ण विड्याचे पानाशी द्यावें व तूप

---

१—हा रोग उपदंश विकारापासून होतो. प्रथम शिश्नाचे त्वचेचे आत किंवा अन्यस्थळीं उडदा एवढी गाठ उठते आणि काही दिवसानीं त्यातून मोड निघू लागतात हे मोड आरंभी लहान असून त्याचे वरील भाग पसरट आणि चिरल्यासारखे शुभ्र असतात नंतर त्याचे मुळातून आणखी तसेच कोंब उद्भवतात. असे काहीं दिवस गेल्यावर त्या कोंबावर आणखी एकेक कोंब फुटतो. हे अंकुर तांदुळाप्रमाणे व मृदु असतात. वारुळाप्रमाणे एकावरएक असे कोंब वाढतात. हे अंकुर नखानीं खुडून काढले तरी दुखत नाहींत, परंतु त्यातून रक्त निघू लागतें आणि काहीं दिवसानीं ते पूर्ववत् वाढतात. या रोगाचे मूळ छेदून टाकल्याशिवाय शांति होत नाही.

वर्ज करावें. ( ६ ) पारा १, व गंधक २ भाग घेऊन त्यांची कज्जली एक मासाप्रमाण गाईच्या तुपाशीं चौदा दिवसपर्यंत सांजसकाळ द्यावी. पथ्य गव्हाची पोळी व तूप. बाकी सर्व वर्ज. ( ७ ) मोरचुत १, लवंगा १, पांढरा कात १, व बाळहिरडे ४ भाग यांचा लोखंडी कढईत चाळीस निंबांचा रस आटेतोंपर्यंत खल करून गोळी वालप्रमाण साजसकाळ तुपांत द्यावी. ( ८ ) गाध्यानचे पाल्याचा रस २ तोळे एकत्र करून पांच किंवा सात दिवसपर्यंत सांजसकाळ देत जावें. पथ्य अलवणी, ह्मणजे हटकून गुण येतो. ( ९ ) कलखापरी १ तोळा, हिराकस ३ मासे मोरचुत ३ मासे, व शिलाजीत १ मासा ही औषधें एकत्र करून २१ निंबाच्या रसांत खलून गुंजप्रमाण गोळी तुपांत गिळावी. पथ्य खिचडी व तूप. ( १० ) पत्री १ तोळा, मिरीं १ तोळा, वेलदोडे १ तोळा, लवंगा १ तोळा, रसकापूर ॥ तोळा, या सर्वांचें चूर्ण करून १४ पुड्या कराव्या व सांजसकाळ एकेक पुडी तुळशीचे पाल्याचे रसांत देत जावी. याप्रमाणें सात दिवस औषध खाऊन सर्व वावडे पदार्थ खावे. आठवे दिवशी डोकीवरून गार पाण्यानें स्नान करावें. व मग पथ्य गव्हाची पोळी, तूप व साखर, व अपथ्य तेलकट, तिखट, आंबट याप्रमाणें चौदा दिवस पुढें पथ्य करावं; म्हणजे चांगला गुण येतो. ( ११ ) जायफळ १ तोळा, पत्री १ तोळा, लवंगा १ तोळा, मिरी १ तोळा, रसकापूर १ तोळा, शाळू जोंधळ्याचे दाणे १२, ही सर्व औषधें एकत्र करून नागवेलीचे पानाचे रसांत खल करावा, आणि बोराच्या आठोळीएवढ्या गोळ्या कराव्या. व सांजसकाळ एकेक गोळी तुपाबरोबर सेवन करावी. पथ्य दही व दूध वर्ज करून बाकी सर्व खावें. या औषधानें कदाचित् तोंड आल्यास बाभळीच्या साळीचा चतुर्थांश काढा करून त्याच्या गुळण्या करीत जाव्या. नंतर गंधक तुपांत खलून त्यात कापसाची वात भिजवून पेटवावी. त्यांतून जें तेल पडेल तें काढून ठेवावें व तोंडास लावीत जावें. (१२) जेपाळ बियांतील पांढरे गोळे १ तोळा, घेऊन पाण्यात चांगले उकळावे. नंतर फोडून आतील मोख काढून टाकावे. नंतर बाळहिरडे ४ तोळे, व सोन्याचा वर्ख १ मासा, ही सर्व औषधें निंबूरसांत खलून गुंजप्रमाण गोळ्या कराव्या व सांजसकाळ एकेक गोळी चिमुटभर साखरेंत देत जावी. ( १३ ) पांढरा कात २ तोळे, शुद्ध रसकापूर । तोळा, लवंगा ३ मासे याचे बारीक चूर्ण करून तें चूर्ण सुमारें एक मासा विड्यांत देत जावें. दिवस ७. ( १४ ) रसकापूर १ तोळा, तुपांत तांबडा होईतोंपर्यंत तळावा, नंतर कंकोळ दाणे २८ व वेलदोडे १४, आंबेमोहराचे तांदूळ १ तोळा, या सर्वांचें बारीक चूर्ण करून तांदुळाचे धुवणात गुंजप्रमाण गोळ्या कराव्या व साजसकाळ एकेक गोळी तुपात द्यावी. ( १५ ) रसकापूर नागवेलीच्या पानाच्या रसात खलून गुंजप्रमाण गोळया कराव्या. व प्रातःकाळी एकेक गोळी तुपात देत जावी. पथ्य तूपभात.

**कथली गरमी**—इच्यात तीन प्रकार आहेत. गरमी अंगांत मुरली ह्मणजे पुढें कथली गरमी होते. हा गरमीचाच भेद आहे. व त्याप्रमाणेंच रोगाची मूळस्थि-

ति होते. इतर प्रकारच्या गरमीवर जी औषधें सांगितलीं आहेत त्याच औषधांनीं हा रोग शमन झाल्यासारखें वाटतें. व कांहीं दिवस गेल्यावर वातूळ पदार्थ खाण्यांत आल्यानें किंवा उन्हाळे दिवसांत अथवा हिंवाळे दिवसांत हाताचे किंवा पायाचे बोटांस अथवा अंगावर किंवा इंद्रियावर फुटकुळी आल्याप्रमाणें भास होऊन तेथें कंडू सुटतो व खाजविल्यानें ती पुळी लागलीच पसरते व अल्प काळांतच चिघळते. व त्या फुटकुळीचा एक चट्टा बनतो. त्या चट्यांतून रात्रंदिवस लशीचा स्राव होऊन वेदना होतात. अशा प्रकारचे पडलेले चट्टे कितीही उपचार केले तरी दोन दोन वर्षे बरे होत नाहींत. कारण त्याचा प्रादुर्भाव विषासारखा असून जेथें चट्टा पडतो तेथील मांस कुजूं लागतें. ह्मणजे बोटास झाला असतां बोट कुजून झडून जातें. तसेंच शिश्नास झाल्यास तेंही कुजून झडून जातें. व इतर अंगांवर झाला असतां व्रणाप्रमाणें छिद्र होतें. कांहीं वैद्यांचे मतें अशा रोगावर वनस्पतींचेंच औषध चांगलें काम करितें, असें अनुभवास आलें आहे. याचे एकांत एक असे तीन भेद आहेत, त्यांतील हा एक भेद आहे असें जाणावें. **याजवर उपाय—( १ )** एक तोळा सराटे व एक तोळा गुळवेल थोडी कुटून आच्छेर पाण्यांत अष्टमांश काढा करावा. त्यांत सहा मासे खडीसाखरेची पूड घालून प्रातःकाळी सेवन करीत जावा व रात्रीं निकाढा घेत जावा. ( २ ) वांकेरीचें भातें गाईचे पांच तोळे निरसे दुधांत सहा मासेपर्यंत उगाळून प्रातःकाळी व सायंकाळी याप्रमाणें दुवक्ता सहा सात सप्तकें दिली असता हटकून गुण होतो. हें कोंकणी औषध मोठें रामबाण आहे व कोंकणांत प्रसिद्ध आहे. कोणी हे औषध गाईच्या तुपांत देतात त्यानींही गुण येतो. व चट्यावर वाकरीचेंच भातें थंड पाण्यांत किंवा गाईचे तुपांत उगाळून त्याचा गंधाप्रमाणें वारंवार लेप करीत जावा. **पथ्य**—गव्हाची पोळी तूप व साखर बाकी सर्व वर्ज्य. ह्या उपायानें मोठी भयंकर गरमी असली तरी तिचा खातरीनें नाश होतो.

**कथली गरमी ( प्रकार दुसरा )**—गरमीचा रोग प्रथम उद्भवून तो उपचारानें शात झाल्याप्रमाणें वाटतो. परंतु पुढें काहीं दिवसानी तो विकार शरीरात मुरतो आणि सर्व शरीरातील रक्त दूषित करून सर्व अंगावर विषार फुटल्यासारख्या गाधी व फुटकुळ्या येतात. प्रथम त्याचा रंग तांबडा असून नंतर लागल्याच काळ्या होतात. त्या योगेंकरून कंडू, निद्रानाश, अंगाची आग, पोटांत दाह, इत्यादि विकार होतात. हे काळे चट्टे बरे न होता फार दिवस त्रास देतात. **उपाय**—( १ ) सराटे २ तोळे व कंकोळ ॥ तोळा, यांचा काढा निकाढा खडीसाखरेचें चूर्ण घालून बरेच दिवस सेवन केला असता गुण येतो. ( २ ) कडू जिरें, बावच्या, आंबेहाळद व टाकळ्याचे बी, ही सर्व औषधें समभाग व या सर्वांसमान नागकेशर घेऊन साधारण कुटून गोमूत्रात किंवा निंबाचे रसांत तीन दिवस भिजत घालून नंतर बारीक वांटून त्याचा एक गोळा करून ठेवावा. दररोज हें उटणें गा-

ईचे दुधांत कालवून दोन वेळ अंगास लावावें व एक प्रहर गेल्यानंतर स्नान करीत जावें. दुवक्त न सोसल्यास एकच वेळ स्नान करीत जावें.

**कथली गरमी ( प्रकार तिसरा )**—वरील दोन प्रकारांप्रमाणें आरंभीं गुण आल्यासारखें वाटतें परंतु जी गरमी अंगांत मुरलेली असते त्या योगानें वातूळ पदार्थ सेवन होतांच ती गरमी सर्वांगावर फुटण्यास प्रारंभ होतो. शरीरांतील रक्त नासून फुटकुळ्या येतात. त्या खाजिवल्या असतां तेथें चट्टे पडतात, व ते सर्वकाळ ओले असतात व नायट्याप्रमाणें दिवसेंदिवस वाढत जातात व ते गजकर्णासारखे तांबूस दिसतात. हा प्रकार मोठा त्रासदायक आहे. **उपाय**—( १ ) याच चट्ट्यांवर मागें जीं मलमें सांगितली आहेत तीं लावीत जावीं ह्मणजे गुण येतो. निराळ्या उपचाराची जरूरी नाहीं.

**आगांतुक गरमी**—या प्रकारची गरमी स्त्रीगमनानेंच होते असें नाहीं, एरवीं अति उष्ण पदार्थ सेवन केल्यानेंही होते. किंवा गरमीची वर कारणें सांगितलीं आहेत त्यांपैकीं कोणत्याही एका प्रकारानें लघवीचेवेळीं किंचित् जळजळ होते. नंतर उन्हाळे लागल्याप्रमाणें वारंवार लघवी होते. व लघवीचे वेळी दाह फार होतो. हा प्रकार फार तर एक दिवस होतो.इतक्यात धातू बिघडून ती लघवीचे वेळी थोडी थोडी पडूं लागते. पुढें एक दोन दिवसांत वृषणापासून गुदद्वारापर्यंत जी शिवण आहे त्याचे आंत एक नळी आहे. त्या नळींत एक फोड उत्पन्न होतो. त्या फोडास दोन तीन दिवसपर्यंत राहून राहून अति कठिण अशा कळा येतात. त्या योगानें रोग्याचा जीव कासावीस होतो. अशा प्रसंगी कांदा तुपांत तळून त्याच्या पोटळ्या बांधाव्या व त्या पोटळ्यांनीं बाहेरून त्या जागी सोसेल इतका शेंक द्यावा; नंतर रानशेणी गोवरीच्या विस्तवानें शेकावें. या उपायांनी आंतील फोड पिकून फुटतो. नंतर कळा बंद होतात. परंतु लघवीचे मागून प्रति वेळी सुमारें दोन दोन तोळेपर्यंत केवळ दह्याप्रमाणें पांढरे रंगाचा पूं वाहतो. हा प्रकार संयोगानें किंवा स्वाभाविक रीतीनें उष्ण वाढल्यानेंही होतो. ही फोडाची जखम आंतून भरली ह्मणजे तात्काळ सर्व विकार दूर होतात. **उपाय**—( १ ) एक तोळा तुकुमराई रात्रौ करहईचे पात्रांत थंड पाण्यात भिजत घालावी. सकाळी त्यांतच सुमारें आतपाव दूध एक तोळा खडीसाखरेची पूड आंत टाकून एकच दिवस दुवक्त घ्यावें नंतर पुढील उपाय करावें. ( २ ) अर्ध तोळा कबाब चिनी घेऊन थोडी कुटून अष्टमांश काढा करावा व तो शीत झाल्यावर त्यांत उत्तम चंदनी तेलाचे सहा पासून बारा थेंब घालावे व प्राशन करावा. या योगानें लघवी साफ होऊन रोग वाहून जातो. हें औषध प्रातःकाळी, दोनप्रहरी आणि सायंकाळी असें तीन वेळां दिवसांतून घेत जावें. हें औषध सतत पांच दिवस घेतल्याने रोगाची शांति होते. गुण तर दुसरे दिवशीच वाटूं लागतो.

**उपदंशावर पथ्य**—वांति, रेच, जुन्या तांबड्या साळीचा भात, मुगाचें व

तांबड्या तुरीचे दाळीचें अळणी वरण, यव, तूप, दोडके, कारलें, शेवगा, पडवळ, व कोंवळा मुळा, यांच्या भाज्या, शेळीचें दूध, जुन्या गव्हाची पोळी, ससा व हरीण यांचें मांस, तेल व विहिरीचें अथवा कोमट पाणी, साखर इत्यादी पथ्यास सेवन करावें.

**उपदंशावर अपथ्य**—दिवसाची झोंप, मूत्र वेग धारण, जडान्न, मैथुन, गूळ, मेहनत, ताक, व आंबट पदार्थ, गोवारी, वांगी, पावटे, उष्ण पदार्थ, ऊन घेणें, जाग्रण, आयास, बाजरी, तांबडा भोपळा, केळ इ० पदार्थ वर्ज करावे.

---

## ऊरुस्तंभ. ( आढ्यवात )

॥ यदाकफान्वितेनोरू स्तब्धौशीतावचेतनौ ॥ संयुक्तौपादसदन ॥
॥ कृच्छ्रोद्धरणसुप्तिभि. ॥ तमूरुस्तंभमित्याहूराढ्यवातमथापरे ॥

**अर्थ**—जेव्हां कफयुक्त वायूनें मांड्यांचा स्तंभ आणि त्यांना जीव नाहींसा होतो आणि मांड्या बारीक, संकटानें उचलणें, स्पर्श न कळणें अशा होतात, तेव्हां त्या वायूला ऊरुस्तंभ किंवा आढ्यवात असें ह्मणतात.

**कर्मविपाक**—जन्मकाळीं सूर्यस्थानीं शनि अथवा रवि असेल तर ऊरुस्तंभ, बंधुसौख्य, अर्थ, बुद्धि, बाल्यावस्थेंत व्याधि, पुत्रसुख, द्वेष, क्रोध, पर स्त्रीसुख, कर्मठपणा इत्यादि प्राप्त होतात. **परिहार**—शनि व रवि यांची दानें, जप व हवन इत्यादि करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—छिद्र काढून दुसऱ्याचें मन क्षणोक्षणी दुखवितो त्याला ऊरुस्तंभ होतो. **परिहार**—प्राजापत्य प्रायश्चित, गोप्रदान, सुवर्णदान, सहस्रनाम जप कूष्मांड होम, इत्यादिक करावी.

**ऊरुस्तंभाचें कारण** ( मा. नि. )—शीत, उष्ण, ओलें, कोरडें, जड, स्निग्ध, अशी परस्पर विरुद्ध भोजनें, जीर्ण, अजीर्ण, तसाच आयास, चित्तक्षोभ, दिवा निद्रा, रात्रौ जागरण, ह्या कारणानी कफ मेदयुक्त अत्यंत सांचलेल्या आमयुक्त, इतर दोषाला अभिभूत ह्मणजे दाबून टाकून मांड्यात येईल आणि माड्यांची हाडें आंतून मंद कफानें भरली तर तेणेंकरून मांड्या ताठून थंड व निर्जीव होतील, दुसऱ्या माड्यासारखें उचलणें, चालणें, यांविषयी असमर्थ होईल. आणि जड अत्यंत पीडायुक्त होतील आणि चिंता, अंगमोड, ओलसरपणा, तंद्रा, ओकारी, अरुचि आणि ज्वर ही लक्षणें होतात. ह्या रोगाला ऊरुस्तंभ असेंही म्हणतात कोणी आढ्यवातही ह्मणतात.

**पूर्वरूप** ( मा. नि. )—अतिनिद्रा, अत्यंत चिंता, मंदपणा, ज्वर, रोमांच,

अरुचि, ओकारी, जंघा आणि मांड्या गळाल्यासारखें वाटणें, हीं ऊरुस्तंभ होण्या- पूर्वी लक्षणें होतात,

**लक्षण** ( मा. नि. )—वायूच्या शंकेनें व जाणून त्याला स्नेहचिकित्सा केली असता हा अधिकच वाढतो. पाय गळतात, मेहरी येते, उचलायास कष्ट होतात. व जंघा आणि मांड्या ह्या फार गळून जातात आणि निरंतर दाह व वेदना होतात. पाऊल फार ठणकतें, गार पदार्थाचा स्पर्श कळत नाहीं, पाऊल टाकण्यास, रगडण्यास, किंवा चालण्यास अथवा हालविण्यास मनुष्य असमर्थ होतो. पाय, आणि मांड्या, मोडल्यासारख्या वाटून दुसऱ्याच्याच आहेत कीं काय असें मानतो.

**साध्यासाध्यलक्षण** ( मा. नि. )—ज्यावेळेस पुरुष दाह, शूल, आणि तोद ( टोंचल्याप्रमाणें ) यांनी पीडित होऊन कंपयुक्त होतो त्यावेळी तो ऊरुस्तंभरोग त्या रोगाचा नाश करितो. ही लक्षणें नसलीं, आणि रोग नवा असला, तर साध्य होतो.

**ऊरुस्तंभावर उपाय**—( १ ) कफशामक आणि वायु कुपित न करणारीं अशीं औषधें नेहमी योजावीत. ( २ ) शिलाजीत अथवा गुग्गुळ किंवा पिंपळी अथवा सुंठ गोमूत्राबरोबर किंवा दशमुळांचे काढ्याबरोबर प्यावें; ह्मणजे ऊरुस्तंभाचा नाश होतो. ( ३ ) धूप, नाकेशर, कुष्ठ, देवदार, वाळा, आस्कंद, गांवठी देवदार, तिळवण, यांच्या कल्कानें पक्क केलेलें शिरसाचें तेल मध घालून प्यालें असतां ऊरुस्तंभाचा नाश होतो. ( ४ ) गुंजागर्भ रस द्यावा. (५) करंजाच्या बिया व शिरस गोमूत्रांत वांटून लेप करावा. ( ६ ) कोराटा, देवदार व सुंठ यांचा काढा करून तिळाचें तेल घालून प्यावा; ह्मणजे वायूनें ज्याचें चालणें बंद झालें असतें तो हवा तसा झरझर किंवा सावकाश चालूं लागतो. ( ७ ) स्नेह आणि स्वेद यांनी कफ किंवा पित्त पातळ होऊन आमाशयात राहून जेव्हा कांही निराळीं लक्षणें प्रगट होतात तेव्हा त्यास बस्तीनें जिकावें. ( ८ ) जुन्या साळीचा भात व अळणी चाकवताची भाजी द्यावी. ( ९ ) रोग्यास वाहणाऱ्या नदीत धरून ओवाकडे चालवावा. अथवा ज्या तळ्यातील पाणी स्थिर आहे त्या तळ्यांत अथवा शीत पाण्यांत चालवावा. (१०) बिब्बे, पिपळी व पिंपळमूळ यांचा काढा मध घालून द्यावा; ह्म० मोठा कठिण ऊरुस्तंभही दूर होईल. (११) पिंपळीचें चूर्ण गोमूत्रात द्यावें (१२) काऱ्या निर्गुडीच्या पानांचा काढा करून त्यांत पिंपळीचें चूर्ण घालून द्यावें. (१३) त्रिफळा व कुटकी यांचें चूर्ण मधांत द्यावें. (१४) मध, शिरस, वारुळाची माती, हीं एकत्र वाटून त्याचा लेप करावा. ( १५ ) लसूण, हिंग, जिरें, शेंदेलोण, त्रिकटू, आणि पिंपळी यांचें चूर्ण २ तोळ्यांपर्यंत समभाग एरंडेल घालून बलाबल पाहून द्यावें नंतर एरंडमुळाचा काढा द्यावा. याप्रमाणें सतत एक महिना दिला असतां संपूर्ण वातरोग, एकांगवात, सर्वांगवात, ऊरुस्तंभ, गृध्रसी, कंबर, पाठ व हाडें यातील वायु, अर्दितवायु, अपतंत्रकवायु, धातुगतज्वर, जीर्णज्वर, हातापायांचें शैत्य इतऱ्यांचा नाश होतो.

**ऊरुस्तंभावर पथ्य**—घाम काढणें, हारीक व जुन्या तांबड्या साळीचा भात, गव्हाची पोळी किंवा सांजा, यव, कुळीथ, सावे, रुक्ष पदार्थ. कोंवळी वांगीं, शेवगा, कारलें, पडवळ व चाकवत यांच्या आळणी भाज्या, ऊन पाणी, मद्य, ससा व हरीण यांचें मास, मध, गोमूत्र, व्यायाम, नदींत किंवा डोहांत पोहणें, गाईचें दूध व तूप, तुरीचें वरण, इ० सेवन करावें.

**ऊरुस्तंभावर अपथ्य**—रेच, वांति, शिरावेध, वस्तिकर्म, स्नेहन, जड, थंड, पानळ, स्निग्ध असे पदार्थ, विरुद्धान्न, स्नेहपान, इ० वर्ज करावें.

---

## कर्णरोग.

कर्णरोगाः समाख्याताअष्टादशमिता बुधैः ॥वातात्पित्तात्कफाद्रक्तात्सन्निपाताच्चविद्रधिः
शोथोऽर्बुद पूतिकर्णः कर्णार्शः कर्णहल्लिका॥बाधिर्यंतंत्रिकाकंडूः शष्कुलिः कृमिकर्णकः ॥
॥ कर्णनादः प्रतीनाहइत्यष्टादशकर्णजाः ॥

**अर्थ**—कर्ण रोग आठरा प्रकारचे, त्यांची नांवें—वात, पित्त, कफ, रक्त, सन्निपात, विद्रधि, शोथ, अर्बुद, पूतिकर्ण, कर्णार्श, कर्णहल्लिका, बाधीर्य, तंत्रिका, कंडू, शष्कुलि,कृमिकर्णक, कर्णनाद, प्रतिनाह, असे आहेत.

**कर्मविपाक**—द्वितीयस्थानी, द्वादशस्थानी, शुक्र किंवा मंगळ असतां अथवा कर्क, वृषभ, मेष, जन्मलग्नीं यांतून कोणत्याही लग्नी चंद्र असतां कर्ण रोग, पंगूपणा, बधिरत्व इत्यादिक प्राप्त होतात. **परिहार**—त्या त्या ग्रहांचीं दानें जप, हवन, इत्यादि करावीं.

**पूर्व कर्मविपाक**—मातापितराचे रतिकाळचे शब्द श्रवण करणें, माता,पिता, देव, ब्राह्मण, यांची निंदा श्रवण करणें, इत्यादिकेंकरून कर्णशूल, कर्णस्राव, बधिरत्व, इत्यादि नाना प्रकारचे कर्ण रोग होतात. **परिहार**—"तद्विष्णो" या मंत्राचा दहा सहस्र जप करावा; आपामार्जन स्तोत्र, मंत्रित जलपान, ब्राह्मणभोजन, सुवर्णदान, नीलमणी, वृषभदान इत्यादि करावीं.

**कर्णशूल** ( मा. नि. )—कानांतील वायु दोषांनीं ( कफपित्तरक्तांनीं ) आवृत होऊन कानामध्यें उलट फिरत असता अत्यंत शूळ करितो. ह्या रोगाला कर्णशूळ ह्मणतात हा कष्टसाध्य आहे. **उपाय**—( १ ) प्रथम मनुष्याला स्निग्ध करून घाम काढून ढाळक द्यावें. भोजन झाल्यानंतर ऊन केलेलें गरम दूध व तूप एकत्र करून प्यावें. ( २ ) आल्याचा रस, किंवा लसणीचा रस सैंधव मिश्रित करून कानांत घातला असतां कर्णशूळाचा नाश होतो. ( ३ ) केळीच्या सोपाचें

पाणी गरम करून कानांत घालावें किंवा कांजी कोंबट करून त्यानें कान पूर्ण भरावा; ह्मणजे वेदना नष्ट होतात. ( ४ ) आल्याचा रस, मध, सैंधेलोण आणि शिरसाचें तेल एकत्र करून तेल शेष राहितोंपर्यंत पचन करावें व तें गरम आहे तोंच कानांत घालावें. ( ५ ) रुईच्या बोंल्या ( अंकुर ) निंबाच्या रसांत वांटून त्यांत तेल व मीठ घालून एक काडे निवडुंगाचें पेरें कोरून त्यांत तो कल्क भरावा. नंतर वर मातीचा लेप देऊन पुटपाकानें पचन करावा. पक्क झाल्यावर रस पिळून काढून सुखोष्ण कानांत घालावा. ( ६ ) हिंग, सैंधव, व सुंठ याच्या कल्कांत शिरसाचें तेल घालून पचन करावें. व कानांत घालावें ह्मणजे अवश्य गुण येतो.

**कर्णनाद** (मा. नि.)—वायु कर्णविवरांत राहिला असतां नानाप्रकारचे स्वर, नौबद, मृदंग, आणि शंख यांचे शब्दासारिखे शब्द ऐकूं येतात.या रोगाला कर्णनाद ह्मणतात. **उपाय**—( १ ) मोहऱ्या, पिंपळी, हिंग, बडीशोप व शुष्कमुळे,यांचा कल्क आणि तेल व तेलाच्या चौपट कांजी एकत्र करून पचन करावें. तेल शेष राहिल्यावर सुखोष्ण कानांत घातलें असतां कर्णनाद, बाधीर्य आणि कर्णशूळ यांचा नाश होतो. ( २ ) गुळ आणि सुंठ यांचा कल्क करून त्याचें नस्य करावें ह्मणजे बाधीर्य आणि कर्णनाद यांचा नाश होतो ( ३ ) आघाड्याचे क्षाराचें पाणी व आघाड्याचा कल्क यांत तिळाचें तेल सिद्ध करावें तें कानांत घातलें असतां कर्णनाद व बहिरेपणा यांचा नाश होतो. ( ४ ) हिंग, नागरमोथे, देवदार, बडीशेप, मुळ्याचें भस्म, भूर्जपत्र, यवक्षार, सैंधव, पादेलोण, सोरा, शेवगा, सुंठ, सज्जीखार, बीडलोण, सुरमा, महाळुंग व केळ्याची चूर्णें व रस आणि मधुसूक्त[1] हे पदार्थ घालून त्यांत तिळाचें तेल घालून सिद्ध करावें.तें दररोज कानांत घालीत जावें;ह्म०कर्णरोग, कर्णनाद, बहिरेपणा, भिवया,मस्तक,व कानाची पाळी व कान यांचा शूळ यांचा नाश होतो. (५) आंवळ्याचा रस अथवा आंवळकठीचा अष्टमांश काढा एक तोळा, मराठे तीळ ३ तोळे, काळ्या निर्गुडीचा रस एक तोळा, व या सर्वांबरोबर निशोत्तराचा अष्टमाश केलेला काढा, तोटीगंधक एक तोळा, चांगला मध आडीच तोळे, हीं सर्व औषधें एके ठिकाणीं करून मंदाग्नीवर तेल सिद्ध करावें.नंतर तें वस्त्रगाळ करून त्यांत एक मासा कापूर मिश्र करावा व त्या तेलाचे बिंदू कानांत सोडीत जावे.ह्म०त्यापासून सर्व प्रकारचे कर्णनाद,पूयुक्त कर्णस्राव, कर्णकृमि, हे रोग हटकून बरे होतात. ( ६ ) कस्तूरी १ मासा, त्रिकटू तीन मासे, ब्रासकापूर १ मासा, सोन्याचा वर्ख ।। मासा, उत्तम अफू ३।। मासे, हीं औषधें एकत्र करून विड्याचे पानाचे रसात घोटून एक वालप्रमाण गोळी करावी. व रात्रीं निजतेवेळीं विड्यांत खावी, दिवस ७. ह्मणजे कर्णनाद रोग बरा होतो. (७) मराठे तिळांचें ताजें तेल एक तोळा, मध एक तोळा, गाईचें तूप एक तोळा, त्रिफ-

१—निंबाचा रस ६४ तोळे, मध १६ तोळे, व पिंपळीचे चूर्ण ४ तोळे एकत्र करून तुपाच्या भाड्यात भरून बंद करून भाताच्या राशींत एक महिनाभरपर्यंत पुरून ठेवावे याला मधुसूक्त असें ह्मणतात.

क्याचें चूर्ण दीड तोळा, आरती कापूर अर्धा तोळा, हीं सर्व औषधें एकत्र करून मंदाग्नीनें तेल सिद्ध करावें तें दररोज कानांत घालून वर कापसाचा बोळा बसवीत जावा; ह्मणजे सर्व प्रकारचे कर्णनाद हटकून बरे होतात.

**बाधीर्य** ( मा. नि. )—जेव्हां केवळ वायु किंवा कफयुक्त वायुशब्द वाहणाऱ्या स्रोतात राहतो तेव्हां त्याचे योगानें कानानें ऐकूं येत नाहीं. **उपाय**—( १ ) हिंग, तिरफळ व सुंठ याच्या कल्कानें शिरस तेल सिद्ध करून कानांत घालीत जावें ह्मणजे बहिरेपणाचा नाश होईल. ( २ ) गाईच्या मूत्रांत बेलफळें वांटून त्यानें तेल सिद्ध करावें व तें तेल कानांत घालीत जावें. ( ३ ) निर्गुडी व जाईचा पाला, रुईची पानें, माका, लसूण, केळ, कापशी, शेवगा, तुळस, आलें व कारलें यांच्या रसांत तिळाचें तेल घालून त्यांत बचनाग घालावा, आणि पचन करून तेल सिद्ध करावें. तें कानांत घातलें असतां बहिरेपणा, कर्णनाद, कृमि, शूळ आणि पू वाहणें हे रोग नाश पावतात. ( ४ ) सुंठ, धणे व हिंग याचे कल्कांत तेल सिद्ध करून कानांत घालावें ह्मणजे चांगलें ऐकूं येतें. ( ५ ) तिळवणीचा रस व तिळाचें तेल समभाग व सैंधव व पावभाग एकत्र करून तेल सिद्ध करावें व कानांत घालीत जावें

**कर्णक्ष्वेड** ( मा. नि. )—पित्तादि दोषांनीं युक्त झालेला वायु कानांत वेणूवाद्यासारखा शब्द उत्पन्न करितो. त्याला कर्णक्ष्वेड ह्मणतात. **उपाय**—( १ ) मुळ्याच्या बारीक बारीक चकत्या करून वाळवून जाळून त्याचा क्षार, हिंग, सुंठ, बडीशेप, वेखंड, कोष्ठ, देवदार, शेवगा, रसांजन, संचळ, सज्जीखार, सोरा, सैंधव, भूर्जपत्र. पिंपळमूळ, बीडलोण, यांचा कल्क मधसुक्त[1] तेलाच्या चौपट, तितकाच महाळुंगाचा रस व तितकाच केळीच्या कांद्याचा रस यांनीं सिद्ध केलेलें तेल कानांत घातलें असता मोठे कष्टसाध्यही कर्णक्ष्वेड, कंडू, क्लेद, बहिरेपणा, पूतिकर्ण, कर्णशूळ, कर्णकृमि, हे विकार असले तरी त्वरित बरे होतात. या तेलास क्षार तेल ह्मणतात हें मुखरोग व दंतरोग यावरही तात्काळ गुण देतें. ( २ ) क्षुद्रशंखाचें मांस शिरसाचे तेलात घालून पचन करून कानांत घालावे. ( ३ ) नुस्तें शिरसाचें तेल कानांत घातलें असतां आणि वातनाशक उपचार केले असतां कर्णशूळ, कर्णनाद, बहिरेपणा आणि क्ष्वेड यांचा नाश होतो.

**कर्णस्राव** ( मा. नि. )—डोक्याला कांहीं लागलें असता अथवा पाण्यांत बुडी मारली असतां किंवा कानात विद्रधि पिकला असतां कानांतून पू गळतो त्याला कर्णस्राव ह्मणतात. **उपाय**—( १ ) सुगंधी वाळ्यांत घृत सिद्ध करून कानांत घालावें ह्मणजे कर्णस्रावाचा नाश होतो. ( २ ) शेवग्याची फुलें सावलींत वाळवून कुटून वस्त्रगाळ पूड करावी व ती पूड कानांत नळीनें फुंकावी; ह्मणजे सात दिवसात पू बंद होतो आणि कान कोरडा पडतो. ( ३ ) जांभळीची आणि आंब्याची

---

१ कर्णशूळावरील ४ थे औषध पाहा त्यात मधुसुक्त आहे.

कोंवळीं पानें, ओले कापशीचें फळ, आणि कवठीचीं पानें हीं समभाग घेऊन रस काढून मध मिळवून कानांत घालावा ह्मणजे स्राव बंद होतो. ( ४ ) कोष्ठ, कोळिजन, हिंग, वेखंड, देवदार, शतावरी, सुंठ, सैंधव, आणि बोकडाचें मूत, यांनी सिद्ध केलेलें तेल कानांत घालावें ह्मणजे कर्णस्राव, व पू वाहणें बंद होतें. ( ५ ) गोमूत्र थोडें उन करून त्यानें किंवा तुरटीचे लाहीचे पाण्यानें कानांत पिचकाऱ्या मारून कान चांगला स्वच्छ धुवून टाकीत जावा. ( ६ ) रसांजन, स्त्रीचे दुधांत उगाळून त्यांत मध घालून तें औषध कानांत घालीत जावें; ह्मणजे त्वरित गुण येतो. ( ७ ) वेखंड, कापूर, व समुद्रफळ याचे कल्कांत तिळाचें तेल सिद्ध करून तें कानात घालीत जावें. ( ८ ) शेंदूर मधांत कालवून कानांत घालावा. ( ९ ) नुसतें वेखंड स्त्रीचें दुधात किंवा पाण्यांत उगाळून कानांत घालीत जावें. ( १० ) दोन तोळे हुलगे खापरात भाजून कढत असतांच मधांत टाकावे. नंतर ती मध गाळून तिचे थेंब कानांत सोडीत जावे; ह्मणजे पूयुक्त कर्णस्राव बंद होतो.

**कृमिकर्ण** ( मा. नि. )—जेव्हा कानात किडे पडतात किंवा माशा अंडीं घालतात तेव्हां कृमिलक्षणावरून ह्या रोगाला कृमिकर्ण ह्मणतात. **उपाय**—(१) गोमूत्रांत हरताळ वाटून त्यानें कान पूर्ण भरावा. ( २ ) सुंठ, मिरें, पिंपळी यांचें चूर्ण कानांत घातलें असतां कृमीचा नाश होतो ( ३ ) सर्व कृमिनाशक क्रिया कराव्या. ( ४ ) निळ्या माक्याचा रस किंवा शेवग्याचे सालीचा रस अथवा कळलावीकंदाचा रस किंवा त्रिकटूचें चूर्ण हे चार योग कानांत घातले असतां कृमि व गोमा इत्यादिकाचा नाश होतो.

**कर्णप्रतिनाह** ( मा. नि. )—कानांत मळ पातळ झाला असतां किंवा स्नेह वेदनादिकानें पातळ झाला असतां नाकातोंडात येतो. तेव्हां त्याला कर्णप्रतिनाह ह्मणतात. ह्या रोगानें अर्धशिशीचा विकार उत्पन्न होतो. **उपाय**—( १ ) कानांत तेल घालून व शेकून मळ गरम झाला ह्मणजे तो कान कोरण्यानें काढून कानांत तेल घालावे. ( २ ) नुसतें मधुसूक्त किंवा सैंधव व मध आणि माहाळुंगाचा रस कानांत घालावा. ( ३ ) मळ काढल्यानंतर रुक्ष झाला असतां तुपाची निवळी कानांत घालावी. कानांत फार मळ सांचला तरी असेंच करावें.

**पतंगादिकीटक**—पतंग, गोमाशा वगैरे कानांत गेले असतां चैन पडत नाहीं, जीव व्याकुळ होतो, आणि कानाला ठणका लागतो, व कानांत टोंचल्यासारखें वाटतें, फुरफुरतें, किडा फिरूं लागला ह्मणजे तीव्र वेदना होतात आणि तो स्तब्ध असला ह्मणजे वेदना कमी होतात. **उपाय**—( १ ) कळलावी व तुळस यांनी सिद्ध केलेलें तिळाचें तेल कानात घालावें. ( २ ) तगर आणि पळस यांचें मूळ दांतानें चावून ती थुंकी कानांत घालावी ह्मणजे तात्काळ गोमाशी वगैरेचा नाश होतो. ( ३ ) चित्रकाच्या मुळांनी सिद्ध केलेलें तेल कानांत घालावें. ( ४ )

काळ्या माक्याचा रस कानांत घालावा. ( ९ ) भांगेच्या पाल्याच्या रसांत सज्जीखार उगाळून कानांत घालावा.

**पूतिकर्ण** ( मा. नि. )—ज्या कानांतून दुर्गंधयुक्त पू वाहतो त्याला पूतिकर्ण असें ह्मणतात. उपाय—( १ ) कृमिकर्ण व कर्णस्राव यावरील चिकित्सा करावी. ( २ ) गंधक, मनशीळ व हाळद यांचें चार तोळे चूर्ण घेऊन त्यांत शिरसाचें तेल आठपट घालून तितकाच धोत्र्याचा रस घालावा. आणि तेल सिद्ध करावें. तें कानांत घातल्यानें फार दिवसाचे कर्णनाडीचा नाश होतो. ( ३ ) जाई, कडू लिंब, कडू पडवळ, यांची कोंवळी पानें, मेण, जेष्टीमध, कोष्ठ, हळद, दारुहळद, कुटकी, पद्मकाष्ट, मंजीष्ट, लोध्र, हिरडा, निळें कमळ, उपळसरी, बाहाव्याचें बीं, ही सर्व औषधें समभाग घेऊन चौपट तिळाचें तेल घालून व तेलाचे चौपट आत पाणी घालून पूर्वोक्त रीतीनें पचन करावें तें तेल कानांत घातलें असता कानांत क्षत पडून पुवाचा स्राव होतो तो, नाडीव्रण, फोड, जखम, शस्त्रप्रहारजन्य क्षत, दग्धव्रण, नख दांतादिकांपासून झालेले व्रण, इत्यादि नाहींसे होतात.

**कर्णमूल**—कर्णमूलरोग वात, पित्त, कफ, रक्त व सन्निपात या भेदेंकरून पांच प्रकारचा आहे. हा कर्णमूलरोग कानाचे खाली कर्णमूलाचे जाग्यावर गांठ येऊन तिचेठायीं उत्पन्न होतो.

**पांच प्रकारचे कर्णमूलांचें लक्षण**—वायूचा कोप झाला असतां वेदना होतात; पित्ताचा कोप झाला असतां दाह होतो; कफाचा कोप झाला असतां कंडू सुटतो; सन्निपाताचा कोप झाला असतां तिन्ही दोषांचीं लक्षणें होतात, रक्ताचा कोप झाला असतां पित्ताचीं लक्षणें असून गांठ आरक्तवर्ण असते. **उपाय**—( १ ) जळवा लावून रक्त काढावें. रक्त निघाल्यापासून ग्लानि आल्यास तूप प्यावयास द्यावें. ( २ ) बचनाग आणि शेवग्याची साल निंबाचे रसात उगाळून लेप द्यावा. ( ३ ) उपदंश प्रकरणांत बदावर जे लेप सांगितले आहेत ते कर्णमूलावरही योजावे.

**असाध्यकर्णरोग** ( मा. नि. )—मूर्च्छा, दाह, ज्वर, खोकला, मळमळ, वांति, हे असाध्यकर्णशूलाचे उपद्रव होऊन तो रोगी मरतो.

**कर्णरोगावर पथ्य**—घाम, रेचक, वमन, नस्य, धूमपान, शिरावेध, साळीचा भात, गव्हाची पोळी, जोंधळ्याची भाकर, ताबड्या तुरीचे डाळींचें व मुगाचें वरण, तूप, यव, हरीण व ससा याचें मांसरस, पडवळ, शेवगा, वांगीं व करटोलीं, यांच्या भाज्या, थंड पाणी, ब्रह्मचर्य, मौन, ही पथ्य करावीं.

**कर्णरोगावर अपथ्य**—दंतकाष्ठ, मस्तकावरून स्नान, व्यायाम, कफकारक अन्न, जडान्न, व काडवेल, हे वर्ज करावे.

---

# कफरोग.

॥ कफस्यविंशतिः प्रोक्तारोगास्तंद्रातिनिद्रता ॥ गौरवंमुखमाधुर्यं
मुखलेपः प्रसेकता ॥ श्वेतावलोकनं श्वेतविट्कत्वश्वेतमूत्रता ॥
॥ श्वेतांगवर्णताशैत्यमुष्णेच्छातिक्तकामिता ॥ मलाधिक्यंचशु-
क्रस्यबाहुल्यंबहुमूत्रता ॥ आलस्यंमंदबुद्धित्वंतृप्तिर्घर्घरवाक्यता ॥
॥ अचैतन्यंचगदिताविंशतिः श्लेष्मजा गदाः ॥

अर्थ—कफ हा एकच रोग आहे, परंतु त्याचे प्रकार नीरनिराळे वीस आहेत. तो कफ बुळबुळीत, पांढरा, चिकट, जड व शीतळ असा आहे. त्याचे ठायीं तमोगुण विशेष असून मधुर असतो. व पक्क झाला असतां किवा विकृत पावला असतां तो तोंडावाटें बेडक्याचे रूपानें पडतो. ते बेडके खारट व आस्मानी रंगाचे असतात. हा कफ शरीरामध्यें पाच ठिकाणीं राहून शरीराची पुष्टता करितो. त्या कफाचीं नांवें व लक्षणें व त्या प्रत्येकावर विहित उपचार खालीं सांगितले आहेत.

१–तंद्रा—ज्या कफाच्या योगानें डोळ्यांस झांपड येते, त्यांस तंद्रा असे ह्मणतात. उपाय—( १ ) सुंठ, मिरी किंवा लवंगा अथवा दालचिनी किंवा मनशीळ यांतून एक पदार्थ घेऊन पाण्यात उगाळून दिवसांतून दोन तीन वेळ अंजन करीत जावें. हा कफविकार बहुतकरून सन्निपात ज्वरात होत असतो व त्या ठिकाणीं तंद्रेवर जी औषधें सांगितलीं आहेत तीच या ठिकाणी योजावीं.

२–अतिनिद्रा—ज्या कफें करून झोंप फार येते तो कफ रोग जाणावा. उपाय—( १ ) मस्तकास दालचिनीचें तेल चोळावें, व उन पाणी पीत जावें. थंड पदार्थ वर्ज करावे. व्यायाम करित जावा, नमस्कार घालावे. या कफाचा अंतकाळीं ही कोप होत असतो.

३–गौरव—ज्या कफेंकरून अंग फार जड होतें तो. उपाय—( १ ) खूप अंगमर्दन करून घ्यावें, जोर काढावे, नमस्कार घालावे, व आणखीही कफनाशक विधि करावा. उन पाणी पीत जावें.

४–मुखमाधुर्य—ज्या कफेंकरून तोंड गोंडीळ ह्मणजे गुळमट होतें तो; उपाय—( १ ) अक्कलकाल्याचें बारीक चूर्ण करून सर्व तोंडास व जिभेस चोळून लाळ गळून द्यावी. नंतर आलें व सैंधव एके ठिकाणी करून त्या चोथ्याची गोळी तोंडांत धरण्यास द्यावी. आणखीही कफनाशक उपाय करावे.

५–मुखलेप—ज्या कफेंकरून तोंड अतिशय चिकट होतें व बुळबुळीतपणा येतो तो उपाय—तुरटीच्या लाहीची पुड करून तोंडास व जिभेस चोळून चांगली लाळ गळूं देत जावी. नंतर लवंगा चावून तोंडांत धराव्या ( २ ) सैंधवाची पूड मधांत कालवून तोंडास व जिभेस चोळावी. परंतु हे उपाय करण्यापूर्वी ऊन पाण्यानें तोंड स्वच्छ धुऊन टाकीत जावें.

**६ प्रसेक**—ज्या कफेंकरून तोंडांतून लाळ गळते तो. **उपाय**—[ १ ] तुरटीचे लाहीची पूड किंवा अक्कलकाऱ्याचें चूर्ण करून सर्व तोंडास व जिभेस लावून वरचेवर लाळ गाळून टाकीत जावी. व आणखीही पुढील कफनाशक उपचार करावे. उन पाणी पीत जावें. प्रथम वांतीचें औषध द्यावें.

**७ श्वेतावलोकन**—ज्या कफाचा कोप झाला असतां सर्व पदार्थ पांढरे दिसतात. **उपाय**—( १ ) सुंठ व दालचिनी उन पाण्यात उगाळून त्याचा डोळ्यांचे पापण्यावर व मस्तकास लेप द्यावा. व हें थोडें औषध डोळ्यांतही घालावें. रोगी सशक्त असल्यास रेचक व वमन द्यावें. व आणखीही कफनाशक पुढील विधि करावा.

**८ श्वेतविट्कत्व**—ज्या कफेंकरून मळ पांढरा होतो. तो उपाय—( १ ) रेचक औषध देऊन मळ साफ करावा व आणखीही कफ नाशक औषधें द्यावीं.

**९ मूत्रता**—ज्या कफेंकरून मूत्र पांढरें होतें ते. **उपाय**—[ १ ] सुंठ ६ मासे व बेहेडेदळ १ तोळा यांचा अष्टमांश काढा करून त्यात ४ मासे मध घालून प्रातःकाळी प्राशनास द्यावा. व निकाढा करून अस्तमानीं द्यावा. व आणखीही पुढील कफनाशक उपचार कारावे.

**१० श्वेतांगवर्ण**—ज्या कफेंकरून शरीराचा वर्ण पाढरा होतो. **उपाय**—[ १ ] पिंपळीचें चूर्ण बलाबल पाहून मधांत चाटण करून द्यावें. [ २ ] आल्याचा रस मध घालून द्यावा व आणखीही कफनाशक उपाय करावे.

**११ उष्णेच्छा**—ज्या कफेंकरून उष्ण पदार्थावर इच्छा जाते तो. **उपाय**—( १ ) प्रथम रेच व वमन देऊन नतर पुढील कफनाशक उपाय करावे.

**१२ तिक्तकामिका**—ज्या कफेंकरून कडू पदार्थावर इच्छा होते तो. **उपाय**—[ १ ] अरुचि रोगावरील उपाय करावे व आणखीही कफनाशक उपाय करावे.

**१३ मलाधिक्य**—ज्या कफेंकरून मल फार होतो तो **उपाय**—[ १ ] प्रथम रेचकें देऊन मळ साफ करावा व आणखीही पुढील कफनाशक उपाय करावे.

**१४ शुक्रबाहुल्य**—ज्या कफेंकरून शुक्रधातूचा फार संचय होतो तो. **उपाय**—[ १ ] स्त्रीसयोग करावा. आणखीही पुढील कफनाशक करावे

**१५ बहुमूत्रता**—ज्या कफेंकरून मुतावयास फार होतें तो. **उपाय**—[१] अननसाचे तुकडे पिंपळीचें चूर्ण घालून द्यावें किंवा वेळूचे पानाचा काढा मध घालून द्यावा; ह्मणजे हटकून बहुमूत्राची शाति होते. हाच बहुमूत्ररोग फार वाढला असतां मधुमेहावर घालवितो, याजकरितां याजवर तावडतोब उपचार करावे.

**१६ आलस्य**—ज्या कफेंकरून आळस येतो. तो **उपाय**. [ १ ] व्यायाम

करावा. [२] अंगास तेलाचें अभ्यंग करून उनउन पाणी पुष्कळ घेऊन स्नान करावें व आणखीही कफनाशक उपाय करावे.

१७ **मंदबुद्धि**––ज्या कफेंकरून बुद्धीला मंदत्व येतें तो. **उपाय** [ १ ] ब्राम्हीचा रस मध घालून प्रातःकाळी प्राशन करीत जावा. [ २ ] वेखंडाचें चूर्ण मधाशीं सेवन करीत जावें. [ ३ ] चित्रकाचें चूर्ण मधाशीं सेवन करीत जावें. व तोंडलीं अगदी वर्ज करावीं, कारण ती तात्काळ बुद्धीला हरण करणारीं आहेत. तसेंच विडाही खाऊं नये.

१८ **तृप्ति**–ज्या कफेंकरून मनुष्य थोडक्या भोजनांत तृप्त होतो तो. उपाय ( १ )अजीर्णरोगावरील उपचार करावे, व अग्नि प्रदीप्त होणारीं औषधें द्यावीं.

१९ **घरघरवाच्यता**–ज्या कफेंकरून मनुष्य बोलतांना घरघर बोलतो तो. **उपाय**––( १ ) दूध चांगलें खरपूस तापवून त्यांत थोडी मिरपूड, थोडी सुंठ, खडीसाखर घालून रात्रौ निजतेसमयीं दररोज प्राशन करीत जावें. ( २ ) जेष्टीमधेचा चहा खडीसाखर घालून सांजसकाळ देत जावा.

२० **अचैतन्य**––ज्या कफेंकरून मनुष्य चेतनेविषयीं मंद होतो तो. **उपाय**––( १ ) मिरीं, हळद, व गूळ यांचें चूर्ण मधाशीं द्यावें. ( २ ) टांकणखाराची लाही, व पिंपळी याची थोडी पूड मधात चाटीत जावी. खूप व्यायाम करावा.

याप्रमाणें वीस प्रकारच्या कफरोगांवर निरनिराळ्या क्रिया सांगितल्या आहेत त्याप्रमाणें कराव्या. त्या करूनही रोगाचा उपशम न होईल तर पुढील उपचार करावे. पथ्यापथ्यासह करावें ह्मणजे अवश्य कफरोगापासून मुक्त होईल यांत संशय नाहीं. हे वरील सर्व कफरोग बुद्धिमंत वैद्यानी सूक्ष्म विचारांनीं ध्यानांत आणावे.

**कफरोगावर उपाय**––( १ ) लसूण, पोटीया अंकूल व मोहऱ्या, हीं औषधें समभाग घेऊन त्या सर्वांसमान तीन वर्षांचा जुना गुळ आंत मिळवून एकेक तोळा प्रमाण अशा तीन गोळ्या कराव्या. नंतर गाईचें दूध जितकें सोसेल तितकें घेऊन त्या बरोबर एक गोळी भक्षण करावी व त्याजवर लागलींच विड्याचीं पानें २० नुस्तीं खावींत. नंतर दीड किंवा दोन तास वाट पहावी ह्मणजे कफाची गोळी केळाचे आतील मगजासारखी लांबट अशी किंवा मकाचे बिरखुंडासारखी मुखावाटें बाहेर पडते. एक गोळी न पडल्यास वरप्रमाणें दुसरी गोळी द्यावी. नंतर तास दीड तास वाट पाहून कफाची गोळीनें न पडल्यास तिसरी गोळी द्यावी ह्मणजे कफाची गोळी आपोआप पडून रोगी कफापासून मुक्त होईल यांस संशय नाही. नंतर वरती नुस्ता तूपभात खावा. ( २ ) कंकोळ १ तोळा, वेलची दाणे १॥, लवंगा २, पिंपळी ३, जेष्ठीमध ३, मिरीं ४, सुंठ ४, दालचिनी ३, व भारंगमूळ ४ याप्रमाणें तोळे घेऊन सर्व एकत्र चूर्ण करावें व त्यासमान आंत खडीसाखरेचें चूर्ण मिळवून ठेवावें व सांज-

सकाळ बलाबल पाहून एकतोळ्यापर्यंत सेवन करीत जावें ह्मणजे कफाचें पाणी होतें. किंवा वेडके मुटून पडतात. ( ३ ) सुंठ, चित्रकमूळ, पिंपळी, पिंपळमूळ व चवक यांचा काढा मध किंवा खडीसाखर घालून द्यावा. ( ४ ) ओंवा ३ मासे, सैंधव १ मासा, व मीठ १ मासा एकत्र करून त्याजवर बिब्याचे शेवत्याचे पांच थेंब पाडून तें सर्व औषध प्रातःकाळीं सेवन करावें. ( ५ ) निर्गुडीचें बीज, जव व पिंपळी हीं समभाग घेऊन त्याचा मधांत लेह करून चाटीत जावा. ( ६ ) सुंठ १ तोळा, व भारंगमूळ १ तोळा यांचा काढा मध घालून द्यावा. ( ७ ) तिधारी निवडुंगाचें कांडें आणून फुफाट्यांत भाजून त्याचा रस १ तोळा, मध ४ मासे व तेल्या टांकणखाराची लाही दोन गुंजा आत घालून एकत्र करून सेवन करावें ह्मणजे सर्व प्रकारचे विकार व गळ्यांत घरघर लागते ती याचा तात्काळ नाश होतो. (८) त्रिफळ्याचें चूर्ण रात्रीं निजतेवेळीं उन पाण्याबरोबर सेवन करीत जावें. याप्रमाणें तीन महिने सारखें नेमानें केलें असतां सर्व प्रकारचे कफाचा नाश होईल यांत संशय नाहीं. ( ९ ) सुंठ ६ मासे, वेहेडेदळ १ तोळा, आडूळशाचीं पिकलेली पानें २ तोळे व खडीसाखर १ तोळा, यांचा काढा निकाढा करून सेवन करीत गेलें असतां कफविकारांचा नाश होतो यांत संशय नाहीं. ( १० ) सर्व प्रकारचे कफरोगांवर वमन प्रशस्त आहे तसेंच थोडें परिश्रम करीत जावें. ( ११ ) आलें आणून तें कुटून त्यासमान गूळ आंत घालून थोडें कढवावें पाक झाला ह्मणजे खालीं उतरून निवालें ह्मणजे दोन तोळेपर्यंत सांजसकाळ सेवन करीत जावें. व दूध वर्ज करावें ह्मणजे एक दिवसांत कफ पिकून तोंडावाटें पिंवळसर वेडके पडून जाऊन कफापासून मुक्त होईल हें औषध पडसें व आगंतुक कफ यांजवर रामबाण आहे असें जाणावें. ( १२ ) आस्कंद जाळून त्याची काळी राख मधांत मिळवून चाटण द्यावें; ह्मणजे कफाचें पाणी होऊन जातें. ( १३ ) सर्व कफरोगावर वांतिसारखें दुसरें हितकारक औषध नाहीं, परंतु रोगी अशक्त असल्यास सौम्य वांतीचें औषध द्यावें.

**कफरोगावर पथ्य**—वमन, रेचन, साटक्या साळीचा वेळलेला भात, तुरीचें व मुगाचें वरण, जुन्या गव्हाची पोळी, गोडें ताक, गाईचें तूप, ताकाची कढी, कुळीथ, मेथी, करटोलीं, कारलीं, करडई व पडवळ, चुका, सुरण व गाजर यांच्या भाज्या, ऊन पाणी व विडा ही पथ्यें होय.

**अपथ्य**—थंड पाणी, दहीं, सर्व प्रकारच्या खिरी, दूध, तेल, लाडू, साखर थंड पदार्थ इ० वर्ज करावे.

---

## कामला ( कांवीळ. )

॥ तथैका कामलास्मृता ॥ स्यात्कुंभकामलाचैका तथैवचहलीमकम् ॥

**अर्थ**—कामलारोग एक प्रकारचा त्याला कांवीळ किंवा कामिण असें ह्मण-

तात. तो रोग पांडुरोगाची उपेक्षा केली असतां होतो. त्या कांविळीचे भेद दोन आहेत, कुंभकामला आणि हलीमक.

**कर्मविपाक**—चंद्र शुक्राच्या दशेमध्यें मध्यगत झाला असतां अनेक प्रकारचीं दुःखें, मस्तकरोग, कामलारोग, वायुजनितरोग, अनेक संकटें इत्यादि होतात. **परिहार**—चंद्रपीडा निरसनार्थ चंद्राचा जप, होम, दानें हीं करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—पूर्वजन्मीं अन्नाची चोरी करितो त्यास कामलारोग होतो. **परिहार**—गरुडाची सुवर्णाची मूर्ति ( वीरसिंहावलोकन ग्रंथात सांगितली आहे ) तशी करून तिची पूजा करून होमादिक विधि करावा. नंतर तिचें दान करावें. इत्यादि दैविक प्रतिकार करावा.

**कामलेचें कारण**—पित्त उत्पन्न करणाऱ्या व्यापारास अडथळा अथवा सांचलेलें पित्त वाहण्यास प्रतिबंध हीं या रोगाची मुख्य कारणें होत. पित्ताशयांत जमलेलें पित्त जाण्यास प्रतिबंध झाला म्हणजे तें शरीरांत सुरून रक्ताबरोबर फिरतें त्यामुळें शरीर पिंवळें दिसूं लागतें. ही अवस्था पित्तसंचयामुळें अथवा यकृतविकारामुळें उद्भवते, खाण्यापिण्यांत अव्यवस्थितपणा व मनोविकारांनेंही हा रोग होतो. जो पांडुरोगी अत्यंत पित्तकारक पदार्थ भक्षण करितो त्याचें पित्त शरीरांतील रक्त व मांस यांना जाळून म्हणजे दुष्ट करून कामलारोगाला उत्पन्न करितें. अथवा पांडुरोगावांचूनही पित्तकारक पदार्थ भक्षिल्यानें कामलारोग होतो. त्याचे भेद कामला व कुंभकामला असे दोन आहेत.

**लक्षण** ( मा. नि. )—डोळे अत्यंत पिंवळे होतात, त्वचा, नखें, तोंड हीं पिंवळीं होतात. मूत्र, मळ हीं लाल व पिंवळीं होणें, इंद्रियशक्ति नष्ट होणें, दाह, अन्न न पचणें, दुर्बळता, ग्लानि, अन्नद्वेष, इहींकरून पीडित होतो, हा कामलारोग पित्ताधिक आहे. एक कोष्ठाश्रय आणि दुसरी शाखा ( रक्तादि धातुरस ) श्रित असते जसा राजयक्ष्मा ( क्षय ) स्वतंत्र होतो तशी कामलाही स्वतंत्र होते असें जाणावें.

**असाध्य लक्षण** ( मा. नि. ) ज्या पुरुषाचा मळ काळा व मूत्र पिंवळें होतें, शरीराला भात्यासारखी सूज येते आणि डोळे, तोंड, वाति, मळ व मूत्र हीं अत्यंत लाल होतात व वरचेवर मोह पावतो तो असाध्य जाणावा आणि दाह, अरुचि, तृषा पोटास फुगवटी, झांपड, मूर्छा, अग्निमांद्य व स्मृति गेलेला असा कामलारोगी तात्काळ मरण पावतो.

**कामलेवर उपाय**—( १ ) हिरडा, बेहेडा, आवळकठी, गुळवेल, कुटकी, कडू निंबाची साल, किराईत आणि आडूळसा या आठ औषधांचा काढा मध घालून द्यावा. या योगानें डोळ्यातील कांवीळ पांडुरोग दूर होतो ( २ ) कुटकीचें चूर्ण साखरेबरोबर भक्षण केलें असतां कांवीळ जाते. ( ३ ) एक तोळा सुंठीचें चूर्ण दु-

घांत द्यावें. ( ४ ) एरंडाचे पानाचा रस चार तोळे काढून त्यांत गाईचें दूध समभाग घालून द्यावा व दिवसां निद्रा घेऊं नये ( ५ ) कडू दोडके पाण्यांत कुसकरून रोग्यास उताणा निजवून दोन थेंब कानांत पिळावे किंवा कडू दोडक्याची वरील साल काढून आंतील गिराची पूड करून तपकिरीप्रमाणें नाकांत ओढावी, ह्मणजे नाकांतून एकसारखें पिवळें पाणी वाहून डोळ्याची वगैरे पिंवळटी साफ होऊन कामलारोग जातो. ज्या वेळी नाकांतून वाहणारें पाणी बंद करणें असेल त्यावेळी नाकांत तूप घालावें. ( ६ ) देवडांगरीचें फळाचा रस नाकांत घालावा. पाणी फार वाहूं लागल्यास तूप घालावें. ( ७ ) चार तोळे दह्यांत दोन वाल कळीचा भिजलेला चुना कालवून प्रातःकाळी पांच दिवस घेतलें असतां कामलारोग मलद्वारानें झडून जातो ( ८ ) पांढरे गोकर्णीचा रस किंवा दारुहळद तुरटी व आंवळकठी यांचें अंजन कामलेचा नाश करितें.(९)आवळकठी,लोहभस्म, सुंठ, मिरि,पिंपळी,दारुहळद,मध,तूप, व साखर, यांचा लेह कामला व पांडुरोग यांचा नाश करितो (१०)रुईचें मूळ तांदुळाचे धुवणांत उगाळून नाकांत घालावें; ह्मणजे कामलेचा नाश होतो. ( ११ ) प्रथम दूध तूप कांही तरी ओशट पदार्थ पाजून रेचन द्यावें. ( १२ ) आंवळकठी, लोहभस्म, त्रिकटू, हळद, मध व साखर ही रोज घेतली असतां मोठ्या वाढलेल्या कामलेचा नाश होतो.(१३) लोहभस्म. हिरडेदळ व हाळद याचें चूर्ण मध व तूप यांत द्यावें. ( १४ ) बाळहिरड्याचें चूर्ण मधांत द्यावें. (१५) वेलची, जिरें, भूयआंवळी व साखर, ही दुधांत पचन करून प्रातःकाळी द्यावी. ( १६ ) हळदीचें चूर्ण एक तोळा आणि दहीं चार तोळे एकत्र करून प्रातःकाळी द्यावें ( १७ ) दारुहळद, तुरटी व आंवळकठी ही तिन्ही पाण्यात उगाळून अंजन करावें. ( १८ ) कुटकीचा काढा मध घालून द्यावा.

कुंभकामला—कामला रोग अंगांत फार दिवस राहून विकोपास गेला ह्मणजे तो कोष्ठात उतरतो त्याला कुंभकाला असें ह्मणतात.

कुंभकामलेचं असाध्य लक्षण ( मा. नि. )—ओकारी, अरुचि, मळमळ, ज्वर, आयासावाचून श्रम, दमा, खोकला यांनीं जर्जरित,आणि अतिसारयुक्त अशा पुरुपाची कुंभकामला असाध्य जाणावी.

कुंभकामलेवर उपाय—( १ ) कुंभकामलेवर कामलेवरचेही उपाय हितकारक होतात. ( २ ) देवडांगरीचे फळाचें चूर्ण तांदूळभार नाकांत ओढावें. तेणेंकरून नाकांतून पिवळा स्राव होऊन दोन प्रहरानीं कामला, कुसकामला व हलीमक यांचा नाश होतो. ( ३ ) हारबऱ्याचे दाळीचें पुरण ह्मणजे दाळ शिजवून त्या बरोबरीनें गूळ घालून नुस्ते पुरण तीन दिवस खावें तीन दिवस पाणी न पितां पुरणाचें काट काढून ठेवावें तें पीत जावें, दुसरें कांही खात जाऊं नये. ( ४ ) पांढऱ्या कांद्यात गुळ व थोडी हळद घालून रात्रीं आणि सकाळीं खावें. तेणेंकरून कामला, कुंभकामला व हलीमक याचा नाश होतो. ( ५ ) मंडूर मधांत द्यावा.

( ६ ) आघाड्याचा मुळी किंवा विष्णुक्रांताची मुळी अथवा कळलावीचे पाल्याचें चूर्ण ताकाशीं द्यावें. (७) त्रिफळ्याचें चूर्ण गूळ व आल्याचे रसांत द्यावें. ( ८ ) उजव्या हाताचा आंगठा उभा केला असता मणगटापुढें जो खळगा पडतो त्यांत कागदाच्या बिडीनें डाग द्यावा.

**पथ्यापथ्यें**—पांडुरोगावरची करावीं,

---

## कास ( खोकला. )

॥ पंचकासाः स्मृतावातपित्तश्लेष्मक्षतक्षयैः ॥ क्षयायोपेक्षिताः सर्वेबलिनश्चोत्तरोत्तरम् ॥

**अर्थ**—वात, पित्त, कफ, क्षत आणि क्षय ह्यांनी पांच प्रकारचे खोकले हो-तात. ह्यावर कांहीं औषधोपचार केला नाहीं तर सर्व क्षयावर घालवितात. हे उत्त-रोत्तर बळवंत आहेत असें जाणावें.

**कर्मविपाक**—कर्क राशिस्थित सूर्य असून बुधाची दृष्टि असेल तर कासरो-ग, कफवातरोग, नेत्ररोग, आणि विपरीतमति असा होतो. **परिहार**—बुधा-ची दृष्टि व सूर्याची पीडा नाशनार्थ सूर्यमंत्राचा जप,दानें, होम इत्यादि पूर्वोक्त करावें.

**पूर्वकर्मविपाक**—आपल्यावर जो उपकार करितो त्यावर उपकार न कर-णारा, अथवा अपकार कराणारा, त्यास खोकला, दमा, कफ, उष्ण ज्वर, वात, पित्त, वगैरे अनेक दुःखें प्राप्त होतात. **परिहार**—पिपलिकामध्य किंवा तीन चां-द्रायणें, ब्राह्मणभोजन, ( अग्निदूत ) या सूक्तानें दहा सहस्र हवन, विष्णुसूक्ताची सहस्र आवृत्ति, मधु, घृत, सुवर्ण, वस्त्रें यांची दानें इत्यादि करावी. **दुसरा प्र-कार**—नीचापासून कुरुक्षेत्रादि पवित्रदेशीं सूर्यग्रहणादि महापर्वणीचे ठिकाणीं ल-वण, कृष्णाजीन, शय्या इत्यादि दानें ग्रहण करणारा, तो जन्मांतरीं, खरूज, दमा, खोकला, कृमिरोग, इत्यादिकेंकरून युक्त असा होतो. **परिहार**—महिषीदान, पुरुषसूक्त आणि विष्णुसहस्रनाम याचा जप, हवन, सहस्रकलश स्नान, सुवर्णाच्या वरुण मूर्तीचें पूजनपूर्वोक्तदान, इत्यादि दैविक प्रतिकार करावा.

**खोकल्याचें कारण** ( मा. नि. )—नाकातोंडातून धूर अथवा धुरळा शिर-ल्यानें, व्यायाम, रुक्ष अन्नें यांचें नित्य सेवन, घाईघाईनें भोजन, भलत्याच मार्गानें अन्न पोटांत गेल्यानें, जेवतांना ठसका लागल्यानें, मळ, मूत्र व शिंका यांचा अव-रोध केल्यानें प्राणवायु अत्यंत दुष्ट होऊन दुष्ट उदान वायूशीं मिळून कफपित्तयुक्त अ-कस्मात् तोंडातून बाहेर निघतो. त्याचा शब्द फुटक्या कास्य पात्राच्या नादाप्रमाणें होतो. याचे भेद वात, पित्त, कफ, उरःक्षत आणि क्षयज असे पांच आहेत. त्यांतून कोणत्याहीं विषयी उपेक्षा केली असता क्षयाला उत्पन्न करितो. हे पांचही प्रकार एकाहून एक बलवान आहेत.

पूर्वरूप ( मा. नि. )—खोकला यावयाचा असला ह्मणजे घशांत आणि तोंडांत बारीक काटे येतात. गळ्यांत खवखवतें, तोंडाला अरुचि, घशांत भाताची कुसें अडकल्यासारखी वाटणें, अन्न न पचणें, हीं लक्षणें खोकला होण्यापूर्वी होतात.

वातकास (चरक)—वातूळ पदार्थांनी कुपित झालेला वायु ऊर, कंठ व तोंड यांस कोरड, हृदय, शंख, बरगड्या, पार्श्वभाग व डोकें यांत शूळ, मोह, अंतर्दाह, स्वरक्षीणता, व कोरडा खोकला उत्पन्न करितो, त्याचा वेग, वेदना व शब्द ही फार असतात. अंगावर रोमांच उभे राहतात, व मोठ्या दुःखानें कोरडा कफ पडला ह्मणजे खोकला कमी होतो. तोंडाला कोरड, बल, स्वर आणि धातुतेज, यांचा क्षय, वारंवार खोकला उसळणें, स्वरभेद आणि कोरडा खोकला हीं वातकासाचीं लक्षणें जाणावीं. उपाय—( १ ) पूर्वी वातकासावर ग्राम्य, जल व जलदेश यांतील मांस व मांसरस अनेक प्रकारचे स्नेह, बस्तिविधि, तऱ्हेतऱ्हेची अन्नपानें यानी उपचार करावे. व रोग्याला गहू, तांदूळ व जव हे खाण्यास द्यावे. ( २ ) वातकासावर प्रथम वातघ्न औषधानें सिद्ध केलेले स्नेहयुक्त पेया, यूष, मांसरस, धूमपान, अभ्यंग, घाम काढणें, परिषेक यांची योजना करावी. मल व वात यांचा अवरोध असल्यास वातघ्न औषधाचे बस्ति द्यावे कासपित्तयुक्त असल्यास भोजनोत्तर घृतपान, व दुग्धपान आणि कफयुक्त असेल तर स्नेहमय रेचकें द्यावीं. ( ३ ) अशोकाचें बीं, मोहरी, वावडिंग, सुरमा, पद्मकाष्ट व बीडलोण यानी सिद्ध केलेलें तूप किंवा त्याचें चूर्ण घालून कालविलेलें तूप कासादि रोगांनी पिडलेल्या मनुष्यांनी खाऊन वर शेळीचें दूध प्यावें. ( ४ ) वावडिंग, सुंठ, रास्ना, पिंपळी, हिंग, सैंधव, भारंगमूळ, व जवखार त्यांचें चूर्ण तुपाबरोबर द्यावें; ह्मणजे कफयुक्त वातकास, श्वास, उचकी, अग्निमांद्य, हे विकार दूर होतात. ( ५ ) धमासा, सुंठ, कचोरा, मनुका, खडीसाखर व काकडशिंगी यांचें चूर्ण वातकासावर तेलाबरोबर द्यावें. ( ६ ) खडीसाखर व सुंठ दह्याच्या निवळीबरोबर द्यावी. ( ७ ) पिंपळी व सैंधव यांचें चूर्ण कोंबट पाण्यात द्यावें. ( ८ ) पिंपळी व रेणूकबीज याचें चूर्ण दह्याबरोबर द्यावें. ( ९ ) ओंवा, पिंपळी, बेलफळाचा गीर, सुंठ, चित्रकमूळ, रास्ना, जिरें, सालवण, पळसाची साल, कचोरा व पोखरमूळ यानी सिद्ध केलेली पेज, तूप, ताक किंवा आंबट पदार्थ व सैंधव घालून वातकासावर द्यावी. ती कंबर, बरगड्या, हृदय, कोठा, यांतील वेदना व दमा व उचकी याचा नाश करिते. ( १० ) समभाग तीळ व तांदूळ घालून दुधांत शिजविलेली सैंधवयुक्त पेया द्यावी. ( ११ ) कचोरा, काकडशिंगी, पिंपळी, भारंगमूळ, गूळ, नागरमोथे व धमासा यांचा पाण्याशी लेह करून त्यांत तेल घालून सेवन केला असता वातकासाचा निश्चयानें नाश होईल. ( १२ ) मोठ्या पंचमुळाचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा.

पित्तकास ( मा. नि. )—उरांत जळजळ, ज्वर, तोंडास कोरड यांनीं पीडित असून तोंड कडू होतें, पिवळी आणि तिखट अशी वांति होते. रोगी पाडुरवर्ण होतो व त्याला चोहोंकडून पेटल्यासारखें वाटतें, भ्रम, पित्ताची व रक्ताची

वांति, तहान, स्वर बदलणें, घशात जळाल्यासारखें वाटून धूर आल्यासारखें वाटणें, आंबट ढेंकर, खोकल्याची अतिशय मोठी उमळ आली असता डोळ्यांपुढें काजवे चमकणें असा भास होतो. **उपाय**—( १ ) पित्तकासांत कफ पातळ असेल तर मधुर पदार्थांनीं व घट्ट असल्यास कडू पदार्थांनी मिश्र करून निशोत्तराचें चूर्ण रेच होण्याकारितां द्यावें. रेच झाल्यावर थंड, मधुर आणि स्निग्ध अशी पेज पिण्याचा क्रम सुरु ठेवावा. व कफ घट्ट असेल तर शीत, रुक्ष व कडू पदार्थांनीं युक्त अशी पेज पिण्याचा क्रम सुरु ठेवावा (२) कचोरा, वाळा, रिंगणी, साखर व सुंठ हीं औषधें पाणी घालून वांटावीं. व रस फडक्यानें गाळून तूप घालून प्यावा. ( ३ ) साखर, असाणा [ जीवक ], रानमूग, रानउडीद व धमासा यांचा काढा करून प्यावा. ( ४ ) चिकणामूळ, रिंगणीमूळ, डोरलीमूळ, गनुका व आडूळशाची पिकलेली पानें यांचा काढा खडीसाखर व मध घालून द्यावा. ( ५ ) तवकीर, पिपळी, साळीच्या लाह्या, मनुका, नागरमोथे व खडीसाखर यांचा लेह तूप व मध यांशी द्यावा. ( ६ ) रिंगणमूळ, डोरलीमूळ, मनुका, आडूळशाची पिकलेली पानें, कचोरा, वाळा, सुंठ आणि पिपळी यांचा काढा खडीसाखर व मध घालून द्यावा; हा योग फारच उत्तम आहे.

**कफकास** [ मा. नि. ]—तोंड आतून कफानें सारविल्यासारखें, ग्लानि, मस्तकास अत्यंत वेदना, सर्व देह कफानें पूर्ण भरणें, अन्नावर अरुचि, शरीरास जडपणा, आणि कंडू होते. रोगी वारंवार खोकतो. कफ पडतो तो दाट असतो. उरांत किंचित् वेदना, डोकें व हृदय ओलसर, थंड व जड होणें, घसा लाखटल्यासारखा, अंगग्लानि, पडसें, वांति, अंगावर रोमाच, दाट, चिकट व पांढरा असा कफ पडणें, ही लक्षणें होतात. **उपाय**—[ १ ] ज्याला कफकास झाला असेल त्यानें प्रथम पेटविलेल्या देवदाराच्या लांकडातून गळालेलें तेल, सुंठ, मिरी, पिपळी, यवक्षार, यांनीं युक्त करून प्यावें. ( २ ) मोर व कोंबडा याच्या पिसांची राख व जवखार याचा मधांत लेह करून द्यावा. [ ३ ] कडुवृंदावनाचें मूळ, पिपळमूळ, निशोत्तर व मोरवेल यांचा लेह मधांत करून द्यावा. [४] भिऱ्यांची पूड मधांबरोबर द्यावी. [ ५ ] आठ तोळे दाळिंबाचा रस, ३२ तोळे गूळ, ४ तोळे सुंठ, ४ तोळे पिंपळी व ४ तोळे मिरी यांचा लेह दीपन व रुचिकर असून पडसें, श्वास व दमा या रोगास जिंकून स्वरास हितावह होतो. [६] ८ तोळे गूळ, ॥ तोळा जवखार, एक तोळा मिरी, ॥ तो० पिंपळी व ४ तो० दाळिंबाच्या सालीचें चूर्ण एकत्र करून सहा मासेपर्यंत चूर्ण द्यावें. [ ७ ] ओंवा, निशोत्तर, कडुवृंदावनाचें मूळ, नागरमोथे, पोखरमूळ यांचा गोमूत्रात किंवा पाण्यात काढा करून प्यावा. [ ८ ] निर्गुडीच्या पाल्याच्या रसात सिद्ध केलेलें तूप द्यावें- [ ९ ] प्रकृति वातरहित करून कडु व तिखट यूप द्यावे. ( १० ) आडूळशाचे पिकलेले पानाचा रस मध घालून द्यावा. ( ११ ) मनशीळ, त्रिकटू, वाळहिरडे, हिंग, वावडिंग, व सैंधव यांचें चूर्ण मध व तूप यांशीं द्यावें; तें श्वास, उचकी व कास यांजवर उत्तम आहे. ( १२ ) त्रि-

कटू, अजमोदा, चित्रक, जिरें, वेखंड व चवक यांचा कल्क करून त्यांत तूप, आडूळशाचा रस, व मध घालून द्यावा. ( १३ ) हिरडेदळ, सुंठ, पिपळी, नागरमोथे, व देवदार यांचें चूर्ण मधांत द्यावें. ( १४ ) चित्रकमूळ, पिंपळमूळ, पिपळी व गजपिंपळी यांचें चूर्ण मधाशी द्यावें.

**उरःक्षतकास** ( मा. नि. )—अति मैथुन, अति भार वाहणें, अति मार्गगमन, मल्लयुद्ध, घोडा,हत्ती हे पळत असतां त्यांच्यामागें पळत जाऊन धरणें, व साहसकर्म ह्या कारणानी रुक्ष पुरुषाचें उर फुटून वायूचा कोप होऊन खोकला उत्पन्न होतो. त्या रोग्याला प्रथम नुस्ती ढास लागून नंतर मुखांतून रक्त पडूं लागते, घसा फार दुखतो, उर फुटल्यासारखा होतो, आणि तीक्ष्ण सुयानी टोंचल्यासारखी पीडा, स्पर्श सहन न होणें, कुऱ्हाडीनें तोडल्यासारखी वेदना, दाह यांनी युक्त असा शूळ होतो. आणि तो रोगी संधी फुटणें, ज्वर, श्वास, तृष्णा, स्वरभेद, यांनी पीडित होतो. क्षतकासाच्या योगानें रोगी पारव्यासारखा घुरघुर शब्द करितो. यात रक्तमिश्रित काळा, पिवळा, कोरडा, गांठाळलेला, कुजलेला असा कफ पुष्कळ पडतो. स्वर बदलणें, हळूहळू वीर्य, रुचि, पचनशक्ति, बल व वर्ण ही कमी होतात, व रोगी क्षीण झाला असतां रक्तमिश्रित मुततो, ही लक्षणें होतात. **उपाय**—( १ ) पांढरी व तांबडी वसू ( वेटोळीमूळ ) सरळ देवदार, कासविंदा, गुळवेल, कडू पडवळ, रिंगणीमूळ, व मरवा, याचा काढा दूध, सुंठ, मिरी आणि पिपळी याच्या कल्कांत सिद्ध केलेलें तूप सेवन केलें असता खोकला विषमज्वर, क्षय, व मूळव्याध, यांचा नाश होतो. ( २ ) पातळ कफ असेल तर शमन, व दाट कफ असेल तर शोधनधूम द्यावा. ( ३ ) लाखेचें चूर्ण मध घालून दुधाबरोबर प्यावें. तें जिरल्यावर साखर घालून दूधभात जेवावा. ( ४ ) ज्याच्या कुशी, बस्ति, वगैरे जागी शूल आहे व ज्याचें पित्त, व अग्नि मंद आहे त्यानें मद्यात घालून लाख प्यावी. व ज्यास पातळ मळ होत असेल त्यानें नागरमोथे, अतिविष, पाहाडमूळ, व कुड्याचें मूळ याचें चूर्ण घालून मद्य प्यावें. ( ५ ) पाण्यात गूळ घालून कढवून निवाल्यावर मध व मिरपूड घालून द्यावें. ( ६ ) दालचिनी ·।।· तोळा, तमालपत्र ·।।· तोळा, वेलची ·।।·, पिंपळी २, आणि खडीसाखर, मनुका, जेष्टीमध, आणि खारका ही प्रत्येक चार चार तोळे घेऊन बारीक चूर्ण करून मधांत गोळ्या कराव्या त्या शुक्राची वृद्धि करितात, आणि रक्तपित्त, खोकला, दमा, अरुचि, वांति, मूर्च्छा, उचकी, मद, भ्रम, उरःक्षत, क्षय, स्वरभेद, कवळू, सूज, ऊरुस्तंभ, वांति, रक्ताचे बेडके, उरात व कुशीत दुखणे, तहान व ज्वर याचा नाश होतो. (७) रिंगणीचें पंचांग, पिपळी, पिपळमूळ, आघाड्याचें बी, जिरें, आणि सैंधव याचा लेह सिद्ध करून द्यावा. तो खोकला, दमा, उरःक्षत, आणि कफरक्त, वांति, याचा नाश करितो. ( ८ ) मजिष्ठ, मोरवेल, तगर, चित्रक, पाहाडमूळ, पिपळी व हाळद याचें चूर्ण मधाबरोबर चाटावें. ( ९ ) पारा १ भाग, रौप्यभस्म पाऱ्याचे चतुर्थांश, मनशीळ व सुवर्णमाक्षिक भस्म ही चतुर्गुण घेऊन आडूळसा व उसाचा रस

यांत दोन प्रहर मर्दन करावें आणि कांचकुपींत भरून वालुकायंत्रांत दोन प्रहर पचवून काढून वांटून त्यांतून दोन गुंजा हातोरेश्वर रस दाळिंब, त्रिफळा, त्रिकटू व या सर्वांसमान गूळ घालून त्याचा एक तोळा चूर्णाशी द्यावा; ह्मणजे क्षतक्षयकासाचा नाश होतो. ( १० ) बिया काढलेल्या मनुका, साजूक तूप व मध हीं औषधें एका बरणीत भरून ती बरणी साळींचे किंवा तांदुळाचे राशींत एक महिनाभर पुरून ठेवावी. नंतर काढून साजसकाळ बलाबल पाहून देत जावें ( ११ ) मौक्तिकभस्म व गुळवेलीचें सत्व हीं गुलकंदांत घालून द्यावी; ह्मणजे उरःक्षत, धातुस्राव, क्षय, पित्त, ज्वर, व अशक्तता जाऊन मनुष्य सुदृढ होतो. ( १२ ) प्रवाळभस्म अथवा मौक्तिकभस्म साजूक तूप व मध यांत द्यावें.

**क्षयकास** ( मा. नि. )—विषम, न सोसणारें अन्नाचें भोजन, अति मैथुन मळमूत्रादिकाचा वेग धारण, यापासून किंवा अत्यंत दया व शोक याला करणाऱ्या मनुष्याच्या अग्नीला कफादि दोष मंद करितात व ते तिन्ही दोष कोपून क्षतजन्य व देह नाश करणारा खोकला उत्पन्न करितो. मग त्या खोकणारास, गात्रशूल, ज्वर, दाह आणि मोह हीं होतात. व प्राणक्षयही होतो. रोगी वाळत जातो, दुर्बळ होऊन शरीरात मांसाचा लेश राहत नाहीं. खोकतां खोकता जे कफाचे बेडके पडतात त्यात रक्त आणि पू असतो. फासळ्या उपटल्यासारखें वाटणें, तोंड स्निग्ध, व टवटवीत दिसतें, त्या सर्व लक्षणांनीं युक्त आणि चिकित्सा करण्यास फार अवघड अशा या खोकल्यास वैद्यलोक क्षयकास ह्मणतात.

**साध्यासाध्य विचार** ( मा. नि. )—याप्रमाणें हा क्षयकास क्षीण पुरुषास घातक होतो, बलवान पुरुषाचा असाध्य किंवा कष्टसाध्य, क्षतजकासाचाही असाच प्रकार आहे. मोठा प्रयत्न केला असतां हे दोन्हीं प्रकारचे कास नवीन असल्यास कदाचित् साध्य होतात. वृद्ध पुरुषांचा जराकास ह्मणजे धातूक्षयानें झालेला सर्व प्रकारचा खोकला कष्टसाध्य होतो. पहिले तीन कास साध्य आहेत ते औषधानें बरे करावे आणि कष्टसाध्य आहेत ते पथ्यसेवनावर लोटावे.

**क्षयकासावर उपाय**—( १ ) गांगेरुचें मूळ पहिलें दिवशी ॥· तोळा दुसरे दिवशी १, तिसरे दिवशी १॥ याप्रमाणें ४ तोळेपर्यंत चढवावे. नंतर एक महिनापर्यंत दररोज चार तोळेपर्यंत घेत जावे. हें दुधाबरोबर घ्यावें व कांहीं अन्न न खातां दुधावरच राहावें. हा प्रयोग पुष्टि, शक्ति आयुष्य व उत्तम वर्ण उत्पन्न करण्याविषयी उत्तम आहे. याप्रमाणें ब्राह्मी, जेष्टीमध व सुंठ यांचीही योजना करावी. ( २ ) क्षयकासावर प्रथम बृहण व दीपन औषधें द्यावी. ( ३ ) फार दोष वाढले असल्यास स्नेहयुक्त मृदु रेचन द्यावें ( ४ ) दुप्पट डाळिंबाच्या रसांत त्रिकटूचा कल्क करून सिद्ध केलेलें तूप जवखार घालून जवल्यावर प्यावें. किंवा पिंपळी व गूळ यांनी सिद्ध केलेलें तूप शेळीचें दूध घालून प्यावें; ह्मणजे क्षयकास झालेल्या रोग्याचा अग्नि वाढून कफानें लिप्त झालेला कंठ, ऊर व स्रोतसें यांची शुद्धि होते.

( ५ ) त्रिकटूचें चूर्ण गूळ व तूप घालून चाटावें. ( ६ ) पिंपळी, पद्मकाष्ठ, लाख व चांगलें पिकलेलें रिंगणीचें फळ हीं समभाग घेऊन वांटून त्यांत तूप व मध यांशीं लेह करून सेवन करावा. ( ७ ) अर्जुनवृक्षाचे सालीचे चूर्णास अडूळशाचे रसाच्या पुष्कळ भावना देऊन तें चूर्ण मध, तूप व खडीसाखर यांत घालून चाटावें, तें क्षय-कास व पित्त याचा नाश करितें.

**सर्व प्रकारचे कासांवर उपाय**—( १ ) किराईत, कुटकी, नागरमोथे, धणे, इंद्रजव, सुंठ, दशमुळें, देवदार व गजपिंपळी यां औषधांचा काढा करून घेतला असतां कास, श्वास, पार्श्वशूल, सन्निपातज्वर, ओकारी, उचकी, डोळ्यावरची झांपड, व हृदयव्यथा, हे सर्व दूर होतात. ( २ ) ताम्रभस्म व पिंपळीचें चूर्ण बलाबल पाहून अनुपान योजून द्यावें.(३)कोष्ठ, सैंधव, नागरमोथे, धमासा, जिरें, शाहाजिरें जवखार, सज्जीखार, चित्रकमूळ, अजमोदा, व हरीतकी, यां सर्वांचे दुप्पट जुना गूळ घेऊन यांचा अवलेह करून मध घालून द्यावा; ह्मणजे कास, श्वास, अग्निमांद्य, कांवीळ, पांडुरोग, गुल्म, उचकी, राजयक्ष्मा, ज्वर, अर्श, प्लीहा, ऊर्ध्ववात, व आनाह वायु हे सर्व दूर होतात. (४) धणे, लोहभस्म, अजमोदा, जिरें, वेलदोडे, दालचिनी, व जायपत्री ही औषधें समभाग घेऊन त्यांचे दुप्पट आलें व गूळ घेऊन या सर्वांचा पाक करावा. तो पाक भक्षिल्यानें मूळव्याध, खोकला, ज्वर, पिनस, प्लीहा, कफ, गुल्म, व क्षय यांचा नाश होतो. ( ५ ) डोरलीचा काढा पिपळी व खडीसाखर घालून द्यावा. ( ६ ) शिरसेल तेल व गूळ एकत्र करून चाटण द्यावें. ( ७ ) दोन पैसे भार उष्णोदकांत साजुक तूप, मध, खडीसाखर आणि सैंधव घालून प्यावें. या प्रमाणे दोन चार दिवस घेतलें असतां कफ पातळ होऊन पडतो. व कास, श्वास हे दूर होतात. ( ८ ) तालीमखान्याचें चूर्ण मध व साजुक तूप यांशीं द्यावें. ( ९ ) आघाड्याचें पंचांग (ह्मणजे मूळा बिया सुद्धां सर्व झाड) काळ्या निर्गुडीच्या [ नीळीच्या ] रसांत वांटून त्यांत मनशीळ, व हरताळ, घालून त्याची वडी वस्त्रानें गुंडाळून अग्नींत टाकावी त्याचा धूर निघेल तो तोंडानें प्यावा. ह्मणजे घोर व भयंकर असे कास व श्वास निवारण करील. [ १० ] बोरीचीं पानें वांटून तुपांत तळून सैंधव घालून लेह करून चाटावा; ह्मणजे स्वर बदलणें, कास व श्वास यांचा नाश होईल. [ ११ ] काकडाशिंगी, सुंठ, मिरीं, पिपळी, त्रिफळा, पोखरमूळ, सैंधव, रिंगणमूळ, भारंगमूळ, संचळ, बीडलोण, समुद्रमीठ, व बागडखार, हीं सर्व सम भाग घेऊन यांचें चूर्ण कोंबट पाण्याबरोबर प्यावें. ह्मणजे कास, श्वास, अरुचि, व पडसें यांचा नाश होतो ( १२ ) भारंगमूळ, सुंठ व पिपळी यांचें चूर्ण गुळाशीं किंवा त्रिकटूचें चूर्ण मध व तूप यांत द्यावें. ह्मणजे कास व श्वास यांचा नाश होतो. ( १३ ) नागरमोथे, सुंठ व बाळहिरडे यांचे चूर्णाची गुळांत गोळी करून तीन दिवस तोंडांत धरावी ह्मणजे श्वास कासाचा नाश होतो. ( १४ ) रिंगणमूळ व पिपळी यांचें चूर्ण मधाशीं द्यावें. ( १५ ) बेहेडेदळ २ भाग व पिंपळी १ भाग यांचें चूर्ण मधात द्यावें हें फार चांगलें आहे. ( १६ )

रुईचें मूळ व मनशीळ यांचे निमे त्रिकटूचें चूर्ण घालून एक जागीं करून निर्धूम अ-ग्नीवर टाकून त्याचा धुर घ्यावा वर विडा खावा किंवा दुध प्यावें ह्मणजे पाच प्रकारचा खोकला शांत होतो यांत संशय नाही (१७) रिगणमूळाचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा ह्मणजे क्षणांत खोकल्याचा नाश होतो. (१८) मिऱ्याचें चूर्ण, तूप, साखर व मध यांत द्यावें. (१९) कापूर, वाळा, कंकोळ, जायफळ व जायपत्री हीं समभाग आणि लवंगा, नाकेशर, मिरी, पिंपळी, आणि सुंठ ही एकोत्तर वृद्धीनें घेऊन चूर्ण करून त्यासमान साखर मिळवून द्यावें; तें रुचिकर आहे आणि क्षयकास, स्वरभंग, श्वास, कास व ओकारी यांचा नाश करितें. (२०) मिरी १ तोळा, पिपळी १ तोळा, जवखार -।।- तोळा व डाळिंबसाल २ तोळे या सर्वांचें चूर्ण करून त्यांत आठ तोळे गूळ घालून चार माशाची गोळी करून तोंडांत धरावी ह्मणजे संपूर्ण प्रकारचे खोकले नाश पावतात. (२१) अर्जुनसादड्याची साल, दालचिनी, तमालपत्र, एलची, पिपळमूळ व त्रिकटु हीं समान आल्याच्या रसांत घोटुन वालप्रमाण गोळी द्यावी. (२२) बोरीच्या पानाला मनशीळ लावून उन्हांत वाळवून चिलमींत घालून धूर प्राशन करावा; ह्मणजे मोठ्याही कासाचा नाश होतो. (२३) रिगणीचें पंचांग २०० तोळे व हरीतकी २०० तोळे घेऊन १०२४ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून त्यांत २०० तोळे गूळ घालून चांगला लेह होण्याजोगा पाक झाला ह्मणजे उतरून थंड झाल्यावर त्यात सुंठ, मिरी व पिंपळी हीं दोन दोन तोळे, मध १२ तोळे दालचिनी अर्ध तोळा, तमालपत्र अर्ध तोळा, एलची अर्ध तोळा, व नाकेशर अर्ध तोळा यांचें चूर्ण आत घालून सारखा लेह करून ठेवावा व सोसेल तसा द्यावा, ह्मणजे वात, पित्त, कफ, द्विदोष, सन्निपात यापासून झालेले व क्षतकास, क्षयकास, पीनस, उरःक्षतकास, एकादशविध क्षय याचा नाश होतो. हें रसायन भृगुऋषीनें सांगितलें आहे. (२४) शेळीचें मूत २०० तोळे मंदाग्नीवर गुळपाकासारखें आटवून त्यांत बेहड्याचें चूर्ण ४ तोळे, पिपळीचें चूर्ण २ तोळे, लोहभस्म २ तोळे, रिगणीच्या फळाचें चूर्ण ४ तोळे घालून यांचा एकत्र अवलेह करून ठेवावा. त्यांतून बलाबल पाहून एक तोळापर्यंत घेऊन तो मधाशीं किंवा केळीचे पाण्याशीं द्यावा; ह्मणजे जे फार दिवसांचे वैद्यांनीं सोडलेले आणि पथ्यहीन असे कासरोग तात्काळ नाश पावतात. हा अवलेह आत्रेय ऋषीनें सांगितला आहे. [२५] हिंगूळ, मिरी. नागरमोथे, टांकणखार व बचनाग यांचा निंबाचे रसात खल करून गुंजप्रमाण गोळी आल्याचे रसांत द्यावी; ह्मणजे कास व श्वास यांचा नाश होईल. [२६] पारा, गंधक, अभ्रकभस्म, ताम्रभस्म, हरनाळ भस्म, लोहभस्म, बचनाग आणि मिरी यांचें चूर्ण करून तें निर्गुंडी, कावळी व निळा माका यांच्या रसाच्या भावना निरनिराळ्या देऊन वाटाण्याएवढी गोळी करून शिवाची पूजा करून ब्राह्मणाला दानें देऊन नंतर गोळी भक्षण करावी, अन्न जिरल्यावर पुन्हां भोजन करावें. तें दूध व मांसरस असें असावें, ह्मणजे शेंकडो वैद्यांना बरें न होणारें असें आम्लपित्त, पाच प्रकारचे

खोकले, आणि दुर्जर असा श्वास यांचा नाश होईल. [२७] भ्रासकापूर व कस्तूरी हीं पाव पाव तोळा, लवंगा अर्धा तोळा, मिरीं, पिंपळी, बेहडेदळ, व कोळिंजन हे प्रत्येक दीड मासा व दाळिंबाची साल एक तोळा, हीं सर्व औषधें घेऊन ताकाशीं वांटून त्याची गुंजप्रमाण गोळी करून तोंडांत धरावी; ह्मणजे ती कफाचा नाश करिते. [ २८ ] कांतणीचें घर जें भिंतीवर असून आंत जंतु वगैरे नसतील, असें घेऊन दररोज थोडेंसें गुळांत सकाळीं, दुपारी व रात्री जेवल्यावर असें तीन वेळा सेवन केल्यानें खोकला व जबरदस्त श्वास यांचा नाश होईल.

**कासावर पथ्य**—वमन, जुन्या साटक्या साळीचा भात, जुन्या गव्हाची पोळी, उदीद, मुग, व तुरी यांचें वरण, कुळीथ, शेळीचें दूध व तूप, तोंडलीं, वांगीं, चाकवत, कोंवळे मुळे, लसूण, उन पाणी, यव, खारीक, मद्य, द्राक्षें, लाह्या, मेथी, पडवळ, अफू, करटोली, कारलीं, नवा गूळ, दोडकी, तवकीर, तांदुळजा, बेदाणा, धणे, नागवेल, निंबूं, परवरें, पडवळ, पुदीना, ब्राह्मी, महाळुंग, लवंगा, पिठीसाखर, गोडा सुरण, शेळीचें दहीं, हिंग, गाईचें दूध, गाईचें लोणी, मांस, मद्य, चाकवत, गोमूत्र, इ० पदार्थ सेवन करावे.

**कासावर अपथ्य**—बस्तिकर्म, नस्य, शिरावेध, व्यायाम, दंतकाष्ठ, ऊन, वारा, दाह करणारे व रुक्ष पदार्थ, आंबट पदार्थ, मल, मूत्र, व ओकारी यांच्या वेगाचें धारण, मासे, कंद, दुध्या भोपळा, आकंठभोजन, जड पदार्थ, मैथुन, स्निग्ध व मधुर पदार्थ, तेलकट पदार्थ, कौठ, दहीं, ताक, दिवानिद्रा, दूध, पिष्टान्न, जायफळ, थंड पाणी इ० पदार्थ वर्ज करावे.

---

## कुष्ठ ( कोड ).

॥ कुष्ठानिसप्तधादोषैः पृथक् द्वंद्वैः समागतैः ॥ सर्वेष्वपित्रिदोषेषुव्यपदेशोऽधिकत्वतः॥

**अर्थ**—पृथक् दोषांनीं ३ द्वंद्वांनी ३, आणि सन्निपातानें एक मिळून ७, सर्व कुष्ठं त्रिदोषज असताही जो दोष अधिक असेल त्यानें व्यवहार करावा. (जसें वातेनकुष्ठंकापालं० इ०.)

**कर्मविपाक**—सप्तमस्थानीं राहु, सूर्य, मंगळ, अथवा मेष, वृश्चिक ह्या लग्नीं रवी असून त्याजवर शुक्रदृष्टि किंवा अष्टमस्थानी शनि, सिंहीं, रवी असून त्याजवर शुक्राची दृष्टि नीचस्थ रवीची दशा इत्यादि योगांनी कुष्ठरोग उत्पन्न होतो. **परिहार**—जो ग्रह अनिष्ट असेल त्याची दानें आणि जप इत्यादि करावा.

**पूर्वकर्मविपाक**—विनाकारण सतत प्राणीहत्या करणें, अपराधावांचून दंड करणें, वस्त्राची चोरी करणें, यांपासून कुष्ठरोग, व मुखरोग प्राप्त होतात. परि-

हार—कृच्छ्रातिकृच्छ्र प्रायश्चित्त, सांतपन प्रायश्चित्त, रौप्यदान, वृषभदान, उमामहेश्वर-प्रतिमादान इत्यादिक जाणावें.

**कुष्ठाचें कारण** ( चरक )—वातादि तीन दोष त्वचा, रक्त, मांस, आणि उदक यास दुष्ट करून कोड उत्पन्न करितात. कुष्ठ होण्याला वातादि दोष आणि त्वचादि दूष्यें हे सात पदार्थ अवश्य कारणभूत आहेत. ह्मणून अष्टादश कुष्ठें होतात. त्यापैकीं सात महाकुष्ठें आणि आक्रा क्षुद्रकुष्ठें आहेत.

**कुष्ठाचें पूर्वरूप** ( मा नि. )—ज्याठिकाणीं कुष्ठ व्हावयाचें असतें ती जागा हाताला फार गुळगुळीत किंवा खरबरीत लागते. त्याठिकाणीं घाम येतो, किंवा येत नाहीं व त्या ठिकाणचा वर्ण बदलतो, दाह होतो, कंडू सुटते, त्वचेला स्पर्श कळत नाहीं, टोंचल्यासारखी पीडा होते, गांधीलमासी डसल्यासारख्या गांधी येतात. आयास केल्यावांचून श्रम होतात, व्रणास ठणका, त्यांची उत्पत्ति लवकर होऊन फार दिवस राहतात, ते भरून आले, तरी रुक्ष असतात. त्यांना थोडें निमित्त झालें तरी कोप होतो. रोमांच येतात. रक्ताला काळिमा येते; हे कुष्ठाचें पूर्वरूप होय.

**सप्तमहाकुष्ठें**—सप्तमहाकुष्ठांचीं लक्षणें सांगून नंतर आक्रा क्षुद्रकुष्ठें सांगतों.

**कपालकुष्ठ** ( मा. नि. )—काळ्या व तांबड्या खापरासारखें, रुक्ष, कर्कश, पातळ त्वचा झालेलें, टोंचणीनें व्याप्त असें दिसतें. हें चिकित्सा करण्यास अवघड आहे. **उपाय**—( १ ) वावडिंग, त्रिकटु, त्रिफळा, नागरमोथे, चित्रक, बचनाग, वेखंड व गूळ हीं समभाग घेऊन त्याचा तीन वेळ लेप केला असतां कापालिका सहित कुष्ठादि रोगांचा नाश होतो.

**औदुंबरकुष्ठ** ( मा. नि. )—शूळ, दाह, आरक्तता, आणि कंडू यांनीं व्याप्त असतें. त्यावरचे केंस भुरे असतात व तें उंबराच्या फळासारखें दिसतें. याजवर सामान्य कुष्ठनाशक उपचार करावे.

**मंडलकुष्ठ** ( मा. नि. )—पांढरें, तांबडें, कठिण, दडस, गुळगुळीत, मंडलाकार व जवळ जवळ लागून दुसरीं मंडलें होतात. हें कुष्ठ साध्य आहे. **उपाय**—( १ ) घर्षण करून चित्रकाचा लेप करावा. नंतर निर्गुडीचे बियांचा लेप करावा; ह्मणजे हें नाश पावतें.

**ऋष्यजिव्हकुष्ठ** ( मा. नि. )—कर्कश, तांबड्या कडा झालेलें, मध्यें काळें, वेदनायुक्त, ऋष्य ह्मणजे रोहिमृगाच्या जिव्हेसारखें असतें. त्याजवर सामान्य कुष्ठनाशक उपचार करावे.

**पुंडरीककुष्ठ** (मा. नि.)—किंचित् पांढरें, कडेला तांबडें, पांढऱ्या कमळाच्या पाकळीसारखें, यत्किंचित् उंच झालेलें आणि मध्यें थोडेंसें तांबूस असतें. याजवर सामान्य कुष्ठनाशक उपचार करावे.

**सिध्मकुष्ठ** ( मा. नि. )—पांढरें, तांबूस, पातळ, खाजविल्यानें कोंडा निघतो, हें बहुतकरून उरावर होतें. याचा आकार पांढऱ्या भोपळ्याच्या फुलाप्रमाणें असतो. त्याला लोकांत शिबें असें ह्मणतात. **उपाय**—( १ ) कापशीचा पाला, काकळी, आणि मुळ्याचें बी, ही ताकांत वांटून मंगळवारीं लेप करावा. ( २ ) मुळ्याच्या बियांचें चूर्ण गोमूत्राशीं, ताकाशीं अथवा कांजीशीं लेप वाटून करावा. (३) गंधक व जवखार पाण्यांत उगाळून लेप करावा. ( ४ ) हरताळ, गंधक व बावंच्या हीं औषधें क्रमवृद्धीनें घेऊन गोमूत्रात वांटून एक महिना लेप द्यावा. ( ५ ) मुळ्याचें बीज आघाड्याचे रसांत वांटून त्याचा किंवा केळीचा खार आणि हाळदयाचा लेप करावा. ( ६ ) कासविंद्याचें बी, मुळे आणि गंधक यांच्या लेपाचें शिळ्यावर मोठें औषध आहे. ( ७ ) मुळ्याचें बी, कडू निंबाचा पाला, पांढरें शिरस व घेरोसा हे पदार्थ पाण्यांत वांटून त्याचा अंगास लेप करावा. नंतर अंगास लेप लावून गरम पाण्यानें चांगलें धुवून टाकावें. याप्रमाणें तीन दिवस केलें असतां सिध्मकुष्ठाचा शीघ्र नाश होतो.

**काकणकुष्ठ** (मा. नि.)—गुंजेसारखें लाल ह्मणजे मध्यें काळें आणि तोंडाला तांबडें अथवा मध्यें तांबडें व कडेला काळें, किंचित् पिकलेलें, तीव्र वेदनायुक्त, तिन्ही दोषांचीं लक्षणें ह्यांत असतात. हें साध्य होत नाहीं.

**चर्मकुष्ठ** [ **गजकर्ण** ] [मा. नि.]—घर्मरहित, मोठी जागा व्यापणारें, माशाच्या खवल्याप्रमाणें, हत्तीच्या चामड्याप्रमाणें जाड असतें. **उपाय**—[ १ ] पारा, पांढरा कांत, मोरचूत, संगजिरा, व मुरदाडशिंग हीं औषधें बारीक खलून तांब्याच्या परातींत तूप घालून पुन्हां चागली खलावी आणि यांचा लेप करावा, ह्मणजे गजकर्ण, कडू खरूज, फोड वगैरे दूर होतात. [ २ ] कबाबचिनी, गेरु, कोष्ठ, मोरचुत, जिरें, मिरीं, हीं प्रत्येक तोळा तोळा व मनशीळ, गंधक हे दोन्ही मिळून बारा तोळे, आणि पारा बारा तोळे, तूप वीस तोळे घेऊन सर्वांचा ताम्रपात्रात खल करावा आणि तें औषध लावीत जावें. [ ३ ] पारा आणि गंधक यांची कज्जली करून त्यांत लोणी घालून खलावें आणि तें लावीत जावें. [ ४ ] आंवळेसार गंधक; मायफळ, व तेल्या टाकणखार हे निंबूरसात चार प्रहर खल करून गोळी करावी व ती निंबुरसांतच उगाळून लावीत जावी.

**किटिभकुष्ठ** ( मा. नि. )—नीलवर्ण, व्रणाच्या घट्टयाप्रमाणें, खरखरीत व रुक्ष असतें. **उपाय**—मनशीळ, हिराकस, आणि मोरचूत, हीं गोमूत्रात वाटून लेप करावा. म्हणजे किटिभ, विसर्प; आणि सर्व कुष्ठें यांचा नाश करण्याविषयीं श्रेष्ठ आहे.

**वैपादिककुष्ठ** ( मा. नि. )—याच्या योगानें हात व पाय फुटतात ह्मणजे चिरा पडतात आणि वेदना फार होतात. **उपाय**—( १ ) धोत्र्याच्या बिया आणि

सैंधव यांचा पाण्यात कल्क करून शिरसाच्या तेलांत पचन करावें, व त्या तेलाचा लेप करीत जावा.

**अलसककुष्ठ** ( मा. नि. )—हें कुष्ठ फार खाजणाऱ्या व तांबड्या रंगाच्या फोडानी व्याप्त असतें.

**दद्रु ( मंडलकुष्ठ )** ( मा. नि. )—कंडू, लाली आणि फोड असतात. हें वर उचललेलें असतें व मंडलाकार उत्पन्न होतें. **उपाय**—( १ ) वाहाव्याची पानें वाटून कांजींत मिश्र करून लेप करावा. तो गजकर्ण, महाकुष्ठ, दद्रु, पामा व विचर्चिका यांचा नाश करितो.

**चर्मदलकुष्ठ** ( मा. नि. )—तांबडें, शूलयुक्त, कंडूयुक्त, फोडांनीं व्याप्त असून फुटतें. त्याला हात लाविला तर सहन होत नाहीं, ह्यांत चामडी फाटते ह्मणून ही संज्ञा दिली आहे. **उपाय**—( १ ) मोहऱ्या, गूळ आणि सैंधव यांचा पाण्यावांचून वाटून लेप करावा व वर चामडें बांधावें. ( २ ) आघाड्याचें भस्म मडक्यांत भरून त्यांत मधोमध शुद्ध हरताळ ठेवून १२ प्रहर अग्नि द्यावा; ह्मणजे हरताळीचें पांढरें भस्म होतें तें संपूर्ण कुष्ठें, संपूर्ण वायु, आणि सर्व रोगांचें निवारण करितें. ( ३ ) हिंगूळ, गंधक, पारा, पिपळी, वचनाग, वावडिंग, हळद, चित्रक, मिरी, वाळहिरडे, सुंठ, नागरमोथे, समुद्रफेंस, बावंच्या, कुटकी, वाहावा, व टाकळ्याचें बी, हीं सर्व समभाग निंबाचे रसांत खलून लेप केला असतां दद्रु, कंडू, विसर्प, लूत, भगंदर व मंडलकुष्ठ यांचा क्षणांत नाश होतो. ( ४ ) पारा, गंधक, नाकेशर, व अभ्रकभस्म. ही शिरसाचे तेलांत खलून मर्दन करावें; ह्मणजे सर्व कुष्ठांचा नाश होतो. (५ त्रिफळा, वावडिंग,व पिपळी यांचें चूर्ण मधांत चाटलें असतां कुष्ठ, कृमि, मेह, नाडीव्रण, व भगंदर यांचा नाश होतो. ( ६ ) पारा व गंधक यांची कज्जली शिरसाचे तेलांत खलून नंतर माक्याच्या रसांत खलून लेप करावा. ह्मणजे सर्व कुष्ठांचा नाश होतो.

**पामाकुष्ठ ( खरूज )** ( मा. नि. )—बारीक बारीक पुष्कळ फोड येतात, त्यांतून लस वाहते, खाज फार सुटते व आग होते. **उपाय**—( १ ) मोहऱ्याचें तेल, हळदीचा कल्क, आणि रुईच्या पानाचा चीक एकत्र खलून लावावें; ह्मणजे शीघ्रपामा, कच्छू आणि विचर्चिका यांचा नाश होतो.

**विस्फोटककुष्ठ** ( मा. नि. )—निळें व तांबडे रंगाचें व वरची त्वचा पातळ असते. असे फोड येतात. याजवर साधारण कुष्ठरोगावरील उपचार करावेत.

**कच्छूकुष्ठ** ( मा. नि. )—जी पामा हातावर किंवा कमरेवर मोठ्या फोडांनीं व तीव्र दाहानें युक्त अशी असते ती. **उपाय**—( १ ) हळदीचा कल्क करून त्यांत गोमूत्र ८ तोळे घालून प्राशन करावा; ह्मणजे कच्छू व पामा यांचा

नाश होतो. (२) शेंदूर, जिरें, शहाजिरें, हळद, दारुहळद मनशीळ, मिरीं, गंधक आणि पारा यांचा तुपाशीं खल करून लेप करावा.

**शतारुकुष्ठ** ( मा. नि. )—तांबडें, शामवर्ण, दाह, शूलयुक्त, व अनेक व्रणयुक्त असें असतें. उपाय—( १ ) गंधकाचें चूर्ण शिरसाचे तेलांत खलून त्याचा लेप करावा किंवा प्राशन करावें; ह्मणजे कच्छू व पामा वगैरे कुष्ठांचा नाश होतो. ( २ ) अडूळशाची कोंवळीं पानें व हळद गोमूत्राशीं वांटून लेप करावा ह्मणजे कच्छूचा व दुसऱ्या खरजेचा नाश होतो.

**विचर्चिकाकुष्ठ**—[ बारीक फोडांची खरूज ] ( मा. नि. ) कंडूयुक्त, फोड शामवर्ण व त्यांतून फार स्राव होतो. ही पायावर उत्पन्न होते. याजवर साधारण कुष्ठनाशक उपाय करावा.

**वातादिप्रधानदोष** [ मा. नि. ]—वायूनें कापालकुष्ठ, पित्तानें औदुंबर, कफानें मंडल आणि विचर्चिका; वातपित्तानें ऋष्यजिव्ह, वातकफापासून चर्मकुष्ठ, किटिभ, सिध्म, अलस, आणि विपादिका, कफ पित्तापासून दद्रु, शतारू, पुंडरीक, विस्फोटक, पामा,व चर्मदल आणि त्रिदोषापासून काकणकुष्ठ होतें, असें जाणावें.

**किलासकुष्ठ** [ पांढरें तांबडें कोड ] [ मा. नि. ]—कुष्ठ होण्याला जीं कारणें [ विरुद्धाशन पापकर्मादि ] सांगितली आहेत, त्या कारणांनीं श्वित्र [ पांढरें कोड ] आणि किलास [ तांबडें कोड ] ही होतात. त्यांतून स्राव होत नाहीं व हें तीन धातूंचा आश्रय करून राहतें, तें वायूनें रुक्ष व अरुण होतें; पित्तानें रक्तकमलपत्राप्रमाणें लाल असतें, व आग होते, व त्यावरचे केंश झडतात, कफाच्या योगानें तें पांढरें, जाड आणि जड असतें, कंडू सुटते; हीं क्रमानें रक्त, मास आणि मेद यांच्या ठिकाणीं होतात; ह्मणजे दोष रुक्ताश्रित असतां तांबडें, मांसाश्रित असतां तांबूस आणि मेदाश्रित असता पांढरें किलास होतें.

**श्वित्राचें साध्य लक्षण** [ मा. नि. ]—ज्या श्विलावरचे केंश पांढरे झाले नाहींत व जे पातळ असून एकमेकास लागले नाहीत व जें नवीन झालेलें आहे व जें भाजल्यामुळें झालेलें नाही तें श्विल साध्य होतें असें जाणावें.

**किलासाचें असाध्य लक्षणं** [ मा. नि. ]—गुह्यस्थानीं, तळहातावर, तळपायावर, ओंठावर, आलेलें किलासकुष्ठ थोड्या दिवसांचें असलें तरी यश मिळविणाऱ्या वैद्यानें सोडून द्यावें.

**श्वेतकुष्ठावर उपाय**—पंधरा दिवसांनीं वमन, दर महिन्यास रेचक, तीन दिवसांनी नस्य, व सहा महिन्यानी रक्तमोक्ष करीत जावा. [ १ ] वडाचें फळ, आंवळकठी, खाती हाळद, चित्रकमूळ, व दारुहळद,ही समभाग गोमूत्रांत खलून सात दिवस लेप करावा. [ २ ] गाभण्या गाईचें गोमूत्र २॥. शेर, माक्याचा रस २॥. शेर, व बिबवे दाणे ५० बारीक वांटून आत टाकावे व त्यांत तिळा-

चें तेल घालून मंदाग्नीवर तेल सिद्ध करावें. त्या तेलाचें प्राशन व अभ्यंग केलें असतां श्वेतकुष्ठ जातें. [ ३ ] हाळद पाण्यात वाटून गोळा करावा. त्यासमान गाईचें लोणी घेऊन एका पातेल्यांत घालावें. त्यांत थोडें पाणी घालून तूप सिद्ध करावें व तें कुष्ठास लावीत जावें. ( ४ ) लसूण व कळीचा चुना एकत्र वांटून वर लेप करावा. ( ५ ) चित्रकमूळ, त्रिफळा, त्रिकटू, जिरें, बडीशेप, वेखंड, सैंधव, अतिविष, कोष्ठ, चवक, एलची, यवक्षार, वावडिंग, अजमोदा, नागरमोथे व देवदार, ही सर्व समभाग व सर्वांच्या समान गुग्गुळ एकत्र करून त्यांत तूप घालून कढवून त्याची गोळी करावी. ती प्रातःकाळीं किंवा भोजनसमयीं बल पाहून द्यावी. ह्मणजे अठरा प्रकारची कुष्ठें, कृमि, दुष्टव्रण, संग्रहणी, अर्शोविकार, मुखरोग, गलरोग, गृध्रसी, भग्न, गुल्म आणि कोष्ठगत व्याधी यांचा ही गोळी नाश करिते. (६) वावडिंग; हिरडा, वेहेडा, आंवळकठी आणि पिंपळी यांचें चूर्ण ताकाशीं द्यावें किंवा मधाशीं द्यावें. तें कोड, जंतु, मेह, नाडीव्रण आणि भगंदर यांचा नाश करितें. (७) खैराच्या झाडाखालीं खळगा करून त्यात खापर ठेवून खैराचें मूळ दुखवून त्यावर अग्नि करावा, ह्मणजे त्याचा खापरांत रस जमतो. त्यात आवळ्याचा रस व मध घालून द्यावा; तो कुष्ठनाश करितो. व रसायनही आहे. ( ८ ) शुद्ध पारा १, गंधक १, ताम्रभस्म २ भाग, एकत्र करून वावंच्याच्या काढ्यात एक दिवस घोटून त्याची सुमारें गुंजप्रमाण गोळी करावी आणि खावी. आणि एक तोळा बावचीचें तेल मध घालून मागून प्राशन करावें; ह्मणजे पांढरें कोड नाश करणारी ही गोळी शशिलेखेसारखी आहे. ( ९ ) मोरचूताच्या पाण्यात सात वेळ कागोणींचें तेल पचन करावें. तें अंगास लाविलें असता तें पांढऱ्या कोडाचा नाश करितें. ( १० ) गुंजा, कोष्ठकोळिंजन, वेखंड व कडूनिंब ही पाण्यात वांटून लेप करावा. अथवा श्वेतगोकर्णी किंवा श्वेतनिर्गुडी याचे मुळ्यांचा लेप श्वेतकुष्ठनाशक आहे. (११) गुंजा व चित्रक यांचा किंवा मनशीळ व आघाड्याची राख यांचा लेप श्वेतकुष्ठनाशक आहे. ( १२ ) चार मासे हरताळ, १६ मासे बावंच्या, गोमूत्रात वांटून लेप करावा ह्मणजे श्वेतकुष्ठ जाईल. ( १३ ) हरताळ, पाऱ्याचें भस्म समभाग व या दोहोंचे चतुर्गुण भाजलेली भाग व सर्वांचे बरोबर गूळ घालून एकत्र खलून चार मासे प्रमाण गोळी खावी. हा विजयेश्वर रस श्वेतकुष्ठांचा नाश करितो. याजवर, खैर, दारुहळद व कडु निंब यांचा काढा प्यावा. ( १४ ) खैराची साल व आंवळकठी याचा काढा बावंच्याचें चूर्ण घालून प्राशन करावा ह्मणजे श्वेतकुष्ठाचा नाश होईल. ( १५ ) पांढऱ्या कुष्ठाचें वारंवार रक्त काढून आणि खैराचा काढा यवान्न देऊन तृप्त करून, वावच्याचा रस गूळ घालून प्राशनार्थ द्यावा. आणि भोजनाला यवागू द्यावा. (१६) खैराच्या सालीचा काढा १०२४ तोळे करून तो तुपानें रावलेल्या मडक्यात किंवा बरणींत ठेवून त्यांत त्रिफळा, त्रिकटू, हळद, धोत्रा, दालचिनी, वावंच्या, गुळवेल व वावडिंग, या प्रत्येकाचें चार चार तोळे चूर्ण आणि मध ८०० तोळे, धायटीची फुलें ३२ तोळे घालून चांगलें तोंड बांधून एक महिना ठेवावा. यांतून प्रा-

तःकालीं बलाबल पाहून पित जावा. ह्मणजे फार दिवसांचें कोड नाश पावतें. एक महिन्याचे संपूर्ण रोग, सूज, मेह, खोकला, दमा, मूळव्याध, भगंदर यांपासून मुक्त होतो. व हा कनकारिष्ट घेतला असतां अंगकांति सुवर्णासारखीं होते. ( १७ ) लेप अंगास लावणें, स्नान,पान व भोजन यांमध्यें खैराच्या काढ्याचा उपयोग केला असतां संपूर्ण कुष्ठरोग नाश पावतात. ( १८ ) २०४८ तोळे पाण्यांत ३०० बिबवे घालून चतुर्थांश काढा करावा. नंतर त्यांत ५१२ तोळे तिळाचें तेल व कुटकी, अतिविष, कळलावी, त्रिफळा, शिलाशित व रसांजन हे चार चार तोळे घालून तैल सिद्ध करावें, हें सर्व कुष्ठ दूर करण्याविषयीं फार उत्तम व आनुभविक आहे.

**कुष्ठावर पथ्य**—रेच, वांति, जुन्या साळीचा भात, मूग, मसुरा, तांबड्या तुरीचे डाळीचें वरण, तूप, गव्हाची पोळी, यव, ससा व हरीण यांचें मांस, करटोलीं, पडवळ, कोवी, घोळ, चाकवत, दोडके, घोसाळीं यांच्या भाज्या, वांग्याचें भरीत, तिळाचें तेल, उन पाणी, शेळीचें लोणी, तवकीर, लसूण, मोहऱ्या, काजू, चाकवत, ताक, एरंडतेल, कबाबचिनी, खिरण्या, ब्राह्मी, मध, गोमूत्र व जोंधळ्याची भाकरी ई० पथ्यास सेवन करावें.

**कुष्ठावर अपथ्य**—घाम काढणें, मैथुन, वांतीच्या वेगाचें धारण, ऊंस, मेहनत, तीळ, उडीद, मासे, दही, दूध, गोडा सुरण, मद्य, कारलें, [illegible] यांची भाजी, गूळ, आंबट, खारट, तिखट असे पदार्थ हे कुष्ठावर वर्ज करावे.



---

## कृमि ( जंत. )

॥ कृमयस्तुद्विधाप्रोक्ता बाह्याभ्यंतरभेदतः ॥ बहिर्मलकफासृग्विट् ॥
॥ जन्मभेदाच्चतुर्विधा. ॥ नामतो विंशतिविधा ॥

**अर्थ**—बाह्य आणि अभ्यंतर या भेदानें कृमि दोन प्रकारचे आहेत. बहिर्मल [ स्वेदादिक ] कफ, रक्त आणि आणि विष्ठा यामध्यें उत्पन्न होणारे असे चार प्रकारचे आणि त्याची नांवें वीस प्रकारची आहेत.

**कर्मविपाक**—जन्मसमयीं क्षीण, असा अष्टमस्थानापन्न चंद्र असेल तर विकल, कृमिरोग किंवा शत्रुग्रहीचा सूर्य असेल तर त्याचे दशेमध्यें नेत्ररोग, पांगळेपणा, कृमिरोग इत्यादि होतात. **परिहार**—इंद्रमंत्राचा जप व तद्दानें, सूर्यमंत्राचा जप व तद्दानें इत्यादी पूर्वोक्त करावी.

**पूर्वकर्मविपाक**—पूर्व जन्मींचे अश्वहत्या किंवा गजहत्या करितात त्यांत ज-

---

१—कृमिरोग हा बहुतकरून अजीर्णापासून उत्पन्न करितो.

न्मांतरीं कृमिरोग होतो. किंवा जी स्त्री भर्तामृत झाल्यानंतर काळें, निळें वस्त्र परिधान करिते तिला कृमिरोग होतो. **परिहार**—नीलवृषभाचें दान, ब्राह्मणभोजन इत्यादि करावें. याप्रकारें दैविक प्रतिकार जाणावा.

**कृमीचें कारण** [ मा. नि. ]—अजीर्णावर भोजन करणारा, निरंतर आंबट किंवा गोड पदार्थ खाणारा, द्रव पदार्थ ह्मणजे कढी, सांबारें आमटी वगैरे खाणारा, गूळ आणि पीठ यांनी केलेले पदार्थ [ अनारसे घारगे इत्यादी ] व्यायाम न करणारा, दिवसांस निद्रा करणारा आणि विरुद्ध क्षीरमत्स्यादि पदार्थ भक्षण करणारा. अशा पुरुषास कृमि ह्मणजे जंत होतात.

**कृमीचें लक्षण** [ मा. नि. ]—कृमि आंतील व बाहेरील असे दोन प्रकारचे आहेत, बहिर्मल [ स्वेदादिक ] कफ, रक्त आणि विष्ठा यांमध्यें उत्पन्न होणारे असे चार प्रकारचे आणि त्यांची नांवें वीस प्रकारची आहेत. त्यांपैकीं बाह्यमलोद्भव कृमि जे असतात त्यांस उवा व लिखा असे ह्मणतात.

**पोटांतील कृमींचीं लक्षणें** [ मा. नि. ]—ज्वर, शरीराचा वर्ण पालटणें, शूळ, हृदयांत पीडा, अंगग्लानि, भ्रम, अन्नद्वेष आणि अतिसार हीं लक्षणें झालीं ह्मणजे पोटांत जंत झाले असें समजावें. उडीद, पिष्टान्न, ( मोदक, लाडू वगैरे ) खार, गूळ, भाज्या, ह्या पदार्थांनी विष्ठेपासून कृमि होतात. मांस, उडीद, गूळ, दूध, दही, शुक्त [ कांजी किंवा लोणचें ] ह्या पदार्थांनी कफापासून कृमि होतात. विरुद्ध, अर्धकच्चें शिजलेलें अन्न आणि भाज्या आदिकरून पदार्थांनीं रक्तजन्य कृमि होतात.

**कफजकृमीचें लक्षण** [मा. नि.]—कफापासून आमाशयामध्यें झालेले कृमि वाढले असतां चोहोंकडे फिरतात. त्यात कोणी रुंद वादीसारखें, कोणी गांडुळासारखे, धान्यांकुरासारखे, कित्येक बारीक, लांब व आंखूड असे असतात. कांही पांढरे व तांबडे असतात; त्यांची नांवें सात आहेत तीं—अंत्राद, उदरावेष्ट, हृदयाद, महारुज, चुरु, दर्भकुसुम आणि सुगंध हीं नांवें कांहीं अन्वर्थ व कांही निरर्थक आहेत. व याप्रमाणेंच पुढील नांवें जाणावीं. या कृमीपासून मळमळ, तोंडाला पाणी सुटणें, अन्न न पचणें, अरुचि, घेरी, ओकारी, तहान, पोट फुगणें, शरीर कृश होणें, सूज आणि पडसें हे विकार होतात.

**रक्तजकृमीचें लक्षण** [ मा. नि. ]—रक्त वाहणाऱ्या शिरांमध्यें रक्तापासून होणारे कृमि बारीक, पादरहित वाटोळे व तांबडे असतात. कित्येक कृमि फार बारीक असतात ह्मणून दिसत देखील नाहीत. ते कृमि सहा प्रकारचे, त्यांचीं नांवें—केशाद, रोमविध्वंस, रोमद्वीप, उदुंबर, सौरस आणि मातर कुष्ठ उत्पन्न करणें हेंच त्यांचें मुख्य कर्म होय.

**पुरीषजकृमीचें लक्षण** [मा. नि.]—पक्काशयामध्यें पुरीष ह्मणजे मळापासून

झालेले कृमि गुदावाटें बाहेर सरतात. ते फार वाढून अमाशयाकडे येतात. तेव्हां त्या कृमिरोग्याच्या ढेंकराला आणि श्वासाला विष्ठेची घाण येते. ते कृमि जाड, पोसलेले, वाटोळे, बारीक, लठ्ठ, नीलवर्ण, पिवळे, काळे व पांढरे असतात. त्यांचीं नांवें पांच आहेत तीं—ककेरुक, मकेरुक, सौसुरा, मलून, लेलीह, हे भलत्या आडमार्गानें जाऊं लागले असता ह्यांपासून पातळ मळ, शूळ, पोट फुगणें, कृशत्व, अंग खरखरीत होणें, पांडुरवर्ण, रोमांच, अग्निमांद्य आणि गुदाला कंडू हे उपद्रव होतात.

**सर्व प्रकारचे कृमींवर उपाय**—डोक्यांत कृमि झाले असल्यास वावडिंगाच्या किंवा त्रिफळ्याच्या काढ्याच्या भावना घोड्याच्या लिदीस शंभर द्याव्या व तें चूर्ण नळीवाटें नाकात फुंकावें. व पोटात कृमि झाले असल्यास मधाबरोबर चाटावें. ( २ ) रक्तात कृमि झाले असल्यास कुष्ठावरची चिकित्सा करावी. डोक्यांत कृमि झाले असल्यास चाईवरची चिकित्सा करावी. ( ३ ) सुंठ, वावडिग, व बिबवा यांचें चूर्ण मधांत द्यावें. ( ४ ) खाजकुहिलीचें कुसूं पाडून बारीक करून तें दह्यांत अथवा गुळांत द्यावें. ( पळसबी, काचकुहिली, पारा व बिबवा यांचें औषध बारा वर्षांचे आंतील मुलास देऊं नये. ) ( ५ ) पुदीन्याचा रस व सबज्याचा रस एकत्र करून द्यावा. ( ६ ) पळसपापडीचें चूर्ण मधाबरोबर द्यावें. ( ७ ) खैर, कुडा, कडुनिंब, वेखंड, त्रिकटू, त्रिफळा व तेंड, यांचें चूर्ण किवा काढा गोमूत्रांत घालून सात दिवस प्यावा; ह्मणजे कोट्यावधि कृमीचा नाश होईल ( ८ ) सज्जीखार, जायपत्री, हिंग, वावडिंग, केशर, पिपळी, चित्रक, सुंठ, ओंवा, पिपळमूळ, व नागरमोथे, यांचें चूर्ण ताकाबरोबर द्यावें. ह्मणजे कोट्यावधी कृमींचा नाश होतो. ( ९ ) हिंग आणि ओवा यांचें चूर्ण गोमूत्राबरोबर द्यावें. (१०) कृमिरोग्याला पूर्वीं निर्गुडी इत्यादिकांत सिद्ध केलेल्या घृतादिकांनी स्निग्ध करून नंतर तीक्ष्णरेचन द्यावें. ( ११ ) नागरमोथे, उंदीरकानी, इंद्रजव, देवदार व शेवग्याची साल या औषधाचा काढा करून त्यांत पिंपळी व वावडिगाचें चूर्ण घालून द्यावा; ह्मणजे दोन्हीही द्वारांनीं फार दिवस पडणारे जरी कृमि असले तरी त्यांचा आणि त्या पासून झालेल्या रोगांचा नाश होतो. ( १२ ) खेरसाल, कुड्याची साल, कडूनिंबाची पानें, वेखंड, त्रिकटू, त्रिफळा, व तेंड यांचें चूर्ण किवा काढा गोमूत्रात घालून सात दिवस द्यावा; ह्मणजे कोट्यावधि कृमि असले तरी लवकर नाश पावतील ( १३ ) हिंगूळ १ तोळा, व जेपाळबीज सहा मासे यांचे चूर्णास रुईच्या चिकाच्या दहा भावना द्याव्या. त्यांतून एक मासा औषध रुईच्या मुळाचा काढा किंवा अंगरस व हिंग यात द्यावें. ( १४ ) पळसपापडीचा कल्क ताकांत द्यावा. ( १५ ) कडू निंबाचे पाल्याचा रस पाणी घालून एक तोळा काढावा व त्यांत गुंजाप्रमाणें हिंगाचें चूर्ण घालून द्यावा. ( १६ ) कंपिलाचूर्ण अर्ध तोळा गुळात भक्षिलें असतां पोटांतील सर्व कृमि पडतील यात संशय नाहीं. हीं औषधें जंतु व अभ्यंतरी असणारे कृमि याची सांगितली आहेत. आणि रक्तज कृमिवर कुष्ठावरचीं औषधें योजावीं.

**कृमिरोगावर पथ्य**—रेच, साटक्या साळीचा भात, मुगाचे दाळीचें वरण,

गव्हाची पोळी, पडवळ, चाकवत, कारलें, केळफुल, दोडकी, परवरें व मेथी यांच्या भाज्या व लसूण, केळें, तिखट पदार्थ, तिळाचें व मोहऱ्याचें तेल, दह्याची निवळ, तांबूल उन पाणी, मद्य, हिंग, क्षार, निंबू, कुळिथाचें कढण, अफू, अमसूल, तांबडा कांदा, काजू, गाजर, जायफळ, ताक, तांबूल, धणे, मटक्या, नागवेल, खिरण्या, पुदीना, पिठीसाखर, गोडा सुरण, मद्य व गोमूत्र हे पदार्थ पथ्यास द्यावे.

**कृमीवर अपथ्य**—वांतीचा वेग धारण, विरुद्धान्न, दिवसांस निद्रा, पिठाचे पदार्थ ( लाडू वगैरे ) तूप, उडीद, दही, खजूर, गूळ, फणस, पालेभाज्या, मांस, दूध, आंबट व गोड पदार्थ, थंड पाणी, बोरें, उंबर, ऊस, नवा गूळ, गिलकी मीठ इत्यादि पदार्थ वर्ज करावे.

---

## गलगंड.

॥ निबद्धः श्वयथुर्यस्यमुष्कवल्लंबतेगले ॥ महान्वायदिवान्हस्वोगलगंडं तमादिशेत् ॥

**अर्थ**—ज्याच्या गळ्याला अनुबंधयुक्त मोठी किंवा लहान अंगाप्रमाणें सूज येते तिला गलगंड असें ह्मणावें.

**कर्मविपाक**—शुक्रदशेमध्यें अंतर्गत रवि अथवा सूर्यदशेमध्यें अंतर्गत शुक्र किंवा बुधाच्या दशेमध्यें अंतर्गत मंगळ असेल तर गलगंड, अपची, शिरोरोग, कुष्ठरोग, ज्वर, शूळ, अतिसार, नेत्ररोग, उदररोग, राजापासून बंधन इत्यादि प्राप्त होतात. **परिहार**—जो ग्रह अनिष्ट असेल त्याचीं दानें, जप, हवन, इत्यादिक करावें.

**पूर्वकर्मविपाक**—गुरुद्वेषी, दुसऱ्याचें मन विनाकारण दुखविणारा, प्रतारणापूर्वक विद्या शिकविणारा, किंवा शिकणारा, हे गलगंडादि रोगानें युक्त होतात. **परिहार**—चांद्रायण प्रायश्चित्त, पुरुषसूक्त जप इत्यादि करावी.

**गलगंडाचें कारण** ( मा. नि. )—गळ्यामध्यें दुष्ट झालेला वात, कफ आणि तसेंच मेद, हीं गळ्याच्या मागल्या शिरांमध्यें राहून क्रमाक्रमानें आपापल्या लक्षणांनीं युक्त असा गंड ह्मणजे गोळा उत्पन्न करितात. त्याला गलगंड किंवा गालगुंड असें ह्मणतात.

**वातज गलगंडाचें लक्षण** ( मा. नि. )—वातजन्य गलगंडांत सुयांनीं टोंचल्यासारखी पीडा होते, तोच काळ्या शिरानी व्याप्त, निळा, तांबूस व खरखरीत लागतो, जो चिरकालानें वाढणारा न पिकणारा, पिकला तर कदाचित् यदृच्छेनें पिकतो, त्या रोग्याच्या तोंडाला रुचि नसते; आणि टाळू व गळा कोरडे पडतात.

**कफजगलगंडाचें लक्षण** ( मा. नि. )—स्थिर, त्वचेच्या रंगाचा, जड, अ-

त्यंत कंडूयुक्त, थंड, मोठा, फार दिवसानें वाढणारा, फार उशीरानें कदाचित् पिकणारा, पिकल्यास ठणका, तोंड गोड व गळा कफानें सारविल्याप्रमाणें होतो.

**मेदोजगलगंडाचें लक्षण** (मा. नि.)—मेदापासून झालेला गलगंड तुळतुळीत, पांडुरवर्ण, जड, दुर्गंधयुक्त, कंडूयुक्त, मंदपिडा करणारा, मूळ लहान असून दुध्या भोपळ्यासारखा लावणारा, देहानुरूप क्षय आणि वृद्धि यांनीं युक्त असतो. ह्मणजे देह क्षीण झाला असतां तो क्षीण होतो; देह मोठा झाला असतां तोही मोठा होतो. त्या मनुष्याचें तोंड तेल सारविल्याप्रमाणें तुळतुळीत दिसतें आणि बोलतांना गळ्यांतून अनुशब्द निघतो.

**सर्व प्रकारचे गलगंडांवर उपाय**—[ १ ] तांदुळाच्या धुवणांत कांचनवृक्षाची साल वांटून सुंठीचें चूर्ण घालून प्यावें. [ २ ] जटामांसी, वेखंड, चित्रक, त्रिफळा, गुळवेल, पिंपळी व देवदार, या औषधाचे कल्कानें माक्याच्या रसांत तेल सिद्ध करून त्याचा लेप करीत जावा, किंवा नस्य द्यावें. [ ३ ] शिरस, शेवग्याचें बीं, तागाचें बीं, सातू, जव व मुळ्याचें बीं, आंबट ताकांत वांटून लेप करावा; ह्मणजे गलगंड, ग्रंथि व गंडमाळा हे रोग नाश पावतात. [ ४ ] निळा माका व लसून याची लुगदी गलगंडावर बांधावी; ह्मणजे फोड येऊन श्राव होतो. त्यानें गलगंडाचा उपशम होतो, यात संशय नाहीं. [ ५ ] कांटेशेवंतीची राख गोमूत्रात शिजवावी; नंतर गाळून तें गोमूत्र प्यावें आणि हारकाचा भात व ताक हीं पथ्यें करावीं. [ ६ ] पिकलेल्या कडू दुध्या भोपळ्यांत सात दिवस पाणी भरून ठेवावें व तें प्राशन करावें.

**असाध्य लक्षण** [ मा. नि. ]—कष्टानें श्वास टाकणारा, मृदुगात्र झालेला, गलगंड होऊन वर्ष लोटलेला, अरुचि, स्वरभेद, यांनी पीडित, व क्षीण, अशा रोग्याला सोडावें.

**अपचीलक्षण** [ मा नि. ]—ज्या गाठी कांही पिकतात, कांहीं स्रवतात, तित्येक नाहीशा होतात, दुसऱ्या उगवतात, अशी पीडा फार दिवस राहते. तिलाच अपचि ह्मणतात. ही साध्य होय, परंतु हीच पीनसादि उपद्रवांनी युक्त झाली असतां साध्य होत नाही.

**अपचीवर उपाय**—[ १ ] लाजाळूचा स्वरस द्यावा; म्हणजे अपची, गंडमाळा व कामला याचा नाश होतो. [ २ ] शेवगा व देवदार यांचा कांजीत वाटून मंदोष्ण असा लेप द्यावा; म्हणजे अति कठिण अपचि नाश पावते. [ ३ ] शिरस, कडू निंबाची पानें, दांतीमूळ व बिबवा ही बकरीचे मुतात वाटून लेप करावा. [ ४ ] त्रिकटू, वावडींग, जेष्टीमध सैंधव, व देवदार, ही औषधें घालून सिद्ध केलेलें तेल प्राशन केलें असतां अपचीचा समूळ नाश होतो.

**गलगंडावर पथ्य**—जुन्या साटक्या साळीचा भात, मुगाचें वरण, यव,

पडवळ, करटोली, यांच्या भाज्या, गव्हाची पोळी, रुक्ष व तिखट पदार्थ, हीं गलगंड, गंडमाळा, अपचि व ग्रंथि यांजवर दोषानुरूप पथ्यें जाणावीं.

**गलगंडावर अपथ्य**—दूध, ऊंस, मासे, पिष्टान्न, आंबट, मधुर व जड, आणि कफकारक पदार्थ, हें गलगंडा, गंडमाला, अपचि व ग्रंथि, यांजवर अपथ्यें जाणावीं.

---

## गुल्म ( गोळा ).

॥ दुष्टावाताद्योत्यर्थ मिथ्याहारविहारतः॥ कुर्वंतिपंचधागुल्मं कोष्ठांतेग्रंथिरूपिणम्॥

**अर्थ**—मिथ्या आहारविहारेंकरून अति दुष्ट झालेले वातादिक दोष, पोटांत पांच प्रकारचा ग्रंथिरूप गुल्म उत्पन्न करितात.

**कर्मविपाक**—जन्मसमयीं मध्यगत चंद्र अथवा सप्तमस्थानीं शनी असेल तर श्वास, क्षय, विद्रधि, गुल्मपीडा, शत्रुपीडा इत्यादि रोग होतात. **परिहार**—चंद्र व शनि यांची दानें, जप, होम इत्यादि करावी.

**पूर्वकर्मविपाक**—पूर्वजन्मीं गुरूचे ठिकाणीं द्वेषबुद्धि, चांडालीशीं गमन, यांपासून गुल्मरोग होतो. **परिहार**—मासपर्यंत पयोव्रत " मुंचामि " या मंत्रानें चरुघृताचें दहासहस्र हवन, अन्नदान, सुवर्णाची गणपतीची प्रतिमा करून तिचें पूजनपूर्वकदान इत्यादि करावें.

**सामान्यरूप**—गुल्माचीं स्थानें पांच आहेत. ती येणेंप्रमाणें, दोहों बाजूंच्या बरगड्याचेठायीं २, हृदय १, नाभी १, आणि बस्ति एक अशी जाणावी. हृदय, नाभी आणि बस्ति यांच्यामध्ये फिरणारा किंवा अचल वाटोळा, लहान,मोठा होणारा असा ग्रंथि ह्मणजे गांठ होते त्याला गुल्म असें ह्मणतात.

**संप्राप्ति** ( मा. नि. )—कुपित झालेल्या पृथक् दोषांनीं तीन आणि सर्व मिळून एक, एकूण चार प्रकारचे गुल्म पुरुषास होतात. आणि स्त्रियांना रक्ता- ( रजा ) पासून एक गुल्म होतो. तेथें व्यस्त शब्दानें द्वंद्वजही गुल्म होतात ह्मणून समजावें. पांचच प्रकारचे गुल्म आहेत ह्मणून निश्चय केला आहे असें नाहीं. रक्तगुल्म हा स्त्रियानाच होतो, पुरुपास होत नाहीं. धातुरूप रक्तज गुल्म आहे तो स्त्रियाना व पुरुषांना होतो असें क्षीरपाणीनें सांगितलें आहे.

**पूर्वरूप** ( मा. नि. )—ढेंकर पुष्कळ येणें, मळावरोध, अन्नावर वासना नसणें, सामर्थ्य नसणें, आंतड्यांत कुरकूर करणें, पोट दुखून फुगणें, पोट ताठणें, मंदाग्नि, हीं लक्षणें दृष्टीस पडली असतां गुल्मरोग लवकरच होणार असें समजावें.

अरुचि, मळ व मूत्र कष्टानें होणें, वायु आंतड्यांत कुरकुरणें, पोट फुगणें, ऊर्ध्ववायु होणें, हीं लक्षणें सर्व गुल्मांत असतात.

**वातगुल्माचें कारण** ( मा. नि. )—रुक्ष, विषम, आणि अतिमात्र असें अन्नपान सेवन करणें, बळकट पुरुषाशीं झोंबी खेळणें, मलमूत्राचा वेगधारण, शोक आणि अभिघात, विरेकादिकांनीं मळाचा अगदीं क्षय करणें, उपवास हे सर्व वातगुल्माला कारण आहेत.

**वातगुल्मलक्षण** ( मा. नि. )—हा गुल्म कधीं नाभींत, कधीं बस्तींत, कधीं पार्श्वांमध्यें जातो व कधीं लहान, कधी मोठा, वाटोळा अथवा लांबट होतो. व त्याची पीडा कधीं थोडी व कधी मोठी होते, तो दभेदरूप अथवा अनेक तऱ्हेची होते. मळाची व वायूची प्रवृत्ति होत नाहीं. गळा आणि तोंड यास कोरड पडते. शरीराचा वर्ण निळा किंवा तांबूस होतो, हिंव येतें, हृदय, कुशी, पार्श्व, खांदे आणि डोळे हीं दुखतात. व जो गुल्म अन्न जिरलें असता अधिक उसळतें आणि जेवल्यानंतर मागून जरा नरम पडतो, तो गुल्म वायूपासून जाणावा. त्यावर रुक्ष, तुरट, कडू आणि तिखट पदार्थ दिले असता सुख होत नाहीं. **उपाय**—( १ ) केतकीच्या मुळाचा क्षार, सज्जीखार, व कोष्ठ यांचें चूर्ण एकत्र करून तेलांतून प्यावें. ( २ ) शेरणी, मिरी, पाढरी वसू, पंचकोळ, ओंवा, जिरें, सैंधव, दही, दूध व आंबट, डाळिंबाचा, व मुळ्याच्या आणि बोराचा रस यानें सिद्ध केलेलें तूप, वातगुल्म, उदर, आनाह, पार्श्वशूल, हृद्रोग, पोटशूळ, योनिरोग, मूळव्याध, ग्रहणी, खोकला, दमा, अरुचि व ज्वर याचा नाश करितें. ( ३ ) सैंधव, हिरडे, पिंपळी व ओंवा यांचें चूर्ण खाऊन वर कोंबट पाणी प्यालें असतां कफ व वायु उत्पन्न झालेला रोगसमूह रामबाणांनीं भेद केल्याप्रमाणें नष्ट होतो. ( ४ ) शुद्ध करून वाळविलेली लसून १६ तोळे घेऊन चौपट दूध व दुधाचे चौपट पाण्यात दूध उरेतोंपर्यंत शिजवावी. तें दूध प्राशन केलें असता उदावर्त, गृध्रसी, विषमज्वर, हृद्रोग, विद्रधि व क्षयरोग, हे विकार लवकर दूर होतात. ( ५ ) बाहाव्याचे वृक्षाचें तेल अर्ध तोळा प्राशन केलें असता सर्व प्रकारचे गुल्मांचा नाश होतो. ( ६ ) त्रिकटू, त्रिफळा, धणें, वावडींग, चवक व चित्रक याच्या कल्काशीं घृत व दूध घालून सिद्ध करावें, आणि तें प्राशनार्थ द्यावें. वातगुल्मावर तूपभात प्रशस्त आहे.

**पित्तगुल्माचें कारण** ( मा. नि. )—तिखट, आंबट, तीक्ष्ण, ( मोहऱ्या वगैरे ) दाह करणारे, व रुक्ष पदार्थ, क्रोध, अति मद्यपान, उन्हात फिरणें, अग्नीजवळ बसणें, विदग्धाजीर्णापासून झालेल्या दुष्ट रसानें अभिघात ह्मणजे पीडा, रक्त नासणें, हें पित्तगुल्माचें कारण सांगितलें आहे.

**पित्तगुल्माचें लक्षण** ( मा. नि. )—ज्वर, तृषा, तोंड आणि अंग यांना लाली, अन्न जिरत असता शूळ फार होतो. घाम येतो, जळजळ होते, आणि

गुल्माला हात लाविला असतां व्रणाप्रमाणें सहन होत नाही; हीं लक्षणें होतात. **उपाय**--( १ ) आठ तोळे त्रायमाण, २५६ तोळे पाणी, यांचा अष्टमांश काढा करून तितकेंच दूध घालून वेताचा उन असतां प्यावा व त्यावर शक्तीप्रमाणें तापलेलें दूधच प्यावें. त्याच्या योगानें रेच होऊन पित्तगुल्म बरा होतो. ( २ ) त्रिफळ्याचे काढ्यांत तेडाचें चूर्ण घालून द्यावें. ( ३ ) आंवळ्याचा रस, उंसाचा रस, हीं वाळहिरड्याच्या काढ्यांत चतुर्थांश तूप घालून पचन करावे ह्मणजे घृत सिद्ध झालें. हें प्याल्यानें पित्तगुल्माचा नाश होतो. पथ्य---भात, गाय व शेळी यांचें दूध, पडवळ, तूप, द्राक्षें, फालसा, आंवळे, खजूर, दाळिंब व साखर इ०.

**कफगुल्माचें कारण** ( मा. नि. )—शीत, जड, स्निग्ध, अशा पदार्थांचें सेवन, तृप्तीपेक्षा अधिक भोजन, दिवसास निजणें, ही कफोत्पन्न गुल्म होण्याला कारणें होतात.

**कफगुल्मलक्षण** ( मा. नि. )—अंगाला ओलसरपणा, शीतज्वर, शरीराची ग्लानि, मळमळ, खोकला, अरुचि, जडत्व, शैत्य, थोडी पीडा, गुल्म कठिण असून उचललेला असतो. **उपाय**---( १ ) कफगुल्मावर प्रथम वमन द्यावें. वांति देण्यास तो अयोग्य असेल तर उपास करावे. नंतर कडू, उष्ण व तिखट पदार्थ, पेयादिक्रमात योजून त्यानें आणि हिंग्वादि चूर्णांत क्षार, हिंग व आम्लवेतस दुप्पट घालून त्यानें त्याचा अग्नि प्रदीप्त करावा. ( २ ) त्रिकटू, जवखार, सैंधव, हिंग, बिडलोण, डाळिंब व दशमुळें यांनीं सिद्ध केलेलें तूप कफगुल्माचा नाश करितें. ( ३ ) तीळ, एरंड्या, आळशीचें बी व पाढऱ्या मोहऱ्या, याचा कफगुल्मावर लेप करून त्यावर लोखंडाच्या भांड्यानें शेक द्यावा. ( ४ ) पिंपळी, पिपळमूळ, चवक, चित्रक व सुंठ, हीं चार चार तोळे घेऊन त्यांचा अष्टमांश काढा करून त्यात एक शेर तूप, यवखार, व दूध शेरभर घालून पचवून घृत सिद्ध करावें. हें तूप कफगुल्म, संग्रहणी, पांडुरोग, प्लीहा, खोकला व ज्वर यांचा नाश करितें. (५) दशमुळें ४ तोळे व गाईचें दूध ३८४ तोळे, पिपळी, मनुका, हरीतकी, व आंवळकठी ही चार चार तोळे, व एरंडेल तेल ६४ तोळे ही सर्व एकत्र करून तेल शेष राहीतोंपर्यंत पचन करावें व तें योजावें. पथ्य---कुळीथ, जुन्या साटक्या साळी, यव, अरण्यांतील पशूंचें मांसरस, मद्य, तेल, घृत व ताक इत्यादि योजावीत.

**द्वंद्वजगुल्मलक्षण** ( मा. नि. )—दोहों दोषांच्या गुल्मामध्यें कारणें, लक्षणें, आणि दोषाचे बलाबल पाहून चिकित्सा करण्यासाठीं मिश्र लक्षणाचे दुसरें तीन गुल्म जाणावे. त्या सर्वांवर उपाय---( १ ) चवक, चित्रक, त्रिकटू आणि कडूवृंदावन व सैंधव हे बारीक वांटून करंज व वड यांच्या पानात गुंडाळून पुटपाकविधीनें पचन करावा. तो पाण्याशीं वांटून दोन तोळे मध घालून द्यावा; ह्मणजे गुल्म, उदर, पांडुरोग व द्वंद्वजगुल्म यांचा नाश होतो.

**रक्तगुल्म** ( मा. नि. )---नवीन प्रसूत झालेल्या स्त्रीनें अपथ्य भोजन

केलें असतां अथवा अपक्क गर्भपात झाला असतां अथवा ऋतुकालीं अ-पथ्य भोजन केलें असतां वायु कुपित होऊन त्या स्त्रीचें रक्त ( विटाळ ) घेऊन त्याचा गुल्म करितो. तो पीडायुक्त, दाहयुक्त आणि पित्तगुल्माचीं जीं लक्षणें सांगितलीं आहेत तशीं लक्षणें याला होतात. आणि ह्यामध्यें दुसरा वि-शेष प्रकार आहे तो असा—हा गुल्म फार वेळानें गोळाचा गोळाच हालतो, अव-यवांनीं हालत नाहीं. शूळयुक्त होतो, गर्भाच्या लक्षणासारखीं याचीं लक्षणें असतात, ह्मणजे विटाळ न येणें, तोंडाला पाणी सुटणें, स्तनाच्या बोंड्या काळ्या पडणें आणि डोहोळे लागणें इत्यादी. ही गोष्ट व्याधिस्वभवानें होते. हा रक्तजगुल्म स्त्रियांसच होतो. दहावा महिना गेल्यावर ह्या गुल्माला चिकित्सा करावी. कोणी ह्मणतील कीं गर्भ आहे किंवा रक्तगुल्म आहे ही शंका जाण्यासाठीं दहावा महिना गेल्यावर असें सांगितलें, कारण नववा आणि दहावा महिना प्रसूतीचा काळ आहे, तर असें नाहीं. " यः स्पंदतेपिंडितएवनांगैः " इत्यादि विशेष दृष्टी पडल्याने संशय गेलाच आहे. आणि गर्भ तर निरंतर प्रत्येक अवयवानें शूळ केल्यावांचून हालत अ-सतो. गुल्म तर याच्या विपरीत आहे. मग दहावा महिना गेल्यावर चिकित्सा करा-वी ही कां सांगितली?याचें कारण असें आहे कीं, त्याला तितके दिवस गेलेच पाहि-जेत. तेव्हा त्यावर चिकित्सा केली असतां तो सुखसाध्य होतो जसें ज्वर जीर्ण झाला तरच त्यावर क्षीरपान, विरेचन हीं हितावह होतात. व तंत्रांतरीही सांगितलें आहे, तें असें. "रक्तगुल्मे पुराणत्वं सुखसाध्यस्य लक्षणम्"ह्याला पुराणत्व तर दहा म-हिने गेल्यावरच प्राप्त होतें. आणि जें ज्जटानेंही सांगितलें आहे कीं, जर या पूर्वी भेदनादि क्रिया केली तर गर्भाशयाला विकार होतो. कारण रक्त त्या ठिकाणीं जमू-न असतें. आकराव्या महिन्यामध्यें गुल्माचा चांगला गोळा जमला ह्मणजे स्नेहा-दिकेंकरून सर्व शरीर मृदु केलें ह्मणजे भेदन केलें तरी गर्भाशय सुरक्षित राहतो.

**रक्तगुल्मावर उपाय**—( १ ) भारंगमूळ, पिंपळी, करंजाची साल, पिंपळमू-ळ व देवदार यांचें चूर्ण तिळाचे काढ्यात द्यावें. ( २ ) तिळाचे मूळ, शेवग्याचें मूळ ब्रह्मदंडीचें मूळ, त्रिकटू व जेष्ठीमध यांचें चूर्ण सेवन केलें असतां स्त्रियांचें नष्ट पुष्प वातगुल्म याला सद्य सुखावह होईल. ( ३ ) मुंडी व वंशलोचन यांचें चूर्ण शर्करा व मध यांशीं रक्तगुल्मावर रेचनार्थ द्यावें. ( ४ ) पारा, गंधक, मोरचूत, जेपाळ,पि-पळी, वाळहिरडे व वाहव्याच्या शेंगेंतला मगज, हीं सर्व समभाग घेऊन कांडे निव-डुंगाच्या चिकात खल करावा व एक माशाची गोळी करून द्यावी. ती सर्व प्रकारचे स्त्रियांचे गुल्म व उदर याचा नाश करिते. ( ५ ) कळलावी, आघाडा किंवा कडू वृंदावन याचें मूळ योनीमध्यें धारण केलें असतां योनिशूळ व पुष्पावरोध यांचा नाश करितें. ( ६ ) कडू निंबाची फळें व एरंड्याच्या आतील गोळे, हीं कडूनिंबाच्या पाल्याच्या रसांत वाटून गोळी करावी व योनींत धारण करावी. किंवा त्याचा यो-नीला लेप द्यावा ह्मणजे योनिशूळाचा नाश होतो. ( ७ ) शतावरी, करंजाची साल, देवदार, भारंगमूळ व पिंपळी यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून तिळाच्या काढ्यांतून प्यावें

ह्मणजे रक्तगुल्माचा नाश होतो. ( ८ ) मधावरोवर नाराच रस द्यावा. ( ९ ) उदयमार्तंड रस द्यावा. ( १० ) रिठ्याचे पाण्यांत कडूवृंदावनाचें मूळ उगाळून द्यावें. ( ११ ) बेंबीजवळ पुष्कळ जळवा लावाव्या ह्मणजे रक्तगुल्म गळून पडतें. ( १२ ) पळसाच्या क्षाराच्या योगानें घृत सिद्ध करून द्यावें. ( १३ ) दातीमूळ, हिंग, जवखार, कडू दुध्याभोपळ्याचें बी, पिंपळी व गूळ, हीं निवडुंगाचे चिकांत खलून बलाबल पाहून गोळी भक्षण केली असतां रक्तगुल्माचा नाश आणि रक्ताचा स्राव करणारी अशी आहे. ( १४ ) तिळाचे काढ्यांत सुंठ, मिरी, पिंपळी, भाजलेला हिंग व भारंगमूळ यांचें चूर्ण घालून द्यावा. ( १५ ) त्रिफळ्याच्या काढ्यांत मासाभर गुग्गुळ घालून देत जावा. ( १६ ) करंजाची साल, दारुहाळद, शतावरी, भारंगमूळ व पिंपळी यांचें चूर्ण मराठे तिळाचें काढ्यात द्यावें. ( १७ ) मराठे तिळाचे काढ्यांत भारंगमूळ व त्रिकटू यांचें चूर्ण तूप व गूळ घालून द्यावें ह्मणजे रक्तगुल्म आणि स्त्रियांचें शुक्र नष्ट होतें यांवर प्रशस्त आहे. ( १८ ) मासाला निवडुंगाचा चीक लावून तें योनींत ठेवावें ह्मणजे योनीची शुद्धि होऊन गुल्म फुटेल.

**सन्निपातगुल्मलक्षण** ( मा. नि. )—महाशूल व दाह यांनीं युक्त असून पाषाणासारखा कठिण, व उंच, शीघ्र दाहानें भयकर; अंतःकरण, शरीर, जठराग्नि व बळ याचे हरण करितो. हा असाध्य जाणावा. **उपाय**—[ १ ] वायवर्णी, कमळ, अथवा गहुला अथवा लहान बेलफळ, आघाडा, चित्रक, आयरण दोन प्रकारची [ लहान व थोर ], गोड शेवगा, कडू शेवगा, रिंगणी, मोतरिंगणी, श्वेतकोळिस्ता, पीतकोळिस्ता, काळा कोळिस्ता, मोरवेल, काकडशिंगी, किराईत, मेढशिंगी, कडू तोंडलीचें मूळ, करज, शतावरी, या २१ औषधांचा काढा करून प्यालें असतां कफ, मेदोरोग मस्तकशूळ गुल्म, अंतरविद्रधि[१] हे रोग दूर होतात. [ २ ] शंखद्राव, सुंठीचे चूर्णाबरोबर एक किंवा तीन वाल अथवा हरीतकीबरोबर द्यावा. [ ३ ] वाहावा, निवडुंग, रुई, करंज, अंकोल, जांभूळ, कडू पडवळ, हाळद चिंच, पिंपळी, पुनर्नवा आणि आघाडा, यांचीं समभाग मुळें घेऊन पुटपाकानें पचन करावीं. त्यातून एक तोळा रस घेऊन आठ तोळे गोमूत्राबरोबर द्यावा.

**साध्यासाध्यविचार** [ मा. नि. ]—क्रमाक्रमानें वाढलेला गुल्म जेव्हां सर्व उदर व्यापून टाकतो आणि धातूमध्यें त्याचें मूळ जाऊन पोंचतें, त्यावर शरीराचें जाळें होतें, आणि कांसवाचे पाठीसारखा गुल्म उचललेला दिसतो, तेव्हा तो निःशक्तपणा, अन्नद्वेष, मळमळ, खोकला, ओकारी, असंतोष आणि ज्वर व तहान, तंद्रा आणि पडसें, ह्या लक्षणांनीं युक्त होतो; मग तो साध्य होत नाही. वांति, ढाळ यांनी बेजार झालेल्या अशा गुल्मरोग्यास हृदय, नाभी, हातपाय याच्या ठिकाणी सूज येते आणि ताप व दमा लागतो. असे झालें असतां रोगी वांचत नाही. दमा, शूळ, अन्नद्वेष, तहान आणि गुल्माची गांठ एकाएकी नाहीशी होणें आणि

---

१—अंतरविद्रधि आणि गुल्म यामध्ये भेद कोणता आहे, याचे स्थान व आकृति सारखी आहे.

शक्तिपात होणें, हीं लक्षणें झालीं, म्हणजे समजावें कीं गुल्मरोग्याचें मरण जवळ आलें आहे.

**सर्व गुल्मांवर उपाय**—( १ ) पळस, निवडुंग, आघाडा, चिंच, रुई व तिळाचे दांडे, यांचे राखेपासून काढलेला क्षार व यवक्षार आणि सज्जीखार हे आठ क्षार गुल्म व शूळ यांचा नाश करून अजीर्णाला पचविणारे असे आहेत. ( २ ) सैंधव, जवखार व नवसागर हीं प्रत्येक आठ आठ तोळे, सोरा १६ तोळे, फटकी ४ तोळे, हिराकस २ तोळे, हीं सर्व एकत्र करून डमरू यंत्रांत घालून मातकापड करावें. नंतर चुलीवर ठेवून खालीं खैराचे लांकडाचा अग्नि द्यावा. आणि त्यापासून द्रव ह्मणजे अर्क काढून घ्यावा. तो स्वच्छ पाण्यासारखा असावा. तो संपूर्ण धातूंचें द्रावण करितो. म्हणजे त्यांचें पाणी करितो. कवड्या व शंखाचे तुकडे विरवितो, याला शंखद्राव म्हणतात. हा सर्व प्रकारचे उदररोग व सर्व प्रकारचे गुल्मरोग यांचा नाश करितो. [ ३ ] काडे निवडुंगाचा चिक ८ तोळे, तूप ३२ तोळे, कपिला ४ तोळे, सैंधव २ तोळे, निशोत्तर ४ तोळे व आंवळकठी १६ तोळे याप्रमाणें घेऊन त्यांत ६४ तोळे पाणी घालून मदाग्नीवर घृत सिद्ध करावें. तें एक तोळ्यापर्यंत प्राशनार्थ द्यावें; म्हणजे सर्व प्रकारचीं उदरें, पांथऱ्या, पोटांत कांसवासारखा रोग होतो तो व सर्व प्रकारची गुल्में सांचा नाश होतो. हें वज्ररूपी औषध ब्रह्मदेवानें गुल्मावर निर्माण केलें आहे. [४] अग्निमुख चूर्ण द्यावें. [५] पिंपळी, पिपळमूळ, चित्रक, खारींजिरें व सैंधव याचें चूर्ण मद्याशी द्यावें ह्मणजे गुल्माचा तात्काळ नाश होतो. [६] अर्धतोळा कोरफडीचा गीर काढून त्यात गाईचें तूप अर्धा तोळा व त्रिकटू, हरीतकी व सैंधव यांचें चूर्ण अदमासानें घालून एकत्र करून द्यावें. [ ७ ] नाराचचूर्ण द्यावें [ ८ ] हिंग्वादि चूर्ण द्यावें. [ ९ ] पारा, गंधक, हरताळ, ताम्रभस्म, सुवर्णमाक्षिक भस्म व मोरचूत, ही सर्व समभाग घेऊन पिंपळीचा काढा, काडे निवडुंगाचा चीक व शेळीचें मूत्र यांत पृथक् पृथक् एकेक दिवस खल करावा. हा विद्याधर रस बलाबल पाहून सोसेल अशा बेतानें एक किंवा दोन मासेपर्यंत मधांत कफगुल्मावर द्यावा. रक्तगुल्मावर देणे झाल्यास पूर्वी त्या गुल्माचें रक्त काढावें. नंतर हें औषध द्यावें. सन्निपातगुल्मावरही द्यावें. [ १० ] उदररोगांत वज्रक्षार सांगितला आहे तो द्यावा. [११] कुमारीआसव द्यावें. [ १२ ] चिंचाशंखवटी द्यावी.

**गुल्मावर पथ्य**—रेच, स्नेहपाक, घाम काढणें, बस्ति, लंघन, अभ्यंग, जुन्या साटके साळीचा भात, गव्हाची पोळी, जोंधळ्याची भाकरी, मुग व ताबड्या तुरीचे

---

मागील पृष्ठावरून पुढे चालु

मग भेद कोणता ? विद्रधि पिकतो आणि गुल्म पिकत नाहीं कारण गुल्म निराश्रय आहे शुश्रुतानें सांगितलें आहे कीं गुल्म हा मुठीएवढा आणि विद्रधि यापेक्षा मोठा असतो. गुल्माचा कांहीं निर्बंध नाहीं आणि विद्रधीला निर्बंध आहे. गुल्माचें ठिकाण आपल्या दोषामध्ये असतें, आणि विद्रधीचे मास रक्तात असतें. म्हणून विद्रधीचा पाक होतो, व गुल्माचा होत नाहीं.

दाळीचें पातळ वरण, उन पाणी, कुळीथ, साखर, ससा व हरीण यांचें मांस, मद्य, गाय, व शेळी यांचें दूध, मधुर ताक, लसूण, कोंवळा मुळा, चाकवत, शेवगा, अगस्त्याच्या शेंगा, करटोलीं, घोळ, चूका व गोडा सुरण यांच्या भाज्या, हिंग, निंबू, काजू, मनुका, खजूर, डाळिंब, महाळुंग व पौष्टिक लघु अशीं अन्नें, अळुखार, अमसूल, एरंडतेल, पिस्ते, पोकळा, शेळीचें लोणी. दोडकी, आंवळकठी, हिंग, गोमूत्र, हे पदार्थ गुल्मावर पथ्यकार होत.

**गुल्मावर अपथ्य**—संपूर्ण वातकारक पदार्थ, विरुद्धान्न, मांसें, वाळलेल्या भाज्या, सर्व प्रकारच्या डाळी, मलस्तंभक व जड पदार्थ, मलमूत्रादिकांचा वेग धारण, वांति, फार पाणी पिणें, थंड पाणी इ० सेवन करूं नये.

---

## गंडमाळा.

॥ कर्कंधुकोलामलकप्रमाणैः कक्षांसमन्यागलवंक्षणेषु ॥
॥ मेदः कफाभ्यांचिरमंदपाकैः स्याद्गंडमालाबहुभिस्तुगंडैः ॥

**अर्थ**—मेद आणि कफ यांपासून कांख, खांदे, मान, गळा आणि आडसंधी इतक्या ठिकाणीं लहान बोराएवढ्या, मोठ्या बोराएवढ्या, आंवळयाएवढ्या अशा अनेक गांठी येतात. त्या फार दिवसानी हळू हळू पिकतात; त्या गांठींच्या ओळीला गंडमाळा असें ह्मणतात.

**कर्मविपाक**—शुक्रदशेमध्यें अंतर्गत रवि अथवा सूर्य दशेमध्यें अंतर्गत शुक्र किंवा बुधाच्या दशेमध्यें अंतर्गत मंगळ असेल तर ग्रंथिरोग, गंडमाळा इत्यादि प्राप्त होतात. **परिहार**—जो ग्रह अनिष्ट असेल त्याचीं दानें, जप, हवन इत्यादि करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—गुरुद्वेषी, दुसऱ्याचें मन विनाकारण दुखविणारा, प्रतारणापूर्वक विद्या शिकणारा किंवा शिकविणारा हे गंडमाला, ग्रंथिरोग यानी युक्त होतात. **परिहार**—चांद्रायण, पुरुषसूक्त जप, प्रायश्चित्त इत्यादि करावें.

**गंडमाळेवर उपाय**—( १ ) रुईच्या चिकात हरताळ, जेपाळ,कोष्ठ कोळिंजन यांचा खल करून तें लाविल्यानें गंडमाळा व गालगुंड यांचा नाश होतो.(२) तिळाचे तेलांत राळ आणि चिचोंद्री तळून तें तेल लावीत जावें. ( ३ ) मोहऱ्या, कडूनिंबाची पानें आणि बिबवे एकत्र जाळून ती राख बकऱ्याचे मुतात बारीक वांटून लेप करावा. ( ४ ) वेखंड, हिरडेदळ, लाख, कुटकी व चंदन यांनी सिद्ध केलेलें तेल प्यालें असतां हटकून गंडमाळा निखालस बरी होते. ( ५ ) कांचनाचे सालीचा काढा सुंठीचें चूर्ण घालून द्यावा. ( ६ ) वायवर्ण्याचा का-

हा मध घालून द्यावा. ( ६ ) पांढऱ्या गोकर्णीचें मूळ, कडू वृंदावनाचें मूळ गोमूत्रांत वाटून लेप करावा. ( ७ ) विनवा, व रंगारी हिरडा, रुईचे चिकात उगाळून लेप करीत जावा. ( ८ ) शेवग्याचा डिंक, मिरी व पांढरे गुलबासीचा कांदा, हीं एकत्र थंड पाण्यांत उगाळून लावीत जावें. ( ९ ) निर्गुंडीचे अंगरसात कुहिरीचें मूळ उगाळून तेलांत टाकून कढवावें आणि त्या तेलाचें नस्य द्यावें; ह्मणजे दुस्तर गंडमाळेचा नाश होतो. ( १० ) गंधक, टांकणखार, सैंधव, हाळद, नवसागर, पादेलोण, जवखार, शेंदूर, सज्जीखार, कापूर खैर, लकड्या पाषाणभेद, उंदीरकानीची साल, जेपाळाचा मगज, ही सर्व समभाग घेऊन इडनिंबाचे रसांत खलून शस्त्रानें गंडमाळेचा छेद करून वर हें औषध लावावें व त्यावर एरंडाच्या पानानें बांधावें. याप्रमाणें तीन दिवस करावें. पथ्यास दहींभात ह्मणजे गंडमाळा, अपची, ग्रंथी हे फुटून बाहेर निघतात यात संशय नाही. ( ११ ) हिराकस पिंपळी व विनवे रुईचे चिकांत उगाळून लावावे.

**असाध्यलक्षण**—पिनसादि उपद्रवानें रक्तगंडमाळा असाध्य होय.

**गंडमाळा, गलगंड, अपचि, ग्रंथि व अर्बुद यांजवर पथ्य**—वमन, जुन्या साटक्या साळीचा भात, अथवा भाकरी, मूग, पडवळ, करटोलीं यांची भाजी, जुन्या तुपाचें पान, रुक्ष व तिखट पदार्थ संपूर्ण दीपन यांचें सेवन करावें.

**गंडमाळा वगैरेंवर अपथ्य**—दूध, ऊंस, अनूपदेशांतील मांस, मिष्टान्न, आंबट, मधुर, जड व कफकारक पदार्थ हे वर्ज करावे.

---

## ग्रंथि.

॥ वातादयोमांसमसृक्प्रदुष्टाः संदूष्यमेदश्चतथाशिराश्च ॥
॥ वृत्तोन्नतं विग्रथितंतुशोथंकुर्वंत्यतोग्रंथिरितिप्रदिष्टः ॥

**अर्थ**—अत्यंत दुष्ट झालेले वातादि दोष मास, रक्त आणि मेद तशाच शिरा यांना दुष्ट करून ( येथें दुष्टि वृद्धिरूप जाणावी क्षयरूप नव्हे कारण क्षीणास विकार करण्याचें सामर्थ्य नसतें ) वाटोळी, उंच, गाठाळलेली, किंवा कठिण अशी सूज उत्पन्न करितात ह्मणून त्याला ग्रंथि असें म्हटलें आहे. याचे वात, पित्त, कफ, मेद शिरोजग्रंथी असे पाच भेद आहेत.

**कर्मविपाक व पूर्वकर्मविपाक**—हे गंडमाळेप्रमाणें समजावे.

**वातजग्रंथि** ( मा. नि. )—वातजग्रंथि ओढून लांब केसासारखा छिद्याचासारखा, टोंचल्यासारखा, फेंकल्यासारखा, घुसळल्यासारखा, फोडल्यासारखा होतो. तो काळ्या रंगाचा मृदु, बस्तीप्रमाणें विस्तृत असतो. तो फुटला असता स्वच्छ रक्त स्त्रवतें, ही लक्षणें होतात.

**पित्तजग्रंथि** ( मा. नि. )—आगीनें भाजल्याप्रमाणें, अत्यंत दाहयुक्त, आंतून धूर निघाल्या सारखा, तुंबडीनें ओढल्या सारखा, क्षार लावून पिकल्या प्रमाणें अत्यंत पक्क होतो, जळून भस्म होतें असें वाटतें, तांबडा लाल होतो किंवा किंचित् पिंवळा असतो, आणि फुटला ह्मणजे त्यांतून नासलेलें पुष्कळ रक्त स्रवतें. ही लक्षणें होतात.

**कफजग्रंथि** ( मा. नि. )—थंड, प्रकृतिसमवर्ण, कोणी किंचित् विवर्ण असें ह्मणतात, अल्प पीडा करणारा, अत्यंत कंडूयुक्त, दगडाप्रमाणें कठिण, व मोठा आणि चिरकालानें वाढणारा असा असतो; तो वाढला ह्मणजे फुटून पांढरा दाट पू गळतो, हीं लक्षणें होतात.

**मेदजग्रंथि** ( मा. नि. )—शरीर वृद्ध झालें असलें तर तो वृद्ध होतो, शरीर क्षीण झालें तर तो क्षीण होतो, तुळतुळीत, मोठा कंडूयुक्त, पिडारहित असतो, आणि तो फुटला असतां त्यांतून तिळाचे कल्कासारखा किंवा थिजलेल्या तुपासारखा मेद जातो. हीं ल० होतात.

**शिराजग्रंथि** ( मा. नि. )—निर्बळ पुरुषानें नाना प्रकारची शरीरास आयासजनक कर्मे केल्यानें वायु कुपित होऊन शरीराचें जाळें आखडून संकोच करून आणि एके ठिकाणी करून व शोषवून झटकन उच ग्रंथि ह्मणजे गांठ करितो ही लक्षणें होतात.

**सर्व ग्रंथींवर उपाय**—[ १ ] सर्व ग्रंथींचे ठायीं रक्तस्राव प्रशस्त आहे [ २ ] कोष्ठ कोळिजन, रुईचा चीक, हरताळ आणि जेपाळ याचा लेप केला असता सर्व ग्रंथी नाश पावतात. [ ३ ] विष्णुक्रांत आणि पेटारीमूळ हीं दोन्ही कांजीत वाटून लेप करावा; ह्मणजे काळपुळीचाही नाश करील, मग इतर ग्रंथीची काय कथा. [ ४ ] मोहऱ्या व लसून एकत्र वाटून लेप करावा. [ ५ ] पुत्रजीववृक्षाचा नार [ अंतरसाल ] पाण्यांत उगाळून लेप करावा; ह्मणजे काळपुळी, विषाचा फोड, हे वेदनायुक्त असले तरी तात्काळ नाश होतो. आणि काख, गळा, कान या ठिकाणच्या ग्रंथीचा नाश करितो.

**असाध्य लक्षण**—पीडारहित मोठा, स्थिर किंवा मर्मस्थानीं झालेला असाध्य जाणावा.

**पथ्यापथ्यें**—गलगंडावरील करावी.

---

# ज्वर कर्मविपाक.

॥ देवस्वहरणाच्चैवजायतेविविधोज्वरः ॥ ज्वरोमहाज्वरश्चैवरौद्रोवैष्णवएवच ॥

अर्थ—देवाच्या द्रव्याचा अपहार केला असतां अनेक प्रकारचे ज्वर उत्पन्न होतात. त्यांत ज्वर रुद्रापासून, आणि महाज्वर विष्णूपासून होतो. ज्योतिषशास्त्रात ग्रहाचे उच्चे आणि नीचे सांगितले आहेत. त्याप्रमाणें जन्मकाळीं नीचस्थानीचा सूर्य किंवा क्षीणचंद्र असेल तर त्यांच्या दशेमध्यें नेत्ररोग, ज्वर, मस्तकरोग, बंधन, अति मार्ग चालण्यानें पायास पीडा होणें, कुष्ठरोग इत्यादिक होतात. अथवा जन्मकाळी राहु किंवा शनी यांच्या मध्यगत बुध असतां सुहृत् बंधु यांचा वियोग, भूमिसंबंधी कलह, शरीरपीडा, व ज्वर इत्यादि रोग होतात. **परिहार**— सूर्यपीडा परिहारार्थ त्याच्या मंत्राचा जप करावा. रुईच्या समिधांनी होम, विद्रुममणीधारण, गोप्रदान, इत्यादि करावें. याप्रमाणें जो जो ग्रह अनिष्ट असेल त्याचीं दानें व जप करावे; म्हणजे इहजन्मसंबंधी पीडा दूर होते. जन्मांतरी अत्यंत जे दुष्ट पापकर्म करितात व लोकाशीं विनाकारण क्रूर रीतीनें वागून साहसकर्म करितात आणि जे सर्वकाळ दुसऱ्याचें वाईट चिंतितात ते ज्वररोगी होतात. **परिहार**—देवीच्या ( जातवेदसे ) मंत्राचा दहाहजार जप करावा. आणि भोजन, शतचंडी, सहस्रचंडी, अनुष्ठान, सहस्र कलशांनीं देवावर अभिषेक (उष्णज्वर असेल तर महादेवावर शीतज्वर असेल तर विष्णूवर) अथवा यथाविधि कुंभदान करावें किंवा मृत्युंजय विधान करावें. याप्रकारें दैविक प्रतिकार जाणावे.

॥ दक्षापमानसंक्रुद्धरुद्रनिःश्वाससंभवः ॥ ज्वरोष्टधापृथग्द्वंद्वसंघातागंतुकःस्मृतः ॥

अर्थ—दक्षानें अपमान केल्यामुळें संतप्त झालेला जो शिव त्याच्या त्या वेळच्या श्वासापासून ज्वर उत्पन्न झाला तो असा की, वात, पित्त व कफ या दोषांपासून पृथक् पृथक् तीन प्रकारचा, दोन दोन दोष मिश्र होऊन त्यांपासून तीन प्रकारचा व तिन्ही दोषांपासून एक आणि एक आगंतुक मिळून आठ प्रकारचा ज्वर जाणावा. त्याची नावें. वातज्वर, पित्तज्वर, कफज्वर, वातपित्तज्वर, पित्तकफज्वर, कफवातज्वर, सन्निपातज्वर आणि आगंतुकज्वर अशीं जाणावी. ( मा. नि. )

**सामान्यज्वराचें लक्षण** (मा. नि.)—घामाचा प्रतिबंध, देह, इंद्रिय, आणि मन यांचा संताप व सर्व अंगास वेदना, हीं एकेच काळी उत्पन्न होतात त्याला ज्वर असें ह्मणतात. पित्तज्वरामध्यें घाम येतो, तेव्हां वर जें लक्षण सांगितलें आहे; त्याला दोष येतो. याजवर जेज्जटादिक ग्रंथकार असें समाधान करितात, कीं स्वेदावरोध ( स्विद्यते अनेनेति स्वेदः ) या व्युत्पत्तीवरून स्वेद म्हणजे अग्नि त्याचा अवरोध म्हणजे दोषव्याप्ति असा अर्थ केल्यानें लक्षणाचा व्यभिचार घडत नाही.

**रोगोत्पत्तीचें कारण**—अति पाणी पिणें, अकालीं अति खाणें, दिवसां निजणें, रात्रीं जागरण करणें, मलमूत्र यांचा अवरोध करणें, या सहा प्रकारांनीं रोग उत्पन्न होतात. यास प्रमाण— ॥ अत्यंबुपानाद्विषमाशनाच्च दिवाशयाज्जागरणाच्चरात्रौ ॥ संधारणान्मूत्रपुरीषयोश्चषड्भिः प्रकारैः प्रभवंति रोगाः ॥

**ज्वरनिदान**( वाग्भट )—ज्वर हा सर्व रोगांत मोठा श्रेष्ठ असून तसाच मोठा दुष्ट आहे. इतर रोगापेक्षां या रोगानें मनुष्य जास्त मरतात. हा मनुष्यांचें ओज ( सर्व धातूचें तेज ) भक्षण करितो. मोठा मारक असून हा दक्षाच्या यज्ञाचा नाश करणाऱ्या शंकराच्या तृतीय नेत्रापासून निघालेला रोग होय. उत्पन्न झाल्यापासून अखेरपर्यंत मोहमय असून दाहात्मक आहे. व हा भयंकर व्याधि अनेक कारणापासून त्वरित उत्पन्न होऊन निरानिराळ्या प्राण्यांत निरनिराळीं नांवें पावतो. याचे भेद वात १, पित्त १, कफ १. द्वंद्वज ३, सन्निपात १, आणि आगांतुक ज्वर १, मिळून संक्षेपानें आठ प्रकारचा आहे.

**ज्वरसंप्राप्ति** ( मा. नि. )—मिथ्या आहार व विहार यांपासूत दुष्ट झालेले दोष आमाशयाचा आश्रय करून कोष्ठाग्नीला बाहेर त्वचेपर्यंत काढून रस धातूला मिळवून ज्वर उत्पन्न करितात. ही संप्राप्ति शारीर ज्वराचीच आहे.आगांतुक ज्वराची नव्हे, कारण यांना दोष संबंध मागून होतो असें जाणावें.

**ज्वराचें पूर्वरूप** ( वाग्भट )—आळस, चैन न पडणें, अंग जड होणें, तोंड बेचव होणें, अरुचि, जांभळ्या येणें,डोळे पाण्यानें भरून येणें,हातपाय मोडल्या सारखें होणें, अंग मोडून येणें. अन्नाचा पाक न होणें, शक्ति कमी होणें, झोंप फार येणें, रोमांच उभे रहाणें, शरीर वांकणें, पोटऱ्या दुखणें, चांगला उपदेश केला असतांही न सोसणें, आंबट, खारट, व तिखट पदार्थांवर वासना जाणें, गोड पदार्थाचा व मुलांचा तिरस्कार येणें, तहान फार लागणें, त्याच प्रमाणें शब्द, अग्नि, थंडी, वारा, पाणी, सावली व ऊन यांची कारणावाचून तिरस्कार व इच्छा होणें, आयासावांचून श्रम, ग्लानि, आधारांत पडल्या सारखें वाटणें, अन्नावर वासना नसणें, असंतोष, ही लक्षणें ज्वर उत्पन्न होणार असतां सामान्यतः सर्व ज्वरात होतात. आतां विशेष लक्षणें सागतों—वायूपासून ज्वर यावयाचा असला तर जांभया फार येतात. पित्तापासून डोळयाची आग होते. आणि कफापासून अन्नद्वेष होतो असें जाणावें.

**शास्त्रार्थ** ( सूत्रस्थान ) ( वाग्भट )—आत्रेयादि महाऋषीनीं असें सांगितलें आहे कीं, आमाशयस्थ दोष अग्नि मंद करून आमाशी मिश्र होऊन व स्त्रोतेंसांचा ( मार्गांचा ) अवरोध करून ज्वर उत्पन्न करितात. यास्तव ज्वराचीं पूर्वरूपें दिसूं लागतांच किंवा तो सुरु होतांच शक्ति क्षीण न होऊं देण्याविषयी तत्पर राहून लंवन करावें. कारण शक्ति हा आरोग्याचा पाया आहे. व आरोग्य हेंच चिकित्सेचें प्रयोजन होय. ॥ **लंघनैः क्षपिते दोषे दीप्तेऽग्नौलाघवेसति ॥ स्वास्थ्यं क्षुत्तृड्रुचिः पक्तिर्बलमोजश्चजायते**॥लंघनानी दोष क्षीण, अग्नि प्रदीप्त व देह हलका झाला क्षण-

जे स्वस्थता, क्षुधा, तृषा, अन्नावर अरुचि, पचनशक्ति, बल व ओज, हीं उत्पन्न होतात.

**वमनाची योजना** ( वाग्भट )—जेवण होतांच जर ज्वर आला असेल व विशेषेंकरून जर तो सामज्वर असेल व जर त्यांत उम्हासें, तोंडास पाणी सुटणें, अन्नद्वेष, खोकला व विषूचिका हीं लक्षणें असून दोषांची अति वृद्धि, त्यांचें स्वस्थानापासून सुटून चलित होणें व कफाधिक्य सुचवीत असतील तर त्यांत रोगी वमनार्ह असल्यास वमन प्रशस्त आहे. याखेरीज इतर प्रसंगीं वमन दिल्यास श्वास, अतिसार, मूर्छा व हृदयास पीडा होतात व तो ज्वर विषमत्व पावतो. वमन देणें झाल्यास पिंपळी, इंद्रजव किंवा जेष्ठीमध यांजबरोबर मधयुक्त किंवा लवणयुक्त ऊन पाण्याशीं कडू, पडवळ, कडू निंब, करटोली व वेत यांच्या पानांच्या काढ्यांत, सातूच्या तरवण्याबरोबर उंसाच्या रसांत किंवा मधांत गेळफळाचें आंतील बीज बलाबल पाहून द्यावें. वमनास योग्य असल्यास वमन द्यावें. न सोसल्यास उपास करावा तेणेंकरून प्रवृद्ध दोषांचा पाक व प्रशम होतो. तें लंघन आमाचा पाक होईपर्यंत ज्वरितास घालावें.

**लंघनाचा नियम** ( वाग्भट )—लंघन ( उपास ) घाम काढणें, काल, पेया ह्मणजे पेज व कडू पदार्थ अवस्थानुसार किंवा क्रमानें त्या त्या काळीं दोषांचा पाक करणारे आहेत. केवळ वातज्वर, धातुक्षयात्मकज्वर, आगांतुकज्वर व जीर्णज्वर यांजवर लंघन करूं नये. तर त्यांत कर्शन न करणारें असें शमन हितावह आहे. आतां लंघनाचेंही दोन प्रकार आहेत. जें दोषांना बाहेर काढून टाकतें त्याला शोधन ह्मणतात तें पाच प्रकारचें. बस्ति, वमन, विरेचन ऊर्ध्व विरेचन व रक्तमोक्ष. जें औषध दोषांना बाहेर काढून न टाकितां व सम दोषांना विकृत न करितां विषम दोषाना समस्थितीत आणितें. त्याला शमन ह्मणतात. तें सात प्रकारचें. पाचन, दीपन, निराहार, पाणी न पिणें, व्यायाम करणें, आतप सेवन व वाऱ्यात बसणें—वायूला व पित्ताश्रित वायूला बृंहण हेंच शमन होय. वायूचा व पित्ताश्रित वायूचा लंघनानें प्रकोप व बृंहणानें उपशम होतो. ह्मणून वरील व्यवस्था त्यास लागू नाही. सामज्वरांची लक्षणें असली तर तो चांगला लंघीत झाला नाही असें समजावें. चांगला लंघीत झाल्याचीं लक्षणें येणेंप्रमाणें—इंद्रियांची प्रसन्नता, मल होणें, देहलाघव, रुचि, क्षुधा व तृषा यांचा एककालीं प्रादुर्भाव, हृदय, कंठ व ढेंकर यांची शुद्धि, व्याधिमार्दव, उत्साह व तंद्रेचा नाश इतक्या गोष्टी उत्पन्न झाल्या ह्मणजे पुढें सहा दिवस किंवा ज्वर कमी होईपर्यंत औषधानें सिद्ध केलेल्या कण्हेऱ्या द्याव्या. त्यात मंडापासून प्रारंभ करावा ह्मणजे जठराग्नि प्रदीप्त होतो. प्रथमतः सहज पचणारी अशी साळीचे लाह्याची कण्हेरी किंवा तांदूळ भाजून कण्हेरी, सुंठ, धणे, पिपळी व सैंधव घालून द्यावी. रोग्याची आंबटावर वासना गेली असल्यास डाळिंबाचा रस व सैं-

१—आमाने युक्त.

धव घालून द्यावी. तापकऱ्यास रेच होत असल्यास किंवा पित्ताचें आधिक्य असल्यास सुंठ व मध घालून ती कण्हेरी थंड झाल्यावर द्यावी—ओटी, पोट, कुशी व डोकें यात ठणका असल्यास रिंगणमूळ व गोखरू यांच्या काढ्यानें सिद्ध केलेली पेज द्यावी. ज्वर व अतिसार हे दोन विकार असल्यास पिठवण, त्रिकणामूळ, बेलकाचरी, सुंठ, निळें कमळ, व धणे यांच्या काढ्यांनं सिद्ध केलेली दीपन व पाचन अशी पेज द्यावी.—उचकी, वेदना, श्वास व खोकला हे विकार असल्यास लघुपंच मुळाच्या काढ्यात सिद्ध केलेली व रोगी कफानें पीडित झाला असल्यास मोठ्या पंच मुळाच्या काढ्यांत सातूंच पीठ घालून सिद्ध केलेली पेज द्यावी—मलावरोध झाला असल्यास सातू, पिंपळी आवळकठी यांनीं सिद्ध करून तुपाची फोडणी दिलेली व पुरीपादि मळ व वातादि दोष याचें अनुलोमन करणारी पेज द्यावी—बद्धकोष्ठ व मुरडा असेल तर चवक, पिपळमूळ, मनुका, आंवळकटी व सुंठ यांनीं सिद्ध केकेली कण्हेरी द्यावी.— गुदाशी कातरल्यासारखी पीडा होत असल्यास बोरें, अमसूल, सालवण, पिठवण व बाळबेल यांच्या काढ्यांत केलेकी कण्हेरी द्यावी—घाम व झोंप येत नसून तृपेनें व्याकुळ झाला असल्यास खडीसाखर, आंवळकटी व सुंठ यांनीं तयार केलेली कण्हेरी द्यावी—तहान, वांति, दाह व ज्वर यांचा नाश करण्याकरितां खडीसाखर, बोरें, मनुका, उपलसरी, नागरमोथे व रक्तचंदन यांनी ती कण्हेरी सिद्ध करून आंत मध घालून द्यावी.—मद्यापासून उत्पन्न झालेल्या ज्वरांत नेहमीं मद्य प्राशन करणाऱ्या मनुष्यास ताप आला असता त्यात कफपित्ताचे स्थानी गेला असतां, ग्रीष्मऋतूंत पित्त व कफ याचें आधिक्य असतां, रोगी तहान, वांति व दाह यांनीं पीडित झाला असता किंवा ऊर्ध्वगामी रक्तपित्त झालें असतां पेज देऊं नये. अशा ठिकाणीं ज्वरनाशक अशा डाळिंब, नारिंग, इत्यादि फळांच्या रसाबरोबर किंवा पाण्याबरोबर साखर व मध घालून साळीच्या लाह्यांचें तरवणी करून द्यावें. त्यानंतर लाह्यांचें पातळ केलेलें पीठ किंवा यवागू जिरल्यावर रोग्यास भूक लागली असता त्यास धान्याचें कढण ( यूप ) किंवा मूग व लाव्याचें मांस याचें साधें कालवण अथवा सुरवा याजबरोबर भाजलेल्या तांदुळाचा भात द्यावा.

**ऊन पाणी**—वातकफात्मकज्वरात रोग्यास तहान लागली असतां थोडें थोडें ऊन पाणी द्यावें. तें कफास पातळ करून लवकर तहान कमी करितें. व अग्नि प्रदीप्त करून स्रोतसांस मऊ करून साफ करितें. तसेंच तें स्तब्ध झालेलें पित्त, वायु, घाम, मल व मूत्र यांचें अनुलोमन करणारें, झोंप, जडत्व व अरुचि दूर करणारें व प्राणाचें संरक्षण करणारें असें आहे. थंड पाण्याचे गुण याच्या उलट असून तें दोषसमुदायाची वृद्धि करितें. जरी ऊन पाण्याचे असे गुण आहेत, तथापि तें केवळ पित्तज्वरांत, पित्ताधिकज्वरांत, नेत्रादिकातून उष्ण वाफा निघणे, दाह, मोह व अतिसार यांनी युक्त अशा ज्वरांत विषम व मद्य यापासून उत्पन्न झालेल्या

१—बेलाचीं सुकलेली फळें.

ज्वरांत, ग्रीष्म ऋतूंत आणि ज्यास उरःक्षत, क्षय व रक्तपित्त हे रोग झाले आहेत त्यास देऊं नये. तर त्यास नागरमोथे, चंदन, सुंठ, वाळा, पित्तपापडा व काळावाळा यांनी सिद्ध केलेलें थड पाणी हितकारक असून तें पाचक, ज्वर व तहान यांस दूर करणारें आहे. उष्णता ही पित्तावाचून नाही व ज्वर उष्णतेवांचून नाहीं ह्मणून कोणत्याही ज्वरात व विशेषतः पित्तज्वरात पित्ताला विरुद्ध असे पदार्थ वर्ज करावे. तसेंच स्नान, अंगास तेल लावणे, चंदनादिकांचे लेप व उपवासावांचून बाकीचीं लंघनें वर्ज करावीं.

अशा प्रकारें ६ दिवस रोग्याची शक्ति कमी न होऊं देतां व दोष वाढवूं न देतां घालवावे. नंतर उपवासादिकांनी दोषांचा पाक झाला असता शेष राहिलेल्या दोषांचें पाचन व शमन करणारा असा काढा द्यावा. तीव्र वेदनांनीं युक्त व आमाधिक अजीर्णावर जसें शूलनाशक औषध देऊं नये, तसेंच त्याच प्रकारच्या ज्वरामध्यें ज्वरघ्न औषध देऊं नये. सर्पास दूध पाजलें असता जसें त्याचें विषच होतें तसें तें आमयुक्त कोठ्यात आमाची अधिकच वृद्धि करितें. पित्तज्वरावर विशेषतः कडू व कफज्वरावर तिखट असा काढा योजावा. तुरट रस जरी पित्त व कफज्वरास नाशक आहे, तथापि नवज्वरात ह्मणजे अपक्व किंवा आमज्वरात तुरट काढा देऊं नये, कारण तो मलावरोध करून विषमावर घालवितो आणि अरुचि उम्हासे, उचकी व पोट फुगणें इत्यादि विकार उत्पन्न करितो.

**औषधाची योजना**---कोणी ७ दिवसांनी, कोणी १० दिवसांनी, कोणी लघु अन्न सेवन केल्यावर ज्वरनाशार्थ औषध सुरु करावें असें ह्मणतात. केव्हाही द्या, परंतु आमाचें आधिक्य असतांना मात्र देऊं नये. परंतु ज्वराची उत्पत्ति झाल्या दिवशीच रात्रौ चतुर्थांश पाण्याचा काढा द्यावा. तो कोंबट द्यावा. त्या योगानें आम व दोष शात होतात. वात, पित्त व कफ वगैरे कोणते दोष आहेत हे तीन दिवसांत स्पष्ट होऊन पुढे त्यास पाचनाची योजना करण्यास ठीक पडतें. तीव्र ज्वरानें पीडित झालेल्या रोग्यास दोषाच्या उद्वेग काली ( वांति, दाह, तळमळ इत्यादिकांनी सूचित ) किंवा दोषांचा अतिशय संचय होऊन झापड व अंग ओल्या वस्त्रानें गुडाळल्यासारखें वाटणें ही लक्षणें झाली असतां दिलेल्या औषधाचें पचन न होतां तें पुनः ज्वर वाढवितें---ज्वर कमी होऊन अंग हलकें झालें व दोष चलित झाले ( मल, मूत्र व स्वेद याची प्रवृत्ति झाली ) ह्मणजे नुकताच ज्वर येऊं लागला असला तरी त्यास औषध द्यावें. दुसरें असें की---नवज्वरेदिवास्वप्नं स्नानाभ्यंगान्नमैथुनं ॥ क्रोधप्रवातव्यायामकषायांश्चविवर्जयेत् ॥ नूतन उत्पन्न झालेल्या ज्वरात दिवसां झोंप घेणें, स्नान, अभ्यंग, अन्न खाणें, क्रोध, मैथुन, वारा घेणें, व्यायाम करणें व काढा देणें इतके वर्ज करावें. साराश इतकेच ध्यानात ठेवावा की नवीन उत्पन्न झालेल्या ज्वरावर ह्मणजे त्याचा वेग काहीं कमी होईपर्यंत त्याजवर कोणत्याही प्रकारचें औषध देऊं नये व भोजनही हितकारक होत नाही. यासाठी वर सागितल्याप्रमाणें पेज, कण्हेरी, यवागू व युष वगैरे देऊन ज्वर कमी झाल्यानंतर

औषध उपचार करावा. तसें न करितां नूतन ज्वरावर कोणतेंही औषध दिल्यास किंवा शोधन दिल्यास तें विषम ज्वरावर घालवितें. विषम ज्वर ह्मणजे जो ज्वर विकृत ह्मणजे विकोपास जातो त्यास विषमज्वर ह्मणतात.

**वातज्वराचें कारण**—वाल, उडीद, तुरी, हरबरे, जडान्न, चिकट पदार्थ, कलिंगड, कवठ, मठ, कंद, काकडी, मुळे, रुक्ष पदार्थ, अति मैथुन, अति व्यायाम व अति जाग्रण, इ० कारणानीं वातज्वर उत्पन्न होतो.

**वातज्वराचें लक्षण** ( मा. नि. )—कंप होणें, अनियमित कालीं ज्वर अधिक उणा होणें किंवा येणें, घसा, तोंड व ओठ यांस कोरड पडणें, निद्रा न येणें, शिंका न येणें, गात्रांना रुक्षता, मस्तक, हृदय, गात्रें यांचेठायी वेदना, तोंडाला विरसपणा, शौचास खडा होणें, पोटांत दुखणें व वायूनें पोट फुगून दुखणें, जांभया येणें, हीं लक्षणें वातज्वरांत होतात.

**वातज्वर लक्षण** ( वाग्भट )—ज्वर अधिक उणा होणें, वेदना व उष्णता यांचा अनियमितपणा, शिरास वेदना, पाय बधिर होणें, ताठणें, पोटऱ्या वळणें, थकणें, सांधे सुटल्यासारखे होणें, माड्या गळाल्यासारख्या होणें, कंबर जखडणें, पाठींत टोंचल्यासारखें वाटणें, पोटांत पिळवटल्यासारखें होणें, विशेषत· बरगड्यांची हाडें कापल्यासारखीं वाटणें, हृदय जखडल्यासारखें वाटणें, उरांत भाल्यानें टोंचल्यासारखें वाटणें, खांदे घुसळल्यासारखें होणें, दंडास फोडल्यासारखी वेदना होणें, अंगांत दाबल्यासारखी पीडा होणे, जबड्यास खाण्याची शक्ति नसणें, जांभया येणें, कानांत शब्द होणें, शंखांत अतिशय वेदना होणें, डोकें दुखणें, तोंड बेचव किंवा तुरट होणें, मलमूत्रादिकांची प्रवृत्ति न होणें, त्वचा, तोंड, डोळे, नखें, मल व मूत्र हीं रुक्ष ह्मणजे निस्तेज व अरुणवर्ण होणें, लाळ गळणें, अरुचि, अन्नावर वासना नसणें, अन्नाचा पाक न होणें, घाम न येणें, झोंप न येणें, घसा व ओंठ यांस कोरड पडणें, तहान लागणें, कोरडी ओकारी, ढास, ( सुका खोकला ) मनाची खिन्नता, रोमाच उभे राहणें, अंग व दांत शिवशिवणें, कंप शिक न येणें, चक्कर, बडबड, उष्णाची इच्छा व अंग वांकणें हीं लक्षणें वातज्वरांत होतात.

**वातज्वराचें लक्षण** ( अन्यमत )—हात, पाय व कंबर गळून गेल्यासारखें वाटणें, डोळे पाण्यानें भरून येणें, कंडू, उष्ण श्वास. हृदयाला ओढल्यासारखें वाटणें, तोंडास थोडा गुळचटपणा असणें, शोष, क्वचित् ओकारी व आंबट पदार्थाविषयीं इच्छा होणे, अजीर्ण, भ्रम, मोहो, डोळ्यावर झापड, ही लक्षणें वातज्वरात होतात असें जाणावें.

**वातज्वरावर पाचन**—सुंठ, काडे किराईत, नागरमोथे व गुळवेल यांचा काढा व निकाढा ज्वराचा वेग थोडा कमी झाल्यावर म्हणजे निदान तीन चार दिवस गेल्यावर द्यावा. म्हणजे पूर्वी ज्वर अपक्व असतो, तो या काढ्यानें पक्वदशेस येतो.

**वातज्वरावर उपाय**—ज्वर आल्यापासून याजवर सातवे दिवशी औषध

सुरु करावें. ( १ ) गुळवेल, सुंठ, नागरमोथे, हाळद आणि धमासा यांचा काढा निकाढा पिपळीचें चूर्ण घालून द्यावा. ( २ ) पिपळमूळ, पित्तपापडा, आडूळसा, भारंगमूळ, सुंठ व गुळवेल यांचा काढा निकाढा किंचित् मध घालून द्यावा; ह्मणजे मोटा तीव्र जरी वातज्वर असला तरी त्याचा नाश होईल. ( ३ ) पिंपळी, हिंगूळ व वचनाग हीं सर्व शुद्ध व समभाग घेऊन घेऊन बारीक चूर्ण करून बलाबल पाहून दोन गुंजांपर्यंत मधांत द्यावें. ( ४ ) वाळू खापरांत तापवून तिजवर कांजी शिंपून रोग्याला त्या खापराशेजारीं बसवावा व वरून कांबळा वगैरे पांघरूण घालून वाफारा द्यावा; ह्मणजे वातज्वर, कफज्वर, मस्तकशूळ व अंगमोडेपणा यांतें शमवितो. ( ५ ) दर्भाचें मूळ, चिकणामूळ, व गोखरू याचा काढा चतुर्थांश करून निवाल्यावर साखर व मध घालून द्यावा. ( ६ ) धमासा, सुंठ, कुटकी, पाहाडमूळ, कचोरा, आडूळसा आणि एरंडमूळ यांचा काढा निकाढा पित्तशूळ,श्वास, खोकला, व वातज्वर यांचा नाश करितो. ( ७ ) सालवण, चिकणामूळ, मनुका, गुळवेल, आणि उपलसरी यांचा काढा तीव्र वातज्वर घालवितो. ( ८ ) वाळा, पिठवण, सुंठ, किराईत, नागरमोथे, सालवण, रिंगणमूळ, डोरलीमूळ, गुळवेल व गोखरू यांचा काढा द्यावा. ( ९ ) रात्रीं भांग भाजून तिचें चूर्ण थोडें मधाशीं द्यावें; ह्मणजे निद्रानाश, अतिसार, संग्रहणी व अग्निमांद्य यांचा नाश होतो. ( १० ) पिपळमूळाचें चूर्ण गुळाशीं मिश्र करून द्यावें; ह्मणजे बहुत दिवसाचा निद्रानाश झाला असेल तरी त्यास निद्रा येईल. ( ११ ) कावळीचें मूळ सुतांत बांधून शेंडीस बांधलें असतां निद्रा त्वरित येते.

**वातज्वरीं पथ्य**—वेळलेल्या जुन्या साळींचा भात, खडीसाखर, किंवा सैंधवयुक्त जुन्या गव्हाची कण्हेरी, आमसुलाचे सार, आलुबुखार, जुन्या गव्हाची रोटी, मुगाचें कढण किंवा वरण, तुरीचे पातळ वरण, अमसूल किंवा आंवळकठी याची आलें मिश्रित चटणी, आडाचें ऊन पाणी, कोबी, तांदुळजा, करटोलीं, माठ, चाकवत, पडवळ, कोंवळा मुळा, यांच्या भाज्या, घाम काढणें, अंग रगडणें, लोंकरीचीं वस्त्रें, खारीक, मनुका, गूळ, ह्यांचें सार, यवागू, इत्यादि वातज्वरावर पथ्यास द्यावें.

**वातज्वरीं अपथ्य**—थंड पाणी, तेल, तूप, आंबट पदार्थ, वारा घेणें, जागरण, थंड व जड पदार्थ, स्नान, मैथुन, अभ्यंग, व अनुलेपन इ० वर्ज करावें.

**पित्तज्वराचें कारण**—क्षारान्नभोजन, तैल भक्षण, वांगें, सुरण, कारली, कडू पदार्थ, तिखट, मोहऱ्या याचें अति सेवन, तळीव पदार्थ खाणें, फार ऊन घेणें, फार जागरण करणें, इत्यादि कारणांनी पित्तज्वर उत्पन्न होतो.

**पित्तज्वराचें लक्षण** ( मा. नि. )—ज्वराचा वेग तीक्ष्ण, अतिसार ह्मणजे शौच्यास पातळ होणें, थोडी निद्रा, वांति, गळा, ओंठ, तोंड, नाक यांवर फोड, घाम, बडबड, तोंड तिखट, रूपादिकाचें अज्ञान,दाह, उन्मत्तपणा, तहान व विष्ठा,

मूत्र आणि त्वचा यांना पिंवळेपणा, चाकावर बसून फिरविल्यासारखें वाटणें, ही लक्षणें पित्तज्वरांत होतात.

**पित्तज्वराचें लक्षण** ( वाग्भट )—सर्वांग तापणें, बडबड, तोंड कडू होणें, नाक व तोंड येणें, थंड पदार्थांची इच्छा होणें, चक्कर, घेरी ( मूर्च्छा ), मद, चैन न पडणें, अतिसार, पित्ताची वांति, रक्ताचा थुंका पडणें, आंबट ढेंकर, तांबड्या गांधी उठणें, त्वचा, तोंड, डोळे, नखें मळ व मूत्र ही पिवळी किंवा हिरवीं होणें, घाम येणें, श्वासास घाण येणें, तहान फार लागणें, ही पित्तज्वराची लक्षणें होतात.

**पित्तज्वराचें लक्षण** ( अन्यमत )—मूत्राचा वर्ण तांबूस, मस्तक दुखणें, तोंड कडू, डोळ्यांपुढें अनेक रंगांचे काजवे हालत असल्याचा भास होणें, डोळ्यांचा व अंगाचा दाह, श्वास उष्ण, कुक्षीशूल, अस्वच्छता, विस्मय, काम, कैफ घेतल्यासारखें होणें, थंड पदार्थावर इच्छा, इ० लक्षणें होतात.

**पित्तज्वरावर पाचन**—गुळवेल, कडूनिंब, धणे, सुंठ व हळद यांचा काढा निकाढा किंचित् जुना गूळ घालून ज्वराचे चवथे अगर पांचवे दिवशी ज्वरपाचनार्थ द्यावा ह्मणजे ज्वर पक्व होतो.

**पित्तज्वरावर उपाय**—ज्वर येऊन दहा दिवस आले ह्मणजे पुढील औषध द्यावें, ( १ ) मनुका, कडू पडवळ, कडू निंब, कुटकी, वाळहिरडे, रिंगणमूळ, वाळा, धणे, लोध, नागरमोथे व सुंठ यांचा काढा निकाढा पित्तज्वर समुद्राला वडवाग्निसारखा आहे. ( २ ) किराइत, गुळवेल, धणे, रक्तचंदन, वाळा, पित्तपापडा, व पद्मकाष्ठ यांचा काढा पित्तज्वर, दाह, तृषा, श्रम, अरुचि, तोंडास पाणी सुटतें तें, वांति व ग्लानि, यांचा नाश करितो. ( ३ ) कडू पडवळ व यव यांचा काढा शीत झाल्यावर मध घालून द्यावा; तो तृषा तीव्र पित्तज्वर व दाह यांचा नाश करितो. ( ४ ) कडू पडवळ, यव, धणे व जेष्टीमध यांचा काढा मधाशीं घेतला असता पित्तज्वर, दाह व तहान, यांतें शमवितो. ( ५ ) मनुका व बाहाव्याचा मगज यांचा काढा द्यावा. (६) सुंठ, पित्तपापडा, वाळा, नागरमोथे व रक्तचंदन यांचा काढा थंड करून द्यावा; तो तृषा, ओकारी, दाह व पित्तज्वर याचा नाश करितो. ( ७ ) उंबराच्या मुळ्याचें पाणी साखर घालून द्यावें. ( ८ ) धणे व तांदूळ रात्रीं पाण्यांत भिजत घालून प्रात:काळीं त्याचा काढा करून साखर घालून द्यावा; तो अंतरदाह व पित्तज्वर यांतें शांत करितो. ( ९ ) जेष्टीमध ॥· तोळा व मुगाची डाळ ८ तोळे ही दोन्ही पाण्यांत कढवून शीत झाल्यावर गाळून तो काढा प्राशनार्थ द्यावा. ( १० ) आंबा व जांभूळ यांची कोंवळी पानें व वडाच्या कोंवळ्या पानांच्या कळ्या व त्याच्या कोंवळ्या पारंब्या आणि वाळा,या औषधांचा फांट करून प्यालें असतां पित्तज्वर, तहान, ओकारी, अतिसार व कष्टसाध्य अशी मूर्छा हे रोग दूर होतात. ( ११ ) शतधौत घृत ह्मणजे शंभर वेळा पाण्यानें धुतलेलें तूप किंवा सहस्र वेळां पाण्यानें धुतलेलें

तूप हें हातापायांस लावून थोडें चोळलें असतां किंवा निंबाचा रस फेंसयुक्त करून त्याचा लेप अंगास केल्यानें दाह शांत होतो. ( १२ ) पळसाची, बोरीचीं किंवा निंबाची कोंवळी पानें ताकांत किंवा निंबूचे रसांत वांटून अंगास लेप केला असतां दाह व पित्तज्वर यांचा नाश होतो. ( १३ ) ज्वरित मनुष्याला उताणें निजवून त्याच्या नाभीवर तांब्याचें किंवा कांशाची वाटी ठेवून त्यांत गार पाण्याची मोठी धार धरावी ह्मणजे दाह कमी होऊन पित्तज्वराचा नाश होतो. ( १४ ) गुळवेलीचें सत्व साखरमिश्रित द्यावें; ह्मणजे पित्तज्वराचा नाश होतो. ( १५ ) उंबराचा चीक साखर घालून द्यावा. ( १६ ) गाईच्या ताकानें किंवा काजीनें वस्त्र भिजवून त्या वस्त्राचें रोग्याला पांघरूण घालावें ह्मणजे दाह नष्ट होतो. ( १७ ) मनुका व आंवळकटी याचा किंवा पिकलेल्या डाळिंबाचा अथवा धण्याचा हिम करून त्याचा मुखांत कवल द्यावा तो हितकारक आहे. ( १८ ) जो रोगी दाह व वांति यांनीं पीडित, कृश, काही खात नाही, तहान फार लागते त्याला साळीच्या लाह्याचें पीठ करून साखर व मध घालून द्यावें आणि मुगाचें कढण भात व साखर हे पदार्थ भक्षणार्थ द्यावे. ( १९ ) रक्तचंदन, वाळा आणि सुंठ यांचा काढा द्यावा. ( २० ) वाळा, काळा वाळा, नागरमोथे, पित्तपापडा, सुंठ व रक्तचंदन यांचा काढा तीव्र पित्तज्वर घालवितो. ( २१ ) रक्तचंदन, धणे, गुळवेल, कडूनिंबाची साल व पद्मकाष्ठ यांचा काढा द्यावा ह्मणजे पित्तज्वर, कफज्वर, तृषा, दाह व वायु याचा त्वरित नाश होऊन अग्नि प्रदीप्त होतो.

**रक्तपित्तज्वर**—याची लक्षणें पित्तज्वरासारखींच असतात, परंतु त्यापेक्षां तीव्र लक्षणें असतात. याजवर उपाय–(१) कुटकी, धमासा, किराईत, गुळवेल, पित्तपापडा व आडूळसा याचा काढा साखर घालून द्यावा. ( २ ) हरीतकीचें चूर्ण तेल, तूप व मध यांबरोबर चाटलें असतां दाह, ज्वर, खोकला, रक्तपित्त, विसर्प, श्वास व वांति यांचा नाश करितो. ( ३ ) गुळवेल रात्री कुटून पाण्यात भिजत घालून प्रातःकाळीं कुसकरून गाळून तें पाणी खडीसाखर घालून प्यावें तें रक्तपित्तनाशक आहे. याचप्रमाणें आडूळशाचा हिम, कास, रक्तपित्तज्वर यांचा नाशक आहे. (४) डाळिंबाचे सरबतांत सुवर्णमाक्षिक दोन गुंजा किंवा प्रवाळभस्म दोन गुंजा घालून द्यावें. ( ५ ) सुगंधी पुष्पांचें धारण करून वास घ्यावा ह्मणजे पित्तज्वर कमी होतो.

**पित्तज्वरीं पथ्य**—तांबड्या जुन्या साळी, जुन्या साळी, तापून निवालेलें पाणी, ताजें शीतोदक, मुगाचें कढण, आमसूलाचें सार, जुन्या गव्हाची पोळी, साळीच्या लाह्या, मनुका, कारलें, कोबी, पोकळा, पडवळ, चाकवत, दुध्या भोपळा, तादुळजा, तुरीचें पातळ वरण, तांदुळाची कण्हेरी खडीसाखर घालून, आंवळकठी व आमसुलाची चटणी, सुताची वस्त्रें, खजूर, खडीसाखर, यवागू, ही पित्तज्वरावर पथ्यें जाणावी.

**पित्तज्वरीं अपथ्य**—उन पाणी, उष्ण पदार्थ, लोंकरीचीं वस्त्रें, तूप, तेलकट

तिखट व आंबट पदार्थ, जागरण, हीं पित्तज्वरिनांनीं सेवन करूं नयेत व कोणत्याच प्रकारचा तेलकट वास घेऊं नये.

**कफज्वराचें कारण**—मिष्टान्नावर ह्मणजे गोड व मधुर अशा अन्नावर लागलींच पाणी पिणें (खीर लाडू वगैरे खाऊन), तेलात व तुपांत तळलेले पदार्थ खाणें, दही, दूध भक्षण, वारंवार स्नान, दिवसांस निद्रा, नित्य नवें पाणी पिणें व कफकारक पदार्थ अति भक्षण करणें इ० कारणानी कफज्वर उत्पन्न होतो.

**कफज्वराचें लक्षण** ( मा. नि. )—अंग ओल्या वस्त्रानें गुंडाळल्यासारखें भासणें, ज्वराचा वेग मंद, शक्ति असून काम करण्यास उत्साह नसणें, तोंडाला गोडी, मळ, मूत्र आणि त्वचा यांस पांढरेपणा, अंग ताठणें, तहान, तृषा सारखी अन्नावर वासना नसणें, अंगास जडपणा, थंडी वाजणें, ओकारी आल्यासारखी वाटणें, अंगाला कांटा येणें, फार झोंप, पडसें, अरुचि, खोकला, डोळ्यांवर पांढुरकी हीं लक्षणें कफज्वरांत होतात.

**कफज्वरलक्षण** (वाग्भट)—अरुचि, जडपणा (डोकें वगैरे भागास), स्रोतसांचा अवरोध, तापाचा जोर कमी असणें, लाळ गळणें, तोंड गोड होणें, कफ दाटल्यासारखें होणें, दमा, पडसें, उम्हासे, वांति, खोकला, ताठणें (अंग), त्वचादिकांस पांढरेपणा येणें, थंड पुळ्या येणें, झांपड व अंगावर चकंदळें उठणें ( उदर्द ), हीं लक्षणें कफज्वरांत होतात.

**कफज्वरलक्षण** (अन्यमत)—लघवी फार होणें, तळहात तळपाय व कपाळ याचा दाह होणें, सांधे दुखणें, तोंड खारट झाल्यासारखें वाटणें, साधारण जांभई येऊन डोळ्यांतून पाणी वाहणें, घसा भरल्यासारखा असून श्वास दाटणें व घाम अल्प येणें, शोष, अस्वच्छता, संताप, अंधेरी, मूत्र फेंसयुक्त होणें, शूळ, जिभेला खरे येणें, हीं लक्षणें कफज्वरात होतात.

**कफज्वरावर पाचन**—ज्वराचे ४ थे अगर ५ वे दिवशीं पाचन द्यावें. नागरमोथे, सुंठ, धमासा व अडूळसा यांचा काढा व निकाढा हा पाचन असून ज्वर, श्वास, खोकला, शूळ व कफज्वर यांचा नाश करितो.

**कफज्वरावर उपाय**—याजवर १२ वे दिवशीं औषध सुरू करावें. ( १ ) कडूपडवळ, त्रिफळा, कुटकी, कचोरा व अडूळसा याचा काढा मध घालून द्यावा. ( २ ) कोष्ठ, कोळिंजन, इंद्रजव, मोरवेल व कडूपडवळ यांचा काढा मिरपूड व मध घालून द्यावा. ( ३ ) कुटकी, कडूनिंब, अतिविष, त्रिकटू, इंद्रजव व वाळा, यांचा काढा उचकी व खोकला, यांसहित कफज्वराचा नाश करितो. ( ४ ) रिंगणमूळ, गुळवेल, देवदार, अडूळसा व सुंठ यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा. ( ५ ) कायफळ, पुष्करमूळ, काकडशिंगी, ओवा, अजमोदा व त्रिकटू यांचें चूर्ण आल्याचे

रसाशीं किंवा मधाशीं द्यावें; तें कास, श्वास, अरुचि, ओकारी, सर्दी, वायु व कफज्वर यांचा नाश करितें. ( ६ ) नागरगोथे, धमासा व सुंठ यांचा काढा द्यावा. ( ७ ) अडूळसा, गुळवेल, रिंगणी यांचा काढा मधाशीं द्यावा. ( ८ ) भारंगमूळ, पोखरमूळ, देवदार, पिंपळी, गुळवेल, अडूळशाचीं पानें, नागरमोथे व सुंठ यांचा काढा दिला असतां कफज्वर, खोकला, श्वास, बरगड्यांची पीडा, अग्निमांद्य व अरुचि, इतक्यांचा समूळ नाश करितो. ( ९ ) रिंगणमूळ, गुळवेल, पिंपळी व सुंठ यांचा काढा द्यावा; ह्मणजे कफज्वर, श्वास, खोकला, शूळ, अग्निमांद्य व पोटातील वायु यांचा नाश करितो. ( १० ) कायफळ, पिंपळी, काकडशिंगी आणि पोखरमूळ यांचें चूर्ण मधाशी चाटावें; म्हणजे श्वास, खोकला, ज्वर आणि कफ, यांचा नाश होतो.

**कफज्वरीं पथ्य**—जुन्या साळीचा वेळलेला भात, गव्हाचा सांजा, जुन्या गव्हाची कण्हेरी, खडीसाखर किंवा सैंधव घालून आमसुलाचें सार, गूळमिश्रित तुरीचें वरण. उन पाणी, मेथी. कुळीथ, भाजक्या तांदुळाचा भात, मुगाचें कढण, करटोली, कारलें, कोबी, खिरण्या, तांदुळजा, जुने गहूं, करडईची भाजी, लोंहकरीचीं वस्त्रें इ० पथ्यास द्यावें.

**कफज्वरीं अपथ्य**—थंड पाणी, थंड पदार्थ, सुताचीं वस्त्रें, दूध, तूप, तांदुळाचे पिठाचे पदार्थ, मधुर पदार्थ इत्यादि वर्ज करावे.

**वातपित्तज्वरलक्षण** ( मा. नि. )—तहान, मूर्छा, भ्रम, दाह, निद्रानाश, मस्तकशूळ, गळा, तोंड यांचा शोष, मळमळ, रोमांच, अरुचि अकस्मात् अंधारांत पडल्यासारखें भासणें, सांध्याचेठायीं वेदना व जांभया ही लक्षणें होतात.

**वातपित्तज्वरलक्षण** ( वाग्भट )—मूर्छा, ओकारी, दाह, मोह, घशास व तोंडास कोरड, चैन न पडणें, सांधे फुटणें, झोंप न येणें, तहान, भ्रम, रोमांच उभे राहणें, जांभया व बडबड, ही लक्षणें होतात.

**वातपित्तज्वरलक्षण** ( अन्यमत )—मूत्राचा रंग काळसर किंवा धूरकट असणें, डोळ्यांची आग होणें, जीव गुदमरणें, श्वास असणें, गळ्यात आणि छातीत जळजळत असणें, मस्तक जड होऊन दुखणें, कंठ व मुख हीं शुष्क होणें, डोळ्यांपुढें अंधेरी, जिव्हा शुष्क, बडबड, तोंड कडू, कंडू, घाम, कडू, आंबट असें चमत्कारिक तोंड होणें हीं लक्षणें होतात.

**वातपित्तज्वरावर उपायं**[1]—याजवर आठवे दिवशीं औषध द्यावें. ( १ ) नागरमोथे, धणे, किराईत, गुळवेल, कडू निंब, कुटकी व कडू पडवळ यांचा काढा द्यावा. ( २ ) रिंगणी, भारंगमूळ, आडूळसा, रास्ना, धमासा, मोचरस, बहाव्याचा मगज व त्रिफळा यांचा काढा द्यावा. ( ३ ) रिंगणमूळ, गुळवेल, रास्ना, त्रायमाण,

---

१ ॥ वातपित्तज्वरे देयमौषधं अष्टमेहनि ॥

हरीतकी व मसुराची दाळ यांचा काढा द्यावा. (४) मनुका, किराईत, गुळवेल, आडूळसा व कचोरा यांचा काढा द्यावा. ( ५ ) साळीच्या लाह्या, सुंठ, खारीक, खडीसाखर, यांचा काढा द्यावा. ( ६ ) बाजरीचें लाहीपीठ २ तोळे घेऊन त्यांत जुना गूळ अर्धा तोळा घालून दोन शेर पाण्यांत कालवून आछेर उरवावा व निजते वेळीं पिववेल तितका प्यावा. यानें घाम सुटून वात पित्तज्वर शांत होतो. (७) भाताची पेज साखर व मध घालून द्यावी.

**वातपित्तज्वरीं पथ्य**—जुन्या तांदळाची कण्हेरी, जुन्या गव्हाची कण्हेरी, खडीसाखर किंवा सैंधव घालून द्यावी. तापवून निवालेलें पाणी, तांदुळजा, पडवळ, करटोलीं, मुगाचें व तुरीचें वरण, जुन्या साळीचा भात, जुन्या गव्हाची पोळी, आमसुलाचें सार, आमसुल किंवा आंवळकठीची चटणी, आलेंमिश्रित गिलकी, हीं पथ्यास योजावी.

**वातकफज्वरलक्षण** (मा.नि.)-अंग ओल्या वस्त्रानें गुंडाळल्यासारखें भासणें, सांध्यांना फूट, निद्रा फार येणें, अंग जड, मस्तकावर भार, पडसें, श्वास, खोकला, किंचित् घाम येणें, शरीराचा दाह व ज्वराचा वेग मध्यम, हीं वातकफज्वराचीं लक्षणें जाणावीं.

**वातकफज्वर लक्षण** ( वाग्भट )—थंडी वाजणें, तृप्तता कमी होणें, अरुचि, सांधे व डोकें दुखणें, पडसें, श्वास, खोकला, मलमूत्रांचा अवरोध, जडत्व, डोळ्यापुढें अंधेर. भ्रम व झांपड हीं लक्षणें होतात.

**वातकफज्वर लक्षण** ( अन्यमत )—मूत्र गढुळलेलें, अंग कंपायमान होऊन कांटा येणें, निद्रा चांगली न येणें, अंगाच्या सर्व संधी दुखणें, जांभया येऊन डोळ्यातून पाणी वाहणें, नाकांतून पाणी किंवा शेंबूड वाहणें, भोजनसमयीं वांति येणें, तोंड बुळबुळीत असून खारट झाल्यासारखें वाटणें, अतिदाह, निद्रानाश, श्वास कोंडणें, जिभेला खरें येणें हीं लक्षणें जाणावीं.

**वातकफज्वरावर उपाय**[1]—याजवर नववे दिवशीं औषध द्यावें. ( १ ) कडू निंब, गुळवेल, सुंठ, देवदार, कायफळ, कुटकी व वेखंड यांचा काढा संधीपीडा, मस्तकशूल, कास, अरुचि, व वातकफज्वर यांचा नाश करितो, ( २ ) रिंगणमूळ, ओंवा व गुळवेल यांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा; ह्मणजे कफवातज्वर, श्वास, शूल, पडसें व खोकला यांचा नाश करितो. ( ३ ) पिंपळीचा काढा अग्निदीपक असून वातकफज्वर, प्लीहा व कफ यांचा नाश करितो. ( ४ ) घाम फार आल्यास कुळीथ भाजून त्याचें पीठ अंगास चोळीत जावें. ( ५ ) रिंगणमूळ, गुळवेल, सुंठ व पुष्करमूळ यांचा काढा कफवातज्वर श्वास, कास, अरुचि, पार्श्वशूल आणि त्रिदोषजनितज्वर यांचा नाश करितो. ( ६ ) किराईत, ओंवा,

---

१ ॥ वातश्लेष्मज्वरे देयमौषधनवमेहनि ॥

कुटकी, वेखंड व कायफळ, यांचें चूर्ण अंगास लाविलें असतां सतत येणारा घाम दूर होतो. ( ७ ) सुंठ, नागरमोथे, गुळवेल आणि किराइत यांचा काढा द्यावा. (८) आघाड्याची राख मधांत चाटण्यास द्यावी; ह्मणजे छातीतील व घशांतील कफ वितळून जातो. ( ९ ) नागरमोथे, पित्तपापडा, सुंठ, गुळवेल व धमासा इतक्यांचा काढा कफ, वायु, अरुचि, ओकारी, दाह आणि शोष यांचा नाशक आहे. (१०) रिंगणी, सुंठ गुळवेल व एरंडमूळ यांचा काढा द्यावा; म्हणजे वातकफज्वर, त्रिदोषज्वर, कास, श्वास, पाठीचा शूळ हे दूर होतात.

**कफवातज्वरीं पथ्य**—जुन्या तांदुळाची कण्हेरी, व जुन्या गव्हाची कण्हेरी सैंधव घालून द्यावी, जुन्या साळीचा भात, तुरीचें वरण, कुळीथ, उन पाणी, मेथी, तांदुळजा, पडवळ, व करटोली, यांच्या भाज्या, पुदिन्याची चटणी, जुन्या गव्हाची पोळी, लोंहकरीची वखें, आमसुलाचें सार, हीं पथ्यास द्यावी.

**कफपित्तज्वरलक्षण** ( मा. नि. )—तोंड कडवट असून चिकट, झांपड, मोह, खोकला, अरुचि, तहान, वारवार दाह होणें, वारंवार थंडी वाजणें, हें कफपित्तज्वराचें लक्षण जाणावें.

**कफपित्तज्वरलक्षण** (वाग्भट)—थंडी वाजणें, ज्वर येणें, केंव्हा घाम येतो व केंव्हां येत नाहीं, तहान, खोकला, खाकऱ्यांत कफ व पित्त पडणें, मोह, झांपड व तोंड तिखट व कडू होणें, हीं लक्षणें होतात.

**कफपित्तज्वरलक्षण** ( अन्यमत )---मूत्राचा रंग केंव्हां तांबूस, केंव्हां पांढरा, निद्रा न येणें, कंठावरोध, वांति, श्रम, तळपायाची आग होणें, आणि डोळ्यांपुढें काळे, तांबडे, काजवे चमकल्यासारखें वाटणें, कांहीं वेळ खेद, कांहीं कांहीं वेळ हर्ष, रोमांच उभे राहतात, अग्निमांद्य, गळा धरणें, मुखाला दुर्गंध, हीं लक्षणें होतात.

**कफपित्तज्वरावर पाचन**—नागरमोथे व पित्तपापडा यांचा काढा ज्वराचे चवथे किंवा पांचवे दिवशीं पाचनार्थ द्यावा.

**कफपित्तज्वरावर उपाय**—याजवर दहावे दिवशीं औषध द्यावें. ( १ ) कारलीचा रस जिऱ्याचें चूर्ण घालून द्यावा. ( २ ) कुटकीचें चूर्ण चार मासे समभाग साखर घालून उष्ण पाण्याबरोबर द्यावें. ( ३ ) किराईत, नागरमोथे, गुळवेल, व धमासा यांचा काढा द्यावा. ( ४ ) रिंगणमूळ, गुळवेल, सुंठ, पुष्करमूळ व काडेचिराईत यांचा काढा सर्व ज्वरांस तात्काळ दूर करितो. ( ५ ) गुळवेल, कडू निंब, कुटकी, नागरमोथे, इंद्रजव, सुंठ, कडू पडवळ व चंदन याचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा, तो पित्तकफज्वर, वांति, अरुचि, उरात दाटणें, दाह व तृषा यांचा नाशक आहे. ( ६ ) पानांफुलांसहित आडूळशाचा रस काढून त्यात साखर व मध घालून द्यावा; त्यानें कफपित्तज्वर, रक्तपित्त व कांवीळ हे दूर हो-

तात. ( ७ ) आडूळसा, सुंठ, खारीक व बडीशेप, यांचा काढा दिल्यानें कफपित्तज्वर त्वरित शमन होतो. ( ८ ) रिंगणमूळ, गुळवेल, भारंगमूळ, सुंठ, इंद्रजव, धमासा, किराईत, चंदन, नागरमोथे, कडू पडवळ व कुटकी यांचा काढा कफपित्तज्वर, दाह, तृषा, अरुचि, उचकी, खोकला, हृदय व कुक्षिशूल यांचा नाश करितो. ( ९ ) धणे व पित्तपापडा यांचा यूप द्यावा. ( १० ) साळींचे लाह्याचा किंवा तांदूळ भाजून त्यांचा मंड[1] दिला असता कफपित्तज्वर व तहान हे दूर होतात. ( ११ ) यव चांगले कांडून कोंडा काढून त्यांत चौदापट पाणी घालून शिजवून नंतर तें पाणी गाळून घ्यावें; हें पाणी प्यालें असतां कफपित्त दूर होऊन कंठास हित होतें, व रक्तपित्ताचा नाश होतो.

**कफपित्तज्वरीं पथ्य**—जुन्या तांदुळाची कण्हेरी, जुन्या गव्हाची कण्हेरी, खडीसाखर किंवा सैंधव घालून द्यावी, तुरीचें वरण, मुगाचें वरण, जुन्या गव्हाची पोळी, आमसुलाचें सार, तापवून निवालेलें पाणी, तांदुळजा, करटोली, व पडवळ यांची भाजी हे पदार्थ पथ्यास द्यावे.

**सन्निपातज्वराचें कारण**—आंबट, स्निग्धोष्ण, तीव्र, उष्ण, मधुर, मद्य, उन किंवा शेक घेणें, तुरट पदार्थ, काम, क्रोध, अति रुक्ष, फार जड, आकंठभोजन, मांसभक्षण, शीत पदार्थ सेवन, शोक, श्रम, चिंता, पिशाचबाधा, व फार स्त्रीसंग, इत्यादि कारणांनी आणि चैत्र, वैशाख, आश्विन. कार्तिक, श्रावण, भाद्रपद या महिन्यांत मनुष्यांना प्रायः सन्निपाताचा प्रकोप होतो.

**सन्निपातकर्मविपाक**—विश्वासघात करणें, वाईट शब्द बोलणें, दुसऱ्याचा जीव घेणें, अपराधाशिवाय बंदित ठेवणें, द्वेष करणें, निरर्थक रागें भरणे, गोरसविक्रय करणें, शास्त्र, वेद, द्विज यांजवर दोषारोप करणे, होमकुंडें, याग, जलाशय, विवाह, विहिरी व अरण्य यांचा नाश करणें, इत्यादि कारणांनी तेरा प्रकारचे सन्निपात होतात. त्यांचा परिहार-सुवर्णाची तुळा करावी, अश्वदान करावें, विहिरी, बारवा, तलाव, देवळें इत्यादी बांधावी. चिंच, कवठ, वेल व आंबे इत्यादिकांची झाडें मार्गावर लावावी. हा सन्निपात नव्हे तर केवळ मृत्यूच होय. सन्निपाताला जो वैद्य जिंकितो तो मृत्युंजयच ह्मणून सन्निपातसमुद्रात बुडालेल्यास जो वैद्य बाहेर काढतो, त्याचें प्रत्युपकारी सर्वस्व दान केलें तरी पुरेसें होत नाही. सन्निपातज्वर ह्मणजे त्रिदोषज्वर वातादि त्रिदोष कांहीं निमित्तानें प्रकोप झाले असतां त्यांपासून तो ज्वर येतो तो.

**सन्निपातज्वराचें लक्षण** ( मा. नि. )—क्षणांत दाह, क्षणात शीत, हाडें, संधी, मस्तक यांचेठायी शूळ, डोळ्यांला पाणी येणें व तें गढूळ डोळे लाल वटारलेले

---

१—मंड ह्मणजे तांदुळाचे लाह्याचे चौदापट पाणी घालून शिजवून शितें न येता पेज काढावी त्या पेजेला मंड ह्मणतात.

असतात व कानांत शब्द होतो व शूळ होतो. गळ्यांत भाताचें कूंस लागल्यासारखें दुखतें, झांपड, मोह, बडबड, खोकला, श्वास, अरुचि, भ्रम व जिभेच्या कडा जळाल्यासारख्या व ती सागाचे पानासारखी खरखरीत,अत्यंत अंग गळणें, रक्तपित्तानें मिश्रित असा कफाचा बेडका येणें व मस्तक डोलतें, तहान फार लागते, झोंप न येणें, उरांत दुखणें, घाम, मूत्र व मळ हे फार वेळानें थोडे थोडे होतात. गात्रें अत्यंत कृश होत नाहींत, निरंतर गळा घुरघुर वाजतो. मधमाशी चावल्यासारख्या अंगावर गांधी येतात. काळसर व तांबूस वर्ण चकंदळें उठतात, वाचा बसते, कान, नाक, तोंड याचे ठिकाणीं फोड येतात. व पोट जड होतें आणि वातपित्तकफ यांचा पाक कालेंकरून होतो, ही लक्षणें जाणावी.

**सन्निपातज्वरलक्षण** ( वाग्भट )—त्रिदोषात्मक ज्वरांत वारंवार थंडी लागणें, वारंवार दाह होणें, दिवसां अतिझोंप, रात्रीं जागरण, नेहमी झोंप येणें किंवा मुळीच न येणें, गाणें, नाचणें व हांसणें इत्यादि वेड्यावांकड्या चेष्टा करणें, डोळे पाण्यानी भरून येणें, गढूळ, लाल व वांकडे होणें, व त्यांच्या पापण्यांचे केंस लुले होणें, पोटऱ्या, कुशी, डोकें, सांधे व हाडें यात वेदना होणें, भ्रम, कानांत शब्द होणें व दुःख होणें, घशात भाताचीं कुसें आडकल्यासारखें होणें, जीभ करपल्यासारखी व खरखरीत व जड होणें, सांधे व अंग गळाल्यासारखें होणें, थुंकींत रक्त, पित्त व कफ पडणें, डोकें कापणें (हालणें), फार वेदना होणें, अंगावर गांधी, काळीं आणि लाल अशी चकंदळें पडणें, हृदयांत दुखणें, मळाचा अवरोध किंवा अतिसार किंवा थोडा थोडा मळ होणें, तोंड चिकट असणें, शक्ति कमी होणें, आवाज बसणें, बडबड, दोषांचा पाक उशिरां होणें, झांपड, व घसा अतिशय वाजणें, ही लक्षणें होतात, त्यास सन्निपात ह्मणतात.

**सन्निपातज्वरलक्षण** ( अन्यमत )—डोळे आंत ओढलेले असून स्रावयुक्त, शब्दोच्चार घशात असणें, अस्थि, मस्तक व अंग यांमध्यें वेदनादिक पीडा असणें, श्वासयुक्त खोकला, मस्तक फिरून भोंवळ येणें, छाती दुखणें, डोळे ताठलेले, शरीरास स्पर्श न समजणें, नाडीचा पाक ( पिचणें ) इत्यादि लक्षणें होतात.

**कर्णमूळाचेंलक्षण** ( मा. नि. )—सान्निपात ज्वराचे अंतीं कर्णमूळाचे ठायीं मोठी भयंकर सूज उत्पन्न होते. तीपासून क्वचित् एखादा बरा होतो. ती सूज ज्वराचे पूर्वीं आली असता असाध्य, ज्वराचे मध्यें आली असतां कष्टसाध्य, व ज्वराचे अंतीं आली असतां सुखसाध्य जाणावी.

**कर्णमूळावर उपाय**—( १ ) जळवा लावून रक्तमोक्ष करावा, तेणेंकरून ग्लानि येऊन आतुर झाला तर तूप पाजावें ( २ ) रास्ना, सुंठ, महाळुंगाचें मूळ, दारुहळद व टाकळी या औषधाचा लेप करावा. ( ३ ) वर पोटीस बांधून पिकवावें, आणि छिद्र पडल्यास जुन्या तुपाची अथवा मलमाची वात करून दररोज नवी त्यात घालीत जावी; ह्मणजे पुवाचा निचरा होऊन भरून येतें. नाहीतर आंतल्या आंत

पिकून खालीं छातींत उतरते किंवा नाकांतून वाहूं लागतें. ( ४ ) हिंग, हाळद, इंद्रवारुणी, सैंधव, देवदार व पिंपळी, यांचें चूर्ण रुईचे चिकांत खलून त्यांत तूप घालून कालवून लेप करावा; ह्मणजे कर्णमूळाचा नाश होतो. ( ५ ) कर्णमूळ फुटण्याकरितां उपदंश रोगांत बदावर जीं औषधें सांगितलीं आहेत तीं करावीं.

**साध्यासाध्यलक्षण** ( मा. नि. )—वात, पित्त आणि कफ याची वृद्धि झाली असतां, जठराग्नि नष्ट झाला असतां, व जी सन्निपाताचीं लक्षणें ती सर्व झालीं असतां सन्निपात ज्वर असाध्य जाणावा. कांहीं न्यून असतां साध्य जाणावा.

**सन्निपाताची कालमर्यादा** ( मा. नि. )—सन्निपात ज्वर जर ७ व्या, ९ व्या, ११ व्या, १४ व्या, १८ व्या, आणि २२ व्या दिवशीं जास्त होईल तर तो रोगी या मर्यादा दिवसांमध्यें मरेल आणि मर्यादा चुकली तर तो रोगी वांचेल.

**दोषजनित कालमर्यादा** ( मा. नि. )—७-९-व ११ या तीन मर्यादा वात, पित्त, कफ यांच्या पाक होण्याचा अनुक्रमें जाणाव्या. ह्मणून त्या त्या दिवशीं धातुपाक झाला तर रोगी मरतो. आणि त्याच प्रमाणें मलपाक झाला तर रोगी वांचतो.

**धातुपाकलक्षण** ( मा. नि. )—निद्रानाश, हृदय ताठल्यासारखें होणें, मलमूत्रांचा अवष्टंभ, शरीराला जडपणा, अन्नद्वेष, अस्वस्थपणा, आणि बलाचा नाश इत्यादि लक्षणें होतात.

**मलपाकलक्षण** ( मा. नि. )—दोषांचा स्वभाव पालटणें, ज्वर हलका होणें, शरीर हलकें, इंद्रियांस निर्मलता, इ० धातुपाक आणि मलपाक होणें, हें केवळ दैवावर अवलंबून आहे. याविषयीं दुसरा कांहीं हेतु दिसत नाहीं.

**सन्निपातज्वरावर शास्त्रार्थ** ( चरक )—त्रिदोषज्वरिताला साळीच्या लाह्यांचें पीठ सैंधव घालून द्यावें. तें जर निर्विघ्नपणें जिरलें तर तो रोगी निश्चयानें वांचेल. लाह्यांचें पीठ फार शीत आहे ह्मणून तें नुस्तें कधींही देऊं नये. सन्निपातज्वरितांनें पूर्वी चांगलें लंघन करावें आणि नुसत्या पाण्याचा काढा करून तो शीत झाल्यावर तहान लागल्यास तें पाणी देत जावें आणि वेळेवर औषध द्यावें. तापविल्यावांचून शीतोदक कधींही देऊं नये. संपूर्ण सन्निपातावर मध देऊं नये. मध भक्षण केला असतां त्यावर शीत उपाय केले पाहिजेत. आणि सन्निपातांत शीत उपाय विरुद्ध आहेत व सर्व उष्णाशी मधाशी विषासारखा विरोध आहे. ह्मणून जो मनुष्य मुळीच उष्णानें पीडित असून त्यावर उष्ण उपाय केले तर ते विषासारखे मारक होतात. सन्निपातज्वरावर पूर्वी आमकफनाशक औषध द्यावें. व कफ क्षीण झाल्यावर पित्तवात शमवावे कित्येक वैद्यांचें मत असें आहे की, सन्निपातज्वरांत प्रथमतः पित्त शमवावें, तेंच दुर्निवार आहे. लंघन सहन होणें, ही दोषाची शक्ति आहे. दोष मुक्त झाल्यावर रोग्यास लंघन सहन होत नाहीं. कफ व पित्त हे द्रवधातु

आहेत. ह्मणून रोग्यास आमक्षय झाल्यावरही मोठें लंघन सहन होतें. परंतु वायूला मोठें लंघन क्षणमात्रही सहन होत नाहीं.

**साधारण सन्निपातावर उपाय**—( १ ) रिंगणमूळ, डोरलीमूळ, सुंठ, धणे व देवदार यांचा काढा सर्व ज्वरांवर पाचक व ज्वरनाशक असा आहे. (२) कायफळ, त्रिफळा, देवदार, रक्तचंदन, फालसा, कुटकी, पद्मकाष्ठ आणि वाळा यांचा काढा त्रिदोप, दाह व तहान यांना शमवितो. आणि दीर्घकाल ज्वरितास केवळ अमृतोपम होतो. ( ३ ) कस्तूरी व मिरी, हीं घोड्याच्या लाळेंत उगाळून मध घालून डोळ्यांत अंजन करावें, तें तंद्रेला शीघ्र निवारण करितें. तसेंच त्रिकटूचें चूर्ण नाकांत फुंकिलें असतां तेंही तंद्रा नाशक आहे. ( ४ ) सन्निपातज्वरामध्यें क्षुधार्थ रोग्याला जो वैद्य मांस भक्षणार्थ देतो तो मोठा अधम आहे असें जाणावें. ( ५ ) सन्निपातज्वरावध्यें पूर्वीं कफाला जिंकावें, कफ कमी झाल्यावर व शरीराचे मार्ग मोकळे झाल्यावर शरीराला हलकेपणा येतो व तहान नाहींशी होते. ( ६ ) कायफळ, नागरमोथे, वेखंड, पाहाडमूळ, पुष्करमूळ, जिरें, पित्तपापडा, देवदार, हरीतकी, काकडशिंगी, पिंपळी, किराईत, सुंठ, भारंगमूळ, इंद्रजव, कुटकी, कचोरा, रोहिपतृण व धणे, ही औषधें समभाग घेऊन त्यांचा काढा करून त्यांत हिंग व आल्याचा रस घालून प्राशनार्थ द्यावा, ह्मणजे कर्णमूळ, मान व गळा यांसंबंधीं सूज, कफवातज्वर, कास, श्वास, उचकी, हनुग्रह, गलगंड, गंडमाळा, कफापासून झालेला स्वरभेद, मस्तकाची जडता, वहिरेपणा, कफ व मेद याची वृद्धि, दहा प्रकारचे ज्वर, सन्निपात, अभिन्यास आणि संज्ञानाश यांचा हा काढा नाश करितो. (७) भारंगमूळ, किराईत, कडू निंब, नागरमोथे, कुटकी, देवदार, वेखंड, सुंठ, मिरीं, पिपळी, अडूळसा, कडुवृंदावन, धमासा, कडू पडवळ, रास्ना, हळद, पाहाडमूळ, कुचला, ब्राह्मी, दारुहळद, गुळवेल, निशोत्तर, अतिविष, पुष्करमूळ, त्रायमाण, रिंगणीमूळ, डोरलीमूळ, इंद्रजव, हिरडा, बेहडा, आंवळकठी आणि कचोरा, या ३२ औपधाचा काढा घेतला असतां १३ प्रकारचे सन्निपात, शूळ, खोकला, उचकी, दमा, पोटफुगी, ऊरुस्तंभ, अंतर्विद्रधि, गलरोग, अरुचि व संधिग्रह यांचा नाश होतो यात संशय नाहीं. ( ८ ) किराईत, देवदार, दशमुळें, सुंठ, नागरमोथे, कुटकी, इंद्रजव, धणे व गजपिंपळी याचा काढा द्यावा. तो झांपड, बडबड, खोकला, अरुचि, दाह, मोह, दमा यांनीं युक्त सर्व ज्वरांचा नाश करितो हा अष्टादशांग काढा मृत्युतुल्य ज्वराचा नाश करितो यांत संशय नाही. ( ९ ) देवदार, सुंठ, किराईत, धणे, कुटकी, इंद्रजव, गजपिपळी, दशमुळें व नागरमोथे यांचा काढा द्यावा; तो अत्यंत कठिण मृत्यूसारखा ज्वर, सन्निपातज्वर, खोकला, हृदयशूल, पार्श्वपीडा, दमा, उचकी आणि वांति याचा नाश करितो; ( १० ) गुळवेल, दशमुळें, याचाही काढा १३ प्रकारचे सन्निपातांला शमवितो ( ११ ) त्रिकटू, दशमुळें, कचोरा, भारंगमूळ व गुळवेल याचा काढा उग्र सन्निपाताला शमवितो. ( १२ ) पिंपळमूळ, इंद्रजव, देवदार, गुळवेल, भारंगमूळ, माका, त्रिकटू, चित्रक, कायफळ,

पुष्करमूळ, रास्ना, हरीतकी, रिंगणी, डोरली, ओंवा, निर्गुडी, किराईत, वेखंड, चित्रक आणि पाहाडमूळ, यांचा काढा सर्व सन्निपात, बुद्धिभ्रंश, घाम, शैत्य, बडबड, पोटफुगी, विद्रधि, कफवात, वातरोग आणि बाळंतरोग याचा नाश करितो. (१३) दशमुळाच्या काढ्यात कायफळाचें चूर्ण काढ्यासमान आल्याचा रस घालून द्यावा; ह्मणजे तो मृत्यूसारख्या कठिण ज्वराचा नाश करितो. ( १४ ) मृतसंजीवनीरस द्यावा. ( १५ ) रास्ना, हिरडेदळ, डोरलीमूळ, रिंगणमूळ, निर्गुडी, पाहाडमूळ- वेखंड व चवक यांचा काढा करून मासाभर गुग्गुळ घालून द्यावा; ह्मणजे सन्निपात, घाम, शैत्य, बडबड, शूळ, दमा, कफ व बाळंतरोग यांचा नाश करितो. ( १६ ) रुईचें मूळ, धमासा, देवदार, किराईत, रास्ना, निर्गुडीचा पाला, वेखंड, टाकळा, शेवग्याची साल, पिपळी, पिंपळमूळ, चवक, मिरीं, सुंठ, अतिविष व माका, यांचा काढा सन्निपात, धनुर्वात, दांतखीळ, घाम, श्वास व बाळंतरोग यांचा नाश करितो. ( १७ ) रास्ना, हरीतकी, गुळवेल, कोरांटा, नागरमोथे, शतावरी, सुंठ, देवदार, कुटकी, कापुरकाचरी, अडूळसा, एरंडमूळ व दशमुळें, यांचा काढा करून दिला असतां संधिगत सन्निपात, मन्यास्तंभ, अंतर्विद्रधि, ज्वर, अरुचि व सांध्यांतील सर्व पीडा, यांचा नाश करितो. ( १८ ) जर कोणतेही उपायानें रोगी साध्य न होईल तर मनुष्याचे मूत्रांत लसूण आणि सुवर्ण घालून काढा करावा. आणि सन्निपातज्वरावर द्यावा. हें फार तीव्र औषध हटकून गुण देणारें आहे. किंवा मनुष्याच्या मूत्राऐवजीं गोमूत्र घेतलें असता चालेल.

**सन्निपातनिदानें** ( योगतरंगिणी )—सन्निपातामध्यें कफ, वात व पित्त या प्रत्येक दोषाच्या उल्बणापासून तीन, दोन दोषांच्या उल्बणापासून तीन, व तिन्हीही दोषांच्या उल्बणानें एक. एकूण सात आणि प्रवृद्ध व मध्य व हीन हे वात, पित्त आणि कफदोष यांच्या पर्यायानें सहा, असे सन्निपाताचे तेरा भेद आहेत.

**वातोल्बणसन्निपात** ( भालुकी )—वाताधिक्य आणि कफ व पित्तहीन अशा सन्निपातामध्यें हाडें आणि मस्तक यांमध्यें शूल, बडबड, अंगाला जडत्व, भ्रम, तहान व गळा आणि तोंड यांना शोष, हीं लक्षणें होतात.

**वातोल्बणसन्निपात** ( योगतरंगिणी )—तृषा ज्वर, ग्लानि, पार्श्वभागीं शूल, डोळ्यानें न दिसणें, पोटऱ्या व मांड्या दुखणें व गळाल्यासारख्या होणें, दाह, बलहानि, तोंड व मलमूत्र हें रक्तवर्ण, शूल, निद्रानाश, गुदाचा भेद, बस्ति आकुंचित होणें, हातपाय ताणणें, अंगभेद, विलाप, मूर्च्छा, ओरडणें, रडणें, हीं लक्षणें होतात.

**वातोल्बणसन्निपातावर उपाय**—( १ ) नागरमोथे व पंचमुळें यांचा काढा करून तो दोषांचें बल असता गरम व दोष अल्प असता सुखोष्ण द्यावा. (२) कायफळ, नागरमोथे, वेखंड, पाहाडमूळ, जिरें, पित्तपापडा, देवदार बाळहिरडे, काकडशिंगी, पिपळी, किराईत, सुंठ, भारंगमूळ, इंद्रजव, कुटकी, कचोरा, रोहिषतृण, व धणे, हीं औषधें समभाग घेऊन त्यांचा काढा करून त्यांत हिंग व आल्याचा रस

घालून प्राशनार्थ द्यावा; ह्मणजे कर्णमूळ, मान व गळा यासंबंधीं सूज, कफवातज्वर, श्वास, कास, अरुचि, उचकी, हनुग्रह, गलगंड, गंडमाला, कफापासून झालेला स्वरभेद, मस्तकाची जडता, बहिरेपणा, कफ व मेद यांची वृद्धि, दहा प्रकारचे ज्वर, सन्निपात, अभिन्यास, आणि संज्ञानाश यांचा हा कट्फलादि काढा नाश करितो. ( ३ ) भारंगमूळ, किराईत, कडू निंब, नागरमोथा, वेखंड, सुंठ, मिरी, पिपळी, आडूळसा, इंद्रवारुणीमूळ, रास्ना, धमासा, पटोल, देवदार. हाळद, पाडळीचें मूळ, टेटू, ब्राह्मी, दारुहळद, गुळवेल, निशोत्तर, अतिविष, पुष्करमूळ, त्रायमाण, पाहाडमूळ, रिंगणीमूळ, इंद्रजव, हिरडा, बेहडा, आंवळकठी, कचोरा व कुटकी, यांचा काढा द्यावा; ह्मणजे सर्व प्रकारचे सन्निपात व मन्यास्तंभ, गुदामय, व हिक्का, भ्रम, मूर्च्छा, शीत, श्वास, बलास, कास, वायु, हृद्रोग, मलावष्टंभ यांचा नाश करितो.

**पित्तोल्बणसन्निपात** ( भालुकी )--पित्ताधिक सन्निपात झाला असतां मळ व मूत्र यांना रक्तता, दाह, श्वास, घाम, तहान, बलक्षय, आणि मूर्च्छा हीं लक्षणें होतात.

**पित्तोल्बणसन्निपात** ( योगतरंगिणी )—दाह युक्त असतां आंत बाहेर सारखा ज्वर, त्यांत शीतोपचार केला असतां कफवायू यांचा कोप होऊन उचकी, श्वास, डोळ्यांवर झापड, हीं वाढतात. विषूचि, स्वरभेद, प्रलाप, जडपणा, भ्रम, नाभी आणि पार्श्व यांचे ठिकाणी पीडा या सर्व लक्षणेंकरून व्याकुळ झालेला जो सन्निपाति त्याची रसवाहिनी नाडी फुटून त्यांतून रक्तस्राव होतो. आणि शूलानें पीडित झाला असतां तृषा व श्वास हे विशेष होतात.

**पित्तोल्बणसन्निपातावर उपाय**--( १ ) कचोरा, पुष्करमूळ, रिंगणमूळ, काकडशिंगी, धमासा, इंद्रजव, कडू पडवळ, व कुटकी, यांचा काढा सन्निपातज्वर, दमा, खोकला, दिवा निद्रा, रात्री जागरण, तहान, दाह, आणि त्रिदोप याचा नाश करितो. ( २ ) चंदन, पद्मकाष्ठ, कुटकी व पिठवण हीं औषधें समभाग ठेंचून रात्री थंड पाण्यांत भिजत घालून ठेवावी आणि ते थड पाणी दुसरे दिवशी गाळून द्यावें; हें पित्ताधिक सन्निपाताचा नाश, करितें. ( ३ ) किराईत नागरमोथे, सुंठ पाहाडमूळ, वाळा आणि कमळाची बिसें, यांचा काढा करून शीत करून द्यावा.

**कफोल्बणसन्निपात** ( भालुकी )—कफाधिक सन्निपात झाला असता आळस, अरुचि, मळमळ, दाह, वाति, चैन न पडणें, भ्रम, झांपड आणि खोकला हीं लक्षणें होतात.

**कफोल्बणसन्निपात** ( योगतरंगिणी )—शीतज्वर, निद्रा, अंगाला जडपणा, आळस, डोळ्यांवर झांपड, ओकारी, मूर्च्छा, तृषा, तृप्ति, हृदयव्यथा, तोंडातून थुंका येणें, तोंड मधुर, कर्ण, शब्द, आणि दृष्टि, हीं ओढल्यासारखीं होणें, पोटांत अन्न गेलें न गेलें तरी त्रिरात्र वांचत नाही.

**कफोल्वण सन्निपातावर उपाय**—( १ ) रिंगणीमूळ, डोरलीमूळ, पुष्कर-मूळ, भारंगमूळ, कचोरा, काकडशिंगी, धमासा, इंद्रजव, कडू पडवळ व कुटकी यांचा काढा कफाधिक सन्निपात, दमा व सर्व उपद्रव यांवर हितकारक आहे. (२) पिंपळमूळ, देवदार, इंद्रजव, वावडिंग, ब्राह्मी, माका, चित्रक, त्रिकटू, कायफळ व कमळकंद यांचा काढा करून मासाभर गुग्गुळ घालून द्यावा. ( ३ ) रास्ना, हिरडे-दळ, डोरली, रिंगणीमूळ, निर्गुडी, पहाडमूळ, वेखंड व चवक यांचा काढा करून मासाभर गुग्गुळ घालून द्यावा ह्मणजे सन्निपात, घाम, शैत्य, वडवड, शूळ, दमा, कफ व वाळांतरोग यांचा नाश करितो.

**त्र्युल्वणसान्निपात** ( भालुकी )—हा संपूर्ण लक्षणांनीं युक्त असतो.

**त्र्युल्वणसान्निपात** ( योगतरंगिणी )—ज्वर, अंगमर्द, तालूचा शोष, इंद्रि-यांस असामर्थ्य, पोट फुगणें, डोळ्यांवर झांपड, अरुचि, श्वास कास, श्रम व भ्रम, हीं लक्षणें होतात.

**त्र्युल्वणसन्निपातावर उपाय**--(१) सुंठ, मिरीं, पिंपळी, नागरमोथे, हि-रडा, बेहेडा, आंवळकठी, कडूनिंब, कडू पडवळ, कुटकी, इंद्रजव, किराईत, गुळवे-ल आणि पहाडमूळ याचा काढा त्रिदोषज्वराचा नाश करितो. ( २ ) भारंगमूळ, कचोरा, पुष्करमूळ, इंद्रजव, धमासा, काकडशिंगी, कडू पडवळ, रान गांज्यामूळ, कुटकी, रानभालमूळ, रिंगणीमूळ, रानवांगीचें मूळ अथवा मोतरिंगणी, गोखरूमूळ, बेलाचें मूळ, टाकळीमूळ, टेटूचें मूळ, शिवणमूळ व पाहाडमूळ या औषधांचा काढा पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा.

**वातपित्तोल्वणसान्निपात** ( भालुकी )--भ्रम, दाह, तहान, अंगाला जडत्व व मस्तकशूळ ही लक्षणें होतात.

**अन्य ग्रंथाचें मत** ( योगतरंगिणी )—ज्वर, अंगमर्द, तालूचा शोष, इ-द्रियांस असामर्थ्य, पोट फुगणें, डोळ्यांवर झांपड, अरुचि, श्वास, कास, भ्रम हीं लक्षणें होतात.

**वातपित्तोल्वण सन्निपातावर उपाय**—( १ ) लघुपंचमूळाचा काढा मध घालून द्यावा.

**वातकफाधिक सन्निपात** (भालुकी)—यांत शैत्य, खोकला,अरुचि, झांपड, तहान, दाह व अगास ठणका, हीं लक्षणें होतात.

**वातकफाधिकसन्निपात** ( योगतरंगिणी )—शीतज्वर निद्रा, क्षुधा व तृषा यांचा नाश, पार्श्वपीडा, मस्तकाला जडत्व, आळस, मानेचा स्तंभ, इंद्रियांस असामर्थ्य, उदर धगधगीत, कंबर व बस्ति यांना पीडा, ही लक्षणें होतात, हा अ-तिदारुण आहे. **उपाय**--( १ ) किराईत, नागरमोथे, गुळवेल व सुंठ यांचा काढा द्यावा.

**पित्तकफादि सन्निपात** ( भालुकी )—वांति, शैत्य, वारंवार दाह, तहान मोह आणि हाडें दुखणें ही लक्षणें होतात.

**पित्तकफादिक सन्निपात** ( योगतरंगिणी )—अंतरदाह, बाहेर शीत, डोळ्यांपुढें अंधेरी, तृपा, उजवे वरगडीत पीडा, उर, मस्तक व गळा हे धरितात. पित्तमिश्रित कफाचा थुंका मोठ्या संकटानें येतो. इंद्रियांस असामर्थ्य, कंडू, मळाचा भेद होतो, श्वास व उचकी, हीं लक्षणें होतात. **उपाय**—( १ ) पित्तपापडा, कायफळ, कोष्ठ, वाळा, चंदन, काळा वाळा, सुंठ, नागरमोथे, काकडशिंगी, आणि पिपळी याचा काढा द्यावा; ह्मणजे तहान, दाह, अग्निमांद्य आणि पित्तकफाधिकसन्निपात यांचा नाश होतो.

**हीनवात मध्यें पित्त व कफाधिक सन्निपात** (भालुकी )—पडसें, वांति, आळस, झांपड, अरुचि आणि अग्निमांद्य, ही लक्षणें होतात.

**हीनवात मध्यें पित्त व कफाधिक सन्निपात** (योगतरंगिणी)—किंचित् अंग दुखणें, कटिव्यथा, मध्यम दाह, मस्तक, मान व तोंड आणि हृदय यांना पीडा, अल्पशूळ, भ्रम, फार ग्लानि, शब्द ओढणे, डोळ्यावर झापड, श्वास व उचकी, ही लक्षणें होतात. या ज्वरावर प्रारंभीच कदाचित् उपाय चालतो. हा सन्निपात उतरला असतां कानाचे मुळास सूज उत्पन्न होते. यांतून वाचणे कठिण. यांजवर उपाय करणें तर तीन दिवसांचे आंत करावा. नतर औषधे देणें व्यर्थ आहे.

**हीनवात मध्यें कफ व पित्ताधिक सन्निपात** (भालुकी)—नेत्र, मूत्र आणि त्वचा ही पिपळी होतात. दाह व तहान भ्रम आणि अरुचि हीं लक्षणें होतात.

**हीनवात मध्यें कफ व पित्ताधिकसन्निपात** (योगतरंगिणी)—हृदय पोळल्यासारखें, धगधगीत, यकृत, कवळू, फुफुस हें शिजल्यासारखें, ऊर्ध्व आणि अधोद्वारानें पूमिश्रित, रक्तश्राव होणें, दांत उकलणें, ही लक्षणें होतात. हा सन्निपात झाला असतां मृत्यु प्राप्त होतो.

**हीनपित्त मध्येंकफवाताधिक सन्निपात** ( भालुकी )—मस्तकशूळ, कंप, दमा, बडबड, वांति आणि अरुचि, ही लक्षणें होतात.

**हीनपित्त कफ व वाताधिक सन्निपात** (योगतरंगिणी)—बडबड, आयास, मोह, कंप, मूर्छा, अरति भ्रम आणि विशेषेंकरून मानेचा स्तंभ ही लक्षणें होतात. हा तात्कालिक मृत्युदायक आहे.

**हीनपित्तमध्येंवात व कफाधिक सन्निपात** (भालुकी)—यांत थंडी वाजते. अंगाला जडत्व येतें, झांपड, बडबड व हाडे आणि मस्तक यांत फार ठणका, हीं लक्षणें होतात.

**हीनपित्तमध्येंवात व कफाधिकसन्निपात** (योगतरंगिणी )—विशेषेंकरून

अंतर्दाह, वाणीचा स्तंभ, मुख आरक्त वर्ण दिसणें, कफ बाहेर काढण्याविषयीं यत्न केला असतां हृदयापासून न सुटणें, उरांत फाटल्याप्रमाणें व्यथा होणें, वरगड्यांत टोंचल्यासारखी वेदना आणि दिवसेंदिवस सामर्थ्य कमी होणें, जीभ काळी आणि खरखरीत, गळ्यांत भाताचें कुसूं टोंचल्यासारखी पीडा, श्वास व उचकी यांची वृद्धि, मळमूत्रांचा उत्सर्ग झाला असतां न समजणें, कपोत पक्ष्यासारखा शब्द करणें, शरीर भात्यासारखे कफानें पूर्ण होणें, मुख, ओंठ, व तालू ही शुष्क होणें, डोळ्यांवर झांपड, फार निद्रा घेणें, हात लुले पडणें, शरीर निस्तेज होणें, अति ग्लानि, भलतेंच मागणें, वारंवार हातपाय ताडणें, किंचित् रक्तमिश्रित थुंका येणें ही लक्षणें होतात. हा मोठा दारुण आहे.

**हीनकफमध्यवातवपित्ताधिकसन्निपात** ( भालुकी )—यांत सांध्यांत ठणका, अग्निमांद्य, तहान, दाह, अरुचि, आणि श्रम, ही लक्षणें होतात.

**हीनकफमध्यवात व पित्ताधिकसन्निपात** (योगतरंगिणी)—मोह, बडबड, मूर्च्छा, डोळ्यांस अंधेरी, कंप, मान, व मस्तक ताठणें; खोकला, श्वास, भ्रम, डोळ्यांवर झांपड, निचेष्टित पडणें, उरांत दुखणें. कान, डोळे नाक, तोंड, व त्वचा यांतून रक्त वाहणें, डोळे थिजणें, हीं लक्षणें होतात. हा सन्निपात झाला असतां तीन दिवसांत मनुष्य मरतो.

**हीनकफमध्यपित्त व वाताधिकसन्निपात** ( भालुकी )—यांत खोकला, दमा, श्वास, पडसें, मुखाला शोष, आणि पार्श्व भागी फार ठणका, हीं लक्षणें होतात.

**हीनकफमध्यपित्त व वाताधिकसन्निपात** (योगतरंगिणी)–बडबड, आयास, मोहो, कंप, मूर्च्छा, अप्रीति, भ्रम, व अर्धांग शून्य होणें हीं लक्षणें होतात हा अत्यंत दारुण आहे.

**समत्रिदोषसन्निपातलक्षण** ( भालुकी )—-वात, पित्त व कफ हे एकदाच समबलत्वेंकरून कुपित होऊन त्यांची पूर्वोक्त लक्षणें संपूर्ण होतात आणि सर्व इंद्रियाचे व्यापार राहतात. 'कांही खाववत नाही, अति श्वास, अंग ताठणें, डोळे थिजणें, हीं लक्षणें होतात. ही लक्षणें आली असतां रोगी तीन दिवसांत मरतो.

**या सहांची एकतंत्रानें चिकित्सा**—-जो दोष वाढला असेल त्याला कमी करावें आणि कमी असेल त्याला वाढवावें अशी कुशल वैद्यांनी क्षीण वृद्ध दोषांची चिकित्सा करावी. वाढलेल्या दोषाला शमविलें, म्हणजे मध्यम दोष आपले आपण शांत होतो. जसा सोवती शमविला; म्हणजे दुसरा दुर्बळ होत्साता आपणच शांत होतो. **उपाय**—( १ ) सुंठ, देवदार, कचोरा, पित्तपापडा, रिंगणी, कुटकी, किराईत, नागरमोथे, आणि धमासा, यांचा काढा पिंपळीचें चूर्ण व मध घालून द्यावा; म्हणजे विशेष सन्निपात. जीर्णज्वर,

व खोकला यांचा नाश होतो. ( २ ) रुईचीं मुळें, धमासा, किराईत, देवदार, रास्ना, निर्गुडी, वेखंड, ऐरण, शेवगा, पिपळी, पिपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, अतिविष आणि माका यांचा काढा तीव्र असे दोष, धनुर्वात, वायूनें दांतखीळ बसते ती, अंगांतील फार शीतता, श्वास, खोकला व बाळंतरोग यांचा नाश होतो. ( ३ ) रुईचें मूळ, पिपळमूळ, शेवग्याची साल, देवदार, चवक, निर्गुडी, पिंपळी, रास्ना, माका, पुनर्नवा, चित्रक, वेखंड, किराईत व सुंठ यांचा काढा सर्व त्रिदोषज्वर, प्रसूतिवायु, बाळंतरोग, नानाप्रकारचे शैत्य व अपस्मार यांचा नाशक आहे. ( ४ ) गंधक, पारा, टाकणखार, मिरीं व बचनाग, हीं औषधें धोत्र्याचे रसांत एक दिवस खलून गुंजप्रमाण गोळी आल्याचे रसांत द्यावी; ह्मणजे हा पंचवक्र रस घोरसन्निपाताचा नाश करील. ( ५ ) बचनाग, त्रिकटू, गंधक, टांकणखार, ताम्रभस्म, धोत्र्याचें बीज व हिंगूळ यांचा भागेच्या रसांत एक दिवस खल करून १॥ गुंजप्रमाण गोळी करावी; एक गोळी भक्षण करून मागून रुईच्या मुळाचा काढा द्यावा; ह्मणजे हा मृतसंजीवनीप्रमाणे सन्निपाताचा नाश करितो. ( ६ ) जेपाळ १० भाग, मिरें १ भाग, पिपळी १ भाग व पारा १ भाग, यांचा जांभूळ आणि निंबू याचे रसात ७ दिवस खलून गोळ्या बांधून ठेवाव्या आणि मध व आल्याचा रस व तुळशीचा रस अथवा उष्णोदकांत गोळी उगाळून अंजन करावें.

**तंद्रालक्षण**—सन्निपातज्वरात तंद्रा उत्पन्न होते तिला युक्तीनें जिंकावी. हा ज्वरांमध्यें कष्टसाध्य उपद्रव आहे. ज्या ज्वरामध्यें आमाशयांत आम आणि कफ यांच्या संचयानें दृढ सन्निपातज्वर होऊन शांत झाल्यावर त्या रोग्यास निश्चयेंकरून तंद्रा उत्पन्न होते. आणि पातळ रस, दूध व दिवसास निद्रा यांच्या सेवनानें दुर्बळ व अल्पायु अशा रोग्याचा कफ कोपतो आणि तो कफ वायूच्या मार्गाला रोधून धमनींत प्रवेश करितो. त्या रोग्याचे डोळे अर्धे मिटलेले किंवा वटारलेले असून तारका ( डोळ्यांतील बाहुली ) फिरतात आणि बुबुळ चंचळ असून डोळे गळलेले दिसतात. पापण्या अचंचळ असून तोंड उघडें व दांत बाहेर दिसतात; वारंवार उताणा निजतो, चिकट व तंतुयुक्त असा कफ टाळ्यातून बाहेर येतो व कंठमार्गाचा रोध होतो. याप्रमाणें लक्षणें होतात. तो त्रिरात्रीपूर्वी साध्य होतो. नंतर असाध्य आहे असा जाणावा.

**तंद्रेवर उपाय**—( १ ) लोहभस्म, पांढरा लोध, मिरीं व गोरोचन हीं औषधें पाण्यांत उगाळून दिवसांतून एक दोन वेळ अंजन करावें. ( २ ) सैंधव, मनशीळ व त्रिकटू हीं मधांत खलून अंजन करावें.

**सन्निपाताचीं नांवें व मर्यादा** ( मा. नि. )—संधिक ७, अंतक १०, रुग्दाह २०, चित्तविभ्रम २४, शीतांग १५, तंद्रिक २५, कंठकुब्ज १३, कर्णक ९०, भुग्ननेत्र ८, रक्तष्ठीवी १०, प्रलापक १४, जिव्हक १६ आणि अभिन्यास १६ दिवस. ही आयुष्याची परमावधि सांगितली आहे. परंतु कधीं कधीं रोगी तात्काळही मरतो.

**साध्यासाध्यविचार** ( मा. नि. )—संधिक, तंद्रिक, कर्णक, कंठकुब्ज, जिव्हक व चित्तविभ्रम, हे सहा साध्य व बाकीचे राहिलेले सात ते कष्टसाध्य व मारक आहेत असें जाणावें.

**संधिकसन्निपातल०** ( मा. नि. )—पूर्वरूपामध्यें शूल, शोप, वायूच्या फार वेदना, कफ, संताप, बलहानि व जागरण हीं लक्षणें होतात.

**संधिकसन्निपातल०** ( योगतरंगिणी )—सांध्यासाध्यांना सूज, शूळ, शरीराचे ठायीं वायूची पीडा, नंतर अंग पिळवटल्यासारखें दुखणें, निद्रानाश हीं लक्षणें होतात. हा त्रिदोषाच्या लक्षणांनी युक्त असतो.

**संधिकसन्निपातावर उपाय**--( १ ) पारा, गंधक, अभ्रकभस्म, त्रिक्षार, जिरें, त्रिकटू, त्रिफळा व मीठ, हीं समभाग चित्रकाच्या काढ्यांत मर्दन करून ४ गुंजप्रमाण गोळी मध व पिंपळी यात द्यावी; वर उष्णोदक प्यावें; ह्मणजे हा संधिकारी रस संधिकसन्निपात हरण करितो. (२) पंचमुळें पिपळी, सैंधव व सुंठ यांचें चूर्ण कुळिथाच्या काढ्यावरोबर द्यावें. तें वायुनाशक आहे.

**अंतकसन्निपातल०** (मा. नि.)—दाह करितो. संतापाला वाढवितो, मोह पावतो, मस्तक कांपवितो, उचकी उत्पन्न करितो व खोकला वाढवितो, हीं लक्षणें होतात. याची मर्यादा १० दिवस असून त्याला असाध्यात गणला आहे.

**अंतकसान्निपातल०** ( योगतरंगिणी )—निरंतर मस्तक कांपणें, अतिदाह, अप्रतिम बडबड, प्रीति नसणें, कफ, उचकी, श्वास, वेदना, अग्नीसारखी लाल कांति व एकसारखा ताप, हीं लक्षणे होतात.

**अंतकसन्निपातावर उपाय**—( १ ) हिरडा, आडूळसा, फालसा, देवदार, कुटकी, रास्ना, गुळवेल, कोष्ठ व कोळिजन, यांचा काढा अंतक सन्निपातापासून मुक्त करितो. ( २ ) मृत्युंजयाचा जप करावा. ( ३ ) मृतसंजीवनी रस द्यावा. ( ४ ) आनंदभैरवी रस द्यावा.

**रुग्दाहसन्निपात** ( मा. नि. )—बडबड, संताप, बळकट मोह, मंदत्व, आयासानें श्रम, भोवळ, कंठ, मान व हनवटी याचेठायीं वेदना, निरंतर तृषा लागणें, श्वास, कास, आणि उचकी या लक्षणानी व्याप्त, असा हा रुग्दाह कष्टसाध्य व मारकही आहे.

**रुग्दाहसन्निपात** ( योगतरंगिणी )--तृषायुक्त अतिशय ज्वर, अति संतापेंकरून शरीर ग्लानि, मस्तकास कंप तेणेंकरून कंठ, मान, हनवटी यांस व्यथा होणें, श्वास, मोह, बडबड, दाह, हीं लक्षणें होतात.

**रुग्दाहसन्निपातावर उपाय**—( १ ) नागरमोथे, रक्तचंदन, सुंठ, वाळा, काळा वाळा, व पित्तपापडा, यांचा काढा थंड झाल्यावर द्यावा. ( २ ) धणे व तां-

दूळ रात्रीं पाण्यांत भिजत घालून प्रातःकाळी त्याची पेज करून थंड करून द्यावी. ती अंतर्दाह, आणि पित्तज्वर यांना शमविते. ( ३ ) वाळा, रक्तचंदन, काळा वाळा, मनुका, आवळकठी व पित्तपापडा यांचा काढा शीत करून द्यावा; म्हणजे दाह, तृषा व ज्वर हे शांत होतात. ( ४ ) बोरीचा पाला, पांढरा चंदन व कडू निंबाचा पाला हीं औषधें एकत्र थंड पाण्यांत बारीक वांटून पायाच्या तळव्यास लेप केला असतां रुग्दाह शमतो. ( ५ ) दाह, व वांति, यांनी कृश, अन्न चालत नाही व अतिशय तहान लागते अशा रोग्याला लाह्यांचें पीठ, साखर व मध घालून पाण्यांत कालवून पाजावें. ( ६ ) रुग्दाहरोग्यानें सुस्वरूप, विलासी व चतुर अशा तरुण स्त्रीचें आलिंगन केलें असता रुग्दाह शमतो. ( ७ ) पारा १, गंधक १, ताम्रभस्म१, गाईचें दूध ३ भाग एकत्र करून खलात घालून मर्दन करावें. नंतर निर्गुडीच्या रसांत एक दिवस खल करून गोळा करून मुशीत घालून त्यावर मातकापड, करून वालुकायंत्रांत तीन प्रहर अग्नि द्यावा. आपोआप शीत झाल्यावर बाहेर काढून त्याच्या अष्टमांश वचनागाचें चूर्ण घालून एकत्र करून ठेवावें. ही मात्रा दोन गुंजा पंचकोलाचे काढ्यावरोबर द्यावी, पथ्य शेळीचें दूध व भात; म्हणजे हा त्रिनेत्ररस रुग्दाहसन्निपाताला शमवितो.

**चित्तविभ्रमसन्निपात** (मा. नि.)—जर कोणत्याही प्रकारानें शरीराला पीडा होत आहे व भ्रम, धोका खाल्ल्यासारखी अवस्था, संताप, मोह, विकलपणा, डोळे, व्याकुळ होणें, हंसणें, गाणें, नाचणें आणि वडवड ही लक्षणें होतात. हा कदाचित् असाध्यही होतो.

**चित्तविभ्रमसन्निपात** ( योगतरंगिणी )—फार हंसणें, विपरीत पाहणें, मोह ताप, भ्रम, फार नाचणें, फार वेळ गाणें, ही लक्षणें होतात.

**चित्तविभ्रमसन्निपातावर उपाय**—( १ ) आल्याचे रसात गूळ व सुंठ घालून नस्य द्यावें. ( २ ) हिरडा, पित्तपापडा, कुटकी, मनुका, देवदार, नागरमोथे, किराईत, बहाव्याच्या शेंगेंतला मगज, कडू पडवळ व आवळकठी यांचा काढा द्यावा. ( ३ ) ब्राह्मी, वेखंड, शतावरी, त्रिफळा, कुटकी, चिकणामूळ, बहाव्याच्या शेंगेंतला मगज, किराईत, कडू निंब, कडू पडवळ, मनुका आणि दशमुळें याचा काढा द्यावा. ( ४ ) सन्निपातगजांकुश द्यावा. ( ५ ) प्राणेश्वर रस द्यावा.

**शीतांगसन्निपात** ( मा. नि. )—शरीर अत्यंत गार, कंप, श्वास, उचकी, संपूर्ण अंग ढिलें होणें, शब्द आत ओढलेला, अंतरीं संताप, अनायासानें श्रम, मनाला संताप, खोकला, वांति व अतिसार, ही लक्षणें होतात. हा प्राणाचा त्वरित नाश करितो.

**शीतांगसन्निपात** (योगतरंगिणी)—अति शिथिल, ओकारी, ग्लानि, उचकी, खोकला, ज्वर, स्वरभंग, मोह, श्वास, कंप, बडबड, सर्वांगपीडा, फार कफ पडणें, ही लक्षणें होतात.

**शीतांगसन्निपातावर उपाय**—(१) रुईचें मूळ, जिरें, त्रिकटू, भारंगमूळ, रिंगणमूळ, काकडशिंगी व पुष्करमूळ यांचा काढा गोमूत्रांत सिद्ध करून प्यालें असतां तात्काळ शीतगात्र सन्निपात, मोह, श्वास आणि कफाची वृद्धि यांचा नाश होतो. ( २ ) महाळुंग, किराईत, पिपळमूळ, देवदार, अजमोदा, दशमुळें व सुंठ यांचा काढा द्यावा. ( ३ ) सरळ वृक्षाच्या फळाचें भस्म ८ भाग, भांग ४ भाग, मिरीं पारा व बचनाग हे तिन्ही मिळून ४ भाग, हे सर्व एकत्र खलून त्याचें चूर्ण करून द्यावें ह्मणजे असाध्य शीतगात्रालाही निश्चयानें घाम येतो. ( ४ ) अतिशीत घाम येऊं लागल्यास भाजलेल्या चण्याचें पीठ किंवा भाजलेल्या भागेचें चूर्ण अथवा कुळिथाचें पीठ सर्व अंगास मर्दन करावें ह्मणजे घामाचा नाश होतो. ( ५ ) आनंदभैरवीची मात्रा द्यावी.

**तंद्रिकसन्निपात** ( मा. नि. )—झापड फार येते, शूळ, ज्वर, कफ, तहान यांनीं रोगी फार पीडित होतो. जीभ काळी, कठिण, वर कांटे आलेली, अतिसार, श्वास, ग्लानि, तलखी, कर्णशूळ, घसा जड आणि रात्रंदिवस झोंप, ही लक्षणें होतात.

**तंद्रिकसन्निपात** ( योगतरंगिणी )—कठीण,बहुत कंटकें ह्मणजे कांट यांहीं करून युक्त जिव्हा, ग्लानि, मद, कर्णांस पीडा, अंगावर कोट ( धूम्र आरक्त वर्ण अशीं मंडलें येतात ) ती उत्पन्न होऊन लागलीच नाहींशीं होतात. खाज, तृषा, तीव्रताप, डोळ्यांवर झापड[१], श्वास, कास, ज्वर व अतिसार ही लक्षणें होतात.

**तंद्रिकसन्निपातावर उपाय**—[ १ ] सैंधव, अरति कापूर, मनशीळ व पिंपळी हीं घोड्याचे लाळेंत व मधांत उगाळून अंजन करावें. [ २ ] भारंगमूळ, गुळवेल, नागरमोथे, रिंगळमूळ, हरीतकी, पुष्करमूळ व सुंठ याचा काढा तीन दिवस द्यावा. [ ३ ] गुळवेल, त्रिकटू, कडू पडवळ व आडूळसा यांचा काढा द्यावा. [४] मिरीं, दारुहाळद, वेखंड, कोष्ठ, वावडिंग, सुंठ, हाळद व कौडळ ही औषधें शेळीच्या मुतांत खलून त्याचें नस्य द्यावें, ह्मणजे तें तंद्रिकाला निःसंशय दूर करील. [५] पारा १, गंधक १, बचनाग १, अभ्रकभस्म १, व लोहभस्म १ भाग ही सर्व औषधें आल्याच्या रसांत एकत्र घोटून नंतर त्रिकटूचे काढ्यांत व आल्याचे रसांत एकेक दिवस खल करावा. नंतर शहाजिरें, अजमोदा, ऐरण, ओंवा, ब्राह्मी, माका, भांग, कडूनिंब, गोकर्ण, सेवगा, कौडळ, श्वेतविष्णुक्रांत, आडूळसा व चित्रक यांचे रस किंवा काढे यांत पृथक् पृथक् एकेक भावना द्यावी. व बोराच्या आंठीप्रमाणें गोळ्या कराव्या आणि आल्याच्या रसांत मिरपूड घालून त्यांत एक गोळी द्यावी ह्मजजे तंद्रिकसन्निपात नाश पावतो. हिला ब्रह्मवटी ह्मणतात.

**कंठकुब्जसन्निपात** ( मा. नि. )—कपाळ व गळा दुखणें, बेसावध, कंप, ज्वर, रक्तसंबंधीं पीडा, हनुवटी जखडणें, संताप, बडबड आणि मूर्च्छा, हीं लक्षणें यांत होतात.

---

१—ज्वर उत्पन्न होतांच याची मुख्य खूण अशी आहे कीं, डोळ्यास तात्काळ अंधत्व येतें.

**कंठकुब्जसन्निपात** ( योगतरंगिणी )—हनुस्तंभ, दाह, अरुचि, श्वास,कंप, तापेंकरून व्यथा, कंठाचा अवरोध, बडबड व मस्तक दुखणें, हीं ल० होतात.

**कंठकुब्जसन्निपातावर उपाय**—( १ ) त्रिफळा, कुटकी, नागरमोथे त्रिकटू, कुड्याची साल, अडूळसा व हळद यांचा काढा द्यावा; हा फारच उत्तम आहे. ( २ ) काकडशिंगी, कुडा, हरीतकी, नागरमोथे, कचोरा, किराईत, भारंगमूळ, हळद, कुटकी, पुष्करमूळ, चित्रक, मिरीं, रिंगणी, आडूळसा, आंवळकठी, देवदार, बेहेडे, चवक, सुंठ, पिपळी व कायफळ यांचा काढा किंचित् उष्ण असा द्यावा.

**कर्णकसन्निपात** (मा. नि.)—बडबड, बहिरेपणा, गळा धरणें, अंगात तिडका, श्वास, लाळ गळणें, ज्वर संताप, कान व गाल यास पीडा, ही लक्षणें होतात.

**कर्णकसन्निपात** ( योगतरंगिणी )—बडबड, मोह, मद, गळा धरणें, कंप, बहिरेपणा आणि ज्वर उतरला असतां कानाचे मुळास शोथरूप आणि व्यथायुक्त असा ग्रंथि उत्पन्न होतो.

**कर्णकसन्निपातावर उपाय**—( १ ) रास्ना, रिंगणी, हरीतकी, त्रिकटू, कुटकी, नागरमोथे, पुष्करमूळ, काकडशिंगी, आवळकठी व भारंगमूळ यांचा काढा द्यावा. ( २ ) दशमुळें, मिरीं, सुंठ, पिंपळी, त्रिफळा, हाळद, कुटकी व काडे किराईत यांचा काढा सैंधव घालून द्यावा. ( ३ ) सन्निपातविध्वंसन रस द्यावा.

**भुग्ननेत्रसन्निपात** ( मा. नि. )—ज्वरानें बलक्षय, स्मृतिनाश, श्वास, वक्रदृष्टि, बेसावधपणा, बडबड, भ्रम, कंप आणि सूज हीं लक्षणें होतात. हा रोगी त्वरित मरण पावतो.

**भुग्ननेत्रसन्निपात** ( योगतरंगिणी )—श्वास, बडबड, मोह, निरंतर ज्वर. खोकला, डोळे ताठणें व थिजणें हीं लक्षणें होतात.

**भुग्ननेत्रसन्निपातावर उपाय**—( १ ) मिरी, आस्कंद, पिंपळी, सैंधव, लसूण, मोहाचा डिंक, वेखंड व आलें हीं बकरींच्या मुतांत खलून त्याचें नस्य द्यावें. ( २ ) किराईत, मध, वेखंड, पिंपळी, मिरीं, लसूण व मोहऱ्या यांचें एकत्र चाटण करून द्यावें. व मीठ आणि पिंपळी पाण्यांत उगाळून अंजन करावें. आणि वेखंड, मिरी, हिंग, जेष्टीमध आणि डाळिंब यांचें नस्य द्यावें. ( ३ ) पंचवक्ररस द्यावा. हा रस सन्निपातांत सांगितला आहे.

**रक्तष्ठीवीसन्निपात** ( मा. नि. )—रक्त ओकणें, किंवा रक्ताची गुळणी येणें ज्वर, वांति, तृषा, मूर्छा, शूळ, अतिसार, उचकी, पोट फुगणें, चक्राच्या भ्रमणासारखें भोंवणें, तलखी, श्वास, संज्ञानाश, जिव्हा काळी किंवा रक्तवर्ण होते व तिच्यावर मंडळें असतात, हीं लक्षणें होतात. हा सन्निपात प्राणाचा नाश करणारा असा प्रसिद्ध आहे.

**रक्तष्ठीवीसन्निपात** ( योगतरंगिणी )—तहान, लाळेचा स्राव, अरुचि, मनोविकृति, खोकला मद ह्मणजे झिंगल्यासारखें होणें, भ्रम, श्वास, पोटफुगी, अतिसार, ओकारी, उचकी, ज्वर गळा फुगून त्यात व्यथा फार होते. आणि तोंडांतून रक्त पडते, हीं लक्षणें होतात.

**रक्तष्ठीवीसन्निपातावर उपाय**—[ १ ] पंचवक्त्ररस द्यावा. [ २ ] आंठ्याच्या आठीचें किंवा कांद्याच्या रसाचें नस्य द्यावें. तें नासिकावाटें येणारे रक्ताला जिंकील. [ ३ ] दूर्वाच्या रसाचे किंवा डाळिंबाच्या फुलाचें किंवा त्रिफळा व दूर्वा याचे रसाचें नस्य द्यावें. तें रक्तष्ठीवीनाशक आहे. [ ४ ] पद्मकाष्ठ, पांढरा चंदन, पित्तपापडा, नागरमोथे, जाईचा पाला, त्रिफळा, रक्तचंदन, वाळा, जेष्टीमध व कडू निंब, यांचा काढा मुखावाटें जें रक्त पडतें त्याचा नाश करितो. [ ५ ] पित्तपापडा, धमासा, आडूळसा व सुगंधी रोहिष तृण यांचा काढा साखर घालून द्यावा. आणि कंकोळाचें चूर्ण करून त्याचें नस्य द्यावें ह्मणजे मुखांतून पडणारें रक्त बंद होतें. [ ६ ] पित्तपापडा, कुटकी, धमासा, आडूळसा, किराईत वाळा व कापूरकांचरी याचा काढा साखर घालून द्यावा.

**प्रलापकसन्निपात** [मा. नि ]—कंप, बडबड, संताप, कपाळ दुखणें, प्रौढ गोष्टी सागणें, स्वच्छपणाविषयी आसक्त, दुसऱ्याची काळजी करणारा, बुद्धिनाश झालेला, विकल आणि पुष्कळ बडबड करणारा असा हा सन्निपातरोगी यमसदनास जातो.

**प्रलापकसन्निपात** ( योगतरंगिणी )—बडबडणें, एकाएकी उठणें. निचेष्टित होणें, कांपणें, वारंवार पडणें, अतिज्वर, व दाह, इहींकरून व्याकुळ, ही लक्षणें होतात.

**प्रलापक सन्निपातावर उपाय**—( १ ) तगर, आस्कंद, कुंभा, शंखाहुली, देवदार, कुटकी, ब्राह्मी, जटामासी, नागरमोथे, बहावा, हिरडा, मनुका, दशमुळें, वाळा, सुंठ, चंदन, बहावा, आडूळसा, व पित्तपापडा, याचा काढा शीघ्र प्रलापाला शमवील. ( २ )तगर, त्रिफळा, कुटकी, बहाव्याचा मगज, नागरमोथा, किराईत, वाळा, आस्कंद, ब्राह्मी, द्राक्षें, रक्तचंदन, दशमुळें, व शंखपुष्पी, याचा काढा द्यावा. तो प्रलापक सन्निपाताचा नाश करील. ( ३ ) मृत्यूत्थापन रस द्यावा.

**जिव्हक सन्निपात** ( मा. नि. )—खोकला, दमा, संताप यांनी विव्हल, कठिण व काट्यांनी व्याप्त झालेली जिव्हा, बहिरेपणा, मुकेपणा, आणि बलाची हानि, ही लक्षणें होतात. हा कष्टसाध्य आहे.

**जिव्हकसन्निपात** ( योगतरंगिणी )—कठिण आणि कटकांनी व्याप्त अशी जिव्हा बहिरेपणा, मुकेपणा, ज्वर, दाह, खोकला, मोह व श्वास, ही लक्षणें होतात.

**जिव्हक सन्निपातावर उपाय**–(१)बचनाग, सुंठ, पिपळी, गजपिपळी, रुईचें

मूळ, व लाल एरंडाचें मूळ, हीं क्रमवृद्धीनें घेऊन आल्यच्या रसांत खलून गोळ्या कराव्या. हा त्रिपुरभैरव रस जिव्हकाचा नाश करितो. ( २ ) सुंठ, दारुहळद, हळद, त्रिफळा, गुळवेल, नागरमोथें, रिंगणमूळ, कडूनिंब, कडूपडवळ, पोखरमूळ, कोष्ठ व देवदार, आणि सुवर्ण यांचा काढा द्यावा.

**अभिन्यास सन्निपात** ( मा. नि. )—त्रिदोषांच्या कोपानें तोंडावर तुळतुळीतपणा, झोंप, विकलपणा, अंग गळणें, निचेष्ट पडणें मोठ्या प्रयासानें एकदां शब्द बोलणें, बलनाश, व श्वासादिकांचा अवरोध, हीं लक्षणें होतात. हा केवळ भयंकर मृत्युतुल्य आहे असें जाणावें.

**अभिन्यास सन्निपात** ( योगतरंगिणी )—ज्यांत सन्निपाताची सर्व लक्षणें होतात. आणि विशेषेंकरून दाह व मोह होतात.

**अभिन्यास सन्निपातावर उपाय**—[ १ ] त्रिकटू व सैंधव यांचें चूर्ण आल्याचे रसांत घालून तोंडात धरण्यास द्यावें; ह्मणजे रोगी सावध होतो. [२] हिंग व सुंठ हीं माका व लिंबू याचे रसात घालून चाटण करून द्यावे; ह्मणजे रोगी सावध होतो. किंवा तिखट व कडू अशा औषधाचें नस्य द्यावें; म्हणजे रोगी सावध होतो. [ ३ ] मिरी, सैंधव, पिपळी, निर्गुडी, मोहाचें फूल, व कायफळ या औषधांचें चूर्ण करून ऊन पाण्यात घालून त्याचे आठ किंवा चार बिंदू नाकात सोडावें. [ ४ ] रिंगणमूळ, डोरलीमूळ, गुळवेल, मनुका, जिरें, त्रिकटू, काकडशिंगी व वावडिंग याचा काढा करून त्या काढ्यांत तादूळ तुपांत भाजून त्याची पेज करावी आणि ती ऊन ऊन अशीच ज्वरीताला द्यावी ह्मणजे उचकी, श्वास, कास, अभिन्यास आणि वायु व मळमूत्र याचा अवरोध हीं दूर होतात. [५] रिंगणमूळ, धमासा, भारंगमूळ, कचोरा, काकडशिंगी व पुष्करमूळ यांचा काढा कफ, उदर दुखणें व अभिन्यास यांचा नाश करितो. [ ६ ] तिळवण, पुष्करमूळ, एरंडमूळ ,त्रायमाण, सुंठ, गुळवेल, दशमुळें, कचोरा, काकडाशिंगी, आडूळसा, भारंगमूळ व पुनर्नवा, यांचा गोमूत्रांत काढा करून द्यावा, तो नाडीचें शोधन करून अभिन्यास दूर करितो. [ ७ ] सन्निपातानें ज्याची संज्ञा जाते त्याचे दोन पाय व कपाळ यांला लोखंडाचे सळईनें डाग द्यावा. असा डाग दिल्यावर सावध न होईल तर त्याचा तळपाय, भ्रुकुटी, व ललाट यांचेठायी डाग द्यावा. [ ८ ] दशमुळें, धमासा, सुंठ, व एरंडमूळ यांचा काढा सुंठीची व मिऱ्याची पूड घालून द्यावा. [ ९ ] पारदभस्म, ताम्रभस्म, कांतभस्म, तिख्याचें भस्म, पितळेचें भस्म, लोहभस्म, हरताळभस्म, माक्षिकभस्म, यांचा एकत्र खल करून त्यांत त्रिकटू, बचनाग, टाकणखार, चित्रक, यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून घालावें.नंतर आडूळसा,निर्गुडी,बेलाचा पाला यांच्या रसाच्या भावना, पृथक् पृथक् एकेक दिवस देऊन शरावसंपुटांत घालून भूधर यंत्रांत चार प्रहर अग्नि द्यावा. स्वांगशीत झाल्यावर काढावें. नंतर दशमुळाचे काढ्यांत दोन किंवा चार गुंजांप्रमाणें द्यावें. ह्मणजे निश्चयानें अभिन्यास सन्निपाताचा नाश होतो.

**हारिद्रकसन्निपात** [ मा. नि. ]--देह, नखें, हात व पाय, ही हळदीप्रमाणें पिंवळीं होणें, ज्वर, थुंका पडणें व खोकला, हीं लक्षणें होतात. हा ज्वररूपी काळच होय. हा साध्य होत नाहीं. हा त्रयोदशसन्निपाताखेरीज आहे. हा विरळा पाहण्यांत येतो. याजवर औषधें कोठें पाहण्यात येत नाहीं.

**सन्निपाताचें असाध्यलक्षण** [ मा. नि. ]—मलादि व पित्तादिदोष बद्ध झाले असतां व अग्नि शांत झाला असता, वातादि सर्व दोषाची संपूर्ण लक्षणें होऊन सन्निपातज्वर असाध्य होतो. आणि यांच्या उलट दोषप्रवृत्ति असून अग्नि थोडासा दीप्त असून सर्वांची लक्षणें थोडी थोडी झाली, तर सन्निपातज्वर कष्टसाध्य होतो.

**सन्निपातज्वरीं पथ्य**—उन केलेलें कोंवट चतुर्थांश किंवा तापवून निवालेलें पाणी, जुन्या तांदुळाची किंवा जुन्या गव्हाची कण्हेरी, सैंधव किंवा पित्ताधिक्य असल्यास खडीसाखर घालून द्यावी, तुरी, मुग, किंवा कुळीथ याचे यूष, साळीचे लाह्यांचें पाणी, कन्हेरी करणें ती १६ पट पाणी घालून चवथा हिस्सा किंवा निमे उरवावी तीही पथ्यास द्यावी.

**सन्निपातावर अपथ्य**—थंड पाणी, मद्य, मास, वारा, पलंग, कापसाची गादी. इ० वर्ज करावें.

**आगंतुकज्वर**--हे ज्वर पंधरा प्रकारचे आहेत. ते येणेंप्रमाणें.

१ **अभिचारज्वर**--श्येनादियज्ञापासून अथवा विपरीत मंत्रेंकरून लोहाचे स्रुचीनें सर्षपादिकांचा होम केला असतां त्यापासून उत्पन्न होतो. **लक्षण**--तृषा, मोह, अंगावर फोड, भ्रम, मूर्छा, चित्ताचा संताप, शरीराचा दाह, उत्तरोत्तर ज्वराची वृद्धि, ही लक्षणें होतात. **उपाय**—[ १ ] होम, देवपूजा, देहावर मण्यादिकांचें धारण, तीर्थस्नान, व ज्यापासून पीडा असेल त्या ग्रहांचें पूजन करावें.

**अभिचारज्वरावर पथ्य**—देवतेच्या क्षोभापासून ज्वर येतो त्याजवर जप, होम, ग्रहशांति व पित्तज्वरावरील पथ्यापथ्यें करावी.

२ **शापज्वर**—ब्राह्मण, गुरु, वृद्ध, सिद्ध यांचे अनिष्ट वचनापासून होतो. **लक्षण**--तृषा, मोहादि लक्षणें, अभिचार ज्वरासारखीं जाणावी. **उपाय**—( १ ) जपहोमादिक करावी.

३ **भूतावेषज्वर**—पिशाच्यादिकांच्या संबंधेंकरून उत्पन्न होतो. **लक्षण**--चित्तास उद्विग्नपणा, हसणें, रडणें, कापणें, लज्जा, बुद्धि व निद्रा यांचा नाश हीं लक्षणें होतात. **उपाय**--[ १ ] पंचाक्षरी ह्मणजे भूतवैद्य, देवऋषी, आणून उपाय करावा. [ २ ] चिकण्याचें मूळ विधियुक्त गळ्यात बांधावें. [ २ ] सूर्यफुलवल्लीचें मूळ कानास बांधावें.

**भूतावेषज्वरावर पथ्य**--जुन्या साळीचा भात, जुन्या गव्हाची पोळी, तुरी-चें वरण थोडें तूप घालून किंवा मुगाचें वरण, तांदुळजा, पडवळ, करटोली, यांची भाजी, आमसुलाचें सार, ऊन किंवा तापवून निवालेलें पाणी, जुन्या तांदुळाची किंवा जुन्या गव्हाची कण्हेरी, सैंधव किंवा खडीसाखर घालून द्यावी ही पथ्य होय.

**४ कामज्वर** [मा. नि.]—इच्छिलेल्या स्त्रीची प्राप्ति न होतां तिचा समागम, गुण आणि रूप यांचें चिंतन केलें असता ज्वर होतो. **लक्षण**—चित्तास भ्रम, डोळ्यांवर झांपड, आळस, जेवणावर इच्छा नसणें, हृदयांत पीडा, गात्रें शुष्क होणें, कापूर, चंदन, चांदण्यात निद्रा, शिथिल याचें सेवन करावेंसें वाटणें, श्वासोच्छ्वास टाकणें, रडणें, बडबड करणें, मोहयुक्त असणे, अरुचि, दाह, निद्रा, लज्जा, बुद्धि, यांचा क्षय व विरह वेदना, ही लक्षणें होतात. उ०--[ १ ] सुस्वरूप, शृंगारिक, सुगंधचर्चित, रसिक, कामानें रसरसलेल्या, शृंगारिक भाषण करणाऱ्या अशा तरुण स्त्रियांचें आलिंगन, संभाषण, स्पर्शादि केलें असता कामज्वर शांत होतो. तसेंच निर्मळ स्थल, कमळें, सुगंधी फुलावरून आलेला वारा, जलक्रीडा, सुंदर बागांतून फिरणें, या उपचारानें कामज्वर जातो. [ २ ] चंदन, कापूर व वाळा यांची उटी अंगास लावावी. [ ३ ] वाळ्याचे पंख्यानें वारा घालावा. [ ४ ] मित्रावरोबर थट्टामस्करी करावी व गायन ऐकावें आणि बगीच्यांतून हिंडावें इ० शीत उपचार करावे. [ ५ ] सायंकाळी धने पाण्यात भिजत घालून दुसरे दिवशी हातानें कुसकरावे. आणि तें पाणी उगाळून त्यात खडीसाखर घालून द्यावें; ह्मणजे अंतर्दाह शांत होतो. [ ६ ] कामज्वरितास चिरकाळानें गुण येणारे असे नानावल्लींचे रस व कडू काढे देऊं नयेत. विरही पुरुषास हेंच औषध योग्य आहे कीं, सुंदर स्त्रियेचें अधरचुंबन हा काढा व आलिंगन करणें हें पथ्य.

**कामज्वरावर पथ्य**—इंद्रियजुलाब व रेच, अंगास चंदनादि शीतल द्रव्यांची उटी लावणें, वाळ्याचें थंडगार पाणी, थंड वारा, गायन, थंड बगीच्यांतून हवा खात फिरणें, चांदणें, थंड वाळवंट व पित्तज्वरावरील पथ्यापथ्यें वय अवस्था पाहून द्यावी.

**५ भीतिज्वर**--कांहींएक मोठ्या भयापासून उत्पन्न होतो. **लक्षणें**—बडबड, मस्तकास पीडा, कंप इत्यादि लक्षणें होतात. **उपाय**—( १ ) काम, शोक व भय हे ज्वर हर्षोत्पादक पदार्थानें किंवा गोष्टीनें अथवा इच्छित पदार्थाच्या लाभानें अथवा पित्तशामक उपचारानें शात होतो.

**६ शोकज्वर**--हा शोकापासून उत्पन्न होतो. **लक्षणें व उ०**—भीतिज्वराप्रमाणें जाणावी. ज्या कारणानें शोक नष्ट होईल ते करावे.

**भीति व शोकज्वरावर पथ्य**—वातज्वरावरील पथ्यापथ्यें करावी व इच्छित मनोरथ पूर्ण करून मनांतील भीति हरउपायानें काढून टाकावी.

७ **क्रोधज्वर**—हा क्रोधापासून उत्पन्न होतो. **लक्षणें**—कंप, डोकें दुखणें, दाह व वडवड ही लक्षणें होतात. उ०—( १ ) पित्तनाशक उपाय, सुंदर स्त्रियांचीं भाषणें, चांगल्या गोष्टी, आश्वासन, इष्ट पदार्थांचा लाभ आणि वायूचा नाश करणें इ० उपाय करावे.

**क्रोध० पथ्य**—याजवर पथ्यापथ्यें कामज्वरावरील करावी.

८ **विषज्वर** [ मा. नि ]—वचनागादिकाचे सेवनानें आणि सर्पादि विषाचे भक्षणानें उत्पन्न होतो. **लक्षणें**—दाह, अतिसार, काळसरवर्ण असें मुख, अन्नावर अरुचि, तृषा, अव्यवस्था व मूर्च्छा, ही लक्षणें होतात. उ०—( १ ) विषावरचे व पित्तशामक उपाय करावे.

**विषज्वरावर पथ्य**—पथ्यापथ्यें पित्तज्वरावरील करावी. व मुख्यत्वेंकरून जुलाब द्यावा.

९ **तीव्रौषधिगंधजन्यज्वर** [ मा. नि. ]—एखाद्या उग्र औषधाच्या वासाच्या योगानें होतो तो. **लक्षणें**—मूर्च्छा, कपाळ दुखणें, वांति किंवा मळमळ, आणि शिंका व कंप ही लक्षणें होतात. उ०—[१] पित्तशामक उपाय करावे.

**औषधीगंधजन्यज्वरावर पथ्य**—पथ्यापथ्यें पित्तज्वरावरील करावी.

१० **श्रमजन्यज्वर**—अति व्यायामापासून व श्रवणापासून उत्पन्न होतो तो. **लक्षणें**—अंग ठेंचल्यासारखें दुखणें, डोळ्यांवर झापड, संधि दुखणें इत्यादि लक्षणें होतात. उ०—[१] गाईचें तूप पाजावें, मांसरसोदन, क्षीरोदन, मद्य इ० पदार्थांनी शमवावा. चांगलें अभ्यंग करून दिवसां निद्रा करावी.

**श्रमजन्यज्वरावर पथ्य**—अभ्यंग, अंग रगडणें, गाईचें तूप पाजणें, मांसरस, मद्य, दूध, दिवसास निद्रा करावी, उत्तम इच्छाभोजन, जुन्या साळीचा भात, जुन्या गव्हाची पोळी, गाईचें तूप, दूध, साखर, तुरीचें व मुगाचें वरण, तूपमिश्रित भेंड्या, तांदुळजा, पडवळ, चाकवत, हरभरा, करटोली याची भाजी, मधुर ताक, अदमुरें, ताजें थंड पाणी ही पथ्यें होत.

११ **दाहजन्यज्वर**—अग्न्यादिकांचे दाहापासून उत्पन्न होतो. **लक्षणें**—तृषा, अंगावर फोड येणें, भ्रम, मूर्च्छा, चित्तास संताप, शरीराचा मोठा दाह, उत्तरोत्तर ज्वराची वृद्धि, इ० लक्षण होतात. उ०—[ १ ] उष्ण उपचार खेरीज करून मधुर व स्निग्ध उपाय करावे. व पथ्यें पित्तज्वरावरील करावीं.

१२ **क्षतजन्यज्वर**—काहींएक कारणानें अंगास क्षतें पडून त्याचे योगानें उत्पन्न होतो तो. **लक्षणें**—अंग ठणकणें, अरुचि, निद्रा न येणें, शोष इ० लक्षणें होतात. उ०—[ १ ] स्निग्ध, तुरट व मधुर उपचार करावे.

**क्षतजन्यज्वरावर पथ्य**—क्षतापासून ज्वर आल्यास पथ्यापथ्यें व्रण रोगावरचीं करावीं.

१३ **छेदजन्यज्वर**—(अभिघातज्वर) शस्त्रादिकांचे छेदनानें अथवा दंडादिकांचे ताडणापासून उत्पन्न होतो. **लक्षणें**—क्षतजन्यासारखी होतात. उपाय—क्षतजन्याप्रमाणे करावे.

**अभिघात ज्वरावर पथ्य**—गाईचे तुपाचें पान, अभ्यंग, मद्यपान, मासरस, जुन्या साळीचा भात, जुन्या गव्हाची पोळी, मुगाचें किंवा तुरीचें वरण, तांदुळजा, चाकवत, पडवळ, व करटोली, यांच्या भाज्या, हरबरे, मूग, अमसुलाचें सार, गाईचें दूध, साखर, ताजें थंड पाणी, व जो अभिघात झाला असेल त्याजवरीलही उपचार करावे.

१४ **स्वेदज्वर**—पर्वताच्या शिखरावर धावत चढणें, फार चालणें, अति मोहयुक्त होणें, फार भार घेणें, बहुत दिवस बंदींत राहणें, बळवंताशी युद्ध करणें, साहस कर्म करणें, घोड्यावर बसून धावणें, रात्रंदिवस प्रौढ स्त्रीचे सेवन करणें, इत्यादि कारणानें स्वेदज्वर उत्पन्न होतो. **लक्षणें**—अंग बाधल्यासारखें होणें, अति मोह, शोष, मूर्छा, श्वास, स्तब्धता, नेत्र मिटणें, कंप, पाय ताठणें, हळु बोलणें, डोळ्यांतून पाणी पडणें, इत्यादी लक्षणें होतात. **उपाय**—[ १ ] अंग मर्दन करावें. [ २ ] त्रिकटू, हिंग व किराईत यांचें चूर्ण द्यावें.

**स्वेदजन्यज्वरावर पथ्य**—पथ्यापथ्यें पित्तवज्रावरील करावी.

१५ **दृष्टिज्वर**—पिशाच्च, ब्रह्मराक्षस, हे ज्या वृक्षावर राहतात त्यांचे खाली व बहुत लोकादेखत भोजन करणें, नदी, तलाव इत्यादिकाचे तीरीं अडखळून पडणें इत्यादि कारणानीं उत्पन्न होतो. **लक्षणें**—बुद्धीला विपर्यास, अंगास शिथिलपणा, नाना प्रकारची औषधें केली असतां असाध्यता, अन्न पाहण्याविषयींही कंटाळा अशी अरुचि, मिथ्यावाद करणें, दुसऱ्यास मारण्याविषयी उद्युक्त होणें, ही लक्षणें होतात. **उपाय**—[१] पायस अन्न परडी भरून त्याजवर उडदाचे वडे, चण्याचे पिठाचा दिवा लावून रुधिर व सुरा वर घालून केळी व रक्तपुष्पें वर ठेवून रोग्याला दाखवून मागास द्यावं आणि ईश्वर पार्वतीच्या पूजा करून अगरूचा धूप व नानाप्रकारच्या अन्नाचा नैवेद्य करावा आणि दोन कुमारीस पंचामृतभोजन द्यावें,

**दृष्टिज्वरावर पथ्य**—सामान्य ज्वरावरील पथ्यापथ्यें करावी.

**कालज्वर लक्षण**—अतर्दाह, बाहेर थंडी, गळ्यात कफ, तोंडास चव नसणें, जिव्हा फार काळी, डोळे तांबडे होणें, नाडी सूक्ष्म आणि तीव्र अशी वाहणें मूर्छा ,बडबड, बुद्धीस भ्रम होऊन चेष्टा करणें, सताप- मोह, हात आपटणें, तोंडावर मारून घेणें, हाय हाय असा शब्द करणें,भ्रम, व शरीरास कंप, ही लक्षणें होतात.

**कालज्वरावर उपाय**—( १ ) नागरमोथे, गुळवेल, पित्त पापडा, द्राक्षें व कुटकी, यांचा काढा द्यावा. ( २ ) पिपळी, देवदार, पुष्करमूळ, सुंठ, वेखंद, रास्ना, बाळहिरडे, पित्तपापडा, भारंगमूळ, धमासा, मिरी, पिपळी, त्रायमाण, कचो-

रा, गुळवेल, मोतरिंगणी, अ० रानवांगी याचा काढा दिला असता तंद्रा, दाह, शोप, कास व श्वास हे रोग दूर होतात.

**कालज्वरी पथ्य**—पथ्यापथ्यें सन्निपातज्वरावरील करावी.

**विषमज्वराची संप्राप्ति** [ मा. नि. ]—ज्वरानें नुकताच सोडलेल्या मनुष्याला अपथ्य सेवन आलें असतां त्याचा दोष पुनः कुपित होऊन रसरक्तादि धातूंपैकी कोणत्याही धातूप्रत जाऊन विषमज्वर ह्मणजे तृतीयादिक ज्वर उत्पन्न करितो. किंवा पहिल्यापासूनही विषमज्वर होतो. अथवा दोष बलवान् नसल्यामुळें विशिष्टकाळीं बलवान् होऊन ज्वर करितो. आणि जो दोष बलवान् आहे तो तर नित्यच ज्वर करितो.विषमज्वराचें सामान्य लक्षण **भालुकी**नें असें सांगितलें आहे कीं,अनियमितकाळी शीतोष्णानें विषम वेगज्वर होतो. दुसरें लक्षण असें आहे की, "**मुक्तानुबंधित्वंविषमत्वं**" ह्मणजे जो ज्वर सोडतो आणि पुन. धरतो, त्यास विषमज्वर असें ह्मणतात. ह्मणजे जो सम नाहीं तो विषम, परंतु लोक प्रचारात असें ह्मणतात की जो वीस दिवसाचा तो विषम आणि जो नऊ दिवसांचा तो नवज्वर. परंतु या मतास कोठें आधार मिळत नाहीं,यावरून शब्दाचा अपभ्रंश झाला असावा;असें दिसतें.

**विषमज्वरांचीं नांवें व संख्या** ( मा. नि. )—संतत, सतत, अन्येद्यु, ( द्व्याहिक ) तृतीयक, आणि चातुर्थिक असे पाच भेद आहेत.

**संततादिज्वरांचीं अनियमित दूष्यें**—रसधातुगत दोष संतत ज्वराला उत्पन्न करितो. व रक्तधातूगत दोष सतत ज्वराला उत्पन्न करितो. तोच दोष मांसाश्रित झाला असता अन्येद्युष्क ह्मणजे द्व्याहिकज्वराला उत्पन्न करितात. व मेदोगत झाला ह्मणजे त्र्याहिक ह्मणजे त्रिजार उत्पन्न करितो. तो दोष अस्थिमज्जाश्रित झाला ह्मणजे दुःसह मृत्युदायक अनेक रोगांनी व्याप्त असा चातुर्थिक ज्वर उत्पन्न करितो.

**विषमज्वरावर चिकित्सा**—संपूर्ण विषमज्वर सन्निपातापासून म्हणजे त्रिदोषापासून उत्पन्न होतात. परंतु त्यात अधिक जो दोष असेल त्यावर चिकित्सा करावी. वांति व रेचन द्यावें आणि स्निग्ध व उष्ण अशी अन्नें व पानें यांनी विषमज्वर शमवावा. ताक व मांस किंवा दूध मास अथवा दही मास व माष मास याच्या भक्षणानें विषमज्वर जातो. मद्य व मट्ठा याचें प्राशन व कोंबडा व तित्तिरपक्षी यांचें मांस भक्षणास द्यावें. क्षीणरोग्याचा फार दिवसांचा संतत किंवा विषमज्वर पथ्यकारक भोजन व ज्वरनाशक औषधी यांनी शमवावा. रुक्ष रोग्याचा ज्वर नानाप्रकारचे काढे, नानाप्रकारचे लेप व लघुभोजन यांनी शांत होत नाही. याकरितां त्याला घृतपान द्यावें; ह्मणजे ज्वर शमतो असें बहुतेक वैद्याचें मत आहे. वाताधिक विषमज्वर असेल तर त्याजवर घृतें व अनुवासनबस्ति द्यावा.—पित्ताधिकावर दूध तापवून त्यात तूप घालून रेचनार्थ द्यावें व कडू आणि शीत अशा उ-

पचारानें जिकावा—कफाधिक विषमज्वराला वमन, पाचन व रुक्ष असें अन्न व पान, लंघन व तुरट आणि उष्ण अशा औषधांनीं जिकावा. [ १ ] भुईतरवड, वाळहिरडे, काळी द्राक्षें व जिरें यांचा काढा विषमज्वरावर प्राशनार्थ द्यावा. [ २ ] सुंठ,पिंपळमूळ,वडीशेप, भुईतरवड, वाहाव्याचा मगज व हरीतकी यांचा काढा सैंधव घालून द्यावा तो विषमज्वरावर पाचन व रेचन असा आहे. [३]काळी द्राक्षें,त्रिफळा, सुंठ व धणे यांचा काढा विषमज्वरावर पाचन व द्रावक असा आहे. [ ४ ] कोरफडीचा कांदा दहा मासेपर्यंत घेऊन त्याचा कल्क कोंबट पाण्याशीं प्राशन केला असतां वांति होऊन फार दिवसांचा विषमज्वराचा नाश होतो. [ ५ ] जेष्टीमध, धमासा, आडूळसा, त्रिफळा, वाळा, गुळवेल, व नागरमोथे यांचा काढा खडीसाखरेचें चूर्ण घालून द्यावा. [ ६ ] नागरमोथे, रिंगणमूळ, गुळवेल, सुंठ व आवळकठी यांचा काढा मध व पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा. [ ७ ] कडू पडवळ, कुटकी, जेष्टीमध, हरीतकी व नागरमोथे यांचा काढा विषमज्वराला लवकर घालवितो. [ ८ ] कडू पडवळ, कडू निंब, डोरलीमूळ, इंद्रजव व गुळवेल याचा काढा मध घालून दिला असतां जुना विषमज्वर नाश पावतो. [ ९ ] भारंगमूळ, पित्तपापडा, सुंठ, आडूळसा,पिंपळी,किराईत,कडू निंब,गुळवेल,नागरमोथे,व धमासा याचा काढा जीर्णज्वर,धातुगतज्वर,उपद्रवासहित विषमज्वर व सर्व ज्वर यांचा नाश करितो हा दोन दिवस घेतला असतां त्याचें यमापासूनही रक्षण होईल.(१०)भारंगमूळ,नागरमोथे,पित्तपापडा धमासा, सुंठ, किराईत, कोष्ठ, पिंपळी, रिंगणमूळ, आणि गुळवेल याचा काढा जीर्णज्वर, संततज्वर, सततज्वर, अन्येद्युष्कज्वर, तृतीयकज्वर व धातुर्थिकज्वर याचा नाश करितो. [ ११ ] हाळद, पिंपळी, मिरी व सैंधव हीं औषधें समभाग तिळाचें तेलांत खलून अंजन करीत जावें. [ १२ ] सैंधव, पिंपळीचे दाणे व मनशीळ, हीं औषधें समभाग तिळाचे तेलांत खलून अंजन करावें. [ १३ ] पिंपळी, मोहऱ्या, वेखंड व कोष्ठ हीं औषधें समभाग घेऊन लसणीच्या रसात खलून अंजन करावें. [ १४ ] मिऱ्याचें चूर्ण तुळशीचें रसात द्यावें. [ १५ ] निंबादि चूर्ण द्यावें. [१६] अमृतपट्फल घृत द्यावें. [१७] चंदनाद्यघृत द्यावें. [ १८ ] गोपिच्याादि घृत द्यावें. [ १९ ] गुळवेलीचें वस्त्रगाळ चूर्ण शंभर तोळे व गूळ, मध, तूप, हीं प्रत्येक सोळा सोळा तोळे घेऊन एकत्र करावीं; आणि अग्निबळ पाहून भक्षावी. व हितकारक, परिमित असें अन्न भक्षण करावें ह्मणजे त्याला कोणतीही व्याधी व ह्मातारपण केंसाचा पांढरेपणा, ज्वर, विषमज्वर, मेह, वातरक्त व नेत्ररोग हे रोग होत नाहीत. हें उत्कृष्ट रसायन बुद्धि देणारें, त्रिदोषनाशक याच्या सेवनानें पुरुष शभर वर्षें वाचतो. व दैत्यासारखा बलवान् होतो.

**संतत ज्वराचें लक्षण**—सात किंवा दहा दिवसपर्यंत किंवा बारा दिवसपर्यंत एकसारखा तो ज्वर असतो तो संततज्वर होय. सात, दहा आणि बारा, हे अनुक्रमें वात, पित्त, कफ यांच्या उल्बणानें सांगितले आहेत. हा ज्वर त्रिदोष-

ज आहे, कारण याला द्वादश पदार्थांचा आश्रय आहे. ते पदार्थ वातादि दोष ३, सप्तधातूंचे ७, मूत्र १, आणि पुरीष १ असे १२ जाणावे.

**संतत ज्वरावर उपाय**—( १ ) कडू पडवळ, इंद्रजव, देवदार, गुळवेल, आणि कडू निंबाचा पाला किंवा साल याचा काढा द्यावा. ( २ ) कडू पडवळ, नागरमोथे, आडूळसा, कुटकी व उपळसरी यांचा काढा द्यावा. ( ३ ) कडू पडवळ, इंद्रजव, धमासा, हरीतकी, कुटकी व गुळवेल याचा काढा द्यावा.

**संततज्वरावरील पथ्य**—तारतम्य पाहून जुन्या तांदुळाची किंवा जुन्या गव्हाची कण्हेरी सैंधव किंवा खडीसाखर घालून द्यावी, जुन्या साळीचा भात, तुरीचें वरण, आमसुलाचें सार, तापवून निवालेलें पाणी, तांदुळजा, पडवळ, करटोलीं, भेंडी, यांची भाजी, रेच, वांति, शुभकर्म, देवब्राह्मण यांचें पूजन हीं पथ्यें होत.

**सततज्वराचें लक्षण** ( मा. नि. )—सततज्वर रात्रीमध्यें दोन वेळ येतो. **ईशानदेव** ह्मणतात कीं, दिवसां दोन वेळा किंवा रात्रीं दोन वेळा अथवा दिवसां एक वेळा आणि रात्रीं एक वेळा एकून दोन वेळां अमूकच वेळेवर येतो असें सांगितलें नाहीं आणि असें पाहण्यातही येतें. **अन्येद्युष्कज्वर** अहोरात्रींत एक वेळ येतो. **उपाय**—( १ ) कडू पडवळ, हरीतकी, कडू निंब, इंद्रजव, गुळवेल, धमासा यांचा काढा सततज्वर व खोकला यांचा नाश करितो.

**सततज्वरावर पथ्य**—संततज्वरावरील पथ्यापथ्यें करावीं.

**ऐकाहिक व द्व्याहिक ज्वरावर उपाय**—( १ ) कडु पडवळ, त्रिफळा, कडु निंबाचीं पानें, मनुका, बाहाव्याचा मगज व आडूळसा याचा काढा मध व खडीसाखर घालून द्यावा ह्मणजे प्रति दिवशी जो ज्वर येतो तो दूर होतो. ( २ ) कुमारीनें काढलेल्या सुतानें गुंडाळून आघाड्याची मुळी शेंडीस बांधावी ह्मणजे प्रतिदिवशी येणारा ज्वर अति वेगानें नाश पावतो. ( ३ ) कोळ्याचे जाळ्याचे सुताची वात करून ती तिळाचे तेलांत पेटवून काजळ धरावें आणि त्याचें अंजन करावें, ह्मणजे द्व्याहिक ज्वर नाश पावतो. ( ४ ) हिंगुळ व बचनाग यांचें चूर्ण एक गुंज द्यावें ह्मणजे ऐकाहिक, द्व्याहिक, त्र्याहिक व चातुर्थिकज्वर याचा नाश होतो.

**ऐकाहिक ज्वरावर पथ्य**—जुन्या तांदुळाचा भात, तुरीचें वरण, जुन्या गव्हाची पोळी, कुळीथ, मुगाचे कढण, तापवून निवालेलें पाणी, किंवा ऊन पाणी, पडवळ, तांदुळजा, करटोली, आमसुलाचें सार, तुपांत परतलेले लसूनाची चटणी, रेच, वांति, मेथी, चाकवत, शेवगा, लोंकरीचीं वस्त्रें हीं पथ्यें होत.

**तृतीयकज्वराचें लक्षण** ( मा. नि. )—एक दिवसांमध्यें जाऊन येतो. हा तीन प्रकारचा होतो. कफपित्तात्मक तृतीयकज्वर तो कंबर व पाठीचा कणा यांचे

संधींत उत्पन्न होऊन नंतर शरीरांत प्रवेश करितो. वातकफात्मक तो तृतीयकज्वर तो पाठींतून उत्पन्न होतो. तसाच वातपित्तजन्य जो तृतीयकज्वर तो मस्तकापासून उत्पन्न होतो असें जाणावें.

**द्व्याह्निकावर पथ्यें**---ऐकाहिकावरची करावीं.

**तृतीयकज्वराचें कारण व लक्षण** ( योगतरंगिणी )—अति क्रोध, मोठें रान व मोठ्या अग्नीच्या ज्वाळा व जळकें शरीर ही पाहिल्यानें, कांहींएक फार वाईट पदार्थ दुसऱ्यानें खातांना पाहिल्यानें, देशांतरी मृत्यु पावला जो कोणी स्वकीय त्याची मरणवार्ता ऐकिल्यानें व पाण्यांत मलविसर्ग केल्यानें अथवा पिशाचादिकाच्या बाधेनें तृतीयकज्वर उत्पन्न होतो. **लक्षण**—अंग थंड होतें, कंप, विलाप, तृषा, मोह, खारट व आंबट पदार्थावर रुचि, इंद्रियें गलित होणें, स्वभावाचें वैपरित्य, अमंगळपणा, अंग जड होणें व विपरीत बुद्धि हीं लक्षणें होतात.

**तृतीयकज्वरावर उपाय**---( १ ) रक्तचंदन, धणे, सुंठ, वाळा, पिंपळी व नागरमोथे, यांचा काढा मध व खडीसाखर घालून द्यावा. (२) वाळा, चंदन, नागरमोथे, गुळवेल, धणे व सुंठ यांचा काढा मध व खडीसाखर घालून द्यावा; ह्मणजे तो तृतीयकज्वर, तृषा व दाहपूर्वकज्वर यांचा नाश करील. ( ३ ) आघाड्याची मुळी आदितवारी आणून तांबड्या सुताच्या ७ तंतूंनीं कंबरेस बांधावी; म्हणजे तृतीयकज्वर शांत होतो.

**त्र्याह्निकज्वरावर पथ्यें**—व्द्याहिकावरचीं करावीं.

**चातुर्थिकज्वराचें लक्षण** ( मा. नि. )—२ दिवस मध्यें जाऊन येतो. हा ज्वर आपलें सामर्थ्य २ प्रकारचें दाखवितो. कफाधिक असतो तो पहिल्यानें मांड्यांपासून आरंभ करून मग सर्व देह व्याप्त करितो. आणि वाताधिक असतो तो पहिल्यानें मस्तक तापवून नंतर सर्व शरीरात भरतो. कोणी हा विषमज्वर भूताभिषंगोत्थ आहे असें ह्मणतात. सुश्रुताचें व चरकाचेंही असेंच मत आहे. ज्वराचा वेग शांत झाल्यानें विषमज्वर गेलासा वाटतो. परंतु तो ज्वर अन्य धातूप्रत जाऊन सूक्ष्मरूपानें राहतो ह्मणून दिसत नाहीं. त्याचें स्वस्थानी त्याच दिवशीं गमन होतें.

**चातुर्थिकज्वराचें कारण व लक्षण** ( योगतरंगिणी )—दुष्ट स्वप्न, मेलेल्या मनुष्याचे केस पिंजरलेले असें डोकें, दारुण युद्ध, सुळावर चढविलेला, व फांशी दिलेला, यांचे दर्शनानें चातुर्थिकज्वर उत्पन्न होतो. **लक्षण**—अंगास निस्तेजपणा, अति कृशपणा, शरीराचा वर्ण विपर्याय, खारट, तिखट, तुरट, या पदार्थांवर इच्छा, शरीर थंड, मुखशोष, फार कंप, ही लक्षणें होतात.

**चातुर्थिकज्वरावर उपाय**—रोग्याला ज्वराच्या वेळेस धास्तीनें म्हणजे चिंतनानें ज्वर येतो याकरितां इष्ट साधनानें अथवा अद्भुत साधनांनी ज्वरिताचें मन तिकडून फिरवावें. संततविषमज्वर क्षीण पुरुषाला फार दिवस येतो. त्याला उ-

त्तम भोजन पथ्य अशा ज्वरघ्न उपायांनीं यत्न करावा. [ १ ] आडूळसा, आंवळकठी, सालवण, देवदार, धणे, आणि सुंठ, यांचा काढा मध व साखर घालून चातुर्थिकावर द्यावा. [ २ ] देवदार, बाळहिरडे, आडूळसा, रानगांजा, सुंठ आणि आंवळकठी यांचा काढा थंड झाल्यावर त्यांत मध व साखर घालून द्यावा. [ ३ ] रिंगणीमूळ, वाळा, डोरलीं, नागरमोथे, मोहाचें फूल, हिरडे, आस्कंद, सुंठ, आडूळसा, गुळवेल व पित्तपापडा, याचा काढा मध व पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा; म्हणजे दाह, घाम, तहान, जत, दुष्ट रक्त, शैत्य, भ्रांति, श्वास, शूल, दिवा ज्वर, रात्रीं ज्वर आणि चातुर्थिकज्वर नाश पावतातः [ ४ ] पांढऱ्या पुनर्नव्याचें मूळ दुधाशीं प्राशन केल्यानें अथवा विड्याशीं भक्षण केल्यानें फार जुनाटही चातुर्थिकज्वर नाश पावतो. [ ५ ] कुड्याची साल, कडू पडवळ, व कुटकी यांचा काढा द्यावा. ( ६ ) कडू पडवळ, उपळसरी, नागरमोथे, पाहाडमूळ, व कुटकी यांचा काढा द्यावा; म्हणजे हे वरील दोन काढे पांच प्रकारचे ज्वराचा नाश करितात. ( ७ ) देवदार, सुंठ, बाळहिरडे, यांचा काढा करून त्यांत मध व पिपळीचें चूर्ण घालून घेतला असतां चातुर्थिकज्वर जातो. ( ८ ) ज्वरारि रस द्यावा. ( ९ ) शितारी रस द्यावा. ( १० ) महाज्वरांकुश रस द्यावा.

**चातुर्थिकज्वरावर पथ्य**—जुन्या साळीचा भात, जुन्या गव्हाची पोळी, ज्वारीची भाकर, तुरी व मूग यांचें वरण, सामुक ताकाची कढी. थोडी डिंकेमाली घातलेली, तांदुळजा, चाकवत, पडवळ, माठ, भेंडी, करटोलीं, शेवगा, मेथी, यांच्या भाज्या, आमसुलाचें सार, आलें, कवठ, लसून, व पुदीना यांच्या चटण्या, तापवून निवालेलें, किंवा, उन पाणी, अथवा थंड पाणी, वांति, रेच, अगस्त्याचीं पुष्पें, हीं पथ्यें होत.

**विषमज्वराचे विशेष भेद** ( मा. नि. )—शरीरामध्यें अन्नाचा रस दुष्ट झाला असतां व कफ आणि पित्त हीं कोपलीं असतां अर्धा देह कफानें थंड होतो. ( कंबरेवरचा अथवा खालचा किंवा डावा अथवा उजवा भाग ) पित्तानें उष्ण होतो. जेव्हां कोष्ठामध्यें पित्त दुष्ट होतें आणि कफ हातापायांचेठायीं दुष्ट होऊन राहतो, तेणेंकरून शरीरास उष्णत्व येतें आणि हातपाय गार होतात. ज्या वेळेस कोष्ठामध्यें कफ दुष्ट होऊन पित्त हस्तपादांमध्यें दुष्ट होऊन राहतें तेव्हां शरीराला शीतता आणि हातापायांला उष्णता येते यांवाचून विषमज्वर होत नाहीं व कफ आणि पित्त ही नष्ट झालीं असतां वायु विशेषेंकरून शरीरांत संचार करितो.

**विषमज्वराचें लक्षण** (योगतरंगिणी)—देहांत अन्नाचा रस विदग्ध होऊन असें जें पित्त आणि कफ या हेतूनें शरीराची एक बाजू थंड आणि दुसरी बाजू उष्ण होते, अथवा कंबरेखालीं थंड व वर उष्ण होणें; व थंडपणा हा कफाचे योगानें आणि उष्णपणा हा पित्ताचे योगानें जेव्हां कोठ्यांत पित्त दुष्ट होतें आणि हातापायांत दुष्ट होऊन राहतें तेव्हां गळ्यांपासून कंबरेपर्यंत शरीर उष्ण व हातपाय थंड

होतात अथवा जेव्हां कोठ्यांत कफ दुष्ट होतो आणि पित्त आंत बाहेर दुष्ट होऊन राहतें तेव्हां शरीर थंड होतें व हातपाय उष्ण होतात. ज्या वेळेस आमस्थानीं अथवा नाभीस्थानीं पित्त दुष्ट होऊन राहतें व कफवायु हे त्वचेंत राहतात, त्यावेळीं आंत दाह आणि बाहेर शीत होतें. जेव्हां त्वचेंत कफवायु हें राहतात तेव्हांच थंडी वाजून ज्वर येतो. नंतर त्याचे शमाविषयीं पित्त जागृत होऊन अतिदाह होतो. आणि जेव्हां पित्त त्वचेंत राहतें तेव्हां दाहपूर्वक ज्वराला उत्पन्न करितें. त्याचे शमाविषयीं कफवायू जागृत होऊन थंडी अति वाजूं लागते. या दोहोंतून दाहपूर्वक ज्वर दुःखप्रद आणि अति कष्टसाध्य आहे व शीतपूर्वकज्वर अल्पकाष्टसाध्य आहे असें जाणावें.

**विषमज्वराचें असाध्य लक्षण** ( योगतरंगिणी )—जो ज्वर अनेक कारणांपासून उत्पन्न होतो, व ज्यांत त्रिदोषांचीं संपूर्ण लक्षणें असतात, आणि ज्याचे योगानें रसादि सप्तधातू व इंद्रियें हीं क्षीण होतात, घाम येतो व आंत दाह व बाहेर शीत ही लक्षणें ज्या ज्वरांत होतात तो असाध्य जाणावा.

**वातबलासकज्वर** ( मा. नि. )—रोगी ज्वरानें शोथयुक्त होऊन ग्लान होतो. अंग ताठतें, कफ फार होतो, व शरीर रुक्ष होतें, हा ज्वर वायु आणि कफ यांपासून होतो. हीं लक्षणें होतात.

**वातबलासकज्वर** ( योगतरंगिणी )—शरीराला रुक्षता, सूज, निरंतर अल्पज्वर, व स्तब्धता, हीं लक्षणें होतात. हा वातकफात्मकज्वर जाणावा. यांत कफाचें बाहुल्य असतें. हा मोठ्या कष्टानें साध्य होतो.

**प्रलेपकज्वर** (मा. नि.)—गात्रें घामानें व जडपणानें सारा वेळ चिकट होतात. त्या योगानें ज्वर मंद असतो. थंडी वाजते, हा ज्वर कफपित्तजन्य आहे क्षयरोगामध्यें हा होत असतो. कोणी याला त्रिदोषजनितही म्हणतात. याजवर कफज्वराचे उपाय करावे.

**शीतपूर्वकज्वर** ( मा. नि. )—कफ आणि वायु हे रसधातूचा आश्रय करून पहिल्यानें शीतज्वर उत्पन्न करितात, त्यांचा वेग शांत झाला म्हणजे शेवटीं पित्त व दाह करितो. पूर्वीं कडकड थंडी वाजून येऊन नंतर ज्वर अंगांत भरतो. कंबर, हात, पाय, अंग, व संधी यांना फूट, ओकारी, बडबड, अरुचि, इत्यादि लक्षणें होतात.

**शीतज्वराचें कारण**—केळीं, शिताफळें, पेरु, काकड्या वगैरे शीत पदार्थ भक्षण करून वर गार पाणी प्यालयानें किंवा गार पाण्याचीं स्नानें केल्यानें शीतज्वर ( हिंवताप ) होतो, किंवा अति भयानें व अति शोकानेंही होतो. अथवा अति भयानें किंवा अति धास्तीनें औषधाशिवाय नाहींसाही होतो.

**शीतज्वराचें लक्षण**—पूर्वीं कडकडून थंडी वाजून येते. नंतर ज्वर भरतो.

कंबर, हात, पाय, अंग, संधी, यांना फूट, ओकारी, बडबड, अरुचि, इत्यादि लक्षणें होतात.

**शीतज्वरावर उपाय**—( १ ) शीतज्वरानें रोग्यास थंडी वाजूं लागल्यास शीतनाशक उपाय करावे. व दाह झाला असतां दाहनाशक क्रिया करावी. ( २ ) कुड्याची साल, टाकळीमूळ, आडूळसा, गुळवेल, निर्गुडी, माका, सुंठ, रिंगणी व ओंवा यांचा काढा शीतज्वररूप अरण्यास अग्नीसारखा नाशक आहे. ( ३ ) हिंगूळ १, सोमल १, व कात २ तोळे एकत्र करून विड्याचे दोनशें पानाचे रसांत खलून मोहरीप्रमाणें गोळी बांधावी. ओंव्याचें चूर्ण २ मासे व बत्तासा एक यांत एक गोळी द्यावी. ( ४ ) पहाडमुळाच्या काढ्यांत मिऱ्याचें चूर्ण घालून द्यावें. ह्मणजे शीतज्वर शात होतो. ( ५ ) जिरें, लसूण, त्रिकटू व पहाडमूळ हीं औषधें ऊन पाण्याशीं वांटून त्या कल्कांत गूळ घालून शीतज्वर येण्याचे वेळेस द्यावा ह्मणजे शीतज्वर शांत होतो.(६) काकडी खाऊन त्यावर आंबट ताक प्यावें आणि शेक घ्यावा किंवा उन्हांत पांघरूण घेऊन बसावें ह्मणजे सर्व अंगाला घाम येऊन शीतज्वर शांत होतो. ( ७ ) आरोग्यारि रस द्यावा. ( ८ ) शितारी रस द्यावा ह्मणजे शीतज्वर शांत होतो. ( ९ ) हरताळ १ तोळा, मोरचूत २ तोळे, शिंपीशिं भस्म ६ तोळे, हीं एकत्र करून लोहपात्रांत घालून धोत्र्याचे रसात एक प्रहर घोटून चुलीवर ठेवून तो रस सुकवून तसेंच निवूं द्यावें. पुन्हां धोत्र्याचे रसात ऊन करून सिद्ध करावें आणि वालप्रमाण गोळ्या कराव्या. एक गोळी साखरेबरोबर द्यावी ह्मणजे हा भूतभैरव रस सर्व शीतज्वरांचा निःसंशय तात्काल नाश करितो. (१०) सुदर्शन चूर्ण थंड पाण्यांत द्यावें. ( ११ ) सुंठ, मिरीं व पिपळी यांचें चूर्ण ताकांतून द्यावें. ( १२ ) कोयनेल थंड पाण्यांतून लिंबाच्या रसाचे दोन थेंब घालून द्यावें. ( १३ ) काडेचिराइताचा काढा साखर घालून द्यावा.

**दाहपूर्वकज्वर** ( मा. नि. )—पहिल्यानें पित्त रसगत होऊन अत्यंत दाह करितें, नंतर त्याचा वेग शांत झाला ह्मणजे वातकफ शेवटीं शैत्य करितात. दाहपूर्वक आणि शीतपूर्वक हे दोन्ही ज्वर त्रिदोषाच्या संबंधानें होतात.त्यांपैकी दाहपूर्वकज्वर दुःखप्रद आणि अत्यंत कष्टसाध्य आहे. आणि शीतपूर्वकज्वर सुखसाध्य आहे. कारण शीतज्वराला उष्ण उपचार करिता येतात, परंतु दाहपूर्वक ज्वराला अति शीत उपचार करितां येत नाहीत.

**दाहपूर्वक ज्वरावर उपाय**—( १ ) दाहपीडित मनुष्यास उताणा निजवून त्याचे नाभीवर तांब्याचें किंवा कांशाचें भांडें ठेवून त्यात थड पाण्याची धार धरावी; ह्मणजे दाह शांत होतो. (२) सज्जीखार, सुंठ, कोष्ठ, मोरवेल, लाख, हळद, पतंग व जेष्ठीमध यांच्या काढ्यांत तिळाचें तेल आणि तेलाचे सहापट ताक घालून तें सिद्ध करावें तें दाहयुक्त ज्वराचा नाश करितें. (३) दाहनाशक क्रिया करावी. (४) बेहेडेदळ, बहाव्याचा मगज, कुटकी, तेड व बाळहिरडे यांचा काढा तहान व दाहपूर्वक,

ज्वर व विषमज्वर यांचा नाश करितो. ( ५ ) चिकणामूळ व सुंठ यांचा काढा शीत, कंप व दाह यांनीं युक्त ज्वराचा तीन दिवसांत नाश करितो. ( ६ ) धन्याचा हिम, गुळवेलीचें सत्व व खडीसाखर घालून द्यावा. ( ७ ) दह्यांतील पाणी वस्त्रानें गाळून टाकावें व त्या सुक्या दह्यांत संगजिऱ्याची पूड थोडी घालून द्यावी.

**रसधातुगत ज्वर** (मा. नि.)—जडपणा, हृदयस्थ दोष, दोष कोपून पडेलसा वाटणें, ग्लानि, ओकारी, अन्नद्वेष, मनाला खेद, ही लक्षणें होतात, यांजवर घाम काढावा.

**रक्तधातुगत ज्वर** (मा नि.)—रक्ताचा वेडका, दाह, मोह ओकारी, भ्रम, वडबड, अंगावर गाठी किंवा फुटकुळ्या आणि तहान ही लक्षणें होतात. **उपाय**—( १ ) लेप व रक्त काढणें, व पित्तशामक उपायही करावे. ( २ ) त्रिफळा, ओंवा, रिंगणी, हळद, वेळूचें बीज व आडूळसा याचा काढा मध घालून द्यावा. ह्मणजे रक्तापासून दारुण झालेल्या ज्वराचा नाश करितो. ( ३ ) आडूळसा, धमासा, पिपळी, पित्तपापडा, किराईत व कुटकी यांचा काढा मध घालून द्यावा ह्मणजे रक्ताश्रित ज्वर, दाह, तृषा, मूर्छा, मतिभ्रम व पित्तज्वर यांचा नाश करितो. ( ४ ) अंगावर पाणी शिंपणें, ज्वरशामक औषधें व अंगास लेप इत्यादि करावें.

**मांसधातुगत ज्वर** ( मा. नि. )—गुडघ्याचे खालीं पोटऱ्यास, मांसाचे गोळे उचलतात. तहान मळ व मूत्र ही वहुत होतात. तलखी, अंतर्दाह, हातपाय चाळविणें आणि ग्लानि हीं लक्षणें होतात. याजवर प्रथम तीक्ष्ण रेचन द्यावें.

**मेदोधातुगत ज्वर** ( मा. नि. )—अत्यंत घाम येणें, तहान, मूर्छा, वडवड, वांति, अंगाला दुर्गंधी, अरुचि, ग्लानि आणि वेदना सहन न होणें, ही लक्षणें होतात. यांजवर मेदोरोगावरचे उपाय करावे

**अस्थिधातुगत ज्वर** ( मा. नि. ) हाडें फुटल्यासारखें वाटणें, कुंथणें, श्वास, रेच, ओकारी व हातपाय चाळविणें, ही लक्षणें होतात. यांजवर वातनाशक औषधें द्यावींत, घाम काढावा, अंग मर्दन करावें, अभ्यंग करावें

**मज्जाधातुगत ज्वर** ( मा. नि. )—अधारात शिरल्याप्रमाणें भासणें, उचकी, खोकला, थंडी वाजणें, ओकारी, अंतर्दाह, महाश्वास व हृदयभेद, ही लक्षणें होतात. हा असाध्य परंतु दैवानें कदाचित् साध्यही होतो.

**शुक्रधातुगत ज्वर** ( मा. नि. )—रसादि धातुगत ज्वरापैकी शुक्रस्थानी ज्वर गेला असता रोगी मरण पावतो. ह्या ज्वरात शिश्नास ताठरपणा असतो, शुक्राचा स्राव विशेष होतो व दुसरे रक्तादि पदार्थाचाही थोडा थोडा स्राव होतो.

**रसादिधातूसंबंधानें साध्यासाध्य विचार**—रस,रक्त, मास व मेद हे धा-

तुगत ज्वर औषधानें साध्य होतात; अस्थि व मज्जागत ज्वर दुःसाध्य व शुक्रगत-ज्वर झाला असतां मनुष्य मरण पावतो.

**प्राकृत आणि वैकृतज्वर** ( मा. नि. )—वर्षाऋतूंत, शरदृतूंत आणि वसंतऋतूंत वातादिकांनी क्रमेंकरून जो ज्वर होतो. प्राकृत ज्वर ह्मणजे वर्षाकाळी वातज्वर, शरत्काळी पित्तज्वर, आणि वसंतकाळी कफज्वर, याहून जो दुसरा ज्वर तो वैकृतज्वर; जसें वर्षाकाळीं पैत्तिक, शरत्काळीं श्लेष्मिक आणि वसंतकाळीं वातिक हा वैकृतज्वर दुःसाध्य आहे. आणि वातजन्य प्राकृत ज्वरही दुःसाध्य आहे.

**अंतर्वेग ज्वराचें लक्षण** ( मा. नि. )—अभ्यंतरीं दाह, फार तृषा, बडबड, श्वास, भ्रम, सांधे आणि हाडें यांचे ठिकाणी शूळ, घाम येत नाहीं, वायु आणि मळ यांचा प्रतिबंध, ही लक्षणें होतात. हा ज्वर दुःसाध्य आहे.

**बहिर्वेग ज्वराचें लक्षण** (मा. नि.)—बाहेरून संताप फार असतो. तृषा, भ्रम, घाम, श्वास हे अल्प असतात. हा ज्वर सुखसाध्य आहे.

**लघुज्वराचें लक्षण** (योगतरंगिणी)—ज्या ज्वरांत दोषांचीं लक्षणें अल्प असतात तो साध्य जाणावा.

**गुरुज्वराचें लक्षण** ( योगतरंगिणी )—ज्या ज्वरांत वातादि दोषांचीं लक्षणें संपूर्ण असतात तो असाध्य जाणावा.

**अपक्वज्वराचीं लक्षणें** ( मा. नि. )—लाळेचा स्राव, ओकारी होईल असें वाटणें, उरात जड वाटणें, अरुचि, झांपड, आळस, अन्नाचा पाक न होणें, तोंड वेचव, अंगाला जडपणा, क्षुधा नसणें, वारंवार मूत्र होणें, अंग ताठल्यासारखें होणें, अंगांत पुष्कळ ज्वर असणें, हीं अपक्वज्वराचीं लक्षणें जाणावीं. अशीं लक्षणें असतां औषध देऊं नये. कारण अपक्व दोषाला औषध दिलें तर ज्वर वाढतो. शोधन किंवा शमन औषध दिलें तर विषमज्वरावर घालवितें.

**अपक्वज्वराचीं लक्षणें** ( वाग्भट )—वर दिलेल्या ज्वराच्या लक्षणाशिवाय या ज्वरांत ग्लानि येत नाहीं व मळशुद्धि होत नाहीं, कदाचित् झालीच तर अपक्व होते. या ज्वरावर ७ दिवस लंघन केलें असतां ज्वर पक्व होतो. यालाच नवज्वर ह्मणजे नूतनज्वर असें ह्मणतात.

**खुलासा**—या ज्वरावर औषध मुळींच देऊं नये ह्मणून सांगितलें, परंतु ज्वर अति वाढला तर त्याजवर शोधन औषध मात्र द्यावें असें कित्येक वैद्यांचें मत आहे. कारण शोधन किंवा शमन औषध दिलें ह्मणजे विषमावर घालवितो. तर येथें इतकेंच ग्रहण करावयाचें कीं, अपक्व ज्वर जो ज्वर सांगितला आहे तो वाढल्यास मृत्यूच यावयाचा यात शंका नाहीं. करितां विषमावर घालविलें तर कांहीं तरी उपचार

करितां येतात. कारण विषमज्वर हा २ दोषांनीं व्याप्त असतो. असें बहुमतानें ठरलें आहे. केवळ वरच्या कारणामुळेंच अपक्क ज्वरावर औषधी ह्मणजे शोधन किंवा शमन देणें तें येणेंप्रमाणें.

**अपक्कज्वरावर शोधन व शमन**—( १ ) कुटकी, नागरमोथे, पिंपळमूळ व बाळहिरडे यांचा काढा निकाढा थोडा मध घालून दिला असतां आमाशयगत ज्वराचें शोधन होऊन नाश पावेल. ( २ ) पारा १ भाग, गंधक २ भाग, टांकणखार ४ भाग व जेपाळबीज ८ भाग, या सर्वांचा ३ दिवस खल करावा. मात्रा वालप्रमाण मधांत द्यावी; ह्मणजे अपक्क ज्वराचें शोधन होऊन ज्वर कमी होतो. यास सर्वेश्वररस ह्मणतात. ( ३ ) वचनाग १ तोळा व गंधक, ताम्रभस्म व जेपाळ हे त्याच्या समभाग घेऊन दांतीमुळाच्या रसांत एक प्रहर खल करावा. हा त्रिपुरभैरवरस एक वाल त्रिकटूचें चूर्ण व आल्याचा रस किंवा नुसत्या साखरेशीं द्यावा; ह्मणजे नवज्वर, अग्निमांद्य, वातापासून उत्पन्न झालेली सूज, शूळ, मलस्तंभ, मूळव्याध व कृमीपासून आलेले व्याधि यांचा नाश होतो. पथ्य ताकभात. (४) पारा १ भाग, गंधक २ भाग, हिंगूळ ३ भाग व जेपाळबीज ४ भाग, ही औषधें दांतीमुळाच्या काढ्यांत खलून गुंजप्रमाण गोळ्या कराव्या.एक गोळी प्रातःकाळीं थंड पाणी व साखर यांबरोबर द्यावी; ह्मणजे एक दिवसांत नवज्वराचा नाश होतो.

**अपक्क ज्वराकर पथ्य**— जुन्या तांदुळाची कण्हेरी, सैंधव किंवा खडीसाखर घालून द्यावी. जुन्या गव्हाची कण्हेरी, मूग व तुरी यांचें कढण, ही पथ्यें द्यावी.

**अपक्क ज्वरावर अपथ्य**—स्नान, रेच, मैथुन, औषधें, व्यायाम, दिवसास निद्रा, तेलकट, आंबट, दूध, तूप, मांस, ताक, दही, मद्य, गोड पदार्थ, जड पदार्थ, चिकट पदार्थ, क्रोध, थंड पाणी व फार बोलणें, सर्व प्रकारच्या दाळी, वारा घेणे, फिरणें, क्रोध ई० वर्ज करावें.

**पक्क होणाऱ्या ज्वराचें लक्षण** ( मा. नि. )—ज्वराचा वेग अधिक, तहान फार लागणें, बडबड, श्वास, भ्रम, मळ होणें, ओकारी आल्यासारखी वाटणें, हीं लक्षणें यांत होतात.

**पक्क किंवा निरामज्वराचें लक्षण** ( मा. नि. )—भूक लागणें, शरीर कृश होणें, अंग हलकें होणें, मंदज्वर असणें, वायु सरणें आणि मनाला उत्साह वाटणें, हीं लक्षणें होतात. याप्रमाणें ज्वराची लक्षणें दिसल्यावर पुढील औषधांपैकीं कोणतेंही एक औषध दिलें असतां तत्काळ गुण येतो.

**पक्क किंवा निराम ज्वरावर उपाय**—( १ ) पाऱ्याचें भस्म, अभ्रक भ-

१—ज्वर जाण्याचे वेळेस धातूंच्या क्षोभानें व दोषाच्या चलनानें ज्वर वेग फार होतो, परतु त्रिदोष ज्वर, अतर्वेगज्वर व धातुगतज्वर याचे मात्र असें लक्षण होतें. व अन्य ज्वरात घाम येतो असें जाणावें.

स्म, ताम्रभस्म, सुवर्णभस्म, व गंधक हीं सम भाग, लोहभस्म अर्धा भाग व वैक्रांत मण्याचें भस्म पाव भाग, ही सर्व एकत्र करून माक्याचे रसांत खल करून पर्पटीसारखा पचन करावा. नंतर खलांत घालून शेवगा, आडूळसा, निर्गुडी, गुळवेल, चित्रक, माका, रिंगणी, मुंडी, जयंती, आगस्ता, ब्राह्मी, किराईत आणि कोरफड, यांच्या रसाच्या निरनिराळ्या तीन तीन भावना द्याव्या. नंतर एक लघुपुट द्यावें. शीत झाल्यावर काढून ठेवावें. गुंजप्रमाण मात्रा पिपळीच्या चूर्णाशी द्यावी; ह्मणजे नूतन ज्वराचा दोन घटिकांत नाश होतो. हा रत्नगिरीरस योगवाहक आहे. अनुपानपरत्वें पाहिजे त्या रोगावर चालतो. **पथ्य**—मुगाचें अन्न, मुगाचें कढण, ताक, वारा घेणें, व ज्वरावरील सांगितलेली पथ्यें करावी. ( २ ) पारा, ताम्रभस्म, निशोत्तर, गंधक, कुटकी, जेपाळ, पिंपळी, बचनाग, कुचला आणि हरीतकी, हीं सर्व समभाग घेऊन धोत्र्याचे पाल्याचे रसांत एक दिवस खल करावा. मात्रा दोन वालपर्यंत आल्याचे रसाशी द्यावी; ह्मणजे नूतन ज्वराचा नाश होतो. **पथ्य**—लघुअन्न व मुगाचें कांठ, ( ३ ) पारा, गंधक, मिरी व टांकणखार ही सर्व समभाग आणि यासमान खडीसाखर व मत्स्यपित्त घेऊन एकत्र करून तीन दिवस सारखा खल करावा. मात्रा वालप्रमाण आल्याचे रसांतून द्यावी; फार दाह झाल्यास पंख्यानें वारा घालावा. **पथ्य**—ताकभात ह्मणजे एक दिवसांत नूतन ज्वराचा नाश होतो. जर पित्त अधिक असेल तर मस्तकावर थंड पाणी शिंपडावें. ( ४ ) पारा, गंधक, हिंगूळ व समुद्रफेंस, ही औषधें सर्व समभाग आल्याचे रसांत एक प्रहर खलून वालप्रमाण गोळी आल्याचे रसात तीन दिवस द्यावी, ह्मणजे नवज्वराचा नाश होतो. याला ज्वर धूमकेतु असें ह्मणतात. (५) गंधक, टांकणखार, पारा व मिरी यांचा मत्स्यपित्तांत तीन दिवस खल करावा. मात्रा वालप्रमाण आल्याचे रसांत द्यावी. **पथ्य**—ताकभात. ह्मणजे क्षणांत घाम उत्पन्न होतो.

**जीर्णज्वर ( हाडीं ज्वर )** ( मा. नि. )—पूर्वी मोठा ज्वर येऊन एकवीस दिवस लोटल्यावर जो ज्वर बारीक होऊन अंगांत राहतो, त्यापासून पोटांत कवळु ( पान्थरी ) व जठराग्नि मंद होतो. त्याला जीर्णज्वर ह्मणतात. याची उपेक्षा केली असतां पुढें पांडु, क्षय याचा परिणाम होतो.

**जीर्णज्वरांचें लक्षण**—उत्तरोत्तर मंद गतीनें आहार कमी होत जातो. अन्न पचन होत नाहीं, शौच्य साफ होत नाही, हाडें धगधगीत राहतात, तोंडास पाणी सुटतें, शुक्र धातु पातळ असून क्षीण इ०लक्षणें होतात. जीर्णज्वर यद्यपि एकदांच तादृश पीडा करीत नाही तथापि उत्तरोत्तर अति पीडाकारक होऊन प्राणनाशक रोग उत्पन्न करितो.

---

१—जीर्णज्वरिताने कधींही उपवास करू नये. लघन केले तर रोगी क्षीण होऊन ज्वर अधिक बलवान् होतो व रोगी अति क्षीण झाला असल्यासत्यास वमन व रेचन ही दोन्ही हितकारक होत नाहींत, याकरिता त्यास यथेच्छ गाईचे दूध पिण्यास देत जावें.

**जीर्णज्वरावर उपाय**—( १ ) गुळवेलीचें सत्व तूप व खडीसाखर यांत किंवा मध व साखर यांत द्यावें ( २ ) गुळवेल व गोखरू समभाग व दोहों औषधांचे चतुर्थांश सुंठ या तिन्हींचा काढा मध व साखर घालून द्यावा. ( ३ ) गाईचें दूध ४ तोळे, पाणी १६ तोळे, पिंपळ्या ३ किंवा ४, आंत घालून एकत्र करून कल्हईचे पात्रांत कढवून दूध शेष राहिलें ह्मणजे त्यांतील पिंपळ्या चावून वर तें दूध प्यावें व पथ्यास दूधभात द्यावा. याप्रमाणें १४ किंवा २१ दिवस सेवन केलें असतां जीर्णज्वर निश्चयानें जाईल ( ४ ) क्रमवृद्धीनें दहा दिवस दहा पिंपळ्या दुधाबरोबर द्याव्या; बलिष्ठ पुरुषांनी वांटून बारीक करून घ्याव्या; मध्यम बलपुरुषांनीं दुधांत शिजवून घ्याव्या; हीनबल पुरुषांनीं चूर्ण करून मधाशी घ्यावें ह्मणजे खोकला, अजीर्ण, अरुचि, श्वास, हृद्रोग, पांडुरोग, कृमि, मंदाग्नि व विषमाग्नि यांना प्रशस्त आहे. व ह्या गूळ, मध, तूप यांतून दहा किंवा त्यांतून अधिक घेतल्या असतां श्वास, खोकला, हृद्रोग, पांडुरोग, कामला, प्रदर व प्रमेह यांचा निश्चयानें नाश होतो. यास वर्धमानपिंपळी असें ह्मणतात. ( ५ ) तीन तीन किंवा पांच पांच क्रमवृद्धीनें गाईच्या दुधांत पिंपळ्या वांटून दहा दिवसपर्यंत प्राशन कराव्या. नंतर त्याच मानानें कमी करीत आणावें. याप्रमाणें वीस दिवस घेतलें असता जीर्णज्वराची शाती होते व पाडूरोग, कास, श्वास, अग्निमांद्य व कफ यांचा नाश होतो. ( ६ ) गुळवेलीचा हीम नुस्ता किंवा खडीसाखर घालून द्यावा. (७) मध १ भाग, तूप २ भाग, पिंपळ्या ४ भाग, साखर ८ भाग, गाईचें दूध ३२ भाग, आणि चातुर्जात १ भाग, याप्रमाणें दुधांत घालून पचन करून गोळ्या कराव्या. याच्या सेवनानें धातुगत सपूर्ण ज्वर, दमा, खोकला, पांडुरोग, धातुक्षय व अग्निमांद्य यांचा नाश होतो. ( ८ ) गुळवेलीचा काढा थंड झाल्यावर मध घालून द्यावा. ( ९ ) कुटकी, पित्तपापडा, काडेकिराईत, नागरमोथे व गुळवेल यांचा यांचा काढा बहुत दिवस सेवन केला असतां असाध्यही ज्वर जातो. ( १० ) मनुका, गुळवेल व सुंठ यांचा काढा पिपळीचें चूर्ण घालून द्यावा, ह्मणजे श्वास, कास, अग्निमाद्य, जीर्णज्वर व तृषा यांचा नाश होतो. ( ११ ) कायफळ, नागरमोथे, कुटकी, कचोरा, काकडशिंगी व पुष्करमूळ, यांचें चूर्ण मधाशी किंवा आल्याच्या रसाशी द्यावें; ह्मणजे जीर्णज्वर, कास, श्वास, अरुचि, वायू, शूल, ओकारी, व क्षय याचा नाश होतो. ( १२ ) पिपळीचें चूर्ण मधांत दिलें असतां जीर्णज्वर, मेद, कफ, श्वास, कास, ज्वर, पांडुरोग व प्लीहा यांचा नाश होतो. ( १३ ) गुळवेलीचा अंगरस, पिपळीचें चूर्ण व मध घालून द्यावा; ह्मणजे जीर्णज्वर, कफ, प्लीहा, कास व अरुचि, यांचा नाश होतो. ( १४ ) जेष्टीमध, बहाव्याच्या शेंगेंतला मगज, मनुका, कुटकी, धमासा, त्रिफळा, व कडू पडवळ यांचा काढा रेचक व त्रिदोषज्वरनाशक आहे. ( १५ ) बेलाचें किंवा जाईचें मूळ याचा गाईचे दुधांत काढा करून सेवन केला असतां मोठ्या कठिणही जीर्णज्वराचा नाश होईल यांत संशय नाही.

( १६ ) धातुज्वरांकुश द्यावा. ( १७ ) कल्याणघृत द्यावें. ( १८ ) लाक्षादि तेल व चंदनादि तेल योजावें.

**जीर्णज्वरावर पथ्य**—सूक्ष्म रेच, वांति, घाम काढणें, अभ्यंग, थंड पाण्यांत शिरून स्नान करणें. थंड उपचार, मृग व पक्षी यांचीं मांसें, गाईचें किंवा शेळीचें दूध, पर्वतांतील झऱ्याचें थंडगार पाणी, वाळ्याचें पाणी, साखर, द्राक्षें, पडवळ, शेवगा, तांडुळजा, करटोली, भेंडी, चाकवत, घोसाळी, पोकळा, व माठ यांच्या भाज्या, ताजें गोड ताक, ताज्या ताकाची कढी, अमसुलाचें सार, पुदीना, आंवळकटी, व कोथिंबीर यांच्या चटण्या, जुन्या साळीचा भात, जुन्या गव्हाची पोळी, ज्वारीची भाकर, मुग, व तुरी यांचें वरण, गाईचें दूध, तूप, भात, स्त्रीसंभोग हीं पथ्यास द्यावीं.

**मधुराज्वराचें कारण** ( मा. नि. )—ज्वरांत तूप खाल्ल्यानें किंवा घामाचा रोध केल्यानें ह्मणजे घामावर वारा घेतल्यानें मधुराज्वर होतो.

**मधुराज्वराचें लक्षण** ( मा. नि. )—दाह, ज्वर, भ्रम, मूर्छा, अतिसार, वांति, तृषा, निद्रानाश, तोंड, टाळा व जीभ यांस शोष, गळा व मान यांजवर पांढऱ्या मोहऱ्यासारखे फोड येणें, हीं लक्षणें होतात. या ज्वराचा माधवानें पित्तज्वरांत अंतर्भाव केला आहे ह्मणजे पित्तज्वरासारखाच हा एक आहे. परंतु व्यवहारांत हा ज्वर वेगळाच मानितात व कित्येक वैद्यांनीं याचें निराळें नांव ठेवून त्याजवर औषधीही निराळ्याच सांगितल्या आहेत, या ज्वरास कोणी वेडा मधुराही म्हणतात.

**मधुराज्वराचें लक्षण** ( योगतरंगिणी )—डोळ्यांवर झांपड, दांत, ओठ हे शामवर्ण व ज्वर आल्यापासून सात दिवसांचे नंतर त्या पुळ्या येऊं लागून एकवीस दिवसपर्यंत पुऱ्या होतात. ही लक्षणें जाणावी.

**मधुराज्वरावर उपाय**—( १ ) रक्तचंदन, वाळा, धणे, काळा वाळा, पित्तपापडा, नागरमोथे व सुंठ याचा काढा द्यावा. ( २ ) तुळशीची पानें, गाईचें शेणाचा रस, जिरें, मेलेली माशी, सांबरशिंग, रक्तचंदन, शहाजिरें, वाळा, किराईत, इंद्रजव, गुळवेल, एलची, व कमळाक्ष, हे पदार्थ एकत्र वांटून तो कल्क बलाबल पाहून द्यावा; ह्मणजे मधुराज्वराचा शीघ्र नाश होईल. ( ३ ) पित्तज्वरावरीलही सर्व उपाय या ज्वरावर हितकारक होतात. ( ४ ) जिरें १ तोळा, पुदीन्याचा पाला २ तोळे, धणे ॥ तोळा, वाळा १ तोळा, खडीसाखर २ तोळे, कपुरीमधुरी २ तोळे, ही सर्व औषधें रात्री, कल्हईचे पात्रांत थंड पाण्यात भिजत ठेवावी. सकाळी त्याच पाण्यांत कुसकरून वस्त्रगाळ करून बलाबल पाहून पिण्यास द्यावें. ( ५ ) रानतुळस, पित्तपापडा व सुंठ यांचा काढा द्यावा. याजवर पथ्यें पित्तज्वरावरील करावी.

**कृष्णमधुराज्वर लक्षण**—ज्वर, नेत्रांना झांपड, आणि दांत, ओंठ, जिव्हा, कंठ, मुख, व नासिका, हीं काळीं होतात. व नेत्र चित्रवर्ण दिसतात. हा ज्वर क्वचित् पाहण्यात येतो. या ज्वरिताचे गळ्यांत सात दिवसांचे आंत मोत्याचा हार न घातला, तर एकवीस दिवसांत मोहऱ्यांसारखे फोड येतात.

**कृष्णमधुराज्वरावर उपाय**—( १ ) हिंग, कांसवाची पाठ, एलची, तुळशीचीं पानें, नारळाची करवंटी, आंब्याची कोय व खसखस ही औषधें समभाग गाईचे शेणाचे रसांत वांटून गाळून पिण्यास द्यावी; ह्म० कृष्णमधुरा ज्वर शांत होतो. ( २ ) याजवर मधुराज्वरावरील उपचार हितकारक होतात.

**दुर्जलजनितज्वर**—प्रवासांत नित्य नवीन ठिकाणचें पाणी प्यावें लागतें व तें एखाद्यास मानवत नाही. आणि त्यापासून ज्वर उत्पन्न होतो. या ज्वराला इंग्लिश लोक "मलेरीयसफीवर" असें ह्मणतात. **उपाय**—( १ ) कडू पडवळ, नागरमोथे, गुळवेल, अडूळसा, सुंठ, धणे, किराईत व कुटकी यांचा काढा निकाढा मध घालून देत जावा. ( २ ) हिरडेदळ, कडुनिंबाची पानें अथवा साल, सुंठ, सैंधव व चित्रक यांचें चूर्ण थंड पाण्याशीं द्यावें. ( ३ ) दुर्जलघ्नीरस द्यावा.

**उलटलेला ज्वर**—ज्वर निघाल्यावर अपथ्य सेवन केल्यानें ज्वर पुनः येऊं लागतो, तेणेंकरून दाह, शैत्य, मस्तकशूळ, पोटाला फुगवटी, कंबरेंत शूल, कंडू, रेच होणें किंवा मलबद्धता हीं लक्षणें होतात. **उपाय**—( १ ) कुटकी, वाळा, चिकणामूळ, धणे, पित्तपापडा व नागरमोथे, यांचा काढा उलटलेल्या ज्वराचा शीघ्र नाश करितो. ( २ ) कुटकी ·।।· तोळा, वाळा १ तोळा व नागरमोथे १ तोळा, यांचा काढा खडीसाखरेची पूड घालून द्यावा; ह्मणजे निश्चयानें उलटलेल्या ज्वराचा नाश होईल.

**उलटलेल्या ज्वरावर पथ्यापथ्य**—तारतम्य पाहून याजवर पथ्यापथ्य पित्तज्वरावरील करावें.

**ज्वरोपद्रव** ( मा. नि. )—श्वास, मूर्च्छा, अरुचि, वांति, तृष्णा, अतिसार, मलबद्धता, उचकी, खोकला व अंगमोडे हे १० उपद्रव ज्वरांत बहुतकरून होतात. ह्मणजे ज्वराचे अंगभूत असतात. याकरितां मूळ ज्वर शांत झाल्यावर हे संपूर्ण उपद्रव लागलेच आपोआप शांत होतात. याकरिता यत्न करून पूर्वी मूळव्याधि जिंकावा मग उपद्रवाची चिकित्सा करावी. परंतु त्यामध्यें जो शीघ्रकारी उपद्रव असेल त्याला पहिल्यानेंच शांत केलें पाहिजे. वैद्यानें प्रथमत. मूळव्याधि जिंकावा, किंवा त्यांत जो बलवत्तर उपद्रव असेल त्याला प्रथम जिंकावें. किंवा दोषाचे अविरोधानें चिकित्सा करावी.

**श्वासावर**—( १ ) पिपळी, कायफळ व काकडशिंगी यांचें चूर्ण मधाशी चाटलें असतां मोठ्या उग्र श्वासाचा नाश करील यांत संशय नाही.

ळयावरचा घाम उरःस्थळावर येत नाहीं तो मनुष्य यमाच्या घरीं लवकर जातो.— ज्याला दाट व बुळबुळीत घाम चोहींकडे सर्वांगास येतो आणि अंग थंड होतें तेव्हां तत्क्षणीं त्या रोग्याचें मरण आलें असें समजावें.

**इंग्लिश डाक्टराचें मत** ( असाध्यलक्षण ) प्रलाप--तापांत बडबड सुरु होण्याचे अगोदर रोग्यास घेरी येते, विषाची तीव्रता फार असली ह्मणजे रोगी बेशुद्धही होतो. या स्थितींत कधींकधी रोग्यास पित्ताची अथवा रक्ताची वांति होते. बेशुद्ध अवस्था कधी कधीं सहापासून छत्तीस किंवा अठ्ठेचाळीस तासपर्यंत राहते. रोग्यास कांहीं केल्यानें झोंप लागत नाही, पहिले दिवशीं ज्वर वाढलेला बराच वेळपर्यंत राहतो. पण बहुतकरून बारा अथवा सोळा तासांनीं सर्व लक्षणें कमी होतात. ज्वर कमी झालेला किती वेळपर्यंत कमी राहील याचा नेम नाही. दुसरे दिवशी फिरून ज्वर विशेष वेगानें येतो. आणि तो येण्यापूर्वी थंडी वाजत नाही, परंतु उष्णावस्थेची सर्व चिन्हें जास्त स्पष्ट असतात. वाईट परिणाम होणाऱ्या ज्वरांत कांवीळही उद्भवते. सन्निपाताची सर्व लक्षणें उद्भवतात. काळ्या रंगाची वांति होते. श्वासाला दुर्गंधी सुटते व आंकडी येऊन रोगी मरतो. सन्निपातज्वरांत शेंकडा पांचपासून दहा माणसें मरतात. दारू पिणारा व गलिच्छ ठिकाणी राहणारा रोगी बरा होण्याचा संभव थोडा असतो. नेहमीं १०४ डिग्रीपेक्षां जास्त ताप असणें, नाडी अति क्षीण, पुष्कळ अतिसार, जिभ कोरडी, लाल व भेगा पडलेली, अतिशय गुंगी, नंतर बेसावध स्थिति, हीं लक्षणें तिसऱ्या आठवड्यांत उद्भवून कफही फार झाला ह्मणजे रोगी वांचण्याचा संभव फार थोडा असतो.

**असाध्यलक्षण** ( वाग्भट )--ज्वरांत सर्व शरीराचा दाह, तहान, मूर्छा, शक्ति क्षीण होणें, सांधे सुटल्यासारखे होणें, हे विकार ज्यास अकस्मात् उत्पन्न होतात तो मरणार असें जाणावे. तसेंच प्रलेपकज्वरानें पीडलेल्या मनुष्याच्या तोंडावर पहाटेस जर अतिशय घाम येईल तर तोही वांचणें कठिण.

**अन्य ग्रंथाचें असाध्य मत**—जो. ज्वर आरंभापासून संतत सतत इत्यादि रूपेंकरून विषम झाला, अपरात्रीस येतो तो आणि क्षीण व रुक्ष पुरुषाचा ज्वर प्राणनाशक जाणावा.

**ज्वरीं पथ्य**--वांति द्यावी व लंघन करावें. प्रातःकाळीं यवागू द्यावी. घाम काढणें, व तिखट, कडू हे रस आणि पाचन, हें उपचार तरुण ज्वरावर करावे. आणि सन्निपातावर सर्व करावे. आमज्वरावर कफनाशक क्रिया करावी. अवलेह, अंजन, नस्य, गंडूप व घाम काढणें हे उपचार करावे.

**तरुण ज्वरावर अपथ्य**--स्नान, रेच, मैथुन काढे, व्यामाम, दिवसांस निद्रा, दूध, तूप, सर्व प्रकारच्या डाळी, मास, ताक, मद्य, गोड पदार्थ, जड पदार्थ, द्रव पदार्थ, अन्नाचें भक्षण, वारा घेणें, फिरणें, क्रोध आणि बहुत बोलणें हे पदार्थ तरुणज्वरी रोग्यानें सोडावे.

**मध्यम ज्वरीं पथ्य**—जुन्या साळीचा भात, जुन्या गव्हाची पोळी, अलुबुखार, यवागू, विलेपी, तांदळाची पेज, मुगाचें व तुरीचें वरण, करटोलीं, कारलें, काजू, दोडकी, सातपुती घोसाळी, चाकवत, तवकीर, तांदुळजा, गोडें डाळिंब, मनुका, बेदाणा, धणे, तांबड्या तुरी, मुग, मटक्या, ब्राह्मी, लसूण, शेळीचें दूध, व तिचें लोणी, कुळीथ, पडवळ, खिरण्या, तांबड्या साळी, शेवगा, कोंवळा मुळा, मसुरा, चणे, पिकलेलें कवठ, लघुअन्न, पडवळ, माठ, फोडणी दिल्याशिवाय भाज्या, हीं पथ्यें जाणावीं.

**साधारण सर्व ज्वरांवर अपथ्य**—ओकारी, दंतकाष्ठ, अतिभक्षण, दाह, करणारे व जड पदार्थ, वाईट पाणी, क्षार, तेलकट, तिखट व आंबट पदार्थ, पालेभाज्या, मोड आलेलें धान्य, तांबूल, कलिंगड, फणस, नवें धान्य, पिठाचे पदार्थ, ( लाडु वगैरे ) पौष्टिक पदार्थ, मिष्ट अन्न, स्नान, जागरण, तेलकट पदार्थांचा वास, थंड वारा, थंड पाणी, पुरणाची पोळी, थंड पदार्थ, हे पदार्थ ज्वरीतानें सोडावे–तसेंच मेहनत, स्त्रीसंग, नित्य स्नान, हवा खात फिरणें, व परिश्रम हे ज्वरमुक्त रोग्यानें चांगली शक्ति आल्याशिवाय करूं नये.



---

## मंत्र.

वज्रहस्तो महाकायो वज्रतुंडो महेश्वरः ॥ हतोऽसिवज्रतुंडेन भूम्यां गच्छ महाज्वर ॥
'ठः शः शांतः' तालपत्रे लिखित्वा तु कंठे बाहौच बंधयेत् ॥

**अर्थ**—वरील मंत्र ताडाच्या पानावर लिहून गळ्यांत किंवा बाहूला बांधावा ह्मणजे ज्वर शांत होतो.

**स्नानविधि**—( **कढूपाणी** ) ज्वरमुक्त झाल्यावर प्रथम स्नान करणें तें असें करावें कीं, चांगली उन्हाची वेळ पाहून स्नानांत कडू निंबाचीं पानें तीन मिळाश्यास कडू शेवग्याचीं पानें किंवा करंज, निर्गुडी इत्यादि वायुहारक वनस्पतीची पानें थोडी बेतांनीं घालून व थोडा ओंवा घालून ते पाणी चांगली उकळी येईपर्यंत कढवून त्यांत विसण गार पाणी न घालतां तसेंच खाली उतरून ठेवावें. आणि फार ऊन नाहीं व फार थंड नाही असें आपोआप झाल्यावर आजारी मनुष्यास ज्या ठिकाणीं वारा नाहीं अशा घरांतील मोरींत बसवून त्या पाण्याने स्नान घालावें. फारवेळ तेथें न बसतां लागलीच वस्त्रानें अंग चांगलें पुसून काढावें व बिछान्यावर तोंडावरून पांघरूण घालून एक तासपर्यंत निजवावें; ह्मणजे कोणत्याही प्रकारचा विकार न होतां अंग हलकें होतें.

---

# तृषा ( तहान शोष ).

॥ तृष्णाचषड्विधाप्रोक्तावातात्पित्तात्कफादपि ॥ त्रिदोषैरुपसर्गेणक्षयाद्धातोश्चषष्ठिका ॥

**अर्थ**—तृष्णारोग सहा प्रकारचा—वात, पित्त, कफ, त्रिदोष, आंगतुक, शस्त्रादिकेंकरून क्षत होऊन त्यापासून होते ती, उपसर्ग तृष्णा व धातुक्षयापासून होते ती. या प्रकारें सहा प्रकारची तृष्णा जाणावी. तृष्णा ह्मणजे मनुष्याला सर्वकाळ पाणी प्यावयाची इच्छा होते, आणि पाणी प्यालें असतांही तहान भागत नाहीं, पुनः पुनः इच्छा होते, तिला तृष्णा ( तहान ) ह्मणतात.

**कर्मविपाक**—चंद्र सिंहस्थ असून त्या लग्नी जन्म झाला असतां दंतरोग, भस्मरोग, व शोषरोग इत्यादि प्राप्त होतात. **परिहार**—चंद्रपीडानिरसनार्थ चंद्राचा जप, होम, दानादि विधान करावें.

**पूर्वकर्मविपाक**—मार्ग चालून श्रमलेली अशी गाय, व ब्राह्मण तृषित झाले असतां जो पाणी देत नाही त्याला तृषारोग, व मूर्छा इत्यादि होतात. **परिहार**—वरुणसूक्ताचा जपपूर्वक होम, जलदान, पायस ( दूध ) मूग, शर्करा, घृत इत्यादिकांचीं दानें करावीं. याप्रकारें दैविक प्रतिकार जाणावा.

**तृषेचें कारण** ( मा. नि. )—भय, श्रम व बलक्षय यांनी वायु कुपित होतो, तो पित्त वाढविणारे पदार्थांच्या संबंधेंकरून पित्तस्थानी ह्मणजे हृदयाचेठायीं पित्त संचित होऊन वातासहवर्तमान मनुष्याचे गळा, व पिपासास्थान यांप्रत जाऊन तृषा उत्पन्न करितो.

**वातजतृषा** ( मा. नि. )—मुख म्लान होतें, शंख व मस्तक यास पीडा, तोंडास अरुचि, ही तृषा शीतोदकानें फार वाढते. व टाळू, ओष्ठ, कंठ, यांस शूळ, दाह, संताप, मोह, बडबड, व श्रम इत्यादि होतात. **उपाय**—( १ ) गूळ व दही खावें. ( २ ) रुप्याच्या भांड्यांत तापविलेलें पाणी शीत करून द्यावें. ( ३ ) मस्तकास व सर्व अंगास सुगंधिक तैल लावावें. ( ४ ) सोनें, रुपें, मातीचें ढेंकूळ व वाळू यांतून एखादें अग्नींत तापवून पाण्यांत विझवून तें पाणी किंचित् उष्ण असें प्यावें. ( ५ ) पाण्यात मध व साखर घालून ते पाणी प्यावें.

**पित्तजतृषा** ( मा. नि. )—मूर्च्छा, अन्नद्वेष, बडबड, दाह, नेत्रास आरक्तपणा, फार तृषा लागणें, शीत पदार्थांची प्रीति, तोंड कडू, आणि तोंडातून धूर निघाल्यासारखा भास होणें, मळ, मूत्र व नेत्र यांस पिवळेंपणा, हीं लक्षणें होतात. **उपाय**—( १ )पिकलेलें उंबराचा रस सहा मासे समभाग साखर घालून द्यावा. ( २ ) उन्हानें तापलेल्या पाण्यांत लाह्याचें पीठ घालून द्यावें. ( ३ ) भोजन जिरल्यावर तृषा लागली तर तांदुळाचे धुवणांत थोडा मध घालून पिण्यास द्यावें.

**कफजतृषा** ( मा. नि. )—नेत्राश्रूंचा अवरोध झाला असतां कफानें जठराग्नि व्याप्त होऊन तृषा उत्पन्न होते. तेणेंकरून निद्रा, मस्तक, जड होतें व तोंड गुळमट, ही लक्षणें होऊन रोगी कृश होतो. **उपाय**—( १ ) ओल्या थंड वस्त्रानें पांघरूण घेऊन बसावें; ह्मणजे तृषा राहते. ( २ ) तुरटी, धायटीचीं फुलें, त्रिकटू, चवक, चित्रक, दर्भमूळ व तिळाचें काडें यांचा काढा खडीसाखर घालून द्यावा. ( ३ ) प्रथम कडू निंबाचा काढा प्राशनार्थ देऊन वमन करावें.

**क्षतजतृषा** ( मा. नि. )—क्षतसंबंधीं वेदना, व रक्तस्राव उत्पन्न होतो. तिचें क्षतनिवारण करावें. **उपाय**—( १ ) मांसरस देऊन रक्तस्राव बंद करावा.

**क्षयजतृषा** ( मा. नि. )—रसादि धातूच्या क्षयेंकरून तृषा उत्पन्न होते, येणेंकरून मनुष्य रात्रंदिवस उदकपान करीत असतांही तृप्ति पावत नाहीं. तिला वैद्य सन्निपातजन्य ह्मणतात. हिचेठायीं रसक्षयसंबंधी सर्व लक्षणें असतात, असें जाणावें. **उपाय**—( १ ) दुधाचा काढा किंवा मांसरस अथवा जेष्टीमधेचा काढा खडीसाखर घालून द्यावा.

**आमजातृषा** ( मा. नि. )—वात, पित्त, कफ, या तिघांचीं लक्षणें असतात. इजमध्यें हृदयशूल, कृशत्व व वमन हीं होतात. **उपाय**—( १ ) त्रिदोष शमविणारे व पाचक असे उपाय करावे.

**अन्नजातृषा** ( मा. नि. )—स्निग्ध, आम्ल, खारट, जड, यांच्या भक्षणेंकरून उत्पन्न होते. **उपाय**—( १ ) स्निग्ध अन्नाच्या भक्षणानें जी तृषा होते ती गुळाचे पाण्यानें शांत करावी. आणि अति रुक्ष व दुर्बळ अशा मनुष्याची तृषा वाळ्याचे काढ्यानें शांत करावी.

**असाध्यलक्षण** ( सुश्रुत )—म्लान भाषण, मोह, मुखग्लानि, गळा, टाळू व हृदय यांना शोष, ज्वर, क्षय, कास यांहींकरून युक्त असा रोगी असाध्य जाणावा. तशाच सर्व तृषा अति वाढल्या असतां व तो रोगी कृश झाला असता व ओकारीनें व्याप्त झाला असता त्याला तृषा मारते.

**सर्व प्रकारचे तृषेवर उपाय**—( १ ) मिरें, जेष्टीमध, काळ्या उंबराचीं पानें, व निळें कमळ, हीं चार औषधें चार चार तोळे घेऊन चांगली कुटून २४ तोळे पाणी घेऊन मडक्यांत घालावें. नंतर त्यांत तीं औषधें रात्रीस भिजत घालून प्रातःकाळी तें पाणी गाळून खडीसाखर घालून प्यालें असतां तहान व ओकारी हे रोग दूर होतात. ( २ ) जव भाजून पीठ करून थंड पाण्यांत फार पातळ नाहीं व फार दाट नाही अशा बेतानें कालवून त्यांत तूप मिळवून प्यालें असतां तहान, दाह, रक्तपित्त, हे रोग दूर होतात. ( ३ ) जिरें, धणे, आलें आणि पादेलोण, यांचें चूर्ण अर्धे व दुप्पट चांगली मध घालून प्यालें असतां तृषानाश होईल. ( ४ ) मातीचें ढेंकूळ, खापरी, वाळू यातून कांहीं तापवून दह्यांत विझवून तें

दहीं गूळ घालून प्यावें. ( ५ ) वाळा, मैलागर, रक्तचंदन, पद्मकेशर व काळा वाळा हीं गुलाबपाण्यांत वांटून त्याचा लेप मस्तकावर करावा. ( ६ ) पिंपळी, जिरें, साखर, नाकेशर व डाळिंब यांचें चूर्ण मधांत द्यावें. ( ७ ) कोष्ठ, कासविंद्याचें मूळ, व जेष्ठीमध ही पाण्यांत वांटून खडीसाखर घालून द्यावी; ह्मणजे फार दिवसांची तृषा शांत होते. (८) वडाच्या पारंब्या, हिरडेदळ, पिंपळी व जेष्ठीमध यांचा लेह मधाशीं द्यावा. (९) वडाच्या पारंब्या खडीसाखर, लोध, डाळिंब व जेष्ठीमध यांचा कल्क मध घालून तांदुळाचे धुवणांत द्यावा; ह्मणजे तहान व ओकारी नाश पावते. ( १० ) निळें कमळ, नागरमोथे, मध, लाह्या व वडाचे अंकुर हीं पाण्यांत वांटून गोळी मुखांत धरावी, ती तत्क्षणी तृषेचा नाश करिते ( ११ ) खजूर, मनुका, जेष्ठीमध व खडीसाखर, ही प्रत्येक २ तोळे, पिपळी, दालचिनी, तमालपत्र व एलची ही प्रत्येक एकेक तोळा, यांची मधाशीं गोळी करून द्यावी; ह्मणजे तहान, मोह व रक्तपित्त, यांचा नाश होतो. ( १२ ) जिरें, धणे, मनुका, चंदन व कापूर यांचें चूर्ण थंड पाण्यांत द्यावें. (१३) दह्याचे मठ्ठ्यांत साखर, सातू व बोरें, याचें पीठ घालून द्यावें. आणि सर्व अंगाला तिळाची पेंड आणि कांजी यांचा लेप करावा; ह्मणजे उन्हापासून तहान असली तर तिचा नाश होतो. ( १४ ) रोगाचे संबंधानें तहान असली तर धण्याचें पाणी, मध व साखर घालून द्यावें, आणि फार वेळ तहान लागून दुःसाध्य झाली तर वडाचीं कोंवळीं पानें अथवा पारंब्या, जेष्ठीमध, पिपळी व मध याची गोळी मुखांत धरावी. ( १५ ) पारा व रुपें यांची खलून घट्ट गोळी करून मुखांत धरावी. ( १६ ) पारा, गंधक, कापूर, शिलाजीत, वाळा व साखर याचें सूक्ष्म चूर्ण करून बलाबल पाहून प्रातःकाळीं ४ गुंजांपर्यंत द्यावें. आणि वर शिळें पाणी प्यावें; ह्मणजे अत्यंत तृषा असली तरी तिचा नाश होईल.

**तृषेवर पथ्य**—रेच, वमन, निद्रा, स्नान, तोंडांत कवलधारण, हरीक, जुन्या साळी व लाह्या यांची विलेपी, निर्जल देशांतील पशूचें मांस, साखर, मध व मधुर दहीं एकत्र करून गाळावा, तो रागखांडव, मूग, मसुरा, चणे, केळफूल, ताक, द्राक्षें, वाल, कवठ, बोरें, खजूर, डाळिंब, आंवळे, काकडी, वाहतें पाणी, लिंबू, करवंद, माहाळुंग, गाईचें दूध, वाळ्याचें पाणी, थंड पाणी, दूध, पऱ्हीं, तळ्याचें पाणी, शतावरी, नाकेशर, एलची, जायफळ, धणे, चादण्यात बसणें, थंड वारा, मोत्याचे अलंकार, नदीत स्नान करणें, अंगाला शीत चंदनादिकाची उटी लावणें, बेदाणा, भोंपळा, पांढरें रताळू, रामफळ, लोणी, पिठीसाखर, यव, तांबड्या साळी, मोहाचा नारळ, सारख-निंबू, सरोवराचे पाणी, तापवून थंड केलेलें पाणी, अगस्त्याच्या शेंगा, आमसूल, पाडाचा आंबा, रसाळ आंबा, आब्याची पोळी, जुन्या तांदुळाची कण्हेरी, यवागू, टरकाकडी, पांढरा कांदा, कालें, केळें, सोनकेळी, चुका, तवकीर, कबाबचिनी, पाणी, तांबडा भोपळा, लवंगा, काळी द्राक्षें, दिवसास निद्रा ही पथ्यें जाणावीं.

**तृषेवर अपथ्य**—पक्कें उंबर, अंगास तेलादिक लावणें, अंजन, घाम काढणें,

धूमपान, व्यायाम, नस्य, कोहळा, जडान्न, आंबट, खारट, तुरट व तिखट हे पदार्थ, खराब पाणी, तांबूल, सावे व उन्हांत फिरणें हें वर्ज करावें.

---

# दाह.

॥ रक्तपित्तात्तथा रक्तात्तृष्णायाः पित्ततस्तथा ॥ धातुक्षयान्मर्मघाताद्रक्तपूर्णोदरादपि ॥

**अर्थ**–देहाची आग होते त्याला दाह ह्मणतात. तो रोग सात प्रकारचा आहे. रक्त व पित्त याच्या कोपेंकरून होतो तो; रक्ताच्या कोपेंकरून, तृष्णेचे निरोधेंकरून, पित्ताच्या कोपेंकरून, रसादि धातूंच्या क्षयेंकरून, मर्मस्थळी आघात होऊन त्यापासून होतो तो, मोठा गाढशस्त्रादि प्रहार होऊन कोठ्यात रक्त जमून त्यापासून होतो तो. याप्रकारें जाणावे.

**कर्मविपाक**—जन्मकाळीं तनुस्थानीं मंगळ व चतुर्थस्थानीं रवी असतां, दाहरोग होतो. **परिहार**—रवी आणि मंगळ यांची दानें, होम, जप इ० करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—अग्नीवर थुंकलें असतां ज्वर, शूल, दाह, नेत्र पीतवर्ण इत्यादि रोग होतात. **परिहार**—कपील नामक ग्रहाच्या उद्देशानें बलिदान करावें.

**मद्यपानिजदाह** ( मा. नि. )—मद्यानें कुपित झालेल्या पित्ताची उष्णता, पित्तरक्तानें वाढून भयंकर दाह उत्पन्न होतो. याजवर पित्तशामक औषधें योजावी. ( १ ) बोरें व आंवळें यांनी युक्त आबील अंगास चोळावी. अथवा वस्त्राला लावून तें वस्त्र पाघरावें. ( २ ) लघुरोहिष गवत व चंदन याचा लेप अंगास लावावा व चंदनाचें पाणी शिपडून ताडाचे पंख्यानें वारा घालावा. ( ३ ) केळीच्या पानावर शयन करावें. ( ४ ) थंड पाण्यांत बसावें किंवा स्नान करावें.

**रक्तज व पित्तजदाह** ( मा. नि. )—देहांतील रक्त कुपित होऊन अत्यंत दाह करितें. रोगी अग्नीजवळ बसल्याप्रमाणें तापतो, तृषा लागते, डोळे लाल होतात, तोंडाला व अंगाला लोखंडासारखी घाण येते आणि अंगावर कोणी विस्तवच टाकतो अशी वेदना होते. पित्तापासून जो दाह होतो तो पित्तज्वरासारखा आहे. ह्मणजे पित्तज्वराची लक्षणें त्यांत असतात. त्याजवर उपचारही पित्तज्वराचे करावे. **उपाय**—( १ ) अभ्रकभस्म, निंबू, हिंगूळ, पारा व गंधक एकत्र मधांत प्रहरभर खलावें, नंतर दोन वाल आल्याच्या रसात द्यावें. हें वाताच्या कोपापासून झालेला दाह शांत करील. पथ्य–ताकभात, हें नवज्वर नाशकही आहे.

**तृषानिरोधजन्यदाह** ( मा. नि. )—तृषेचा निरोध केल्यानें उदकरूप धातू क्षीण होऊन तेज ह्मणजे पित्तोष्मा वाढतो आणि देहाला आंतून व बाहेरून दाह करितो. त्यानें रोगी बेशुद्ध होतो, गळा, ताळु, ओठ हे अत्यंत कोरडे पडतात, जीभ

बाहेर काढून कांपवितो. **उपाय**—( १ ) भाजलेल्या सातूचें पीठ, तूप व थंड पाणी एकत्र करून फार पातळ नव्हे व फार घट्ट नव्हे असें प्राशन करावें. म्हणजे तृषा, दाह पीडा व पित्त यांचा नाश होतो.

**रक्तपूर्णकोष्ठजदाह** ( मा. नि. )—शस्त्रादिकांचा प्रहर होऊन रक्तानें कोष्ठ भरून जो दाह होतो तोही फार दुःसाध्य आहे. **उपाय**—( १ ) धणे, आंवळकठी, आडूळसा, मनुका व पित्तपापडा यांचा हिम द्यावा. तो रक्तपित्त, ज्वर, दाह, तृषा व शोष यांचा नाश करील.

**धातुक्षयजन्य दाह** ( मा. नि. )—रसादि धातूंच्या क्षयापासून जो दाह होतो त्यानें मूर्छा येते, तहान लागते, स्वर खोल जातो. निचेष्ट पडतो व अत्यंत दुःखी होऊन मरतो. **उपाय**—( १ ) खजूर, आंवळकठी, पिपळी, शिलाजीत, वेलदोडे, जेष्ठीमध, पाषाणभेद, काकडीचें बी, धणे व साखर यांचें चूर्ण जेष्ठीमधेच्या काढ्याबरोबर द्यावें; तेणेंकरून अंगदाह, गुददाह, लिंगदाह, क्षीणशुक्रजदाह, शर्करा अश्मरी व शूल यांचा नाश होईल; व हें वृष्य व बल देणारें असें आहे, व मूत्ररोग आणि शुक्रापासून झालेले रोग यांचाही नाश करितें.

**क्षतजन्य दाह**—( मा. नि. )—क्षत, उपोषण आणि शोक यांपासून दाह होतो. त्यामध्यें अभ्यंतरीं अत्यंत दाह, तहान, मूर्छा, आणि बडबड ही लक्षणें होतात. **उपाय**—( १ ) शतधौतघृताचा अंगास लेप करावा. ( २ ) चंदन, वाळा, कोष्ठकोळिजन, नागरमोथे, आंवळकठी, गठोणा, कमळ, मोहाचें फुल, जेष्ठीमध, द्राक्षें व साखर, ही समभाग, घेऊन त्यांचें चूर्ण करून त्यासमान साखर घालून प्रातःकाळीं थंड पाण्याबरोबर प्यावें; तेणेंकरून रक्तपित्त, श्वास, पित्तगुल्म, अंगदाह, शिरोदाह, मस्तकांतील भ्रम, कामला, प्रमेह व पित्तज्वर यांचा नाश होईल.

**औषधीजन्य दाह** ( सुश्रुत )—उष्ण औषधी सेवन केल्यापासून दाह झाला असतां त्याचे शमनार्थ पाणी, आंवळे, द्राक्षें, केळीं, उंस, साखर आणि काकडी हे पदार्थ द्यावे, ते हितकारक होतात.

**सर्व प्रकारचे दाहावर उपाय**—( १ ) पांढरा चंदन उगाळून त्यांत कापूर घालून अंगास उटी द्यावी. ( २ ) वाळा, गुलाबकळी व खडीसाखर यांचें चूर्ण तांदुळाचे धुवणांत किंवा दुधांत कालवून द्यावें. ( ३ ) चंदन, पित्तपापडा, दर्भमूळ, वाळा, नागरमोथे, कमळाची बिसें, बडीशोप, धणे, पद्मकाष्ठ व आंवळकठी, याचा काढा द्वितीयांश करून त्यांत साखर व थंड झाल्यावर मध घालून द्यावा. म्हणजे तत्क्षणीं मोठ्या वाढलेल्या दाहाचा नाश होतो. (४) काळा, वाळा, रक्तचंदन व पांढरा वाळा, यांचा काढा साखर घालून थंड करून द्यावा. तो दाह व पित्तज्वर यांचा नाश करितो. ( ५ ) ज्याला पित्त वाढलें असे वाटत असेल त्यानें साखरपाणी अथवा उसाचा रस किंवा दूध प्राशन करावें. ( ६ ) पुनर्नवादि तेल अंगास मर्दन करावें.

( ७ ) अति थंड पाणी प्यावें आणि शीत उपचार करावे, किंवा सुवासिक चंदन लाविलेल्या अलंकारयुक्त मंजुळ भाषणाचे स्त्रियेचें आलिंगन करवावें. ( ८ ) उत्तम सकुमार स्त्रियेचें गायन ऐकावें. ( ९ ) नारळाचें पाणी साखर घालून प्यावें.

**असाध्य लक्षण** ( मा. नि. )—मर्माचेठायीं अभिघात झाला असतां दाह होतो तो असाध्य होय. तसेंच रोग्याचें अंग बाहेरून थंड झालें असतां सर्व दाह असाध्य होय.

**दाहावर पथ्य**—साटक्या साळी, मूग, मसुरा, चणे, यव, निर्जल देशांतील मांसरस, लाह्याचा मंड, दुधाचें लोणी, काकडी, केळें, फणस, डाळिंब, पडवळ, दूध, आंवळकठी, तोंडलें, खजूर, धणे, बडीशोप, कोंवळें ताडफळ, चारोळ्या, शिगाडे, वाळ्याचें थंड पाणी, थंड भुयार, अभ्यंग, स्नान, थंड बगीच्या, कथा, गायन. मंजुळ भाषण, वाळा व चंदन, यांचा लेप, चांदणें, थंड वारा, स्त्रियांचें आलिंगन, थंड वाळवंट, मधुर रस, व सर्व पित्तशामक पदार्थ, पांढरें रताळू, रामफळ, आक्रोड, इरसाल आंबा, हारकाचा भात, पांढरा व काळा उंस, अंजीर, टरकाकडी, कार्ले, खरबूज, खारीक, तवकीर, तांदुळजा, तूप, गाईचें व ह्मशीचें दूध, मटक्या, मोहाचा नारळ, तापवून निवालेलें पाणी, ताजें थंड पाणी, उंबर, तालीमखाना, मनुका, तांबड्या साळी, नारळ, गोडंबी, भुईकोहळा, पिठीसाखर, खडीसाखर, इ० सेवन करावी.

**दाहावर अपथ्यें**—क्षीरमत्स्यादि विरुद्धान्न, विरुद्धपानें, क्रोध, मलमूत्रादिकांचा वेगरोध, स्त्रीगमन, क्षार, पित्तकारक पदार्थ, व्यायाम, श्रम, उन घेणें, ताक, विडा, मद्य, हिंग, कडू, तीक्ष्ण, व उष्ण पदार्थ, तांदुळाचे पिठाचे पदार्थ, बासुंदी, पेढे, बर्फी, मोड आलेले धान्य, गाजर, तांबुल, कुळीथ, नारळाचें दूध, सैंधव, ह्मशीचें लोणी इ० पदार्थ वर्ज करावे.

---

## नारू.

**कारण**—हातापायामध्यें दोष कुपित होऊन विसर्पासारखी सूज येते ती फुटून क्षत पडतें तेथें जळजळ फार होते व मास शुष्क होऊन सुतासारखा वाटोळा पांढरा दोरा बाहेर येतो, तो हळुहळु क्षताच्या बाहेर निघताना तुटला तर फार दुःखदायक होतो आणि सगळा, बाहेर निघाला ह्मणजे सूज ओसरते. त्यांत कांही अंश राहिला असला तर पुन्हां दुसरे ठिकाणी होतो. त्या रोग्याला स्नायुक ( नारू ) ह्मणतात. त्यावर विसर्पाप्रमाणें चिकित्सा सांगितली आहे. कदाचित् हाताला किंवा पायाला नारू होऊन ठणका लागून तुटला असतां हातपाय आखडतात. आणि रोगी खुळा व लुला होतो. शिवाय ज्यांत फार जिवंत पाणी न-

सतें व तें न वाहतां त्यांत कपडे वगैरे धुतले जातात. असे जें लहान तळाव विहिरी वगैरेचें पाणी तें पिण्यापासून नारूरोग शरीरांत उत्पन्न होतात.

**नारूवर उपाय**—( १ ) वाभळीचें वीं गोमूत्रांत वांटून लेप करावा. (२) निर्गुडीचे पाल्याचा रस दोन तोळे त्यांत गाईचें तूप दोन तोळे घालून द्यावा. ( ३ ) टांकणखार ६ मासे व जुना गूळ दीड तोळा एकत्र गोळी करून द्यावी, दिवस सात. ( ४ ) नवसागर १ मासा दोन तोळे तुपांत घालून द्यावा, दिवस सात. ( ५ ) एक धोत्र्याचें पान घेऊन त्यावर रिठा, गूळ व थोडी आफू पाण्यांत उगाळून लावावी, तें पान नारूवर बांधावें व तीन दिवस सोडूं नये ह्मणजे नारू आंतले आंत जळून जातो, परंतु हा उपचार नारू फुटल्यावर करावा. ( ६ ) गहु व तागाचें वीज यांचें चूर्ण तुपांत भाजून सहा मासेपर्यंत घेऊन गुळांत कालवून तो लाडू भक्षण करावा. दिवस सात. ( ७ ) नारळाचे अर्ध शेर पाण्यांत तुरटीची लाही एक मासा घालून तें पाणी प्यावें, दिवस तीन. ( ८ ) मोठें वागें चिरून त्यांत सहा मासे वजनाचा आंवळेसर गंधकाचा खडा घालावा व वरून कणकीचा लेप करून फुफाट्यांत भाजावें नंतर ऊन असतांच वरील लेप काढून ज्या जागीं नारूची सूज आली असेल तेथें त्या वांग्यानें शेकावें; ह्मणजे सूज लवकर वरी होऊन नारूच्या तांतूचें पाणी होतें. व आंतील गंधकाचा खडा तीन दिवस दोन मासे प्रमाणें पावशेर दुधांत घालून पीत जावा; ह्मणजे तीन दिवसांत नारूचा नाश होतो. ( ९ ) वचनाग पाण्यांत उगाळून नारूवर लेप करावा. ( १० ) भिवयापासून कपाळावर दोन बोटें उंच व आडीच बोटें रुंद अशा जागीं फांसण्या टाकून थोडें रक्त काढावें. नंतर लागलींच आळशीचें पोटीस करून त्यांत थोडें मीठ घालून दोन बोटें जाडीचा ऊन ऊन असा लेप द्यावा. व त्याजवर फडक्यानें गच्च बांधून टाकावें. हा प्रकार अस्तमानीं करून तो लेप चार प्रहर रात्र तसाच ठेवावा व प्रातःकाळीं शरीरांतील सर्व नारूचे तंतु बाहेर निघून येतात. ते सर्व काढून तेथील जागा पुसावी, परंतु त्याठिकाणी पाण्याचा स्पर्श करूं नये. नंतर मैदालकडी पाण्यांत उगाळून वर लेप करावा; ह्मणजे जन्मभर कधींच नारू होणार नाहींत. ( ११ ) नारूचा दोरा बाहेर आला असतो त्याजवर हरप्रयत्नानें विचवाची नांगी मारवावी; ह्मणजे तत्काळ सर्व नारू बाहेर येतो.

**अपथ्य**—यांजवर पथ्यापथ्यें कृमिरोगावरचीं करावी.

---

## नासारोग.

॥ तथा नासाभवागदाः ॥ अष्टादशैवसंख्याताः ॥

**अर्थ**—नासारोग ह्मणजे नाकांतले रोग ते अठरा प्रकारचे आहेत.

**कर्मविपाक**—शनि, मंगळ, रवी, हे अनिष्टस्थानापन्नअसून एक राशिस्थ असतां नासिकारोग, नाना व्याधी, शत्रुभीति इत्यादि होतात. **परिहार**—त्या त्या ग्रहाचीं दानें, जप, होम इत्यादि करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—विद्येंकरून दोषांचें संगोपन करणें, दुसऱ्याचे दोष काढणें, अनुष्ठानकालीं कुक्कुट, गर्दभ इत्यादिकांचें मैथुन पाहणें इत्यादि कारणें करून नासारोग उत्पन्न होतो. **परिहार**—सुवर्णदान, कृच्छ्रप्रायश्चित्त, श्रीसूक्तजप इ० करावें.

**पूर्वरूप** ( मा. नि. )—शिंका, मस्तक भरल्यासारखें वाटणें, अंग ताठणें, अंग मोडून येणें, अंगाला शहारे येणें व दुसरे नानाप्रकारचे तत्काळीं होणारे रोग ( घ्राणधूमायनादिक ) पडसें येणार असलें ह्मणजे मनुष्यास हे विकार होतात.

**कारण** ( मा. नि. )—अति स्त्रीसेवन, मस्तक तापणें, अति धूर घेणें, नाकांत धूर शिरणें, शीतोपचार, फार ऊन घेणें, आणि मळ मूत्राचा अवरोध, हीं कारणें तत्काळ प्रतिश्याय उत्पन्न करितात. तसेंच वात, पित्त, रक्त, आणि कफ हे आपल्या स्वकारणानें कुपित होऊन मस्तकाचे ठायी पडसें उत्पन्न करितात. तो प्रतिश्याय पांच प्रकारचा आहे.

**वातप्रतिश्याय लक्षण** (मा. नि.)—नाक ओढल्या सारखें होऊन कफेंकरून कोंडतो व स्राव अल्प होतो व गळा, टाळू, ओठ यांचा शोप, शंखाचे ठायीं फार पीडा होते व स्वर फिरतो या रोगाला वात प्रतिश्याय असें ह्मणतात.

**पित्त प्रतिश्याय लक्षण** ( मा. नि. )—ज्या पडशाचे ठायीं नाकातून उष्ण व पीत वर्ण असा स्राव होतो व मनुष्य कृश, व पाडुरवर्ण होऊन संतप्त होतो आणि तृषेनें फार पीडित होऊन नाकांतून धुरा सारखा उष्ण श्वासोच्छ्वास सोडतो, या रोगाला पित्त प्रतिश्याय ह्मणतात.

**कफप्रतिश्याय लक्षण** ( मा. नि. )—ज्या पडशाचे ठायीं नाकांतून कफ धूम्रवर्ण अथवा पांढरा असा वारंवार निघतो व डोळ्याला पिंवळटपणा येतो, गळा, टाळू, ओंठ व मस्तक यांस फूट लागते, खोकला, अरुचि श्वास इत्यादि लक्षणें होतात.

**रक्तप्रतिश्यायाचें लक्षण** ( मा. नि. )—रक्ताचे कोपेंकरून नाकांतून रक्तस्राव, नेत्र आरक्त वर्ण, उरामध्यें पीडा, श्वासोच्छ्वासाला दुर्गंधी, ऊर बधिर, कान, डोळे व नाक यास कंडू, सुगंध अथवा दुर्गंध यांचें ज्ञान न होणें, हीं लक्षणें होतात. हे सर्व प्रतिश्याय उपेक्षिले असतां कालेंकरून असाध्य होऊन दुष्ट दशेस पोंचतात.

**सन्निपात प्रतिश्याय लक्षण** (पिनस ) ( मा. नि. )—त्रिदोषाचे कोपेंकरून जो प्रतिश्याय रोग वारंवार उत्पन्न होऊन कारणावांचून कमी किंवा जास्त किंवा अकस्मात नाहीसा होतो. नाक क्षणांत कोरडें व क्षणांत ओलें होतें, पुन्हा

वाहवयास लागतें व नाक कोंदून सुगंध अथवा दुर्गंध यांचें ज्ञान नसतें याप्रमाणें हा दुष्ट प्रतिश्याय कष्टसाध्य जाणावा. या मध्यें सर्व इंद्रियांस त्रास होतो, अग्निमांद्य, ज्वर, श्वास, कास,ऊर व बरगड्यांत कळ, पुवाप्रमाणें काळसर, रक्ताच्या गुठळ्यानीं युक्त असा शेंबूड येतो; व लांब, स्निग्ध,पांढरे व बारीक असे कृमि होतात. यांचीं विशेष लक्षणें अशी होतात की, नाकांत एक व्रण पडून दुर्गंधयुक्त पुवाचा अथवा रक्तमिश्रित पुवाचा स्राव होतो, नाकात खपली धरिते, नेत्राचे अश्रुवाहक नासिकांतर्गत नलिका बंद झाल्यानें डोळ्यांतून पाणी वारंवार वाहूं लागतें. वेळेवर औषधोपाय न पोंचला तर आंतील मांसाचा पू होऊन निवून गेल्यावर नाक बसतें, वास कळत नाहीं. व हा रोग अति वाढला असतां टाळ्यास भेग पडून पू लस तोंडांत उतरते. या रोगास अलीकडे प्रचारांत पीनस असें ह्मणतात. या रोगांनी नाकांतून नानाप्रकारच्या रंगांनीं पू बाहेर येतो. याजवर उपाय—( १ ) बदामाचें तेल पांच तोळे, गाईचें तूप पांच तोळे, कापराचें तेल अर्धा तोळा, माक्याचा रस एक तोळा, आडूळशाचा रस एक तोळा, जासवंदीचे फुलाचा रस अर्धा तोळा, रिंगणीचा रस एक तोळा, मेंढीचें दूध हें अर्धा शेर, हे पदार्थ घेऊन प्रथम ते अग्नीवर ठेवून थोडे आटवावे. नंतर त्यांत वरील तेल व रस घालावे. शिवाय पावशेर पाणी घालून मंदाग्नि लावून कढवून तूप शेष राखावें. नंतर तें तूप दररोज टाळूवर चोळून नाकातही घालीत जावें व थंड पाण्यानें स्नान डोक्यावरून करावें ह्मणजे सात दिवसांत रोग बरा होतो.(२) पिनस यावर पडशाप्रमाणें चिकित्सा करावी. (३) सवजाचा रस एक तोळा घेऊन त्यांत अरतीकापूर सुमारें एक मासा घालून एके ठिकाणी मिश्र करून कुपीत भरून ठेवावें. सांजसकाळ चार चार थेंब नाकात सोडीत जावे. याप्रमाणें सात दिवस केलें असतां नाकांतील जळमटें, घाण, पू व रक्त पडणें हें बंद होऊन पिनसरोग बरा होतो. ( ४ ) तिळाचें ताजें तेल २ तोळे, माक्याचा रस १ तोळा, वावडिंगाचे दाणे दोन मासे, आघाड्याचा क्षार एक मासा, कापूर एक मासा कपिला तीन मासे, यांपैकीं रस व तेल खेरीज करून सर्व औषधाचें चूर्ण करून नंतर रस व तेल त्यांत मिळवून तें पात्र अग्नीवर ठेवावें. नंतर एकजीव होईतोंपर्यंत ढवळून त्यांत एक तोळा मध घालून एकत्र करून चागला घट्ट पाक करावा. नंतर दररोज दोन थेंब नाकात सोडीत जावे व तेंच औषध टाळूवर चांगलें मर्दन करीत जावें; ह्मणजे सात दिवसांत नाकातील घाण, पू, जळमटें, लस वगैरे नाहीशी होऊन पदार्थांचा वास चांगला येऊं लागतो, व पिनस बरा होतो.

**साध्यासाध्य विचार** (मा. नि )—सर्व प्रतिश्याय औषध उपाय न केले असतां कालेंकरून दुष्ट झाले ह्मणजे असाध्य होतास. यामध्यें पांढरे, स्निग्ध, बारीक व लांब असे किडे असतात, कृमीजाशिरोरोगाच्या लक्षणासारखी ज्यांत लक्षणें होतात तें असाध्य. व अंग हलकें होणें, शिंका कमी होणें, कफ चिकट व पिवळा होणें, व रस आणि वास कळूं लागणें ही साध्य लक्षणें जाणावी.

**प्रतिश्याय ह्मणजे पडसें याजवर उपाय**—(१) गाईचे दुधांत आफू ख-

लून किंचित् उन करून नाकावर घालावी. ( २ ) ताजे फुटाणे खावे व वर पाणी पिऊं नये. ( ३ ) त्रिकटू, एरंड, वावडिंग, देवदार, काळें अतिविष, कोष्ठ, हिंगणबेट. वांग्याचें बी, निशोत्तर, शिरस, कुजलेला मासा, ऐरणीचीं फुलें, पिलूचीं फळें, शेवग्याच्या शेंगा, घोड्याचें मूत व लिंदीचा रस, हत्तीचें मूत यांचा एके ठिकाणी कल्क करून तागाच्या फडक्यास लावून त्या फडक्याची वात करावी व नाकानें आणि तोंडानें तिचा धूर प्यावा. ( ४ ) क्षयरोग व कृमि यांवरील चिकित्सा करावी. ( ५ ) तीक्ष्ण घृतें, नस्य व कवल हीं योजावीत. ( ६ ) सुंठ, पिंपळी, कोष्ठ, वावडिंग व मनुका यांचा कल्क व काढा यानी सिद्ध केलेलें तूप किंवा तेल नाकांत घातलें असतां शिंका व पीनस हे विकार दूर होतात. ( ७ ) सुंठ, दालचिनी व खडीसाखर यांचा काढा द्यावा. (८) सुंठ व दालचिनी याचा लेप मस्तकास द्यावा.(९) मिरपुड व गूळ ही दह्याबरोबर सेवन करावी व नुस्त्या गव्हाचें अन्न पथ्यास द्यावें भात देऊं नये. ( १० ) काळ्या माक्याचा रस १० तोळे, तूप १० तोळे, अरती कापूर १ तोळा व पाणी १० तोळे, हे पदार्थ एकत्र करून मंदाग्नीवर तूप शेष राहितोंपर्यंत, कढवावें. नंतर गाळून बाटलीत भरून ठेवावें व तें तूप टाळूस चोळीत जावें. व चार चार थेंब प्रत्येक नाकपुडींत सोडीत जावे ह्मणजे, सात दिवसात गुण येतो. ( ११ ) नुस्ता काळ्या माक्याचा रस नाकपुड्यांत थोडा घालीत गेलें असतां शिंका येऊन नाकातील सर्व जळमटें पडून जाऊन त्वरित गुण येतो.

**पूतिनस्य** ( मा. नि. )—गळा व टाळा यांत दुष्ट झालेल्या दोषांनीं वायुमिश्रित होऊन नाक व तोंड यांच्या मार्गानें दुर्गंधयुक्त पू बाहेर निघतो. **उपाय**—(१) रिंगणी, दातीमूळ, वेखंड, शेवगा, रास्ना, सुंठ, मिरी, पिंपळी आणि सैंधव याच्या कल्कात व काढ्यांत तेल सिद्ध करून नाकांत सोडावे.

**नासार्श** ( सुश्रुत )—वातादि दोष, त्वचा व मांस यातें दूषित करितात. त्या योगाने एका नाकपुडीत किंवा २ नाकपुड्यात मांसांकुर उत्पन्न होतात. **उपाय**—( १ ) तिळाचे तेलात जितकें तेल तितकीच तांबडी कण्हेर, जाई, व मोगरी याचे फुलाचा अंगरस मिश्र करून तें मिश्रण नाकात घालावें. यानें नासार्श नाश पावतात. ( २ ) आघाड्याचें बी, चुलीवरील घेरोसा व सैंधव ही औषधें तेलात घालून ते तेल पक्क करावें; ह्मणचे नासार्श नाश पावतो. (३) नासार्श व नासार्बुद यांवर प्रथम खाजवून नंतर दातीमूळ, निशोत्तर, सैंधव, मनशीळ, हरताळ, व पिंपळी यांच्या कल्काची वात करून तिला तूप व मध लावून नाकात घालावी. ( ४ ) लाल कण्हेराचें मूळ पाण्यांत उगाळून मोडावर लेप द्यावा. ( ५ ) क्षारप्रकरणांतील क्षार लावावे.

**नासापाक** ( मा. नि. )—नासिकाश्रित पित्त दुष्ट होऊन नाकांत व्रण उत्पन्न करितें, आणि नाक आतून पिकते व पुवानें ओलें असतें, गंधयुक्त लस वाहते. **उपाय**—( १ ) राळ, अर्जुन, उंबर व कुडा याच्या सालीचा काढा करून

त्यानें नाक धुवावें व यांच्या कल्कांत घृत सिद्ध करावें तें नाकांत घालावें. ( २ ) कायफळ, पुष्करमूळ, काकडशिंगी, सुंठ, मिरीं, पिंपळी आणि वडिशेप यांचा काढा किंवा चूर्ण करून आल्याच्या रसाशी पडसें, स्वरभंग, तमक, श्वास, हलीमक, सन्निपात, कफ, वात, खोकला व दमा यावर द्यावें.

**पूयरक्त** ( मा. नि. )--मस्तकात वातादि दोष स्वकारणांनीं कुपित झाले असतां अथवा कपाळावर लागल्यानें नाकांतून पूमिश्रित रक्त वाहतें. **उपाय**-(१) रक्तपित्तनाशक काढे, नस्य इ० उपाय करावे ( २ ) माका, लवंगा, जेष्टीमध, कोष्ठ आणि सुंठ, यांच्या काढ्यांत तेल सिद्ध करून त्याचें नस्य द्यावें; ह्मणजे अस्थिगत व शिरोगत पू व रक्त यांचा नाश होऊन आणखीही १०० रोगांचा नाश करील यांत संशय नाहीं. ( ३ ) कुड्याची साल, हिंग, मिरी, लाखेचें शिंर, कायफळ, कोष्ठ, वेखंड आणि वावडिंग यांचा कल्क करून त्यांचा रस नाकांत पिळावा. ( ४ ) अति वाढल्यास नाडीव्रणाप्रमाणें चिकित्सा करावी.

**क्षवथु** ( मा. नि. )—नासिकेंतील मर्मामध्यें वायु कुपित होऊन कफाशीं मिळतो व तो नाकांतून शब्दयुक्त बाहेर येतो. **उपाय**—( १ ) तूप, गुग्गुळ, आणि मेण यांचा धूर द्यावा

**भ्रंशथु** ( मा. नि. )--दाट व खारट नासलेला असा कफ मस्तकाचे ठायीं पूर्वी संचित होऊन सूर्याच्या सतापेंकरून पातळ होऊन नासिकेपासून अकस्मात् बाहेर निघतो. नाक अत्यंत दाहयुक्त असता त्यात वायु धुराप्रमाणें संचार करितो. त्याच्या योगानें नाक जळल्याप्रमाणें वेदनायुक्त होतें. **उपाय**—[ १ ] लिंबाचा रस व रसांजन यांचें नस्य करावें व मस्तकाला अल्प शेक द्यावा.

**नासारोगावर पथ्य**—स्वेद, स्नेह, मस्तकाला अभ्यंग, जुने यव, साळी, जुन्या गव्हाची पोळी, तुरीचें वरण, तूप, कुळिथ व मूग याचें यूष, मासरस, वांगी, पडवळ, शेवगा, करटोली, कोंवळे मुळे, लसूण, दहीं, तापलेलें पाणी, मद्य, तिखट, आंबट, खारट, स्निग्ध, उष्ण आणि लघु असे भोजन, अगस्त्याचें पुष्प, जायफळ, तांबूल आणि नागवेल हे पदार्थ सेवन करावे.

**नासारोगावर अपथ्य**—क्रोध, मल, मूत्र आणि वायु यांचा वेगाचा रोध, शोक, द्रव पदार्थ व भूमिशय्या, स्नान, थंड पाणी व थंड पदार्थ सेवन हे वर्ज करावे.

---

## नेत्ररोग.

॥ शिरानुसारिभिर्दोषैर्विगुणैरूर्ध्वमाश्रितैः ॥ जायंते नेत्रभागेषुरोगाःपरमदारुणाः ॥

**अर्थ**--कुपित झालेले वातादिदोष डोळ्यांच्या शिरांत शिरून डोळ्यांचा भाग

त्यास केला ह्मणजे त्यांना भयंकर रोग होतात. हे नेत्ररोग वात, पित्त, कफ, रक्त सन्निपात आणि आगांतुक यापासून होणारे असे ७६ आहेत.

**कर्मविपाक**—रवी लग्नस्थ, मेषस्थ किंवा स्वगृहींचा अथवा चंद्रगृहींचा किंवा बारावा किंवा बुध, गुरु व रवी हे एक राशिस्थ असतां रातांधळें, काणत्व आणि दुसरे अनेक प्रकारचे नेत्ररोग होतात. **परिहार**—त्या त्या ग्रहांची दानें, जप व होम इत्यादि करावीं.

**पूर्व कर्मविपाक**—कपटाचा उपचार सांगून दुसऱ्याचे दृष्टीला विकार करणें, परस्त्रीकडे कामदृष्टीनें पाहणें, स्त्रीपुरुषांचें मैथुन पाहणें, अमंगळ असतां सूर्य, नक्षत्रें, यांचें दर्शन घेणें, देवाच्या किंवा ब्राह्मणाच्या मंदिरातील दिवा मालवणें, इ० कारणें करून राताधळें व अनेक नेत्ररोग वगैरे उत्पन्न होतात. **परिहार**—चांद्रायण, पारायण, ब्राह्मणभोजन, हवन, महादेवावर अभिषेक, गोपाळकृष्णाची प्रतिमा करून तिचें पूजन व होम पूर्वकदान इ० करावीं.

**कारण** [ मा. नि. ]—उन्हानें अंग तापल्यावर थंड पाण्यांत शिरलें असतां, दूर दृष्टि करून पाहिलें असतां, डोळ्यांस वाफ लागली असतां, घाम येऊन तो तसाच डोळ्यांत जिरला असतां किंवा धूळ गेली असता, धूर लागला असता, वांतीचा रोध केला असता, तिचा अति योग झाला असता, पातळ अन्नपानाचें सेवन केलें असतां, मलमूत्रांचा अवरोध, रडणें, शोक, अति मद्यपान, मस्तकावर अभिघात झाला असतां, क्लेश ह्मणजे मनाला खेद, अति मैथुन, अश्रूचे वेगधारण, सूक्ष्म पदार्थ याचें फार वेळ अवलोकन, तोंडांत पाण्याची चूळ न घेणें, डोळ्यांत अंजन न करणें, नाकांत नस्य न घालणें, इ० कारणांनीं नेत्रात रोग उत्पन्न होतात.

**वातज अभिष्पंद** ल० (मा. नि.)–वायूचे कोपेंकरून डोळ्यांचेठायी सुया टोंचल्यासारखी पीडा व जडपणा येतो, डोळे रेती घातल्याप्रमाणे खुपतात, निस्तेज होतात, मस्तकास पीडा होते, डोळे कठिण असून शुष्क होतात, आंतून थंड पाणी येतें, पापण्या कांपतात, अंगाला शहारे येतात, डोळ्यांतून स्राव होतो, परंतु ह्मागत नाहींत, त्यांच्या रक्तवाहिन्यांत रक्तसंचय होतो, खाज सुटते, वेदना, संध्याकाळी थंड वारा लागल्यानें रोग वाढतो, सकाळी निजून उठलें ह्मणजे डोळे चिकटलेले असतात, नाक फुगतें, भिवई व कपाळ यास टोंचणी, स्फुरण व फोडल्यासारखी पीडा, डोळ्यांत पू आल्यास कोरडा व थोडा, डोळ्यांत कांही जीव चावल्यासारखें वाटणें, हीं लक्षणें होतात.

**वातज अभिष्पंद** ल० (वाग्भट)–वाताभिष्पंद यास स्निग्ध आणि उष्ण उपचारानें गुण येतो, या अभिष्पंदाची हयगय केली असतां अधिमंथ होतो. वायूनें मान, डोळे व शंख यांकडून किंवा दुसरीकडून तीव्र वेदना उत्पन्न होते, चिकटा, लाली व सूज, हे विकार नसून डोळा संकुचित होतो व पाणी येतें, या विकारांस अन्यतोवात ह्मणतात. तसेंच ज्यात डोळा वाकडा होतो व सुजतो, त्यास वातवि-

पर्यय ह्मणतात. उपाय—( १ ) सातूचे पिठाची पाण्यांत वडी ऊन करून डोळ्यांवर ठेविली असतां वाताभिष्पंदाची कळ तावडतोब बरी होते, यांत संशय नाहीं. (२) एरंडाचीं पानें, मुळें आणि त्वचा, हीं वांटून त्याची वडी करून उष्ण अशी नेत्रांवर बाधावी. ( ३ ) शेळीचें दूध सुमारें एकशेर घेऊन त्यांत २ तोळे सैंधवाची पूड घालून तें दूध चांगलें तापवून डोळ्यास शेक द्यावा; ह्म० डोळ्यांवर त्याची धार धरावी.

**पित्ताभिष्पंद** ल० (मा. नि.)–डोळ्यांची आग फार होते व त्याभोंवतें फोड येऊन पिकतात, त्याला थंड पदार्थ लावावे अशी इच्छा होते, डोळ्यांतून वाफा निघतात, कढत पाण्याची गळ लागते, डोळे मिटले असतां गरम लागतात, मिटवत नाहीत व पिंवळट असे दिसतात.

**पित्ताभिष्पंद लक्षण** ( वाग्भट )—दाह, धूर निघाल्यासारखें होणें, सूज, पांपण्यास बाहेरून काळेपणा, आंत पू येणें, आंसवें पिंवळीं व कढत, लाली, पदार्थ पिवळे दिसणें व डोळ्यास क्षार लावल्याप्रमाणें ञग पडणें, पित्तानें नेत्र आले असतां, हीं लक्षणें होतात. **उपाय**—( १ ) जटामांसी, पद्मकाष्ठ, कांकोली व जेष्ठीमध याचा खता करावा; ह्मणजे पुरचुंडी करून ती डोळे आले की लागलीच डोळ्यांवर ठेवावी. ( २ ) काकडशिंगी, हिरडे, मोरचूत व लोध्र याचें वस्त्रगाळ चूर्ण करून फडक्यात त्याची सैल पुरचुंडी बांधून तांब्याच्या भाड्यात काजी घालून त्यांत बुडवून डोळ्यावर वारंवार ठेवावी; ह्मणजे डोळ्यांतील अनेक प्रकारच्या वेदना दूर होतात. (३) रक्तचंदन, धमासा आणि मंजिष्ठ यांना पाण्यांत उगाळून डोळ्यांवर लेप द्यावा. (४) पद्मकाष्ठ, जेष्ठीमध, जटामांसी व दारुहळद, हीं औषधें पाण्यात वांटून त्याचा लेप डोळ्यांवर करीत जावा.

**कफज अभिष्पंद** ल० ( मा. नि. )—कफाचे कोपेंकरून डोळे जड होऊन सुजतात, शेकावे असें वाटणें व शेकले असता सुख होतें, पांपण्याच्या कोरीला कंडू सुटतो, थंडपणा येतो, आंतून चिकट स्राव येतो व डोळे पिचापिचीत होतात.

**कफज अभिष्पंद लक्षण** ( वाग्भट )—कफानें डोळे आले ह्मणजे ते जड होतात, फार सुजतात, कंडू व झोंप येते, अन्नावर वासना नसते, दाट, स्निग्ध, व फ्कळ पांढरा, बुळबुळीत असा मळ व अश्रू असतात. **उपाय**—( १ ) त्रिफळा पाण्यांत उगाळून त्याची वडी करून नेत्रावर बाधावी. (२) रसाजन स्त्रीचे दुधात उगाळून डोळ्यावर लेप द्यावा.

**रक्तज अभिष्पंद** ( मा. नि )—डोळ्यांतून तांबूस अश्रू येतात व लाल होतात, भोंवताली तावड्या रेषा उमटतात, ही लक्षणे होतात.

**रक्तज अभिष्पंद** ल० ( वाग्भट )—आसवें, डोळ्यांतील शिरा, पू, पांढरें बुबुळ, दर्शन ( पदार्थ दिसण्याची जागा ), हीं लाल होतात. व पित्ताभिष्पंदाचीं लक्षणें होतात. **उपाय**—( १ ) जाईच्या कळ्या, शंख, त्रिफळा व जेष्ठीमध हीं पा-

वसाच्या पाण्यांत वांटून वात करावी, व डोळ्यांतून फिरवीत जावी. ती पित्तजन्य व
रक्तजन्य विकार दूर करिते. ( २ ) लोध्र तुपांत उगाळून त्याचे बिंदू नेत्रांत सोडा-
वे. (३) त्रिफळयाचें चूर्ण ४ मासे १ तोळा साखरेंत द्यावें.

**अधिमंथरोग** ( मा. नि. )—अभिष्पंदावर औषधोपाय न केला तर तो वा-
ढून त्यापासून तितकेच चार आधिमंथरोग होतात. त्यांनीं डोळ्यांला तीव्र वेदना
होते, बुबुळें गळून पडल्यासारखीं वाटतात, डोळ्यांत रवी घालून घुसळल्याप्रमाणें अ-
त्यंत वेदना होतात. व्याधिप्रभावानें अर्ध मस्तकाला वेदना होतात. त्याचीं लक्षणें
वात, पित्त अभिष्पंदाप्रमाणें जाणावीं.

**अधिमंथरोग** ( वाग्भट )—सर्व अधिमंथांत अभिष्पंदापेक्षां वेदना जास्त
असतात व त्यात शंख, दांत, गाल व कपाळ यात फारच वेदना असतात. उपाय—
(१) पुंडरीकवृक्ष, जेष्ठीमध व दारुहळद हीं प्रत्येक सोळा सोळा तोळे घेऊन १०२४
तोळे पाण्यांत काढा करावा, गाळून पुनः कढवावा. दाट झाला ह्मणजे त्यांत २०
तोळे उत्तम जस्ताचें फूल अर्धा तोळा मीरपूड घालून चूर्ण किंवा वाती कराव्या. हें
घातलें असतां सर्व प्रकारच्या अभिष्पंदांपासून होणारी लाली, ठणका व खूप हे वि-
कार दूर होतात. (२) ललाटस्थानींची शीर टोंचून रक्त काढावें. इतक्यानेंही बरा न
झाल्यास भिंवयाच्या वरच्या बाजूस डाग द्यावा. आणि ज्या चोहों प्रकारच्या अभि-
ष्पंदांवर क्रिया सांगितल्या आहेत त्या सर्व या रोगावर योजाव्या.

**सामान्यलक्षण** ( मा. नि. )—ज्या नेत्रांना वेदना फार होतात, लाली
फार असून ते गढूळ असतात, रेती घातल्यासारखे खुपतात, सुईनें टोंचल्यासारख्या
वेदना होतात, व ठणका लागतो, गळ लागते, ते नेत्र आम ह्मणजे अपक्क आहेत
असें जाणून अंजनादि क्रूर कर्में करूं नयेत. त्यास लघु अन्न द्यावें. डोळ्याची
वेदना कमी झाली, कंडू सुटूं लागला,सूज ओसरली, गळ बंद झाली व डोळे निवळ-
ले ह्मणजे दोष पक्क झाला असें समजावें.

**शिरोत्पात** ( मा. नि. )—ज्याच्या नेत्रांतील शिरा वेदनारहित किंवा
वेदनासहित असून तांबड्या होतात. आणि त्या अधिक अधिक वारंवार लाल
होतात. हा व्याधि रक्तजन्य होय. परीक्षा न होऊन शिरोत्पाताची उपेक्षा के-
ली असता शिराप्रहर्षरोग होतो. त्या योगानें डोळ्यांतून तांबडे अश्रु येतात.
व डोळ्यांनीं उघडून पाहवत नाहीं. उपाय—( १ ) आम्लवेतस, राळ व मैथल
याचें अंजन करावें. ( २ ) पित्ताभिष्पंद रोगावरील सर्व उपाय करावें. ( ३ )
हिराकस मधांत उगाळून अंजन करावें. ( ४ ) सैंधव व हिराकस यांस दुधांत
घोटून त्याचें अंजन करीत जावें.

**सव्रणशुक्र** ( फुलें ) ( मा. नि. )—डोळ्याच्या काळ्या बुबुळावर फुल
पडतें व तें आंत बुडाल्यासारखें, व मध्यें सुईनें भोंक पाडल्यासारखें दिसतें. नेत्रांतू-
न अति उष्ण, व पुष्कळ स्राव होतो, त्यामध्यें आत पीडा होत असते. तें फुल

दृष्टीच्या जवळ होत नाहीं, खोल गेलेलें नसून फार स्रवत नाहीं, ठणका नसतो, व जवळ जवळ झालेलीं जुळी फुलें नसल्यास कदाचित् साध्य होतें. **उपाय**—( १ ) समुद्रफेंस, सैंधव, शंख, कोंबड्याचे अंड्यांचीं टरफलें आणि शेवग्याचें बीज, हीं औषधें पाण्यांत घोटून त्याची गोळी करून मधांत तिचें अंजन करीत जावें. ( २ ) अव्रणशुक्रावरीलही सर्व औषधी कराव्या.

**अव्रणशुक्र** ( मा. नि. )—जें फूल अभिष्यंदापासून उत्पन्न झालेलें व कुंद-पुष्प, शंख, चंद्र यासारखें पांढरें असतें व अभ्र जसें पातळ दिसतें तसेंच नेत्राच्या काळ्या बुबुळावर असतें व आग होते, हें सुखसाध्य आहे असें जाणावें. आणि जें शुक्र खोल गेलेलें व जड झालेलें, फार दिवसांचें तें असाध्य होय. **उपाय**—( १ ) लोहभस्म, जेष्टीमध, त्रिफळा, व पिंपळी यांचे चूर्णासमान गुग्गुळ घालून एकत्र करून मध व तूप यांत भक्षण करावें. ( २ ) वडाच्या चिकांत कापूर खलून अंजन केलें असतां दोन महिन्याचें फूल नाश पावतें. ( ३ ) सुवर्णमाक्षिक, माहाचा डिंक, बेहेडा किंवा सैंधव यांपैकीं कोणतेंही एकाचें मधाशीं अंजन करावें; ह्मणजे नूतन फुलें दूर होतात.

**कांचबिंदु**—डोळ्यांमध्यें कांचेसारखें चकाकणारें असें मासाचें गुळूंब येतें. याला कोणी मोतबिंदूही ह्मणतात. **उपाय**—( १ ) जळवा लावून रक्त काढावें. ( २ ) मिरीं । तोळा, पिंपळी ॥ तोळा, समुद्रफेंस ।॥ तोळा, सैंधव । तोळा आणि मसुरा २। तोळे, हीं औषधें घेऊन त्याचा पाण्यांत खल करून अंजन करावें.

**रातांधळें** ( मा. नि. )—दुष्ट कफ नेत्राच्या तिन्ही पडद्यांत राहून रातांधळें उत्पन्न करितो. कफ दिवसास सूर्यतापानें कमी झाल्यानें दिवसास दिसतें. **उपाय**—( १ ) जाईचे पानाचा रस, हळद आणि रसांजन हीं मधांत उगाळून अंजन करावें. ( २ ) गाईचे शेणाचे रसांत पिंपळी उगाळून अंजन करावें. ( ३ ) नदींतील क्षुद्रशंख, त्रिकटू, रसांजन, मनशीळ, हाळद, दारुहाळद आणि रक्तचंदन या सर्व औषधांची गाईचे शेणाचे रसांत खलून गोळी करावी. तिचें पाण्यांशीं अंजन केलें असता रात्र्यांध्य व दिवांध्य यांवर प्रशस्त आहे.

**अर्म ( वडस )** ( मा. नि. )—हे पांच प्रकारचे आहेत ते प्रख्यांत आहेत. **उपाय**—( १ ) मिरी व बेहेडा हळदीचे रसांत उगाळून अंजन करावें. ( २ ) मिरीं माक्याचें रसांत वांटून त्यांचा डोळ्यावर लेप करावा.

**अर्जुन ( अहिरा )** ( मा. नि. )—डोळ्याच्या पांढऱ्या बुबुळावर ससाच्या रक्तासारखा जो एक बिंदु उत्पन्न होतो तो. **उपाय**—( १ ) बडीशेप, सुर्मा, रसांजन, साखर, समुद्रफेंस, शंख, सैंधव गेरु, मनशीळ आणि मिरीं हीं औषधें समभाग घेऊन चूर्ण करून नंतर मधांत घोटून त्याचे बिंदु नेत्रांत सोडावे ह्मणजे कांचबिंदू, तिमिर, अहिरा, आणि वर्त्मरोग ( पांपण्याचे रोग ) यांचा नाश होतो.

**सर्व प्रकारचे नेत्ररोगांवर उपाय**--( १ ) जेष्टीमध, लोहभस्म व त्रिफळा यांचें चूर्ण मध व तूप यांत द्यावें ह्मणजे वांति, तिमिररोग, शूल, आम्लपित्त, ज्वर, क्लम, आनाह, मलबद्धता, आणि नेत्रशूल यांचा नाश होतो. ( २ ) तुळस व बेल यांची पानें यांच्या समभाग रस व या दोहोंचे समान स्त्रीचें दूध घालून कांस्य पात्रांत गजपिंपळीचें चूर्ण घालून तांब्याचे वाटीनें फार बारीक घोटावें. काळें काजळासारखें झाल्यावर त्याचें अंजन करावें, ह्मणजे सद्यः नेत्ररोग, नेत्रशूल आणि नेत्रपाक यांचा नाश होतो. ( ३ ) पुनर्नवा दुधात उगाळून अंजन करावें ह्मणजे कंडूचा नाश होतो; मधाशीं नेत्रस्राव तुपांत नेत्रांतील फूल, तेलाशीं तिमिर आणि कांजीशीं अंजन केलें असता रातांधळें याचा नाश होतो. ( ४ ) पारा आणि शिशाचें भस्म समभाग आणि या दोहोंच्या दुप्पट सुर्मा व पाऱ्याचे चतुर्थांश अरती कापूर यांचा एकत्र खल करून अंजन केलें असतां तिमिर, पटल, काचबिंदु, फुलें, वडस, अहिरा आणि नेत्ररोग याचा नाश होतो. ( ५ ) निवळीचें बीज, शंख, सैंधव, त्रिकटू, साखर, समुद्रफेंस, रसांजन, मध, वावडिंग आणि मनशीळ हीं सर्व औषधें समभाग एकत्र करून स्त्रीच्या दुधांत खलून त्याचें अंजन करावें ह्मणजे तिमिर, पटल, काचबिंदु वडस, नेत्रातील फुलें, कंडू, क्लेद आणि नेत्रार्बुद यांचा नाश होतो. ( ६ ) उत्तम नवीं आवेहाळद घेऊन चूर्ण करून तें चाळीस दिवसपर्यंत निंबाचे रसांत भिजत ठेवावें, नंतर त्याचा खल करून गोळ्या करून सावलीत सुकवून ठेवाव्या. ती एक गोळी मधांत उगाळून अंजन करीत गेलें असता डोळ्यास पाण्याची गळती लागते ती व पडकेंस, नाहींसे होतात; डोळे लाल झाले असल्यास अथवा पांढरी भुरी असल्यास गाईचें दुधांत अंजन करावें. डोळे खुपत असून लाल झाल्यास माक्याचे रसात अंजन करावे, डोळ्यास ठणका लागल्यास शिळ्या पाण्यांत अंजन करावें, डोळे धुंद झाल्यास स्त्रीचे दुधांत अंजन करावें. दिसत नसल्यास गाईच्या तुपामध्ये अंजन ( काजळ ) करावें. ( ७ ) मिरी व रुईची फुलें पाण्यात वाटून गोळी करून ती गोळी पाण्यांत उगाळून अंजन करावें, ह्मणजे डोळ्यावरील भूर नाहींसा होतो. ( ८ ) सुंठ, निंबूरसात उगाळून डोळ्याचे पांपण्यावर लेप द्यावा व शेकावें, ह्मणजे डोळे ठणकत असल्यास राहतात. ( ९ ) तुरटी निंबाचे रसात उगाळून अंजन केले असता डोळ्यांतील भूर जाईल ( १० ) चांगलें जस्त आणून त्याचा रस करून गाईच्या ताकांत, त्रिफळ्याच्या काढ्यांत, निंबू रसात, गोमूत्रात याप्रमाणें प्रत्येकांत सात सात वेळ ओतावें. नंतर पुन्हां त्रिफळ्याचे काढ्यात सात वेळ ओतावें. नंतर कोरफडीचे बलकांत त्या जस्ताचा चूर करून घालावा. व उन्हात वाळवावा. याप्रमाणें करून नंतर त्याचें भस्म करावें अथवा जस्ताचे भस्मासच वरप्रमाणें भावना द्याव्या. आणि घट्ट वस्त्रानें गाळून ठेवावें. नंतर एलची, सैंधव, कोष्ठ, शंखभस्म, तुरटीची लाही, हिंगूळ, तेल्या टांकणखाराची लाही, मिरें, माका, मोरचूत, पिंपळाची लाख, नीळ, मनशीळ, अरती कापूर, कमळाक्ष, समुद्रफेंस, कोंवड्याचें अंडें. निवळीचें बीं, कु-

टकी, माणसाच्या कपाळकवटीचें भस्म, देवदार, पांढऱ्या वमूची मुळी, हीं सर्व औषधें समभाग घेऊन चूर्ण करावें. व बकरीचे मुतांत सात दिवसपर्यंत खल करून लांबोळ्या गोळ्या करून ठेवाव्या. त्या गोळीचे अंजन पाण्याशीं केलें असतां सर्व प्रकारचे नेत्ररोग, पांढरी, तांबडी फुलें, नीळ, काचबिंदू, रातांधळें, वगैरे संपूर्ण रोग दूर होतात. ( ११ ) कलखापरी, सैंधव, मोरचुताची लाही, टांकणखाराची लाही, सुंठ, मिरी, व पिपळी, हीं औषधें कुटून वस्त्रगाळ चूर्ण करून निंबाचे रसांत खल करावा. नंतर त्याच्या गोळ्या करून सावलींत वाळवाव्या, ती गोळी मधांत उगाळून अंजन केलें ह्मणजे सर्व प्रकारचे नेत्ररोग, रुक्षत्व, वडस, फुलें, मांस वाढतें तें, तिमिर, अर्जुन, पटल, नेत्रवात, कांचबिंदु नेत्रांतून पाणी गळतें तें इत्यादि अनेक नेत्रविकार हे सर्व दूर होतात. ह्या गोळीस रसकेश्वरवटी ह्मणतात. ( १२ ) उंटाचें हाड पाण्यात उगाळून अंजन केलें असतां नवी दृष्टि येईल. ( १३ ) सुरवारी हिरडा निंबुरसात उगाळून अंजन केलें असतां भूर जाईल.

**नेत्ररोगावर पथ्य**—जुन्या साळीचे तांदूळ, जुने गहूं, सैंधव, गाईचें तूप, गाईचें दूध, साखर, मध, ह्मशीचें व गाईचें लोणी, आवळकठी, मुगाचे पापड, मुगाचें वरण, करडईची भाजी, घोळूची भाजी, जवस, टरबूज. लोणकढें तूप, द्राक्षें, चाकवत, कुळीथ, निंबू, ऊन पाणी, कोंवळा मुळा, अगस्त्याचें पुष्प ( रातांधळ्यावर द्यावें ) गाईचें तूप, शेळीचें तूप, मनुका, तांबड्या साळी, शेळीचें दही व लोणी, सैंधव लंघन, यव, लसूण, कारलें, करटोली, पडवळ, धणे, लघु अन्न, तांदुळजा हे पदार्थ पथ्यास सेवन करावे.

**नेत्ररोगावर अपथ्य**—मोड आलेलें धान्य, गाजर, तांबूल, तिळाचें तेल, करडईचें तेल, पावटे, स्त्रीसंग, पाले भाज्या, केळें, गोवारी, तांबडा भोपळा, कुळीथ, मोहऱ्या, उस, जागरण, मासे, दही, मद्य, खारट, आंबट व तिखट, पावटे, वांगी, केळें, वाल, बाजरी, गूळ, क्रोध, शोक, रडणें, स्नान, ऊन घेणें, फार बडबड करणें, टरबूज, ग्राम्यपशूंचें मांस इ० अपथ्यें जाणावी.

---

## पांडुरोग.

॥ पाडुरोगाः स्मृताः पंच वातपित्तकफैस्त्रयः॥ चतुर्थः सन्निपातेनपंचमोभक्षणान्मृदः ॥

**अर्थ**—पांडुरोग पांच प्रकारचे आहेत. वातपांडु, पित्तपांडु, कफपांडु, संन्निपातपाडु आणि पांचवा माती खाल्यापासून, एकुण पांच सागितले आहेत.

**कर्मवीपाक**—अष्टमस्थानाप्रत शनी अथवा सिंहराशिस्थ चंद्र असेल तर तो बहिष्कृत, घातक, दुःखी, क्षयरोगी, पांडुरोगी, असा होतो. **परिहार**—शनि

मंत्राचा जप, होमादिक दान इत्यादि करावें. चंद्रपीडा परिहारार्थ चंद्राचा जप, दान, हवन इत्यादिक करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—देव अथवा ब्राह्मण यांचे द्रव्याचा जो अपहार करितो तो पांडुरोगी होतो, किंवा अंत्यजाचे स्त्रियेचे ठिकाणीं गमन करणारा असा पांडुरोगी होतो. **परिहार**—कृच्छ्रातिकृच्छ्र, चांद्रायणें, सुवर्णदान, अथवा सुवर्णाची पृथ्वी करून ह्मणजे पृथ्वीसारखी प्रतिमा करून पूजा करावी. इत्यादि दैविक प्रतिकार जाणावा.

**पांडुरोगाचें कारण** ( मा. नि. )—अति मैथुन, अत्यम्ल पदार्थ, खारट, पदार्थांचें सेवन, अति मद्यपान, मृत्तिकाभक्षण, दिवसांस निजणें, अत्यंत तिखट पपार्थ सेवन करणाराचें रक्त दोषांनीं दुष्ट होऊन शरीराची त्वचा, पांडुरवर्ण होते. येथें रक्त हें केवळ उपलक्षण आहे. तेणेंकरून त्वक्, मांस हीं दूष्यें आहेत. हारितानें तर रस देखील दूष्य ह्मणून सांगितला आहे.

**पांडूचें कारण** ( वाग्भट )—वर सांगितलेल्या कारणांनीं दोष कुपित होतात. त्यात पित्त मुख्य असते, त्यांत वायु हा प्रेरक व बलवान असल्यामुळें तो पित्तास फेंकतो त्यामुळें तें हृदयांत येऊन तेथून दहा धमन्यांत शिरून सर्व शरीरास व्यापून कफ, त्वचा, रक्त, व मांस यास दुष्ट करून त्वचा व मांस यांच्यामध्यें राहून त्वचेवर पांडुर, पिवळा, व हिरवा, असे निरनिराळे रंग उत्पन्न करितें. त्यांत पांडुर वर्ण अधिक असतो. म्हणून या रोगास लोक पांडुरोग असें म्हणतात.

**पूर्वरूप** (मा. नि.)—त्वचा फुटणें, तोंडाला थुंका, अंग गळणें, मृत्तिका भक्षण, नेत्रगोलाना सूज, मळमूत्र यांना पिवळटपणा, अन्नाचा पाक न होणें, इत्यादि पांडुरोग होण्यापूर्वी लक्षणें होतात

**पूर्वरूप** ( वाग्भट )—धातु जड व शिथिल होतात. ओजाचे गुण कमी होतात. त्या नंतर त्याचें रक्त व मेद कमी होतात. शक्ति नाहींशी होते, इंद्रियें शिथिल होतात, अंग ठेंचल्यासारखें होतें, त्या मनुष्याचें मन फार कोमल होतें, डोळ्याचे कोनाडे सुजतात, अंगें म्लान होतात, तो फार रागीट होतो, वारंवार थुंकतो, थोडें बोलतो, अन्नाचा व थंड पदार्थांचा तिटकारा करितो, केंश गळतात, अग्नि मंद होतो, मांड्या गळतात आणि त्यास संताप, श्वास, कर्णनाद, भ्रम, आयास केल्यावांचून थकवा, हृदय कांपणें ह्मणजे धडधडणें, त्वचा रुक्ष होणें, अरुचि, मूत्र पिंवळें होणें, घाम न येणें, तुरट माती वायूस, क्षारयुक्त पित्तास, मधूर माती कफास आणि सर्व प्रकारची माती रसादिकास शुष्क करून स्वताहाच्या रुक्षतेनें खाल्लेल्या पदार्थांसही रुक्ष करिते, तिचा पाक होतां स्रोतांत शिरून त्यास बंद करून मागे सांगितल्याप्रमाणें पांडुरोग उत्पन्न न करिते. त्यामुळें मनुष्याची बेंबी, पाय, तोंड व शिश्न ही सुजतात, व त्यास रेच होतात, मळात कृमि, रक्त व कफ असतो.

**वातपांडु** ( मा. नि. )—त्वचा, मूत्र, आणि नेत्र इत्यादिकांस रूक्षता व काळेपणा असतो, आणि कंप, सुया टोंचल्यासारखी पीडा, पोट फुगणें, भ्रम, आदिशब्देंकरून भेद शूळादिक हीं होतात.

**वातपांडुल०** ( वाग्भट )—वायूपासून जो पांडुरोग होतो त्यांत गात्रांत टोंचणी, व वेदना असते, व गात्रांना कंप, शिरा, नखें, मळमूत्र व डोळे हे काळे रुक्ष व अरुण होतात. अंग सुजतें, पोट फुगतें, तोंड बेचव होतें, मळ वाळतो, बरगड्या व डोकें हीं दुखतात.

**पित्तपांडु** ( मा. नि. )—मूत्र, विष्ठा, आणि नेत्र हीं पिंवळीं होतात. दाह, तहान ज्वर यांनी पीडित असतो. मळ पातळ होतो. आणि शरीरकांति अत्यंत पिंवळी होतें.

**पित्तपांडुल०**( वाग्भट )—शिरादिक हिरव्या, किंवा पिंवळ्या होतात; ताप, डोळ्यांस आंधेरी येणें, ताहान, घाम येणें, मूर्च्छा, थंड पदार्थांची इच्छा, आंगास वाईट घाण, तोंड कडू असणें, जुलाब होणें, आंबट ढेंकरा येणें, व दाह हीं लक्षणें होतात.

**कफपांडु लक्षण** ( मा. नि. )—मुखावाटें कफाचा स्राव, सूज, डोळ्यांवर झांपड, आळस, शरीराला भार, त्वचा, मूत्र, डोळे, आणि तोंड यांना पांडुरपणा हीं लक्षणें होतात.

**कफपांडूचें लक्षण** ( वाग्भट )—शिरादिक पांढरे असतात, शिवाय झांपड असते, तोंड खारट असतें, अंगावर कांटा उभा राहतो, स्वर क्षीण होतो, आणि खोकला व वांति हीं असतात.

**सन्निपातपांडु** ( मा. नि, )—हा तिन्हीही लक्षणांनीं युक्त असतो. हा दुःसह आहे.

**असाध्यलक्षण** (मा. नि.)—ज्वर अरुचि, मळमळ, ओकारी, तहान, आणि उह्रासे याणी युक्त आणि क्षीण झालेला, व ज्याच्या इंद्रियांची स्वविषय घेण्याची शक्ति नष्ट झाली असा सन्निपातिक पांडुरोगी असाध्य जाणावा.अथवा नेत्रगोल, गाल, भिवया, पाय, नाभी, आणि शिश्न, यांना सूज, कोठ्यांत कृमि, रक्त कफमिश्रित ढाळ होणें; सर्व पांडुरोगांमध्यें जेव्हां कोठ्यांत कृमि ( जंत ) होतात तेव्हा ही लक्षणें होतात. असें **जेज्जटाचार्यांचें** मत्त आहे. आणि मृद्भक्षणजन्य पांडुरोगानंतर हे लक्षण सांगितलें आहे ह्मणून हे त्याचें लक्षण होय. असें इतर आचार्यांचें मत आहे, विदेहानें तर हेंच लक्षण त्याचें ( मृत्पांडुरोगाचें ) ह्मणून स्पष्ट सांगितलें आहे—फार दिवसाचा पाडुरोग काळ बहुत लोटल्यामुळें जारठ झाला ह्मणजे साध्य होत नाही.—सर्व शरीराला सूज आली असून जो रोगी पदार्थ पिंवळे

पाहतो तो रोगी असाध्य.--ज्या मनुष्याला बांधलेला थोडा मळ हिरव्या रंगाचा कफ मिश्रित पडतो तो असाध्य जाणावा.--जो मनुष्य दीन ह्मणजे म्लान होतो व पादरा फटफटीत पडतो, व ओकारी, मूर्छा, तृषा, ह्यांनीं पीडतो तो नास्ति ह्मणजे मेल्यासारखा जाणावा.—रक्तक्षयापासून जो पाडुरोगी पांढरा होतो तो असाध्य.—ज्याचे दांत, नखे व डोळे हे पिवळे झाले आहेत तो असाध्य.—जो पांडुरवर्णाचे पदार्थ पहातो तो असाध्य—हात, पाय, डोकें, यांच्या ठिकाणी सूज आणि मध्यदेह ज्याचा शुष्क झाला आहे तो असाध्य व याच्या उलट साध्य.—मध्यदेहाला सूज आणि हातपाय व डोकें हीं शुष्क झालेलीं, गुद व शिश्न यांचेठायी सूज, मृतप्राय झालेला, असा पांडुरोगी वैद्यानें सोडावा —अतिसार आणि ज्वर यांनीं पीडलेल्या रोग्यास यश इच्छिणाऱ्या वैद्यानें औषध देऊं नये.

**सर्व प्रकारचे पांडुरोगांवर उपाय**—( १ ) पांडुरोगी साध्य आहे असें पाहून तूप पाजून स्निग्ध करावा. आणि रेच व वमन देऊन शुद्ध करावा. नंतर मध तूप व हरीतकी ज्या चूर्णात पुष्कळ आहे अशा औषधांचा उपचार करावा व हळद घालून कढविलेलें तूप प्यावें, किंवा त्रिफळा आणि हिंगणबेट यांनीं सिद्ध केलेलें तूप प्यावें; अथवा कांहींएक औषधांनीं रेचन सिद्ध करून घेत जावें, अथवा रेचक घृताबरोबर प्यावें; आतां सामान्य उपचार वातपांडूवर स्निग्ध, पित्त पांडुवर कडु व शीत; आणि कफपाडूवर तिखट, रुक्ष व उष्ण आणि द्वंद्वजावर मिश्र, याप्रमाणें उपचार करावे. ( २ ) आंवळकठी, लोहभस्म, त्रिकटू, हळद आणि खडीसाखर यांचें समभाग चूर्ण मध व तूप यांत द्यावें; ह्मणजे हा धात्रीलोह, पांडुरोग, कामला व हलीमक यांचा नाश करितो. ( ३ ) मंडूर, सुंठ, गूळ व तोळ हे एकेक भाग व पिपळी २ भाग एकत्र करून गोळ्या कराव्या. व एकेक गोळी देत जावी. ( ४ ) अडूळसा, गुळवेल, कडूनिंब, कुटकी व किराईत याचा काढा मध व तूप घालून द्यावा; ह्मणजे कामला, पाडुरोग, रक्तपित्त, हलीमक आणि कफाधिक व्याधि या सर्वांचा नाश होतो. ( ५ ) गोखरूचा काढा मध व साखर घालून प्यावा. ( ६ ) गोखरू, धणे व गुळवेल यांचा काढा मध व साखर घालून द्यावा. (७) अभ्रकभस्म अनुपान योजून द्यावें. ( ८ ) पारा व गंधक यांची कज्जली एक गुंजभर मध व तूप यांत द्यावी. ( ९ ) नित्य प्रातःकाळीं ४ तोळ्यांपर्यंत शक्त्यनुरूप वस्त्रगाळ केलेलें गोमूत्र सतत घेतलें असतां सर्व प्रकारचे पांडुरोग शांत होतात. ( १० ) लोखंडाचे पात्रांत तापवून ठेविलेलें गाईचें दूध ७ दिवस प्यावें. आणि पथ्य करावें, ह्मणजे पांडुरोग, क्षय व संग्रहणी हे रोग दूर होतात ( ११ ) सुंठ आणि लोहभस्म किंवा पिपळी, हिरडा, लोहभस्म व शिलाजीत अथवा गुग्गुळ व गोमूत्र इतके योग कफपाडूचे नाशक आहेत. ( १२ ) लोहासव द्यावें. ( १३ ) गोमूत्रात सप्तरात्र लोह भिजत घालून ठेवावा आणि तो दुधाशी पांडुरोगावर द्यावा. ( १४ ) हळदीचा काढा व कल्क करून त्यानें घृत सिद्ध करून द्यावें; ह्मणजे पाडुरोग नष्ट होतो. ( १५ ) लोहभस्म, त्रिकटू, कंकोळ, तीळ व माक्षिकभस्म, ही सर्व एकत्र करून याचें चूर्ण बला-

बल पाहून मध किंवा ताक यांशीं द्यावें; ह्मणजे फार दिवसांचा पांडुरोगाचा नाश होतो. ( १६ ) पारा, गंधक व लोहभस्म हीं समभाग घेऊन त्यास कोरफडीच्या रसाच्या ३ दिवस भावना द्याव्या. व प्रत्येक भावनेस गजपुट द्यावें. हा रस २ वाल मध व तूप यांत पांडु व कामला यांजवर द्यावा ( १७ ) कथील व पारा समभाग कोरफडीच्या रसांत खलून वालुकायंत्रांत पचन करावा ह्मणजे चंद्राप्रमाणें पांढरा वर्ण होतो. तो रस बलाबल पाहून मध व साखर यांत द्यावा; ह्मणजे पांडुरोग, प्रमेह, दुर्बळता व कावीळ यांचा नाश करितो. ( १८ ) ताम्रभस्म, जेपाळ व गुग्गुळ, हीं सर्व समभाग तुपांत खलून गोळ्या कराव्या आणि बलाबल पाहून तुपांत द्याव्या; ह्मणजे सूज व पांडुरोग यांचा नाश होतो. या गोळीवर थंड पाणी व आंबट पदार्थ हे वर्ज करावे. ( १९ ) उदयभास्कराची मात्रा द्यावी. ( २० ) किराईत, नागरमोथे, कडू पडवळ, कडु निंब, कुटकी, दारुहळद, वावडिंग; गुळवेल, धमासा, चित्रक, पिपळी, सुंठ, पित्तपापडा, त्रिफळा व लोहभस्म, यांचें चूर्ण आल्याच्या रसांत खलून गोळी मधाशीं द्यावी; ह्मणजे उग्र अशा पांडुरोगाचा नाश होतो. ( २१ ) चित्रकमुळाच्या चूर्णाला आंवळकठीच्या काढ्यांत ३ भावना द्याव्या. नंतर तें गाईचे तुपातून रात्रौ देत जावें. (२२) बाळहिरडे गोमूत्रांत २१ दिवस भिजत घालून दररोज ४।४ भक्षण करीत जावे. ( २३ ) पिपळी, पिपळमूळ, चवक, चित्रक, त्रिकटू, देवदार, त्रिफळा, वावडिंग व नागरमोथे, हीं सर्व समभाग व सर्वांचे दुप्पट मंडूर व सर्वांच्या आठपट गोमूत्र घालून अग्नीवर पचन करून दाट झाल्यावर त्याच्या वालप्रमाण गोळ्या करून एक गोळी ताकाशीं द्यावी. पथ्य—ताकभात ह्मणजे पांडुरोग, अग्निमांद्य, अरुचि, मूळव्याध, संग्रहणी, सूज, ऊरुस्तंभ, हलीमक, कृमि, प्लीहा, उदररोग, गलरोग आणि इतर अनेक रोगांचा नाश होतो. ( २४ ) नारसिंहरस, राजमृगांकरस, लक्ष्मीविलासरस, रससेंदूर, मंडूर-गुटिका या मात्रा अनुपान योजून द्याव्या. (२५) आरोग्यवर्धक वटी द्यावी. या सर्व मात्रा पुढें रसायन प्रयोगांत दिल्या आहेत.

**मृत्तिकाभक्षणजन्य पांडुरोग** ( मा. नि. )—माती खाण्याची ज्यास सवय लागली त्याचा वातादिकांपैकी एखादा दोष कुपित होतो. ती माती तुरट रसाची असली तर वायु कुपित होतो. खारी असली तर पित्त कोपतें, गोड असली तर कफ कुपित होतो. ती माती पोटांत गेल्यावर रसादि धातूंना रुक्ष करिते. आणि रौक्ष-गुण प्रबळ झाला ह्मणजे जें अन्न खावें तें रुक्ष होऊन जातें. ती माती कोष्ठादिकांच्या अग्नीनें पाक झाल्यावाचून रस वाहणाऱ्या स्रोतसात ह्मणजे मार्गात शिरते. आणि त्यांचा रोध करिते. तेणेंकरून इंद्रियाचे बळ ह्मणजे स्वविषय ग्रहणशक्ति नष्ट होते. शरीराची दीप्ति, शक्ति, आणि ओज म्हणजे सर्व धातूंचें सार हृदयात असतें, तें क्षीण होऊन पांडुरोग उत्पन्न होतो. त्यामध्यें बल, वर्ण आणि अग्नि या तिन्ही रोगांचा नाश होतो.

**मृत्तिकाभक्षणजन्य पांडुरोगावर उपाय**—(१) माती खाल्ल्यापासून झालेल्या पांडुरोगांत प्रथम तीक्ष्ण रेचकें देऊन शरीरांतील माती काढून टाकावी. नंतर

कोठा शुद्ध केला ह्मणजे शक्तिवर्धक घृतें द्यावीं. ( २ ) नाकेशर, जेष्ठीमध, पिंपळी व दूर्वा आणि दूध यानीं सिद्ध केलेलें तूप माती खाल्लयापासून होणारे सर्व विकार त्वरित शमवितें. ( ३ ) नाकेशर, जेष्टीमध, पिंपळी व निशोत्तर यांचा काढा करून त्याच्या भावना मृत्तिकेला द्याव्या. नंतर ती माती खाण्यास द्यावी; ह्मणजे खाल्लेली माती पडून विकार दूर होतो. ( ४ ) त्रिकटू, बेल, हळद, दारुहळद, त्रिफळा, पाढरी व तावडी वसु, नागरमोथे, लोहभस्म, पाहाडमूळ, वावडिंग, देवदार, मेढशिंगी व दूध इतक्यानी सिद्ध केलेलें तूप मृत्तिकेपासून झालेल्या सर्व विकारांचा नाश करितें.

**हलीमकलक्षण** ( मा. नि. )—पांडुरोगामध्यें हलीमक या नांवाचा एक रोग होत असतो. ज्या वेळेस पांडुरोगाचा वर्ण हिरवा, निळा किंवा पिवळा होतो आणि बल व उत्साह यांचा नाश, झोंपड अग्निमांद्य, बारीक ज्वर, स्त्रीसंभोगाचे इच्छेचा अभाव, अंग मोडून येणें, दाह, तृषा, अन्नद्वेष आणि भ्रम हे उपद्रव होतात, तेव्हां वातपित्तापासून त्याला हलीमकरोग झाला असें समजावें.

**हलीमकावर उपाय**—( १ ) पांडु व कामलेवरचे उपाय हलीमकावर योजावे. ( २ ) साखर, कुटकी, चिकणामूळ, जेष्ठीमध, त्रिफळा, हाळद व दारुहाळद याचा लेह मध व तूप यात करून द्यावा, ( ३ ) लोहभस्म आणि नागरमोथे यांचें समभाग चूर्ण खैराच्या काढ्यांत द्यावें. ( ४ ) गुळवेलीचा अंगरस गाईचें दूध व तूप घालून पाजावा. ( ५ ) ह्मशीचे तुपांत चौपट किंवा आठपट दूध घालून पाजावें.

**पांडुरोगावर पथ्य**—ओकारी, रेच, जुने गहूं, जुने यव, साटक्या साळी, व मूग, तुरी, मसुरा यांचे यूष, अरण्यांतील प्राण्यांचे मांसरस, पडवळ, पिकलेली केळी, काळा उंस, ताडुळजा, कोंवळी वांगी, कांदा, लसूण, पिकलेला आंबा, तोंडली, आंवळे, ह्मशीचें ताक, तूप, तेल, लोणी, हळद, केशर, तुरट पदार्थ, अगस्त्याच्या शेंगा, कारली, जुना गूळ, तवकीर, लोणकडें तूप, गाईचे दूध, शेळीचें लोणी, तापवून थंड केलेलें पाणी, सावे, चाकवत, अफू, तवकीर, ब्राह्मी, मनुका, सालंमिश्री, गोमूत्र, इ० पथ्यास सेवन करावें.

**पांडुरोगावर अपथ्य**—रक्तस्राव, धूमपान, वांति, मलमूत्रादिकांच्या वेगाचें धारण, घाम, मैथुन, शेंगा व पाला यांच्या भाज्या, हिंग, उडीद, वाईट पाणी, तांबूल, मद्य, संपूर्ण अम्लवर्ग, विरुद्धान्न, भोजनावर लागलेंच भोजन जड व विदाही अशीं अन्नें हीं पांडुरोगाला अपथ्यें जाणावी

# पित्तरोग.

॥ अथपित्तभवारोगाश्चत्वारिंशदिहोदिताः ॥

अर्थ—पित्तरोग हे चाळीस प्रकारचे आहेत. त्यांची नांवें व लक्षणें सांगतों.

१ धूमोद्गार—ज्या पित्तापासून मनुष्याला धुरासारखे ढेंकर येतात तो.
२ विदाह—ज्या पित्तेंकरून मनुष्याचे शरीराचा विशेप दाह होतो तो.
३ उष्णांगत्व—ज्या पित्तापासून अंग सर्वदां ऊन असतें तो.
४ मतिभ्रम—ज्या पित्तेंकरून मनुष्यास वरचेवर चक्कर येतात व मस्तक भ्रमल्यासारखें होतें तो.

५ कांतिहानि—ज्या पित्तेंकरून मनुष्याचे शरीराचा वर्ण बदलून कांतीचा नाश होतो तो.

६ कंठशोष—ज्या पित्तेंकरून कंठाचा शोष होतो तो.
७ मुखशोष—ज्या पित्तेंकरून तोंडाचा शोष होतो तो.
८ अल्पशुक्रता—ज्या पित्तेंकरून धातु क्षीण होते तो.
९ तिक्तास्यता—ज्या पित्तेंकरून मनुष्याचें तोंड कडू होतें तो.
१० आम्लवक्त्रत्व—ज्या पित्तेंकरून मनुष्याचें तोंड आंबट होते तो.
११ स्वेदस्राव—ज्या पित्तेंकरून मनुष्याचे शरीरास घाम येतो तो.
१२ अंगपाक—ज्या पित्तेंकरून शरीराचा पाक होतो तो.
१३ क्लम—ज्या पित्तेंकरून शरीराला ग्लानि येते तो.
१४ हरितवर्ण—ज्या पित्तेंकरून शरीराचा हिरवा वर्ण होतो तो.
१५ अतृप्ति—ज्या पित्तेंकरून भोजनाविषयीं इच्छा तृप्त होत नाहीं तो.
१६ पीतकायता—ज्या पित्तेंकरून शरीर हळदीसारखें पिवळें होते तो.
१७ रक्तस्राव—ज्या पित्तेंकरून रक्तस्राव होतो तो.
१८ अंगदरण—ज्या पित्तेंकरून शरीराची त्वचा फाटते तो.
१९ लोहगंधा—ज्या पित्तेंकरून लोखंड भात्यानें तापविल्यावर जसा गंध येतो तसा अंगास गंध येतो तो.

२० दौर्गंध्य—ज्या पित्तेंकरून गात्रांना दौर्गंध्य येतें तो.
२१ पीतमूत्रत्व—ज्या पित्तेंकरून मुतायला पिंवळें होतें तो.
२२ अराति—ज्या पित्तेंकरून पदार्थांवर प्रीति राहत नाहीं तो.
२३ पीतविट्कत्व—ज्या पित्तेंकरून मळ पिंवळा होतो तो.
२४ पीतावलोकन—ज्या पित्तेंकरून सर्व पदार्थ पिवळे पाहतो तो.
२५ पीतनेत्रता—ज्या पित्तेंकरून डोळे पिवळे होतात तो.
२६ पीतदंत—ज्या पित्तेंकरून दांत पिवळे होतात तो.

२७ **शीतेच्छा**--ज्या पित्तेंकरून थंड पदार्थावर इच्छा होते तो.
२८ **पीतनखता**--ज्या पित्तेंकरून नखें पिवळीं होतात तो.
२९ **तेजोद्वेष**—ज्या पित्तेंकरून दीप व अग्नि यांचा द्वेष करितो.
३० **अल्पनिद्रता**--ज्या पित्तेंकरून झोंप थोडी येते तो.
३१ **कोप**—ज्या पित्तेंकरून मनुष्यास झट्कन राग येतो तो.
३२ **गात्रसाद**—ज्या पित्तेंकरून गात्रांना पीडा होते तो.
३३ **भिन्नविट्कत्व**—ज्या पित्तेंकरून मळ पातळ होतो तो.
३४ **अंधता**—ज्या पित्तेंकरून दृष्टीचा नाश होतो तो.
३५ **उष्णोच्छ्वासत्व**—ज्या पित्तेंकरून उष्ण श्वास येतो.
३६ **उष्णमूत्रत्व**—ज्या पित्तेंकरून मुतावयास उष्ण होतें तो.
३७ **उष्णमलत्व**—ज्या पित्तेंकरून मल उष्ण होतो तो.
३८ **तमोदर्शन**—ज्या पित्तेंकरून अंधारांत गेल्यासारखें होतो तो.

३९ **पीतमंडलदर्शन**—ज्या पित्तें करून शरीरावर पीतवर्ण मंडलें दिसतात तो.

४० **निःसरत्व**—पित्त तोंडावाटें अथवा गुदावाटें पडतें तो.

**सर्व प्रकारचे पित्तांवर उपाय**—( १ ) द्राक्षें ( मनुका ) खजूर, जेष्टमध, आंवळकठी, चवक, चंदन, वाळा, तवकीर, कंकोळ, वेलदोडे, हिरडा, जिरें, हें समभाग आणि सर्वांबरोबर साखर घालून तें सर्व एकत्र करून त्यांतून एक तोळा नित्य भक्षण करावें; ह्मणजे अंगदाह व पित्त यांचा नाश होतो. ( २ ) गुळवेलीचें सत्व ४ गुंजा तूप व खडीसाखर यांत द्यावें. ( ३ ) प्रवाळभस्म, गाईचें दूध व बत्तासे किंवा खडीसाखर यांत देत जावें. ( ४ ) सूतशेखर आंवळ्याच्या मुरंब्याबरोबर एक गुंजप्रमाण देत जावा. ( ५ ) साळीच्या लाह्या थोड्या शिजवून त्यांत साखर, एलची दाणे, व थोडा निंबूरस घालून त्याचा लेह करून द्यावा. (६) आंवळकठीचें चूर्ण सहा मासे, साजूक तूप सहा मासे, व एक तोळा साखर हीं सर्व एकत्र करून द्यावी. ( ७ ) त्रिफळा चूर्ण किंवा तिफळ्याचा काढा रेच होण्याकरितां देत जावा. ( ८ ) बडीशेप व धणे रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं त्यांतच कुसकरून तें पाणी गाळून त्यांत साखर घालून द्यावें. ( ९ ) साखरपाणी सेवन करावें. ( १० ) गुलाबी सरबत सेवन करावें. ( ११ ) डाळिंबाचें सरबत सेवन करावें. ( १२ ) तूप, साखर व सोनकेळें एकत्र करून सेवन करावी.

**पित्तावर पथ्यें**—रेच, जुन्या साळीचा भात, गाईचें दूध, तूप, साखर मुगाचें वरण, जुन्या गव्हाची पोळी, जोंधळ्याची भाकर, आदमुरें, ह्मशीचें दहीं, तापवून निवालेलें पाणी किंवा थंडगार पाणी, आमसुलें, पिकलेलें कवठ, आंवळकठीची चटणी, श्रीखंड, सर्व मधुर पदार्थ व फळें, चादणें, थंड वाळवंट, निद्रा, थंड व-

गीच्यांतून हवा खात फिरणें, सुगंध पदार्थांची अंगास उटी व दाहरोगावरचीं सर्व पथ्यें पित्तरोगावर करावी नें हितकारक आहे.

**पित्तावर अपथ्य**—विडा, हिंग, तेलकट, तिखट, व आंबट पदार्थ, गूळ व सर्व अपथ्यें दाहरोगावर जीं सांगितलीं आहे तीं वर्ज करावीं.

---

## प्रमेह ( परमा ).

॥ तथामेहाश्चविंशतिः ॥

**अर्थ**—एकंदर विस प्रकारचे मेह आहेत.

**कर्मविपाक**—जन्मांतरी सुवर्णाची चोरी, कर्मान्तरीं विद्याची चोरी, कन्या, माता, भगिनी, भ्रातृभार्या, इत्यादिकाचेठायीं जो गमन करितो त्याला परमारोग होतो. **परिहार**—द्वादशाब्द प्रायश्चित्त, ब्राह्मणभोजन, पुरुषसूक्त जप, रुद्रसूक्त होम, पिपीलिकामध्यें, चांद्रायण, गोप्रदान, इत्यादि करावें.

**प्रमेहाचें कारण** ( मा. नि. )—एकेठिकाणी निचेष्ट बसणें, निद्रा, दहीं भक्षण, गांवातील व पाण्यातील प्राण्यांचे मांसरस, व दूध, नवें अन्न, नवें पाणी, साखर, काकवी, राब, गुळाचे पदार्थ आणि सर्व कफकारक पदार्थ व विशेषेंकरून खराब स्त्रियांशी मैथुन हीं प्रमेह होण्यास कारणें जाणावी.

**प्रमेहाचें कारण** ( वागभट )—मेद, मूत्र व कफ यांस करणारें अन्न, पान व क्रिया, इत्यादि प्रकार, गोड, आंबट, खारट, स्निग्ध, जड, चिकट, व थंड पदार्थ आणि नवें धान्य, सुरा, अनूपमास, ऊंस, गूळ, दूध, दही, तसेंच एका जागी फार वेळ बसणें, व शास्त्रांत सांगितलेले नियम सोडून निजणें, ह्या कारणानीं प्रमेह होतो.

**अन्यग्रंथाचें मत**—प्रमेह या शब्दाचा अर्थ स्राव होणें असा आहे. प्राचीन ग्रंथकार हा रोग ह्मणजे धातुस्राव समजत असत. प्रमेहाचा स्राव उपदंशाच्या स्रावापासून अगदीं भिन्न आहे. प्रमेहाच्या लसेचा परिणाम पिच्छात्वचेवर मात्र होतो. नेत्र, नाक, गुद वगैरे भागांस प्रमेहाची लस लागली असतां दाह होऊन प्रमेहाप्रमाणें स्राव होऊं लागतो. संशययुक्त संभोग झाल्यानंतर सुमारें चारपासून आठ दिवसांचे आंत हा रोग उद्भवतो. क्वचित् थोड्या तासाचे आंत हा रोग उद्भवल्याची उदाहरणे पाहण्यांत आली आहेत. कधींकधी दाह अथवा पंधरा दिवसांनंतर हा रोग झालेला पाहण्यात आला आहे. लक्षणाच्या तीन अवस्था केल्या आहेत. पहिली अभिनिवेश, दुसरी दाह, तिसरी विलंबी, लघवीद्वाराशी लघवीच्या मार्गांत चुणचुणल्यासारखी अथवा खाज सुटल्यासारखी लघवी

करतांना भास उत्पन्न होतो तो. लघवी करण्याचें छिद्र लाल होतें, सुजतें आणि पातळ सफेत स्त्रावामुळें चिकटतें. दाबल्यानें आतून श्लेष्मयुक्त पू निघतो. हें इंग्लिश डाक्टराचें मत आहे.

**पूर्वरूप** ( मा. नि. )—दांत, जिव्हा, टाळू इतक्यांवर मळ जमणें, हातापायांची आग, अंगाला चिकटा, तृषा, श्वास, आणि केंश, नखें व जटा इत्यादि कांसवृद्धि हीं लक्षणें होतात.

**प्रमेहाचें सामान्य लक्षण** ( सुश्रुत )—मूत्र फार असून गढूळल्यासारखें होतें व दोष आणि दूष्य यांचे ठायीं यद्यपि भेद नाहीत तथापि त्याचा संयोगजन्य भेद आहे. यास्तव मूत्रवर्ण भेदानें प्रमेहाचेठायीं भेद विकल्प होतात. हें भेद उत्तम प्रकारें जाणून महा वैद्यांनीं मेहाची चिकित्सा करावी. या प्रमेहाचे भेद २० आहेत

**इंग्लिश डाक्टरांचें मत**—दाहाच्या अवस्थेस आरंभ झाला ह्मणजे लघवी करतांना फार आग होते व दाट पुवाचा स्त्राव होऊं लागतो. कधीं तो दुधासारखा, पिवळा, हिरवा, अथवा रक्ताच्या वर्णासारखा होतो. या अवस्थेंत रात्रीं रोग्याची झोपमोड होते व शारीरिक आणि दुसरे कित्येक संकर विकार उद्भवतात. या स्थितीत रोग आठपासून पंधरा दिवस राहून दाहाची लक्षणें कमी होऊं लागतात. व तो विलंबी होतो. विलंबी अवस्थेंत लघवी करताना किंचित् आग झाल्याचा भास होतो. व पिवळ्या रंगाचा स्त्राव होत असतो. योग्य उपाय न केल्यास तो कित्येक महिने किंबहुना कित्येक वर्षेपर्यंत तसाच राहतो. या अवस्थेस ग्लीट असें ह्मणतात.

**प्रमेहाचे संकर**[1]—( १ ) मूत्राशयाचा दाह होतो, तेणेंकरून लघवी करण्याची वारंवार शंका होते व अतिशय वेदना होतात. अथवा मूत्राशयाचा दाह झाल्यामुळें मूत्राशयाच्या मानेचा संकोच होऊन लघवी बंद होते, वारंवार जननेंद्रियाचा क्षोभ होऊन तें ताठतें, रात्री त्यामुळें फार त्रास होतो. व रोग्याय झोंप लागत नाही. जननेंद्रियाची चामडी सुजल्यामुळें ती पाठीमागें ओढवत नाही. अथवा चामडी पाठीमागें राहून सुजते व ती पुढें ओढवत नाही. जांघेच्या गाठी सुजतात त्यांलाच वद असे ह्मणतात वृषण सुजतात. हा विकार प्रमेहास आरंभ झाल्यानंतर बरेच दिवसानीं होतो. यात अंड सुजून त्यात वेदना होऊं लागतात. दाबल्यानें वेदना वाढतात. त्याबरोबर ताप येतो. व कधी कधी वातीही होते, सन्धिवात होतो, डोळे येतात असें जाणावें. हा रोग स्पर्शजन्य आहे. ज्या स्त्रियांस हा रोग असतो, त्याशी संभोग केल्यानें हा उद्भवतो. कधीं कधी हें कारण नसताही होतो. आर्तव, तीक्ष्ण प्रदर, स्वच्छतेचा अभाव, इत्यादि कारणांनीं स्त्रियास हा

---

१—संकर म्हणजे एका रोगात दुसरा रोग उद्भवणे त्याला संकर अशी संज्ञा आहे

रोग होतो. कधीं कधीं सर्दी, संधिवात प्रकृति, व अव्यवस्थितपणा, अति उष्ण उष्ण पदार्थ खाणें, वगैरे कारणांनीं पुरुषासही हा विकार होतो असें जाणावें.

**कफादिजन्यमेहाचें साध्यासाध्यत्व** ( सुश्रुत )—कफापासून झालेले दहा प्रमेह साध्य होतात. कारण कफदोष आणि दूष्यरस मांसादि या उभयतांची उपशमात्मक क्रिया कटुकषाय तिक्तादि पदार्थ सेवन करून ती सम आहे ह्मणून. पित्तजन्य सहा प्रमेह कष्टसाध्य आहेत. कारण दोष आणि दूष्य या उभयतांची क्रिया विषम आहे. कारण पित्तदोष आणि दूष्य, रस, मांसादिक याविषयीं शीतें मधुरादिक पित्तशामक क्रिया ती रसमांसादिकाला उत्पन्न करणारी आहे, आणि मेदनाशक कटुतिक्तादि ते पित्तकर आहेत. वातजन्य चार प्रमेह असाध्य आहेत. कारण वायु मज्जादिक गंभीर धातूंचें आकर्षण करून पीडा करितो आणि येथें क्रियाही विषम होते ह्मणून असाध्य. कफ, पित्त व वायु हे दोष आणि मेद शुक्र, शरीरगत क्लेद, मांसस्नेह, ( चरबी ) मज्जा, रस व ओज ( सर्व धातूंचें सार ) मांस हीं दूष्यें जाणावीं. याच्या योगानें रोग्याला वीस प्रकारचे मेह, होतात. ते वर्णानुक्रमानें प्रथम कफमेह १०, पित्तमेह ६, आणि वातमेह ४ सांगितले आहेत.

१ **उदकमेही** (मा. नि.)—उदकासारखें स्वच्छ, गंधरहित, पुष्कळ व थंड, शुभ्र, किंचित् गढूळ आणि बुळबुळीत असें मूत्र होतें. **उपाय**—( १ ) पारिजातकाच्या सालीचा अथवा मुळाचा काढा मध घालून द्यावा. ( २ ) कायफळ, बाळहिरडे, नागरमोथे व लोध यांचा काढा मध घालून द्यावा.

२ **इक्षुमेही** ( मा. नि. )—किंचित् गढूळ असून उंसाच्या रसाप्रमाणें अत्यंत मधुर असें मूत्र होतें. **उपाय**—( १ ) कडू निंबाचा काढा अथवा पाहाडमूळ, वावडिंग अर्जुनसादडा व धमासा यांचा काढा मध घालून द्यावा.

३ **सांद्रमेही** ( मा. नि. )—मूत्र शिळें झालें असतां थिजतें. **उपाय**—[ १ ] सातवणीचा किंवा दारुहळद, खाती हळद, तगर व वावडिंग यांचा काढा मध घालून द्यावा.

४ **सुरामेही** ( मा. नि. )—मद्यासारखें मुततो आणि तें मूत्र रात्रीं कांचेचे पालामध्यें ठेविलें असतां वरतीं पाण्याप्रमाणें निवळतें आणि गाळ जाऊन तळीं बसतो. **उपाय**—( १ ) कांटे शेवरीच्या सालीचा किंवा कळंबाची साल, सागाचें बीज, अर्जुनसादड्याची साल व ओंवा यांचा काढा मध घालून द्यावा.

५ **पिष्टमेही** ( मा. नि. )—पिठासारखा श्वेतवर्ण आणि बहुत मुततो. व मुततेवेळीं अंगास शाहरे येतात. **उपाय**—( १ ) हळद किंवा दारुहळद, वावडिंग, खैराची साल, व धावडा, यांचा काढा मध घालून द्यावा.

६ शुक्रमेही ( मा. नि. )—शुक्रासारखें अथवा शुक्रमिश्रित मूत्र असतें. उपाय—( १ ) दूर्वा, पाण्यांतील शेवाळ, लहान नागरमोथे, करंज, व कचोरा यांचा काढा किंवा अर्जुनसादडा व चंदन, यांचा काढा मध घालून द्यावा. ( २ ) देवदार, कोष्ठ, कोळिंजन, रक्तचंदन व अर्जुनसादडा यांचा काढा मध घालून द्यावा.

७ सिकतामेही ( मा. नि. )—रेती सारखें कण मुततो. उपाय—( १ ) कडुनिंबाचे सालीचा अथवा दारुहळद, ऐरण, त्रिफळा, व पाहाडमूळ यांचा काढा मध घालून द्यावा.

८ शीतमेही ( मा. नि. )—अत्यंत शीतल आणि बहुतकरून मधुर मुततो. उपाय—( १ ) पाहाडमूळ व गोखरू यांचा काढा किंवा पाहाडमूळ, मोरवेल व गोखरू, यांचा काढा मध घालून द्यावा.

९ शनैर्मेही ( मा. नि. )—थोडें थोडें मंद असें मुततो. उपाय—( १ ) त्रिफळा व गुळवेल यांचा काढा किंवा ओंवा, वाळा, हिरडेदळ व गुळवेल, यांचा काढा मध घालून द्यावा.

१० लालामेही (मा. नि.)—लाळेप्रमाणें तंतुयुक्त व बुळबुळीत असें मुततो. उपाय—( १ ) त्रिफळा, वहाव्याचा मगज व मनुका यांचा काढा किंवा जांभूळ, आंवळकठी, चित्रक व सातवीण यांचा काढा मध घालून द्यावा.

१ क्षारमेही ( मा.नि )—गंध रस व क्षारोदकासारखें मूत्र होतें. उपाय—[ १ ] त्रिफळ्याचा किंवा नागरमोथे, हिरडेदळ व पोखरमूळ यांचा काढा द्यावा.

२ नीलमेही ( मा. नि. )—नीलवर्ण मूत्र होतें. उपाय—[ १ ] पिंपळाचे सालीचा किंवा कडू पडवळ, कडू निंब, आंवळकठी व गुळवेल, यांचा काढा मध घालून द्यावा.

३ कालमेही ( मा. नि. )—काजळासारखें कृष्णवर्ण मूत्र होतें. उपाय—[ १ ] लोध, वाळा, दारुहळद व धायटीची फुलें, याचा काढा मध घालून द्यावा.

४ हरिद्रामेही ( मा. नि. )—तिखट हळदीसारखें पिवळें व कढत असें मुततो. उपाय—(१) वहाव्याच्या शेंगेंतला मगज याचा काढा किंवा वाळा, नागरमोथे, आंवळकठी व हिरडेदळ, यांचा काढा मध घालून द्यावा.

५ मंजिष्ठमेही ( मा. नि. )—आमगंधी व मंजिष्ठाचे काढ्यासारखें लाल असें मूत्र होतें. उपाय—(१) मंजिष्ठ व रक्तचंदन यांचा किंवा वाळा, लोध, आस्कंद व रक्तचंदन, यांचा काढा मध घालून द्यावा.

६ रक्तमेही ( मा नि. )—आमगंधी, उष्ण, खारट, व रक्तासारखें लाल मूत्र होतें. उपाय—( १ ) गुळवेल, टेंभुरणीचें बीज, शिवणीचें फळ व खजूर

यांचा काढा किंवा सुंठ, अर्जुनसादडा, बडीशेप व कमळ यांचा काढा मध घालून द्यावा. ( २ ) नाकेशर व कंकोळ यांचा अष्टमांश काढा मध घालून द्यावा.

१ **वसामेही** ( मा. नि. ) वसा ( चरबी ) मिश्रित किंवा वसेसारखा वारंवार मुततो. **उपाय**--( १ ) ऐरणीचा काढा किंवा काळे शिसव्याचा काढा मध घालून द्यावा.

२ **मज्जामेही** ( मा. नि. )--मज्जेसारखें किंवा मज्जामिश्रित मूत्र वारंवार होतें. **उपाय**--( १ ) कोष्ठ, कोळिंजन, पहाडमूळ, हिंग व कुटकी यांचें चूर्ण किंवा गुळवेल व चित्रक यांचा काढा मध घालून द्यावा.

३ **क्षौद्रमेही** ( मा. नि. )--तुरट, मधुर आणि स्निग्ध असें मूत्र होतें. **उपाय**--(१) सुपारी व पांढरा खैर यांचा काढा मध घालून द्यावा; किंवा चुका व मेदा यांचा काढा मध घालून द्यावा.

४ **हस्तिमेही** ( मा. नि. )--हस्तीचे गंडस्थळापासून निरंतर जसें दानोदक स्रवतें त्याप्रमाणें वेगरहित व लसेनें युक्त आणि अडकत अडकत असें शिश्नापासून निरंतर मूत्र स्रवतें. **उपाय**--[ १ ] टेंभूरणी, कवठ, शिरस, पळस, पाहाडमूळ, मोरवेल, धमासा, यांचा काढा मध घालून द्यावा.

**कफमेहाचे उपद्रव** ( मा. नि. )--अन्नाचा पाक न होणें, अरुचि, ओकारी, ज्वर, ओला खोकला व पडसें ही लक्षणें होतात.

**पित्तमेहाचे उपद्रव** ( मा. नि. (--बस्ति आणि लिंग यांचेठायीं, टोंचल्यासारखी पीडा, व अंडावरची त्वचा पिकून फाटते, ज्वर, तृषा, आंबट ढेकर, मूर्छा आणि मळ पातळ होणें, ही लक्षणें होतात.

**वातमेहाचे उपद्रव** ( मा. नि. )--उदावर्त, गळा, व हृदय यांचा निरोध, लोलता ( सर्व रस भक्षणाची इच्छा ) शूल, निद्रानाश, शोष, सुका खोकला, व श्वास, हीं लक्षणें होतात.

हें वरील २० प्रमेहांचें निदान व चिकित्सा सांगितली आहे. परंतु याशिवाय ही मिश्र दोषानें द्वंद्वज लक्षणें जाणावी. व त्याजवर उपचारही दोहों दोषांनींयुक्त असे साम्य उपचार करावे.

**कफपित्तजमेहावर**--( १ ) कपिला, सात्वीण, अर्जुनसादडा, बेहेडेदळ, रक्तरोडा व कुड्याची फुलें, हीं सर्व समभाग दह्यांत वांटून कल्क करून तो मध घालून सेवन करावा.

**कफवातजमेहावर**--( १ ) वाळहिरडे, कायफळ, नागरमोथे, लोध्र, रक्तचंदन व वाळा यांचा काढा मध किंवा हळदीचें चूर्ण घालून द्यावा.

**पित्तवातजमेहावर**—( १ ) वावडिंग, दारुहळद, हळद, खैरसाल, वाळा, व सुपारी यांचा काढा मद्य घालून प्रातःकाळीं द्यावा.

**मेहाचें असाध्य लक्षण** ( मा. नि. )—रोगाचे धास्तीनें किंवा वर सांगितलेल्या अविपाकादि उपद्रवांनी युक्त ज्याचे मूत्राचा स्राव फार झाला आहे. शराविकादि पिटिकानी युक्त, रोग फार दिवसांचा अंगात मुरलेला, अशी लक्षणें झालीं असतां असाध्य. मधुमेही पुरुपासून उत्पन्न झालेल्या प्रमेही पुरुषाचा रोग बीजदोपामुळें साध्य होत नाहीं. येथें मधुमेह शब्दानें सामान्य मेहही जाणावा. सर्व प्रमेह औपध पोचलें नसतां कालेंकरून मधुमेहत्व पावतात. तेंव्हां तेही असाध्य होतात. जो प्रमेही पुरुप मधुमेही पित्यापासून उत्पन्न झाला त्याचा मेह साध्य होत नाहीं, कारण तो प्रमेह महा प्रमेहारंभक दोपांनीं दुष्ट झालेले बीजापासून उत्पन्न होतो ह्मणून व जे अन्य कुलसबंधी ह्मणजे पितृपितामहादिसंभूत असे कुष्ठादि नानाविकार तेही असाध्य जाणावे. कारण गर्भसंभवकाळी बीजच तद्युक्त दूपित असतें ह्मणून ज्वर, तृपा, अतिसार, दाह, अति दुर्वलता, अरुचि, अन्न न पचणें, ही लक्षणें झालीं असतां रोगी असाध्य जाणावा.

**साध्यलक्षण**—ज्या कालीं प्रमेहरोग्याचें मूत्र गढूळ व चिकट न होतां स्वच्छ व कडू, तिखट, असें होतें त्याकाळी रोग्यास आरोग्य होईल असें जाणावें. त्याचप्रमाणें मनात रोगाची धास्ती न बाळगणारास व पथ्यानें वागणारास निश्चयानें आरोग्य होतें असें जाणावें.

**मधुमेह** ( मा. नि. )—सर्व मेह उपेक्षेनें ह्मणजे हयगईनें मधुमेहत्व पावतात. ( मूत्र मधासारखें गोड होतें ) धातुक्षय आणि आवरण यापासून कुपित झालेल्या वायूनें मधुमेहाचा संभव होतो. या मधुमेहामध्यें मूत्र मधासारखें गोड होतें. तो दोन प्रकारचा आहे. तो असा की धातुक्षयानें वायु कुपित होऊन होतो तो एक आणि दोपानें वायूचा मार्ग आवृत केल्यामुळें होतो तो दुसरा.

**आवरणलक्षण**—आवृत वायूनें केलेला मधुमेह ज्या पित्तादि दोषानें आवृत झालेला असेल त्याची लक्षणें अकस्मात् दाखवितो, क्षणांत क्षीण होतो, व क्षणात पूर्ण होतो. तो कष्टसाध्य जाणावा.

**मधुमेह शब्दाच्या प्रवृत्तीविपयीं निमित्त** ( मा. नि. )—प्रमेहामध्यें रोगी प्रायशः मधासारखें मधुर मुततो आणि सर्व शरीराला मधुरत्व येतें. ह्मणून सर्व प्रमेहाला मधुमेह संज्ञा दिली आहे ( **खुलासा** ) यावरून असें दिसतें की मधुमेह हा वीस प्रमेहांहून निराळा नाहीं त्यातलाच आहे. परंतु हल्ली प्रचारांत हा रोग बराच वाढला आहे व तो बहुतकरून श्रीमंत लोकांसच होतो. याचें मुख्य कारण असें दिसतें कीं, ज्या मनुष्यास वरील वीस प्रमेहांपैकी कोणताही एखादा प्रमेह फार दिवस अंगांत मुरून राहतो व पुढें कमताकत झाली असतां किंवा जो मनुष्य

स्वतः कष्ट करणारा नसतो त्यासच प्रायः हा रोग होतो व असेंही पाहण्यांत येतें कीं, जो मनुष्य या रोगानें युक्त असतां उन्हांत अतिशय चालतो. स्वतः हातांनीं जमीन खणितो व इतर कष्ट करितो त्याचा मधुमेह औषधाशिवाय शांत होतो. बहुमूत्रमेह ह्मणजे मूत्रातिसार याचींही बहुतेक लक्षणें मधुमेहासारखींच होतात, त्यामुळें रोग्यास मधुमेहाचा संभव होऊन मधुमेहच झाला कीं काय, अशा चिंततेनें तो रोगी विपत्तींत पडतो. हा बहुमूत्रमेह तरी वीस प्रकारांपैकींच समजला पाहिजे, त्याचीं विशेष लक्षणें सांगतों. मधुमेही व बहुमूत्रमेही या रोग्यास पुढें काळपुळी ( पाठे ) झाल्याचीं पुष्कळ उदाहरणें आढळतात.

**बहुमूत्रमेह प्रकार १ ला ( सुश्रुत )**—कृशता ( रोगी दुर्बळ होणें ) अंगास घाम व घाण व हात, पाय, जिव्हा, नेत्र व कर्ण यांचा दाह, खोकला, अंगास शिथीलपणा, अरुचि, अंगावर व तोंडावर फुटकुळ्या व कंठ टाळू ओंठ यांचेठायीं शोष, दाह, थंड पदार्थावर इच्छा, पांढरेपणा, अति कृशत्व, थकणें व मूत्र पिवळें आणि ज्या ठिकाणीं मुतेल तेथें मुंग्यामाश्या वगैरे येतात. इतकीं लक्षणें बहुमूत्र रोग वाढला ह्मणजे होतात.

**प्रकार २ रा**—अंगास घाम, घाण, शिथिलपणा व शय्या, बसणें, निद्रा, यांचे सुखाची इच्छा, हृदय, नेत्र, जिव्हा कान यांचा दाह, अंग जड, केश, नखें यांची वृद्धि, शीत पदार्थ प्रिय वाटणें, गळा, टाळू यांचेठायी शोष, तोंड गोड, हात पाय यांचा दाह व मूत्राला मुंग्या किंवा माश्या लागणें, तहान, मूत्र गोड, चकचकीत व मधासारखें व अनेक प्रकारचे उपद्रव आणि दोष क्षीण झाले असतां कफाचें प्राबल्य अशी लक्षणें होतात आणि कफमेह फार वाढला नसता साध्य होतो. व पित्तमेह याप्य ह्मणजे कष्टसाध्य होतो व वातमेह असाध्य होतो.

**इंग्लिश डाक्टरांचें मत**—हा शारीरिक रोग असून त्यांत मूत्राचें प्रमाण फार वाढतें. तें रंगरहित असून गोड व वजनदार असतें व त्यात शर्करा सांपडते. **लक्षणें**—सुस्ति, अतिशय क्षीणता, हळुहळु शरीर कृश होणें, जीभ आरक्तवर्ण असते व तिच्यावर भेगा पडतात, तिचे कण मोठे होतात, अतिशय तृषा लागते, वारंवार लघवी होते, अतिशय क्षुधा व पोटांत गळाल्यासारखा भास, बद्धकोष्ठ आणि शौच्यास खडा, शरीराची त्वचा शुष्क व श्वासास मधुर, वास ही लक्षणें रोगाच्या तीव्रतेप्रमाणें कमीजास्त वाढतात. गळवें, काळपुळ्या, पायांवर सूज वगैरे ललक्षें उद्भवतात. कितीही पाणी प्याल्यानें तृषा न भागणें हें ह्या रोगाचें मुख्य लक्षण आहे. शरीराची स्वाभावीक उष्णता कमी असते. ह्मणजे ९७ डिग्री असते.—चोवीस तासांत लघवीचें प्रमाण आठापासून वीस शेर, कधीं कधीं ३० शेर वाढतें त्यामुळें लघवी वारंवार करण्याची जरूर पडते. तीस शेर लघवीचे विशिष्ट गुरुत्व १०४० असलें तर तींत साखरेचें प्रमाण सुमारें चार शेर अ-

सतें. या मानानें थोड्या महिन्यांत रोगाच्या वजनाबरोबर साखर त्याचे शरीरांतून जाते. लघवीचा वर्ण गवताच्या रंगासारखा ह्मणजे पिंवळट असतो.

बहुमूत्रमेह—ह्या रोगांत लघवीचें प्रमाण वाढतें, पण तींत साखर नसते. किंचित् क्षीणता, याशिवाय रोग्यास दुसरी कोणचीही अडचण होत नाहीं. **कारणें**—पचनक्रियेंत कांहीं व्यंग उत्पन्न होऊन खाल्लेल्या अन्नांतील साखरेचा भाग न पचतां रक्तांतून लघवीद्वारानें बाहेर निघतो. खाल्लेल्या अन्नांतील साखरेचा भाग म्हणजे जी साखर खाण्यांत येते ती नव्हे पण भात व त्या सारखे दुसरे पदार्थावर लाळेचें कार्य घडून जी साखर उत्पन्न होते ती होय.

**चिकित्सा**—इंग्रजी व देशी औषधें ह्या रोगावर लागू पडत नाहीं असें बहुतेकांच्या अनुभवास आलें आहे, होम्योपाथिक औषधें ह्या रोगावर चांगली लागू पडून रोग बरा झाल्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. करितां येथें ते प्रयोग कांहीं घेतले आहेत.

Acid Phosphoric—**आसिड--फास्फारिक**—वारंवार लघवी करण्याची जरूर पडते. कंबर दुखणें, शरीरकृशता व आशक्तता, अतिशय मानसिक श्रमानें रोगाची उत्पत्ति, हीं लक्षणें असली ह्मणजे ह्या औषधाचा उपयोग करावा. ह्या औषधापासून शक्ति येऊन लघवीचें विशिष्ट गुरुत्व कमी होतें. **प्रमाण**—अर्काचे चार थेंब पावशेर पाण्यांत घालून दर दोन तासांनीं द्यावें. हें औषध बरेच महिनेपर्यंत घेतलें पाहिजे.

Uranium Nit०—**युरेनिअम नाइट्रस**—ह्या औषधानेंही पुष्कळांस गुण आला आहे. वरचें औषध बरेच महिने घेऊन गुण न आल्यास हें औषध घेण्यास आरंभ करावा. **प्रमाण**—अर्काचा एक थेंब एक तोळा पाण्यांत दिवसांतून याप्रमाणें चार वेळ द्यावा.

**उपयुक्त उपचार**—खाण्याच्या ज्या पदार्थांत साखर येते, ते पदार्थ व ज्या पदार्थांपासून पचनक्रियेंत साखर उत्पन्न होते ते पदार्थ वर्ज्य करावे. मुख्यत्वेंकरून दूध व कोंड्याची भाकर व ज्यास धर्माविषयी हरकत नसेल त्यानें मांस व हे पदार्थ खावें. अजीर्ण होईल असे पदार्थ खाऊं नये. तृषा लागेल त्याप्रमाणें पाणी प्यावें. उष्ण पाण्याचें स्नान व अंगांत फ्लानीनचे गरम कपडे घातल्यानें सुख होतें. होऊं शकेल तर कसरत करून अंगांतून घाम काढीत जावा. थंडी, वारा व हवेंत एकाएकीं फेरफार ह्यापासून रोग्यानें आपलें संरक्षण करावें. फक्त दुधावर राहिल्यानें लघवींतील शर्करा कमी होऊन रोगी बरा झाल्याचीं उदाहरणें आढळतात. दूध ऊन करून त्यावरची साय काढून टाकून जिरवेल तितकेंच तें दूध घेत जावें.

**मधुमेह व बहुमूत्रमेह यांजवर देशीं औषधें**--प्रथम तीक्ष्ण रेचकें देऊन

कोठा शुद्ध करावा (१) पाऱ्याचें भस्म, वंगभस्म अर्जुनसादडा व सज्जीमागर हीं सर्व समभाग घेऊन कांटेसावरीच्या काढ्यानें एक दिवस खलून एक मासा प्रमाण गोळ्या कराव्या. एक एक गोळी मधांत देत जावी ही इंद्रवटी मधुमेहाचा नाश करणारी आहे. ( २ ) वंगभस्म मधांत द्यावें. ( ३ ) निवळ्याच्या फळाच्या सालीचा काढा, रक्त्याबोळाचें चूर्ण घालून द्यावा. ( ४ ) जांभळीच्या सालीचें चूर्ण सकाळीं १ तोळा व रात्रीं १ तोळा मधांत द्यावें. ( ५ ) ज्याला मधुमेह असाध्य म्हणून वैद्यानें सोडला आहे, त्या पुरुषानें ४०० तोळ्यापर्यंत शुद्ध शिलाजीत मेंगाचा काढा करून त्यांत नित्य बलाबल पाहून सेवन करीत जावा; म्हणजे तो मधुमेहांनीं व्याप्त असला तरी पुनः अगदीं नवा होतो. ( ६ ) जांभळाचे बियांचें चूर्ण मधांत द्यावें. ( ७ ) त्रिफळा, वेळूची पानें, नागरमोथे व पाहाडमूळ यांचा काढा व निकाढा मध घालून द्यावा; म्हणजे अगस्ती मुनीनें जसा समुद्र शोषिला तसा बहुमूत्र मेह याला शोष करील. ( ८ ) पारदभस्म, वंगभस्म, लोहभस्म व अभ्रकभस्म, हीं ४ भस्में समभाग घेऊन मधांत खलावीं. हा तालकेश्वररस एकवार मधांत द्यावा. (९.)रसककल्खापरीचें भस्म व कांतलोहभस्म हीं दोन्ही समभाग एकत्र करून तें सुमारें ३।४ गुंजा त्रिफळ्याचा काढा लोहपात्रांत रात्रीं ठेवून त्यांत तिळाचें चूर्ण घालून त्याशीं घेतलें असतां निश्चयानें मधुमेह जातो. व पित्त, क्षय, पांडुरोग, सूज, गुल्म, संपूर्ण योनिरोग, विष, अग्निमांद्य व ज्वर यांचाही नाश होतो. ( १० ) रिंगणीमूळ १०० तोळे पाण्यात टाकून चतुर्थांश काढा उरला म्हणजे गाळून त्यांत ६४ तोळे तूप, आणि त्रिकटू, त्रिफळा, रास्ना, वावडिंग, चित्रक, शिवणमूळ, करंजमूळ व साल रुईची साल हीं औषधें बारीक वांटून बारीक केलेलें चूर्ण १६ तोळे आंत टाकून मंदाग्नीनें घृत पक्व करावें. आणि शक्तीप्रमाणें दूधभाताबरोबर खावें; म्हणजे मधुमेह, मूत्रकृच्छ्र, भगंदर, आलस्य, अंडवृद्धि, विशेषेंकरून कुष्ठरोग व क्षय यांचा नाश करील. याला सिंहामृत घृत म्हणतात.

**मधुमेह व बहुमूत्रता यांजवर पथ्य**—तीक्ष्ण रेच, कळकीचें बीज, नाचण्या, वर्या, कोद्रू (हरीक), व सावे यांचें भात किंवा भाकरी, साठ्या जुन्या तांदुळांचा भात, मूग,उडीद, चवळ्या,कुळिथ,तुरीचें वरण,तीळ,मोहऱ्या, कवठ व जांभळें यांचीं रायती व चटण्या,मेथीची,करडईची व घोळूची भाजी,त्रिफळा,मध,हरबरे,जंगलामधील प्राण्यांचें मांस, उसाच्या रसापासून तयार केलेलें मद्य, मध व पाणी एकत्र करून उष्णोदकाशीं देणें, कोंड्याची भाकरी, उन्हांत छत्रीशिवाय फार फिरणें, व्यायाम करणें, जोर काढणें, कसरत करणें, जमीन खणणें, मुगदुलाच्या जोड्या फिरवणें, इत्यादि अंगमेहनत जितकी होईल तितकी करावी. जागरण करणें, अफू, नागवेलीचे रसांत खलून सर्वांगास खूप चोळीत जावें. इत्यादि पथ्य होय.

**अपथ्य**—सर्व कफकारक व मधुर पदार्थ, गूळ, साखर, उसाचा रस, गहू, तेल, तूप, निवांत बसणें, अंगमेहनत न करणें, दिवसास झोंप, नवें अन्न, नवें पाणी खराब पाणी, दहीं, पुष्टिकारक पदार्थ, हे वर्ज करावे.

तिडीक प्रमेह[1]—यांत तिडिकयुक्त जितक्या प्रकारचे प्रमेह आहेत तितक्यांचा समावेश होतो. लघवीचे वेळीं मोठा चटका बसतो. व ती साफ न होतां फारच जळजळ लागते. लिंग ताठतें, त्या योगानें वारंवार वेदना उत्पन्न होतात. प्रमेहपीडित रोग्यानें रोग बरा होईपर्यंत स्त्रीगमन करूं नये, कारण घर्षणाच्या योगानें आंतील चट्टा जोरास चढतो. आणि त्याचे सभोंवती जी सूज आलेली असते त्या जागी कात्रे पडतात. त्या योगानें सुखसाध्य होणारा प्रमेह कष्टसाध्य होऊन फार दिवस कष्ट भोगावे लागतात.

अन्य मत—प्रमेह झाल्यानें मनुष्यास अति वेदना होतात पुवाचा स्राव, मूत्रकृच्छ्र ह्मणजे थोडें थोडें मूत्र गळणें, उन्हाळी लागणें, शहारे येणें, मूत्रमार्गाचा संकोच म्हणजे मूत्र कोंडणें, व रात्री शिश्नोत्थान ( शिश्न जोरावणें ) होऊन शिश्न वांकणें व फार वेदना होतात, तेणेंकरून निद्रा लागत नाहीं व रोगी रात्रभर तरफडतो. पुढें संधिवात होतो, अंगावर पुरळ उठतात, डोळ्यांत दाह होऊन फुलें पडतात, दृष्टि मंद होते व कधीं कधी डोळे येतात. पुढें हा रोग गळ ह्मणजे धातु फाटणें, अथवा पातळ होणें, यारूपानें दीर्घकाळपर्यंत राहतो ह्या रोगापासून दुसरा अतिशय दुःसाध्य लज्जास्पद, क्लेशकारक, जन्मभर दुःख देणारा असा परिणाम होतो, तो नंपुसकत्व होय.

तिडिक प्रमेहावर उपाय—प्रथम तीक्ष्ण रेचन देऊन कोठा शुद्ध करावा. नंतर दुसरे दिवशीं मूत्रढाळ द्यावा. हे मूत्रढाळाचे प्रयोग उपदंश रोगांत सांगितले आहेत. त्यातील कोणताही एक उपाय करावा. नंतर तिसरे दिवसापासून पुढील कोणतेंही एक औषध प्रकृतीस मानेल तें घ्यावें (१) सोरा १ तोळा, वेलदोड्याचे दाणे २ तोळे, व जिरें अतपाव, याचें एकत्र वस्त्रगाळ चूर्ण करून ठेवावें. त्यापैकीं सकाळी १ तोळा व तिसरे प्रहरी १ तोळा चूर्ण सेवन करून एकेक वाटी वर ताक पीत जावें, म्हणजे तीन दिवसाच्या आंत तिडिक प्रमेह अगदी बंद होईल. ( २ ) सोरा व पळसाची फुले हे दोन्ही समभाग व या दोहोंचे दुप्पट खडीसाखर एकत्र चूर्ण करून ठेवावें. प्रातःकाळी १ तोळा व तिसरे प्रहरी १ तोळा चूर्ण घेऊन एक वाटीभर थंड पाणी घेऊन त्यात चूर्ण कालवून घेत जावें; म्हणजे तिडिकप्रमेहाचा मोठ्या जलदीने नाश होतो. ( ३ ) सोनामुखी, लकडीरेवाचिनी, उत्तम पांढरा सुवासिक चंदन, ही सर्व समभाग व या सर्वासमान खडीसाखर घालून त्यांत तें मिश्र चूर्ण करून ठेवावें. सकाळी १ तोळा व तिसरा प्रहरी १ तोळा चूर्ण घेऊन प्रत्येक वेळी गाईचें दूध पावशेर समभाग पाणी घालून त्यात तें मिश्र करून वर पीत जावें. याप्रमाणें तीन किंवा पाच दिवस सेवन केलें असतां तिडिकप्रमेहाचा निश्चयानें नाश

---

१—तिडीक प्रमेहाचा वरील वीस प्रकारचे प्रमेहात समावेश होत नाहीं व त्याजवरील औषधेही याजवर लागू पडत नाहींत यावरून हा मेह विसाहून निराळा समजू नये, कारण हा मेह मेहाचे पूर्वरूपात गणला जातो व त्याजवर औषध उपचारही निराळ्याच प्रकारचा सांगितला आहे.

होईल. ( ४ ) कडूनिंबाची अंतरसाल व बाभळीची अंतरसाल समभाग पांच तोळेपर्यंत घेऊन थोडी कुटून अस्तमानी एका मडक्यांत पाणी घालून भिजत ठेवावी. प्रात:काळीं ती पाट्यावर वांटून त्यांचा अंगरस चार तोळेपर्यंत काढून त्यांत सहा मासे खडीसाखरेची पूड घालून प्रातःकाळी तो रस सेवन करावा. व याचप्रमाणें तिसरे प्रहरींही स्वरस वरप्रमाणें काढून सेवन करावा म्हणजे हटकून तिडिकप्रमेहाचा नाश होईल, ( ५ ) वंशलोचन, एलची दाणे, वावडिंग, नागकेशर, रेवाचिनी व दारुहाळद हीं सर्व समभाग कुटून वस्त्रगाळ चूर्ण करावें. चंदनाचे तेलांत खलून बोराएवढ्या गोळ्या कराव्या. प्रातःकाळी एक, तिसरे प्रहरीं एक व रात्रीं निजतेवेळी एक, याप्रमाणें सेवन करून वर थंड पाण्याचा घोट घेत जावा; म्हणजे एक दिवसांत तिडीक बंद होते. ( ६ ) वंशलोचन १ तोळा आणि वेलदोड्याचे आंतील दाणे १ तोळा, या दोहींचें चूर्ण वस्त्रगाळ करून चंदनी तेलांत खलावें व त्याच्या बारीक सुपारीएवढ्या गोळ्या करून कुपीत भरून ठेवाव्या. एक गोळी घेऊन सुमारें पांच तोळे थंड पाण्यांत कालवावी. नंतर त्यांत अर्ध तोळा प्रमाण खडीसाखरेची पूड मिळवून प्रातःकाळीं प्राशन करावें व त्याचप्रमाणें अस्तमानींही प्राशन करावें ह्मणजे कसाही कठिण तिडिकप्रमेह असला तरी त्याचा एक दिवसात नाश होतो. तरी हें औषध तीन किंवा पाच दिवस पुढें सेवन करावें.

**तिडिकप्रमेहावर पथ्य**—गव्हाची पोळी, ज्वारीची भाकरी, किंवा कण्या, तुरीचें वरण, ह्मशींचें ताक, जांभळें, खजूर, ताडफळें व कलिंगड हे पदार्थ खाण्यास द्यावे. बाकी सर्व वर्ज्य करावे.

**थंडा प्रमेह**—यासच शीतमेह ह्मणतात. यांतील भेद असा आहे कीं, फक्त लघवीचेवेळी सुमारें अर्धतोळापर्यंत परमा प्रथम पडून नंतर लघवी होते. यांत तिडीक किंवा जळजळ मुळीच होत नाही. दुसरा भेद असा आहे कीं, रात्रंदिवस थेंब थेंब परमा राहून राहून गळतो. व लघवीच्या आरंभी एक किंवा दोन थेंब पडतात. कोणत्याही वेळी इंद्रिय दाबलें असतां बिंदु पुढे येतो. हा प्रमेह कांही दिवस आंगांत मुरल्यानें शक्ति क्षीण होऊन निस्तेज होतो व पुढें परिणामी भगंदर व मधुमेह इत्यादि विकार उत्पन्न होतात. करितां या रोगाची हेळसांड बिलकूल करूं नये. बहुतेक वैद्याचें असें मत आहे की, या मेहावर त्वरित औषध लागू पडत नाही.

**थंडे प्रमेहावर उपाय**—( १ ) कळकीची सुकलेलीं पानें १ तोळा व एक तोळा उपळसरीचें मूळ याचा तीस तोळे पाण्यांत अष्टमांश काढा तयार होत आला ह्मणजे एक तोळा खडीसाखर घालून काढा आला ह्मणजे वस्त्रगाळ करून घ्यावा. ( २ ) काटेशेवरीच्या मुळावरील सालीचें चूर्ण ॥ तोळा, जायफळाची पूड दोन गुंजा, व खडीसाखर सहा मासे ही औषधें एक तोळा गाईचे तुपांत मिश्र करून सेवन करावी. ( ३ ) पांढऱ्या कमळाच्या कांद्याचें चूर्ण सहा मासे, गाईचे तूप १ तोळा व खडीसाखर चार मासे त्यात जायफळाची पूड सुमारें दोन गुंजा घालून

एकत्र करून सेवन करावें. ( ४ ) बोळ ।‍ तोळा आणि जुना गूळ ।॥‍ तोळा एकत्र कुटून त्याच्या तीन गोळ्या कराव्या. पैकी एक सकाळीं एक तिसरा प्रहरीं व रात्रीं निजते वेळीं नुसती घ्यावी. याप्रमाणें हें औषध दोन अथवा तीन सप्तकें सेवन केलें असतां चांगला गुण येतो. **पथ्य**—तिडीकप्रमेहावरील करावी.

**तंतुमेह**—या तंतुमेहासच लालमेह असें ह्मणतात. यांचीं कारणें दोन आहेत तीं हीं कीं, प्रमेह उत्पन्न झाल्यापासूनच शिश्नावाटें तारेसारखी लाळ पडूं लागते. अथवा कोणत्याही प्रकारचा प्रमेह उत्पन्न होऊन कित्येक दिवस गेले आणि बहुत औषधें सेवन करून कांहीं गुण वाटतांच किंवा प्रमेह व्याधि असतांच स्त्रीसंभोग केल्यानें इतर मेहाचाही परिणाम लालमेहावर घडतो. पैकीं पहिला प्रकार ह्मणजे आरंभापासूनच लालमेह उत्पन्न होतो तो औषधांनीं त्वरित बरा होतो. परंतु वर जो दुसरा प्रकार सांगितला आहे, तो मात्र फार दिवस त्रास देतो. आतां यांतही दोन प्रकार दिसून येतात. ते हे कीं, लघवीच्या आरंभीं लाळेसारखी जी तार पडते ती उपचारानें नाहींशी होते. परंतु लघवीचे-मध्यें किंवा अंतीं जी तार पडते तो व्याधि मात्र लवकर बरा होत नाहीं आणि त्याचा परिणाम धातुक्षयावर जातो.

**लालमेहावर उपाय**—( १ ) मेंदीचा पाला बारीक वांटून थंड पाण्यांत कालवून सुमारें चार तोळे तें पाणी गाळून घेऊन त्यांत अर्धा तोळा खडीसाखरेची पूड घालून प्रातःकाळीं सेवन करावें. याप्रमाणें सांजसकाळ दुवक्त चौदा किंवा एकवीस दिवस सेवन केलें असता हटकून गुण येतो. ( २ ) सराटे तुपांत तळा-वे आणि त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून ठेवावें. तें चूर्ण सहा मासे, एक तोळा गाईचें तूप व सहा मासे खडीसाखरेची पूड, ही सर्व एकत्र करून सेवन करावी. याप्रमाणें सांजसकाळ दुवक्त चौदा किंवा एकवीस दिवस सेवन केलें असतां तंतुमेह, धातुस्था-नीची कडकी, धातुस्राव, स्वप्नावस्था, व अन्य धातुविकार याजवर रामबाणाप्रमाणें काम करितें. **पथ्य**—तिडीकप्रमेहावरील करावें.

**प्रमेहावर पिचकारी**—प्रमेहाचे योगानें इंद्रियांत जी टाकी ( व्रण पडतो ) त्याजवर पिचकारीचे योगानें मारलेलें औषध त्वरित लागूं पडतें. कारण पोटांत घेतलेलें औषध मूत्रद्वारांत येण्यास फार वेळ लागतो तथापि प्रमेहनाशक ज्या औ-षधी पोटांत घेण्यास सांगितल्या आहेत त्या सुरु ठेवून हा पिचकारीचा बाह्य उप-चारही करीत जावा. ह्मणजे तात्बडतोब गुण येतो. ती पिचकारी बहुतकरून काचेची असावी. तिजमध्यें पुढें सांगितलेलें औषधाचें पाणी भरून तिचें बारीक टोंक असतें तें मूत्रद्वारात सुमारें एक तादूळा इतकें शिरकावून पिचकारी बेतांनी मा-रावी. ह्मणजे तें सर्व औषध इंद्रियाचे आतपर्यंत जातें. व आंतील चट्टयावर त्याचें चांगलें घर्षण होऊन त्यावरचा पू, लस वगैरे पिचकारी काढून घेतली ह्मणजे त्यासरसा बाहेर येऊन पडतो. नंतर पुन्हा लागलीच दुसरी पिचकारी मारावी.

याप्रमाणें सांजसकाळ पिचकारीचा उपाय सतत तीन चार दिवस केला असतां उत्तम प्रकारचा गुण येतो. **पिचकारीचीं औषधें**—( १ ) जस्ताचें फूल सुमारें २ गुंजा पांच तोळे स्वच्छ थंड पाण्यांत घालून सारख करावें. व त्याच्या वरप्रमाणें दोन पिचकाऱ्या माराव्या. ( २ ) तुरटीची लाही सुमारें दोन गुंजा व एक गुंज आफू सुमारें सहा तोळे पाण्यांत मिश्र करून त्या औषधाच्या दोन पिचकाऱ्या वरप्रमाणें माराव्या. ( ३ ) बाभळीचे अंतरसालीचा काढा गाळून घेऊन त्यानें पिचकाऱ्या माराव्या. ( ४ ) त्रिफळ्याचा काढा गाळून घेऊन त्यानें पिचकाऱ्या वरप्रमाणें माराव्या; ह्मणजे त्वरित गुण येतो.

**प्रमेहाचें व्रण**—हा प्रमेहव्याधि, विषासारखा मोठा दुःसह आहे. हा फार दिवस शरीरांत राहिल्यानें एक फोड उठून त्यातून स्राव होत असतो. या रोगाचा जेव्हां उद्भव होतो तेव्हांच त्याजवर योग्य उपचार करावे. नाहींतर दिवसेंदिवस तीं क्षतें वाढत जाऊन लिंग झडण्यासही कारणीभूत होतात. याचा दुसरा असा प्रकार आहे कीं, कांहीं उपचार केले असता चट्टयावर खपली धरते. परंतु त्याचे आंत पू जमत जमत राहतो. अशा वारंवार खपल्या धरतात व वारंवार स्राव होत असतो. एकदम क्षत भरून येत नाहीं. याप्रमाणें दोन दोन वर्षेंही चट्टे व्रणाप्रमाणें वाहत राहतात. अशा चट्टयांवर मागील उपदंश रोगात जी मलमें सांगितली आहेत तीं मलमें लावीत जावी व धुण्याकरिताही जे काढे सांगितले आहेत त्यांनी व्रण धूत जावा. ( १ ) वांकेरीचें भातें व कापूरभेंडीचें मूळ तुपांत किंवा पाण्यांत उगाळून लावीत जावें आणि फक्त वांकेरीचें भातें सुमारें सहा मासेपर्यंत गाईचे निरसे पाच तोळे दुधांत उगाळून प्रातःकाळीं व सायंकाळीं याप्रमाणें दुवक्त दीड महिनापर्यंत सेवन करून पथ्य करीत जावें; ह्मणजे प्रमेहापासून उत्पन्न झालेले चट्टे, अंगांत मुरलेले फार दिवसांचे प्रमेह व उपदंश यापासून रोगी मुक्त होतो; यांत बिलकूल संदेह धरूं नये.

**प्रमेहपिटिका**—प्रमेहामध्यें दहा प्रकारच्या पिटिका म्हणजे फुटकुळ्या सर्व अंगावर व तोंडावर होतात. तेणेंकरून तृषा, श्वास, मांसाचा संकोच, प्रमेह, उचकी, मद, विसर्प व मर्मस्थानास पीडा हे उपद्रव होतात. **उपाय**—( १ ) पूर्वीं जळवा वगैरे लावून ठिकठिकाणचें रक्त काढावें आणि संपूर्ण व्रणनाशकविधि करावा. (२) उंबराचे चिकाचा किंवा बावंचीचे चिकाचा फुटकुळ्यावर वरचेवर लेप करीत जावा. म्हणजे त्या लवकर बऱ्या होतात.

**सर्व प्रमेहांवर उपाय**—( १ ) वेलदोडे, कापूर, खडीसाखर, जायफळ, गोखरू, कांटेशेवरीची साल, रसशिंदूर, वगंभस्म व लोहभस्म हीं नऊ औषधें समभाग घेऊन चूर्ण करून त्याला गुळवेल व कांटेशेवरी यांच्या काढ्याची भावना देऊन दोन दोन माशाची गोळी करून मधाशी घ्यावी; ह्मणजे सर्व प्रमेह नाहींसे होतात. ( २ ) अभ्रकभस्म, पारा, गंधक, वगंभस्म, वेलदोडे व शिलाजित हीं सर्व स-

मभाग केळीचे काल्याचे रसांत खलून वालप्रमाण गोळी मध किंवा गाईचें तूप यांत द्यावी, म्हणजे वीस प्रकारचे प्रमेह व कामला यांचा नाश होतो. याला चंद्रोदय रस ह्मणतात.( ३ ) अंकोलाच्या कळ्या, आंवळकाठी, व हाळद यांचें चूर्ण बलाबल पाऊन मधाबरोबर चाटलें असतां वीस प्रकारचे प्रमेहांचा नाश होईल यांत संशय नाहीं. ( ४ ) भूयआवळी, दालचिनी, वेलदोडे, तमालपत्र, व मिरी ही सर्व समभाग एकत्र कुटून तें चूर्ण बलाबल पाहून थंड पाण्याशी प्राशन करावें म्हणजे असाध्य जरी प्रमेह असला तरी त्याचा सात दिवसांत नाश करील. ( ५ ) वेलदोडे, शिलाजीत, पिंपळी व पाषाणभेद यांचें चूर्ण सहा मासेपर्यंत तांदुळाच्या धुवणाशीं द्यावें, म्हणजे तिडीक वगैरे सर्व प्रमेहांचा लवकर नाश होईल. ( ६ ) शिशाचें भस्म दोन गुंजापर्यंत हाळद, आंवळकाठी व मध या अनुपानांत दिलें असतां प्रमेहाचा नाश होतो. ( ७ ) अभ्रकभस्म त्रिफळा व हाळद यांचें चूर्ण मधांत घालून चाटलें असतां सर्व प्रकारचे मेहांचा तात्काळ नाश होईल. ( ८ ) पारा १, गंधक १ व वंगभस्म १ भाग एकत्र खल करून ती कज्जली मध व साखर यांत द्यावी. हा वंगेश्वर रस सर्व प्रकारचे प्रमेहांचा नाश करितो. ( ९ ) वंगभस्म व शिलाजीत एकत्र करून मध व तूप यांत द्यावें किंवा खडीसाखर व तूप यांत द्यावें; ह्मणजे वीस प्रकारचे प्रमेह, धातुक्षय, दुर्बळपणा, व नष्ट शुक्र यांचा निश्चयानें नाश होईल. आणि अभ्रकाचें भस्म, जायफळ, सूर्यफूल, पद्मकंद, व लवंगा याचे बरोबर सेवन केले असता पुत्र देणारें होतें. ( १० ) वंगभस्म, लोहकांतभस्म, अभ्रकभस्म, व पिवळे जासवंदीचीं फुलें, ही सर्व समभाग घेऊन कोरफडीच्या रसांत सात भावना द्याव्या, व दीड गुंजपर्यंत मधांत देत जावा; ह्मणजे हा वंगेश्वररस वीस प्रकारचे प्रमेह, मूत्रकृच्छ्र, सोमरोग, पांडुरोग व अश्मरी यांचा नाश करितो. हें श्रेष्ठ रसायन नागार्जुनानी सांगितलें आहे. ( ११ ) पारा २ भाग, वंगभस्म ३ भाग व गंधक ३ भाग, यांचा कोरफडीचे रसांत खल करून तें मडक्यांत किंवा कुपींत भरून तोंड बंद करून वालुकायंत्रात एक दिवस चांगला अग्नि लावून पक्क करावा. थंड झाल्यावर काढून देवब्राह्मणाची पूजा करून मध पिंपळी बरोबर द्यावें. पथ्य दूधभात. बाकी वर्ज्य. म्हणजे वीस प्रकारचे प्रमेहांचा नाश होतो, यात संशय नाहीं. ( १२ ) अभ्रकभस्म, गंधक, पारा, वंगभस्म, वेलदोडे व शिलाजीत, ही सर्व औषधें समभाग घेऊन केळीचे काल्याचे रसांत घोटावीं. वालप्रमाण गोळी मधांत किंवा दुसरे अनुपानांत योजून द्यावी, म्हणजे वीस प्रकारचे प्रमेह व कामला याचा नाश होतो. याला चंद्रोदयरस असें म्हणतात.

**प्रमेह रोगावर पथ्य**—लंघन, वमन, विरेचन, अंगास उटणें लावणें, हारीक, सावे, वरिया व जुन्या तांबड्या साळी यांचा भात, मूग, जुने गहूं, जुने कुळीथ, तुरी व चणे याचे यूष, मटक्या, तीळ, लाह्या, जुनें मद्य, मध, तांदुळाच्या चौदापट पाणी घालून केलेली पेज, बुडाभात, गोड ताक, ससा, हरीण, तितर,वगैरे जंगलातील

प्राण्यांचीं मांसें, शेवगा, पडवळ, करटोलीं, घोळयांच्या भाज्या, काकडी, उंबराचीं फळें, पिकलेलीं केळी, कवठ, जांभळं, खजूर, भेंडशीचीं फळें, कलींगड, संपूर्ण कडू व तुरट पदार्थ, आफू, आंवळे, कालें, कोत्री, जुना गूळ, तवकीर ह्मशीचें ताक, तिळाचें तेल, तापवून निवालेलें पाणी, पाढरें रताळू, शिंगाडे, सैंधव, अळूनखार, कारलें, कोहळा, जायफळ, ब्राह्मी, सालंमिश्री, शेळीचें लोणी, लसूण, हत्ती, घोडा यांवर बसणें, फार फिरणें, ऊन घेणें, व्यायाम करणें. हीं प्रमेहावर पथ्य जाणावीं.

**प्रमेहावर अपथ्य**—मूत्रवेगधारण, धूमपान, घाम काढणें व रक्त काढणें, उगीच बसणें, दिवसास निद्रा, नवें अन्न, दहीं, पावटे, मिष्टान्न, मैथुन, मद्य, तेल, ह्मशीचें दूध, तूप, गूळ, पांढरा भोपळा, उंस, खरात्र पाणी, गोड, खारट, आंबट व पौष्टिक हे पदार्थ; मांस, जागरण, नवें पाणी, हे पदार्थ वर्ज करावे.

---

## भगंदर.

॥ गूढमूलांससंरंभां रुगाढ्यांरूढकोपिनीम् ॥ भगंदरकरीं विद्यात्पिटिकां नत्वतोऽन्यथा ॥

**अर्थ**—जिचें मूळ खोल असतें, जीत क्षोभ व सूज फार असते, जीत वेदना फारच असतात व जी वरच्यावर भरून येते व पुनः पुनः पुवळते, त्या पिटिकेपासून भगंदर होतें, दुसरीपासून होत नाही.

**कर्मविपाक**—अष्टमस्थानीं शनि, व कर्कलग्नीं रवी असून त्यांजवर मंगळाची दृष्टि इत्यादि योग असतां बंधुविरोध, कपट, दुष्टपणा, भगंदर, कुष्ठ, कडू, क्षय, गजादि वहानापासून भय इत्यादि प्राप्त होतात. **परिहार**—जो ग्रह अनिष्ट असेल त्याची दानें, जप व होम करावा.

**पूर्वकर्मविपाक**—पूर्वजन्मीं लांच खाऊन खोटा न्याय केला किंवा गुरुस्त्रीशी गमन केलें तर भगंदर, वातरोग व कृमि इत्यादि रोग उत्पन्न होतात. **परिहार**—सुवर्ण, नवरत्नें, धान्य, वस्त्र व भूमि यांची दानें व ब्राह्मणभोजन इत्यादि करावें.

**भगंदराचें कारण**—पूर्वी मूळव्याध किंवा गरमी भरली असतां त्यांच्या उपशमनार्थ अति दुःसह औषधें सेवन केल्यानें व तिखट पदार्थ व रुक्ष पदार्थ यांच्या सेवनानें व अति जाग्रणानें भगंदर रोग उत्पन्न होतो.

**भगंदराचें कारण** ( वाग्भट )—हत्ती, घोडा इत्यादिकांवर बसून जाणें, कठिण पदार्थावर बसणें, उकीडवें बसणें, व मूळव्याधीचे निदानात सांगितलेली दुसरीं कांहीं कारणें, दैवदुर्विपाक किंवा इहजन्मीच साधूंची निंदा करणें, या कारणांनीं गुदाच्या आंत किंवा बाहेर एक किंवा दोन बोटावर दुष्ट आलेल्या रक्त व मांस यांत

जो व्रण होतो त्यास भगंदर ह्मणतात. हा होण्याचें पूर्वी बहुधा पुळी होत असते. भगंदर हा बस्ति व मूत्रवहस्रोत ( मार्ग ) यांच्या समीप असल्यामुळें पाझरत असतो. सर्व प्रकारचे भगंदरांवर लवकर औपधोपाय न केला तर योनि, बस्ति व गुद यांस फाडितात. व ती फाटलीं असतां पुष्कळ छिद्रें पडतात. व त्या छिद्रातून वायु, मूत्र, मळ व शुक्र हीं क्रमानें बाहेर येतात. ज्या पिटिकेचें मूळ खोल असतें, जीत क्षोभ व सूज फार असते, वेदना फारच असतात, वरच्यावर भरून येते. व पुनः पुनः पूवळते, त्या पिटिकेपासून भगंदर होतो. दुसरीपासून होत नाहीं.

**पूर्वरूप** ( मा. नि. )—याचे पूर्वरूपामध्यें कंबरेच्या कपालअस्थीला टोंचणी लागते, आग होते, कंडू सुटते, ठणका लागतो, इत्यादि उपद्रव होतात.

**वातजभगंदर** ( मा. नि. )—तुरट आणि रुक्ष पदार्थांच्या भक्षणानें वायु अत्यंत कुपित होऊन गुदस्थानी जी पिटिका करितो तिची उपेक्षा केली असतां ती पिकते, आणि फुटली ह्मणजे ठणका लागून तांबूस व फेंसाळ असा पू वाहतो. व तेथें चाळणीसारखीं अनेक छिद्रें पडतात. व त्यांवाटें मूत्र, पुरीष आणि रेत, ही वाहतात. चाळणीसारखी छिद्रें असतात म्हणून त्यास **शतपोनक** असें ह्मणतात.

**पित्तजभगंदर** ( मा. नि. )—अति पित्तकारक पदार्थांनी पित्त कुपित होऊन गुदस्थानी लाल पिटिका उत्पन्न होते. ती लवकर पिकून तिच्यांतून कढत पू वाहतो, ही उंटाच्या मानेसारखी उंच असते ह्मणून हिला **उष्ट्रशिरोधर** नांव दिलें आहेत, वाग्भट्टाचें मत की या विकारात ज्वर येतो.

**कफजन्यभगंदर** ( मा. नि. )—भगंदरास कंडू सुटतो, व त्यांतून घट्ट पू वाहतो व ती पिटिका कठिण असते. तिला ठणका कमी असून वर्ण पांढरा असतो. इला **परिस्रावी** भगंदर असें ह्मणतात.

**वातपित्तजभगंदर** ( वा. भ. )—जसा नगराच्या कोटासभोंवती खंदक असतो त्याप्रमाणें या विकारांत गुदाच्या सभोंवती वाटोळा नाडीव्रण असतो यास **परिक्षेपी**भगंदर असें म्हणतात.

**वातकफजभगंदर** ( वाग्भट )—वातकफापासून होणाऱ्या भगंदरास ऋजु ( सरळ ) भगंदर म्हणतात, यात सरळ नाडीव्रण होऊन गुद फाटतें.

**कफपित्तजभगंदर** ( वा. भ. )—पूर्वी मोड आले असून त्यांचा आश्रय करून कफपित्त कुपित होऊन मोडाच्या मुळाशी कंटू व दाह इत्यादि लक्षणानीं युक्त सूज उत्पन्न करितात. तो लवकर पिकून फुटला असतां अर्शाच्या मुळांत क्लेद उत्पन्न करून अनेक नाडीव्रण होऊन त्यांतून एकसारखा पू वाहतो. यास अर्शोभगंदर असें म्हणतात.

**त्रिदोषज भगंदर** ( वाग्भट )—त्रिदोषांपासून होणारा भगंदर शंखाच्या भोंवऱ्याप्रमाणें असतो; ह्मणून त्यास **शंबुकावर्तभगंदर** ह्मणतात. त्यांत अनेक नाडीव्रण होऊन ते गुद फाडतात, व यांत कळा फारच भयंकर असतात.

**त्रिदोषज भगंदर** ( मा. नि. )—यांत गाईच्या स्तनासारख्या अनेक पिटिका होतात. त्यांचे रंग, वेदना आणि स्राव हे अनेक तऱ्हेतऱ्हेचे असतात. आणि व्रण शंखाच्या भोंवऱ्याप्रमाणें पोंखरलेला असतो, ह्मणून त्याला **शंबुकावर्त** ह्मणतात.

**क्षतजन्य भगंदर** ( वाग्भट )—आधाशीपणानें मांस खातांना हाडाचा तुकडा पोटांत जाऊन मळाबरोबर एका बाजूनें आडवा येत असतां गुद फोडतो व त्या व्रणापासून पुढें नाडीव्रण होतो. त्या नाडीव्रणांत पू उत्पन्न होऊन तो व्रण चरत गुदापर्यंत जातो. व त्यातील मास कुजून त्यामध्यें किडे पडतात. व ते चोहोंकडून गुद खातात. त्यामुळें तें अगदीं विदारण होतें. या भगंदरास **उन्मार्गी व क्षतजन्य** भगंदर ह्मणतात.

**साध्यासाध्य लक्षण** ( मा. नि. )—सर्व भगंदरें[१] दुःसाध्य आहेत. त्यांमध्यें त्रिदोषज भगंदर असाध्य. आणि क्षतज तर विशेषेंकरून असाध्य. ज्या भगंदरातून वायु, मूत्र, पुरीष, कृमि, आणि शुक्र वाहतात, त्याच्या योगानें रोगी मरतो.

**सर्व प्रकारचे भगंदरांवर उपाय**—भगंदराची पिटिका पिकल्यावर दुःसाध्य भगंदररोग होतो. ह्मणून ती पिटिका पिकल्याशिवाय बरी होईल असे उपचार पूर्वींच करावे, ते हे की, पूर्वी वमन द्यावें, नंतर तीक्ष्ण रेच द्यावें, नंतर रक्तस्राव ह्मणजे तिचें रक्त काढावें. परिषेक वगैरे तसेच तऱ्हेतऱ्हेचे लेप योजावे. व त्यांतून पाणी निघून जाईल व ती पिकणार नाही असे उपाय करावे. ( १ ) पुळीला सुवर्णाच्या काडीनें डागावें. नंतर अग्निदग्धव्रणावरची क्रिया करावी. ( २ ) खैरसाल व त्रिफळा यांचा काढा ह्मशीचें तूप व वावडिगाचें चूर्ण घालून द्यावा. (३) त्रिफळा ३ भाग व पिपळी १ भाग, याचे चूर्णांत गुग्गुळ ५ भाग घालून एक ठिकाणी खलून तारतम्य पाहून एक गोळी मध व तूप यांत द्यावी. ह्मणजे भगंदर, सूज, गुल्म व मूळव्याध हे रोग दूर होतात. ( ४ ) सप्तविंशति गुग्गुळ मधांत द्यावा. ( ५ ) व्रणावरील चिकित्सा करावी. ( ६ ) तीळ, वेखंड. लोध, घेरोसा, कडुनिंबाची पानें, हळद, दारुहळद व बाळहिरडे, हीं सर्व औषधें समभाग पाण्यात वांटून भगंदरावर लेप द्यावा; ह्मणजे त्याचें शोधन व रोपण होतें. ( ६ ) मांजराचें हाड त्रिफळ्याचे काढ्यात उगाळून चांगला दाट असा भगंदरावर लेप द्यावा, ह्मणजे दुष्ट झालेल्या व्रणाचा हटकून नाश होतो. ( ७ ) हळद, रुईचा चीक, सैंधव, गुग्गुळ, कण्हेर व कुडा हीं औषधें समभाग घेऊन त्यात तिळाचें तेल सिद्ध करून अभ्यंग

---

१ वाग्भटाचें मत या लक्षणाशिवाय वरील ६ भगदर कष्टसाध्य आहेत त्रिदोषात्मक व क्षतज हे २ असाध्य व प्रवाहिणी वलीपर्यंत गेलेला किंवा शिरणीवर झालेलाही असाध्य होय

करावा व व्रणावरही चांगलें चोळावें; ह्मणजे हटकून गुण येतो. ( ८ ) मोगली-एरंडाच्या फळांतील बिया काढून त्यातील गीर काढावा. आणि तें बारीक वांटून पाण्यात कालवून तें भांडें चुलीवर ठेवावें. आणि अर्धें पाणी अटत आलें ह्मणजे वर तेल येईल तें तेल काढून घ्यावें. या तेलांत कापसाच्या चकत्या भिजवून अनेक छिद्रांनी किंवा एक छिद्रानी युक्त अशा भगंद्राच्या ठिकाणी बसवाव्या. प्रत्येक प्रहरानीं चकत्या बदलून बसवीत जाव्या. या योगानें भगंदराचें शोधन होऊन आंतून भरत येतो. हें तेल जितकें जुनें असेल तितकें चांगलें समजावें. ( ९ ) वांकेरीचें भातें चागलें आणून दुधांत शिजवून शुद्ध करून ठेवावें. सांजसकाळ गाईचें दूध ४ तोळे घेऊन त्यांत ते भातें ३ माशापासून ६ माशांपर्यंत पचत जाईल त्या मानानें उगाळून पोटांत प्राशन करीत जावें. व तेंच भातें जुने तुपांत भगंदरावर दिवसांतून एक दोन वेळ लावीत जावें; ह्मणजे अवश्य गुण येतो.

**भगंदरावर पथ्य**—लंघन, जुन्या साळी, जुने मूग, जंगलांतील प्राण्यांचें मांस, पडवळ, शेवगा, वेताचे कोंब, कोंवळे मुळे, तिळाचें व शिरसाचें तेल, मेथी, कारली, कडू पदार्थ, तूप, मध, ऊन पाणी, ताक, जुन्या गव्हाची पोळी, तुरीचें वरण, थंड पाणी ही पथ्यें जाणावी.

**भगंदरावर अपथ्य**—व्यायाम, मैथुन, युद्ध,वहनावर बसणें, जडान्न, पपई, हे पदार्थ व्रण बरा होऊन घट्ट झाल्यावरही एक वर्ष सोडावे.

---

## मस्तकरोग ( शिरोरोग ).

॥ एकादशशिरोरोगा जायंते दुष्टभोजनात् ॥

**अर्थ**--दुष्ट भोजनानें ११ प्रकारचे मस्तकरोग उत्पन्न होतात.

**कर्मविपाक**—सूर्याचे दशेंत शुक्र किंवा शुक्राचे दशेमध्यें चंद्र अथवा चंद्राचे दशेमध्यें शुक्र किंवा बुधाच्या दशेंत मंगळाची अंतर्दशा असता मस्तकरोग, कुष्ठरोग, गलरोग, शूलरोग इ० प्राप्त होतात. **परिहार**—त्या त्या ग्रहाची दानें, जप, होम इत्यादिक करावें.

**पूर्वकर्मविपाक**—गुरूचा अपराधी, स्वीकृत व्रताचा त्यागी, फुटक्या कास्यपात्रांत भोजन करणारा, ब्रह्मचारी इ० कारणांनी मस्तकरोग होतो. **परिहार**—ब्राह्मणभोजन, सूर्योपासन, " अक्षिभ्या " या मंत्राचा जप, सुवर्णमय यज्ञोपवीताचें दान इत्यादिक करावें.

**मस्तकरोगाचें कारण** ( मा. नि. )—धूर, आतप, तुषार, जलक्रीडा, अति निद्रा, अति जागरण, उंच ठिकाणचा पूर्वेचा वारा, रडणें, अति उदक किंवा मद्य यांचें प्राशन, कृमि व मलमूत्र, यांचे वेग धारण, धांवणें, ओरडणें, द्वेष, डोळे लावून

फार वेळ अवलोकन करणें, दुष्ट गंध, दुष्टान्न आणि मोठ्यानें भाषण करणें या कारणांनीं मस्तकरोग ( शूळ ) उत्पन्न होतो.

**मस्तकरोगाचें कारण** ( वाग्भट )—धूर, ऊन, दहिंवर, पाण्यांत पोहणें, फार जागणें व निजणें, घामाची जास्त प्रवृत्ति होणें, मानसिक दुःख, पूर्वेचा वायु, आंसवांचा अवरोध, रडणें, फार पाणी पिणें, फार मद्य पिणें, कृमि, वेगधारण करणें, उशी न घेतां निजणें, स्नान न करणें, अभ्यंग न करणें, फार वेळ खालीं पहाणें, असात्म्यवास घेणें, दुष्ट आम, फार बोलणें, इ० कारणांनी मस्तकांतील दोष कुपित होऊन मस्तकरोग उत्पन्न करितात.

**वातजमस्तकशूळ** ( मा. नि. )—मस्तक अकस्मात् दुखणें, रात्रीस अधिक दुखतें, तें बांधलें किंवा शेकलें ह्मणजे उतरतें.

**वातजमस्तकशूळ** ( वा. भ. )—शंखांत फार ठणका लागतो, मानेच्या कांट्यास फूट लागते, भिवयांचा मध्यभाग व कपाळ यांत अति वेदना होत असून तीं पडतातच काय असें वाटतें, कान दुखतात व त्यांत शब्द होतो, डोळे बाहेर काढल्यासारखे वाटतात, सर्व मस्तक हालल्याप्रमाणें वाटतें, व सांध्यापासून सुटल्यासारखें वाटतें, शिरांचा समुदाय फुरफुरतो, मान व हनुवटी ही जखडतात, उजेडाकडे पाहवत नाहीं, नाकास पाणी सुटतें, कारणावांचून कमीजास्त होतें, मर्दन, स्नेह, स्वेद व बंधन यांनी विकार कमी होतो.

**वातजमस्तकशूळावर उपाय**—( १ ) रात्रीं डोक्यास अभ्यंग करून तूप प्यावें. आणि त्याजवर तापलेलें ऊन दूध थोडी मिरपूड घालून प्यावें. (२) उडीद मूग, किंवा कुळिथ तुपाबरोबर खावें. आणि वर ऊन दूध प्यावें. ( ३ ) तिळाचें तेल किंवा कल्क दुधाबरोबर प्यावा. ( ४ ) कानात तेल घालीत जावें. ( ५ ) कापसाच्या सरक्या, दालचिनी, नागरमोथे व जाईच्या कळ्या, ही औषधें समभाग ऊन पाण्यांत वाटून त्याचें नस्य केलें असतां मस्तकसंबंधीं सर्व प्रकारच्या वेदना बंद होतात. ( ६ ) मुचकुंदाचे फुलाचा लेप मस्तकावर करावा. ( ७ ) शिरोव्याधीवर १६ अंगुळें रुंदीचें चामडें घेऊन तें मस्तकाला गुंडाळावें व त्याच्या संधीला उडदाचें पीठ पाण्यांत कालवून लेप द्यावा. आणि रोग्यास स्थिर बसवून वातहारक तेल थोडें ऊन करून त्यात ओतावें. तें तेल प्रहर किंवा २ प्रहर अथवा व्याधी शांत होईपर्यंत तसेंच असूं द्यावें. नंतर ओतून काढावें. याला शिरोबस्ति ह्मणतात. तो वायूपासून झालेले मस्तकशूळ, हनुवटी, मान, नेत्र, कर्ण यांचे व्याधि, आर्दितवायु, मस्तक कांपतें तो वायु याचा निश्चयानें नाश होतो. हा शिरोबस्ति भोजनाचे अगोदर करावा. याप्रमाणें पाच सहा किंवा सात दिवस केलें असतां हटकून गुण येतो.

**पित्तजमस्तकशूल** ( मा. नि. )—मस्तक आंगार ठेविल्याप्रमाणें तप्त होतें, व डोळे आणि नाक ही जळजळतात, शीत पदार्थांनी किंवा रात्रीं शांत होतो.

**पित्तजमस्तकशूळ** ( वाग्भट ) —डोळ्यातून धूर निघाल्याप्रमाणें होतें, ज्वर येतो, डोळ्याची आग होते, मूर्च्छा येते, घाम येतो. थंड उपचारांनीं किंवा रात्रीस कमी होतो.

**पित्तजमस्तकशूळावर उपाय**—( १ ) प्रथम मनुष्याला स्निग्ध करून चांगलें तीव्र रेचन द्यावें. ( २ ) द्राक्षे, त्रिफळा, उसाचा रस, दूध आणि तूप यांनीं रेचक द्यावें. ( ३ ) साखर व केशर घालून सिद्ध केलेलें तूप प्यावें. ( ४ ) मध, तगर, निळें कमळ व चंदन, ही औषधें पाण्यांत किंवा तुपांत वांटून त्यांचा मस्तकावर लेप करावा. ( ५ ) या विकारांत रक्त काढूं नये. काढलें असतां वायु वाढतो.

**कफजमस्तकशूळ** (मा. नि )—डोकें आंतून कफानें सारवल्यासारखें, जड, बांधल्यासारखें आणि थंड होतें, व डोळे सूजीर असून तोंडाला थोद्री येते.

**कफजमस्तकशूळ** ( वा. भ. )—डोकें जड व ओलसर भासतें, व गार होतें, शिरा उडत नाहींत, आळस येतो, ठणका दिवसां कमी व रात्रीं जास्त असतो, झांपड, वांति, कानांस कंडू व डोळ्याचे कोनाडे सुजणें, ही लक्षणें होतात.

**कफजमस्तकशूळावर उपाय**—( १ ) पूर्वी वातीचें औषध द्यावें. नंतर लंघन करावें. नंतर घाम काढावा. ( २ ) रेणूकबीज, तगर, शिलाजीत, नागरमोथे, एलची दाणे, कृष्णागर, देवदार, जटामासी आणि एरंडमूळ, हीं औषधें पाण्यांत वांटून त्यांचा उष्ण असा मस्तकावर लेप द्यावा.

**सन्निपातजमस्तकशूळ** ( मा. नि. )—यांत तिन्हीही दोषांचीं लक्षणें मिश्र असतात.

**सन्निपातजमस्तकशूळावर उपाय**—(१) जुनें तूप बलाबल पाहून पिण्यास द्यावें. ( २ ) त्रिकटू, पोखरमूळ, देवदार, रास्ना, हळद व वेखंड, हीं औषधें समभाग घेऊन त्यांचा काढा करून तो काढा व निकाढा नाकानें प्यावा; ह्मणजे नानातऱ्हेच्या दोषापासून उत्पन्न झालेले मस्तकशूळ लवकर नाश पावतात. ( ३ ) गेळफळ, तिळवणीचें बीज, व भूतकेशीचीं पानें, हीं समभाग व वडाचें बीज आणि साल यांचें चूर्ण अर्धा भाग आंत घालून सर्वांचें वस्त्रगाळ चूर्ण करून तपकिरीसारखें नाकांत ओढावें, ह्मणजे तात्काळ मस्तकशूळ, प्रलाप, कफ, झांपड, आणि सन्निपात यांचा नाश होतो. ( ४ ) आल्याच्या रसांत पिंपळी व सैंधव उगाळून त्यांत थोडा गूळ घालून त्याचें नस्य द्यावें. ( ५ ) बेलफळ आणि सुंठ यांचा दुधांत कल्क करून नस्य द्यावें, किंवा सैंधव, व पिंपळी, पाण्यांत उगाळून त्याचें नस्य द्यावें.

**रक्तजमस्तकशूळ** ( मा. नि. )—पित्तजमस्तकशूळासारखीं सर्व लक्षणें होतात व स्पर्श सहन होत नाहीं.

**रक्तजमस्तकशूळ** ( वा. भ. )—रक्तजमस्तकशूळाचेठायीं पित्तजन्यमस्तकशूळापेक्षां अधिक वेदना होतात असें जाणावें.

**रक्तजमस्तकशूळावर उपाय**—( १ ) पित्तनाशक व थंड असे उपाय करावे आणि विशेषेंकरून जळवा लावून रक्त काढावें. ( २ ) सहस्रधौतघृत मस्तकास चोळावे व लेप करावा.

**क्षयजमस्तकशूळ** ( मा. नि. )—मस्तकांतील रक्त, वसा, कफ आणि वायु यांचा क्षय झाल्यानें अत्यंत भयंकर मस्तकशूळ होतो. त्यांत शिंका फार येतात, मस्तक तापतें, व त्याजवर स्वेद, वांति, धूमपान, नस्य, आणि रक्तमोक्ष हे उपाय केले असता तो अधिक वाढतो. **उपाय**—( १ ) गूळ, तूप व पुऱ्या भक्षणार्थ द्याव्या. ( २ ) दूध व तूप पिण्यास द्यावें, आणि त्याचें नस्यही करावें. ( ३ ) पौष्टिक उपचार करावे. ( ४ ) प्रातःकाळीं बदामाचा शिरा खाण्यास द्यावा. ( ५ ) साखरीभात द्यावा.

**कृमिजमस्तकशूळ** ( मा. नि. )—मस्तकाला अत्यंत टाकी लागते व कृमी म्हणजे किडे आंतून पोखरतात; व तें मस्तक आत फुरफुरतें, आणि नाकावाटें रक्त पू आणि किडे पडतात. हा कृमिजशिरोरोग मोठा भयंकर आहे असें जाणावें.

**कृमिजमस्तकशूळ** ( वा. भ. )—पथ्यापथ्य पदार्थ सेवन केल्यानें डोक्यांत रक्त व मांस यांचा क्लेद होऊन त्रिदोषांचा कोप होऊन डोक्यांत कृमि उत्पन्न होतात. ते मस्तकांतील रक्त खाऊन भयंकर वेदना उत्पन्न करितात. त्या वेदनांमुळें त्यास वेड लागल्यासारखें होतें. खोकला, ताप, शक्तीचा क्षय, हे विकार होऊन डोक्यास रुक्षता व सूज येऊन टोंचल्यासारखी व कापल्यासारखी पीडा, स्फुरण, व दाह होतो, घाण येते, कपाळ, टाळू, व डोकें, ही कोरडीं पडतात, व कंड सुटते, डोळे मिटतात. तांबडा व पातळ असा शेंबूड येतो, व कानांत शब्द होतो.

**कृमिजमस्तकशूळावर उपाय**—( १ ) नाकांत रक्ताचें नस्य करावें. त्याच्या योगानें कृमि मूर्छित होतात आणि रक्ताच्या वासानें उन्मत्त होऊन नाकातोंडावाटें बाहेर येऊं लागतात. नंतर फार तीक्ष्ण नस्यें व धूम यांनी ते बाहेर काढून टाकावे. ( २ ) शिरसेल, निंबोण्याचें तेल किंवा हिंगणबेटाचें तेल या एकांत वावडिंग, सज्जीखार, दांतीमूळ, हिंग व गोमूत्र घालून सिद्ध करून त्याचें नस्य द्यावें. ( ३ ) वावडिंगें शेळीचे मुतात वांटून त्याचें नस्य दिल्यानें हटकून कृमी बरे होतात.

**सूर्यावर्त** ( मा. नि. )—सूर्योदयाबरोबर कपाळ दुखण्यास हळुहळु प्रारंभ होऊन जसजसा सूर्य चढतो तसतसा तो शूळ, डोळे आणि भिंवया यामध्यें अधिक होऊं लागतो. आणि सूर्याबरोबर वाढून सूर्य मावळला म्हणजे नाहींसा होतो. शीत किंवा उष्ण उपचारानें रोग्याला सुख होतें.

**सूर्यावर्त** ( वा. भ. )—वायू पित्तानें युक्त होऊन शंख, डोळे, भिवया, व कपाळ यांत स्फुरणयुक्त वेदना उत्पन्न करितो. ती जसजसा सूर्य चढत जातो, तसतशी दुपारपर्यंत वाढते. भुकेलेल्या मनुष्यास ती फारच होते, किंवा केव्हां थंड पदार्थांपासून व किंवा उष्ण पदार्थांपासून बरें वाटतें. व अस्तमानीं नाहींशी होते.

**सूर्यावर्तावर उपाय**—( १ ) सूर्यावर्त रोग्यास सूर्य उदयापूर्वी दररोज दहीं भाताचें भोजन घालीत जावें; ह्मणजे तीन किंवा पांच दिवसात गुण येतो. ( २ ) टाकळ्याचें बी दह्यांत वांटून मस्तकावर लेप करावा. ( ३ ) दुधांत तूप घालून सेवन करावें व त्याचें नस्यही द्यावें. ( ४ ) नारळांतील पाणी किंवा दूधसाखर घालून प्यावें. ( ५ ) तुपात तळलेले पदार्थ खावे. ( ६ ) केशर तुपांत परतून शेळीचें दुधांत पचन करून त्यांत साखर घालून नाकानें प्यावें; ह्मणजे सूर्यावर्त आणि अर्धशिशी यांचा नाश होतो. ( ७ ) वेखंड, व पिपळी, यांच्या चूर्णाची पोटळी करून हुंगण्यास द्यावी अथवा जंगलांतील प्राण्यांच्या मांसाचा पेंड मस्तकावर बांधावा.

**अनंतवात** ( मा. नि. )—तिन्ही दोष दुष्ट होऊन मानेच्या मागल्या शिरांस बळकट जखडून डोळे, भिवया आणि आख यांठिकाणी राहून तीव्र वेदना करितात, व कानाच्या पुढल्या भागावर कंप होतो, हनुवटी जखडते, नेत्ररोग होतात, ह्या त्रिदोषजन्य मस्तकरोगाला अनंतवात असें म्हणतात.

**अनंतवातावर उपाय**—( १ ) करंजा, घेवर, बदामाचा शिरा, तूप, पुऱ्या, जिलबी, साखरीभात, वगैरे मधुर पदार्थांचें सेवन करावें व सूर्यावर्तावर जे उपाय सांगितले आहेत ते सर्व याजवर योजावेत.

**अर्धावभेदक** ( अर्धशिशी ) ( मा. नि. )—रुक्षान्न अति भक्षण, अध्यशन पूर्वेकडील वारा, दंव, मैथुन, वेग धारण, आयास, व्यायाम, ह्या कारणांनी कुपित झालेला केवळ वायु किंवा कफयुक्त वायु अर्ध मस्तक धरून मानेच्या शिरा, भिवई, आंख, कान, डोळा, ललाट हीं सर्व एका बाजूचीं धरून कुऱ्हाडीनें घाव घातल्यासारखी किंवा रवीनें घुसळल्यासारखी वेदना करितो. हा रोग फार वाढला असतां त्या बाजूचा डोळा जातो. किंवा कान बहिरा होतो.

**अर्धशिशीवर उपाय**—( १ ) पूर्वी घृतादि स्नेह सेवन करून नंतर घाम काढावा. नंतर विरेचन द्यावे. ( २ ) आल्याच्या रसांत गूळ घालून त्याचे थेंब नाकांत सोडावे. ( ३ ) तांदुळजा आणि जटामांसी यांचे कल्कांत तूप सिद्ध करून तें नाकात घातल्याबरोबर अर्धशिशीचा नाश होईल. ( ४ ) करंज्याचें बीं पाण्यांत उगाळून त्यांत थोडा गूळ घालून उष्ण करून नस्य द्यावें ( ५ ) जेपाळाचें बीं निंबाचे रसांत उगाळून कपाळ दुखत असल्यास त्या ठिकाणीं लेप करावा.( ६ ) रिठा पाण्यांत उगाळून त्याचे थेंब नाकांत सोडावे, शिंक आली ह्मणजे अर्धशिशीचा नाश

होईल. ( ७ ) तुरटीच्या लाहीची पूड कानांत घालून वर निंबूरस पिळावा ह्मणजे क्षणात अर्धशिशीचा नाश होईल.

**शंखक** ( मा. नि. )—दुष्ट झालेले पित्त, रक्त आणि वायु ( येथें कफही दुष्ट आहे असें समजावें ) फार वाढून आंखावर भयंकर सूज उत्पन्न करितात. ठणका फार लागतो, आग फार होते, व ती लाल फार होते, ती विषवेगाप्रमाणें वाढून टाळ्यांत जाऊन त्वरित त्याचा रोध करिते. या शंखक रोगानें तीन दिवसांत प्राणनाश होतो. या तीन दिवसात कुशल वैद्यांचें औषध पोंचलें तर रोगी जगतो. परंतु प्रत्याख्यान करून चिकित्सा करावी.

**शंखक** ( वा. भ. )—पित्त ज्यांत अधिक आहे असे रक्तासह वातादिदोष शंखांत शंखक नांवाचा विकार उत्पन्न करितात. यांत दाह, कळ, लाली, बडबड, ज्वर, तहान, व भ्रम हे विकार जवर होतात. तोंड आंतून कडू व बाहेर पिवळें होतें. हा त्वरित उत्पन्न होऊन तीन दिवसांत मारतो. लवकर चिकित्सा केली तर कदाचित् बराही होतो.

**शंखकावर उपाय**—( १ ) मस्तकावर थंड पाण्याची धार धरावी किंवा बर्फ ठेवावा. ( २ ) खडीसाखर व केशर तुपांत तळून त्याचें नस्य द्यावें ह्मणजे वायु व रक्त यांपासून भिवया, आंख, कान, डोळे या ठिकाणचा शूळ, अर्धशिशी व सूर्यावर्त यांचा नाश होतो. ( ३ ) चिकणामूळ, निळेंकमळ, दूर्वा, काळे तीळ, आणि पुनर्नवा, ही औषधें पाण्यांत वांटून मस्तकावर लेप करावा. ह्मणजे शंखक, अनंतवात आणि सर्व मस्तकरोग यांचा नाश होईल. ( ४ ) त्रिफळा, किराईत, हाळद, कडू निंब व गुळवेल यांचा काढा करून त्यांत सहावा हिस्सा गूळ घालून द्यावा; म्हणजे भिवया, आंख व कान या ठिकाणचा शूळ, अर्धशिशी, सूर्यावर्त, शंखक, दंतशूळ, रातांधळें, डोळ्याच्या पडद्याचे रोग, डोळ्यांतील फुलें, व डोळे दुखणें, यांचा नाश होतो हा काढा निदान २१ दिवस सेवन करावा म्हणजे गुण दिसूं लागेल.

**मस्तकशूळावर पथ्य**—घाम काढणें, नस्य, धूमपान, रेचक, लंघन रक्तस्राव, जुने गाईचें तूप, जुन्या साटक्या साळी, दूध, जंगलांतील मांस, पडवळ, शेवगा, द्राक्षें, चाकवत, कारलें, आंबा, आंवळे, दाळिंब, तिळाचे तेल, ताक, नारळ, तूप, मूग, चांदणें, कबाबचिनी, बदामाचा शिरा, जुन्या गव्हाची पोळी, साखर, व सर्व मधुर पदार्थ हे खाण्यास द्यावें.

**मस्तकशूळावर अपथ्य**—शिंका, जांभई, मूत्र, रुदन, निद्रा व मळ यांच्या वेगाचें धारण, अंजन, ह्मशीचें दूध, वाईट पाणी, विरुद्धान्न, खराब पाण्यानें स्नान करणें, दंतकाष्ठ, दिवसास निद्रा, सारखी नजर लावून कोणतेंही काम करणें, इत्यादि वर्ज करावें.

---

# मुखरोग.

॥ दंतेप्वष्टावोष्ठयोश्चमूलेपुदशपंचच ॥ नवतालुनि जिव्हायां पंचसप्तदशामयाः ॥
॥ कंठेत्रयः सर्वसरा एकपष्टि चतुःपरे ॥

**अर्थ**—दंतरोग ८, ओष्ठरोग ८, दंतमूलरोग १५, तालूचे रोग ९, जिव्हेचे रोग ५, कंठरोग १७ आणि सर्वसर ३ एकूण ६५ मुखरोग आहेत. (मा.नि.)

**कर्मविपाक**—शुक्राच्या दशेंत. अंतर्गत सूर्य असतां मुखरोग होतो. **परिहार**—सूर्याची दानें, जप, हवन इत्यादि करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—स्वतः किंवा दुसऱ्यानें घातलेलीं धर्मकार्यें ह्मणजे सदाव्रत, अन्नछत्रे यांचा नाश, विनाकारण दुसऱ्याचे दोष बाहेर काढणें, पैशून्य काढून दुसऱ्याचें भाषण बंद करणें, मर्मछेद करणें, दुसऱ्याची जिव्हा छेदणें, अनृत भाषण ( खोटी साक्ष देणें ) इत्यादि कारणांनीं मुखरोग होतो. **परिहार**—चांद्रायण, ब्राह्मणभोजन, सुवर्णदान, हवन इत्यादि करावें.

**मुखरोगाचें कारण**—मत्स्य, माहिष, वराह ( डुक्कर ) यांचें मांस व जलचरांचें मांस व आवळे, मुळे, उडदाचें वरण, दहीं, दूध, मीठ, काकवी, यांचें अतिसेवन, पालथें निजणें, दांत न घासणें, धूम्रपान, वमन, गंडूष आणि शिरावेध हीं यथोक्तकाळीं न करणें, यांहींकरून मुखरोग उत्पन्न होतो. या रोगांत त्रिदोषांचा संबंध असतो. परंतु कफाचें आधिक्य असतें.

**दंतरोग** ( मा. नि. )—आठ प्रकारचे त्यांची निदानें व चिकित्सा एक तंत्रानें सांगतों. **दालन**—दांतामध्यें फोडल्यासारखी पीडा होते, हा वातजन्य होय. याला वातनाशक औषधांनीं शमवावा. **कृमिदंत**—वायूच्या योगानें दांताला काळीं छिद्रें पडतात व हालतो, स्राव होतो, सुजतो, ठणकतो व कारण नसतां दुखतो. यांत काळी छिद्रें पडतात तीं दुष्ट रक्तानें कृमी होऊन तीं तोंडें करितात. **उपाय**—( १ ) अचलकृमिदंताला स्राव करणाऱ्या औषधांनीं स्रववून शेकावा तसेंच वातनाशक अवपीड, स्नेह आणि गंडूषधारण, स्निग्ध भोजन भाजलेल्या गरम हिंगाचें दाढेंत धारण इत्यादि करावी. ( २ ) रिंगणी, गोरखमुंडी, पांढरा एरंड आणि रिंगणमूळ, याच्या काढ्यांत तिळाचें तेल घालून त्यानें गुळण्या कराव्या ह्मणजे कृमिदंतवेदना शम पावतात. ( ३ ) पांढऱ्या उपलसरीचीं पानें आणून त्याची लुगदी करून घट्ट दांतात धरावी ह्मणजे दांतांतील कृमीपडून जातात आणि दांत घट्ट होतात. ( ४ ) हिराकस, हिंग, तुरटी व देवदार, ही समभाग घेऊन पाण्यांत वांटून गोळी करून दातांत धरावी ह्मणजे दांतांतील कृमीपासून झालेल्या दंतशूळाचा नाश होतो. ( ५ ) नारळाचे करटीचें तेल पाडून रात्रीं निजतेवेळीं तेल दाढेस चांगलें लावावें व त्याजवर दांतवण दाबून

बसवून निद्रा करावी. परंतु थुंका गिळीत जाऊं नये. प्रातःकाळीं ऊन पाण्यानें तोंड धुवावें. ( ६ ) रिंगणीचीं हिरवीं फळें असल्यास तीं त्याचे तेलांत वाटून सुकीं असल्यास तीं बारीक करून तें चूर्ण किंवा वरील तेलांतील कल्क निर्ळ्यांत घालून कांहीं वेळ धूर तोंडांत धरावा. गिळूं नये किंवा हीं औषधें निर्धूम अग्नीवर घालून त्यांची धुरी दांतांवर घ्यावी. व लाळ गळूं द्यावी ह्मणजे दाढेंतून लागलीच त्यांतील किडे पडतात ते दिसतात व दाढ बरी होते. ( ७ ) गुरासनी ओंवा त्याचे तेलां-त मिळवून लोखंडाची पळी लाल करून तिजवर टाकून धूर घ्यावा व लाळ गळूं द्यावी. ( ८ ) उपळसरीच्या पानाची लुगदी करून घट्ट दांतांत धरावी ह्मणजे दांतांतील किडे पडून जातात व दांत बरे होतात. **भंजनक**—तोंड वांकडें हो-ऊन दांत फुटतात. हा कफवातज होय. यांजवर कफवातनाशक औषधें द्या-वीत **दंतहर्ष**—दांताला थंड, रुक्ष, आंबट अशा पदार्थांचा स्पर्श आणि वारा हे लागले असतां तें सळसळतात व आंबतात. हा रोग पित्तवायूच्या कोपा-नें होतो. हा दंतहर्ष रोग वातजन्य असताही त्याला उष्ण सोसत नाहीं. हा व्याधिस्वभाव होय. **उपाय**—( १ ) तेल किंवा तूप यांचें नस्य, मांसरस, य-वागू, दूध आणि शिरोबस्ति इत्यादि वातनाशक औषधी क्रमानें कराव्य। ( २ ) मंद, उष्ण अशी तेलाची किंवा तुपाची गुळणी धरावी किंवा वातनाशक अशा औ-षधांच्या काढ्यात ऊन ऊन गुळण्या कराव्या. **दंतशर्करा**—दांतावरचा मळ, पित्त वायूनें शोषला जाऊन वाळूसारखा खरखरीत होतो. **उपाय**—( १ ) दंत-मुळाना धक्का लागल्यावांचून दांतावरचा मळ खरवडून काढावा आणि मधाशीं ला-खेचें चूर्ण मिळवून तें बोटावर घेऊन हळू चोळावें. **कपालिका**—त्याच शर्करे-चे पापड्याप्रमाणें दांतापासून कपरे निघूं लागतात यानें सर्व दांत नासतात. **उपाय**—( १ ) यांजवर दंतशर्करेवरचे उपाय करावे. **शावदंत**—जो दंत दुष्ट रक्तपित्तानें जळून काळा किंवा निळा होतो. याजवर रक्तपित्तनाशक उपाय क-रावे. **हनुमोक्ष**—वायूच्या योगानें त्या त्या अभिघातेंकरून हनुवटीचा सांधा उखळतो. यांची लक्षणें आर्दितवायुसारखी आहेत.

**ओष्ठरोग** ( मा. नि. )—ओष्ठरोग आठ प्रकारचे आहेत, त्यांचीं निदानें व चिकित्सा क्रमानें सांगतों. **वातज ओष्ठरोग**—वातकोपानें ओठ कर्कश, खरखरीत, ताठर, काळे. व त्याला मोठी पीडा होणारे व फुटणारे व त्यावरची चामडी फाटणा-रे असे होतात. **उपाय**—(१) तेल, तूप, राळ, मेण, रास्ना, गूळ, सैंधव आणि गेरु, हीं एकत्र कढवून एक जीव झाला ह्मणजे ओठाला लेप करावा; ह्मणजे ओठ फुटता-त त्याना आणि व्रणाला भरून आणितो. ( २ ) रात्रीं निजते वेळीं दुधावरील साय ओठास लावीत जावी. **पैत्तिक ओष्ठरोग**—पित्ताचे योगानें ओठावर पुळ्या येतात त्या दुखतात. ओठाचा दाह व पाक होतो आणि पिवळे दिसतात. **उपाय**—( १ ) या पित्तविकारावर शिरावेध, वमन, रेचन व कडू रसाचें पान, रसयुक्त भो-जन, शीत लेप, आणि पित्तघ्न ह्म० पित्त नाश करणाऱ्या औषधाचे काढ्याचा परिषेक

इत्यादि उपचार करावे. **कफज ओष्ठरोग**—कफकोपानें ओंठ त्वचेसारख्या रंगाच्या फोडांनीं व्याप्त असतात. थोडे दुखतात व बुळबुळीत, थंड आणि जड असे होतात. **उपाय**—( १ ) पूर्वीं रक्त काढून नंतर मस्तकरेच, धूमपान, शेक, कवल इत्यादि उपचार करावे. **सन्निपातिक ओष्ठरोग**—सन्निपातानें ओठ एकदां काळे, कधी पांढरे, कधीं पिवळे व अनेक तऱ्हेच्या पुळ्यांनीं व्याप्त असे होतात. **उपाय**—( १ ) दोषानुसार चिकित्सा करावी. आणि त्याला व्रण झाले असले तर व्रणावरची चिकित्सा करावी. **रक्तज ओष्ठरोग**—रक्तानें ओठावर खजुराच्या फळासारख्या रंगाच्या पुळ्या येतात, त्यांतून रक्त वाहतें. व तें ओष्ठ रक्तासारखे लाल दिसतात. याजवर साधारण रक्तज विधि करावा. **मांसज ओष्ठरोग**—मांस दुष्ट झाल्यानें ओठ जड, ठोसर व मांसाच्या गोळ्यासारखे उमळून येतात. या रोगांत दोन्ही ओठाला किडे पडतात. याजवर साधारण कृमिनाशक उपचार करावे. **मेदजओष्ठरोग**—मेदानें ओट तुपाच्या निवळीप्रमाणें व लापशीसारखे व कंडूयुक्त, जड असे होतात. आणि त्यांतून स्फटिकासारखा स्वच्छ स्राव होतो. व त्यावर पडलेला व्रण भरत नाही व त्यास मृदुताही येत नाहीं. वाग्भट यांचें मत या रोगात ओठ मृदु होतात. **उपाय**—( १ ) शोधन करून शेक द्यावा व कवल धारण करावें. आणि गहुला, त्रिफळा व लोध, यांचें चूर्ण मध घालून त्यानें हळुहळु चोळावें. **अभिघात ओष्ठरोग**—ओठ सभोंवताले चिरतात, ठणकतात, आणि गांठाळतात, कंडू सुटतो व लस वाहते. **कफरक्तजओष्ठरोग**—ओठ व्रणांनीं युक्त व लाल होतात, ठणका लागतो व स्राव होतो.

**दंतमूलरोग** ( मा. नि. )—दंतमूलरोग १९ प्रकारचे आहेत, त्यांचीं निदानें व चिकित्सा क्रमानें सांगतों. **शिताद**—ज्याच्या हिरड्यांतून अकस्मात् रक्त वाहतें व दांतांचें मांस दुर्गंधयुक्त, काळें आणि चिघळून मृदु होऊन झडतें व एक दांताची हिरडी पिकली ह्मणजे ती दुसरीला पिकविते, हा व्याधि कफ रक्तापासून होतो. उ०-(१) दंतमूळाचें पूर्वीं रक्त काढून नंतर त्रिफळ्याचे काढ्यानें गुळण्या करून टाकाव्या. ( २ ) हिराकस, लोध, पिंपळी, मनशीळ, गव्हला आणि मालकांगोणी, यांचें चूर्ण करून त्याचा मधाशीं लेप करावा. तो कुजलेल्या मांसाचा नाश करितो. नंतर त्यावर वातनाशक तेल किंवा तूप योजावें. **दंतपुप्पुट**—ज्याच्या दोन किंवा तीन दांतांच्या मूळाला मोठी सूज येते. हा कफरक्तापासून होतों. **उपाय**—रक्तमोक्ष करावा. आणि पंचलवणें व क्षार मधाशीं मिळवून त्यानें हळुं हळुं घासावें. **दंतवेष्ट**—रक्त दुष्ट झाल्यानें दांतातून रक्त व पू वाहतो व दात हालतात. **उपाय**—( १ ) रक्तपित्तनाशक विधि करावा. ( २ ) शिरोरेचक, नस्य आणि स्निग्ध भोजन करावें. आणि दंतांचें वेष्टन कुजलें असतां त्यावर प्रतिसारण करावें. ( ३ ) क्षीरवृक्षाच्या[1] काढ्यात मध, साखर आणि तूप घालून करावा करावा.(४)निळा कोरा-

[1]—वड उंबर इत्यादि दूध निघणारे वृक्ष.

टा ४०० तोळे घेऊन त्याचा १०२४ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून त्यांत तेल घालावें. आणि धमासा, तांबडा खैर, पांढरा खैर, जांभूळ, आंवा, जेष्टीमध व कमळें या प्रत्येकांचा दोन दोन तोळे कल्क घालून तेल शेष राहीपर्यंत पचन करावें तें तेल तोंडात धरावें; ह्मणजे हालणारे दात घट्ट बसतात. **सौपिर**—कफरक्तापासून दंताच्या मुळाशीं सूज येते व त्यामुळें ठणका, लाळ गळणें, हे होतात. **उपाय**—( १ ) रक्त काढून नंतर लोध, नागरमोथे व रसांजन याचें चूर्ण करून तें मधांत कालवून त्याचा लेप करावा. आणि क्षीरवृक्षाचे काढ्याचा किंवा कल्काचा गंडूष करावा. **महासौपिर**—ह्या त्रिदोषज व्याधीनें हिरड्यापासून दांत हालतात आणि टाळ्याला भेगा पडतात. या रोगानें रोगी सात रात्रींत मरतो. **परिहार**—या रोगानें दातांचें मांस गळतें आणि थुंकीमध्यें रक्त पडतें. हा व्याधि पित्तरक्तकफापासून होतो. **उपाय**—( १ ) शीतादावरचे उपाय करावे, **उपकुश**—या रोगामध्यें हिरड्याचा दाह होऊन पिकतात त्यामुळें दांत हालतात-तोंड खालीं केलें असतां थोडीशी ठुसठूस लागून दंत वेगळे होऊन रक्त स्रवतें व रक्त वाहून गेल्यावरही हिरड्या फुगतात. आणि तोंडाला घाण येतें. हा व्याधि पित्तरक्तज आहे. **उपाय**—( १ ) शीताद दंतरोगावरील क्रिया करावी आणि वमन, रेचन व मस्तक रेच द्यावे. ( २ ) खारेतीच्या ह्मणजे काळ्या उंबराच्या पानांनी व्रण घासून रक्तस्राव करावा आणि सैंधव, मध, सुंठ, मिरीं व पिंपळी यांचें चूर्ण करून त्यानें हळु हळुं घांसावें. **वैदर्भ**—दांतांच्या हिरड्या जोरानें घांसल्यामुळें सुजतात आणि दांत खिळखिळे होतात. हा रोग अभिघातानें होतो. **उपाय**—( १ ) शस्त्रानें फोडून रक्तस्राव करावा. नंतर क्षार योजावा. आणि शीत क्रिया करावी. **खल्लीवर्धन**—वायूच्या योगानें दात तीव्र वेदनायुक्त होऊन इतर दांतापेक्षां यत्किंचित् लांब होतो तो. तो पूर्ण झाल्यानंतर सर्व वेदना शांत होतात. **उपाय**—( १ ) अधिक दंताला उपटून काढून लासावा आणि कृमिदंतासारखा इतर सर्व विधि करावा. **कराल**—हिरड्याचा आश्रय करून राहणारा वायु हळु हळु भयंकर मोठे विकट असे दांत वांकडे तिकडे करितो. हा रोग बरा होत नाहीं. सुश्रुताचें मत कीं, हा संख्येहून जास्त आहे व ग्रंथकारानें आपल्या ग्रंथांत लिहिला आहे ह्मणून मींही घेतला आहे **अधिमांसक**—शेवटल्या दाढेच्या मुळाशी मोठी सूज येते ती फार ठणकते व लाळ फार गळते. हा कफापासून होतो. **उपाय**—( १ ) शस्त्रानें छेदन करून त्यावर वेखंड, मालकांगोणी, पहाडमूळ, सज्जीखार, यवक्षार आणि पिंपळी याचे चूर्णाचा कल्क तोंडांत धरावा. आणि कडू पडवळ, कडू निंब व त्रिफळा यांचा काढा करून त्यानें गुळण्या करून टाकाव्या. **दंतविद्रधि**—दंत, मास, कफ, वात, पित्त आणि रक्त यांनीं मोठें सुजतें आणि दाह, ठणका, व फुटल्यावर पुवांचा स्राव होतो. **उपाय**—( १ ) सामान्य विद्रधीवरची सर्व क्रिया करावी. परंतु कुशल वैद्यानीं शस्त्रकर्म करूं नये. **नाडीव्रण**—निदानामध्यें वात, पित्त, कफ, सन्निपात आणि आगंतुक असे पांच प्र-

कारचे नाडीव्रण सांगितले तेच दंताच्या मुळाला होतात असें जाणावें. **उपाय**—दंतनाडीरोगांवर संपूर्ण नाडीव्रणावरची चिकित्सा करावी आणि ती नाडी ज्या दांतांमध्यें होते तो दांत युक्तीनें उपटून काढावा. तो नाडीव्रण खोल असल्यास तेथील मांस शस्त्रानें छेदन करून टाकावें आणि क्षारानें किंवा अग्नीनें तें ठिकाण भाजावें. दंत उपटण्याची उपेक्षा केली असतां त्या नाडीची अस्थीमध्यें गति होते आणि वरचा दांत उपटला असतां रक्त फार वाहतें. रक्तस्राव फार झाला असतां पूर्वी सांगितलेले घोर रोग उत्पन्न होतात. अथवा तो रोगी काणा ह्मणजे तिरळा होतो. किंवा आर्दितवायु होतो याकरितां वरचा दांत हालत असला तरी त्याला उपटून काढू नये व खालचा समूळ दांत उपटून काढावा. आणि खालचे भग्नास्थीही काढावे **उपाय**—( १ ) जाईचा पाला, गेळफळ, पांगारा, गोखरु, मंजिष्ठ, लोध्र, खैराची साल व जेष्ठीमध यांचा काढा करून त्यांत तिळाचें तेल, घालून सिद्ध करावें व त्यांनीं गुळण्या कराव्या ह्मणजे नाडीच्या दंतगत गतीचा नाश होतो. (२) संपूर्ण दंतरोगांवर वातनाशक क्रिया करावी आणि तेल ऊन करून तें मंदोष्ण तोंडांत धरावें. ( ३ ) तेल ६४ तोळे, लाखेचें शिरे ६४ तोळे, दूध ६४ तोळे व लोध्र, कायफळ, मंजिष्ठ, कमळाचें केशर, चंदन, निळें कमळ व जेष्ठीमध, हीं प्रत्येक चार चार तोळे घेऊन त्यांचा काढा तेलाचे चौपट घालावा आणि या प्रत्येक औषधांचा चार तोळे कल्क शिवाय आत घालून तेल पक्क करावें तें सिद्ध झाल्यावर तोंडात धरावें, ह्मणजे दातांचा दालनरोग, दांत हालतात ते, अकालीं पडतात ते, व कपालिका, शीताद, पूतिवक्र, अरुचि आणि तोंडाचा पचपचीतपणा यांचा नाश करितें. व दांतांना घट्ट करितें. हें लाक्षादि तेल दंतरोगावर उत्तम आहे. ( ४ ) कोष्ठ, दारुहाळद, लोध्र, नागरमोथे, मंजिष्ठ, पहाडमूळ, कुटकी, मोरवेल व जुई यांचें चूर्ण करून त्यानें दांत घांसावे ह्मणजे; रक्तस्राव, कंडू आणि ठणका यांचा नाश होतो. ( ५ ) जाईचा पाला, पुनर्नवा, गजपिपळी, कोरांटा, वेखंड, सुंठ, ओंवा, हिरडेदळ व तीळ, हीं सर्व औषधें समभाग घेऊन चूर्ण करावें तें चूर्ण तोंडांत धरलें असता दुर्गंध, दातांचा ठणका, दांत हालणें, व्रण, सूज, कंडू आणि कृमि यांचा नाश होतो. ( ६ ) तिळाचे तेलांत सैंधव घालून थोडें ऊन करून त्या तेलाचा गंडूप करावा ह्मणजे दात हालतात ते चांगले बळकट होतात. ( ७ ) मोगली एरंडाच्या ओल्या काडीनें नित्य दात घाशीत जावें. किवा फार दिवसांचे जुनाट मोगली एरंडाच्या बुंधाचा तांबडा चीक काढून दांतांस लावीत जावा किवा हा चीक दातांला लावून वर दांतवण बसवावें; ह्मणजे हिरड्यांचे सर्व रोग जाऊन दांत घट्ट होतात. ( ८ ) नुसत्या तपकिरीनें दररोज दांत घांसण्याचा परिपाठ ठेविला असतां दांताला कधींही कीड लागत नाही. ( ९ ) तुरटीच्या लाहीची पूड, भीमसेनी कापूर, कंकोळ व कापूरकाचरी याचें चूर्ण दांतांस व हिरड्यास चोळावें ह्मणजे हिरड्या व दातांचे रोग त्वरित नाश पावतात. (१०) पुढें तैल प्रकारणांत इर मेदादितैल सागितलें आहे त्याचा उपयोग सर्व दंतरोगांवर करावा.

**दंतरोगांवर पथ्य**—उष्ण उष्ण असें अन्न, ऊन पाण्यानें चुळ भरणें व वातनाशक असें अन्न यांची योजना करावी.

**अपथ्य**—आंबट फळें, आंबट पदार्थ, थंड पाणी, रुक्ष अन्न, दांत घासणें, व कठिण पदार्थांचें भक्षण हें दंतरोग्यांनीं करूं नये.

**जिव्हारोग**—जिव्हारोग पांच प्रकारचे आहेत. त्यांची निदानें व चिकित्सा एकतंत्रानें सांगतों. **वातजजिव्हारोग**—वायूनें जीभ फुटते, मेहरते आणि सागाचे पानासारखी खरखरीत होते. **पित्तज**—पित्तानें जीभ, पिवळी, व तिला दाह होतो आणि तिजवर लांब लांब व तांबडे असे कांटे येतात. **कफजजि०**—कफानें जीभ जड व दडदडीत होते व तिजवर सावरीच्या कांट्यासारखे अंकुर येतात. **आलसकजि०**—कफरक्तापासून जिभेचे खालचे अंगास मोठी सूज येते ती वाढल्यानें जीभ ताठते, व मुळाशी पिकते हा असाध्य होय. **उपजिव्हा**—कफरक्तानें जिव्हेला दाबून जिभेच्या अग्रासारखी सूज उत्पन्न होते व कंडू सुटतो, लाळ फार गळते व आग होते. **उपाय**—( १ ) उपजिव्हिकेला क्षारानें लेखन करून नंतर प्रतिसारण, शिरोरेच, गंडूष आणि धूमपान हे उपचार करावे. ( २ ) सुठ, मिरीं, पिपळी, यवक्षार, हरीतकी आणि चित्रक यांचें चूर्ण करून त्यानें जिभ घांसावी. व याच औषधानी तैल सिद्ध करून त्याचा गंडूष करावा. ( ३ ) रक्त काढावें. ( ४ ) गुळवेल, पिपळी, कडू निंब, आणि तिखट औषधें यांचा कल्क करून तोंडांत धरावा. व वात दंतओष्ठरोगांवर सागितलेलीही चिकित्सा करावी.

**तालुरोग** ( मा. नि. )—हे नऊ प्रकारचे आहेत. त्यांचें निदान व चिकित्सा एकतंत्रानें सांगतों. **गलशुंडीतालुरोग** ( पडजीभ )—कफरक्तापासून तालूच्या मुळाशीं फुगलेल्या भात्याप्रमाणें मोठी सूज येते आणि तिच्या योगानें तहान, खोकला, व दमा हे होतात. **तुंडीकेरीता०**—कफरक्तेंकरून शूळ, ठणका, दाह, पिकणें इत्यादिकांनी युक्त अशी सूज उत्पन्न होते. तिचा आकार रानकापशीचे बोंडासारखा होतो. इची सूज मऊ व थोडी तांबडी असून तीव्र वेदना होतात. **अध्रुवता०**—टाळ्यावर रक्तविकारानें तांबडी, व ताठ अशी सूज येते. तिला ठणका लागून ज्वर येतो. **कच्छपता०**—कफदोषानें कांसवाचे पाठीसारखी उंच व वेदनायुक्त अशी सूज फार जलद येते. तिला वेदना कमी असते. **अर्बुदता०**—तालूमध्यें रक्तदोषांनी कमळाच्या वाटीसारखी असते. तिची लक्षणें अर्बुदनिदानातील रक्तार्बुदाप्रमाणें जाणावी.

**मांससंघातता०**—ताळूमध्यें कफानें मांस दुष्ट होऊन वेदनारहित असें मांस सुजून लोंबूं लागतें. **तालुपुप्पुट**—मेदयुक्त कफानें टाळ्यावर वेदनारहित, स्थिर, व बोराएवढी अशी सूज येते. **तालुशोष**—वायूनें टाळा फार सुकून भेगा पडतात, सूज येते व भयंकर श्वास लागतो. **तालुपाक**—कुपित पित्तानें अत्यंत

भयंकर अशी टाळू पिकते. तालुशोषावर वातनाशक व तालुपाकावर पित्तनाशक क्रिया करावी.

**तालुरोगांवर उपाय**—( १ ) पडजीभ सुटते त्यावर गंडूष धारणाकरितां कफनाशक काढे किंवा रस योजावे. आणि कोष्ठ, मिरीं, वेखंड, सैंधव, पिंपळी, पाहाडमूळ आणि चवक यांचें चूर्ण करून मधाशीं कालवून तें पडजिभेला चोळावें. ( २ ) दांतवण पडजिभेवर दाबून थोडी लाळ गळू द्यावी, याप्रमाणें दोन दिवस करावें.

**गलरोग** ( मा. नि. )—हे आठरा प्रकारचे आहेत त्यांचें निदान व चिकित्सा एक तंत्रानें सांगतों. रोहिणीही पांच प्रकारची आहे. हिचें सामान्य लक्षण गळ्यामध्यें वात पित्त व कफ हे दुष्ट होऊन मांसाला व रक्ताला दूषित करून गळ्यामध्यें मांसाकुर उत्पन्न करितात. त्यामुळें गळा दाटून जातो. हा रोहिणीनामक व्याधि प्राणनाशक आहे. **उपाय**—पांच रोहिणीमध्यें ज्या साध्य रोहिणी सांगितल्या त्यांचें रक्त काढावें आणि वमन, धूमपान, गंडूषधारण आणि नस्य हे उपाय करावे. **वातजरोहिणी**—जिव्हेच्या भोंवते अत्यंत वेदनायुक्त असे मांसांकुर उत्पन्न होतात ते गळा कोंडितात आणि त्या योगानें कंप,स्तंभनादिक वायूचे उपद्रव होतात. **उपाय**–(१) रक्त काढून लवणानें घांसावें आणि सुखोष्ण असे गंडूष वारंवार धरावे. **पित्तजरो०**—पित्तकोपानें होणारी रोहिणी लवकर वाढते व दाह होतो. लवकर पिकते, आणि तिच्या योगानें तीव्र ज्वर येतो. **उपाय**—( १ ) साखर, मध व गहुला यांचें चूर्ण चोळून नंतर द्राक्षें व फालसा यांचे काढ्याचा गंडूष धरावा. **कफजरो०**—कंठसंबंधी शिरांचा वेध करिते व अचल असून उंचवट असते व हळूहळू पिकते. आणि तिचे अंकुरही कठिण असतात. **उपाय**—(१) घेरोसा व तिखट औषधांनीं चोळावी. आणि पांढरी तुळस, वावडिंग, दांतीमूळ यांनीं तेल सिद्ध करून त्यांत सैंधव घालून त्याचें नस्य करावें व त्याचा गंडूषही करावा. **त्रिदोषजरो०**—या रोहिणीमध्यें पू खोल होतो व तिजवर औषधोपाय चालत नाही. व तिन्ही दोषाच्या लक्षणांनी युक्त असते. ही तत्काळ प्राण घेते. हिला हल्लीं प्रचारांत काटेधावरें असें ह्मणतात. **रक्तजरो०**—ही फोडांनी व्याप्त असते आणि तिचीं लक्षणें पित्तजरोहिणीचे लक्षणासारखीं असतात, ती साध्य जाणावी. **उ०**—पित्तरोहिणीवरची चिकित्सा करावी. **कंठशालूक**—गळ्यामध्यें कफापासून बोराच्या बीएवढी गांठ येते. तिजवर बारीक काटे असतात व ती खरखरीत असते. हा रोग शस्त्रानें साध्य होतो. **उ०**—( १ ) स्राव करून नंतर तुंडीकेरीवरची चिकित्सा करावी. आणि दिवसांतून एक वेळ यवान्न भक्षण करून रहावें. **अधिजिव्हक**—रक्तमिश्रित कफकरून जिभेच्या अग्रासारखी जिभेवर सूज येते; हा पिकला तर साध्य होत नाहीं ह्मणून वर्जावा. **उ०**—उपजिव्हकरोगावरील चिकित्सा करावी. **वलय**—गळ्यांत कफानें उंच व लांब अशी गांठ उत्पन्न होते. तिजमुळें

अन्न खालीं उतरत नाहीं व तिजवर कांहीं उपायही चालत नाहीं. हल्लीं प्रचारांत याला घांटसर्प ह्मणतात. उ०--( १ ) कौंडळाचें ह्मणजे गवळणीचें फळ अर्धवट कुटून चिलमींत घालून धूर गिळावा. किंवा नुसतें त्याचें बीज पाण्यांत उगाळून प्राशनार्थ द्यावें; ह्मणजे घसा तावडतोब साफ होतो. ( २ ) जवखार. पिंपळी व डाळिंबाचे दाणे या तिन्हींची गोळी करून तोंडांत धरावी. व रसगिळीत जावा. **उल्हास (बलास)** कोपलेला कफवायु गळ्यांत शोथ उत्पन्न करितो.व त्या योगानें दम लागतो व गळा दुखतो. हा मर्म तोडणारा दुर्धर व्याधि असाध्य जाणावा.**एकवृंद**—गळ्यामध्यें कफ व रक्त यांच्या कोपानें वाटोळी, उंच किंचित् दाहयुक्त खाजणारी अशी सूज येतें व ती किंचित् पिकते व कांहीं मऊ व कठिण अशी असते. **उपाय**—स्राव करून नंतर शोधनविधि करावा. **वृंदक**—गळ्यामध्यें उंच, वाटोळा, तीव्र, दाहयुक्त व ज्वरयुक्त अशी सूज उत्पन्न होते. हा वात, पित्त व रक्त यांच्या कोपानें होतो. यांत टोंचणी लागते. हा एक वृंदाचाच भेद आहे. **उपाय**—एक वृंदावरची चिकित्सा करावी. **शतघ्नी**—गळ्यामध्यें लांबोडी कठिण अशी सूज येते. तिनें गळा कोंडतो, तिजवर मांसाचे अंकुर फार असतात. व तीत ठणका, दाह, कंडू व अनेक पीडा होतात. ही प्राण घेणारी सूज लांबट व काटे लावलेले शस्त्राप्रमाणें असते. **गिलायु**—गळ्यामध्यें कफ रक्ताच्या योगानें आंवळ्याच्या बींसारखी गांठ येते. तींत ठणका, मंद वेदना, अशी असते. तिच्या योगानें गिळते वेळीं अन्न अडकल्यासारखें वाटतें. हा व्याधि शस्त्रसाध्य आहे. **उपाय**--शस्त्रानें उपाय करावा. **गलविद्रधि**—त्रिदोषसंबंधानें गळाभर सूज येते व तिजमध्यें वातादि दोषांनीं ठणका, दाह व कंडू इत्यादि लक्षणें होतात. व ती पूर्वोक्त सन्निपात विद्रधीच्या लक्षणांनीं युक्त असते. **उपाय**—(१) मर्मावांचून जाग्यावर झालेला गलविद्रधि पिकला असतां त्याचा छेद करावा.**गलौघ**—रक्तयुक्त कफानें गळ्यांत मोठी सूज उत्पन्न होते. त्या योगानें अन्न व पाणी खालीं उतरत नाहीं व वायुसंचार होत नाहीं. तो तीव्र ज्वरयुक्त असतो. **स्वरघ्न**—गळ्यांतील वायूचे मार्ग कफानें कोंडले असतां वारंवार डोळ्यांपुढें अंधेऱ्या येतात व तो पुरुष श्वासोच्छ्वास टाकितो, व त्याचा आवाज फुटतो, गळा कोरडा पडतो, आणि अन्न गिळत नाहीं. हा व्याधि वातजन्य आहे. **मांसतान**—जी सूज गळ्यांत उत्पन्न होऊन क्रमानें पसरून गळ्याचा अवरोध करिते व फार दुःख देते. हा रोग प्राणघातक आहे. **विदारी**--गळ्यांत पित्तकोपानें दाह व ठणका यानीं युक्त अशी सूज उत्पन्न होते व दुर्गंधयुक्त असें मांस सडून पडतें. व रोगी बहुतकरून ज्या बाजूवर निजतो त्या बाजूवर हा रोग होतो.

**सर्व गलरोगांवर उपाय**--( १ ) गलरोगाचें रक्त काढावें व तीक्ष्ण औषधें द्यावीं. व नस्यादि कर्में करावीं. ( २ ) कुटकी, अतिविष, देवदार, नागरमोथे, आणि इंद्रजव यांचा गोमूत्रांत काढा करून प्राशनार्थ द्यावा. ( ३ ) द्राक्षें, कुटकी, त्रिकटू, दारुहळद, दालचिनी, त्रिफळा, नागरमोथे, पाहाडमूळ, रसांजन, आणि तेजबळ यांचें चूर्ण करून त्यांत मध घालून द्यावें; हें गलरोगावर फार चांगलें औ-

षध आहे. ( ४ ) जवखार, तेजबळ, पाहाडमूळ, रसांजन, दारुहळद आणि पिंपळी यांचे चूर्णाची मधात गोळी करून ती सर्व गलरोगनाशनार्थ तोंडांत धरावी.

**सर्वसर–मुखपाक** ( तोंड येणें ) ( मा. नि. )—हे मुखपाकरोग वात, पित्त व कफ असे ३ प्रकारचे आहेत. वायूचे योगानें तोंडांत चहूंकडे फोड येऊन चिणचिणतात व जळजळतात. पित्तानें तोंडांत तांबडे व पिंवळट असे फोड येऊन आग होते. कफानें किंचित् वेदनायुक्त, कंडूयुक्त आणि चामडीच्या रंगासारख्या अशा फोडांनीं तोंड व्याप्त होतें. कांहीं वैद्यांचें मत असें आहे की, रक्तज व पित्तज हा एकच आहे. त्रिदोषज ह्मणजे ३ दोषांनीं युक्त असा जो मुखपाक तो तत्काळ मारतो. कफज मुखपाक ३ दिवसानीं, पित्तज ५ दिवसांनीं आणि वातज मुखपाक ७ दिवसांनीं मारतो. **उपाय**—( १ ) वातजनित मुखपाकाला मिठानें चोळावा व वातनाशक औषधांनीं सिद्ध केलेल्या तेलाचें नस्य व गंडूप करावा. ( २ ) पित्तज मुखपाकावर रेचक द्यावें. नंतर संपूर्ण मधुर व शीतळ असा पित्तनाशक विधि करावा. ( ३ ) कफज मुखपाकाला प्रतिसारण, गंडूष, धूमपान, शोधन व संपूर्ण कफनाशक विधि करावा. ( ४ ) तवकीर व वंशलोचनाची पूड मुखांत टाकीत जावी. (५) बाभळीच्या सालीच्या काढ्याच्या गुळण्या करीत जाव्या. (६) संगजिरा व गेरू यांचें चूर्ण चोळावें. (७) नुस्ता जाईचा पाला चावून तंबाखूप्रमाणें तोंडांत धरावा. (८) जाईचा पाला, गुळवेल, मनुका, धमासा, दारुहळद व त्रिफळा यांचा काढा मध घालून गुळण्याकरिता द्यावा. ( ९ ) एक मुठ गोडे शेवग्याचीं कोंवळीं पानें, एक मुठ मुगाची सोलीव दाळ, आणि एक मुठ सडिक चांगले तांदूळ,हे तिन्ही एकत्र करून आठपट पाणी घालून त्याची पेज तयार करावी ती थोडी ऊन आहे तोंच गाईचें ताजें तूप दोन तोळे घालून प्राशन करावी; याप्रमाणें सात दिवस प्रातःकाळीं सेवन केली असता अति दुर्घट मुखपाकाचा निश्चयानें नाश होईल. (१०) जेष्टीमध, रक्तचंदन, वाळा, अतितिष, दूर्वा, पांढरा सुवासिक चंदन, देवदार, वंशलोचन, कंकोळ, आणि ब्रास कापूर ही प्रत्येक आर्धा तोळा घेऊन त्याचें चूर्ण करून त्या समान मध आंत मिळवून तें मिश्रण जिव्हा व मुख यांस लावीत जावें. ह्मणजे जिभेवरील, घशांतील व तोंडांतील ठिकठिकाणीं पडलेले चट्टे, चिरा आणि तोंडांतील सर्व प्रकारचे उष्णतेचे रोग ह्मणजे ज्यांच्या योगानें खाणें, पिणें, बोलणें, गिळणें, हे बरोबर होत नाहीं अशा अनेक प्रकारच्या मुखरोगांचा तीन किंवा पांच दिवसांत हटकून नाश होईल.(११) दारुहळद, जेष्टीमध, मोचरस, मैदालकडी,वंशलोचन, आणि रक्तचंदन यांचें चूर्ण बलाबल पाहून सहा मासे पर्यंत गाईचें तूप व मधांत दररोज प्रातःकाळीं सात दिवसपर्यंत देत जावें; ह्मणजे सर्व प्रकारचे मुखपाकाचा नाश होईल. ( १२ ) तुरटीची लाही करून बारीक पूड करावी आणि त्यांत वेलदोड्याचे दाण्याची पूड मिश्र करून तें मिश्रण तोंडांत फासून लाळ पडं [illegible] नंतर स्वच्छ तोंड धुवावें. याप्रमाणें दिवसांतून चार पांच वेळ केलें [illegible] ारचे मुखपाकाचा खात्रीनें नाश होतो. (१३) भीमसेनी कापूर, [illegible] ोळ यांची बारीक वस्त्रगाळ पूड क-

रून तोंडांत चोळावी व लाळ गळूं द्यावी; ह्मणजे हटकून मुखपाकाचा नाश होतो (१४) त्रिफळ्याचा काढा करून त्यांत मध घालून त्यानें तोंड धुवावें व गुळण्या कराव्या. (१५) संपूर्ण मुखपाकावर शिरावेध, मस्तकरेच, व मध, गोमूत्र, तूप, दूध आणि शीत पदार्थ यांचा कवल धरावा. (१६) दारुहळदीचा स्वरस काढून तो कढवावा आणि दाट झाला ह्मणजे त्यांत मध घालून द्यावा; ह्मणजे मुखदोष, रक्तदोष, आणि नाडीव्रण यांचा नाश होतो. (१७) सातविणीची साल, वाळा, कडू पडवळ, नागरमोथे, बाळहिरडे, कुटकी, जेष्टीमध, बहाव्याच्या शेंगेंतला मगज व रक्तचंदन यांचा काढा प्राशनार्थ द्यावा; म्हणजे मुखपाकाचा नाश होता, (१८) पिंवळी, मिरी, कोष्ठ व इंद्रजव यांचें चूर्ण तंबाखूसारखें तोंडांत धरावें; मुखपाक, लस आणि दुर्गंध यांचा नाश होतो. (१९) हाळद, कडूनिंबाचीं पानें, जेष्ठीमध व निळें कमळ यांच्या कल्कांत तिळाचें तेल सिद्ध करून त्याचा गंडूष करावा; ह्मणजे मुखरोगाचा खात्रीनें नाश होतो. (२०) खैराची साल ४०० तोळे घेऊन तिचा १०२४ तोळे पाण्यांत अष्टमांश काढा करून गाळून ध्यावा; त्यांत जायपत्री, कापूर, चिकणी सुपारी, दालचिनी, वेलची, तमालपत्र, नाकेशर व कस्तूरी हीं प्रत्येक तोळा तोळा घेऊन चूर्ण करून त्या काढ्यात मिळवावें आणि त्याची हरबऱ्याएवढी गोळी करावी. ती तोंडांत धरली असतां सर्व मुखरोग, जिव्हारोग, ओष्ठरोग, दंतरोग, गलरोग आणि टाळूरोग याचा नाश होतो.

**साध्यासाध्यविचार** (मा.नि.)—ओष्टरोगामध्यें मांसज, रक्तज व त्रिदोषज हे तीन, व दंतमूलगतामध्ये सन्निपातनाडी आणि सौषिर हे दोन; दंतरोगामध्यें शाळ, दालन आणि भंजन हें तीन; जिव्हारोगामध्यें आलास एक. तालुरोगामध्यें अर्बुद एक; गलरोगांत स्वरघ्न, वलय, वृंद, बलास, विदारिका, गलौघ, मांसतान, शतघ्नी आणि रोहिणी, हे नऊ मिळून एकोणवीस रोग असाध्य आहेत. याजवर चिकित्सा करणें झाल्यास वैद्याच्यानें बरा होणें कठिण आहे, असें सांगून औषध द्यावें.

**मुखरोगावर पथ्य**—घाम काढणें, रेच, वांति, गुळण्या, कवलधारण, रक्तमोक्ष, नस्य, धूम्रपान, जुन्या साळी, यव, मूग, कुळीथ, जांगलमांसाचा रस, कारलें, पडवळ, कोंवळा मुळा, तिखट, व कडु रस, गोड डाळिंब, तूप, जोंधळ्याची भाकर, जुन्या गव्हाची पोळी, व साखर, हे पदार्थ सेवन करावे.

**मुखरोगावर अपथ्य**—विडा, दंतकाष्ठ, स्नान, आंबट पदार्थ, मांस, व अनूपज प्राण्याचें मास, दही, दूध, गूळ, उडीद, रुक्षान्न, कठिणान्न, खाली तोंड करून निजणें व जड, पौष्टिक, असें अन्न, व दिवसांस निद्रा, हीं अपथ्यें होत.

---

# मूर्च्छा.

॥ मोहोमूर्च्छेतितांविद्याद्विज्ञेयाषड्विधाचसा ॥

**अर्थ**—वात, पित्त, कफ, मद्य, विष, व रक्त, यांपासून सहा प्रकारची मूर्च्छा होते.

**कर्मविपाक**—तृषा रोगांवरील समजावा, व त्याचप्रमाणें परिहार करावा.

**मूर्च्छेचें कारण व लक्षण** ( मा. नि. )—क्षीण झालेला, पुष्कळ दोष सांचलेला, विरुद्ध आहार सेवन करणारा, अशा पुरुषास मलमूत्रादि वेग धारण केल्यानें, लांकडादिकांच्या अभिघातानें, अथवा ज्या पुरुषाचा सत्वगुण क्षीण झाला, अशा पुरुषाची बाहेरच्या व आंतल्या मनोवह स्रोतसांमध्यें दोष प्रवेश करितात, तेव्हां मनुष्यास मूर्च्छा येते, ह्मणजे संज्ञा वाहणाऱ्या नाडी वातादिकांनीं आवृत झाल्या असतां सुखदुखानें ज्ञान नष्ट करणारें असें तम ह्मणजे अज्ञान अकस्मात् प्राप्त होतें. सुखदुःखाचें ज्ञान नष्ट झालें ह्मणजे मनुष्य काष्ठवत् पडतो, ह्या रोगाला मोहो किंवा मूर्च्छा असें ह्मणतात. ही सहा प्रकारची आहे.

**पूर्वरूप** ( मा. नि. )—हृदयांत पीडा, जांभया, ग्लानि, व भ्रांतीहीं सर्व मूर्च्छांचीं पूर्वरूपें जाणावीं.

**वातजमूर्च्छा** ( मा. नि. )—वायूपासून झालेल्या मूर्च्छेमध्यें आकाश निळ्या रंगाचें किंवा काळें अथवा तांबडें दृष्टीस पडून अंधारी येते, म्हणजे मूर्च्छा येते, आणि रोगी लवकर सावध होतो. अंगाला कांप सुटतो, अंग मोडून येतें, हृदय फार दुखतें, शरीर कृश होतें, शरीराचा वर्ण, काळा, सांवळा किंवा तांबूस होतो.

**पित्तजमूर्च्छा** ( मा. नि. )—लाल, किंवा हिरवें अथवा पिंवळें आकाश पाहून रोगी मूर्च्छित होतो, आणि सावध होतेवेळी घाम येतो, तृषा लागते, संताप होतो. डोळे ताबूस, व पिंवळे होतात, व मळ पातळ होतो, व शरीराचा वर्ण पिंवळा होतो.

**कफजमूर्च्छा** [ मा. नि. ]—आकाश मेघासारखें, किंवा आंधार आणि मेघ यांनी व्याप्त झालेले पहात असता रोगी मूर्च्छा पावतो, आणि उशीरानें सावध होतो, अंगावर जाड पांघुरणे, अथवा ओले चर्म घातलें आहे असें वाटतें, तोंडाला पाणी सुटतें व ओकारी होईलसें वाटतें.

**सन्निपातजमूर्च्छा** [ मा. नि. ]—यात तिन्हीही दोषांची लक्षणें होतात. हा रोग दुसरा अपस्मार ( फेंफरे ) च होय. परंतु अपस्मारामध्यें, तोंडाला फेंस, दात चावणें, डोळे फिरविणें, इत्यादि लक्षणें होतात. ती मात्र येथें होत ना-

होंत, एवढाच काय तो भेद आहे. बाकी फेंपऱ्याप्रमाणें नियमित दिवशीं नियमित काळीं अथवा पाहिजे त्यावेळीं किंवा वाटेल तितके वेग येतात व त्यांचा निर्वंध राहत नाही.

**रक्तजमूर्च्छेची संप्राप्ति** ( मा. नि. )—पृथ्वी आणि उदक हीं दोन्ही तमोगुण विशिष्ट आहेत. आणि रक्ताचा गंध हात दन्वय ह्मणजे पृथ्वी अंभोमय आहे म्हणून रक्ताच्या गंधाच्या योगानें जे भुविमानव म्हणजे तामस पुरुष आहेत ते मूर्च्छा पावतात. रक्ताचा गंध न आला तरी नुस्तें रक्त पाहून मूर्च्छा येते, हा द्रव्यस्वभाव आहे असें कोणी ह्मणतात.

**विष व मद्यज मूर्च्छा** ( मा. नि. )—तैलादिकामध्यें जे दहा गुण[1] आहेत तेंच विष आणि मद्य यांमध्यें अत्यंत तीव्रतेनें राहतात म्हणून विष मद्यापासून खालीं सांगितल्याप्रमाणें मोह पावतात. **विषजमोह**—आपले आपण जात नाही, कारण त्याचा पाक होत नाहीं आणि मद्यजन्य मोह तर मद्य पचल्यानंतर शांत होतो. हा विषमद्यामध्यें प्रभावानें राहतो.

**रक्तजादि तीन मूर्च्छा** ( मा. नि. )—रक्तजमूर्च्छेनें अंग आणि डोळे ताठतात, आणि श्वास अस्पष्ट असतो.—मद्यानें बडबड करितो, निजतो, स्मृति नष्ट होते, भ्रमिष्ट होतो आणि जोंपर्यंत तें मद्य जीर्ण होत नाही तोंपर्यंत जमिनीवर हातपाय पाखडतो.—विषजन्य मूर्छेमध्यें कापरें, झोंप, तृषा आणि आंधारात पडल्यासारखें वाटणें ही लक्षणें होतात. आणि मूल, पत्र क्षीरादि भेदेंकरून जें विष भक्षणांत आलें असेल त्याच्या लक्षणानें युक्त मूर्च्छा होते.

**मूर्च्छा इत्यादिकांचा भेद** ( मा. नि. )—मूर्च्छेमध्यें पित्त आणि तमोगुण हे अधिक असतात.—रजोगुण, पित्त आणि वायु यापासून भ्रम होतो.—तमोगुण वायु आणि कफ यापासून तंद्रा होते, आणि कफ व तमोगुण यापासून निद्रा उत्पन्न होते.

**तंद्रेचें लक्षण**[2] ( मा नि. )—इंद्रियें ही स्वविषय ग्रहण करीत नाहींत. सुस्ति, जांभया, अनायासानें श्रम, ही लक्षणें निद्रार्त पुरुषाप्रमाणे ज्यास होतात त्यास तंद्रा ह्मणतात.

**संन्यासाचें लक्षण** ( मा. नि. )—अत्यंत बलिष्ठ झालेले दोष, वाणी, देह, आणि मन यांचे व्यापार बंद करून हृदयांत राहून निर्बळ प्राण्याला मोहून टाकतात. तो संन्यासानें पिडलेला मनुष्य काष्ठ होऊन मेल्यासारखा पडतो. त्याला सध्यां फल

---

१—लघु, रुक्ष, आशु, विषद, व्यवायी, तीक्ष्ण, विकासी, सूक्ष्म, उष्ण, मनिर्देश्यरस.

२—निद्रा आणि श्रम हे अति प्रसिद्ध असल्यामुळे ते माधवानें सागितले नाहींत "चरकानें" सागितले आहेत ते असे. ज्यावेळेस समनक्लात होऊन इद्रियक्लात होतात. आणि विषयापासून निवृत्त होतात तेव्हा मनुष्याला झोंप लागते असे जाणावे.

चिकित्सा ह्मणजे अंगाला सुया टोंचणें, कुहिरीचे कांटे लावणें, पेटविलेले काकड नाकांत घालणें, इत्यादि क्रिया न केली तर तो लागलींच मरण पावतो. नाहीं तर वांचतो.

**सर्व प्रकारचे मूर्च्छेवर उपाय**—( १ ) अंगावर थंड पाणी शिंपावें. व पंख्यानें वारा घालावा. आणि सुगंध व शीत अशीं पन्हीं प्राशनार्थ द्यावीं. (२) बोराच्या आंठीचा मगज, पिंपळी, वाळा व नाकेशर, हीं पाण्यांत वांटून प्यावीं अथवा पिंपळीचें चूर्ण मधांत द्यावें. ( ३ ) त्रिफळ्याचें चूर्ण मधाबरोबर रात्रींस द्यावें, आणि गूळ व आलें एकत्र करून प्रातःकाळीं द्यावें. असें ७ दिवस दिलें असतां मद, मूर्च्छा, कामला, व मोह यांचा नाश होतो. ( ४ ) पाय ओरपावे व नखें दाबावीं, केश ओढावे व तोडावे. ( ५ ) नारळाच्या पाण्यांत सातूचें पीठ आणि साखर घालून द्यावें; ह्मणजे हृदयांतील कफ, तहान, मूर्च्छा व भ्रम हे भयंकर जरी असले तरी त्यांचा नाश होतो. ( ६ ) पित्तज्वरावरचे सर्व काढे द्यावे. (७) शिरीसवृक्षाचीं बी, पिंपळी, मिरीं व सैंधव हीं गोमूत्रांत वाटून उगाळून त्याचें किंवा लसूण, मनशीळ व वेखंड यांचें अंजन करावें. ( ८ ) सूतशेखर, पिंपळी व मध यात द्यावा. (८) हळद व साखर पाण्यांत कोंळून तें पाणी पाजावें. (९) नवसागर व चुन्याची कळी शिशीत भरून बूच काढून हुंगण्यास द्यावी.

**मूर्च्छारोगावर पथ्य**—धूम, अंजन, नस्य, रक्तमोक्ष, डाग, रेच, वांति, लंघन, क्रोध, भय, दुःखकारक बिछाना, विचित्र व कर्णप्रिय अशा गोष्टी, शीतल छाया, कडुरस, तांबड्या साळी, मडक्यांतील तूप, मूग, वाटाणे यांचें यूष, गाईचें दूध, साखर, पडवळ, केळें, डाळिंब, नारळ, तादूळजा, लघु, अशीं अन्नें, चंदनाचें वारंवार उटणें, थंड वारा, थंड वाळवंट, अद्भुत पदार्थांचें दर्शन, धैर्य, खारीक, काळीं द्राक्षें, तापवून निवालेलें पाणी, ताजें पाणी, उंबर, थंड पाणी व खडीसाखर हीं सर्व पथ्यें जाणावीं.

**मूर्च्छेवर अपथ्य**—तांबूल, पालेभाज्या, ऊन घेणें, विरुद्ध भक्षण, विरुद्ध प्राशन, मैथुन, घाम काढणें, तिखट पदार्थ, मलमूत्रांचा वेगरोध, ताक, श्रम, हीं अपथ्यें जाणावीं.

---

## मूत्रकृच्छ्र ( उन्हाळी ).

मूत्रकृच्छ्राणिचाष्टौस्युः

**अर्थ**—मूत्रकृच्छ्रें आठ प्रकाराचीं आहेत.

**कर्मविपाक**—जन्मसमयीं सप्तमस्थानीं शनि असून राहु दृष्टि असेल तर

मूत्रकृच्छ्र व मू्ाघात हे रोग होतात. परिहार—शनीचीं दानें, जप, व होम इत्यादि करावी.

**पूर्वकर्मविपाक**—गुरुस्त्रीशीं गमन किंवा गुरूशीं मत्सर करणें, मद्यपान, दिवसांस स्त्रीगमन इत्यादि कारणानें मूत्रकृच्छ्र व मूत्राघात हे रोग होतात. **परिहार**—गुरुतल्पादि गमनोक्त प्रायश्चित्त, सुवर्णमिश्रित अष्टदलाचें तिळासह दान इत्यादि करावीं.

**मूत्रकृच्छ्राचें कारण** ( मा. नि. )—व्यायाम, तीक्ष्ण औषधें, रुक्ष पदार्थ, दररोज मद्य प्राशन, निरंतर घोड्यावर बसून प्रवास करणें, जळाजवळ संचार करणाऱ्या पक्ष्यादिकांचें मांस आणि मत्स्य, जेवणावर जेवण,आणि कच्चे पदार्थ इत्यादिकांच्या सेवनानें मनुष्यास मूत्रकृच्छ्ररोग (उन्हाळी) होतो तो आठ प्रकारचा आहे. पृथक् दोषानी ३, सन्निपातानें १, शल्यज १, पुरीपज १, शुक्रज १ आणि अश्मरीजन्य १ मिळून आठ प्रकार जाणावे.

**अन्यमत**—हा रोग बहुतकरून सर्वास केव्हाना केव्हां तरी होतोच. अतिशय उन्हात फिरणें, अनवाणी उन्हांत चालणें, अतिशय जागरण करणें, खरबुज काजु यांचें अति सेवन इत्यादि उष्ण पदार्थांचे अति सेवनानें मूत्रस्थानास उष्णता होऊन मूत्रावरोध होतो. त्या योगानें लघवी साफ न होतां क्षणोक्षणी मूत्र होत असल्याचा भास होणें, थेंब थेंब लघवी होणें, इंद्रियाचा दाह होणें, चैन न पडणें, या रोगास तात्काळ औषध मिळून नाश न झाल्यास त्यापासून पुढें प्रमेह व्याधी उत्पन्न होते. याचे साधारण प्रकार दोन पाहण्यांत येतात. ते असे कीं, लघवीद्वारानें दाहयुक्त रक्त पडणें व दुसरें क्षणोक्षणीं थेंब थेंब लघवी होणें.

**संप्राप्ति** ( मा. नि. ) स्वकारणांनीं कुपित झालेले वातादि दोष अथवा सर्व दोष बस्तीमध्यें कोप पावून जेव्हां मूत्राचा मार्ग पीडित करितात तेव्हां मनुष्याला मोठ्या कष्टानें मुतावयास होतें.

**वातज मूत्रकृच्छ्र** ( मा. नि. )—आडसंधी, मूत्राशय आणि शिश्न यांच्या ठिकाणी तीव्र वेदना होतात आणि मोठ्या कष्टानें मुतावयाला थोडें थोडें आणि वरचेवर होतें. **उपाय**—( १ ) गोखरू, बाहाव्याच्या शेंगेंतला मगज, दर्भ, काश, धमासा, आंवळकठी, पाषाणभेद व हिरडेदळ, यांचा काढा मध घालून द्यावा, म्हणजे आसन्नमृत्यु जरी आहे तथापि त्याचे अश्मरी व मूत्रकृच्छ्र नाश पावतील यांत संशय नाहीं.

**पित्तज मूत्रकृच्छ्र** ( मा. नि. )—पिंवळें, यत्किंचित् लाल, वेदनायुक्त, अग्नीप्रमाणें वारंवार आणि कष्टानें मुतावयास होतें. **उपाय**—( १ ) दारुहळद व आवळकठी यांचें चूर्ण मध घालून द्यावें. ( २ ) उत्तम सुवासिक चंदन ४ तोळे तांदुळाच्या धुवणांत उगाळून त्यांत मध व साखर घालून द्यावें. ( ३ ) पांच तोळे तां-

दुळाचे धुवणांत सागवानाच्या दोन बियांचा रस उगाळून त्यांत सहा मासे साखर घालून द्यावें. ( ४ ) बिया काढलेल्या मनुका १ तोळा व खडीसाखरेचें चूर्ण एक तोळा, आतपाव दह्याचे निवळींत घालून प्राशन करावें. ( ५ ) नारळाचें पाणी, धन्याचें चूर्ण गूळ घालून प्राशनार्थ द्यावें, तें दाहसहित मूत्रकृच्छ्र व रक्तपित्त यांचा नाश करितें.

**कफज मूत्रकृच्छ्र** ( मा. नि. )—लिंग आणि बस्ति यांना जडत्व व सूज येते आणि मूत्र बुळबुळीत होतें. **उपाय**—( १ ) खारट, तिखट, व उष्ण असें औषध, अन्नपान, स्वेद, लंघन, वमन, ताक, कडू व तिखट औषधांनी सिद्ध केलेल्या तुपाचें प्राशन करावें. ( २ ) कुरडूचे बियांचें चूर्ण एक तोळा पांच तोळे ताकांत द्यावें.

**सन्निपातजमूत्रकृच्छ्र** ( मा. नि. )—हें सर्व लक्षणांनीं युक्त असतें. व कष्टसाध्य आहे. **उपाय**—( १ ) रिंगणीमूळ, डोरलीमूळ, पाहाडमूळ, जेष्टीमध, व इंद्रजव यांचा काढा खडीसाखर घालून द्यावा. ( २ ) शतावरीच्या मुळाचा काढा साखर व मध घालून द्यावा. ( ३ ) चार मासे जवखार साखरेबरोबर खावा, व वर थोडें थंड पाणी प्यावें, किंवा ताक प्यावें.

**शल्यजमूत्रकृच्छ्र** ( मा. नि. )—मूत्र वाहणारे मार्ग शल्यानें यत्किंचित् दुखावले असतां त्या योगानें भयंकर मूत्रकृच्छ्र होतें. त्याचीं लक्षणें वातजमूत्रकृच्छ्रासारखी होतात. **उपाय** [ १ ] वड, पिंपळ, आंबा व जांभूळ यांच्या साली समभाग पाण्यांत उगाळून किंवा बारीक वांटून यत्किंचित् असा उष्ण लेप नाभीवर व सर्व बस्तीवर करावा.

**पुरीषज मूत्रकृच्छ्र** ( मा. नि. )—मळाचा अवष्टंभ आल्यानें किंवा मळाचा वेग धारण केल्यानें वायु उलटा होऊन आध्मान, वातशूळ व मूत्र गुंतणें हे विकार होतात. **उपाय**—( १ ) घाम काढणें, अभ्यंग, बस्ति हे उपचार करावे आणि शुक्रविबंधनाशक विधि करावा. ( २ ) मद्य किंवा आवळ्याचा रस याबरोबर वेलदोड्याचें चूर्ण द्यावें. ( ३ ) खजूर, आंवळकठी, पिपळी, शिलाजीत, वेलदोडे, जेष्टीमध, पाषाणभेद, चंदन, शेंदाडाचें बी व धणे यांचें चूर्ण साखर घालून जेष्टीमधेच्या काढ्यांत द्यावें, ह्मणजे अंगदाह, लिंगदाह, गुददाह, वृषणाचा दाह, शुक्राचे ठिकाणचा दाह, शर्करा, अश्मरी व शूळ याचा नाशक असून बल्य व वृष्य असा आहे.

**अश्मरीजन्य मूत्रकृच्छ्र** (मा. नि )-मुतखड्याच्या योगानें जें मूत्रकृच्छ्र होतें तें. **उपाय**—( १ ) स्वेदादिक वातनाशक क्रिया करावी. ( २ ) वेलदोडे, पिपळी जेष्टीमध, पाषाणभेद, रेणुकबीज, गोखरू, आडुळसा व एरंडमूळ यांचा काढा पाषाणभेदाचें चूर्ण मध व साखर घालून द्यावा.

**शुक्रज मूत्रकृच्छ्र** ( मा. नि. )—दोषांच्या योगानें शुक्र दुष्ट होऊन मूत्रमार्ग कोंडला ह्मणजे कष्टानें मूत्र होतें व मूत्रावरोबर शुक्रधातु स्रवते आणि वस्ती व शिश्न यांस ठणका लागतो. **उपाय**—( १ ) उंस, दर्भ, काश, कसई, आणि कुश यांचे काढ्यांत तूप सिद्ध करून द्यावें. ( २ ) चिकणामूळ, हिंग, दूध व तूप ही एकत्र करून प्यावी ह्मणजे मूत्रदोष व शुक्रदोष हे दूर होतील.

**अश्मरी आणि शर्करा** ( मा. नि. )—अश्मरी व शर्करा ( खर ) या दोहोंची उत्पत्ति आणि लक्षणें सारखींच आहेत. परंतु त्यांमध्यें थोडासा भेद आहे तो असा कीं, पित्तानें पक्क होणारी आणि वायूनें शोषित होणारी अशी अश्मरी कफानें बांधली नाहीं तर मूत्रावाटें खरू लागते ह्मणजे स्रवूं लागते तिलाच शर्करा ह्मणतात. त्या शर्करेच्या योगानें हृदयास पीडा, कंप, कुशींत शूळ, अग्नि दुर्बळ, मूर्छा, आणि भयंकर मूत्रकृच्छ्र हे रोग होतात.

**सर्वप्रकारचे मूत्रकृच्छ्रांवर उपाय**—( १ ) पांढरा कांदा भाजून बारीक वाटून त्यांत थोडें तूप घालून बेंबीवर बांधावा. ( २ ) शीतळ चनीचा दोन तोळे काढा करून निवाल्यावर त्यांत सुमारें चार पाच थेंब चंदनी अत्तराचे घालून प्राशन करावें. ( ३ ) गाईचे दुधांत कुड्याची साल वांटून प्यावी; ह्मणजे भयंकर मूत्रकृच्छ्र नाश पावते. ( ४ ) उंस भाजून त्याचा रस काढून त्यांत उंद्राची विष्ठा थोडी मिळवून तो प्यावा म्हणजे तत्काळ मूत्रकृच्छ्राचा नाश होईल यात संशय नाहीं. ( ५ ) मनुका शिळे पाण्यांत वांटून तें पाणी प्यावें. ( ६ ) ऊन पाण्याची धार वस्तीवर धरावी. ( ७ ) उंदराच्या लेंड्या पाण्यात वाटून किंचित् उष्ण असा वस्तीवर लेप द्यावा. ( ८ ) वाळहिरडे, धमासा, बहाव्याच्या शेंगेंतला मगज, गोखरु व पाषाणभेद यांचा काढा मध घालून द्यावा; ह्मणजे दाह, तिडीक, व वायूचा अवरोध यांसहित मूत्रकृच्छ्राचा नाश होतो. (९) मुळांसुद्धा गोखरुचे झाडाचा काढा करून साखर व मध घालून द्यावा. ह्मणजे मूत्रकृच्छ्र व उष्ण वायु हे दूर होतात. ( १० ) जवखार ३ मासे पर्यंत ताकांत द्यावा. ह्म० मूत्रकृच्छ्र व अश्मरी यांचा नाश होईल.(११) एलची, पाषाणभेद, शिलाजीत व पिंपळी यांचे चूर्ण तांदुळाचे धुवणात घालून द्यावें. अथवा गुळावरोबर खावें. म्हणजे आसन्नमृत्यू जरी मूत्रकृच्छ्र असलें तरी रोगी वांचेल ( १२ ) लकड्या पाषाणभेद १, एलची दाणे १, सोरा १, गोखरु १ आणि उंची केशर २ भाग, या सर्वांचें चूर्ण करून त्यांतून तीन मासे सकाळी व तीन मासे तिसरे प्रहरीं तांदुळाचे धुवणांत देत जावें. दिवस सात. इतक्यानें रोग बरा न झाल्यास पुन्हां सात दिवस केळीचें पाण्यांत वरप्रमाणें देत जावें, म्हणजे तिडीकयुक्त मोठ्या धुरंधर मूत्रकृच्छ्राचा नाश होईल यात संशय नाही.

**मूत्रकृच्छ्रावर पथ्य**—जुन्या तांबड्या साळी, गाईचें व म्हशीचें ताक, अनूपमांस, गाईचें दूध, दहीं, पडवळ, काकडी, खजूर, नारळ, तांदुळजा, बारीक वेलची, शीतळ अशीं अन्नें व पानें, थंड वाळवंट, कालें, तवकीर, साठ्याचा भात,

काळा ऊंस, तापवून थंड केलेलें पाणी, कोंवळा मुळा, पांढरें रताळूं, कोंहळा, हारीक, जंगलमांस, नदीचें पाणी, जोंधळ्याची भाकरी, जुन्या गव्हाची पोळी, तूप, साखर, मुगाचें वरण. ऐेच इत्यादि पथ्यवर्ग जाणावा.

**मूत्रकृच्छ्रावर अपथ्य**—मद्य, श्रम, मैथुन, हत्ती, घोडा यांजवर बसणें, विषमाशन, विरुद्धाशन, तांबूल, मत्स्य, मीठ, आलें, तेलांत तळलेले पदार्थ व हिंग, मूत्रवेगाचें धारण, वेळूचे कोंब, अति तीक्ष्ण व उष्ण पदार्थ, विदाही, रुक्ष, व आंबट पदार्थ, साठ्याचा भात, व हरकाचा भात, तीळ, उन्हांत फिरणें, गुळाचे पदार्थ इत्यादि वर्ज करावे.

---

# मूत्राघात.

॥ जायंतेकुपितैर्दोषैर्मूत्राघातास्त्रयोदश ॥ प्रायोमूत्रविघाताद्यैर्वातकुंडलिकादयः ॥

**अर्थ** (मा. नि.)—मूलवेग विधारणादिकेंकरून (आद्य शब्दानें पुरीष शुक्रादि वेगविघात आणि रुक्षाशनादिक समजावी) कुपित झालेल्या दोषानी वातकुंडलिकादिक तेरा प्रकारचे मूत्राघात होतात.

**कर्मविपाक**—मूत्रकृच्छ्ररोगांत सांगितला आहे, व परिहारही त्याचप्रमाणें जाणावा.

**मूत्राघाताचें स्वरूप**--पीडा अल्प असून मूत्राचा प्रतिबंध होतो. त्या व्याधीला मूत्राघात ह्मणतात. आणि मूत्रकृच्छ्रामध्यें मूत्राचा अवरोध अल्प असून पीडा फार असते. इतका मूत्राघात व मूत्रकृच्छ्र या उभयतांचा भेद जाणावा.

**वातकुंडलिका** ( मा. नि. )---रुक्षतेनें किंवा मलमूत्रादि वेग धारणानें कुपित झालेला बस्तिगत वायु वेदनायुक्त होऊन मूत्राला आवरून उलटा होऊन वावटळीसारखा फ़िरत राहतो. तेणेंकरून मूत्र थोडें थोडें होतें व तिडीक लागते.

**वातकुंडलिका** ( वाग्भट )---वायूची गति उलट होऊन तो बस्तीत अतिशय वेदना करीत मूत्रांत शिरून इकडे तिकडे कुंडलाकार फिरतो व मलमूत्रांचा अवरोध व बस्तीत पिळवटल्यासारखी वेदना होते व बस्ति जड होतो व मूत्र थोडें थोडें होतें किंवा मूतताना मल होतो.

**अष्ठीला** ( मा. नि. )—वायु हा बस्ति आणि गुद यांस फुगवून व रोध करून चंचल आणि उन्नत अशी अष्ठीला ( दगडासारखी गांठ ) करितो ती मूत्रमार्गाचा रोध करिते.

**अष्ठीला** ( वाग्भट )—गुद व बस्ति यांच्यामध्यें वायु राहून फणसाच्या

बींसारिखा कठिण, स्थिर व उचललेला असा ग्रंथि उत्पन्न करितो. व मळमूत्र आणि वायु यांचा अवरोध होऊन पोट फुगतें.

**वातवस्ति** ( मा. नि. )—जो अडाणी मनुष्य मूत्र लागलें असतां मूत्राव-यास जात नाहीं, त्याच्या बस्तीतील वायु बस्तीचें तोंड बंद करितो, तेणेंकरून मूत्र बंद होतें. तो वायु बस्ति आणि कुशी ह्यांमध्यें पीडून राहतो. हा कष्टानें साध्य होतो.

**वातवस्ति** ( वाग्भट )—मूत्राचा अवरोध करणाऱ्या मनुष्याच्या बस्तीचें ह्मणजे मूत्रमार्गाचें तोंड वायु बंद करून आत मूत्र कोंडितो व बस्तीत वेदना, व कंडू उत्पन्न करितो. कधीं कधीं तर बस्तीस आपल्या स्थानापासून चाळवून वर उचलतो व तो गर्भाप्रमाणें मोठा झाल्यामुळें पोट गर्भिणीसारखें दिसतें. व तो तरंगल्यासारखा चंचळ होतो. व तेथें ( बस्तींत ) टोंचणी लागते. दाह होतो, ब-स्ति कांपतो, व पिळवटल्यासारखा होतो, थेंब थेंब मूत्र येतें व बस्ति दाबला अस-ता मात्र फार मूत्र येतें. या दोहोंस वातवस्ति असें ह्मणतात. पहिला प्रकार दुः-साध्य आहे व दुसरा फारच दुःसाध्य आहे, व त्यांत वायु प्रबळ असतो.

**मूत्रातीत** ( मा. नि. )—फार वेळ मूत्र कोंडून धरिलें असतां तें त्वरेनें बाहेर येत नाहीं, व कदाचित् आलें तर मग अडकत अडकत येतें. व वेदनाही फार नसते.

**मूत्रजठर** ( मा. नि. )—मूत्राचा वेग धरिला असतां त्यामुळें उत्पन्न झाले-ल्या उदावर्तास कारणीभूत असा अपानवायु कुपित होऊन फार पोट फुगवितो. बें-बीच्या खालीं ( ओटींत ) आध्मान उत्पन्न करितो. त्यात वेदना फार होतात.

**मूत्रजठर** ( वाग्भट )—निदान माधवासारखेंच आहे, परंतु अन्न न पच-णें, व मळाचा अवरोध, ही दोन लक्षणें जास्त असून, या विकारास मूत्रोदर असें नांव दिलें आहे.

**मूत्रोत्संग** ( मा. नि. )—प्रवृत्त झालेलें मूत्र बस्तीमध्यें अथवा शिश्नामध्यें अथवा शिश्नाच्या अग्रभागीं अडकून राहतें, आणि तें बळेंच कुंथून मुतलें असता वायूनें बस्ति फाडून जें मूत्र निघतें, तें हळु हळु, थोडें थोडें, तिडीक लागून अ-थवा तिडकेवांचून रक्तासहित स्रवतें. व विगुण (उलट्या) वायूपासून उत्पन्न होतें.

**मूत्रोत्संग** ( वाग्भट )—मूत्रवाहक छिद्रांच्या विकृतीमुळें ( त्यांत कोण-त्याही तऱ्हेनें मूत्राच्या गतीस हरकत आल्यामुळें ) बस्तींत, नळींत, किंवा मण्यात थोडथोडेंच आलेलें मूत्र राहून राहून काहीं कांहीं वेळानें हळुहळु स्रवतें व त्यावेळी तिडीक लागते किंवा लागतही नाहीं. व मूत्र अडकत अडकत होऊन काहीं शि-श्नांत शिलक राहतें. त्यामुळें शिश्न जड होतें.

**मूत्राक्षय** ( मा. नि. )—रुक्ष झालेल्या व म्लान देह झालेल्या अशा पुरुषाच्या बस्तींतले पित्त व वायु, मूत्राचा क्षय करितात. तेणेंकरून तिडीक, व जळजळ होतें.

**मूत्रक्षय** ( वाग्भट )—रुक्ष व थकलेल्या मनुष्याच्या बस्तींतील पित्त व वायु दाह आणि कळा यांनी युक्त असा मूत्राचा क्षय करितात.

**मूत्रग्रंथि लक्षण** ( मा. नि. )—बस्तीच्या तोंडामध्यें वाटोळी, स्थिर, लहानशी गोळी, अकस्मात् उत्पन्न होते. तिची पीडा मूतखड्यासारखीच होते.

**मूत्रशुक्र** (मा. नि.)—मुतावयास लागून स्त्रीसंग केला असतां वायु त्या शुक्राला उडवितो, तें स्थानापासून भ्रष्ट झालेलें शुक्र मुततांना पहिल्यानें किंवा मुतल्यानंतर प्रवृत्त होतें. तें पाण्यात भस्म कालविल्यासारखें दिसतें.

**उष्णवात** ( मा. नि. )—व्यायाम, अति मार्गगमन व ऊन लागल्यानें, या कारणांनीं कुपित झालेलें पित्त बस्तीत जाऊन वायूला मिळून बस्ति, मेंढ्र ( शिश्न ) आणि गुद यांचा दाह करितें, आणि हळद्वट, ताबूस, अथवा लाल अशा मूत्राचा स्राव वारंवार कष्टानें करितें.

**उष्णवात** ( वाग्भट )—निदान माधवाप्रमाणेंच असून, याशिवाय केव्हां नुस्तें रक्तच पडतें असें आहे.

**मूत्रासाद** ( मा. नि. )—पित्त किंवा कफ अथवा दोन्ही वायूनें घट्ट केलें तर पिंपळें, तांबडें, पांढरें, घट्ट असें मूत्र कष्टानें होतें, व मुततेवेळीं आग होते. तें जमिनीवर सुकलें म्हणजे गोरोचन, शंखाचें चूर्ण यांच्या रंगाचें अथवा सर्व रंगांचें असें मूत्र होतें.

**मूत्रासाद** ( वाग्भट )—निदान माधवाप्रमाणेंच असून मूत्र गोरोचन, शंख, किंवा चुना यांच्या रंगांचें होतें असें आहे.

**विड्विघात** ( मा. नि. )—रुक्ष आणि दुर्बळ, पुरुषाचें शकृत् ( मळ ) जेव्हां वायु ऊर फोडून आणितो, तेव्हां तें मूत्रमार्गात येतें. त्या वेळेस मनुष्य मुतूं लागला ह्मणजे कष्टानें मुततो. त्याच्या मूत्राला विष्ठेची घाण येते.

**बस्तिकुंडलिका** ( मा. नि. )—जलदी वाट चालल्यानें, लंघनानें, आयासानें, दगड, काठी, वगैरे लागल्यानें, रगडण्यानें, बस्ति स्वस्थान सोडून वर गेला असतां मोठा होऊन गर्भासारखा कठिण राहतो. तेणेंकरून शूळ, कापणें, आणि दाह, ही होतात. मुताचा एकेक बिंदु गळतो, जर बस्ति जोरानें पिळला तर मोठी धार उडते, बस्ति सुजतो व पेटक्यांची पीडा होते, हा शस्त्रासारखा विषतुल्य असा भयंकर आहे. यांत प्रायः वायु प्रबळ असतो. मंदबुद्धि वैद्यांस याचें निवारण करण्यास कठिण पडतें.

**साध्यासाध्यलक्षण** ( मा. नि. )—कफानें ज्याचें तोंड चोंदलें आहे असा व पित्तानें व्याप्त झाला असा, बस्ति साध्य होत नाहीं.ज्या बस्तीचें तोंड मोकळें आहे व जो कुंडलीकृत झालेला नाहीं तो साध्य होतो.कुंडलीभुताचें लक्षण—बस्ति कुंडलीभूत झाला असतां तृषा, मोह आणि श्वास हे होतात.

**सर्व मूत्राघातांवर उपाय**—मूत्रकृच्छ्र व मूत्राश्मरी यांजवर जीं औषधें सांगितलीं आहेत तीं देशकाल जाणणाऱ्या वैद्यांनीं सर्व मूत्राघातांवर योजावीं. (१) केळीच्या सोपाचें पाणी सुमारें ४ तोळे त्यांत पातळ केलेलें तूप एक तोळा घालून द्यावें; ह्मणजे त्वरित मूत मोकळें होतें. ( २ ) पळसाची फुलें शिजवून बस्तीवर बांधावी, आणि त्या शिजलेल्या फुलाचें पाणी सुमारें ३ तोळे घेऊन त्यांत २ मासेपर्यंत सोरा घालून पिण्यास द्यावें; ह्मणजे तावडतोब लघवी होईल. ( ३ ) पाण्यांतील शेवाळ आणून थोडा वेळ ओटीवर ( बस्तीवर ) ठेवावें; ह्मणजे लागलींच लघवी मोकळी होते यांत संशय नाहीं. ( ४ ) काकडीचें बीज एक तोळा घेऊन त्यांत थोडें सैंधव घालून कांजींत कालवून प्राशनार्थ द्यावें. ह्मणजे मूत्राघातापासून मुक्त होतो. (५) गोखरू, एरंडमूळ व शतावरी यांचा काढा साखर घालून वातापासून झालेल्या शूलयुक्त मूत्राघाताचा नाश करितो. (६) दशमुळाचा काढा शिलाजीत व साखर घालून द्यावा; ह्मणजे वातकुंडलिका, अष्ठीला व वात बस्ति यांचा नाश होतो.(७) लघुदेवनळ, कुश, काश व ऊंस यांचे मुळांचा काढा थंड करून साखर घालून द्यावा; ह्मणजे तिडीकयुक्त मूत्राघाताचा नाश होतो. (८) गोखरूचा काढा गुग्गुळ व शिलाजीत घालून द्यावा; ह्मणजे मूत्रक्षय, मूत्रशुक्र व मूत्रोत्संग यांपासून मुक्त होतो. ( ९ ) वायवर्णी, गोखरू व सुंठ यांचा काढा गूळ व यवक्षार घालून द्यावा; ह्मणजे मूत्रशर्करा, मूत्रावरोध व मूतखडा यांचा नाश होतो. ( १० ) भूयआंवळी, शतावरी व गोखरू यांच्या मुळाचा अंगरस ४ तोळे, २ गुंजा टांकणखार, एक मासा यवखार व २ मासे सोरा, ही सर्व औषधें एकजागीं करून दिली असतां मोठ्या दारुण मूत्राघाताचा नाश होईल. ( ११ ) तिळाच्या काड्यांचें भस्म दुधामध्यें कालवून मध घालून दिलें असता मूत्राघात त्यांत आग होत असली तरी त्याचा नाश होऊन मूत मोकळें होतें. ( १२ ) तांदुळाचें धुवणांत ताडाचें मूळ वांटून त्यामध्यें साखर घालून द्यावें, ह्मणजे मूत्राची उष्णता शमवितें. ( १३ ) कापराचे चूर्णाची फडक्यांत वात करून हळहळू शिश्नद्वारांत चालवावी आणि ठेवावी. ती मूत्र मोकळें करिते. ( १४ ) रिंगणीचा अंगरस ताकांत द्यावा. ( १५ ) रात्रीं केशर पाण्यांत भिजत घालून सकाळीं त्यामध्यें मध घालून कोंळून प्यावें; ह्मणजे मूत्राघाताचा नाश होतो. ( १६ ) शिलाजीत, साखर व अरतीकापूर, हीं एकजागीं करून खावी; ह्मणजे मूत्रजठर व मूत्रातीत यांचा नाश होतो. ( १७ ) गोखरू व धणे याचे काढ्यात किंवा कल्कात घृत सिद्ध करून द्यावें; ह्मणजे मूत्रकृच्छ्र, मूत्राघात व दारुण शुक्रदोष याचा नाश होतो. ( १८ ) मुळ्याचे पाल्याचे रसांत कलमी सोरा १ मासा, अरतीकापूर अर्धा मासा, खडीसाखर १ तोळा आणि ३ मासे काकडीचें बीं,

हीं एकत्र करून वांटून त्यामध्यें थोडें दूध व मध घालून द्यावें; म्हणजे मूत्र कोंडण्याचें भय दूर होऊन मूत्र साफ होऊं लागतें व मूत्राशयाची उष्णता निघून जाते. ( १९ ) रिठा व खारकेंतील बीं हीं समभाग पाण्यामध्यें उगाळून ओटी व लिंगाच्या सभोंवतीं त्याचा लेप देऊन शेकावें; म्हणजे सर्व विकार दूर होऊन लघवी साफ होते. (२०) धणे, दालचिनी व धमासा हीं औषधें समभाग घेऊन पावशेर दुधामध्यें वांटून त्यांत थोडासा भीमसेनी कापूर घालून त्याचा लेप बेंबीवर व ओटीवर लाविला असतां मूत्र त्वरित मोकळें होतें. व याच औषधामध्यें थोडीशी खडीसाखर घालून पोटांत घेतलें असतांही त्वरित गुण येतो. ( २१ ) लकडी रेवाचिनी, वावडिंग, धमासा, बाळहिरडे, वाळा, दालचिनी, बहाव्याचा मगज, चंदन, पित्तपापडा, गोखरू व लकड्या पाषाणभेद हीं सर्व औषधें समभाग ४ तोळे घेऊन त्याचा काढा करून त्यांत साखर घालून सेवन करावा; म्हणजे त्यापासून मूत्रकृच्छ्र (उन्हाळी) खर पडणें, मूत्र कोंडणें, हे विकार त्वरित नाश पावतात. व मूत्र साफ होतें यांत संशय नाहीं.

**मूत्राघातावर पथ्य**—स्नेह लावणें, घाम काढणें, रेचक, शेक, स्नान, जुन्या तांबड्या साळी, निर्जल देशांतील मांस, मद्य, ताक, दूध, दहीं, उडदाचा मंथ, जुना कोंहळा, पडवळ, शेंदाडें, खजूर, नारळ, ताडफळ, जुन्या गव्हाची पोळी, जोंधळ्याची भाकरी, मुगाचें व तुरीचें पातळ वरण, तांदुळजा, पोंकळा व पडवळ यांच्या भाज्या, आमसूल व आंवळकठी यांच्या चटण्या हीं पथ्यें होत.

**मूत्राघातावर अपथ्य**—विरुद्धान्न, उद्योग, मार्ग चालणें, रुक्ष, विदाही, विष्टंभी असे पदार्थ, मैथुन, मूत्रादिकांचा वेग धारण करणें, वमन इ० अपथ्यें जाणावीं.

---

# मूळव्याध ( अर्श ).

॥ पृथक्दोषैः समस्तैश्चशोणितात्सहजानिच ॥ अर्शांसिषट्प्रकाराणिविद्याद्गुदवलित्रये ॥

**अर्थ**—पृथक् दोषें करून ३, समस्त दोष मिळून १, रक्तापासून १, आणि सहज १, असे सहा प्रकारचे अर्श, ( मूळव्याध ) गुदाच्या तीन वळ्यांवर होतात. गुदाचे ठिकाणीं प्रवाहिणी, सर्जनी, आणि ग्राहिणी अशा तीन वळी आहेत.

**कर्मविपाक**—कर्कलग्नथिस्त सूर्य असून त्याजवर शनीची दृष्टि अशा समयीं जन्म झाला असतां अर्शोरोगी, निर्दय, कुष्टी, निर्लज्ज असा होतो. **परिहार**—सूर्यमंत्र जप, तिलार्कसमिधा यांनी हवन, गोप्रदान इत्यादि करावें.

**पूर्वकर्मविपाक**—वेदशास्त्र शिकविणें, वेदपूजा, हवन इत्यादि दुसऱ्याचें करितो अथवा गोहत्या करितो त्यास जन्मांतरीं अर्शोरोग होतो. **परिहार**—कृच्छ्रातिकृच्छ्र चांद्रायणें, पुरुषसूक्तजप, सूर्याचें अर्घ्यप्रदान, विष्णुहृदय अग्निवर्ण इ-

त्यादि सूक्तजप, घृतदान, हिरण्यदान, कुटुंबपर्यास, धनदान इत्यादि करावें याप्रमाणें दैविक प्रतिकार जाणावा.

**संप्राप्ति** [ मा. नि. ]—वातादिदोष, त्वचा, मांस, आणि मेद ह्यांना आणि त्या ठिकाणचे रक्ताला दूषित करून अपान ह्मणजे गुदस्थानीं आदि शब्दानें नासिकादिक घ्यावीं. त्या ठिकाणीं नानाप्रकारच्या आकृतीचे मांसाचे अंकुर उत्पन्न करितात. त्या अंकुरास अर्श [ मूळव्याध ] ह्मणतात.

**सामान्यरूप** [ वाग्भट ]—संक्षेपानें अर्शाचे प्रकार दोन आहेत—जन्मापासून झालेले व पुढें झालेले तसेच शुष्क व स्रावयुक्त [ ज्यांत रक्तस्राव असतो ]–मूलाच्या जो शेवटला साडेचार अंगुळें लांबीचा भाग त्यास गुद ह्मणतात. त्यांत दीड दीड बोटें लांबीच्या तीन वळ्या आहेत. त्यांत आंतील म्हणजे पहिली प्रवाहिणी, मधली म्हणजे दुसरी विसर्जनी व बाहेरली म्हणजे तिसरी संवर्णी व संवर्णीच्या बाहेर एक बोटावर दीड यव प्रमाणाचा गुदोष्ठ असतो व त्यापुढें केंस येतात.—त्यास सहज अर्शाचें कारण गर्भ उत्पन्न होते वेळीं वळीसंबंधी बीज दुष्ट होणें हें होय. व आईबापाचें अपथ्य सेवन आणि दैव या दोन कारणांनीं बीज दुष्ट होतें. व याच दोन कारणांनीं सन्निपाताचा कोप होतो. दुसरें कोणतेंही कारण नाहीं. यामुळें सहज अर्श असाध्य होत. व तसेंच कुलपरंपरा होणारे इतर रोग असाध्यच असतात.—सहजअर्श विशेषतः रुक्ष असून दृष्टि पडण्याला कठिण असतात. व त्यांचीं तोंडें आंत असून ते पांडुरवर्णाचे असतात व त्यांचे उपद्रवही भयंकर असतात.—वायूपासून व कफापासून होणारे अर्श शुष्क असतात. त्यांतून रक्तस्राव होत नाहीं. व रक्तापासून आणि पित्तापासून होणारे अर्श स्रावी असतात—मागें सांगितलेल्या दोषप्रकोपाच्या कारणांनीं अग्नि मंद झाला असतां व त्यामुळें मळाचा संचय किंवा खडा झाला असतां आणि अति मैथुन सेवन केल्यानें, गाडी, घोडा इत्यादिकांवर बसल्यानें, गुदास आघात झाला असतां, उंच, सखल व कठिण जागीं बसल्यानें, उकीडवें बसल्यानें, बस्तीची नळी, दगड, ढेंकूळ, जमीन वस्त्र इत्यादिकांचें गुदास घर्षण झाल्यानें, अत्यंत थंड पाण्याच्या स्पर्शानें, फार वेळ अतिशय कुंथल्यानें, वात, मूत्र व मळ यांचें वेग धारण केल्यानें किंवा बळेंच प्रवृत्त केल्यानें, ताप, गुल्म, अतिसार आमदोष, संग्रहणी, सूज व पांडुरोग यांनीं मनुष्य क्षीण झाल्यानें व शरीराचे वेडेवांकडे व्यापार केल्यानें व स्त्रियांस गर्भपात झाल्यानें व गर्भ वाढून त्याचा गुदावर दाब बसल्यानें इत्यादि व आणखी दुसरे कांहीं कारणांनीं अपानवायु कुपित होऊन गुदसंबंधीं वळीवर मल जमवितो. व त्यामुळें त्या आर्द्र झालेल्या वळीवर मोड उत्पन्न होतात.

**मूळव्याधीचें पूर्वरूप** ( वाग्भट )—अग्निमांद्य, पोट फुगणें, मांड्या गळाल्यासारखें होणें, पोटऱ्या वळणें, भ्रम, अंगग्लानी, डोळे सुजणें, रेच होणें, किंवा मलावरोध, अपमान वायु अतिशय कुंठित होऊन बहुधा नाभीच्या खालच्या भागीं

संचार करून मोठ्या कष्टानें व शब्द करीत गुदांतून बाहेर पडतो, व बाहेर पडतांना टोंचल्यासारखी व कातरल्यासारखी पीडा होते. आंतड्यांत कुरकुर शब्द होतो, पोटांत गुडगुडतें, मनुष्य कृश होतो, ढेंकरा फार येतात, मूत्र फार होतें, मळ थोडा होतो, अन्नावर वासना नसते. घशांतून वाफा निघतात, घशाशीं आंवट येतें, डोकें पाठ व ऊर यांत शूळ असतो, आळस येतो, वर्ण बदलतो, इंद्रियें निःशक्त होतात, फार फार येतो, उपचार दुःखकारक होतात, ग्रहणी, पांडुरोग गुल्म व उदर हे रोग होण्याची त्यास भीति वाटूं लागते. हीं लक्षणें होऊं लागलीं कीं, पुढें मूळव्याध होणार असें जाणावें.

**लक्षण** (वाग्भट)—गुदांत मोड होऊन त्यानें गुदमार्गाचा रोध केल्यामुळें, अपानवायु उलट होऊन सर्व इंद्रियें व शरीर यांस व्यापणारे दुसरे चार वायु मूत्र शकृत, पित्त, कफ, धातु व त्याचे आशय ( स्थानें ) यांस क्षुब्ध करून अग्नीस अगदीं मंद करितो. त्यामुळें मूळव्याध झालेला मनुष्य अतिशय कृश होतो. त्याचा उत्साह अगदीं नष्ट होतो, दीनवाणी, मांसहीन, निस्तेज व निर्बल होतो त्याची छाया नाहींशीं होते व तो रोगी कीड लागलेल्या झाडाप्रमाणें दिसतो, सर्व उपद्रवांनीं तो व्याप्त होतो, मर्मस्थानीं दाबल्यासारखी वेदना होते, तसेंच खोकला, तहान तोंडास वेचवपणा, श्वास, पडसें, क्लम, अंग मोडणें, वांति, शिंका, सूज, ताप, षढता, बहिरेपणा, तिमिररोग, मूत्रशर्करा व मूतखडा, या विकारांनीं तो ग्रस्त होतो. आवाज खोल जातो व बदलतो, चिंताग्रस्त होतो, वारंवार थुंकतो व अरुचि असते, सर्व संधी, हाडें, हृदय, नाभी, गुद व अडसंधी, यांत वेदना असते भाताचे पेजेसारखा गुदांतून चिकट स्राव होतो. कधीं शौच्यास साफ होतें, कधीं होत नाहीं. कोरडा किंवा ओला, पक्क किंवा आम, पांढरा किंवा पिंवळा, हिरवा किंवा लाल व चिकट असा वारंवार थांबून थांबून मळ होतो.

**सामान्य चिकित्सा**—अर्श, अतिसार व संग्रहणी हे विकार बहुतकरून एकमेकांच्या आश्रयानें होतात. हे अग्नि प्रदीप्त असतां होत नाहींत. ह्मणून विशेषंकरून अग्नि प्रदीप्त राहील अशी चिकित्सा करावी. मूळव्याधीला औषध क्षार, शस्त्र, आणि अग्नि याप्रमाणें चिकित्सा आहे. परंतु त्यांत औषध मुख्य आहे.—शस्त्रानें किंवा जळवांनीं सुजलेले व कठिण असे मोड त्यांचें संचित झालेलें रक्त वारंवार काढावें—जें वायूला अनुलोमन करितें. व जें अग्नीला वाढवितें असें अन्नपान व औषध योजावें.—स्नेह व घाम हीं वायूला, रेच पित्ताला, वांति कफाला, मिश्र दोषांवर मिश्र उपाय, व रक्तज अर्शाला पित्तासारखे उपाय करावे. ज्या मूळव्याधीमध्यें रेच व शौच इत्यादि होतात, त्यावर वातातिसारासारखी आणि बद्धकोष्ठ अर्शावर उदावर्तासारखी औषधक्रिया करावी. रक्त वाहणाऱ्या मूळव्याधीवर रक्तपित्तनाशक उपचार व बद्धकोष्ठ असेल तर बद्धकोष्ठावरील उपचार करावे.

**वातार्शाचें कारण** ( मा. नि. )—तुरट, तिखट, कडू, अतिरूक्ष, अतिशीत,

आणि अति [illegible] अशा पदार्थांचें सेवन, उशीरानें जेवणें, अल्पभोजन करणें, तीव्र मद्याचें पान करणें, अत्यंत मैथुन करणें, उपवास, थंडदेश, आणि काल ( हेमंतऋतु ) अत्यंत आयास करणें, शोक करणें, वाऱ्यांत व उन्हांत फिरणें हें वातजन्य अर्शाचें कारण आहे.

**वातार्शाचें लक्षण** ( मा. नि. )—वातादिक गुदांतले मोड ( अर्श ) सुके ( स्त्रावरहित ) चिमचिम वेदनेनें युक्त, निर्जीव, अरुण वर्ण, शामवर्ण, ताठर, बुळबुळीत नसणारे, वांकडे तिकडे, अणकुचीदार, कित्येकाचीं तोंडें भंगलेलीं, तोंडली, बोर, खारीक व देवकापशी यांच्या फळासारख्या आकृतीचे, कोणी कदंबाच्या पुष्पासारखे जाड व बारीक अनेक टोंकांचे, कोणी मोहऱ्या इतके बारीक असे असतात. त्यांच्या योगानें डोकें, बरगड्या, खांदे, कंबर, मांड्या, आणि अडसंधी हे फार दुखतात. व शिंका, ढेंकर, मळावरोध, हृदय जखडल्यासारखी वेदना, अरुचि, हीं होतात. आणि खोकला, श्वास व अन्न कधी चांगलें पचावें व कधीं पचूं नये, कानांमध्यें गुणगुण शब्द आणि भ्रम हीं होतात. त्या अर्शानें पीडित झालेल्या मनुष्यास दगडासारखा कठिण, थोडा, शब्दयुक्त, कुंथून, शूल, फेंस व चिकटा यांसह अडकत, अडकत थोडा मळ होतो. त्या मनुष्याचीं त्वचा, नखें, विष्ठा, मुत्र, डोळे, आणि तोंड हीं काळीं होतात. गुल्म, प्लीहोदर, अष्ठीला ह्या रोगांचा उपद्रव अर्शापासूनच होतो.

**वातार्शावर उपाय**—(१) जून पिकलेलीं अशीं रुईचीं पानें व पंच लवणें, हीं तेल व आंबट पदार्थ यांचे बरोबर जाळून त्यांचा क्षार, युक्तीनें काढून उन पाण्याशीं किंवा मद्याशीं प्यालें असतां अर्शरोगाला हितकारक आहे. ( २ ) जुन्या सुकलेल्या सुरणाचा रस त्यांत मिरीं, पिंपळी, सुंठ, चित्रक, उत्तम जिरें, हिंग, ओंवा व अजमोदा, हीं समभाग व सर्वांचा चौथा हिस्सा सैंधव घालून सुकवावें. नंतर निंबाचे रसाची भावना एक दिवस द्यावी. ह्मणजे हा सूरणमोदक सिद्ध झाला हा प्राण्याचा व्याधिनाश करण्याविषयीं श्रेष्ठ आहे, व शूल, संग्रहणी, अतिसार, प्रवाहिका, गुल्म, अर्श व वायूचा प्रकोप, यांचा नाश होतो आणि अग्नि प्रदीप्त होतो व बळ देतो. हा सुरणमोदक वैद्यानें रक्तपित्त, व गर्भिणी यांस देऊं नये. ( ३ ) सैंधव, चित्रक, इंद्रजव, बिडलोण, बेलफळ व कडूनिंब यांचें चूर्ण सुमारें सहा मासेपर्यंत चार तोळे दह्यांत मिश्र करून सेवन करावें याप्रमाणें सात दिवस केलें असतां वातार्शाचा नाश होतो यात संशय नाही.

**पित्तार्शाचें कारण** ( मा. नि. )—तिखट, आंबट, खारट आणि उष्ण असे पदार्थ, व्यायाम, अग्नीजवळ आणि उन्हांत बसणें, श्रम, उष्ण देश व काळ, क्रोध, मद्यपान, हेवा करणें, दाह करणारी तिखट, ऊन अशीं पानें, अन्न आणि औषधें हीं पित्तार्शाचें कारणें होत.

**पित्तार्शाचें लक्षण** [ मा. नि. ]—पित्ताधिक अर्शाचें मोड निळ्या अग्रा-

चे व त्यांचा रंग तांबडा, पिंवळा किंवा काळा असतो. त्यांच्या आंतून आंबूस घाण येते. ते बारीक, कोमळ आणि शिथील असतात. त्यांचा आकार पोपटाची जीभ, काळीज, आणि जळवांचीं तोंडें ह्यांसारखा असतो. त्यापासून आग, गुदपाक, ज्वर, स्वेद, तृषा, मूर्छा, अरुचि आणि मोह हीं होतात. आणि हात लाविला असतां कढत लागतात. ते जवासारखे मध्यें ठोसर असतात. आणि त्या रोग्याचे त्वचा, नख नेत्रादिक हिरवे, पिंवळे किंवा हळदीसारखे असतात.

**पित्तार्शावर उपाय**–( १ ) तीळ व बिबवे यांचा किंवा इंद्रजवाचा काढा मध घालून द्यावा. पथ्य—भात व मुगाचें वरण ह्मणजे पित्तार्श नाश पावतो. (२) बोलबद्धरस द्यावा. ( ३ ) धोत्र्याचें निबर झालेलें फळ पिंपळी, सुंठ, बाळहिरडे व वाळा यांचें चूर्ण रात्रीं ८ गुंजा, तूप १ तोळा, साखर ६ मासे, व ६ मासे मध, यांत मिश्र करून सेवन करावें. ( ४ ) तीळ, लाल राताळूचें बीज व नाकेशर यांचें चूर्ण जो साखरेशीं सेवन करील त्याला पित्तार्श कधींही होणार नाहीं. ( ५ ) तिळाचें चूर्ण, खडीसाखर, लोणी व नाकेशर, यांचा लेह सेवन केला असतां रक्तापासून अथवा पित्तापासून उत्पन्न झालेले मूळव्याधीचा नाश होतो.

**कफार्शाचें कारण** ( मा. नि. )–मधुर, स्निग्ध, शीत, खारट, आंबट आणि जड अशीं भोजनें, व्यायाम करणें, दिवसांस निजणें, सर्व काळ मऊ गादीवर बसण्याची आवड, पहाटेस पूर्वेचा वारा घेणें, थंड देश आणि थंड काळ, निष्काळजी असणें हें कफार्शाचें कारण होय.

**कफार्शाचें लक्षण** ( मा. नि. )—कफाधिक अर्शाचे मोड महामूल ह्म० दूर धातूप्रत जाणारे, कठिण, मंद पीडा करणारे, पांढरे, लांब लांब ,तुळतुळीत, ताठर, जड, गुदाला ओझें वाटणारे, स्थिर, बुळबुळीत, ओलसर, मण्याप्रमाणें गुळगुळीत, कंडू फार करणारे, ह्मणून त्यांना स्पर्श केला असतां गोड वाटतो. नेप्ती आणि फणस यांच्या आठोळीसारखे, गाईच्या सडासारखे, अडसंधीला जखडून टाकणारे, गुद, वस्ति आणि नाभी यांना ओढल्यासारखी पीडा करणारे आणि मेह, मूत्रकृच्छ्र, मस्तकाला जडत्व, शीतज्वर, यांना उत्पन्न करणारे, नपुंसकत्व अग्निमांद्य, ओकारी आणि अतिसारादिक करणारे वसा ( चरबी ) कफ यांनीं मिश्रित, असा पुष्कळ मळ पडणारे, प्रवाहिका उत्पन्न करणारे होत. त्यापासून क्लेद, रक्तादिक कांहीं स्रवत नाहीं. आणि ते बळकट पिळले असतां फुटत नाहीत. त्याच्या योगानें त्वचा, नखें नेत्रादिक पांढरीं व तुळतुळीत अशी होतात.

**कफार्शावर उपाय**—( १ ) गुदाचें व पार्श्वभागाचें जळवा लावून रक्त काढावें. आणि रुईच्या चिकांत औषधाचा लेप द्यावा. अथवा डाग द्यावा. ( २ ) ओली कडू भोंपळी कांजीत वांटून त्यांत गूळ घालून गुदाला लेप द्यावा; ह्मणजे मुळापासून मोड गळून पडतात. ( ३ ) सुरण, हळद, चित्रक, टांकणखार व गूळ, हीं

एकत्र वांटून कांजींत कालवून गुदाला लेप द्यावा; म्हणजे अर्शांचे मोठेही मोड असले तरी गळून पडतील.

**रक्तार्शाचें लक्षण** ( मा. नि. )--ज्यांत अधिक रक्त आहे असे अर्शाचे मोड पित्तार्शाच्या लक्षणांनीं युक्त असतात. वडाच्या अंकुरासारखे व गुंजेसारखे, कोणी पोंवळ्याच्या कांड्यासारखे असतात. ते जेव्हां कठिण मळानें अत्यंत दावले जातात, तेव्हां त्यांतून दुष्ट व ऊन ऊन रक्त अकस्मात् गळूं लागतें. तें रक्त फार वाहिलें ह्मणजे तो मनुष्य पर्जन्यकाळच्या बेडकासारखा पिंवळा होतो. आणि रक्तक्षयापासून झालेल्या दुःखांनीं ( त्वक्पारुष्यशिराशैथिल्यादिक ) पीडित होतो. त्याच्या शरीराचा वर्ण, स्थूलपणा आणि उत्साह हीं नष्ट होतात, शक्ति नाहींशी होते, डोळे गढूळ होतात, किंवा सर्व इंद्रियें व्याकुळ होतात. त्याला शामवर्ण, कठिण रुक्ष असा मळ होतो. आणि अपानवायु सरत नाहीं.—मूळव्याधीचें रक्त पातळ, अरुणवर्ण, आणि फेंसाळलेलें असें जर पडत असेल, आणि कंबर, मांड्या आणि गुद यांच्या ठिकाणीं शूळ होत असेल, व दुर्बळता फार झाली असेल, आणि त्यांत कांहीं रुक्ष हेतु पोंचला असेल तर त्या रक्तार्शांमध्यें वायूचा संबंध आहे असें जाणावें.—ज्यांत शिथिल, पांढरा व पिंवळा, स्नेहयुक्त व जड आणि शीतळ असा मळ होत असेल आणि जर मूळव्याधीचें रक्त दाट, तंतुयुक्त, पांढरें आणि बुळबुळीत पडत असेल; आणि गुद बुळबुळीत, दडस होत असेल, आणि गुरु, स्निग्ध असें कांहीं कारण झालें असेल तर त्या रक्तार्शास कफाचा संबंध आहे असें जाणावें. पित्ताचा अनुबंध कां सांगितला नाहीं, असें कोणी ह्मणेल तर त्याचें कारण सांगतों. रक्ताचीं व पित्ताची लक्षणें सारखींच आहेत.

**अन्यग्रंथाचें मत**—रक्ताची मूळव्याध होण्यापूर्वी कांहीं दिवस अशीं लक्षणें होतात कीं, मळद्वारांत एकादा कृमि चालत आहे असा भास होऊन अतिशय सुळसुळाट होतो व चैन पडत नाहीं असें कांहीं वेळ होतें. मळाबरोबर बारीक बारीक कृमि पडतात. असे कांहीं दिवस गेल्यावर गुदद्वारांत लहान लहान मोड उत्पन्न होऊन वाढूं लागतात, अथवा कांहीं न वाढतां तसेंच चामखिळीप्रमाणें गुदद्वारांत असून त्यांतून रक्तस्राव होऊं लागतो. स्राव होण्यापूर्वी कांहीं वेळ ते मोड ढेकूण चावल्याप्रमाणें आत टोंचत असतात. व ते मोड वाढून शौच्यासमयी बाहेर येत असतात. त्यांतून जसें गाईचें स्तन पिळलें म्हणजे जोरानें दुधाची धार पडते त्याप्रमाणें एकसारखें बारीक धारेनें रक्त स्रवत असतें अथवा थेंब देखील पडतात. या मोडास शौच्य-विधि झाल्यानंतर हातानें मळद्वारांत दाबावें लागतें. आणि उठून उभें राहतांच रक्त बंद होतें.

**रक्तार्शावर उपाय**—( १ ) गाईचे तुपांत अफू उगाळून त्याचा लेप मोडांस करावा, आणि लागलाच मनुष्याचें हाड तुपांत उगाळून त्याचा लेप अफूचे लेपावर द्यावा. याप्रमाणें ७ दिवसपर्यंत दररोज दोन वेळ लेप केल्यानें रक्त पड-

ण्याचें हटकून बंद होतें. ( २ ) चंदन, नाकेशर, जेष्ठीमध व वाळा यांचें चूर्ण तांदुळाच्या धुवणाबरोबर दोही सांज देत जावें; ह्मणजे ३ दिवसांत हटकून गुण येईल. ( ३ ) फार रक्तस्राव होत असून ठणका असल्यास ओंवा, इंद्रजव, वासनवेल, बेलकाचरी, सुंठ व रसांजन यांचें चूर्ण ताकांत देणें. ( ४ ) जवखार व डाळिंबाचा रस यांनीं सिद्ध केलेलें तूप द्यावें. ( ५ ) कमळाचें केशर साखरेबरोबर किंवा तीळ व लोणी यांत घेतलें असता रक्तार्शाचा हटकून नाश होतो. ( ६ ) कुचल्याच्या बिया शुद्ध करून त्यांचें चूर्ण करून ठेवावें व बलाबल पाहून थोडें थोडें साखरेशी द्यावें; ह्मणजे रक्तार्श, मोठा प्रमेह, त्वग्दोष आणि प्रमेह यांचा नाश होतो. (७) आवाळ्याचें बीज तांदुळाचे धुवणांत वांटून तो कल्क एक तोळा द्यावा. ( ८ ) कमळाचें केशर, मध, लोणी, साखर व नाकेशर, हीं सर्व समभाग घेऊन गोळी करून खावी. ( ९ ) सातूंचें पोटीस करून त्याची पिंडी करून तिला तूप लावून गुदावर बांधावी, ह्मणजे मोडांतून घाम जाऊन सुख होतें. ( १० ) राळ व शिरसाचें तेल यांची नित्य धुरी दिल्यानें रक्त बंद होतें. ( ११ ) आव्याची कोय वाळवून चूर्ण करावें. तें २ मासे चूर्ण मधांत किंवा जुन्या गुळांत देत जावें, ह्म० मूळव्याधीचा रक्तस्राव बंद होतो.

**रक्तार्शावर पथ्य**—साटक्या साळीचा भात, उडदाच्या सोलीव डाळीचें वरण, तूप, ताक, शेळीचें लोणी व गाईचें दूध, बाकी सर्व वर्ज करावें.

**रक्तार्शावर पथ्यापथ्य**—जें पथ्य किंवा अपथ्य रक्तपित्ती रोग्यांना सांगेल तें रक्तार्शरोग्याला विशेषेंकरून द्यावें.

**सन्निपातज व सहजार्शाचें लक्षण** ( मा. नि. )—वातादि अर्शांच्या लक्षणांनी सर्वात्मक ह्मणजे त्रिदोषज अर्शांची लक्षणें आणि सहज अर्शांचीं लक्षणें तरी तीच जाणावी कारण तीही त्रिदोषज आहेत.

**सुखसाध्यलक्षण** ( मा. नि. )—बाहेरल्या वळीवर झालेले एक दोषोल्बण आणि ज्यास एक वर्ष लोटलें नाहीं असे मोड सुखसाध्य होतात.

**कष्टसाध्यलक्षण** ( मा. नि. )—दोन दोषापांसून झालेले व दुसऱ्या वळीवर असणारे आणि ज्यांना एक वर्ष लोटलें आहे आणि जे बाह्य वळीवर असून द्विदोषोल्बण असतील आणि एक दोषोल्बण दुसऱ्या वळीवर झालेले असतील ते कष्टसाध्य जाणावे.

**असाध्यलक्षण** (मा. नि.)—सहज (जन्माबरोबर) झालेले त्रिदोषज आणि आंतल्या वळीवर होतात ते व ज्याचे हात, पाय, गुद, नाभी, मुख आणि वृषण याजवर सुज येते व हृदय आणि पार्श्वभाग दुखतात. इंद्रिय आणि मन यांस

---

वाळलेलीं बेलफळें.

मोह, ओकारी, अंगांत शूल, ज्वर, तृषा, गुदाचा दाह, हीं लक्षणें झालीं असतां रोगी असाध्य जाणावा. तसेंच तृषा अरुचि, शूळ, यानी पीडिलेला व ज्याचें रक्त फार स्रवलें आहे, आणि सूज, अतिसार, यांनी युक्त असा अर्शरोगी मरण पावतो.

**याप्यलक्षण** ( मा. नि. )—असाध्य मूळव्याध जरी असली तरी रोग्याचें आयुष्य बाकी असलें आणि तो चतुष्पाद, संपत्तीयुक्त असला ( वैद्य, औषध, परिचारक आणि रोगी हे जसे असावे तसे असले ) तर आणि त्या रोग्याचा अग्नि प्रदीप्त असला तर याप्य म्हणजे कांहीं शम पावतो. आणि या विपरीत असलेला रोगी सोडावा.

**सर्वार्शांवर उपाय**—प्रथम लेप नंतर धुरी व त्यानंतर पोटांत घेण्याचीं औषधें एकतंत्रानें सांगतों. ( १ ) कांडे निवडुंगाचा चीक व हाळद यांचा गोमूत्रांत खल करून तें मलम डबीत भरून ठेवावें. दिवसांतून एक दोन वेळ मोडांस लावीत जावें. व सुमारें सहा मासे चित्रकमुळाचें चूर्ण गाईच्या छटाक दुधांत घालून प्रातःकाळी सेवन करीत जावें, पथ्य दूधभात; ह्मणजे सात दिवसांत मूळव्याधीचा नाश होतो. ( २ ) हिराकस, कळलावी, कोष्ठ, सुंठ, पिपळी, सैंधव, मनशीळ, पांढऱ्या कण्हेराचें मूळ, वावडिंग, चित्रकमूळ, आडूळसा, दातीमूळ, कडू दोडक्याचें बीज, चोख ( पिसोळा ) व हरताळ, ही पंधरा औषधें प्रत्येक तोळा तोळा घेऊन कल्क करून तिळाचें तेल एक शेर घेऊन त्यात तो कल्क टाकावा. नंतर कांडे निवडुंगाचा चीक आठ तोळे व रुईचा चीक आठ तोळे त्या तेलांत घालावा. व तेलाचे चौपट गोमूत्र आंत घालून सर्व एकत्र करून मंदाग्नीनें तेल शेष राहितोंपर्यंत पक्क करून तें तेल गाळून ठेवावें. हें मूळव्याधीचे मोडांस सोमलादिक क्षार लावितात त्याप्रमाणें लावावें तेणेंकरून क्षाराचे लेपाप्रमाणें गुदाचे आंत तीन वळ्या आहेत त्यांना उपद्रव न होता मोड गळून पडून मूळव्याध दूर होते. (३) सैंधव व देवडांगरीचें बीज, ही समभाग कांजींत वाटून मूळव्याधीचे मोडांस लेप करावा; ह्मणजे ते मोड गळून पडतात. या लेपानें पर्वतही पडतील, मग मूळव्याधीचे मोडाची काय कथा. ( ४ ) शंख्यासोमल घेऊन तो निवडुंगाच्या कांड्यामध्यें भरावा आणि पुटपाकविधीनें पक्क करावा. नंतर आंतील सोमल युक्तीनें काढून घ्यावा. नंतर तो सोमल, रेवाचिनीचा शिरा, व कोष्ठ, हे तिन्ही समभाग घेऊन एकत्र करून पाण्यांत वांटून मूळव्याधीचे मोडांवर लेप केला असता मोड गळून पडतात. ( ५ ) रुईचा चीक, कांडे निवडुंगाचा चीक, कुटकी, कडू भोपळ्याचीं पानें, व करंजाचें बीज, हीं सर्व समभाग शेळीच्या मुतांत वांटून लेप केला असतां मोड गळून पडतात. ( ६ ) कडू भोपळ्याचीं पानें व गूळ कांजींत वांटून लेप करावा, ह्मणजे मूळव्याधीचा नाश होतो ( ७ ) हाळद, व कडू दोडक्याचें चूर्ण व सैंधव, ही औषधें निवडुंगाचे चिकात खलून गोमूत्राशी मोडांस लेप करावा, ह्मणजे हटकून मोड गळून पडतात. ( ८ ) रसकापूर, निंबूरसात उगाळून मोडांस लेप द्यावा व खळगा खणून त्यात बोरीचे कोळसे घालून त्यात विस्तव घालून शे-

कावें, ह्मणजे सात दिवसांत मूळव्याधीचा नाश होईल. ( ९ ) कांटे सेवरीची साल जाळून ती राख काळ्या गाईच्या लोण्यांत तांब्याचे परातींत तांब्याचे भांड्यानें खलून तें मलम डबींत भरून ठेवावें. तें मलम मोडास लावून नंतर बोरीच्या कोळशाचे अग्नीनें शेकावें. ( १० ) हाळद, सोमल, जवखार, व हिंगूळ ही औषधें समभाग पाण्यांत वाटून गोळी करून सोसेल तेथपर्यंत गुदांत ठेवावी. आणि दुधावर झांकण ठेवून अग्नीवर तापवावें व त्याचें झांकण काढून त्याची वाफ गुदास द्यावी. पथ्य—दूधभात. याप्रमाणें तीन दिवस केलें असतां मूळव्याधीचा नाश होतो. हा सिद्ध योग सांगितला आहे. ( ११ ) एरंडमूळ, देवदार, रास्ना, व जेष्टीमध, यांचें चूर्ण करून त्यांत एक भाग लोणी व सर्व औषधांच्या चौपट यवाचें पीठ घालून दुधांत मळावें व अग्नीवर भाकरीसारख भाजून ती पिंडी गुदावर ऊन अशी बांधावी, ह्मणजे शूळासहवर्तमान मूळव्याधीचा नाश होतो. ( १२ ) कणीक चार तोळे, हिंग दोन मासे व बिबवे ४ ही तिन्ही एकत्र कुटून गुदाला धुरी द्यावी ह्मणजे गुदशूल व सन्निपातोद्भव अर्श यांचा नाश होतो.

**सर्वाशांवर पोटांत घेण्याचीं औषधें**—( १ ) पांढरें कांदे बारीक चिरून सावलींत वाळवावे नंतर त्यांतील सुमारें एक तोळा कांदा तुपांत तळावा ह्मणजे चुरमुऱ्यासारखा फुलतो. नंतर त्यांत तिळाची पूड एक मासा आणि पिठीसाखर दोन मासे मिश्र करून नित्य सेवन करावें ह्मणजे सर्व प्रकारच्या मूळव्याधीचा नाश होतो ( २ ) गाईचें लोणी ३ तोळे, पाणी १० तोळे, खडीसाखर ३ तीन तोळे हें पाण्यांत घालून पाक करावा त्याचें सेवन करावें. पथ्य—ज्वारीची भाकरी, तुरीचे दाळीचें वरण व तूप. बाकी कांहीएक खाऊं नये. ( ३ ) उंबराचा डिक ३ तोळे व गाईचें तूप १ तोळा, दोन्हीं एकत्र करून वालप्रमाण गोळ्या करून दररोज एक अशा सात दिवस घ्याव्या. पथ्य—ज्वारीची भाकरी व तुरीचें वरण खावें. ( ४ ) गांठीचीं हळकुंडें २ तोळे व सोनामुखी २ तोळे यांचा अष्टमांश काढा करून साखर घालून घ्यावा. पथ्य—ज्वारीची भाकरी, गव्हाची पोळी, तुरीचें वरण व तूप. ( ५ ) हिरडेदळ २० तोळे, मिरीं, जिरें, पिपळी, पिपळमूळ, चवक व चित्रक हीं प्रत्येक चार चार तोळे, बिबवे ३२ तोळे, सुरण ६४ तोळे व जवखार ८ तोळे यांसर्वांच्या दुप्पट गूळ घालून गोळी करून द्यावी, ही कांकायनानें सांगितली. ही गुदरोगनाशक आहे. आणि जे अर्श, क्षार, अग्नि व शस्त्र यांनीं बरे होत नाहींत, ते या गोळीनें बरे होतात. ( ६ ) चित्रकमूळ ४ तोळे, सुरण ८ तोळे, सुंठ २ तोळे, मिरि ८ मासे, व बिबवे, पिपळमूळ, वावडिंग, त्रिफळा, पिपळी व तालीसपत्र, ही प्रत्येक एकेक तोळा व वृद्धदारु आठ तोळे, ताडमूळ १ तोळा, दालचि-

---

१—जमिनीस खळगा खणून त्यात बोरीच्या लाकडाचे निर्धूम कोळसे घालून त्यावर दुधाचें भांडें ठेवावें; नतर खळीवर एक फळी गुद बसेल, असें छिद्र केलेली ठेवावी. व त्या छिद्रावर गुद ठेवून वाफ घ्यावी सोसेल तितकी वाफ घ्यावी, याप्रमाणें पाच चार वेळ करावे.

नी व एलची ीं प्रत्येक ८ मासे, हीं सर्व एकत्र करून चूर्ण करावें. व चूर्णाच्या दुप्पट जुना गूळ घालून त्याचा मोदक करावा. हा सूरणमोदक एक तोळा दिला असतां तत्काळ मूळव्याधीचा नाश होतो. ( ७ ) विजयाचूर्ण द्यावें. ( ८ ) देवडांगरीच्या काढ्यांनी गुदप्रक्षालन करीत गेलें असतां किंवा देवडांगरीचा हिम करून घेतला असतां त्याला गुदांकुर मुळींच होणार नाहीत. (९) लहान पिकलेलीं केळीं १४ व हिंगूळ १ तोळा आंत घालून चौदा गोळ्या करून चौदा दिवस द्याव्या. ( १० ) ताकांत सैंधव घालून दररोज जितकें सेवन करवेल तितकें करीत जावें. या ताकासारखें दुसरें मूळव्याधीवर औषध नाहीं. कांहीं दिवसपर्यंत नुस्तें ताक पिऊनच राहील तर तो मूळव्याधीपासून मुक्त होईल. ताकानें मूळव्याध नाहीशी झालेली पुन्हां उद्भवणार नाहीं हा वैद्यशास्त्राचा सिद्धांत आहे. ( ११ ) चांगले बिब्बे घेऊन ते फोडून त्यांचें पाताळ यंत्रानें तेल काढावें. त्याच्या अष्टमाश मध दुप्पट तूप घालून दररोज बलाबल पाहून घेत जावें; ह्मणजे अग्नि प्रदीप्त होऊन प्रमेह, कृमि कुष्ठ, अर्श व मेदोविकार हे नाहीसे होतात.

**मूळव्याधीवर पथ्य**—विरेचन, रक्त काढणें, अग्नि व शस्त्र यांचा उपचार, जुन्या साटक्या साळीचा भात, कुळीथ, पडवळ, लसूण, गोडा सुरण, चाकवत, कवठ, लोणी, आंवळे, तूप, दूध, आमसूल, अलुबुखार, करडइची भाजी, पांढरा व तांबडा कांदा, काजू, गांजर, गाईचें व ह्मशीचें ताक, म्हशीचें व शेळीचें तूप, गाईचें दहीं, दूध, चणे, उडीद, जोंधळ्याची भाकर, कोंवळा मुळा, मेथीची भाजी, पांढरीं वांगीं, शेरणी, साखर, घोळ, शेपू, तोंडलें, धणे, तापवून निवालेलें पाणी, गोमूत्र तुरीचें व मृगाचें पातळ वरण, तांदुळजा, पोकळा, मुळ्याच्या शेंगा, आळवाची भाजी, घोसाळीं, पडवळ इत्यादि पथ्यें जाणावीं.

**मूळव्याधीवर अपथ्य**—मासे, दहीं, पीठ उडीद, पावटे, पांढरा भोपळा, पिकलेला आंबा, संपूर्ण विष्टंभ व जड पदार्थ, अतिजलपान, वमन, पूर्वेचा वारा, व मलमूत्रांचा अवरोध, स्त्रीसंग, पृष्टयान, उकडवें बसणें, तेल, वांगें, जागरण, दिवानिद्रा, गोवारी, पुरणाची पोळी, गूळ बाजरी, इत्यादि वर्ज करावें.

---

## मेदोरोग.

मेदो दोपस्तथाचैकः

**अर्थ**—मेदोरोग एक प्रकारचा आहे.

---

ज्या ठिकाणीं चागलें गवत उगवलें आहे आणि त्या ठिकाणीं जर नित्य ताक टाकीत गेलें तर तेथील सर्व गवत जळून जाऊन पुन्हा तेथें गवत उगवणार नाहीं

**कर्मविपाक**—जन्मलग्नापासून द्वादशभुवनीं शुक्र असेल तर, आळस, शरीरांत मेदोवृद्धि, सुख, भ्रष्टपणा, मिष्टान्न भोजन, स्त्रीपरतंत्रपणा इत्यादिक प्राप्त होतात. **परिहार**—शुक्राचीं दानें, जप, होम, इत्यादिक करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—दह्याची चोरी केली असतां मेदोरोग होतो. **परिहार**—दधिधेनूचें दान करावें.

**मेदाचें कारण व संप्राप्ती** ( मा. नि. )—व्यायाम न करणें, दिवसास निजणें, आणि कफकारक पदार्थांचें सेवन करणें, अशा रीतीनें वागणाऱ्या मनुष्याचा अन्नरस केवळ मधुर ह्मणजे आमरूप होऊन स्नेहानें मेद वाढतो. मेदानें मार्ग बंद झाला ह्मणजे अन्यधातु पुष्ट होत नाहीं आणि मेद सांचत जातो. म्हणून मेदस्वी पुरुष सर्व कर्माविषयीं अशक्त असतात.

**लक्षण** ( मा. नि. )—क्षुद्रश्वास, तृषा, मोहो, निद्रा, अकस्मात् श्वास कोंडणें, अंग ग्लानि, क्षुधा, घाम, व त्या घामाला दुर्गंधी येत असते, त्या मनुष्याची शक्ति कमी असते, मैथुनाविषयीं उत्साह नसतो, मेद हा सर्व प्राण्यांच्या उदरांत व अस्थीमध्यें असतो ह्मणून मेदस्वी पुरुषांच्या पोटांत मेद वाढून पोट गरोदर स्त्रीसारखें मोठें होतें.

**विशेषलक्षण** ( मा. नि. )—मेदानें मार्ग बंद झाल्यामुळें कोष्ठामध्यें वायूचा संचार विशेष होऊन तो अग्नीला पेटवितो. आणि खाल्लेला आहार शोषून टाकितो. त्यामुळें तो आहार लवकरच पचून पुन्हां जेवणाची इच्छा होते आणि जेवणाला कांहीं उशीर लागला ह्मणजे भयंकर विकार ( वातविकारांपैकीं ) होतात. हे अग्नि आणि वायु फारच उपद्रव करितात. जसा वणवा वन जाळून टाकतो त्याप्रमाणें हे त्या स्थूळ पुरुषाला जाळतात. अत्यंत मेद वाढला असतां अकस्मात् प्रमेहपिटिका, ज्वर, भगंदर, विद्रधि, वातरोग, ह्यांपैकीं एखादा भयंकर रोग उत्पन्न करून त्वरित जीवाचा नाश करितात.

**स्थूललक्षण** ( मा. नि. )—मेद आणि मांस अत्यंत वाढल्यामुळें त्या पुरुषाचे कुल्ले, पोट आणि स्तन हे चालतांना लटलट हालतात. त्याच्या शरीराची स्थूलता असावी तशी नसते. ह्मणजे भलताच अवयव लठ्ठ झाल्यामुळें बेढब दिसतो. व उत्साह ह्मणजे हुशारी नसते अशा मनुष्याला स्थूल ह्मणतात.

**मेदावर उपाय**—( १ ) त्रिफळा, त्रिकटू, तिळाचें तेल व सैंधव, हीं सर्व एकत्र करून सहा महिनेपर्यंत नित्य सेवन केलें असतां कफ, मेद व वायु यांचा नाश होतो. ( २ ) मैथुन, व्यायाम व चिंता हीं ज्याला स्थौल्य जावें अशी इच्छा असेल त्यानें क्रमेंकरून वाढवावीं, व झोंप कमी करीत जावी. ( ३ ) भाताचा मंड[1] उष्ण असा द्यावा. ( ४ ) मोचरस व समुद्रफेंस पाण्यांत खलून खूप

१—तांदुळाचे चौदापट पाणी घालून पेज निघते ती.

अंगास मर्दन करावें, ह्मणजे मेदानें अंगास दुर्गंध येतो त्याचा नाश होतो. (५) हिरडेदळ पाण्यांत भिजत घालून पाट्यावर चटणीसारखें वांटून अंगास मर्दन करावें नंतर स्नान करावें, ह्मणजे अंगाचा घाम शांत होतो, (६) बाभळीचा पाला पाण्यात वांटून अंगास चोळावा. नंतर हिरडेदळ पाण्यांत वांटून अंगास चोळावें. नंतर स्नान करावें, ह्मणजे घामापासून लवकर मुक्त होतो. (७) महा सुगंध तेलाचें अभ्यंग करावें. (८) त्रिफळा, त्रिकटू, चवक, चित्रक, बिडलोण, सोरा, बावंच्या, सैंधव व पादेलोण, या सर्वांचें समभाग चूर्ण सहा मासे व एक गुंज लोहभस्म तूप व मध यांत द्यावें, म्हणजे अति स्थूलता नाश पावते. अग्नि वृद्धि, मेद, मेह, कुष्ठ व कफरोग याचाही नाश होतो. याला कोणतेंही पथ्य नाहीं. (९) पारा, गंधक, ताम्रभस्म, हरताळ व रक्तचाबोळ, हीं सर्व समभाग रुईच्या चिकांत वांटून एक दिवस खल करावा, आणि दोन गुंजा माला मधांत देत जावी. हा वडवाग्निरस स्थौल्यनाशक आहे. याजवर थोडें मध व कोंबट पाणी एकत्र करून पीत जावें.

**मेदावर पथ्य**—चिंता, श्रम, जागरण, स्त्रीसंग, लंघन, सूर्यताप, हत्ती व घोड्यावर बसणें, फिरणें, रेचक, व अतृप्तिकर पदार्थ, हरीक, सावे, वऱ्या, यव, कुळीथ, हरबरे, मसुरा, मूग, तुरी, लाह्या, तिखट, कडू व तुरट हे रस, ह्मशीचें ताक, मद्य, भाजलेलें वांगें, संपूर्ण क्षार, पालेभाज्या, ओंवा, गरम पाणी, पिठीसाखर, गोडा सूरण, मध, तापवून थंड झालेलें पाणी, हीं पथ्यास द्यावीं.

**मेदावर अपथ्य**—स्नान, साळी, गहु, सुख, दूध, उसाचे रसाचे पदार्थ, उडीद, मासे, मांस, दिवसां झोंप घेणें, सुगंधी पदार्थ, मधुर अन्न, वमन, अळवड्या, दुधाची व गव्हाची खीर, गूळ, तूप, लोणी, वातुळकंद व बटाटे वगैरे, नवा गूळ, म्हशीचें लोणी, घाम, अति पचितान्न व वमन, हीं मेदावर अपथ्यें समजावीं.

---

## रक्तपित्त.

॥ रक्तपित्तंत्रिधाप्रोक्तमूर्ध्वगंकफसंगतम् ॥ अधोगंमारुताज्ज्ञेयंतद्द्वयेनद्विमार्गगम् ॥

**अर्थ**—रक्तपित्त तीन प्रकारचें, एक ऊर्ध्वगामी व एक अधोगामी आणि एक दोहोंमार्गानीं पडतें. त्यांत जें उर्ध्वगामी मुखादिकांवाटें पडतें तें कफसंबंधेंकरून अधोमार्गानी म्हणजे गुदादिकावाटें पडतें तें, वातसंबंधेंकरून, आणि दोहों मार्गांनीं पडतें तें कफवायूच्या संबंधेंकरून पडतें, असें तीन प्रकारचें रक्तपित्त जाणावें.

**कर्मविपाक**—जो मनुष्य मद्यपान करितो त्याला रक्तपित्तरोग होतो. **परिहार**—तुपाची घागर भरून त्याबरोबर मधाचा अर्धा घट भरून हिरण्यदान द्यावें. **प्रकार २ रा**—जन्मकाळी चंद्राचे क्षेत्री भौम असतो, तो रक्तपित्त व

अर्श अशा व्याधी उत्पन्न करितो. अथवा चंद्रामध्यें भौम आला असतां रक्तपित्त, ज्वर, दाह व वायु यांचा उपद्रव होतो. **परिहार**—मंगळाचा जप करावा. आणि खैराच्या समिधा, तीळ व तूप यांचा होम करावा. आणि लाल बैलदान करावें.

**रक्तपित्ताचें कारण** ( मा. नि. )—उन्हांत फार फिरणें, अति आयास करणें, अत्यंत शोक करणें, अति मार्ग चालणें, अति मैथुन करणें, मिरच्या आदिकरून, तिखट पदार्थ खाणें, विस्तवाजवळ बसणें, नवखारादि क्षार पदार्थ, मीठ वगैरे लवण पदार्थ, आंबट, तिखट, पदार्थ इत्यादिकांनी कुपित झालेलें पित्त आपल्या तीक्ष्ण, द्रव, पूति इ० गुणांनीं झटकन रक्ताला तापवितें. तदनंतर तें रक्त ऊर्ध्वमार्गानें किंवा अधोमार्गानें अथवा दोहोंमार्गांनी प्रवृत्त होतें. ऊर्ध्वमार्ग ह्मणजे नाक, डोळे,कान आणि तोंड,यांपासून वाहतें. अधोमार्ग म्हणजे शिश्न,योनि,आणि गुद यांवाटें वाहतें. आणि तें फार कुपित झालें तर सर्व रोमरंध्रांतूनही वाहूं लागतें.

**पूर्वरूप** ( मा. नि. )—ग्लानि, शीत पदार्थाची इच्छा, घशापासून धूर निघाल्यासारखें वाटणें, वांति आणि तापविलेल्या लोखंडावर पाणी ओतलें असतां जसा वास येतो तसा वास त्याच्या श्वासाला येतो. ही लक्षणें रक्तपित्त होण्याचे पूर्वी होतात.

**पूर्वरूप** ( वाग्भट )—डोकें जड होणें, अरुचि, थंडाची इच्छा, घशाची फार फार जळजळ होणें, आंबट ढेकरा येणें, वांति होणें, वांति पाहिली असतां फारच किळस येणें, खोकला, दमा, ग्लानि, तोंडास लोखंड, रक्त व मांसें यांसारखीं किंवा आंबूस घाण येणें, शब्द क्षीण होणें, डोळे, त्वचा, मळ, मूत्र, नखें इत्यादिकांस तांबडा, पिपळा, हिरवा रंग येणें, निळा, लाल, पिवळा हे रंग ओळखतां न येणें, व स्वप्नांत त्या वर्णाचे पदार्थ दिसणें, हीं लक्षणें रक्तपित्त होण्याचे पूर्वी होतात.

**रक्तपित्ताचे उपद्रव** ( मा. नि. )—अशक्तता, श्वास, खोकला, ताप, ओकारी, धोत्रा खाऊन जसा कैफ, शरीरास पांडुरवर्ण, दाह, मूर्छा, अन्न खाल्लें असता अत्यंत दाह होणें, धैर्य खचणें, सर्वकाळ हृदयाचेठायीं विलक्षण पीडा, तहान, कोष्ठाचा भेद, म्हणजे मळ पातळ होणें, मस्तकाचा संताप, दुर्गंधयुक्त थुंका, अन्नद्वेष, आहाराचा परिपाक न होणें, हें रक्तपित्ताचे उपद्रव होतात. आणि तशीच त्याची विकृतीही होते.

**साध्यासाध्य विचार** ( मा. नि. )—ऊर्ध्व रक्तपित्त साध्य, कारण तें कफ संसृष्ट असतें म्हणून त्यावर कषाय तिक्त रस, कफपित्तहर योग होतात. अधोगत रक्तपित्त याप्य आहे. कारण पित्तहरणाविषयीं विरेचन हें प्रधान आहे. आणि यावर तर वातपित्तशमन करणारा एकटाच मधुररस आहे. वमन दिलें तर

विरुद्ध मार्गीय आहे ह्मणून वेग मात्र बंद करील, परंतु पित्तहरण करणार नाहीं.—उभयमार्गी रक्तपित्त असाध्य आहे. कारण त्यावर विरुद्ध चिकित्सा करावी लागते. बलवान पुरुषाचें एक मार्ग ह्मणजे ऊर्ध्वगत ज्याला अति वेग नाहीं, नवीन झालेलें, हेमंत व शिशिरऋतूंत झालेलें आणि दौर्बल्यादि उपद्रवरहित असें रक्तपित्त साध्य होतें. एक दोषज साध्य, द्विदोषज याप्य, आणि त्रिदोषज असाध्य होतें. मंदाग्नि, व्याधीनें अतिक्षीण झालेला, वृद्ध व अन्न तुटलेला अशा पुरुषाचें अतिवेगाचें रक्तपित्त साध्य होत नाहीं.

**असाध्य लक्षण** ( मा. नि. )—ज्याला वारंवार तांबड्या रंगाच्या ओकाऱ्या येतात, डोळे रक्ताप्रमाणें लाल होतात. ढेकर किंवा गर्दड येते तीही लाल येत, असा रोगी मरण पावतो. जें रक्तपित्त, मांस धुतलेल्या पाण्यासारखें किंवा सडल्यासारखें अथवा चिखलानें गढूळ आलेल्या पाण्यासारखें, किंवा चिखलासारखें व पाण्यासारखें, तसेंच जें मेद, पू आणि रक्त यासारखें, काळजाच्या तुकड्यासारखें, पिकलेल्या जांभळासारखें, काळ्या रंगाचें व इंद्रधनुष्याच्या रंगाप्रमाणें, नानातऱ्हेच्या रंगांचें असतें, तेंही असाध्य जाणावें. त्यावर वैद्यांनें उपाय करूं नये.

**रक्तपित्तशास्त्रार्थ**—ऊर्ध्व रक्तपित्ताला रेच, अधोगताला वमन द्यावें. बळकट मनुष्याचें रक्तपित्त प्रथमतः शमवूं नये. जर होतांक्षणीच शमविलें तर, हृद्रोग, पांडु, संग्रहणी, प्लीहा, गुल्म व उदर हे रोग उत्पन्न होतात. ज्याचें मांस आणि बल क्षीण आहे व जो बाल व वृद्ध, ज्यास शोषाचा उपद्रव आहे व जो वमन किंवा विरेचनास योग्य नाही अशा मनुष्याच्या रक्तपित्तावर शामक औषधांनीं उपचार करावा. रक्तपित्तावर थंड दूध, जंगलांतील पशूंचें मांसरस, वाटाणे, साटक्या साळीचा मंड व जेवढीं ह्मणून पित्तनाशक औषधें आहेत तेवढी हितावह आहेत.

**वातज रक्तपित्त** ( मा. नि. )—नील व अरुण वर्ण, किंचित् फेंसयुक्त, पातळ आणि रुक्ष असें असतें. **उपाय**—[१] शतावरी, चिकणामूळ, रास्ना, शिवण व फालसा यांचा काढा साखर घालून द्यावा. तो शूलासहित रक्तपित्त याचा नाश करील

**पित्तजरक्तपित्त** ( मा. नि. )—भगव्या रंगासारखें, काळें, गोमूत्रासारखें, किंवा मृदंगाच्या शाईसारखें, किंवा घेरोशासारखें अथवा सुर्म्यासारखें काळें असतें. **उपाय**—( १ ) त्रिफळा व बहाव्याचा मगज याचा काढा साखर व मध घालून द्यावा. तो सर्व प्रकारचें रक्तपित्त, दाह व पित्तशूल यांचा नाश करितो.

**कफजरक्तपित्त** ( मा. नि. )—रक्त दाट व किंचित् पाडूर वर्ण, सस्नेह व कफमिश्रित असें होतें. **उपाय**—( १ ) हिरडेदळाचें चूर्ण मधांत दिलें असतां पाचक, दीपक, व कफजरक्तपित्त, शूल व अतिसार याचा नाश होतो. ( २ ) शेळीचे दुधात केशर शिजवून प्यावें आणि शेळीचे दुधाबरोबर भात खावा; ह्मणजे ऊर्ध्वरक्तपित्त बंद होतें.

**द्वंद्वजरक्तपित्त** ( मा. नि. )—दोन दोषांचीं लक्षणें असलीं ह्मणजे द्वंद्वज आणि तीन दोषांचीं लक्षणें असलीं ह्मणजे त्रिदोषज जाणावें.

**सर्व प्रकारचे रक्तपित्तांवर उपाय**—( १ ) कामदेव घृत योजावें ( २ ) दूर्वा, कमळाचें केशर, मंजिष्ठ, वाळा, हरीतकी, लोध्र, काळावाळा, नागरमोथे, चंदन व पद्मकाष्ठहीं औषधे तोळा तोळा घेऊन त्यांचा पाण्यांत कल्क करावा व त्यात तूप ६४ तोळे व तांदुळाचें धुवण, शेळीचें दूध हें चौपट आंत घालून मंदाग्नीनें तूप शेष राहितोंपर्यंत पक्व करावें. तें प्राशन केलें असता रक्ताची वांति, नाक, कान व डोळे यांतून जाणारें रक्त व पू व शिश्न, गुद यापासून जाणारें रक्तपित्त बंद करितें व सर्व रोमकूपापासून रक्त स्रवत असल्यास या तुपाचें प्राशन व अभ्यंग करावें. हें सर्व रक्तपित्तावर देण्यास श्रेष्ठ आहे. ( ३ ) वाळा, चंदन, काळा वाळा, नागरमोथे व पित्तपापडा यांचा काढा साखर घालून किंवा यांचें चाहासारखें पाणी कढवून तें थंड करून त्यांत साखर घालून पिण्यास देत जावें; ह्मणजे तहान शमते. ( ४ ) उंबरांचीं पिकलेलीं फळें गुळाबरोबर किंवा मधाबरोबर सेवन केलीं असता नाकातून पडणारें रक्त बंद होतें. (५) पिपळाचे पानांचा रस १ भाग, रक्तचाबोळ ६ भाग व त्याचे दुप्पट मध घालून गोळी करून ठेवावी व बलावल पाहून मधाशी सेवन करीत जावी; ह्म० रक्ताचा प्रवाह किंवा हृदयांत सांचलेलें रक्त वारा जसा मेघास दूर करितो याप्रमाणें दूर करितो. (६) गाईचें किंवा शेळीचें दूध गोखरू व शतावरी यांचें चूर्ण आंत घालून तापवून शीत करून द्यावें. (७) दुधांत लाखेचें चूर्ण मध घालून प्यावें. तें जिरल्यावर दूधात मद्य घालून प्यावें, ह्म० तात्काळ क्षतापासून निघणारें रक्त बंद करील. ( ८ ) आडूळशाचा रस समभाग मध घालून प्रातःकाळीं जर प्राशन करील तर दारुणही रक्तपित्त लवकर शांत होईल. ( ९ ) वाळा, कमळ, लोध्र, धणे, रक्तचंदन, जेष्ठीमध, गुळवेल, काळावाळा व आडूळसा, याचा काढा मध व साखर घालून द्यावा, म्हणजे उग्र रक्तपित्त, तृषा, दाह आणि ज्वर यांचा नाश होतो. ( १० ) मूग, साळीच्या लाह्या, सातु, पिपळी, वाळा, नागरमोथे, चंदन व चिकणा, ही औषधें पूर्व दिवशी पाण्यात भिजत घालून दुसरे दिवशी काढा करून त्यांत साखर घालून द्यावा. ( ११ ) जेष्ठीमधेचा काढा शेळीच्या किंवा गाईच्या दुधात करून थंड झाल्यावर मध व साखर घालून द्यावा. ( १२ ) पळसाचे फुलाचा काढा साखर घालून द्यावा. ( १३ ) मनुका, चंदन, लोध्र व कुटकी, याचे चूर्ण मध व आडूळशाचा रस यात द्यावें, म्हणजे नाक, तोंड, शिश्न, गुद व योनी यापासून जाणारें रक्त, स्रवणारें रक्तपित्त, व्रणापासून निघणारें रक्त, याला बंद करितें. किंवा शिश्नापासून रक्त वाहूं लागलें असतां या औषधाचा उत्तरबस्ति द्यावा; ह्मणजे रक्त बंद होतें. ( १४ ) पत्रकादि चूर्ण द्यावें. ( १५ ) कर्पूरादि चूर्ण द्यावें. ( १६ ) आडूळशाची पानें वांटून पुटपाकानें उकडून रस काढून थंड झाल्यावर मध व साखर घालून द्यावा, ह्मणजे रक्तपित्त, खोकला, ज्वर व क्षय यांचा नाश होतो. ( १७ ) एलादि गुटी द्यावी. ( १८ ) मस्तकाचे केंस

काढून आंवळकठीचा कल्क थंड पाण्यांत करून त्याचा सहस्रधौत घृताचा लेप मस्तकावर करावा. (१९.) डाळिंबाचीं फुलें किंवा दूर्वा अथवा आंब्याची कोय किंवा कांद्याचा रस किंवा नुसतें थंड पाणी यांपैकी एकाचें नस्य दिलें असतां नाकांतून पडणारें रक्त बंद होतें. (२०) नागरमोथे, इंद्रजव, जेष्ठीमध, व गेळफळ, यांचें चूर्ण करून दुधांत मिळवून त्यांत मध घालून तें वांति होण्याविषयीं द्यावें. (२१) वहावा व आंवळकठी अथवा तेड व हिरडा, यांचा काढा मध व साखर घालून रेचनार्थ द्यावा. (२२) शरीरात रक्ताच्या गांठी बनल्या असल्यास मधाबरोबर पारव्याची विष्ठा खावी. (२३) महाळुंगाचीं मुळें किंवा फुलें तांदुळाच्या धुवणांत वांटून त्यांत साखर घालून प्यावी. (२४) गाईचे शेणाचा अथवा घोड्याचे लेंड्याचा रस मध व तूप घालून द्यावा. (२५) लोहभस्म व कांतभस्म यांचें कोरडेंच नस्य द्यावें. (२६) ज्याचे अंगांतून फार रक्त गेलें असेल त्यानें मधाबरोबर केंशर, चाटावें. (२७) तृषा लागल्यास लाह्यांचें पीठ, तूप व मध, घालून द्यावें. (२८) नागरमोथे, पित्तपापडा, कमळाक्ष, मलयागर, शतावरी, जायपत्री, जेष्ठीमध, पेरूची साल, काळा वाळा व रक्तचंदन, यांचा काढा साखर घालून द्यावा.

**रक्तपित्तावर पथ्य**—जुन्या साटक्या साळी, सावे, वऱ्या, यव, मूग, मसुरा, जुने गहूं, चणे, तुरी, ससा, हरीण, पारवा व मेंढ्याचीं मांसें, तुरट पदार्थ, गाईचें व शेळीचें तूप, दूध, म्हशीचें तूप, चारोळ्या, केळें, तांदुळजा, पडवळ, ताडफळ, डाळिंब, खजूर, आंवळे, नारळ, शिंगाडे, कवठ, दुध्या भोपळा, लाह्या, द्राक्षें, साखर, मध, ऊंस, थंड पाणी, झऱ्याचें पाणी, पाण्यात बुड्या मारणें, शतधौतघृताचें अभ्यंग, शीतळ उटणें, थंड वारा, चंदन, चांदणें, रेशमाचें वस्त्र, शीतल बगीचे, परवरें तळ्याचें पाणी, तापवून निवालेलें पाणी, ताजें पाणी, फणस, बेदाणा, बोरें, भोपळा, मटक्या, नाचण्या, नारळ, साखरनिंबू, मेथीची भाजी, आळू, दुधाची खीर, नारळाची खीर, चण्याच्या पाटवड्या, खडीसाखर, लाखेचें वरण, अंजीर, कारलें, पांढरा कांदा, कालें, कोबी, खारीक, खिरण्या, चाकवत, तूप, तोंडलीं, म्हशीचें दही, काळी द्राक्षें, चाकवत, घोळ, शेपू, दोडके, राळे, व मुखढाळ, मध, करवंद, कोहळा, तालीमखाना, म्हशीचें तूप, तवकीर, कबाबचिनी, पिस्ते, तांबडा भोपळा, सफेत मुसळी, पिठीसाखर, सालंमिश्री, गाईचें व शेळीचें दूध, गाईचें लोणी हे पदार्थ पथ्यास द्यावे.

**रक्तपित्तावर अपथ्य**—व्यायाम, मार्ग चालणें, सूर्यताप, उग्रकर्म, मलमूत्रादिकांच्या वेगाचें धारण, चपलता, हत्ती व घोड्यावर बसणें, घाम काढणें, धूमपान, मैथुन, क्रोध, वांगी, तीळ, मोहऱ्या, दही, दूध, विहिरींचें पाणी, तांबूल, सांचलेलें पाणी, मद्य, लसूण, शिंबीधान्य, विरुद्धाशन, तिखट, आंबट, मीठ व दाह करणारे पदार्थ, उडदाचे व मुगाचे पापड, पांढरा कांदा, लसूण, गांजर, नवा

गूळ, तिळाचें तेल, करडईचें तेल, कुळीथ, फुटाणे, पावटे, वाल, चवळ्या, मासे, उडीद, इत्यादि पदार्थ सेवन करूं नये.

---

## वातरक्त ( रक्तपिती ) महारोग.

॥ वाताधिक्येनपित्ताच्चकफाद्दोषत्रयेणच ॥ रक्ताधिक्येनदोषाणांद्वंद्वेनत्रिविधःस्मृतः ॥ वातरक्तंतथाष्टधा ॥

**अर्थ**—वातरक्त आठ प्रकारचें—वातजवातरक्त, पित्तजवातरक्त, कफजवातरक्त, त्रिदोषजवातरक्त, व रक्ताचे आधिक्येंकरून होतें तें रक्तज, दोहों दोषांपासून होतें तें द्वंद्वज तीन प्रकारचें एकूण आठ प्रकारचें, वातरक्त जाणावें.

**कर्मविपाक**—जन्मकाळीं दशमस्थानीं मंगल असून त्यावर शनीची दृष्टि असली, तर तो पुरुष वातरक्तरोगी होतो. **परिहार**—शनीची व मंगळाचीं दानें व जप करावा.

**वातरक्ताचें कारण** ( मा. नि. )—मीठ, आंबट, तिखट, क्षार, स्निग्ध, उष्ण, अपक्क, अशा भोजनांनीं, व मत्स्यादिक, हंस, कारंडव, चक्रवाकादि पक्षी यांचें मांस, व पेंड, मुळे, कुळीथ, पावटे, उडीद, वाल आदिकरून शिंबीधान्यें, भाज्या, भाजलेल्या तिळाची कोंद, उंसाचा रस, दहीं, कांजी, आंबलेली पेज, आंबलेलें शिळें अन्न, ताक, सुरा, मद्य, विरुद्धान्न, व अध्यशन इत्यादि पदार्थांचे सेवनानें क्रोध, दिवसांस निद्रा, रात्रौ जागरण, या कारणांनीं प्रायः सुकुमार पुरुष व मिथ्या आहार व विहार याला करणारा, स्थूल व सुखी अशा मनुष्याचें रक्त कुपित होऊन वातरक्त रोग होतो.

**संप्राप्ति** ( मा. नि. )—हत्ती, घोडे, उंट यांवर बसून जाणारा, ( हे वायूच्या वृद्धीविषयीं आणि विशेषेंकरून रक्ताला खाली उतरण्याला कारण आहेत. ) विदाहकारी अन्न खाणारा, ( यानें देखील रक्ताची वृद्धि होते. ) ऊन ऊन असें अन्न खाणारा, अशा पुरुषाच्या शरीरांतलें सर्व रक्त नासून पायात सांचतें. आणि तें दुष्ट वायूनें दूपित करून मिश्र होतें. त्यांत वायु प्रबळ असतो. ह्मणून या रोगाला वातरक्त असें ह्मणतात.

**पूर्वरूप** ( मा, नि. )—घाम फार येतो अथवा येत नाहीं, शरीराला काळेपणा, अंग मेहरतें, क्षत झालें असलें तर ठणका फार लागतो, सांधे ढिले होतात, आळस येतो, ग्लानि, अंगावर पुळ्या उठतात, गुडघे, जंघा, मांड्या. कंबर, खांदे, हात, पाय आणि अंगाचे सांधे याच्या ठिकाणी सुया टोंचल्याप्रमाणें पीडा, फुरफुरणें, फोडल्यासारखी पीडा, जडत्व आणि बहिरेपणा ही होतात. आणि सांध्याच्या ठि-

काणीं कंडू सुटतो. आणि शूळ होऊन वारंवार नाहींसा होतो, शरीर विवर्ण होतें, मंडळें उठतात, हीं लक्षणें झालीं असतां पुढें वातरक्त व्हावयाचें असें जाणावें.

**वाताधिक वातरक्त** ( मा. नि. )--यांत शूळ, स्फुरण, आणि टोंचल्याप्रमाणें पीडा हीं अधिक होतात. सूज, रुक्षता, काळेपणा, किंवा शामवर्णता या लक्षणांची वृद्धि होते. क्षणांत ऱ्हास होतो, धमन्या आणि बोटांचे सांधे आंखडतात. ह्मणजे आकुंचित होतात, अंगग्रह होतो, अत्यंत वेदना होतात, शीताचा द्वेष होतो, आणि शीतसेवनानें दुःख होतें, ताठा, कंप, आणि मेहरी, या होतात.

**पित्ताधिक वातरक्त** ( मा. नि. )—अत्यंत दाह, इंद्रिय मनोमोह, स्वेद, मूर्च्छा, उन्मत्तता, तहान, स्पर्श सहन न होणें, पीडा, आरक्तता, सूज, बारीक बारीक पिंवळे फोड, आणि अत्यंत उष्णता हीं लक्षणें होतात.

**कफाधिक वातरक्त** (मा. नि.)—ओलसरपणा, जडत्व, मेहरी, तुळतुळीतपणा, शैत्य, कंडू, आणि मंद पीडा, ही लक्षणें होतात.

**द्वंद्वज व त्रिदोषज वातरक्त** ( मा. नि. )--दोन दोषांच्या लक्षणांनीं द्विदोषज व ३ दोषांच्या लक्षणांनी त्रिदोषज जाणावें.

**रक्ताधिक वातरक्त** (मा. नि.)—यांत सुजेला अत्यंत वेदना, व त्यांतून तावडा क्लेद वाहतो, सुजेला चिमचिम वेदना लागतात. स्निग्ध किंवा रुक्ष पदार्थांनी शम होत नाही व सुजेला कंडू व पाणी सुटतें.

**विशेष लक्षण** ( मा. नि. )—तें वातरक्त पायांच्या मुळाला होऊन कदाचित् हातावरही होतें. तें कोपलें ह्मणजे उंदराच्या विषाप्रमाणें सर्व देहावर हळुहळु पसरतें. हें वातरक्त चरकानें २ प्रकारचें सांगितलें आहे तें असें—एक उत्तान आणि दुसरें गंभीर, त्वक् आणि मांस यांचा आश्रय करून जें होतें ते उत्तान होय. व गंभीर असतें तें याहीपेक्षां खोल गेलेलें असतें.

**साध्य लक्षण** ( मा. नि. )---वातरक्त होऊन एक वर्ष झालें नाही व त्याजवर चिरा वगैरे पडल्या नाहीत व एकच दोषांनी युक्त व ज्यांत मुळीच कांहीं दुसरे उपद्रव नाहींत, तें मात्र सुखानें साध्य होतें.

**असाध्य लक्षण** (मा. नि.)-गुडघ्यांपर्यंत गेलेलें, फुटलेलें ह्मणजे ज्यावरची त्वचा निघालेली असें, चिरा पडलेलें, आंतून लस वाहणारें, प्राण, मांस, क्षयादि उपद्रवांनीं जें युक्त असतें तें असाध्य; तसेंच निद्रानाश, अरुचि, श्वास, मास सडणें, मस्तक जखडणें, इंद्रिय मनोमोह, अत्यंत पीडा, तहान, ज्वर, मोह, कंप, उचकी, पागळेपणा, विसाव, पिकणें, टोंचल्यासारखी पीडा, भ्रम, अनायासे श्रम, बोटें वांकडीं होणें, फोड, आग, मर्मग्रह, गांठी होणें, मोहानें युक्त, तें असाध्य जाणावें. ज्या वातरक्तात सगळे उपद्रव झाले नाहीत तें मोठ्या कष्टानें साध्य होतें व त्रिदोषज व उपद्रव युक्त जें असलेलें तें असाध्य जाणावें.

**सर्व वातरक्तांवर उपाय**—वातरक्तानें पीडित रोग्याला पूर्वी स्निग्ध करून चांगलें रेचन द्यावें. नंतर रोग्याचें बलाबल व दोष पाहून शरीरातील दुष्ट रक्त वारंवार थोडें थोडें काढावें, आणि वायूचें संरक्षण करावें. अंगाचा उग्र दाह व ठणका होऊं लागला असतां त्यास जळवा लावून रक्त काढावें. चिमचिम असा शब्द, कंडू,ठणका व वेदना यांनीं युक्त असेल तर तुंबडी लावून रक्त काढावें. हें रक्त न काढलें तर गुप्त शिरामार्गानें किंवा मर्मांगानें ज्या जागचें त्या जागेंत जातें. अंगग्लान किंवा रुक्ष अ० वाताधिक जें वातरक्त त्याचें रक्त काढूं नये. काढलें असता व वायूचें संरक्षण न केलें तर गंभीर, सूज, स्तंभ, कंप, ग्लानि, मस्तकरोग आणि अनेक प्रकारचे वातरोग यांना उत्पन्न करितें. रक्त फार काढलें असता नानाप्रकारचे वातरोग किंवा मृत्यु प्राप्त होईल. याकरितां रोग्याला स्निग्ध करून प्रमाणानेंच रक्त काढावें पित्ताधिकावर स्नेहयुक्त तीक्ष्ण रेच द्यावें. बाह्यवातरक्तावर लेप, अभ्यंग, पाणी शिंपणें व पेंड बांधणें हे उपचार करावे आणि गंभीर वातरक्तावर रेच, निरूहबस्ति व स्नेहपान हे उपचार करावे. पूर्वी वमन विरेचकादि पंचकर्मांनीं शुद्धि करून नंतर औषध योजावें. ( १ ) पांढऱ्या गुलाबशीचा कंद एक तोळापर्यंत गाईचें दूध सुमारें छटाक घेऊन त्यांत उगाळून प्रातःकाळीं द्यावा. ( २ ) कडूनिंबाच्या पाल्याचा रस एक तोळ्यापासून दररोज वाढवीत जाऊन सुमारें अर्धाशेरपर्यंत पिण्याचा क्रम सतत तीन महिने ठेवून पथ्य केलें असतां महारोगाचा नाश होतो. असें एक्या साधूनें खात्रीनें सांगितलें आहे. ( ३ ) रक्त्याबोळानें तिळाचें तेल सिद्ध करून त्याचें अभ्यंग करीत जावें. ( ४ ) जिरें १ तोळा, कडूवृंदावन १ तोळा, व हरताळ भस्म २ मासे, यांचा एकत्र खल करून लहान सुपारी एवढी गोळी बांधावी व रोग्याचें बलाबल पाहून द्यावी; इजपासून उत्तम प्रकारचे रेच होतात व त्यामुळें वातरक्ताचा नाश होतो. पथ्य—तूपभात किंवा दहींभात. यांजवर उतार जिरें बारीक वांटून त्याचें पाणी प्यावें; हें औषध मोठें रामबाण आहे. ( ५ ) कोहळे कोरून त्यांत एक तोळा शुद्ध हरताळ घालावी. मुख बंद करून मातकापड करून गजपुट द्यावें. ह्मणजे हरताळीचें उत्तम भस्म होतें. नंतर त्या भस्मांत लवंगा १ तोळा, जायफळ, १ तोळा, जायपत्री १ तोळा, व कस्तूरी ६ मासे घालून सर्वांची ओंव्याचे काढ्यांत तीन दिवस खल करून वालप्रमाण गोळी बांधावी व तुपांत द्यावी. पथ्य—तूपसांजा. हें एक औषध अमोल्य आहे असें जाणावें. (६) रक्तरोडा सुमारें सहा मासे घेऊन पाण्यांत उगाळून त्यांत मध व थोडें पाणी घालून याप्रमाणें सांजसकाळ दुवक्त देत जावें. म्हणजे नासलेल्या रक्ताची तावडतोब शुद्धि होते. ( ७ ) तुरटीची लाही १ मासा, एक तोळा मध व सहा मासे पाणी एकत्र करून प्रातःकाळीं देत जावें. पथ्य—दूधभात. (८) गुळवेलीचा काढा एरंडेल घालून द्यावा ( ९ ) कळलावीचा कंद, त्रिकटू, व मीठ यांचे चूर्ण करून मध व गाईचें तूप यांत बलाबल पाहून दहा मासेपर्यंत देत जावें; ह्मणजे अनेक रक्तविकार, पाददोष, पाय फुटतात ते मर्मांतील दुःख, असाध्य वातरक्त आणि कुष्ठ यांचा नाश करितें. ( १० ) मुंडी

व कुटकी यांचें चू मध व गाईचें तूप यांत द्यावें. ( ११ ) तालकेश्वर रस द्यावा. ( १२ ) गुळवेलीच्या अंगरसांत सिद्ध केलेलें तूप गुळवेलीच्या सत्वाबरोबर द्यावें. ( १३ ) रक्ताधिकवातरक्ताला सहस्रधौतघृत लावावें. अथवा राळ आणि तूप कढवून त्याचा लेप करावा. ( १४ ) कैशोर गुग्गूळ द्यावा. ( १५ ) गुळवेलीचा काढा व कल्क यांचे बरोबर मंदाग्नीनें सिद्ध केलेलें तूप वातरक्तनाशनाविषयीं मोठें औषध आहे त्याचें पान व अभ्यंग करावें. तें आमवात, कृमि, कुष्ठ, व्रण, अर्श व गुल्म इत्यादिकांचा नाश करितें.

**वातरक्तावर पथ्य**—रेचक, साटक्या साळी, तांबड्या साळी, जुने गहूं, हरबरे, मूग, तुरी, मटक्या, शेळी, मेंढी, ह्मैस व गाय यांचें दूध, चाकवत, कारलें, तांदूळजा, पडवळ, आवळे, सुरण, शेवगा, साखर; द्राक्षें, लोणी, ताजें तूप, तित्तर, कोंबडा, कपोत यांची मांसें, कडू पदार्थ, अक्रोड, मेथीची भाजी, मसुरा, आमसूल, उंबर, कोहळा, तालीमखाना, एरंडेल, मनुका, थंड पाणी, कबाबचिनी, खिरण्या, ब्राह्मी हीं पथ्यें जाणावीं.

**वातरक्तावर अपथ्य**—दिवसांस झोंप, शेकाजवळ बसणें, श्रम करणें, ऊन घेणें, मैथुन, उडीद, कुळीथ, वाल, पावटे, वाटाणे, क्षार, पक्ष्याची मांसें, निर्जल देशांतील मांसें, विरुद्धभोजन, दही, ऊंस, मुळा, मद्य, विडा, तीळ, तिखट, उष्ण, जड, चिकट, मीठ, व पिठाचे पदार्थ, नवा गूळ, गोडा सुरण, घाम काढणें; मार्ग चालणें, बहुत भाषण करणें, हें वर्ज करावें.

---

## वातरोग.

॥ अशितिर्वातजारोगाः कथ्यंतेमुनिभाषिताः ॥

**अर्थ**--वायू ऐशी प्रकारचे ऋषींनी सांगितले आहेत.

**कर्मविपाक**--जन्मकाळीं, कर्कलग्नी, रवी व त्यावर शनीची दृष्टि अथवा शनीच्या अंतर्गत रवी किंवा शनीवर मंगळाची दृष्टि असा योग असतां वातरोगी, प्रवासी, दुसऱ्याचें द्रव्य हरण करणारा, व विपरीत कर्म करणारा असा होतो. **परिहार**—जो ग्रह अनिष्ट असेल त्याची दानें, जप, व होम इत्यादि करावा.

**पूर्वकर्मविपाक**—गुरूचेठायी शत्रुत्व, देव, ब्राह्मणाच्या, द्रव्याचा अपहार, स्वामिद्रोह, इत्यादि कारणानी वातरोग होतो. **परिहार**—॥ शन्नोदेवी ॥ या मंत्राचा दहा हजार जप, कृच्छ्रातिकृच्छ्र, चांद्रायण, व महिषीदान इत्यादि करावी. किंवा अच्युत, अनंत, गोविंद या तीन नामांचा ३० हजार जप करावा. म्हणजे वातरोगापासून मुक्त होतो.

**वातरोगाचें कारण** ( मा. नि. )—रुक्ष, थंड, थोडें व लघु असें अन्न, श्रम, जागरण, न मानतील ते उपचार, व मलमूत्र, कफ, पित्त इत्यादि दोष आणि रक्त यांचें अति गमन, खाडा इत्यादिकावरून उडी मारणें, पाण्यांत बुड्या मारणें, अति मार्गगमन, मेहनत, आयासकारक चेष्टा, रसादि धातूंचा क्षय, चिंता, शोक, दीर्घरोगानें कृशपणा, मलमूत्रादि वेगधारण, आमांश, लांकडादिकांचा मोठा धक्का, उपवास, मर्माला पीडा, हत्ती, उंट, घोडा, यांवरून जलद गमन, या कारणांनीं वायु देहामध्यें रिक्त झालेले नाडीमार्ग पूर्ण भरून आपण बलवान् होऊन एकांगाला किंवा सर्वांगाला होणाऱ्या अशा अनेक वातरोगाला उत्पन्न करितो. त्या वातव्याधींचें जें अव्यक्त लक्षण त्यालाच पूर्वरूप समजावें.

**लक्षण** ( मा. नि. )—अंगनाश, शरीराला हलकेपणा, संधींचा संकोच, हाडें व सांधे यांचा स्तंभ, आणि भंग, रोमांच, बडबड, व बरगड्या, पाठ आणि मस्तक हीं जखडून राहणें, व लंगडेपणा, पांगळेपणा, कुबडेपणा, कोणतेही भागाला सूज, निद्रानाश, व गर्भ, शुक्र, व रज यांचा नाश, कंप, अंगाला मेहरी, व मस्तक, नासिका, नेत्र आणि मान, हीं आंत जाणें, किंवा वाकडीं होणें, टोंचल्यासारखी पीडा, शूळ, ठणका, आक्षेपक, मोह, व आयास, इत्यादि रूपें कुपित वायु करितो. तसाच हेतुविशेष व स्थानविशेष, या कारणांनी विशिष्ट रोग उत्पन्न करितो.

**सामान्यचिकित्सा**—पित्तयुक्त वायु असतां शीतोष्ण औषध द्यावें. कफादिक असला तर रुक्ष व उष्ण असें औषध व आहार द्यावा. केवळ वातविकारावर स्निग्ध व उष्ण असें अन्न व औषध द्यावें. जो वातव्याधि स्निग्ध, उष्ण, रुक्ष, शीत, इत्यादि उपचारांनी शांत होत नाही, तर तो दुष्ट रक्ताश्रित विकार आहे, असें जाणावें.

॥ वातरोगस्त्वसाध्योयंदेवयोगात्सुसिध्यति ॥ अनुमानेनकुर्वतिवैद्यकंतत्प्रतिज्ञया ॥

**अर्थ**—वातरोग असाध्य आहे. हा दैववशेंकरून बरा होतो, आणि वैद्यही औषध अनुमानानें देतात. कोणी प्रतिज्ञा करून देत नाही.

**१ आक्षेपकाचें सामान्य लक्षण** (मा. नि.)—जव्हां वायु कुपित होऊन सर्व धमनींप्रत प्राप्त होतो तेव्हां तो वारंवार संचार करून देहाला वारंवार आक्षिप्त करितो. ह्म० हत्तीवर बसलेल्या पुरुषाप्रमाणें सर्व गात्र चाळवितो. तो वारंवार शरीराचा आक्षेप करितो म्हणून याला आक्षेपक असें म्हणतात. आक्षेपकाचेच अपतंत्रक आणि अपतानक असे २ अवस्था विशेष आहेत. शिवाय दंडापतानक, अंतरायाम, बहिरायाम आणि अभिघात या भेदेंकरून आक्षेपक चार प्रकारचा होतो. त्याचें निदान व चिकित्सा पुढें सांगितली आहे. वर सांगितलेल्या आक्षेपकादिकास पित्तकफानुबंध होतो तो असा. कफपित्तानें युक्त झालेला वायु किंवा केवळ वायु आक्षेपक रोग करितो. व दुसरा म्हणजे दंडापतानकादि त्रयांपेक्षां चवथा अभिघातज आक्षेपक रोग करितो. त्याचें ल-

क्षण, ॥ यदातु धमनी:सर्वाः ॥ इत्यादियुक्त सामान्य लक्षणावरून जाणावें. ह्या श्लोकाचा **गदाधर** असा अर्थ करितात की, कफपित्तान्वित इत्यादि निमित्त भेदानें चार प्रकारचा आक्षेपक होतो. तो असा–एक कफान्वित वायूनें, दुसरा पित्तान्वित वायूनें, तिसरा केवळ वायूनें आणि चवथा दंडाद्यभिघाह कुपित वायूनें. ह्यापक्षीं गर्भपात आणि रक्ताचा अतिस्राव यापासून झालेले केवळ, वातजन्य जाणावे आणि त्याचेठायी वारंवार आक्षेपकही होतो म्हणून समजावें, कारण ते आक्षेपकाचेच भेद आहेत. **आक्षेपकाचें असाध्यत्व**—गर्भपातामुळे झालेला अथवा अति रक्तस्रावापासून झालेला किंवा अभिघातज म्हणजे दंडादिकांचा तडाखा लागून झालेला अपतानक रोग साध्य होत नाही. **आक्षेपकावर उपाय**—( १ ) शिरावेध, आणि वातहरक व तीक्ष्ण अशी औषधें नाकात फुंकणें व त्याचें नस्य देणें इत्यादि उपाय करावे. ( २ ) महाबला तेल योजावें.

**२ अपतंत्रक** ( मा. नि. )—हा तरी आक्षेपकाचाच एक भेद आहे. रुक्षादि स्वकारणांनी कुपित झालेला वायु स्वस्थान सोडून वर येतो ह्मणजे ऊर्ध्वगत होतो, आणि हृदयांत जाऊन तेथें पीडा करून मस्तक आणि आंख यांना पीडा करितो. आणि गात्रें धनुष्याप्रमाणें नमवितो आणि कांपवितो, मोह करितो, मोठ्या कष्टानें श्वासोच्छ्वास सोडितो, डोळे ताठतात किवा मिटून राहतात. आणि कपोतासारखा रोगी घुमतो, व बेशुद्ध पडतो. याजवर रेचन, निरूहबस्ति व वमन कधींही देऊं नये. कफवायूनें कोंडलेल्या श्वासवाही मार्गाला तीक्ष्ण नस्यांनी मोकळा करावा. तो मोकळा झाल्यावर शुद्धीवर येतो. **उपाय**—(१) हरीतकी, वेखंड, रास्ना, सैंधव, आम्लवेतस, तूप व आलें, यांचा लेह अपतंत्रकाचा नाशक आहे. आम्लवेतस न मिळाल्यास आंमसूल घ्यावें.

**अपतानक** ( मा. नि.·)–हा तरी आक्षेपकाचाच एक भेद आहे. डोळे ताठतात, बेशुद्ध होतो, घसा घुरघुरतो, व वायूचा वेग कमी झाला म्हणजे रोगी सावध होतो व सुख वाटतें. पुन्हां वायूनें हृदय व्याप्त झालें ह्मणजे रोगी मूर्छित होतो. गर्भपातानें, अति रक्त गेल्यानें व अभिघातनिमित्तक असे तीन अपतानक वायू बरे होत नाहीत.ज्याचे डोळे निवळ, कंपरहित, केवळ बिछान्यावर न निजणारा, अशा अपतानक वायूला त्वरेनें उपचार करावे. **उपाय**—( १ ) दशमूळाचा काढा, पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा.तो जिरल्यावर मांसरस द्यावा.(२) वातनाशक तेलानें मर्दन करावें, घाम काढावा, तीक्ष्ण औषधाचें नस्य द्यावें, शिरावेध करावा, नंतर घृतपान करवावें. ( ३ ) जेवणापूर्वी आंबट दहीं, मिरपूड घालून द्यावें किंवा स्नेहबस्ति द्यावा.

**३ अभ्यंतरायाम** (धनुर्वात) ( मा. नि. )—अंगुल्या, घोटे, हृदय, उरःस्थल आणि गळा या ठिकाणीं राहिलेला वायु वेगवान् होऊन जेव्हां स्नायुजाल ओढतो, तेव्हां डोळे ताठतात, हनुवटी जखडते आणि पार्श्वभाग मोडतात आणि तों-

डावाटें कफ पडतो, व त्यावेळेस मनुष्याला धनुष्याप्रमाणें आंतून म्हणजे पोटाकडून नमवितो. तेव्हां तो बलाढ्य वायु अंतरायाम करितो. **उपाय**—अंतरायाम व बाह्यायाम यांजवर आर्दितवायूवरचे उपाय करावे. ( २ ) बाह्यायाम, अंतरायाम, पार्श्वशूल, कटीशूल, खल्लीवात आणि दंडापतानक हे व्याधी स्नेहन व घाम या उपायांनी जिंकावे. ( ३ ) बाह्यायाम, अंतरायाम, धनुर्वात व कुब्जक यांच्या ठायीं प्रसारणीच्या काढ्यानें सिद्ध केलेलें तेल योजावें; म्हणजे अवश्य गुण येतो. ( ४ ) इतर वातव्याधीवरचे उपाय करावे.

४ **आर्दितवायु** ( मा. नि. )—उंच स्वरानें वेदादि पाठ करणारा किंवा अत्यंत कठिण पदार्थ खाणारा, जांभया देणारा, यांचा अथवा उंच सखल जाग्यावर निजल्यानें, विषमासन केल्यानें कुपित झालेला वायु, नाक, मस्तक, ओंट, तोंड, ललाट, आणि नेत्र यांच्या संधींत जाऊन मुखाला पीडा देतो. त्या योगानें अर्धे तोंड वांकडें होतें, आणि मानही वांकडी होते, मस्तक कांपतें, वाचा बंद होते, नेत्र भिवई व गाल यांना विकृति होते. ज्या बाजूला अर्दित होतो त्या बाजूकडची मान चुबुक आणि दांत यांस वेदना होते. तीन वर्षे लोटलेला हा रोग असाध्य होतो. यांत तीन प्रकार आहेत. ते असे—वातार्दित असतां लाळ गळते, वेदना होते, कंप, फुरफुरणें, भाषणाचा प्रतिबंध, व ओंठाला सूज, पित्ताधिक आर्दितामध्यें मुखाला पिवळेपणा, ज्वर, तहान, मोह आणि कफ हे विकार होतात. कफाधिकामध्यें गाल, मस्तक व मान यांस सूज, आणि स्तंभ हे विकार होतात. **उपाय**—( १ ) स्नेहपान, नस्य, वातनाशक भक्ष्य पदार्थ, व घाम काढावा. ( २ ) वातात्मक आर्दितावर दशमूळाच्या काढ्याबरोबर किंवा महाळुंगाच्या रसाबरोबर अथवा चिकण्याच्या काढ्याबरोबर अथवा पंचमूळाच्या काढ्याबरोबर दूध प्यावें. ( ३ ) पित्तार्दित वायूवर स्निग्ध पदार्थापासून झालेले शीत उपचार करावे. आणि घृतानें बस्ति व सिंचन किंवा रक्तस्राव करावा. ( ४ ) कफार्दितावर बृंहण उपचार करावे. ( ५ ) शोथयुक्तआर्दितावर वमन द्यावें. ( ६ ) ज्याचें तोंड वांकडें झालें आणि मुकेपणा व दाह हे उपद्रव झाले तर वातपित्तनाशक उपचार करावे. (७) चार किंवा दोन तोळे लसणीच्या रसांत हिंग, जिरें, सैंधव, पादेलोण, व त्रिकटू हीं प्रत्येक मासा मासा घेऊन चूर्ण करून घालावीं. व एरंडमूळाचे काढ्यांत दररोज प्रातःकाळीं एक महिनापर्यंत सेवन केलें असतां सामान्य वातरोग, आर्दितवायु, अपतंत्रक, एकांगवात, सर्वांगवात, ऊरुस्तंभ, गृध्रसी, शूल, द्वंद्वजरोग, कृमि, कुष्ठरोग, व पोटांतील वायु इतक्यांचा नाश होतो. ( ८ ) उडदाचें पीठ लोण्याबरोबर खाऊन वर दशमुळाचा काढा प्यावा.

५ **अत्युद्गार वायू** ( सुश्रुत )—यालाच ऊर्ध्ववात असें म्हणतात.

**ऊर्ध्ववातावर उपाय**—कफवातानें अधोभागीं कोंडलेला वायु फार ढेंकर उत्पन्न करितो. **उपाय**—( १ ) शेवग्याचे मुळाचा रस सुमारें ६ मासे काढून

त्यांत भाजक्या हिंगाची पूड एक गुंज घालून द्यावी. ( २ ) शेवग्याचे सालीचा रस सुमारें सहा मासे काढून त्यांत शुद्ध आंवळेसर गंधकाची पूड तीन मासे घालून द्यावा. ( ३ ) सुंठ ९ तोळे, वरधारा ९ तोळे, हरीतकी ५ तोळे, भाजलेला हिंग ४ तोळे, व सैंधव १ तोळा, यांचें चूर्ण सहा मासेपर्यंत उष्णोदकांत द्यावें. म्हणजे फार वाढलेला जरी ऊर्ध्ववात असला तरी त्याचा नाश होईल. ( ४ ) सुमारें चार मासे पिंपळमूळ, पांच तोळे दुधांत वांटून त्यांत सहा मासे आडूळशाचे पानाचा रस घालून द्यावा.

६ **अतिजृंभावायु** ( सुश्रुत )—वायु दुष्ट होऊन एका मागून एक जांभया उत्पन्न होतात. व आलस्य, निद्रा यांनीं युक्त असतो. **उपाय**—( १ ) चांगली शय्या करून निजावें. ( २ ) शिरसाचें तेल चोळल्यानें, गोड पदार्थांच्या भोजनानें किंवा तांबूल भक्षणानें, जृंभेचा नाश होईल. ( ३ ) त्रिकटू व सैंधव यांचें चूर्ण द्यावें.

७ **अनवस्थितचित्तत्ववायु** ( सुश्रुत )—ज्या वायूचे उपद्रवानें चित्त स्वस्थ राहत नाहीं म्हणजे सर्वदा अस्वस्थ असतें तो. **उपाय**—( १ ) शतावरी, एरंडमूळ, सुंठ, दारुहळद, कोष्ठ, सैंधव, रास्ना व गुळवेल हीं सर्व समभाग व दुप्पट गुग्गुळ आंत मिश्र करून चार मासे प्रमाण गोळ्या कराव्या व गाईचे तुपांत गोळी द्यावी म्हणजे भ्रमवातनाश पावतो. ( २ ) गुग्गुळ तुपांत द्यावा.

**अमाशयागतवात** ( मा. नि. )—वायु आमाशयांत राहिला असतां पार्श्व, उदर, हृदय आणि नाभी यांस पीडा, तृषा, ढेंकर, विषूची, खोकला, घसा व तोंड यांना कोरड व श्वास हे होतात. **उपाय**—( १ ) भोजनापूर्वी दीपन व पाचन असें औषध द्यावें. आणि वांति तीक्ष्ण रेचन द्यावें. ( २ ) सुंठ व देवदार यांचे चूर्ण समभाग दुप्पट गूळ घालून द्यावें. ( ३ ) गुळवेल व मिरी यांचें चूर्ण प्रातःकाळीं ऊन पाण्याबरोबर द्यावें.

८ **आध्मानवायु** ( मा. नि. )—गुडगुड शब्दानें युक्त व अत्यंत पीडायुक्त असें उदर ( पक्वाशय ) अत्यत फुगलें ह्मणजे वाळूनें भरलेल्या चामड्याच्या थैलीप्रमाणें होतें. वातनिरोधापासून हा भयंकर रोग उत्पन्न होतो. **उपाय**—( १ ) पूर्वी लंघन, नंतर दीपन व पाचन द्यावें. आणि गुदांत औषधाची वात घालणें, बस्तिकर्म व रेचक हे उपाय करावें. ( २ ) पिंपळी १ तोळा, तेड ४ तोळे, व खडीसाखर ४ तोळे यांचें चूर्ण ४ मासेपर्यत मधाशीं सेवन करीत गेल्यानें पोटाची फुगवटी दूर होते. ( ३ ) देवदार, वेखंड, कोष्ठ, कोळिंजन, शतावरी, हिंग व सैंधव, हीं औषधें सर्व समभाग निंबाच्या रसांत वांटून ऊन करून उदराला लेप द्यावा. ह्मणजे शूळ व पोटाची फुगवटी यांचा नाश होतो. ( ४ ) हरीतकी, बाहाव्याचा मगज, आंवळकठी, जेपाळ, कुटकी, निवडुंग, तेड व नागरमोथे, ही प्रत्येक चार चार तोळे घेऊन कुटून साडेसहा शेर पाण्यांत अष्टमांश काढा करावा व गाळून

घ्यावा. आणि त्या काढ्यांत जेपाळाच्या सोललेल्या बिया चार तोळे वस्त्रांत पोटली बांधून मंदाग्नीवर शिजवाव्या जोपर्यंत काढा घट्ट होईतोंपर्यंत आटवून नंतर खलामध्यें त्या जेपाळबीजाचे आठ भाग सुंठ, २ भाग मिरीं, पारा व गंधक हीं दोन दोन भाग सर्व एकत्र करून त्याचा एक प्रहर खल करावा; हा नाराचरस थंड पाण्याशीं एक गुंज द्यावा; ह्मणजे आध्मानशूल, वायूचा अवरोध, प्रत्याध्मान, उदावर्त, गुल्म व सर्व उदरें यांचा नाश होतो. रेचाचा वेग शांत झाल्यावर पथ्यास साखर व दहींभात किंवा दहींभात व सैंधव हें द्यावें.

९ **ऊरुस्तंभवायु**—हा रोग उरुस्तंभ सदराखालीं निराळाच घेतला आहे तिकडे पहा.

१० **अंगभेदवायु** ( सुश्रुत )—हा वायु मनुष्याचे अंगास पीडा करितो. यांजवर सामान्य वातनाशक उपचार आहे. खूप अंग मर्दून घ्यावें, तैल लावून अंग चोळून काढावें.

११ **अंगशोषवायू** ( सुश्रुत )—हा वायु सर्व शरीराचें शोषण करितो. यांजवर सामान्य वातनाशक उपचार करावे.

१२ **अंगपीडावायु** ( सुश्रुत )—या वायूकरून सर्व अंगाला पीडा होते. याजवर सामान्य वातनाशक उपाय करावे.

१३ **अंगभंगवायु** ( सुश्रुत )—हा वायु कोपला असतां अंग अतिशय ठणकतें. **उपाय**—( १ ) अंगावर पाय द्यावे. बुक्या मारून घ्यावा, तेल वगैरे लावून खूप अंगास मर्दन करावें ह्मणजे शांति होते.

१४ **अंगविभ्रंशवायु** ( सुश्रुत )—या वायूच्या योगानें शरीराचा एखादा अवयव काष्ठासारिखा चेतनारहित होतो. **उपाय**—साधारण वायूवरचे उपाय करावे.

१५ **अंत्रकूजनवायु**—यालाच आध्यानवायु असें ह्मणतात. त्याचें निदान व चिकित्सा वर सांगितली आहे.

१६ **कटीग्रहवायु** ( सुश्रुत )—जो वायु कंबरेचा स्तंभ करितो तो. ह्मणजे कंबर ताठून राहते. याजवर साधारण वायुहारक तेल मर्दन करून वातनाशक अन्न व उष्ण पाणी प्यावें. **उपाय**—( १ ) आस्कंदाचें चूर्ण खडीसाखर व तूप यांत द्यावें.

१७ **कषायवक्त्रतावायु** ( सुश्रुत )—या वायूचे योगानें तोंड तुरट होतें. साधारण वातनाशक गंडूष करावा.

१८ **कल्लतावायु** ( सुश्रुत )—या वायूचे योगानें कंठांतून स्पष्ट शब्द निघत नाहीं. याजवर साधारण वातनाशक उपाय करावे.

**१९ कलायखंज** ( सुश्रुत )—रोगी चालूं लागतांना थरथर कांपतो, आणि भलत्या रीतीनें चालतो. त्यामध्यें संधीची बंधनें शिथिल होतात. याला खंजवातही म्हणतात. **उपाय**—( १ ) खंज व पंगुवरचे उपाय करावे. व विशेषेंकरून स्निग्ध उपचार करावे.

**२० काठिन्यवायु** ( सुश्रुत )—या वायूकरून शरीर कठिण दगडासारखें होतें. याजवर सामान्य वातनाशक उपाय करावे.

**२१ कार्श्यवायु** ( सुश्रुत ) हा वायु शरीराला कृश करितो. याजवर वातनाशक असे बृंहण उपचार करावे.

**२२ कुब्जत्ववायु** ( सुश्रुत )—कुपित झालेला वायु शरीरांत दुष्ट होऊन हृदय किंवा पाठ याला कुबड आणवितो, तेव्हां त्याला कुबडा म्हणतात. **उपाय**—वातनाशक औषधें, दशमुळाचा काढा, स्नेहपान व मांसरस इत्यादि उपचार करावे. परंतु अत्यंत वाढलेला असल्यास उपचार लागू होत नाहीं.

**२३ कोष्टुशीर्ष** (मा. नि.)—गुडघ्यामध्यें वातरक्तापासून अत्यंत वेदना करणारा, शोथ ( सुज ) येतो. तो कोल्ह्याचे डोक्याप्रमाणें गुडघा मोठा करितो. त्याला लोक प्रचारांत गुडघी असें म्हणतात. **उपाय**—( १ ) गुळवेल व त्रिफळा यांचा काढा गुग्गुळ घालून द्यावा. [ २ ] चार तोळे दुधांत एक तोळा एरंडेल द्यावें. [ ३ ] वातरक्तावरचे सर्व उपाय करावे.

**कोष्ठगतवायु** ( सुश्रुत )—येथें कोष्ठ ह्मणजे आमाशय, पक्वाशय, अग्न्याशय, मूत्राशय, रुधिराशय, हृदय, उंडुक ( पोट ) व फुफ्फुस यांना कोष्ठ अशी संज्ञा आहे. तो कोष्ठाश्रित वायु कुपित झाला असता मळमूत्रांचा रोध होतो, वृषणरोग, हृद्रोग, गुल्म, मूळव्याध आणि पार्श्वशूळ हे रोग उत्पन्न करितो. **उपाय**—( १ ) विशेषेंकरून दूध प्राशन करावें. ( २ ) त्रिकटू, पादेलोण, जिरें, हरीतकी, सेंधेलोण, टांकणखार, बिडलोण, संचळ, उपळसरी, रिंगणमूळ, पाहाडमूळ, इंद्रजव, चित्रक व जवखार यांचें चूर्ण, दह्याची निवळ, मद्य, गरम पाणी, यातून एकाशीं द्यावें. तें अग्नि प्रदीप्त करितें, आणि कोष्ठगत वायूचा नाश करितें.

**२४ कंडूवात** ( सुश्रुत )—हा सर्व शरीरास कंडू उत्पन्न करितो. **उपाय**—(१) याजवर स्निग्ध अशीं रेचकें देऊन दोष शमवावा.

**२५ कंपवायु** ( मा. नि. )—सर्व अंगाला आणि मस्तकाला जो कंपवायु, होतो. त्याला वेपथु ही संज्ञा आहे. **उपाय**—याजवर सामान्य वातनाशक उपचार करावे.

**२६ खल्लीवायु** [ मा. नि. ]—पाय, जंघा [गुडघे] मांड्या, हाताचें मूळ

यांस मोडणारी जी पीडा ह्मणजे त्यास आखडून धरितो त्यामुळें लुलेपणा येतो. याजवर सामान्य वातनाशक उपाय करावे.

२७ खंज व पंगुवायु [ मा. नि. ]—वायु कंबरेमध्यें राहून मांडीचा मोठा स्नायु ह्मणजे शीर ओढून निर्जीव करितो. तेव्हां मनुष्य खुळा होतो आणि दोहों माड्यांची अशी अवस्था झाली ह्मणजे पांगळा होतो उपाय—( १ ) खंज किंवा पंगु नूतन असले तर विरेचन, स्नान करणें, घाम काढणें, गुग्गुळ, स्नेहपान व बस्ति इत्यादि उपचार करावे. फार दिवसांचा असाध्य जाणावा.

गुदस्थितवायु (मा. नि.)—येथें गुद ह्मणजे पक्वाशय समजावा. नुस्तें गुद नव्हे. कारण नुस्तें गुदच ह्मटलें तर अश्मरी वगैरे रोग येणार नाहींत.या वायूचा कोप झाला असतां मळ, मूत्र व अपानवायु यांचा प्रतिबंध, शूल, पोट फुगणें, मूतखडा, शर्कराश्मरी, व मांड्या, पोटऱ्या, हृदय, त्रिक व पाठ, यांत शूल आणि सूज हे विकार होतात. उपाय—उदावर्तावरील उपाय करावे. ( २ ) दशमूळाचा काढा किंवा महाळुंगाचा रस एरंडेल घालून द्यावा: ह्मणजे बस्ति, कुक्षी व गुदस्थित वायु याचा नाश होतो.

२८ गृध्रसीवायु ( मा. नि. )—प्रथमतः स्फिक् ह्मणजे कंबरेचा मागला भाग त्यापासून आरंभ होऊन क्रमानें कंबर, पाठ, मांड्या, गुडघे, पोटऱ्या आणि पाय, यांस स्तंभ ( ताठणें ) वेदना, टोंचल्या सारखी पीडा होते. या उपद्रवासहित तो आखडून धरतो, आणि चलन पावतो. हा वायु दोन प्रकारचा आहे तो असा; वातजगृध्रसी—ठणका, देहाला वक्रता, मांडी व मांडीची मोटरी, व ऊर, याचे संधीचें स्फुरण व अत्यंत स्तब्धता होते. वातश्लेष्मजगृध्रसी—अग्निमांद्य, झापड, लाळ गळणें व भक्तद्वेष इत्यादि लक्षणें होतात. उपाय—( १ ) रेचन व वमन देऊन अग्नि प्रदीप्त झाला ह्मणजे मग बस्त्यादि उपचार करावे. ( २ ) गृध्रसीमध्यें जोंपर्यंत ऊर्ध्वशुद्धि झाली नाही तोंपर्यंत बस्तिविधि करूं नये. केला असतां निरर्थक जातो. ( ३ ) चार तोळे गोमूत्र व एक तोळा एरंडेल मिश्र करून पिंपळीचें चूर्ण घालून द्यावें तें फार दिवसाच्या वातकफात्मक गृध्रसीचा नाश करील. ( ४ ) तेल किंवा तूप यांतून एकाशी आलें व महाळुंगाचा रस किंवा आम्लवेतस व गूळ हीं एकत्र करून द्यावी. ह्मणजे कंबर, माड्या, पाठ, व माकडहाड या ठिकाणचा शूळ, गुल्म, उदावर्त, व गृध्रसीवायु यांचा नाश होतो. ( ५ ) वकाण निंबाचे फळाचा कल्क द्यावा. ( ६ ) पंचमूळाचा काढा तेंडाचें चूर्ण घालून द्यावा; तो गृध्रसी व गुल्म यांचा तात्काळ नाश करील. ( ७ ) वकाण निंबाचा नार ह्मणजे गाभा पाण्यांत उगाळून सुमारें एक तोळापर्यंत रस थोडा मध घालून प्राशन करावा; ह्मणजे असाध्य जरी गृध्रसी रोग असला तरी त्याचा नाश करील. ( ८ ) काळ्या निर्गुंडीचा काढा मंदाग्नीवर करून पिपळीचें चूर्ण घालून प्राशन केल्यावरोबर दुर्निवार अशा गृध्रसीरोगाचा नाश होईल. ( ९ ) पथ्या गुग्गुळ द्या-

वा. ( १० ) रास्ना, गुळवेल, बहाव्याच्या शेंगेंतला मगज, देवदार, गोखरु, एरंडमूळ व पुनर्नवा, यांचा काढा सुंठीचें चूर्ण घालून द्यावा; ह्मणजे पोटऱ्या, पाठ, माकडहाड, व कुशी इतक्या ठिकाणचा शूल नाश पावतो.

गंधाज्ञत्ववायु (सुश्रुत)—या वायुनें सुगंध किंवा दुर्गंध कांहीं समजत नाहीं. यांजवर साधारण वातनाशक उपाय करावे. काळ्या माक्याचा रस नाकांत घालावा ह्मणजे नाक मोकळें होऊन चांगला वास येतो.

२९ जिव्हास्तंभ ( मा. नि. )—वायू वाणीला वाहणाऱ्या शिरामध्यें राहून जिव्हेचा स्तंभ ( ताठणें ) करितो. त्यामुळें अन्नपाणी घेण्यास व बोलण्यास सामर्थ्य नसतें. उपाय—वातव्याधीवरची व आर्दित वायूवरची सामान्य चिकित्सा करावी. ( २ ) हाळद, वेखंड, कोष्ठ, कोळिंजन, सुंठ, मिरीं, अजमोदा, जेष्ठीमध व तूप, यांचा लेह एकवीस दिवस सेवन केला असतां, बहिरेपणा, तोत्रेपणा व मुकेपणा यांचा नाश करून मेघासारखा किंवा कोकिळेसारखा असा मंजुळ स्वर होतो.

३० तूनिवायु ( मा. नि. )—पक्वाशय आणि मूत्राशय यांत कळ निघून खालीं जाते आणि गुद व उपस्थ ह्मणजे स्त्रीपुरुषांचें गुह्यस्थान यांचा भेद करिते. उपाय—( १ ) सैंधव तूप प्राशन करावें. ( २ ) पिंपळीचें चूर्ण पाण्यांत द्यावें. ( ३ ) हिंग व सैंधव उन पाण्यांत द्यावें. किंवा नुसतें तूप पाजावें.

३१ तोदवायु ( भेदवायु ) ( सुश्रुत )—वायूनें सूयांनीं टोंचल्यासारखी सर्वांगास पीडा होते. यांजवर सामान्य वायूवरील चिकित्सा करावी.

त्रिकशूल ( सुश्रुत )—मानेजवळच्या व कटीच्या त्रिकांमध्यें जो वायूनें शूल होतो तो. उपाय—(१) वातहारक तेल किंवा तूप यांनीं त्या ठिकाणीं चांगलें मर्दन करून वाळूच्या पुरचुंडीनें शेक द्यावा; किंवा विटेच्या टोल्यांनीं शेक द्यावा. नंतर बाजेखालीं गोवऱ्यांचा निर्धूम अग्नि ठेवून शेक घ्यावा.

३२ दुर्बलत्व वायु ( सुश्रुत )—या वायूच्या योगानें मनुष्य दुर्बळ ह्मणजे शक्तिहीन होतो. उपाय—( १ ) दह्याची निवळी वस्त्रगाळ करून त्या बरोबर साटक्या साळीचा भात साखर घालून सेवन करीत गेलें असतां चांगली शक्ति येते. ( २ ) कुहिरीचें बीज व तालीमखान्याचें बीं हीं दोन्ही समभाग त्यांत दुप्पट खडीसाखर घालून हें एक तोळा चूर्ण गाईचे दुधाबरोबर सेवन करीत जावें. ( ३ ) जेष्ठीमधेचें चूर्ण सुमारें ६ मासे तूप व मध यांत सेवन करून वर गाईचें दूध पीत जावें; ह्मणजे चांगली शक्ति येते. ( ४ ) गोखरु, तालीमखाना, उडीद, कुहिरीचें बीं, व शतावरी यांचें चूर्ण समभाग साखर घालून १ तोळ्यापर्यंत गाईचे दुधाशीं सेवन करीत जावें.

३३ दृष्टिक्षयवायु ( सुश्रुत )—या वायूनें दृष्टीचा नाश होतो ह्मणजे दिसेनासें होतें. यांजवर नेत्ररोगावरील उपचार करावे. जेवण झाल्यावर आंचवतेवेळीं दोन्ही हात एकमेकाशीं घांसून तीं ओलीं बोटें डोळ्यांत नित्य फिरवीत जावीं.

३४ दंडापतानक ( मा. नि. )—वायु अत्यंत कफयुक्त होऊन धमनींत राहतो व दंडाप्रमाणें अंगाला स्तंभन करितो. हा कष्टसाध्य आहे. याजवर आक्षेपक वायूवरील व इतर वातहारक उपाय करावे.

३५ निद्रानाशवायु ( सुश्रुत )—या वायूचे कोपेंकरून निद्रा येत नाहीं. उपाय—( १ ) पिपळमूळाचें चूर्ण ४ मासे घेऊन दुप्पट गुळांत मिळवून उन पाण्याशीं प्राशन करावें म्हणजे फार दिवस गेलेली झोंप तत्काळ येते. ( २ ) संध्याकाळीं वांगें भाजून मधांत कालवून भक्षण करावें म्हणजे तत्काळ निद्रा येते.

३६ पक्षाघातवायु ( मा. नि. )—वायु देहाचा अर्धा भाग घेऊन शिरा व स्नायू यांना शोषून उजवा किंवा डावा पक्ष निर्वळ करितो म्हणजे एकांग अचेतन होतें. त्यांस कोणी एकांगवात किंवा कोणी पक्षवध किंवा पक्षाघातही ह्मणतात. किंवा लोक अर्धे अंगावरून वारें गेलें असेंही म्हणतात. वायु पित्तयुक्त असला तर दाह, संताप आणि मूर्छा हे विकार होतात, कफयुक्त असतां शैत्य, सूज व जडता हे विकार होतात. केवळ वायूच्या विकारानें झालेला पक्षवध अत्यंत कष्टसाध्य जाणावा. व दुसऱ्या दोषांच्या संयोगानें झालेला पक्षवध साध्य होतो. क्षयापासून झालेला असाध्य, गर्भिणी, बाळंत, लहान बालक, वृद्ध व क्षीण यांचा व रक्तापासून झालेला पक्षघात वेदनारहित असला तर तो वैद्यांनीं सोडावा. उपाय—( १ ) सुंठीचें चूर्ण २८ तोळे, गाईचें तूप २८ तोळे घालून ती सुंठ त्या तुपांत भाजावी. नंतर लसूण सोलून २८ तोळे त्यांत घालून एकत्र करून ठेवावें. नंतर अग्नि, बळ पाहून उष्ण पाण्याशीं द्यावें; म्हणजे पक्षाघात, हनुस्तंभ, कटीबंध, बाहुपीडा, आणि वातरोग यांचा नाश होतो. (२) राळेचें चूर्ण करून त्याचें तेल नलिकायंत्रानें काढून अंगास मर्दन करीत जावें. (३) कस्तूरी १ मासा, अंबर १ मासा, सोन्याचा वर्ख १ मासा व चांदीचा वर्ख १ मासा, तोळाभर मधांत खलून दोही सांज थोडें चाटीत जावें ह्म० अर्धांगवायूचा नाश होतो. (४) कुहिलीच्या बिया, चिकणामूळ, एरंडमूळ, उडीद व सुंठ याचा काढा सैंधव घालून नाकानें प्राशन करावा, ह्मणजे पक्षाघात, मस्तकरोग, हनुग्रह, आर्दितवायु, संधिवात व मन्यास्तंभ यांचा नाश होतो, (५) उडीद, चिकणामूळ, कुहिली, सुगंधी गवत, रास्ना, आस्कंद, व एरंडमूळ याचा काढा हिंग व सैंधव घालून प्रातःकाळीं द्यावा, ह्मणजे पक्षाघात, मन्यास्तंभ, कर्णनाद, व आर्दितवायु यांचा सात दिवसांत नाश होतो. ( ६ ) पिपळमूळ, चित्रक, पिंपळी, रास्ना, कोष्ठ, कोळिंजन, नागरमोथे, सैंधव व उडीद यांच्या काढ्याबरोबर सिद्ध केलेल्या तैलाचें प्राशन व अभ्यंग केलें असतां पक्षवाताचा नाश होतो.

पक्वाशयागतवात ( मा. नि. )—आंतड्यांत कुरकुर शब्द, शूल, पोटांत

गुडगुड शब्द, मळमूत्र कष्टानें होणें, मूत्र कृच्छ्र, पोट फुगणें आणि त्रिकाचेठायीं वेदना ही लक्षणें होतात. उपाय—( १ ) अग्नि प्रदीप्त करणारीं औषधें देऊन उदावर्तावरील उपाय करावे आणि स्निग्ध असें रेचक द्यावें. ( २ ) सुंठ, इंद्रजव व चित्रकमूळ यांचें चूर्ण उन पाण्याशीं द्यावें. ( ३ ) आस्कंद व बेहेडेदळ हीं समभाग व त्यांत दुप्पट गूळ घालून १ तोळा प्रमाण गोळी ऊन पाण्याबरोबर प्रातःकाळीं द्यावी; ह्मणजे पक्वाशयागत वायूचा नाश होतो.

३७ **प्रतूनीवात** ( मा. नि. )—गुद आणि उपस्थ ( स्त्रीपुरुषांचें गुह्य ) यापासून निघालेली कळ उलटी वर जाते, आणि जोरानें पक्वाशयांत शिरते आणि तूनीप्रमाणें भेदही करिते. यांजवर तूनीवरचे उपाय करावे.

३८ **प्रत्यष्ठीला** ( मा. नि. )—वाताष्ठीलाच अत्यंत पीडायुक्त वात, मळ, मूत्र, यांचा रोध करणारी आणि आडवी लांब झाली ह्मणजे तिला प्रत्यष्ठीला ह्मणतात. उपाय—( १ ) हिंगादि चूर्ण द्यावें. ( २ ) हिंग, वेखंड, बीडलोण, सुंठ, जिरें, बाळहिरडे, चित्रकमूळ, कोष्ठ, कोळिंजन, हे पदार्थ एकोत्तर वृद्धीनें घेऊन चूर्ण करून द्यावें. व वर ऊन पाण्याचा घोट घ्यावा. तें गुल्म, उदर, अष्ठीला व तरळ यांजवर प्रशस्त आहे.

३९ **प्रत्याध्मानवायु** ( मा. नि. )—कफानें वायूचा रोध होऊन पांर्श्वशूल व उर यावांचून अमाशयाच्या ठायींच फुगवटी येते. **उपाय**—( १ ) प्रथम वमन आणि लंघन करावें. नंतर दीपनोपचार करावे.

४० **प्रलापक वायु** ( सुश्रुत )—स्वकारणानें कुपित झालेल्या वायूपासून ज्यांत संबंध नाहीं व अर्थ नाहीं असें भापण बोलतो. **उपाय**—( १ ) तगर, पित्तपापडा, बाहाव्याच्या शेंगेंतला मगज, नागरमोथे, कुटकी, वाळा, आस्कंद, ब्राह्मी, काळी द्राक्षे, चंदन, दशमुळें व शंखाहुली, यांचा काढा मध घालून द्यावा, तो लवकर प्रलापाला शमवितो. ( २ ) घृतयुक्त गुग्गुळ द्यावा.

४१ **प्रसुप्तिवायु** ( त्वक्शून्यता ) ( सुश्रुत ) या वायूचा कोप झाला असतां त्वचेच्याठायीं स्पर्श केला असतां कळत नाहीं. याजवर वारंवार रक्तमोक्ष करावा व साधारण वातहारक उपचार करावे. ( २ ) सैंधव, घेरोसा व तेल एकत्र करून ऊन पाण्यांत लेप करावा. गुग्गुळ तुपात द्यावा.

४२ **पार्श्वशूल वायु** ( सुश्रुत )—वायु कोष्ठाचे ठायीं कुपित होऊन पार्श्वाचेठायीं शूल करितो. याजवर साधारण वातहारक औषधें देऊन वातहारक तेलानें अंगमर्दन करीत जावें.

४३ **पाददर्शवायु** ( मा. नि. )—पायांस मेहरी येऊन स्पर्श कळेनासा होतो. हा कफवातापासून होतो. **उपाय**—याजवर कफ वातनाशक औषधें देऊन शमवावा.

**४४ पाददाहवायु** ( मा. नि. )—पादाचेठायीं पित्तरक्तानें मिश्रित वायु मोठा दाह करितो त्यामुळें तळपायांची आग होते, आणि चालतांना तर विशेष आग होते. **उपाय**—( १ ) वातरक्तावरील सामान्य उपाय करावे. ( २ ) उन पाणी थंड करून त्यांत मसुराची दाळ बारीक वांटून पायांस लेप करावा, अथवा संतप्त होणाऱ्या पायांला लोणी लावून बांधावें किंवा लोणी खुप पायांस चोळावें, म्हणजे पायांचा दाह कमी होतो. ( ३ ) गुळवेल व एरंड्याचे गोळे दह्यांत वांटून त्याचा किंवा कडुनिंबाचा पाला व चिकणामूळ एकत्र बारीक वांटून त्याचा पायांना लेप द्यावा.

**४५ पंगुवायु** ( मा. नि. )—यालाच खंजवात ह्मणतात तो पहा.

**४६ वलक्षय** ( सुश्रुत )—या वायूपासून मनुष्य अगदींच शक्तिहीन होतो. याजवर उपाय दुर्बलत्व वायूवरचे करावे. ( १ ) गुग्गुळ तुपांत द्यावा.

**वस्तिगतवायु** ( सुश्रुत )—वस्तिच्याठायीं वायु राहिला असतां मूत्रप्रवृत्ति चांगली होते आणि विकृत होऊन राहिला असतां नानाप्रकारचे मूत्रकृच्छ्रादि विकार होतात. **उपाय**—( १ ) चिकण्याच्या मुळाच्या सालीचें चूर्ण १ तोळा व साखर १ तोळा ही सोळा तोळे दुधांत घालून बलाबल पाहून द्यावी, ह्मणजे वारंवार मुतावयास लागतें त्याची शांति होते. ( २ ) त्रिफळाचूर्ण सहा मासे, व लोहभस्म १ गुंज मधांत कालवून सेवन केलें असतां वारंवार मुतण्याची शांति होते. ( ३ ) जवखाराचें चूर्ण चार मासे समभाग साखर घालून द्यावें. ( ४ ) आंवळकठी पाण्यात भिजत घालून ती पाट्यावर बारीक वांटून त्या कल्काचा जाडा पेंड बस्तीवर म्हणजे नाभी व शिश्न, यामध्यें ठेविला असतां निश्चयेंकरून मूत्ररोग शांत होतो.

**४७ बद्धविट्कतावायु** ( सुश्रुत )—हा वायु कुपित होऊन मळाचे खडे करितो याजवर आनाहावरचे उपचार करावे.

**४८ बाहुशोषवायु** ( मा. नि. )—वायु खांद्यांत राहून खांद्याचें बंधन शोपितो. त्यामुळें खांदा वाळून जातो त्यास अंसशोषही म्हणतात आणि तेथें ह्मणजे खांद्यांतच राहून शिरा आखडून अवबाहुकरोग उत्पन्न करितो. **उपाय**—( १ ) चिकण्याचे मुळाचा काढा भोजन झाल्यावर सैंधव घालून द्यावा. ( २ ) उडदाचे काढ्याचें नस्य व प्राशन करावें. ( ३ ) धोत्र्याचे बियाचें तेलानें मर्दन करावें. ( ४ ) दूध, तेल, तूप किंवा मांस यांबरोबर अथवा साटके भाताबरोबर एकेक तोळा लसूण चढत असा सात दिवस भक्षण केला असतां वातव्याधि, विषमज्वर, शूल, गुल्म, अग्निमांद्य, प्लीहा, व भुज पार्श्व आणि मस्तक, यांचा शूल व शुक्रदोष यांचा नाश होतो. ( ५ ) उडदाचें तेल व लसूण एकत्र करून बाहूंचे ठिकाणी मर्दन करावें.

४९ **वाह्यायामवायु** [ मा. नि. ]—महान हेतूनें मान व पाठ यांच्या बाहेरील स्नायु व कंडरा यांना शोषून मागें नमवितो. हा उर, कंबर व मांड्या मोडितो, म्हणून असाध्य होय. **उपाय**—[ १ ] चांदवेलीच्या काढ्यानें सिद्ध केलेलें तेल योजावें, किंवा आर्दितवायूवरची सर्व क्रिया करावी. [ २ ] स्नेहपान व घाम काढावा.

५० **भीरुत्ववायु** ( सुश्रुत )—ज्या वायूपासून भय उत्पन्न होतें तो. याजवर साधारण वातनाशक उपाय करावे, व घृतयुक्त गुग्गुळ द्यावा.

५१ **मन्यास्तंभवायु** ( मा. नि. ) दिवसास निद्रा, विकृत अन्न, विकारकारक जलांत स्नान, भलत्याच रीतीनें फार वेळ वर पाहणें, इत्यादि कारणांनीं वायु कुपित होऊन कफाशीं युक्त होतो आणि मानेच्या शिरा ताठून स्तंभ करितो. **उपाय**—मानेला तेल किंवा तूप लावून रुईच्या किंवा एरंडाच्या पानांनीं शेकून पुष्कळ वेळ घाम काढावा. ( २ ) कोंबड्याचे आंड्यांतील बलक, सैंधव व तूप घालून ऊन करून मानेला खूप मर्दन करावें.

५२ **मीमीणत्ववायु** [ सुश्रुत ]—वायु कफाशींयुक्त होऊन शब्दवाहिनी शिरा आंखडून धरून मनुष्याला तोतेपणा, मुकेपणा, गेंगाणेपणा व गळा दाटून बोलणें असे विकार उत्पन्न होतात. **उपाय**—[ १ ] दशमुळाचा काढा हिंग व पोखरमुळाचें चूर्ण घालून द्यावा

५३ **मूकादिकवायु** [ सुश्रुत ]—याचीं लक्षणें मीमीणवायुप्रमाणें जाणावी. **उपाय**—[ १ ] हळद, वेखंड, कोष्ठ, कोळिंजन, पिपळी, सुंठ, शहाजिरें, अजमोदा व जेष्टीमध याचें चूर्ण मध व तूप यांत द्यावें, म्हणजे जिव्हास्तंभ, बुद्धिजाड्य, व मूकत्व यांचा नाश होतो. हें चूर्ण अमृतोमय आहे असें जाणावें.

५४ **रसाज्ञतावायु** [ सुश्रुत ]—या वायूचे कोपेंकरून मधुरादि पदार्थांचा स्वाद जिभेस कळत नाहीं. **उपाय**—[ १ ] जिव्हा जड झालेली सैंधव, त्रिकटू व फालसा, यांच्या चूर्णानें घासावी. [ २ ] आम्लवेतस न मिळाल्यास अमसूल अथवा काडेकिराईत, कुटकी, इंद्रजव, कुड्याची साल, ब्राह्मी, पळसपापडी, मोहऱ्या शहाजिरें. पिपळी, पिपळमूळ, चित्रक, सुंठ व मिरी याचें चूर्णानें किंवा त्यांचा आल्याचे रसाशी कल्क करून त्यानें वारंवार जिव्हा घासावी. तेणेंकरून जिव्हा सर्व रस जाणते.

५५ **रोमहर्षवायु** ( सुश्रुत )—या वायूनें रोमांच उभे राहतात. याजवर उपाय साधारण वातनाशक करावे. ( १ ) कडू व स्निग्ध असें औषध, अंगमर्दन करून घाम काढावा.

५६ **व्रणायामवायु** ( सुश्रुत )—सर्व शरीरगत वायु मर्मस्थानींच्या व्रणांप्रत जाऊन आपल्या वेगेंकरून देहाला नम्र करितो. हा असाध्य आहे.

५७ **वातप्रवृत्तिवायु** [ सुश्रुत ]—हा वायु गुदावाटें फार सरतो. **उपाय**—( १ ) सैंधव व पादेलोण यांचें सुमारें चार मासे चूर्ण उष्ण पाण्याबरोबर सेवन करीत जावें.

५८ **वातकंटक** [ मा. नि. ]—पाय वांकडा तिकडा पडला असतां किंवा श्रम झाले असतां वायु कुपित होऊन घोट्यांत जाऊन वेदना उत्पन्न करितो. यास कोणी खुड्वात असेंही म्हणतात. **उपाय**—[ १ ] वारंवार रक्तमोक्ष करावा. [ २ ] एरंडेल प्यावें. [ ३ ] सुयांनीं डाग द्यावा.

५९ **वाताष्ठीलावायु** [ मा. नि. ]—नाभीच्या खालीं उत्पन्न झालेला फिरणारा अथवा अचल अष्ठीले [ वाटोळा पाषाण ] प्रमाणें कठिण, वरच्या अंगास लांब आणि आडवा उचललेला आणि बहिर्मार्ग म्हणजे वात, मूत्र, आणि मल यांचा रोध करणारा असा जो ग्रंथि [गांठ] होतो. **उपाय**—प्रत्यष्ठीलेवरील करावे.

६० **वामनत्ववायु** [ सुश्रुत ]—वायु दुष्ट होऊन गर्भाशी मिळून गर्भाला विकृत करितो. तेणेंकरून मनुष्य लहान, म्हणजे खुजा, ठेंगणा, असा उत्पन्न होतो.

६१ **विश्वाचीवायु** [ मा. नि. ]—बाहुपृष्ठापासून हाताच्या वरल्या भागापर्यंत प्रत्येक अंगुलीच्या ज्या कंडरा म्हणजे मोठ्या स्नायु आहेत, त्या दुष्ट करून हाताच्या ग्रहण आकुचनादि कार्यांचा नाश करणारा जो रोग होतो तो. **उपाय**—( १ ) दशमूळें, चिकणा व उडीद, यांचा काढा तेल व तूप मिश्र करून संध्याकाळीं भोजन झाल्यावर त्याचें नस्य करावें; म्हणजे विश्वाची व अवबाहुक, या दोहींचा नाश होतो. ( २ ) उडीद, सैंधव, चिकणामूळ, रास्ना, दशमूळें, हिंग, वेखंड व शतावरी यांच्या काढ्याबरोबर सिद्ध केलेलें तेल सुंठीचें चूर्ण घालून भोजनोत्तर सेवन करावें; म्हणजे बाहुशोष, अवबाहुक, विश्वाची, पक्षाघात व आर्दितवायु यांचा नाश होतो.

६२ **विड्ग्रहवायु** ( सुश्रुत )—ज्या वायूकरून मळाचा अवष्टंभ होतो म्हणजे मळ साफ होत नाहीं. याजवर रात्रौ निजते वेळीं नुसतां पाण्याचा अष्टमांश काढा करून छटाकपर्यंत प्यावा व आणखीही वातहारक उपाय करावे.

६३ **विरसतावायु** ( सुश्रुत )—ज्या वायूकरून तोंडाचा स्वाद जातो तो. याजवर अरुचीवरचे उपाय करावे.

६४ **शब्दाज्ञतावायु** ( सुश्रुत ) ज्या वायूकरून बहिरेपणा येतो तो. याजवर कर्णरोगांत बहिरेपणावर जी औषधें दिली आहेत तीं योजावी.

६६ **शावतावायु** ( सुश्रुत ] ज्या वायूकरून शरीराचा वर्ण शामवर्ण होतो. तो. याजवर साधारण वातनाशक उपाय करावे.

६६ शीत वायु ( सुश्रुत ) ज्या वायूकरून शरीर थंडगार होतें. याजवर वायुहारक तेलानें सर्व अंगास मर्दन करावें. उपाय—( १ ) कोष्ठ, कोळिंजन व सुंठ, यांचें फार बारीक चूर्ण करून सर्वांगास व मस्तकास चोळावें, (२) कडू, स्निग्ध हे रस द्यावे व अंगास मर्दन करून घाम काढावा.

६७ शिरोग्रहवायु ( मा. नि. )—वायु रक्तांत शिरून मस्तकाला धारण करणाऱ्या शिरा रुक्ष, वेदनायुक्त आणि काळ्या करितो. हा शिरोग्रहरोग असाध्य आहे. उपाय—( १ ) शिरागत वायूवरील उपचार करावा. आणि दशमूळाचा काढा व महाळुंगाचा रस, या दोहोंबरोबर तेल सिद्ध करून त्याचें अभ्यंग करावें. किंवा शिरोबस्ति द्यावा.

६८ शुक्रनाशकवायु ( सुश्रुत )—जो वायु शुक्रधातूला फार क्षीण करितो तो. उपाय—( १ ) पंजाबी सालम १ तोळा व खडीसाखर १ तोळा, या दोहोंचें चूर्ण ४ तोळे गाईच्या तुपांत मिश्र करून दररोज प्रातःकाळीं याप्रमाणें १४ दिवस सेवन करावें. ( २ ) आहाळीव पावशेर, गाईचें तूप अतपाव व गूळ ॥ शेर त्यांत थोडी खडीसाखर घालून पाक करावा. व बलाबल पाहून प्रातःकाळी सेवन करीत जावा. याप्रमाणें एक किंवा २ सप्तकें सेवन केली असता वीर्यवृद्धि होऊन शरीर पुष्ट होतें व कंबरेस जोर येतो. ( ३ ) याजवर धातुपुष्टीवरीलही प्रयोग करावे.

६९ शुक्रकार्श्यवायु ( सुश्रुत )—जो वायू शुक्रधातूला किंचित् क्षीण करितो. याजवर शुक्रनाश वायूवरील उपचार करावे.

७० शुक्रातिप्रवृत्तिवायु—शुक्रगत वात पहा.

७१ स्वेदनाशवायु ( सुश्रुत )—ज्या वायूकरून शरीरास घाम मुळींच येत नाहीं. याजवर सामान्य वातनाशक उपचार करून ऊन पाणी पीत जावें व ऊन पाण्यानें स्नान करीत जावें. (१) गुग्गुळ तुपांत द्यावा.

७२ स्फुरणवायु ( सुश्रुत )—ज्या वायूकरून अंग जागोजागीं हलतें ह्म० स्फुरण होतें. याजवर साधारण वातनाशक क्रिया करावी. ( १ ) कडू व स्निग्ध औषध द्यावें व अंग मर्दन करून घाम काढावा.

स्तंभवायु ( सुश्रुत )—ज्या वायूकरून शरीर स्तब्ध होतें ह्म० ताठतें. याजवर सामान्य वातहारक तेलानें मर्दन करून वातहारक औषधें द्यावी.

७४ हनुस्तंभवायु ( मा. नि. )—जिव्हा फार घासल्यानें, कोरडें अन्न भक्षण केल्यानें आणि अभिघातानें हनुवटीचा मूळ ठिकाणचा वायु कुपित होऊन हनुवटीला संधीपासून खाली सोडून तोंड वासवितो अथवा मिटवितो. तेणेंकरून चावणें अथवा बोलणें यांस कठिण पडतें. उपाय—( १ )—हनुग्रह, हनुस्तंभ, मानेचा स्तंभ आणि आर्दितवायु यांजवर दशमूळें व पिपळी यांचा काढा द्यावा. (२)

मिटून धरलेले तोंडास स्निग्ध पदार्थ चोळून वाफारा देऊन उघडावें आणि वासलें असेल तर वर सांगितलेले उपचार करून दावून मिटवावें. ( ३ ) लसूण सोलून तिळाच्या तेलांत वांटून सैंधव घालून सेवन करावा. (४) लसणीचा गोळा आणि उडदाची वांटलेली डाळ, ही एकत्र करून त्यांत सैंधव, हिंग व आलें घालून त्याचे वडे तेलांत किंवा तुपांत तळून शक्तीप्रमाणें खावे. (५) प्रसारणी तेल योजावें.

**७६ क्षिप्रमूत्रता** ( सुश्रुत )—ज्या वायूकरून मनुष्य मुतावयास फार वेळ जातो यास बहुमूत्रताही ह्मणतात. **उपाय**—प्रमेहरोगांत बहुमूत्रतारोगावर जे उपाय सांगितले आहेत ते करावे.

**७७ सप्तधातुगतवात—रसगतवात** ( मा. नि. )—त्वचेमध्यें वात कोपला असतां ती त्वचा रुक्ष, फुटीर, मेहेरलेली, पातळ, काळी व तीत टोंचल्याप्रमाणें पीडा, लाल होऊन ओढल्यासारखी, व मर्मस्थानी पीडा हे उपद्रव होतात. **उपाय**—( १ ) स्नेहपान, अभ्यंग व घाम काढणें हे उपचार करावे.

**रक्तगतवात**—अत्यंत पीडा, संताप, विवर्णता, कृशपणा, अरुचि, अंगावर व्रण, व भोजनोत्तर अंगाचा स्तंभ हे विकार होतात. **उपाय**—( १ ) शीतळ असे लेप, तीक्ष्ण रेच व रक्तमोक्ष हे उपचार करावे.

**मांसगतवात**—अंग जड होतें, दुखतें, ताठतें, दांड्यानें किंवा मुष्टीनें चेंचल्यासारखें दुखतें व अत्यंत निश्चळ होतें. **उपाय**—रेचक द्यावें.

**मेदोश्रितवात**—अंगावर गांठी, किंवा थोडे दुखणारे व्रण, यांना उत्पन्न करितो. **उपाय**—रेचक द्यावें व व्रणोक्त क्रिया करावी.

**अस्थिगतवात**—वायु दुष्ट होऊन अस्थीमध्यें राहिला असतां हाडें व पेयांच्या ठायीं ठणका, अंगाच्या संधीच्याठायीं शूल, मांस व बल यांचा क्षय, निद्रानाश, आणि अंगात निरंतर ठणका हे विकार होतात. **उपाय**—स्नेहपान, व स्नेहानें मर्दन करावें. ( २ ) केवड्याचें मूळ व लहान व मोठा चिकणा याचा पुष्कळ रस काढावा आणि दहीवराचें पुष्कळ पाणी घेऊन त्यांत सिद्ध केलेलें तेल योजावें.

**मज्जागतवात**—अंगांतील ठणका केव्हांही शांत होत नाहीं. **उपाय**—स्नेहपान व स्नेहानें मर्दन करावें.

**शुक्रगतवात**—शुक्रगतवायु कुपित झाला असतां गर्भाला किंवा शुक्राला बांधतो किंवा विवर्णादि करितो. किंवा सोडतो अथवा गर्भ आणि शुक्र यांना विकृति उत्पन्न करितो. **उपाय**—( १ ) हर्ष उत्पन्न करणारें आणि बल व धातु यांना वाढीवणारें असें अन्न व पान द्यावें. ( २ ) तूप पिणें, घाम काढणें, वांति व रेचक द्यावें. ( ३ ) शुद्ध शिलाजीत ४ गुंजा व वंगभस्म १ गुंज सहा मासे

गाईचे तुपांत प्रातःकाळीं व अस्तमानीं सेवन करीत जावें. याप्रमाणें २१ दिवस केलें असतां सर्व शुक्रदोषा पासून पुरुष मुक्त होऊन प्रजोपत्ति. ( ४ ) नुस्तें अजमोद्यानें सिद्ध केलेलें तूप प्राशन केल्यानेंही शुक्रदोष नाश पावतात.

**शिरागत वायु**—याचा कोप झाला असतां शूळ, शिरा आंखडणें, शिरा स्थूल होणें, बाह्यायाम, अंतरायाम, खल्लीवात, किंवा कुब्जवात, इत्यादि विकार करितो. **उपाय**—स्नेहपान, अंगाला तेल मर्दन, पेंड, लेप आणि रक्त काढणें हे उपचार करावे.

**स्नायुगतवायु**—शूल, वातरोग, कंप व स्तंभ ही लक्षणें होतात. किंवा सर्वांगवात, किंवा एकांगवाताला उत्पन्न करितो. **उपाय**—( १ ) घाम काढणें, पेंड बांधणें, डाग देणें, बांधणें व मर्दन करणें हे उपचार करावे.

**संधिगतवात**—संधींचा नाश, संधीस ठणका व शूल हे विकार होतात. **उपाय**—(१) चोंचे देणें, घाम काढणें व पेंड देणें हे उपचार करावे. ( २ ) कडू वृंदावनाचें मूळ व पिंपळी हीं समभाग त्यांत दुप्पट गूळ घालून त्यातून एक तोळ्याची गोळी भक्षण करावी व वर ऊन पाणी प्यावें; ह्मणजे संधिगतवाताचा नाश होईल. ( ३ ) दोन तोळे पाण्यांत पाव तोळा किराईत भिजत घालून सकाळीं त्यांतच चांगलें कोंवळून तें पाणी गाळून त्यांत चार गुंजा शिलाजीत, दोन गुंजा कापूर व सहा मासे मध घालून द्यावें.

**पित्तकफाश्रितप्राणवायु** ( मा. नि. )—प्राणवायु पित्तयुक्त दुष्ट झाला असतां वांति आणि दाह उत्पन्न करितो व तोच कफयुक्त कोपला असतां दुर्बलपणा, अंग गळणें, झापड, व तोंड बेचव होणें, हे विकार होतात.

**पित्तकफाश्रित उदानवायु** (मा नि.)—उदानवायु दुष्ट झाला असतां दाह, मूर्छा, भ्रम व अनायासें श्रम हे विकार होतात. व तोच वायु कफानें दुष्ट झाला असतां घाम येत नाहीं, रोमांच उभारतात, अग्नि मंद होतो आणि थंडी वाजते.

**पित्तकफाश्रितसमानवायु** (मा. नि.)—हा वायु कोपला असतां घाम, दाह, उष्णता व मूर्च्छा, हे विकार होतात. तोच कफयुक्त कोपला असतां मळमूत्रांचा अवरोध आणि रोमांच हे विकार होतात.

**पित्तकफाश्रितअपानवायु** (मा. नि.)—हा वायु कोपला असतां दाह, उष्णता, आणि लघवी रक्तासारखी हे विकार करितो. तोच कफयुक्त कोपला असतां कंबरेखाली शरीर जड, व थंडी हे विकार करितो.

**पित्तकफाश्रितव्यानवायु** (मा. नि.)—हा वायु कोपला असतां दाह, अंग गळणें व श्रम, हीं लक्षणें होतात. व हाच कफाश्रित झाला तर अंग ताठणें, सूज व शूळ, हीं लक्षणें होतात.

**सर्वांगवात** ( मा. नि. )—सर्व अंगांत वात कुपित झाला असतां गात्राचें स्फुरण होतें. जांभया, आणि सांधे वेदनानीं व्याप्त असून फुटतातच काय असें होतें. **उपाय**—( १ ) सर्व अंगास वातहारक तेल किंवा नुस्तें तेल खूप मर्दन करून नंतर ऊन पाण्यानें स्नान करावें. ( २ ) पिंवळा कोरांटा, देवदार व सुंठ यांचा काढा एरंडेल घालून द्यावा; ह्मणजे ज्याचें शरीर अगदीं वायूनें जखडलेलें असलें तरी तो नीट होऊन शीघ्र व मंद जसा पाहिजे तसा चालूं लागेल. ( ३ ) महारास्नादि काढा द्यावा. हा काढा आमवातरोगांत सांगितला आहे. ( ४ ) बिबव्याचे तुकडे दीड तोळा व पाणी १६ तोळे यांचा काढा चतुर्थांश करून त्यांत साखर ॥ तोळा, तूप २ तोळे, गाईचें दूध ४ तोळे मिश्र करून पुन्हां कढवून थोडा आटला म्हणजे ताकाबरोबर घ्यावा; म्हणजे सर्वांग वाताचा नाश होईल यांत संशय नाहीं.

**स्थाननामलक्षण** ( मा. नि. )—वर बहुतकरून सर्व वायूंचे रोग सांगितलेच आहेत. बाकी राहिलेल्या वायूंस त्या त्या स्थानावरून त्यांस नांव द्यावें. व तदनुसार चिकित्सा करावी. या सर्व वायूमध्यें पित्तादिकांचा संसर्ग असतो तें फार सूक्ष्म रीतीचें जाणावें. या शिवाय शरीराचे ठायीं कोणत्याही अवयवावर ह्मणजे पाय, घोटे, पोटऱ्या, वगैरे ठिकाणीं वायूचा कोप झाला असतां त्याजवर देश काल व बलाबल पाहून वायुहारक चिकित्सा करावी.

**सर्व प्रकारचे वातव्याधींवर तैलें**—( १ ) रुईचे पानाचा रस, शेवग्याचे सालीचा रस, काळ्या धोत्र्याच्या पानाचा रस, या प्रत्येकांचे पावशेर पावशेर रस, त्यांत तिळाचें तेल पावशेर व पावशेर पाणी आंत घालून मंदाग्नीनें तेल शेष राहितोंपर्यंत कढवून गाळून कुपींत भरून ठेवावें व तें तैल चोळीत जावें; म्हणजे सर्व प्रकारचे संधिवाताचा नाश होतो. ( २ ) पुढें तेल प्रकरणांत जी वायुहारक तैलें दिली आहेत त्यांपैकीं जें हितावह वाटेल त्याचा उपयोग करावा. ( ३ ) गुग्गुळ प्रकरणांत गुग्गुळ सांगितले आहेत ते योजावे. ( ४ ) विषगर्भतैल—निर्गुडीचा रस, माक्याचा रस, काळ्या धोत्र्याचा रस, ही प्रत्येक ६४ तोळे आणि वेखंड, कोष्ठ, धोत्र्याचें बीज, कांगोणी व कायफळ, ही प्रत्येक औषधें दोन दोन तोळे व बचनाग या सर्वांच्या समभाग, यांच्या कल्कांत तिळाचें तैल ६४ तोळे घालून युक्तीनें पचन करावें. तें सर्व वायूंवर चोळलें असतां सर्व प्रकारचे वायूंचा नाश होतो. ( ५ ) एरंडमूळ, निर्गुडीचा रस, मुंडी, शेवग्याचें मूळ, शतावरी, कांडवेल, रिंगणी, डोरली व लाल एरंडाचें मूळ, हीं प्रकेक दहा दहा तोळे घेऊन यांच्या काढ्यांत तिळाचें तैल सिद्ध करावें. त्याचा अभ्यंग केला असतां त्वचा, हाडें व स्नायु आणि सर्वांगामध्यें कोपलेले वायूचा नाश होतो. ( ६ ) मालकांगोणी, रानमेथी, शहाजीरें, ओंवा मेथ्या आणि तीळ, हीं सर्व औषधें समभाग घेऊन चूर्ण करून पातालयंत्रानें तैल काढावें. त्याचे अभ्यंगानें सर्व प्रकारचे वायूंचा नाश होतो.

**सर्व वातव्याधींवर पेंड व लेप**—( १ ) ज्या जागीं वायूचा उपद्रव होतो

त्या जागेवर वस्ताऱ्यानें फांसण्या टाकून त्यावर गुंजा उष्ण पाण्यांत भिजत घालून वांटून त्याचा पेंड बांधावा; ह्मणजे त्यानें अवबाहूक, विश्वाची, गृध्रसी आणि इतर सर्व वातसंबंधीं पीडा त्वरित नाश पावतात. ( २ ) नवसागर, सैंधव, काळा बोळ, बचनाग, समुद्रफळ, कोष्ठ, जेपाळाच्या आंतील पांढरे गोळे, आफू आणि चिकणामूळ यांचें चूर्ण निंबाच्या रसांत खलून ऊन करून त्याचा जाड असा लेप करावा. तो ८० प्रकारचे वायूंचा सहज नाश करितो. ( ३ ) बाळांतशेपा, देवदार, कोष्ठ व सैंधव यांचें चूर्ण रुईच्या चिकांत भिजवून त्यानें लेप करावा म्हणजे अस्थिगतवात, कटीवात, व संधिवात यांचा तीन दिवसांत नाश होतो. ( ४ ) निर्गुडीचा पाला बारीक वाटून त्याचा जाड असा लेप करावा.

**सर्व वायूंवर पोटांत घेण्याचीं औषधें**—( १ ) शुद्ध रसकापूर १ गुंज, कस्तूरी १ गुंज, मिरीं ९ तोळे व लवंगा ९ तोळे, हीं एकत्र खलून सूक्ष्म चूर्ण करून तीन मासे चूर्ण आल्याचे रसांत द्यावें; याप्रमाणें दोन्ही साज सेवन केलें असतां सर्व प्रकारचे वायू व विशेषेंकरून अर्धांगवायु यांचा नाश होतो. ( २ ) जिरें १ तोळा, कडूवृंदावन, लवंगा, जायपत्री, जायफळ, केशर, पारा, गंधक, हिंगूळ, बचनाग व मिरी ही सर्व औषधें अर्धा अर्धा तोळा व कस्तूरी । तोळा, या सर्व औषधांचें चूर्ण एकत्र करून आल्याच्या रसात एक दिवस खल करावा व वालप्रमाण गोळी करावी व ती आल्याचा रस आाणि मध यांत देत जावी; म्हणजे नानाप्रकारच्या वायूंचा तीन किंवा सात दिवसांत निश्चयानें नाश होईल. ( ३ ) पिपळी, लवंगा, चित्रकमूळ, हीं एकेक तोळा, कस्तूरी ३ मासे, ही सर्व औषधें एकत्र करून त्यांचा आल्याचा रस, शेवग्याचे सालीचा रस व नागवेलीच्या पानाचा रस यांत पृथक् एकेक दिवस खल करून गोळी वालप्रमाण बांधावी व एक गोळी मधांत द्यावी; म्हणजे मोठा प्रबळही वायूचा विकार झाला असल्यास मनुष्य ताब्डतोब शुद्धीवर येऊन दांतखिळी बसली असल्यास ती उघडते. ( ४ ) बिबव्याचीं टरफलें एक तोळा घेऊन १६ तोळे पाणी घालून अष्टमांश काढा करावा. त्यांत निर्गुडीचा रस सहा मासे व शेवग्याचे सालीचा रस सहा मासे व थोडा मध घालून द्यावा म्हणजे सर्व प्रकारचे वायूंचा नाश होतो. ( ५ ) ओंव्याचें फूल ४ तोळे, तेजबळ १ तोळा, व सुंठ १ तोळा, या सर्वांसमान जुना गुळ घालून ८ मासे प्रमाणाची गोळी बांधावी आणि सांजसकाळ एकेक गोळी तुपांत देत जावी. म्हणजे सर्व प्रकारचे वायूंचा नाश होतो. ( ६ ) मृतसंजीवनी रस द्यावा. ( ७ ) समीरपन्नग द्यावा. ( ८ ) वातराक्षस द्यावा. ( ९ ) द्वात्रिंशक गुग्गुळ द्यावा. ( १० ) योगराज गुग्गुळ द्यावा. ( ११ ) त्रयोदशांग गुग्गुळ द्यावा. ( १२ ) अजमोदादि वटी द्यावी. ( १३ ) अमरसुंदरवटी द्यावी. ( १४ ) सुंठ, एरंडमूळ, देवदार, गुळवेल व कोरांटा यांचा काढा मध घालून द्यावा. ह्मणजे अस्तिगत व संधिगतवात यांचा नाश होतो. (१५) आहाळीव, खसखस, खारीक, तीळ, शेपा, बाळंतशेपा, बिबव्याच्या आंतील गोडंब्या, बदामाचे आंतील गोळे, डिंक व चारोळ्या, ही प्रत्येक चार चार तोळे, मे-

ध्या २ तोळे, गूळ व तूप प्रत्येक ३२ तोळे, हीं सर्व एकत्र करून दोन तोळे प्रमाणाचें लाडू बांधावे. एक प्रातःकाळीं व एक अस्तमानी भक्षण करावा; ह्मणजे कटीवायूचा नाश होतो. धातूचें स्तंभन व धातूची वृद्धि होऊन कंबरेस चांगली शक्ति येते. ( १६ ) रास्ना, गुळवेल, एरंडमूळ, देवदार, हरीतकी, कचोरा, चिकणामूळ, वेखंड, पाहाडमूळ, शेपा, पुनर्नवा, पंचमूळें, अतिविष, मुंडी, बिवा, ओंवा, पुष्करमूळ, आस्कंद, लाजाळू, गोखरू, आडूळसा, खिरणी, वरधारा, शतावरी, ब्राह्मी, गुग्गुळ, आणि आस्कंद, हीं औषधें समभाग घेऊन त्यांचा काढा करावा. आणि त्यांत पिंपळीचें चूर्ण, योगराज गुग्गुळ, एरंडेल यांतून कोणतेंही एक घालून द्यावा; ह्मणजे संपूर्ण वातरोग, कफशोष, प्रतानक, मन्यास्तंभ, शोष, पक्षघात, आर्दित, आक्षेपक, कुब्जत्व, हनुग्रह, स्वरभंग, आढ्यवात, मूकवात, खंजत्व, अवबाहुक, गृध्रसी, जानुभेद, गुल्म, शूळ, कटीग्रह, आमवात, निरामवात, सप्तधातुगतवात, आवृत्त, अनावृत्त, आणि वातरक्त, यांचा नाश करितो. याला बत्तिसा काढा म्हणतात. ( १७ ) रास्ना, एरंडमूळ, देवदार, वेखंड, सुंठ, धमासा, हरीतकी, अतिविष, नागरमोथे, शतावरी व आडूळसा यांचा काढा मध घालून द्यावा; म्हणजे आमवात, खोकला, कफवात, संधिगतवात, व मज्जा, अस्थि व स्नायु यांतील वायु आणि सर्वांग वायु हे निश्चयानें नाश पावतात. ( १८ ) शेवग्याचें मूळ, पिंपळी, रास्ना, सुंठ, गोखरू, सैंधव, चित्रक व एरंडमूळ यांचें चूर्ण ऊन पाण्याशीं दररोज प्रातःकाळीं द्यावें. किंवा हें चूर्ण आल्याचे रसांत खलून गोळ्या कराव्या. एक गोळी मधांत द्यावी. किंवा पिंपळी, रास्ना, सुंठ, गोखरू, सैंधव व चित्रकमूळ याचे चूर्णाला एक शेवग्याचे मुळाचे रसाची भावना व एक एरंडमुळाच्या रसाची भावना देऊन गोळी एक माशाची बांधावी. व आल्याचा रस आणि मधांत देत जावी; ह्मणजे सर्व अंगांत कोपलेला वायु अति त्वरेनें शांत होतो. ( १९ ) कोष्ठ, इंद्रजव, पाहाडमूळ, चित्रकमूळ, अतिविष व हळद यांचें चूर्ण ऊन पाण्याशी द्यावें. तें अनेक वातविकारांचा नाश करितें. ( २० ) रास्ना, पुनर्नवा, सुंठ, गुळवेल व एरंडमूळ यांचा काढा मध घालून द्यावा; तो सप्तधातुगत वात, आमवात आणि सर्वांगवात यांचा नाश करितो. ( २१ ) आल्याचे रसांत ओंव्याचें चूर्ण घालून त्यानें सर्व अंग मर्दन करावे व त्याचेंच नस्य द्यावें; ह्मणजे वातकोपाची शांति होते.

**साध्यासाध्य विचार** ( मा. नि. )—हनुस्तंभ, आर्दित, आक्षेप, पक्षाघात, अपतानक हे व्याधि चागले उपचार मिळाले असतां बहुत दिवसांनीं व मोठ्या यत्नांनीं साध्य होतात अथवा कधीं असाध्यही होतात. परंतु बलवान् पुरुषाचेही व्याधी नवीन असून उपद्रवरहित असले तर तद्वत चिकित्सा करावी. विसर्प, दाह, शूल, मल, मूत्र याचा निरोध, मूर्च्छा, अरुचि, अग्निमांद्य, ह्या लक्षणांनी युक्त झालेला आणि बलक्षीण झालेला अशा पुरुषास पक्षवधादिक विकार मारक होतात—सुजलेला, अंग मेहरलेला, उमेद खचलेला, कंप आणि आध्मान ह्यानी अत्यंत पीडित, व शूळ याणी युक्त अशा मनुष्यास वातव्याधि नष्ट करितो.

**वातरोगावर पथ्य**—अभ्यंग, मर्दन, घाम, स्नान, डाग, पेंड, भूमीवर शयन, ताकाची निवळ, तूप, तेल, गोड, आंबट, व खारट हे रस, जुने गहूं, उडीद, जुन्या साटक्या साळी, कुळीथ, पशुपक्ष्यादिकांचें मांस,पडवळ, शेवगा, वांगी, लसूण, दाळींब, आंबा, वाहतें पाणी, बोरें, द्राक्षें, नारिंग, खडीसाखर, चिंच, स्निग्ध व उष्ण भोजन, रेच, गुदवर्ती, इरसाल आंबा, आंब्याची पोळी, केळफूल, जुना गूळ, ऊन पाणी, अक्रोड, आहाळीव, कवठ, करवंद, जायफळ, गोड ताक, एरंडेल, बेदाणा, तांबड्या साळी, तीळ, कबाबचिनी, ब्राह्मी, गोडंबी, भुईकोहळा, कोंवळा मुळा, मेथीची भाजी, पिठीसाखर, गोडा सुरण, हिंग, शेळीचें दहीं, गाईचे लोणी, करटोलीं, गोमूत्र, विडा, हीं पथ्यें जाणावी.

**वातरोगावर अपथ्य**—चिंता, जागरण, मलमूत्रादिकांचा वेगरोध, वांति, श्रम, उपोषण, हरबरे, वाटाणे, गव्यीसाळी, वर्या, सावे, नाचण्या, राळे, तळें व नदी यातील पाणी, तुरट, तिखट व कडु हे रस, मैथुन, हत्ती व घोडा यांजवर बसणें, फार फिरणें, बाजेवर निजणें, ताडफळ, चवळ्या, जांभूळ, सुपारी, धेंडसीं, आंबा, हिरवे मूग, थंड पाणी, क्षार, कारलें, आवई, रक्तस्राव, तिखट व कडु हे रस वातरोग्यांनी सोडावे.

---

## वांति ( छर्दि ).

॥ छर्दयः पंचविज्ञेयास्तासांलक्षणमुच्यते ॥

**अर्थ**—पाच प्रकारची छर्दी म्हणजे वांति होते. त्यांचीं लक्षणें पुढें सांगतों तीं येणेंप्रमाणें —

**कर्मविपाक**—जन्मसमयी षष्ठमस्थानीं शुक्र किंवा बुध, शुक्र दक्षिण चंद्रानें दृष्ट असता वांतिरोग होतो. **परिहार**—बुध, शुक्र मंत्राचा जप, दानें, होम, अश्वदान, रौप्यधारण, इत्यादि करावें.

**पूर्वकर्मविपाक**—पूर्वजन्मी जो केंस, कीटक, कावळे, कुत्रें, इत्यादिकांनीं दुषित झालेलें अन्न होमार्थ किंवा ब्राह्मणास देतो त्यास अथवा विश्वासघातकी जो त्यास ओकारीरोग होतो. **परिहार**—ब्राह्मणभोजन, घृतयुक्त अन्नदान इत्यादि दैविक प्रतिकार करावा.

**पूर्वरूप**—मळमळ सुटते, ढेकर बंद होतो, तोंडाला खारट पाणी सुटतें व अन्नपानावर अत्यंत द्वेष होतो.

**वांतीचें कारण** [ मा. नि. ]—अत्यंत पातळ व स्निग्ध व किळस आणणारे व खारट पदार्थ ह्यांच्या सेवनानें, अकाळी भोजन केल्यानें किंवा अति मात्र

भोजनांनीं अथवा जें सोसत नाहीं तें खाल्यानें, श्रमानें, भयानें, शिसारी आल्यानें, अजीर्णानें, कृमिदोषांचे योगानें, गर्भिणी स्त्रीला गर्भोत्पीडनानें, तसेंच घाईघाईनें जेवणानें अथवा दुसऱ्या बीभत्सकारणांनीं जोरानें, झटकन, वर आलेला दोष तोंडाला आच्छादन करितो. आणि अंगाचा विळा, खिळा, करून पीडा करितो. म्हणून या रोगाला छर्दि, [ ओकारी ] असें म्हणतात. ह्यामध्यें दोष तोंडावाटें धांवतो.

**वातछर्दि** [ मा. नि. ]—हृदय व बरगड्या यांस पीडा, तोंडास कोरड, मस्तक आणि नाभी यांच्या ठिकाणी शूळ, खोकला, स्वरभेद आणि सुया टोंचल्याप्रमाणें पीडा, ह्या लक्षणांनीं युक्त ओकतो. उद्गार [ ढेंकर ] आणि शब्द हे त्यांत फार असतात, वमनाला फेंस फार असतो, राहून राहून फार वांति होते, किंवा थोडी होते तिचा रंग काळा असून पातळ, तुरट व थोडी असते, वेग मोठा असल्यानें दुःख फार होतें.

**वातछर्दि** [ वा. भ. ]—वातजनितछर्दींत वायु, नाभी व पाठ यांत वेदना करून आहार बाजूस टाकितो. नंतर तुरट, थोडें थोडें फेंसयुक्त शब्द व ढेंकर यांणी युक्त, काळें व पातळ असें मोठ्या कष्टानें व वेगानें रोगी ओकतो. व खोकला, तोंडास कोरड, हृदय, डोकें व स्वर यास पीडा व ग्लानि, हीं लक्षणें होतात.

**वातछर्दीवर उपाय**—इजवर लंघन करूं नये. [ १ ] सैंधवाची पूड तुपांत द्यावी. [ २ ] सैंधव, बीडलोण व कांचलोण यांचेबरोबर अथवा मिठाबरोबर दूध व पाणी एकत्र करून प्यालें असता वायूपासून झालेली ओकारी व उम्हासे यांचा नाश होतो.

**पित्तछर्दि** [मा. नि.]—भोंवळ, तहान, कोरड, डोकें, तालू आणि डोळे हीं तापतात, अंधारी, चक्कर, यांणी पीडलेला रोगी, पिंवळे, कढत, हिरवें, कडू, धुरकट आणि दाहयुक्त असें पित्तानें ओकतो.

**पित्तछर्दि** [ वाग्भट ]—पित्तापासून क्षाराच्या पाण्यासारखें, धुरकट व कर्णाचें, हिरवें, पिवळें, रक्तमिश्रित, आंबट, कडू व उष्ण असें वमन होतें, व त्यांत तहान, मूर्छा, ताप व दाह, ही लक्षणें होतात.

**पित्तछर्दीवर उपाय**—[ १ ] दुर्वांचा रस तांदुळाचे धुवणाबरोबर प्यावा. [ २ ] आडूळशाचा रस, साळीच्या लाह्या व साखर एकत्र करून सेवन करावा. [ ३ ] पित्तपापड्याचा काढा थंड करून मध घालून प्यावा. तो पित्तापासून झालेली वांति, मस्तकाचा ताप व डोळ्यांचा दाह यांचा नाश करितो. [ ४ ] साळीच्या लाह्यांचें पीठ, तूप, साखर व मध घालून चाटलें असता मोठ्या दुस्तर पित्तछर्दीचा नाश होईल.

**कफछर्दि** ( मा. नि. )—झांपड, तोंडाला गोडी, कफाचा स्राव, संतोष, [ जेवल्याप्रमाणें संतोष असणें ], झोंप, अरुचि, जडपणा, यांनी पीडिलेला मनुष्य, स्नेहयुक्त, घट्ट, गोड, पांढरें असें कफानें ओकतो. व ओकते वेळेस थोडी पीडा होते व अंगाला शहारे येतात.

**कफछर्दि** [ वाग्भट ]—कफापासून स्निग्ध, दाट, थंड, मधुर, खारट, अतिशय व अडखळत येणारें वमन असून त्यांत कफाच्या तंतूंचीं जाळी असतात. व त्यामध्यें रोमांच उभे राहणें, तोंड सुजणें व गोड होणें, झांपड, उम्हासे व खोकला, हीं लक्षणें यांत असतात.

**कफछर्दीवर उपाय**—[ १ ] तांबड्या साळीचा भात, गाईचें दहीं व साखर यांचें नित्य भोजन करावें. [ २ ] वावडिंग, त्रिफळा व त्रिकटू, यांचें चूर्ण मधाशीं चाटावें. [ ३ ] काकडशिंगी, धमासा, यांचें चूर्ण मधात द्यावें.

**सन्निपातछर्दि** [ मा. नि. ]—त्रिदोष वातींत शूळ, अजीर्ण, अरुचि, दाह तृष्णा, श्वास, मोह, यांनीं युक्त, मोठ्या वेगानें, खारट, आंबट, नीलवर्ण, दाट व रक्तमिश्रित असें ओकतो.

**सन्निपातछर्दीवर उपाय**—[ १ ] बेलाचे सालीचा अथवा गुळवेलीचा काढा मध घालून द्यावा. [ २ ] भाजलेल्या मुगाचा काढा मध व साखर यानीं युक्त ओकारी, अतिसार, दाहवज्वर, यांचा नाशक आहे. [ ३ ] बोराच्या आठीचा मगज, पिंपळी, मोराच्या पिसाची राख, साखर व मध हीं एकत्र करून चाटलीं असतां ओकारी व उचकी शांत होते. [ ४ ] गंधक, कमलाक्ष, जेष्टीमध, शिलाजीत, रुद्राक्ष, टांकणखार, हरणाचें शिंग, चंदन, तवकीर व गोरोचन हीं सर्व समभाग घेऊन चूर्ण करून बेलाच्या मुळाच्या काढ्यात एक दिवस खल करून गोळी वालप्रमाण बांधावी व मधांत द्यावी, ह्मणजे त्रिदोषजछर्दि नाश पावेल. याला वमनामृतयोग असें ह्मणतात.

**आगंतुकछर्दि** [ मा. नि. ]—बीभत्स पदार्थांच्या दर्शनादिकांपासून झालेली, डोहाळे न पुरविल्यापासून न झालेली, अजीर्णानें झालेली, असात्म्य ( न सोसणाऱ्या ) पदार्थांपासून झालेली अथवा कृमिजन्य या सर्व कारणापासून झालेली, आगांतुक वांति पांचवी होय. ती पूर्वी सांगितलेल्या लक्षणावरून ज्या दोषांचें आधिक्य दिसेल त्या दोषांच्या प्राबल्यानें जाणावी. कृमिजन्य छर्दींत शूळ, हृदय लसलसणें, हें फार असतें. आणि बहुतकरून कृमि आणि हृद्रोग यांच्या लक्षणासारख्या लक्षणांनीं ती जाणावी.

**साध्यलक्षण**—निरुपद्रवी असली तर साध्य जाणावी.

**असाध्य लक्षण** ( मा. नि. )—ज्या वेळेस वायु हा पुरीष, स्वेद, मूत्र व उदक यांस वाहणाऱ्या मार्गाचा रोध करून वर येतो. तेव्हा वर आलेला दोष ह्म-

णजे मळादिक कोष्ठांतून बाहेर काढून वांति करितो. त्या वांतीला विष्ठेचा व मूत्राचा दुर्गंध येतो व रंगही तसाच असतो. तहान, श्वास, कास, व शूळ, हीं लक्षणें होतात. वांति वारंवार मोठ्या वेगानें होते. अशा लक्षणांनीं युक्त रोगी लवकर नाश पावतो. क्षीण पुरुषाची व वारंवार एकसारखी होणारी कासादि उपद्रवानीं युक्त, रक्त व पूमिश्रित, मोर-पिसाच्या चांदव्यासारखी दिसणारी अशी असाध्य जाणावी.

**छर्दीचे उपद्रव** [ मा. नि. ]—कास, श्वास, ज्वर, उचकी, तहान, चिंता, हृद्रोग, तमक-श्वास, हीं लक्षणें ओकारीचे व्याधींत असतात असें जाणावें.

**सर्व प्रकारचे वांतींवर उपाय**—जसजसा दोष असेल तसतसा विचार चार करून उपाय योजावे. आणि पुष्कळ दिवसांची जी ओकारी आहे तिजवर वातनाशक उपचार करावे. घाणेऱ्या व वाईट अशा पदार्थांच्या अवलोकनापासून किंवा दुर्गंधानें ह्मणजे वाईट वासानें जी ओकारी होते ती चांगले स्वच्छतेचे उपायांनीं दूर करावी. व जी स्त्रियांस गरोदरपणी डोहोळ्यांपासून होते ती चांगले सुंदर अंतःकरणास प्रिय अशा पदार्थांनीं जिंकावी. आपल्या मनांत नाही अशा वस्तूपासून लागलेली ओकारी ती लंघन व वमन आपल्या प्रकृतीस मानलेले पदार्थ अशांनीं घालवावी. कृमीपासून जी होते ती कृमि व हृद्रोग यांजवर जे उपाय सांगितले त्या उपायांनीं बंद करावी. [१] मसुराचें पीठ, पिकलेल्या डाळिंबाच्या बिया व मध हे एकत्र करून भक्षण करावें; ह्म० वात, पित्त व कफ यांपासून उद्भवलेल्या वांतीचा नाश होतो.[२] बेलफळ व आंब्याची कोय याचा काढा मध व साखर घालून द्यावा; ह्म० अतिसार व वांति यांचा नाश होतो. [३] मोराच्या पिसाची राख मधांत द्यावी.[४] केळीच्या काद्याचा रस मधांत द्यावा. [ ५ ] पिकलेल्या कौठाचे गिरांत मध व पिंपळी घालून तो वारंवार चाटावा. [ ६ ] करंजाचें बीज किंचित् भाजून तुकडे करून वारंवार नुस्ते खावे म्हणजे मोठ्या दुस्तर छर्दीचें निवारण होईल. [ ७ ] पितांबराचे फडक्यांत जिरे घालून विडी करून पेटवून नाकानें ओढावी म्हणजे फार दिवसाचे वांतीचा नाश होईल. [ ८ ] जाईचे पाल्याचा रस, पिके कवठाचा रस, पिंपळी, व मिरी याचें चाटण मधात द्यावें; म्हणजे फार उग्रवांतीचा नाश होईल. [ ९ ] गुळवेलीचा हिम मध घालून दिला असतां मोठ्या दुर्निवार वांतीचाही नाश करितो. [ १० ] वांतिहृद्रस अनुपान योजून द्यावा.

**वांतीवर पथ्य**—रेचन, वमन, लंघन, स्नान, जुन्या साटक्या साळी, मूग, वाटाणे, जुने गहू, यव, मद्यें, ससा, तित्तिर, लावे इत्यादि जंगलांतील पशु, पक्षी, यांची मांसें, नारळ, निंबू, आंवळे, बोरें, द्राक्षें, कवठ, डाळिंब, महाळुंग, जायपत्री, खडीसाखर, चंदन, चादणें, उत्तम सुवास, हारकाचा भात, साळीच्या लाह्या, पिकलेलें कवठ, काकडी, पांढरा कांदा, चुका, काळी द्राक्षें, धणे, मटक्या, गाईचें तूप, तापवून निवालेलें पाणी, ताजें थंड पाणी, मेथीची भाजी, गोडा सुरण, शेपू, चाक-

वत, तुरी, जायफळ, मनुका, कबाबचिनी, भुईकोहळा, लवंग, पिठीसाखर, गोमूत्र, गोड आंबे, उडीद, जायफळ, वाळ्याचें पाणी, ही पथ्यें जाणावी.

**वांतीवर अपथ्य**—नस्य, घाम, काढणें, रक्तस्राव, पातळ अन्न, आकाशाचें अवलोकन, भीति, ऊन, अप्रिय व अरुचिकर अन्न, दुध्या भोपळा, तोंडलीं, दोडकी, व्यायाम, विरुद्धान्न, मेंढीचें लोणी, उन पाणी, लसूण, स्नेहपान, हे पदार्थ वर्ज करावे.

---

## विषरोग.

॥ स्थावरं जंगमं चैव द्विविधं विषमुच्यते ॥ मूलात्मकं तदाद्यं स्यात्परं सर्पादिसंभवम् ॥

**अर्थ** (मा.नि.)—स्थावर आणि जंगम असे दोन प्रकारचें विष आहे. त्यात मूलादिक जें विष ते स्थावर आणि सर्पादिक विषारी प्राण्याचें तें जंगम होय. विष ह्मणजे विषाद उत्पन्न करितें, म्हणून विष ह्मणतात. मूलादि विष दहा प्रकारचें आणि सर्पादि सोळा प्रकारचें **सुश्रुतांनीं** सांगितलें आहे तें असें—मूळ, पान, फळ, फूल, साल, चीक, नार, डिक, धातु आणि कंद; आणि दृष्टि, निःश्वास, दंत, नख, मूत्र, पुरीष, शुक्र, लाळ, केंस, चिमटा, विशर्धित ( गुदावाटें वारा सरतो तो ) ( पाद ) गुद, अस्थि, पित्त, शुक, आणि शव ही सोळा जंगमविषें जाणावी.

**जंगमविषाचें सामान्य लक्षण** ( मा. नि. )—झोंप, तंद्रा, क्लम, दाह अन्नाचा अपाक, रोमांच, सूज आणि ढाळ, हीं लक्षणें होतात.

**स्थावर विषाचें सामान्य लक्षण** ( मा. नि. )—स्थावर विषानें ज्वर, उचकी, दांत सळसळणें, गळा धरणें, फेंसाची ओकारी, अरुचि, श्वास, आणि अत्यंत मूर्छा हीं लक्षणें होतात.

**असाध्य लक्षण** ( सुश्रुत )—बाल, वृद्ध, क्षुधित, कृश झालेलें, उरःक्षती, मेही, कुष्ठी, रुक्ष, ( निस्तेज ) निर्बल आणि गरोदर स्त्री, ज्यांचे सर्वांगांत विष व्याप्त झालें त्याचे अंगास चाकूनें कांपलें असतां रक्त येंत नाहीं, चावकानें मारल्यास वळ उठत नाहीं व थंडगार पाणी अंगावर शिपडलें असतां रोमांच उभे रहात नाहींत तो रोगी असाध्य जाणावा. व ज्याचें मुख वांकडें होतें, केंश गळतात, नाकाचें अग्र वांकडें होतें, मानेचा काटा मोडल्यामुळें मान सावरत नाहीं, दंशस्थानीं लाल व काळी अशी सूज येते. हनुवटी हालत नाहीं, ही लक्षणें झालीं असतां रोगी असाध्य जाणावा. ज्याचें तोंडावाटें दाट लाळेचा लोंढा वाहतो व नाक, तोंड, गुदद्वार यांतून रक्त स्रवूं लागतें तो आणि अत्यंत उन्मत्त झालेला, ज्वर, अतिसार यानीं युक्त, काळा ठिक्कर पडलेला, मळ, मूत्र वेगरहित, व कुलक्षणानीं युक्त असा रोगी असाध्य जाणावा.

**अफूवर उतार**—( १ ) वेखंडाचें चूर्ण २ मासे व सैंधवाचें चूर्ण २ मासे अर्धी वाटी पाण्यांत कालवून पिण्यास द्यावें. ( २ ) सुमारें ३ किंवा ४ मासे टांकणखाराचें चूर्ण तुपांत द्यावें म्हणजे उलटी होऊन अफू पडते. ( ३ ) हिंग ३ किंवा ४ मासे ताकांत किंवा पाण्यांत कालवून बलाबल पाहून पिण्यास द्यावा. ( ४ ) ज्यांनी अफू खाल्ली असेल त्यांनीं झोंप घेऊं नये हें मुख्य औषध आहे. ह्मणजे कितीही अफू खाल्ली असेल व त्यास बिलकूल झोंप घेऊं दिली नाही तर अफूनें तो मरणार नाहीं.

**उंदराचे विषावर** ( सुश्रुत )—विषारी उंदीर चावला असतां दंशस्थानांतून रक्त वाहतें तें पांढरें असतें, अंगावर मंडळें उठतात, ज्वर, अरुचि, अंगाला शहारे, दाह, मूर्छा, दंशस्थानीं सूज, रंग बदलणें, बहिरेपणा, मस्तक जड, तोंडांतून लाळ किंवा रक्त यांची वांति ही सामान्य लक्षणें होतात. **उपाय**—( १ ) दंशस्थानी उदेल तेल चोळावें. ( २ ) तुळशीचें रसांत अफू उगाळून दंशस्थानी दिवसांतून पांच चार वेळ लावावी म्हणजे विष उतरेल.

**कुत्र्याचे विषावर** ( वा. भ. )—पिसाळलेलें कुत्रें डसलें ह्मणजे व रोग्यास विषाचा अम्मल चढल्यावर त्याचे तोंडास मेहरी येते, व त्यांतून काळें रक्त वाहतें त्या योगानें छातींत किंवा मस्तकांत दुखतें, ज्वर, अंग ताठणें, तहान, मूर्छा, भ्रम, संताप, श्वास, खोकला, नेत्राला पिवळेपणा, मूत्रांत किडे पडणें, उन्माद, कुत्र्यासारखें भोंकणें, दुसऱ्या मनुष्यास चावावयास धांवणें. या विषाचा उद्भव पर्जन्य लागतांच, गढूळ पाणी आलें ह्मणजे व आभाळांत गडगडूं लागलें ह्मणजे होतो. हें विष वातप्रधान असून सर्व दोषांला कोपवितें. **उपाय**—( १ ) कोंबड्याचे विष्ठेचा दंशावर पेंड बांधावा. ( २ ) बकाण निंबाचे, मुळ्याचा किंवा साळीचा रस सकाळी दोन तोळे व संध्याकाळी दोन तोळे याप्रमाणें तीन दिवस प्राशन केला असतां हटकून गुण येतो. ( ३ ) गाईचें दूध अतपाव त्यात कुचल्याचें बीं सुमारें एक गुंज उगाळून प्राशन करावें. याप्रमाणें सर्व बीचें मान सात दिवसपर्यंत क्रमानें वाढवावें; ह्मणजे गुण येतो.

**बचनागाचे विषावर**—( १ ) पोटभर दूध पिण्यास द्यावें. ( २ ) सुमारें २ मासे कापूर पावशेर पाण्यांत कालवून पिण्यास द्यावा.

**विंचवाचे विषावर**—( १ ) बचनाग किंवा जेपाळबीज पाण्यांत उगाळून दंशावर लेप करावा. ( २ ) कांद्याचा रस मधमिश्रित दंशावर चोळावा. ( ३ ) शिकेकईचें चूर्ण सुमारें ३ मासे विड्यांत द्यावें. ( ४ ) मोहाचें मेण किंचित् ऊन करून दंशावर लावावें आणि खाते तेलानें थोडा वेळ तेथें मर्दन करावें म्हणजे विष उतरेल.

**सर्पाचे विषावर**—( १ ) सबज्याचे पाल्याचा ४ तोळेपर्यंत दरवेळीं या-

प्रमाणें दोन किंवा तीन वेळ दिल्यानें विष उतरते. (२) कडू निंबाचे पाल्याचा रस पाणी घालून काढावा. व प्रत्येक तासाच्या अवकाशानें प्रत्येक वेळी सुमारें एकेक तोळा देत गेल्यानें सर्पाचें विष उतरेल. ( ३ ) रिठ्याचे फळाचें अंजन करावें. (४) रुईचें मूळ सुमारें सहा मासेपर्यंत पाण्यांत उगाळून पिण्यास द्यावें.

**सोमलाचे विषावर**—( १ ) तुपांत कापूर मिश्र करून तें तूप पोटभर पिण्यास द्यावें. ( २ ) केळीचे सोपाचें पाणी पावशेरपर्यंत पिण्यास द्यावें. ( ३ ) चार मासे टांकणखाराचें चूर्ण आतपाव तुपांत घालून पिण्यास द्यावें. ( ४ ) फार विष भक्षण केलें असल्यास वांतीचें औषध देऊन वांत्या करवाव्या. आणि मधून मधून वांति बंद होईपर्यंत शक्तीप्रमाणें शेळीचें दूध पाजीत जावें. जेव्हां दूध पोटांत राहील तेव्हां विष उतरेल असें समजावें.

**विषरोगावर पथ्य**—वांगीं, चुका, आंवळे, तादुळजा, लसूण, दालिंब, सैंधव, अगस्त्याच्या शेंगा, करटोली, कवठ, खजूर, खिरण्या, पाढरा घेवडा, सातपुती घोसाळी, गाईचें तूप, दुध्याभोपळा, गाईचें दूध, हरीक, साटक्या साळी, पावटे, कडवे, वाल, साखरनिंबू, तापवून निवालेलें पाणी, करवंद, घोळ, तांबड्या साळी, सावे, कबाबचिनी, थंड पाणी, ब्राह्मी, लवंगा, पिठीसाखर दूधभात व दहीभात हीं पथ्यें करावीं.

**अपथ्य**—विरुद्धान्न, भोजनावर लागलेंच भोजन, क्रोध, भय, आयास, मैथुन, दिवसांस निद्रा, तांबूल, गोडा सुरण, तेल व म्हशीचें तूप हे पदार्थ वर्ज करावे.

---

## विद्रधि.

॥ पृथग्दोषैः समस्तैश्चक्षतेनाप्यसृजातथा ॥ षण्णामपिहितेषांतुलक्षणंसंप्रचक्षते ॥

**अर्थ** ( मा नि. )—पृथक् दोषानीं ३, सन्निपातानें १, क्षतानें १, रक्तानें १ मिळून सहा प्रकारची विद्रधि होतात, त्या सहा विद्रधींचे लक्षण सागतों.

**कर्मविपाक**—याचा कर्मविपाक गुल्मरोगाप्रमाणें जाणावा.

**पूर्वकर्मविपाक**—ब्राह्मणाच्या फळाची चोरी केली असतां विद्रधिरोग होतो. **परिहार**—सुवर्णाचा आम्रवृक्ष फलासह करून त्याचें पूजन करून ब्राह्मणास दान करावें.

**विद्रधींचें कारण व लक्षण** ( वाग्भट )—शिळे, अति उष्ण, रुक्ष, वाळलेले व विदाही पदार्थ खाल्लयानें, वेड्यावांकड्या शय्येवर निजल्यानें, विरुद्ध चेष्टा केल्यानें, व त्या त्या रक्तदूषित करणाऱ्या कारणांनीं, त्वचा, मांस, मेद, अस्थी,

स्नायु, रक्त व कंडरा यांत बाहेरच्या बाजूस किंवा आंतल्या बाजूस जी सूज येते त्यास विद्रधि असें ह्मणतात. तो फार खोल गेलेला असतो. वेदना फार होतात. वाटोळा किंवा लांबोळा असतो.

**विद्रधीचें कारण** ( मा. नि. )—अत्यंत वाढलेले व अस्थीचा आश्रय करून राहिलेले वातादि दोष, त्वचा, रक्त, मांस आणि मेद यांस दुष्ट करून हळु हळु भयंकर शोथ उत्पन्न करितात. त्याचें मूळ अस्थीपर्यंत गेलेलें असतें. उत्पत्तिकाळींच अत्यंत पीडा करणारा व वाटोळा, अथवा लांब जो शोथ असतो त्याला विद्रधि ( गळू केंसतोडें ) असें ह्मणतात

**वातजवि०** ( मा. नि. )—काळा, अरुण, विषम म्हणजे कदाचित् लहान, कदाचित् मोठा, अत्यंत वेदनायुक्त, त्याचा उद्गम आणि पाक हे नाना प्रकारचे असतात. त्यांजवर व सर्व विद्रधीवर जळवा लावणें, मृदू रेच, लघु अन्न, घाम काढणें हे उपचार करावे. परंतु पित्तविद्रधि खेरीज करून.

**पित्तजविद्रधि** ( मा. नि. )—पिकलेल्या उंबरासारखा, अथवा शामवर्ण, ज्वर आणि दाह करणारा, वेदनायुक्त असून त्याचा उगम व पाक लवकर होतात. **उपाय**—( १ ) त्रिफळ्याचा काढा १ तोळा, निशोत्तराचें चूर्ण घालून द्यावा. ( २ ) वड, उंबर, पायरी, जांभूळ व आंबा, यांच्या साली वांटून तूप घालून लेप द्यावा अथवा वाळा व चंदन दुधात वाटून लेप द्यावा.

**कफजविद्रधि** ( मा. नि. )—परळासारखा ह्मणजे मोठा, पांडुरवर्ण, थंड, स्निग्ध, व अल्पवेदनायुक्त असतो. त्याचा उगम आणि पाक उशीरा होतो. यांजवर ( १ ) विटकर, वाळू, लोखंड, घोड्याची लीद, कोंडा व गोमूत्र हीं उष्ण करून त्याची वाफ देऊन घाम काढावा.

**सन्निपातवि०**—हे तिन्ही दोषांनीं युक्त असतात.

**स्तनविद्रधि**—प्रसूत किंवा गरोदर अशा स्त्रियांच्या स्तनांच्या शिरांला वायु दुष्ट करून घट्ट अशी सूज उत्पन्न करितो. त्याची बाह्य विद्रधीसारखी लक्षणें असतात. हा स्तनविद्रधि कन्या ( मुलीच्या ) नाड्या सूक्ष्म असतात म्हणून त्यांना होत नाहीं. **उपाय**—पक्व आणि अति पुवानें स्रवणारा असा विद्रधि, नाडीव्रण, भगंदर व गंडमाळा यांचेठायीं त्रिफळा व गुग्गुळ खावा. व लघुभोजन हें पथ्य करावें. ( २ ) शेवग्याचा डिक, हिंग व सैंधव यांचें चूर्ण रोज प्रातःकाळी सेवन केलें असतां विद्रधीचा लवकर नाश होतो.

**अंतर्विद्रधि** ( मा. नि. )—कुपित झालेले वेगळे किंवा एकत्र झालेले वातादि दोष शरीरामध्यें गुल्मासारखा, वारुळाप्रमाणें, वाढलेला, असा विद्रधि उत्पन्न करितात. त्याचीं स्थानें गुद, बस्तीचें तोंड, बेंबी, कुक्षी, आडसंधि, कुक्षिपिंड,

काळीज, हृदय, क्लोम, ( पिपासास्थान ) इतक्या ठिकाणीं विद्रधि होतात. त्यांचीं लक्षणें बाह्यविद्रधि—लक्षणाप्रमाणेच जाणावीं. गुदामध्यें विद्रधि झाला असतां वायूचा रोध होतो, बस्तीमध्यें झाला असतां कष्टानें थोडें थोडें मुतावयास होतें. नाभीमध्यें झाला असतां उचकी, व रुजापूर्वक क्षोभ होतो. कुशीमध्यें वायूचा कोप होतो व क्षणांत कंबर आणि पाठ, हीं बळकट जखडतात. कुक्षिपिंडांत बरगड्यांचा संकोच होतो. प्लीहेमध्यें उच्छ्वास कोंडतो, हृदयांत सर्व अंगाचें ग्रहण व कंप होतो. काळजांत श्वास आणि उचकी हे लागतात. क्लोमामध्यें रोग्याला वारंवार पाणी पिण्याची इच्छा होते.

**स्रावनिर्गम** ( मा. नि. )—नाभीच्या वरतीं जे विद्रधि होतात, ते पिकले म्हणजे त्याचा स्राव तोंडावाटें होतो. नाभीच्या खालतीं होणाऱ्याचा स्राव गुदमार्गानें होतो. नाभीचे ठिकाणीं झालेल्याचा स्राव उभयमार्गानें होतो. खालून स्रवूं लागले, म्हणजे रोगी वांचतो, आणि वरून स्रवूं लागलें, म्हणजे वांचत नाहीत.

**साध्यासाध्यलक्षण** ( मा. नि. )—हृदय, नाभी, आणि बस्ति हीं स्थानें सोडून झालेले ह्मणजे प्लीहा, क्लोम इत्यादि विद्रधि बाहेर फुटले असतां कदाचित् पुरुष वांचतो. इतराचे ठिकाणी वांचत नाहीं.

**असाध्यलक्षण** ( मा. नि. )—आध्मानयुक्त, मूत्र गुंतलेला, ओकारी, उचकी, तृषा, ठणका व श्वास यांनीं युक्त अशा पुरुषाचा विद्रधि असाध्य जाणावा.

**अंतर्विद्रधीवर उपाय**—( १ ) हिराकस, सैंधव, शिलाजीत व हिंग, यांचें चूर्ण घालून वायवर्ण्याचा काढा दिला असतां अपक्क, मोठा, शोफयुक्त, अशा विद्रधीचा नाश करील. ( २ ) शेवगा, ओंवा, वायवर्णा, दारुहळद, हळद व पिपळी यांचा काढा मध घालून द्यावा तो अपक्क विद्रधीचा नाशक आहे. ( ३ ) श्वेतपुनर्नव्याचें मूळ, व वायवर्ण्याचें मूळ, यांचा काढा मध घालून द्यावा. तो अपक्क विद्रधीचा नाशक आहे. ( ४ ) पित्तपापड्याचे मूळ, तांदुळाचे धुवणांत वांटून मध घालून प्यावें; ह्मणजे फार कठिण अंतर्विद्रधीचा लवकर नाश करील. ( ५ ) हिरडा, सैंधव, व धायटीचें फूल यांचें चूर्ण मध व तूप यांत द्यावें; ह्मणजे उग्र अंतर्विद्रधीचा निश्चयानें लवकर नाश करील. ( ६ ) शेवग्याचें मूळ पाण्यात उगाळून त्यांत मध घालून द्यावें; आणि त्याच रसांत बचनाग उगाळून वर लेप करावा. ह्मणजे अंतर्विद्रधीचा नाश होईल. ( ७ ) पुनर्नवा व वायवर्णा, यांचा मध घालून काढा द्यावा. ( ८ ) शेवग्याचे सालीचा काढा हिंग, घालून द्यावा.

**विद्रधीवर पथ्य**—अपक्क विद्रधीवर रेचन, लेप, घाम काढणें, जळवा किंवा तुंबडीनें रक्तमोक्ष, जुने सावे, जुन्या साळी, कुळीथ, लसूण, पावटे, मध, तांबूल, व

सुजेवर जीं पथ्यें सांगितलीं आहेत, तीं हितकारक आहेत. पक्क विद्रधीवर शस्त्रकर्म जुन्या तांबड्या साळी, तूप, तेल, मूग, निर्जल देशांतील मांसाचा रस, ऊंस, केळें, तापवून थंड केलेलें पाणी, आणि व्रणावर जीं पथ्यें सांगितलीं, तीं सर्व पक्क विद्रधीवर करावी. तांबूल, एरंडेल, पडवळ, इ० सेवन करावें.

**विद्रधीवर अपथ्य**—शोफी मनुष्यास ज्या अपथ्य वस्तु आहेत, त्याच अपक्क विद्रधी-रोग्यास जाणाव्या. आणि व्रणरोग्यास, ज्या अपथ्य वस्तु आहेत त्याच पक्क विद्रधीरोग्यास अपथ्य जाणाव्या.

---

## विसर्प.

॥ लवणाम्लकटूष्णादिसंसेवाद्दोषकोपतः ॥ विसर्पः सप्तधा ज्ञेमः सर्वतः परिसर्पणात् ॥

**अर्थ** (मा नि.)—लवण, आम्ल, कटु, उष्ण, व हिरवी शाक, व पेंड वगैरे भक्षिल्यानें वातादिक दोष कुपित होऊन सात प्रकारचे विसर्पाला करितात, हा रोग शरीरावर सर्पासारखा त्वरित पसरतो; म्हणून विसर्प म्हणतात, व लोकांत धांवेरें असें म्हणतात.

**विसर्पाचें कारण व लक्षण** ( वा. भ. )—विषारी प्राणी अंगावरून गेल्यानें किंवा अंगावर मुतल्यानें व निर्विष प्राण्यांचेही दाढा, दात, व नखें अंगास लागल्यानें मळ, मूत्र व शुक्र यांनी माखलेले व मळकट वस्त्र पांघरल्यानें विषारी झाडावरचा वारा लागल्यानें व कृत्रिम विष अंगास लागल्यानें जो मऊ चंचल ( एकाच जागी न राहणारा ) व मांसास लागलेला शोफ ( सुज ) उत्पन्न होतो, तो विषजन्य होय. तो लवकर उत्पन्न होतो. आणि त्यांत दाह व वेदना असतात. वात, पित्त, कफ, सन्निपात या भेदानें चार आणि द्वंद्वजापासून तीन एकूण सात आहेत. त्यांत वातपित्तापासून आग्नेय विसर्प, कफवातापासून ग्रंथ्याख्य व कफापित्तापासून कर्दम विसर्प जाणावें.

**साध्यासाध्य लक्षण** ( मा. नि. )—वात, पित्त व कफ यांपासून झालेला साध्य, सन्निपातज, क्षतज व मर्मस्थानीं झालेला, आणि पित्तापासून काजळासारखें काळें अंग होतें तो असाध्य जाणावा.

**विसर्पाचे उपद्रव** ( मा. नि. )—ज्वर, अतिसार, वांति, तहान, मांस गळणें, अनायासानें श्रम, अरुचि, अन्न न पचणें, हे उपद्रव विसर्पाचे ठिकाणीं होतात असें जाणावें.

**शास्त्रार्थ**—( १ ) विसर्पावर प्रथम लंघन नंतर विरेचन, वमन, लेप, सेचन आणि रक्तमोक्ष करावा. व विदाही औषधावांचून दोष पाहून क्रिया करावी. ( २ )

निशोत्तर व बाळहिरडे यांचा काढा रेचनार्थ द्यावा. ( ३ ) त्रिफळ्याच्या काढ्यांत तूप व निशोत्तराचें चूर्ण घालून विसर्प, ज्वरशांति आणि रेच होण्याविषयीं द्यावा.

**वातविसर्प** ( मा. नि. )—याचें लक्षण वातज्वरासारखें असतें. सूज, स्फुरण, टोंचणी, भेद व पीडा, ठणका व रोमांच हे होतात, व विसर्प लावट असतो. **उपाय**-( १ ) रास्ना, निळें कमळ, देवदार, चंदन, जेष्टीमध आणि चिकणा, यांना दुधांत वांटून तूप घालून लेप द्यावा.

**पित्तविसर्प** ( मा. नि. )—याचें लक्षण पित्तज्वरासारखें असतें. हा लवकर पसरतो. व अत्यंत लांब असतो. **उपाय**—( १ ) पुंडरीकवृक्षाची साल. मंजिष्ट, कमळकेशर, चंदन, जेष्टीमध आणि निळें कमळ, हीं दुधांत वांटून लेप करावा.

**कफविसर्प** ( मा. नि. )—याचें लक्षण कफज्वरासारखें असतें. व त्यास कंडू फार असून तुळतुळीत असतो. **उपाय**—( १ ) पूर्वी वांति द्यावी. नंतर रेचन द्यावें. ( २ ) गेळफळ, जेष्टीमध, कडूनिंब व इंद्रजव याचें चूर्ण अथवा काढा ओकारी होण्यास द्यावा.

**सन्निपातविसर्प** ( मा. नि. )—हा त्रिदोषांच्या लक्षणांनीं युक्त जाणावा. **उपाय**—( १ ) शतधौतघृतानें वारंवार लेप करावे. ( २ ) शिरस, जेष्टीमध, तगर, चंदन, एलची, जटामांसी, हळद, दारुहळद, कोष्ठ आणि वाळा, या १० औषधांचा कल्क करून तूप घालून लेप करावा; ह्मणजे विसर्प, कुष्ठ, व्रण आणि सूज, यांचा नाश होतो.

**अग्निविसर्प** ( मा. नि. )—वातपित्ताची लक्षणें यांत असतात. या विसर्पाचे योगानें सर्व शरीर रसरसीत, निखारे ओतल्याप्रमाणें होतें. ज्या ठिकाणीं तो विसर्प पसरतो तें ठिकाण कोळशाप्रमाणें काळें, निळें, तांबडें होऊन त्वरित सुजतें, अग्नीनें भाजल्याप्रमाणें वर फोड येतात. शीघ्रगति असते, यामुळें तो झटकन हृदयाला जाऊन भिडतो अथवा अत्यंत बलवान् होतो, संज्ञा व निद्रा यांचा नाश श्वास, उचकी हे होतात. अस्वस्थपणामुळें भुईवर, अंथरुणावर किंवा बसूनही कोठें सुख होत नाहीं. हालचाल करूं लागला असतां क्लेश होतात. मनाला व देहाला क्लेश झाल्यानें उत्पन्न होणारी अशी दुर्बोध निद्रा ( मरणरूप निद्रा ) त्याला प्राप्त होते. या रोगाला अग्निविसर्प ( आग्याधावरें ) असें ह्मणतात. **उपाय**—( १ ) वड, उंबर, पिंपळ, पायरी आणि नांदरूख या ५ सालीचा कल्क करून त्यात शतधौतघृत घालून लेप करावा, तो दाहयुक्त विसर्पाचा नाश करितो. (२) आडूळसा, खैर, कडू पडवळ व कडुनिंब यांचीं पानें व साल, गुळवेल व आंवळकठी या सर्वांचा काढा व कल्क यांनीं घृत पचन करावें. तें रक्तविसर्प, कुष्ठ आणि गुल्म याचा नाश करितें. ( ३ ) कडू पडवळ, आडूळसा, किराईत, कडुनिंब, कुटकी, बेहडे, आंवळकठी व चंदन यांचा गुग्गुळ घालून काढा करावा. तो संपूर्ण दोषांपासून झालेला उग्र विसर्प, वांति, दाह, भ्रांति आणि तहान यांचा नाश करितो.

**ग्रंथिविसर्प** ( मा. नि. )-लांबट, लहान, वाटोळा, मोठा, खरखरीत असा, तांबड्या गांठीच्या माळा करितो. त्यास ठणका फार लागतो, कढत ताप, श्वास, खोकला, अतिसार, तोंडाला कोरड, उचकी, ओकारी, घेरी, भ्रांति, वर्ण फिरणें, मूर्च्छा, अंगमोड, अग्निमांद्य, ही लक्षणें होतात. हा कफवातापासून होतो. **उपाय**—(१) वडाच्या पारंब्या, गुंजा व केळाचें कोंल यांचा शतधौत घृतांत लेप करावा.

**कर्दमविसर्प** ( मा. नि. )---यांत कफपित्ताचीं लक्षणें होतात. हा आमाशयावर उत्पन्न होऊन मग चोहींकडे पसरतो, फार दुःख होत नाहीं, पिंवळ्या, तांबूस व पांढऱ्या अशा पुळ्या त्याजवर येतात, तुळतुळीत शाईसारखा, काळा, मळकट, सुजलेला, जड व आत पिकलेला असून त्याला फार जळजळ असते, तो दाबतांक्षणींच ओला होतो व त्याला चिरा पडतात. चिखलाप्रमाणें होऊन मांस गळतें. तेणेंकरून शिरा, स्नायु, उवड्या पडतात व त्याला मुडद्यासारखी घाण येते. **उपाय**-[१] शिरसवृक्षाच्या सालीचें चूर्ण शतधौतघृतांत घालून लेप करावा.

**क्षतजविसर्प** ( मा. नि. )---बाह्य कारणानें क्षत होऊन त्यापासून वायु कुपित होऊन रक्तासहित पित्ताला व्रणांत आणून विसर्प उत्पन्न करितो. त्यावर हुलग्यासारखे शामवर्ण फोड येतात. सूज, ज्वर, ठणका, आणि दाह असून रक्त काळसर होतें. **उपाय**--[ १ ] गुळवेल, आडूळसा, कडू पडवळ, कडू निंबाची साल, त्रिफळा, कात व वाहाव्याचा मगज, यांच्या काढ्यात चतुर्थांश गुग्गुळ घालून द्यावा, तो विसर्प आणि कुष्ठ याचा नाश करितो. [ २ ] नागरमोथे, कडू निंब, वेखंड, कडू पडवळ, याचा काटा तूप घालून द्यावा; ह्मणजे सर्व प्रकारचे विसर्पाचा नाश होतो, [ ३ ] किराईत, आडूळसा, कुटकी, कडू पडवळ, त्रिफळा, चंदन व कडू निंब, यांचा काढा साखर घालून द्यावा, तो विसर्प, दाह, ज्वर, सूज, कंडू, फोड, तृषा व वांति यांचा नाश करितो. [ ४ ] धोत्रा, नागवेल, जाई, मोरवेल, कपिला, कोष्ठ, कोळिजन व मनशीळ इतक्यांचे बरोबर तेलयुक्त पारा खलून लाविला असतां कुष्ठ, कंडू. विसर्प, फुटलेले पाय, व त्वचेचा काळेपणा यांचा नाश होतो. [ ५ ] द्वंद्वज विसर्पावर त्रिदोषनाशक क्रिया करावी. व कुष्ठरोगावरची रसायनें, घृतें, चूर्णें इत्यादि योजावीं.

**विसर्पावर पथ्य**---वांति, जुने यव, जुने गहू, साटकें भात, मूग, मसुरा, चणे, तुरी, जंगलातील प्राण्यांचे मांसरस, लोणी, तूप, द्राक्षें, कारलें, डाळिंब, पडवळ, आवळकठी, पिकलेलें कवठ, कवाबचिनी, तापवून निवालेलें पाणी, हें सेवन करावें.

**विसर्पावर अपथ्य**---व्यायाम, दिवसांस निद्रा, मैथुन, वारा घेणें, क्रोध, शोक, वांतीच्या वेगाचें धारण, जडान्न व पान, लसूण, कुळीथ, उडीद, तीळ, विदाही पदार्थ, मीठ, आंबट, तिखट, मद्य, आणि उद्योग हे वर्ज करावे.

---

## विस्फोट.

**विस्फोटाचें कारण** ( मा. नि. )--तिखट, आंबट, तीक्ष्ण ( मोहऱ्या वगैरे ) उष्ण, विदाही, रुक्ष, क्षार अशा रस सेवनानें अजीर्ण, अधिक भोजन, आतप, ऋतुविपर्यय ( ऋतूचा पालट ) दोषामुळें वातादिक दोष कुपित होऊन त्वचेंत राहतात आणि रक्त, मांस व अस्थी, यांतें दूषित करून अत्यंत भयंकर अशा फोडांला उत्पन्न करितात. व त्या विस्फोटांत ज्वर असतो. 'ह्या सर्व विस्फोटांचें मुख्य कारण रक्त व पित्त आहे तें होण्यापूर्वी बळकट ताप येतो. याजवर पूर्वी लंघन करावें, नंतर वांति द्यावी, नंतर दोष, व बळ, पाहून योग्य रेचक द्यावें.

**वातविस्फोट** [ मा. नि. ]--कपाळ दुखणें, ठणका, ताप, तृषा, सांधे फुटणें, डोळ्यांला काळेपणा, व फोड काळे असतात. **उपाय**--[ १ ] दशमुळें, रास्ना, दारुहळद, वाळा, धमासा, गुळवेल, धणे, आणि नागरमोथे यांचा काढा खडीसाखर घालून द्यावा.

**पित्तविस्फोट** ( मा. नि. )—ताप, दाह, ठणका, स्राव, फोड पिकणें, तृषा, शरीराचा पिवळा किंवा तांबडा वर्ण होणें, ही लक्षणें यांत होतात. **उपाय**—( १ ) मनुका, शीवणमूळ, खजूर, कडूपडवळ, कडूनिंब, आडूळसा, साळीच्या लाह्या, टेंभुरणी व धमासा, यांचा काढा साखर घालून द्यावा; ह्मणजे उपद्रवयुक्त विस्फोटाचा नाश होतो.

**कफविस्फोट** ( मा. नि. )--ओकारी, अरुचि, जडत्व, व फोड कंडूयुक्त, कठिण, पांढरे आणि त्यांना ठणका लागत नाहीं व ते उशिरानें पिकतात. **उपाय**-( १ ) किराईत, कडूनिंब, आडूळसा, त्रिफळा, इंद्रजव, धमासा, कडूनिंब व कडूपडवळ यांचा काढा साखर घालून द्यावा. येथें कडूनिंब दोन वेळां आला सबब दुप्पट घ्यावा.

**कफपित्तजविस्फोट** ( मा. नि )—कंडू, दाह, ज्वर आणि वांति, हीं होतात. **उपाय**--( १ ) किराईत, कडुनिंब, जेष्ठीमध, नागरमोथे, पित्तपापडा, कडूपडवळ, आडूळसा, वाळा, त्रिफळा, व इंद्रजव, यांचा काढा साखर घालून द्यावा, ह्मणजे द्वंद्वज, त्रिदोषज व रक्तज विस्फोटक यांचा नाश होतो.

**वातपित्तविस्फोट** ( मा. नि. )--यांत फोडाला ठणका फार लागतो. **उपाय**—( १ ) गुळवेल, आडूळसा, कडूपडवळ, नागरमोथे, सात्वीण, तांबड्या खैराची साल, वेताचें कोंब, कडू निंबाचा पाला, हळद, व दारुहळद, यांचा काढा साखर घालून द्यावा; ह्मणजे विसर्प, कुष्ठ, विस्फोट, कंडू, मसूरिका [ देवी ] आणि पित्तज्वर याचा नाश होतो.

**वातकफात्मकविस्फोट** [ मा. नि. ]—कंडू, मंदता व जडत्व यांनीं युक्त असतात.

**सन्निपातविस्फोट** [ मा. नि. ]—जे फोड मध्यें खोलगट आणि कडेला उंच, कठिण, किंचित् पिकणारे असतात व ज्याच्या योगानें दाह, अंगाला लाली, तृषा, मोह, ओकारी, मूर्च्छा, ठणका, ताप, बडबड, कांपरें व झांपड हीं लक्षणें होतात. ते सन्निपातिक जाणावे.

**रक्तपित्तविस्फोट** (सुश्रुत)—अग्नीनें भाजल्यासारखे फोड, अंगावर कांहीं ठिकाणीं किंवा सर्वांगावर येतात. व त्यामुळें ज्वर येतो.

**रक्तजविस्फोट** ( मा. नि. )—फोड तांबडे व गुंजेएवढे असतात, ते रक्त किंवा पित्त दुष्ट होऊन झालेले असतात. ते शेंकडो आनुभविक औषधें योजिलीं तरी साध्य होत नाहीत.

**साध्यासाध्यविचार** (मा. नि.)—एक दोषानेंयुक्त साध्य, द्विदोषज कष्टसाध्य, आणि त्रिदोषज ह्मणजे सर्व लक्षणांनीं युक्त असे भयंकर व ज्यांत उपद्रव पुष्कळ आहेत ते असाध्य जाणावे.

**विस्फोटाचे उपद्रव** ( मा. नि. )—उचकी, दमा, अरुचि, तहान, अंगग्लानि, हृदयास पीडा, विसर्प, ज्वर व मळमळ हे उपद्रव असतात.

**सर्व प्रकारचे विस्फोटांवर उपाय**—[ १ ] किराईत, अडूळसा, कुटकी, कडू पडवळ, त्रिफळा, चंदन आणि कडूनिंब यांचा काढा खडीसाखर घालून द्यावा; ह्मणजे विसर्प, दाह, ज्वर, सूज, कंडू, विस्फोट, तहान आणि वांति याचा नाश करितो. [२] कडुनिंबाची साल, खैराची साल, गुळवेल आणि इंद्रजव याचा काढा मध घालून द्यावा. [३]रास्ना, निशोत्तर, दारुहळद, माका, आडूळशाचीं पानें, सब्जाचें बी अ०पानें, त्रिफळा व मंजिष्ठ यांचा काढा साखर घालून सात दिवस दिला असतां विस्फोटाचा नाश होतो. [४]खाती हळद, लकडी रेवाचिनी, वावडिंग, नाकेशर, धमासा, बाळहिरडे, निशोत्तर, कडू किराईत व त्रिफळा यांचा काढा व निकाढा साखर घालून सात दिवस देत जावा. [ ५ ] कांड्याचा गंधक १० तोळे, मनशीळ ५ तोळे व गाईचें तूप १५ तोळे, यांचा एकत्र खल करून तें मलम सर्वांगास लावीत जावें. [ ६ ] शुद्ध मनशीळ ·१ तोळा व खडीसाखर १ तोळा, यांचें चूर्ण गाईच्या तुपांत खलून अंगास मर्दन करावें व सात दिवस स्नान करूं नये. ( ७ ) शुद्ध आंवळेसर गंधक दररोज दोन मासेपर्यंत गाईचे दुधात घेत जावा. याप्रमाणें सात दिवस घेतला असतां रक्तशुद्धि होऊन अंगांतील गरमी जाऊन विस्फोट बरा होतो.

**विस्फोटावर पथ्य**—वमन, लंघन, क्षुधा लागल्यावर भात, यवान्न, मूग, तुरी, व मसुरा याचे कढणांत थोडी सुंठ घालून देणें, थंड पाणी, तांदुळजा, करटोलीं, पडवळ, वाटाणे आणि कडू असें यूप हें विस्फोट रोग्यास पथ्यास द्यावें.

**विस्फोटावर अपथ्य**—तीळ, उडीद, कुळीथ, मीठ, आंबट, तिखट, दाहकारक पदार्थ, रुक्ष आणि उष्ण हे विस्फोटरोग्यानें वर्जावे.

---

## व्रणरोग.

॥ द्विधा व्रणः परिज्ञेयः शारीरागंतुभेदतः ॥ दोषैराद्यस्तयोरन्यः शस्त्रादिक्षतसंभवः ॥

**अर्थ**—शारीर आणि आगांतुक ह्या भेदानें व्रण दोन प्रकारचे होतात. पहिला (शारीर दोषानी) होतो. व दुसरा शस्त्रादिकेंकरून ( घाय लागल्यानें ) होतो.

**कर्मविपाक**--मंगळ, चंद्र, गुरु, हे तीन ग्रह एक राशिस्थ असून अनिष्ट असतील तर अथवा मंगळाची दशा किंवा मंगळाची दृष्टि गुरूवर इत्यादि योग असता व्रणरोगी, स्त्रीचंचल, सुवर्णालंकारयुक्त, चोर, बुद्धिमान्, शूर, सुरूप, क्रोधी असा होतो. **परिहार**—जो जो ग्रह अनिष्ट असेल त्याचीं दानें, जप, होम इत्यादिक करावीं.

**पूर्वकर्मविपाक**--धर्मज्ञ असून अभिमान, क्रोध, स्नेह, भय, यांच्या आधीन होऊन अधर्म करणारा, अथवा चांडालाचें वचन श्रवण करून भोजन करणारा, किंवा पाण्यांत, आगींत अथवा गळफांसानें आत्महत्या करणारा, व्रण रोगी होतो. **परिहार**-गोप्रदान, ब्राह्मणभोजन, तप्तकृच्छ्र इत्यादि करावें.

**व्रणनिदान**--व्रणांचे पुष्कळ भेद आढळतात, परंतु मुख्य चार भेद आहेत ते हे की, सद्योव्रण, नाडीव्रण, अग्निदग्धव्रण व आगंतुकव्रण, त्यांची एकतंत्रानें निदान व चिकित्सा सागतों.

**सद्योव्रण**--प्रथम एक ठिकाणीं सुज उत्पन्न होते. तिचीं लक्षणें शोध रोगाप्रमाणें जाणावीं. वायूवांचून ठणका लागत नाहीं, पित्तावांचून दाह होत नाहीं व कफावांचून पू होत नाहीं. म्हणून परिपाककाळी तिन्हीही दोष एकत्र होऊन सर्व प्रकारची सूज पिकते. व्रणांतील पू न काढला तर तो मास, शिरा, व स्नायू यांस खाऊन टाकतो. व तेथें नाडीव्रण होतो. जो अज्ञानानें अपक्क शोध पक्क समजून फोडतो व पक्काची उपेक्षा करितो, हे दोघेही अति निच जाणावे. कारण त्यापासून परिणाम भयंकर होतात.—व्रणाला पूर्वी विम्लापन क्रिया करावी, नंतर दुसरी रक्त काढणें, तिसरी पेंड बांधणें, चवथी फोडणें, पांचवी शोधन, सहावी रोपण, ( भरून आणणें ) आणि सातवी विकृतीचा नाश करणें असे सात अनुक्रमें उपाय करावे.—जो व्रणलेप, स्वेद, रक्तमोक्ष आणि तर्पण या क्रियानी शम पावत नाहीं, त्याचें जळवा लावून रक्त काढलें असतां तो शीघ्र नाश पावतो. कारण प्रथम रक्ताला विकार होत असतो. म्हणून तें रक्त काढलें असतां तो विकार लवकर नाश पावतो, याकारितां संपूर्ण क्रियांहून रक्त काढणें ही क्रिया चांगली आहे.

**१ विम्लापन**—प्रथम सुजेवर स्नेह ( तेलतूप ) लावून वेळूच्या फुंकण्या तापवून त्यांनीं शेकावें, व आंगठ्यानें तेल लावून, रगडीत जावें. ही पहिलीच क्रिया होय **२ रक्तमोक्ष**—जर व्रणाला फार सूज, आणि ठणका असला तर प्रथम फांसण्या टाकून किंवा जळवा लावून रक्त काढावें. हा उत्तम उपाय आहे. **३ पक्वव्रण फोडण्याची क्रिया**—सूज पिकल्यावर हस्तीदंत पाण्यांत उगाळून सुजेच्या तोंडावर एक ठिपका द्यावा; म्हणजे कठिण सूज असली तरी पिकून फुटते. यव किंवा गंहू यांचें किंचित् मीठ व हाळद घालून पोटीस करून वर बांधावें किंवा हळदीची राख व कळीचा चुना,हीं पाण्यांत कालवून सुजेच्या तोंडावर एक ठिपका द्यावा ह्मणजे सूज फुटते. **४ प्रक्षालन**—व्रण धुण्याकारितां कडू पडवळ कडू निंब यांचा काढा योजावा. **५ शोधन**—कडू निंबाचा पाला मधांत वांटून लेप केला असतां व्रणाचें शोधन होतें, किंवा तीळ,सैंधव जेष्टीमध, कडू निंबाचा पाला, हाळद व तेड याचें चूर्ण मधांत खलून लेप केला असतां व्रणाचें शोधन होते. किंवा मनशीळ, मंजिष्ठ, लाख, हळद व दारुहळद हीं औषधें तूप व मध यांत खलून लेप केला असता तो व्रणाची चांगली शुद्धि करितो. **६ रोपण (व्रण भरून येणें )**—रात्रीचा लेप करूं नये, पडलेलें व शिळें औषध बांधूं नये, व्रणाच्या मुखावर लेप करू नये. केला असता दोष सांचतात. ( १ ) त्रिफळ्याच्या चूर्णाशी गुग्गुळाच्या गोळ्या कराव्या व एक गोळी द्यावी; ह्मणजे मलबद्धतेचा नाश होऊन व्रणाला शुद्ध करून आंतून भरून आणिते. ( २ ) वावडिंग, त्रिफळा व त्रिकटू व या सर्वासमान गुग्गुळ घालून तुपाशीं गोळी करावी, ती दुष्टव्रण, अपचि, मेह, कुष्ठ आणि नाडीव्रण यांचें शोधन करिते. (३) सज्जीखार, यवखार, कपिला, रेणुकबीज, टांकणखार, पांढरा कात व मोरचूत, या सर्वांचें चूर्ण करून करून गाईचे तुपात एक प्रहर खलावें. या मलमाचे लेपानें सर्व व्रणनाश पावतात व तें व्रणाला आंतून भरून आणितें, व कृमी, कंडू, यांचा नाश करून त्वचेचा चांगला वर्ण करितें. ( ४ ) मोगली एरंडाचा चीक काढून हातावर फेसावा व तो फेंस व्रणावर लावावा; ह्मणजे तात्बडतोब जखम भरून येते. ( ५ ) मोगलीएरंडाचा चीक लोखंडी तव्यावर काढावा. आणि त्यांत पारोसा थुंका मिश्र करून त्या मिश्रणांत रसकापुराचा खडा उगाळून लेप करावा. हा लेप दोन दिवस लावावा. ( ६ ) पांढरा कात १ तोळा, चिकणी सुपारी १ तोळा, व संगजिरें १ तोळा या तिन्ही औषधांची निरनिराळी वस्त्रगाळ पूड करून ठेवावी. नंतर एका कांश्याचे ताटांत सुमोरें दोन किंवा आडीच मासे रसकापूर, दोन किंवा आडीच तोळे लोणी घेऊन त्यांत रसकापूर बारीक करून खलावा. दोन्ही औषधांचा एकजीव झाल्यावर सुपारी,कात व जिरें याच्या केलेल्या पुड्या घालून तें मिश्रण पूर्ववत् घोटावें व जरूर वाटल्यास आणखी लोणी घालून डबीत भरून ठेवावें. हें औषध मोठें रामबाण आहे. याचा लेप केला असता गरमीचे चट्टे, चांदी, सद्योव्रण, आगांतुकव्रण वगैरे सर्व व्रणांचा फार जलदीनें नाश होतो.

**नाडीव्रण** ( मा. नि. )—जो मूर्ख मनुष्य पिकलेली सूज अपक्व म्हणून उ-उपेक्षा करितो किंवा पुष्कळ पू झालेल्या व्रणाची उपेक्षा करितो त्याचा पूर्वोक्त त्वचा, मांसादि स्थानांत जाऊन त्यांचा भेद करून तो फार खोल गेल्यामुळें एक मार्ग होतो त्यातून तो पू नाडीप्रमाणें वाहतो. ह्मणजे बारीक छिद्र होतें. ह्म-णून त्याला नाडीव्रण हें नांव पडलें आहे. त्या लहान छिद्रांतून घट्ट औषध आंत जाऊं शकत नाही त्यामुळें तो बरा होण्यास मोठे प्रयत्न लागतात. म्हणून कु-शळ वैद्यांनीं त्या नाडीची गति पाहून शस्त्रानें फाडून मोठें छिद्र करावें. नंतर सं-पूर्ण शोधनरोपणादि व्रणोक्त क्रिया करावी. परंतु कृश, दुर्बळ, भित्रा अशा रोगाच्या मर्माश्रित नाडीव्रणाला क्षारादिक लावून मोठें छिद्र करावें. शस्त्रानें कधी-ही छेद करूं नये किंवा सोन्याची काडी त्या छिद्राएवढी करून अग्नीत तापवून त्या छिद्राला डाग द्यावा, नंतर अग्निदग्धव्रणावरची क्रिया करावी.

**नाडीव्रणावर उपाय** ( हाड्यात्रण, नासूर )—( १ ) निर्गुंडीच्या मुळ्या, पानें, व फुलें आणून कुटून पाणी घालून रस काढावा. किंवा काढा करून त्यात तिळाचें तल सिद्ध करावें व तें तेल व्रणावर लावीत जावें. ( २ ) पाण्यांतील झाऊची साल समभाग हिंगूळ घालून एकत्र कुटून त्याची व्रणाला धुरी द्यावी; ह्म-णजे तीन दिवसांत व्रण भरून येतो. ( ३ ) तरसाचें हाड वडाचे चिकात उगा-ळून सात दिवस लेप करावा. ( ४ ) चांगलें खोबरें किसून किंचित् उन्हात ता-पवावें. नंतर त्याचे हातानें मळून तेल काढावें. तें तेल प्रथम चुलीवर थोडें गरम क-रून नंतर त्यांत थोडें मोहाचें मेण घालावें. तें वितळले ह्मणजे त्यांत मुरदाडशिंग, व राळ या दोहोंची बारीक पूड करून त्यांत त्या मानानें थोडी टाकावी. व खाली उतरावें. नंतर त्यात शेंदूर, ककोळ, तेजबळ, त्रिफळा व तिळाचें तेल ही प्रत्येक अर्ध अर्ध तोळा घेऊन बारीक चूर्ण करून आत टाकावी व पुन्हां तें मिश्रण एका दगडी खलबत्यांत घालून चांगलें चिकट होईतोंपर्यंत घोटावें व डबीत भरून ठेवावें. हे मलम लाविलें असता सर्व प्रकारच्या गांठी, बदें, विद्रधि, गंडमाळा, दुर्गं-धयुक्त व्रण, नाडीव्रण, आगांतुकव्रण व व्रण इतर सर्व प्रकारचे व्रण व पडलेल्या जखमा या मलमाचे पट्टीनें त्वरित भरून येतात. असा या मलमाचा खात्रीपू-र्वक अनुभव आहे. ( ५ ) घोसाळीची पानें व कडू निंबाची पानें समभाग घेऊन एकत्र बारीक वाटून वडी करावी. ती एक दिवस सावलीत वाळवून, नंतर गाईचें तूप त्या वडीचे सुमारें चौपट तव्यांत घालून ती वडी तळावी, नंतर ती वडी तुपावर तरंगू लागली ह्मणजे काढून ठेवावी आणि बारीक वस्त्राची पट्टी त्या तुपात भिजवून त्याची वात करून त्या वातीनें व्रणास तूप लावीत जावें ह्म-णजे अति दुर्धट व दुर्गंधी युक्त जरी नासरू असला तरी सात दिवसात बरा होतो. ( ६ ) हरणाचे शिंगाची राख व मैदालकडी समभाग तुपात मिश्र करून तें तूप ना-डीव्रणास सोडीत जावें किंवा लावीत जावें. ( ७ ) केवळ शुद्ध पोखरमोहाची मध व्रणांत सोडली असतां किंवा फडक्याला लावून पट्टी दिली असतां सर्व प्रकारचे

फोड, विस्फोटक, चिरा पडलेले व्रण, शस्त्रानें कांपलेले भाग, ठेंचून ठेंचून रक्त निघालेल्या जखमा, सडलेल्या अथवा कुजून दुर्गंधी सुटलेलें असें मांस व त्या भागाचें दुष्ट झालेलें रक्त शुद्ध होऊन व्रणाचे शोधन व रोपण होऊन नाडीव्रणादिक सर्व व्रण भरून येतात. ( ८ ) गांजराच्या अंगरसात मध मिश्र करून व्रणांत सोडिला असतां मांस, अस्थि आणि रक्त यांची शुद्धि होऊन व्रण भरून येतो.

**आगांतुक व्रण** ( मा. नि. )—नाना प्रकारच्या धारांचीं शस्त्रें, अंगावर ठिकठिकाणीं लागून नानातऱ्हेच्या आकृतीचे व्रण ह्मणजे जखमा होतात. त्याचप्रमाणें दगड, लांकूड वगैरे लागल्यानें नानातऱ्हेच्या जखमा होतात. वैद्यानें हे आगांतुक व्रण आहेत असें जाणून त्याला मध व तूप यांनी युक्त व पित्तसंबंधी उष्मानाशक करणारी अशी शीत क्रिया करावी. संपूर्ण व्रणांचा कोप झाला असतां वमन, विरेचन, लंघन आणि बल पाहून रक्त काढावें. **उपाय**—( १ ) तिळाचें ताजें तेल अर्धा शेर गरम करून त्यात मोहाचें मेण पावशेर घालून एकजीव झाल्यावर राळ पावशेर व शेंदूर पावशेर घालून थोडें कढवावें. तें मलम पातळ आहे तोंच त्यात मुरदाडशिंग, सगजिरा, सफेता व मोरचुताची लाही, या औषधांचें पावपाव तोळा चूर्ण आत टाकावें, व एक जागीं करून कढवावें. चांगला चिकटा आला ह्मणजे उतरून ठेवावें व हें मलम शुभ्र पांढरे फडक्यास लावून त्याची व्रणावर पट्टी देत जावी; ह्मणजे नानाप्रकारचे भयंकर व्रण वगैरे असाध्य स्थितींत जरी असले तरी त्याचा सात दिवसांत हटकून नाश होतो. ( २ ) उत्तम सफेता १ तोळा, कापूर २ मासे व संगजिरा ४ मासे त्यांत गाईचें लोणी सुमारें ३ तोळे घालून घोटून मलम तयार करावें. तें उपदंशसंबंधीं चांदी, चट्टे, दाहजन्य व रक्तजन्य, फोड, खरूज, विस्फोट, मूळव्याधीचे व्रण, वगैरे अनेक व्रणावर लाविलें असतां व्रणाचे आंतून शोधन होऊन तात्काळ जखमा भरून येतात ( ३ ) शेंदूर, कोष्ठ, बचनाग, हिंग, कांदा, शरपुंखा ( उन्हाळी ) कळलावी, हरताळ, मोरचुताची लाही व आफू, ही औषधें घेऊन कल्क करून त्यात तिळाचें तेल घालून सिद्ध करावें. ज्या व्रणातून नेहमी पू किंवा पाण्यासारखी लस वाहते त्यांजवर हें तेल रामबाणाप्रमाणें काम करितें. याशिवाय नानातऱ्हेच्या शस्त्राच्या व तलवारीच्या जखमा मोठा भयंकर उपदंश, नाडीव्रण, तळपायांस भेगा पडतात तो रोग व सर्व प्रकारचे फोड यांना हें तेल लाविलें असतां त्वरित नाश पावतात. ( ४ ) राळ, मोहाचें मेण, संगजिरा व कात पढांरा यांचें चूर्ण तुपांत कढवून गाळून तें मलम डबीत भरून ठेवावें व सर्व प्रकारच्या व्रणावर लावीत जावें.

**अग्निदग्ध व्रण**—अग्नीनें किंवा ऊन पाणी किंवा गरम तेल किंवा इतर कोणत्याही रीतीनें अंग भाजल्यास उपाय—( १ ) गाईच्या दुधांत वस्त्र भिजवून त्याच्या वड्या भाजलेल्या ठिकाणीं ठेवाव्या. (२) त्रिफळा, खापरांत घालून वर झांकण ठेवून जाळावा. त्याची राख व रेशमाच्या कपड्याची राख या दोन्ही तेलांत किंवा तुपांत खलून व्रणावर तें मलम लावीत जावें. ( ३ ) चंदन, वडाच्या पारब्या, म-

जिष्ठ, जेष्टीमध, पुंडरीक वृक्षाची साल, दूर्वा, पतंग व धायटीचें फूल, यांच्या कल्कांत तिळाचें तेल व दूध घालून सिद्ध करावें. तें अग्निदग्ध व्रणाला लाविलें असतां व्रणाला तावडतोब भरून आणितें. ( ४ ) कोंबड्याचे अंड्यांतील बलक, लोणी, आणि संगजिरा हीं तिन्ही एकत्र करून तें मिश्रण ढवळून सारखें करावें. आणि पिसानें फार हालके हातानें दोन तीन वेळ लावीत जावें. ( ५ ) पोखर ( झाडाच्या पोकळींत बारीक माशाचें मोहोळ लागतें ) मोहाची मध पिसानें लावावी. ( ६ ) कोरफडीचा बलक वस्त्रानें पिळून त्यांत समभाग लोणी मिश्र करून पिसानें लावावें. ( ७ ) ज्याचे अंगावरील चामडें जळून जाऊन आंतील त्वचा दिसूं लागते, त्याला केळीच्या पानावर निजवावें. नंतर तिळाच्या तेलांत कळीच्या चुन्यावरील निवळ सहापट मिश्रण करून एक घटकापर्यंत काडीनें सारखें करीत रहावें म्हणजे स्वच्छ पांढऱ्या रंगाचें मलम तयार होतें. तें पिसानें फार युक्तीनें दिवसांतून दोन तीन वेळ लावीत जावें. यानें दाह शमन होऊन त्वरित गुण येतो. ( ८ ) बंदुकीचे दारूनें भाजल्यास नुस्तें तुरटीचें पाणी वरचेवर लावीत जावें. अथवा साळीच्या कोंड्याची काळी राख तुपांत खलून लावीत जावी.

**असाध्य लक्षण** ( मा. नि. )—मद्य, अगर तूप, पुष्पें, कमळ, चंदन आणि सोनचांप्याचें फूल यांच्यासारखा किंवा चमत्कारिक पारिजातकादि फुलासारखा सुवास ज्या व्रणाला येतो त्या व्रणानें रोगी जगत नाही.—जे व्रण मर्माचे ठिकाणी उत्पन्न होऊन अत्यंत वेदना करितात ते; व ज्या व्रणांत अभ्यंतरीं दाह, आणि बाहेर थंडावा असतो ते; अथवा बाहेर दाह असून अभ्यंतरी थंड असतात तें; व ज्यामध्यें बळ, मांस यांचा क्षय होते, श्वास, खोकला, अरुचि ह्यांनीं पीडा फार होते असे; व जे व्रण मर्मस्थानीं होऊन त्यांतून पू आणि रक्त फार वाहतात ते; व ज्या व्रणास चांगली चिकित्सा केली असतां साध्य होत नाहींत ते; अशा प्रकारचे व्रण आपलें यश रक्षण करणाऱ्या वैद्यानें सोडावें.

**कष्टसाध्यलक्षण** ( मा. नि. )—कुष्ठी पुरुष, विषार झालेले, क्षयरोगी, मधुमेह अशांचे व्रण कष्टानें साध्य होतात. व ज्यास पूर्वीच्या व्रणावर पुनः व्रण होतात त्याचेही व्रण कष्टसाध्य होतात. ज्या व्रणातून चर्बी, मेद, मज्जा आणि मस्तकांतील स्नेह वाहतात, तो व्रण आगंतुक असेल तर साध्य होतो आणि दोषकृत असेल तर साध्य होत नाही.

**व्रणावर पथ्य**—जुन्या साटक्या साळी, यव, जुने गहु, जुन्या तांबड्या साळी, व मसुरा, तुरी, मूग, खडीसाखर, लाह्याचा मंड, जंगलसंबंधी मृगपक्षी यांची मासें, तूप, तेल, पडवळ, कारली, करटोली, तांदुळजा, अमसूल, मूग, पांढरा ऊंस, खिरण्या, घोळ, जवस, तवकीर, तीळ, तूप, जोंधळे, उन पाणी, सैंधव, काजू, हरीक, कोंवळा मुळा हे पदार्थ पथ्यास द्यावे.

**व्रणावर अपथ्य**—रुक्ष, आंबट, शीतल, मीठ, स्त्रीसंग, श्रम, मोठ्यानें भा-

पण, स्त्रियांचें अवलोकन, दिवसास निद्रा, रात्रीं जागरण, फार फिरणें, शोक, विरुद्धान्न, फार पाणी पिणें, विडा, पालेभाज्या, नवें धान्य, उडीद, तीळ, गूळ, कुळीथ, खिचडी, वाटाणे, पावटे, अनूप मांस, थंड पाणी, तिखट, पिठाचे पदार्थ, दहीं, दूध, ताक, मैथुन, मेहनत, उन घेणें, कोंबड्याचें मांस हे पदार्थ वर्ज करावे.

---

## शीतपित्त.

**शीतपित्ताचें कारण** ( मा. नि. )--अंगावर गार वारा लागल्यानें, कफवायु दुष्ट होऊन पित्ताशी मिळून अभ्यंतरीं ह्मणजे रक्तादिकामध्यें आणि बाहेर त्वचेवर संचार करितात.

**पूर्वरूप** ( मा. नि. )--तहान, अरुचि, तोंडाला पाणी सुटणें, अंग गळणें, अंग जड होणें, व डोळ्याला लाली, ही चिन्हें शीतपित्तापूर्वी होतात.

**उदर्द लक्षण** ( मा. नि. )--गांधीणमाशी डसल्याप्रमाणें त्वचेवर सूज येते, कंडू सुटते, टोंचणी लागते, ओकारी, संताप व आग होणें, या रोगाला उदर्द म्हणतात. कोणी शीतपित्त ह्मणतात, आणि लोकप्रचारांत याला पित्त उठलें आहे असें म्हणतात. यामध्यें कंडू होतो तो कफापासून; टोंचणी लागते ती वातापासून; आणि ओकारी, दाह व संताप हे पित्तापासून होतात. शीतपित्तांत वायु प्रधान असतो व उदर्दांत कफ प्रधान असतो असें जाणावें. उदर्दाचा दुसरा प्रकार असा आहे की, थंडीनें कफाचा कोप होऊन अंगावर तांबडीं चकदळे उठतात, त्याला कंडू फार सुटते, ती मंडळें मध्यें खोलगट व कडेला उंच अशीं असतात.

**कोठलक्षण** ( मा. नि. )--वांतीचें औषध चांगलें लागूं न झाल्यामुळें पित्त आणि कफ उसळले असता किंवा वांतीचा वेग बंद केला असता अंगावर तांबडीं चकंदळें उठतात. त्याला खाज फार सुटते, त्याला उत्कोठ असें ह्मणतात. हाच पुन्हां पुन्हा होतो आणि तो क्षणात उत्पन्न होऊन नाहींसाही होतो. त्याला कोठ म्हणतात.

**सामान्य उपचार**--( १ ) शिरसाचे तेलाचें अभ्यंग करून खूप गरम पाणी अंगावर घ्यावें व कडू पडवळ, कडू निंब आणि आडूळसा यांचा काढा वांति होण्याकरितां द्यावा. ( २ ) तेलांत सैंधव घालून अभ्यंग करावें. ( ३ ) गुळवेल, हाळद, कडू निंब, धणे व धमासा, या प्रत्येकाचा काढा शीतपित्तावर द्यावा; तो प्राणरक्षण करील. ( ४ ) गूळ आणि ओवा एकत्र करून सात दिवस द्यावा म्हणजे उदर्द शमतो. ( ५ ) तुपात सैंधव घालून किंचित् गरम करून त्याचा किंवा तुळशीचे रसाचा अंगास लेप करावा. ( ६ ) ऐरणीच्या मुळाचें चूर्ण तुपांत द्यावें; म्हणजे शीतपित्त, उदर्द आणि कोठ यांचा सात दिवसांत नाश होतो. ( ७ )

शीतपित्त उदर्द, आणि कोठ या व्याधींच्या नाशार्थ, कृमी, दद्रू, यांचा नाशक सर्व विधि करावा.

स्पर्शवात ( सुश्रुत )—अंगाला टोंचल्याप्रमाणें व्यथा, स्पर्श न कळणें, अंगावर मंडळें दिसावीं. असा प्रकार होतो. उपाय—( १ ) पारा १ भाग, हरताळ ८ भाग, यांच्या कज्जलीची गुळांत गोळी करून सूर्योदयीं दोन मासे प्रमाणें द्यावी; म्हणजे स्पर्शवाताचा विकार दूर होईल. ( २ ) पारा ८, कुचली १०, गंधक १२, त्रिकटू ३, त्रिफळा ३, बिबवा, चित्रक, नागरमोथे, वेखंड, आस्कंद, रेणुकबीज, बचनाग, कोष्ठ, कोळिंजन, पिंपळमूळ व नाकेशर, हीं एकेक भाग व गूळ २४ भाग, हीं सर्व एकत्र करून मध्यम बोराप्रमाणें गोळ्या करून एक, दोन, तीन, अशा क्रमानें खाव्या; म्हणजे स्पर्शवाताचा नाश होईल.

शीतपित्तावर पथ्य—जुन्या साटक्या साळी, मूग, कुळीथ जुन्या गव्हाची पोळी, तुरीचें वरण, पडवळ, कारलें, तापलेलें पाणी, तांदुळजा, व कफपित्तहारक पदार्थ, हीं शितपित्त उदर्द आणि कोठ यांजवर पथ्यें जाणावीं.

अपथ्य—स्नान, ऊन घेणें, आंबट, जडान्न हे पदार्थ वर्ज करावे

---

## शुकरोग.

जो मूर्ख मनुष्य, स्त्रीसमागमाविषयीं फार लुब्ध होऊन अकस्मात् शिश्न फार मोठें व्हावें ह्मणजे विषय चांगला होईल ही इच्छा धरून शिश्नाचेठायी वात्स्यायनादि शास्त्रोक्त बिबवे इत्यादिकांचा लेप करितो,परंतु उपचारात विपर्यास पडला असतां शिश्नाचेठायी लिंगार्शादिक शुकरोग उत्पन्न होतात. शुकज म्हणजे जळाचे मुळापासून उत्पन्न होणारा जलतंतु जिव आहे त्याचे सारखा हा रोग असतो. याचे १८ प्रकार आहेत. शिश्नाचें मांस गळून पडूं लागलें म्हणजे तो असाध्य जाणावा. (सुश्रुत)

शुकरोगावर उपाय—( १ ) जळवा लावून रक्त काढावें. ( २ ) पचेल तितकें तूप प्यावें. ( ३ ) तीक्ष्णरेच व मूत्रजुलाब द्यावा. (४) त्रिफळा व गुग्गुळ एकत्र करून गोळ्या करून द्याव्या.

शुकरोगावर पथ्य—वांति, रेच, जळवा लावणें, यव, साळी, अरण्यसंबंधीं मांसें, मूग, तूप, करटोली, शेवगा, पडवळ, कोंवळा मुळा, कडू,तुरट,व गोड हे रस, विहिरीचें पाणी, तेल, व उपदंशावर जीं पथ्यें सांगितली असतील ती करावी.

शुकरोगावरअपथ्य—दिवसांस झोंप, मूत्रवेगाचें धारण, जडान्न, मैथुन, गूळ, मेहनत, ताक, आंबट पदार्थ, आणि उपदंशावर जीं अपथ्यें सागितली असतील ती वर्ज करावी.

---

# शूल ( पोटशूळ ).

॥दोषैः पृथक् समस्तामद्वंद्वैः शूलोऽष्टधाभवेत् ॥ सर्वेष्वेतेषु शूलेषु प्रायेण पवनः प्रभुः॥

अर्थ (मा.नि.)—पृथक् दोषांनीं तीन, सन्निपातानें एक; आमानें एक, आणि द्वंद्वज तीन, मिळून आठ प्रकारचा शूळ होतो. ह्या सर्व शूळांमध्यें बहुत करून वायु हा प्रबळ असतो.

**कर्मविपाक**—जन्म लग्नापासून अष्टमस्थानीं चंद्र असून त्यावर मंगलाची दृष्टि पूर्ण आहे अशा वेळेस अथवा सूर्यदशेमध्यें शुक्राची अंतरदशा असल्यास जन्म झाला असतां पंगु, निर्मल, अंतर्योगपात, प्रिय, दक्ष, शिरोरोगी, गलरोगी, कुष्ठरोगी, ज्वरयुक्त, शूलरोगी असा होतो. **परिहार**—चंद्र व मंगळ, याची दानें जप इत्यादि करावी.

**पूर्वकर्मविपाक**—भिक्षा मागणारा, अथवा दरिद्री, वेदशास्त्राध्ययन करणारा, शांतवृत्ति, अशा ब्राह्मणाला बोलावून विन्मुख घालविणें, अथवा दुसऱ्यास सुळावर चढविणें, हात, पाय, कान कापणें, अथवा आचार टाकणें इत्यादि कारणांनी शूळरोग होतात. **परिहार**—कृच्छ्रातिकृच्छ्र चाद्रायणें करावी. सुवर्णदान ब्राह्मण भोजन, सुवर्ण निर्मित शूलदान, अपामार्जनविधि, विष्णुसूक्ताचा सहस्र जप इत्यादि करावी.

**वातशूळाचें कारण व लक्षण** ( मा नि. ) व्यायाम, फार चालणें, अति मैथुन, अत्यंत जागरण, थंड पाणी पुष्कळ पिणें, वाटाणे किंवा लांख, मूग, तुरी, कोद्रू, अत्यंत रुक्ष पदार्थ, यांचें सेवनानें आणि अध्यशन ( जेवणावर जेवण ) लांकूड वगैरे लागणें, तुरट, कडू, मोड आलेल्या धान्याचें अन्न ( उसळ ) क्षीरमत्स्यादि विरुद्ध, सुकलेलें मास, वाळलेल्या भाज्या यांचें सेवन, मळ, मूत्र, शुक्र आणि वायु याच्या वेगाचा रोध केल्यानें, शोकानें, उपवासानें, अत्यंत हसण्यानें, फार बोलण्यानें, वायूचा कोप होऊन हृदय, पार्श्व, पाठ, त्रिक, आणि बस्ति इत्यादि ठिकाणी शूळ, होतो. हा आहार, जिरल्यावर प्रदोष काळीं, वर्षाकाळी, थंडी पडली असेल त्या दिवशी फारच कोप पावतो. ह्याची वारंवार शांति होते. तसाच प्रकोपही होतो. मलमूत्राचा अवरोध, तोद, आणि भेद, ह्या लक्षणांनीं युक्त असतो. व स्वेदन, अभ्यंग, मर्दन, इत्यादिकेंकरून आणि स्निग्ध व उष्ण अन्नानें शांति पावतो.

**वातशूळावर उपाय**—( १ ) स्नेह, स्वेद आणि दुधाचे पदार्थ यांनीं उपचार करावा. [ २ ] वातशूळानें पीडित मनुष्याला स्वेद सुखावह होतो. [ ३ ] काळी माती पाण्यात कालवून शिजवावी आणि दाट झाली ह्मणजे फडक्यात पुरचुंडी करून पोटाला शेक देऊन घाम काढावा; ह्मणजे शूल बंद होतो. [ ४ ]

सांबराच्या शिगांचें भस्म सहा माशांपर्यंत तुपांत द्यावें. [ ५ ] पंचलवणें समभाग आल्याचे रसांत पंधरा दिवस पचन करावीं. नंतर वालप्रमाण गोळ्या करून उन पाण्याशी द्याव्या. [ ६ ] पादेलोण, चिंच, जिरें, व मिरीं हीं प्रत्येक दोहोत्तर वृद्धीनें घेऊन महाळुंगाच्या रसांत खलून चार मासे प्रमाण गोळी मधांत द्यावी. [ ७ ] वाळा व पिपळमूळ यांचें चूर्ण गाईचे तुपांत द्यावें; तें अति कठिण शूळाचा नाश करितें. [ ८ ] पिकलेल्या महाळुंगाचा रस सैंधव घालून द्यावा. [ ९ ] हिंग, तेल, व सैंधव याना गोमूत्रांत शिजवून त्याचा नाभीवर लेप करावा. [ १० ] मोहन्या व शेवग्याची साल गाईच्या ताकात वांटून पोटावर लेप करावा. [ ११ ] गेळफळ कांजीत वाटून नाभीचेठायी लेप करावा.

**पित्तशूळाचें कारण व लक्षण** ( मा. नि. )--यवक्षारादिक्षार, मिरच्या वगैरे तीक्ष्णोष्ण, मोड आलेले पदार्थ, तेल, वाल, वाटाणे, तिळाची पेंड, हुलग्याचें कढण वगैरे तिखट, आंबट, मद्य, कांजी, याचें अति सेवन, क्रोध, अग्नीजवळ वसणें, आयास, प्रखर फिरणें, अति मैथुन, जळालेलें व कर्पट असें अन्न खाणें, इत्यादि कारणांनी पित्त कुपित होऊन नाभीस्थानीं शूल उत्पन्न करितें. तो शूल, तृषा, मोह, दाह यांस उत्पन्न करितो, आणि घाम, मूर्च्छा, भ्रम आणि शोष यानीं युक्त असून दोन प्रहरीं, मध्यरात्रीं, अन्नाच्या विदाहकाळीं, व शरत्काळीं तो शूळ अधिक होतो. शीतकाळीं शीतळ पदार्थांच्या सेवनानें आणि अत्यंत मधुर, शीत अन्नानें शांति पावतो.

**पित्तशूळावर उपाय**—[ १ ] आंवळ्याचा अथवा भुईकोहळ्याचा किंवा मेंदीचा अथवा द्राक्षाचारस साखर घालून द्यावा; तो तात्काळ पित्तशूळाचें निवारण करितो [ २ ] मोरआंवळ्यात दोन गुंजा प्रवाळ किंवा गुळवेलीचें सत्व घालून द्यावा [ ३ ] कडूपडवळ, उसाचा रस इत्यादिकानी रोग्यास ओकवावा. नंतर पित्तगुल्मावरील रेचकें देऊन शुद्ध करावा. [ ४ ] पाण्यांत बुड्या माराव्या [ ५ ] कांशाचें भांडें पाण्यानें भरून नाभीवर धारण करावें. [ ६ ] गूळ, साळी, जवखार, तूप, दूध व जंगलातील मांस, यांचें भक्षण आणि रेच ही पित्तशूलावरील औषधें आहेत. [ ७ ] शतावरीचा काढा मध व गाईचें दूध घालून द्यावा ह्मणजे शूल, दाह व सर्व पित्तरोग याचा नाश होतो.

**कफशूळाचें कारण व लक्षण** ( मा. नि. )—जलसमीपवर्ति, पक्ष्यादिकांचें मांस, मासे, खर्वस, ताक, दही, तूप, लोणी, मास, उसाचा रस, पिठाचे पदार्थ, खिचडी, तीळ, करंज्या, इत्यादि कफकारक पदार्थांनी कफ कुपित होऊन आमाशयांत शूळ उत्पन्न करितो. तो मळमळ, खोकला, ग्लानि, अरुचि तोंडाला पाणी सुटणें, कोठ्यांत स्तब्धता, डोक्याला भार ह्या लक्षणांनीं युक्त असतो व जेवण होतां क्षणीच सर्वदां अत्यंत पीडा करितो. सूर्योदयीं, शिशिरऋतूमध्यें व वसंतकाळी कोप पावतो.

कफशूलावर उपाय—( १ ) प्रथम वांति देऊन नंतर लंघन अवश्य करावें ( २ ) पिंपळी, पिपळमूळ, चवक, चित्रक, व सुंठ यांचा काढा सैंधव, संचळ, बीडलोण व हिंग यांचें चूर्ण घालून द्यावा. ( ३ ) साळीचा भात, जंगलांतील पशुपक्षी यांची मासें, लसूण, कडूपडवळ, मद्य, जुने गहुं यांचें निरंतर सेवन करावें (४) एरंडमूळाचा-काढा अष्टमांश करून त्यांत जवखाराचें चूर्ण घालून द्यावा; ह्मणजे ऊर व पाठ यांतील कफ शूळाचा नाश होतो.(५)महाळुंगाचा रस गुळ घालून द्यावा ह्मणजे कफशूल, हृद्रोग, वातशूल व गुल्म याचा नाश होतो. ( ६ ) कायफळ, पोखरमूळ पिपळी व काकडशिंगी यांचें चूर्ण मधांत दिलें असता कास, श्वास व ज्वर हे दूर होतात. व कफ दूर होण्याविषयीं हें चूर्ण फारच उत्तम आहे. ( ७ ) हरीतकी, वेखंड, चित्रकमूळ व कुटकी, यांचें चूर्ण गोमूत्राशीं द्यावें.

आमशूल ( मा. नि. )--पोटांत गुडगुडशब्द, वांति, शरीरास जडपणा, मंदपणा, पोट फुगणें, व कफाच्या लक्षणानें युक्त असा असतो.

आमशूलावर उपाय--(१) याजवर आमनाशक अग्नि वाढविणारे असे उपाय करावे. ( २ ) कफशूलावरील सर्व क्रिया करावी. ( ३ ) एरंडेल ६, लसूण ८, हिंग १, सैंधव ३, याप्रमाणें भाग घेऊन एकत्र मर्दन करून एक तोळा सेवन करावें; ह्मणजे आमशूल नाश पावतो. ( ४ ) चित्रकमूळ, पिंपळमूळ, एरंडमूळ, सुंठ व धणे, याचा काढा हिंग, सैंधव आणि बिडलोण घालून द्यावा; तो अत्यंत शूलनाशक आहे.

द्वंद्वजशूल ( मा. नि. )—वस्ति, हृदय, कंठ आणि पार्श्वभाग यांचे ठिकाणीं शूल होतो तो कफवातज—कुक्षी, हृदय, नाभी आणि पार्श्वभाग यांच्या ठिकाणीं जो शूल होतो तो कफपित्तज—व दाह आणि घोरज्वर यांनी युक्त असतो, तो वातपित्तज जाणावा. याजवर द्विदोषनाशक उपचार करावे. उपाय—( १ ) रिंगणमूळ, डोरलीमूळ, दर्भाचें मूळ, काश, कसई, गोखरू, एरंडमूळ, यांचा काढा जवखार घालून द्यावा. तो वातपित्तात्मक शूळाचा नाश करितो ( २ ) लसणीचा कल्क मधाशी प्रातःकाळी द्यावा; तो वातकफशूळाचा नाश करितो, यात संशय नाहीं.

सन्निपातशूल ( मा. नि. )—वातादि सर्व दोषांचीं लक्षणें यांत असतात. हा शूल विष व वज्र यासारिखा दुःसाध्य आहे. मांस, बळ व अग्नि क्षीण झालेला रोगी असाध्य जाणावा. उपाय—( १ ) शंखभस्म, सैंधव, हिंग व त्रिकटू याचें चूर्ण ऊन पाण्याशी द्यावें. ( २ ) महाळुंगाचा रस दूध व मध एकत्र करून द्यावा; ह्मणजे कुशी, उर, व वस्ति या ठिकाणचा शूळ व कोठ्यांतील वायु याचा नाश होईल. ( ३ ) महाळुंगाचा रस अथवा शेवग्याचा काढा जवखार व मध घालून द्यावा; तो कुशी, उर, व बस्ति या ठिकाणचा शूळांचा नाश करील. ( ४ ) घोड्याची लीद पिळून तिचा रस काढून त्यांत थोडा हिंग घालून द्यावा, अथवा कु-

किथाच्या काढ्यांत हिंग, सुंठ व बिडलोण, यांचें चूर्ण घालून द्यावा. तो महान अशा शूळांचा नाश करितो. ( ५ ) वेहेडेदळ १, सुंठ १, हिंग १, बाळहिरडे १ व सागरगोट्याचे गोळे ३ भाग, याचें चूर्ण एरंडेलांत पचन करून घोटावें आणि चार मासे उन पाण्याशी द्यावें; ह्मणजे तें अनेक जागीच्या मोठ्या शूळाला ब्रह्मास्त्रासारखें शमविणारें आहे. ( ६ ) सुंठ, सज्जीखार व हिंग यांचें चूर्ण ऊन पाण्याशी द्यावें; तें क्षणांत संपूर्ण शूळांचा नाश करितें. ( ७ ) वेखंड, सज्जीखार हिंग, कोष्ठ, व इंद्रजव यांचें चूर्ण उष्ण पाण्याशीं द्यावें; तें संपूर्ण शूळांचा नाश करितें. ( ८ ) ओंवा, सैंधव, देवदार, यवक्षार, जवस, सुंठ, एरंडमूळ, हिंग, व विडलोण, याचें चूर्ण गुळवेलीच्या काढ्यांत द्यावें; ह्मणजे अत्यंत मोठ्या शूळाचा नाश करितें. ( ९ ) त्रिकटू, पिपळमूळ, वेखंड, हिंग, जिरें, शहाजिरें व वचनाग यांचें चूर्ण निंबाच्या आणि आल्याच्या रसांत खलून वालप्रमाण गोळी प्रातःकाळीं ऊन पाण्यावरोवर द्यावी; ही सूर्यप्रभावटी आठ प्रकारच्या शूळांचा नाश करिते. ( १० ) सागरगोट्याचे गोळे १, सुंठ १, पादेलोण ·॥·, भाजलेला हिंग ·॥·, येणेंप्रमाणें भाग घेऊन शेवग्याचे मुळाचा रस किंवा लसणाचा रस यांत घोटून नंतर स्वच्छ निखाऱ्यांवर घोटून गोळी दोन वालप्रमाण करावी, व ऊन पाण्याशी द्यावी, ह्मणजे आठ प्रकारचे शूलांचा नाश होतो. ( ११ ) टांकणखार, पारा, गंधक, त्रिफळा, त्रिकटू, हरताळ, बचनाग, ताम्रभस्म, व जेपाळ, याचा माक्याच्या रसांत खल करून दोन गुंजांप्रमाण गोळी करून ती मिरें व आल्याचा रस याशीं द्यावी, हा शूलकुठार सर्व शूलांचा नाश करितो. ( १२ ) गंधक, पारा, वचनाग, कवडीभस्म, टाकणखार, सैंधव, पिंपळी, व सुंठ यांचा नागवेलीचे रसांत खल करून हा शूलगजकेसरी दोन गुंजांप्रमाण आल्याचे रसांत द्यावा. ( १३ ) वाळहिरडे, टांकणखार, त्रिकटू, चित्रक, बिडलोण, गंधक व सैंधव हीं सर्व समभाग, व सर्वासमान कुचल्याचें बीज घालून खल करावा त्याची गोळी गुंजप्रमाण करून द्यावी व वर उन पाण्याचा घोट घ्यावा, ह्मणजे सर्व प्रकारचे शूल, पोट फुगणें, मलबद्धता, गुल्म, खोकला, कफ, आमवात, अजीर्ण, उदररोग, अरुचि व स्वरभंग इतक्या रोगाचा नाश होतो. ( १४ ) तिळाचा खार पाण्यांत द्यावा. ( १५ ) आल्याचा रस पावशेर, निंबूरस अर्धा शेर, मीठ १ तोळा, संचळ १ तोळा, सैंधव १ तोळा, ही सर्व एकत्र करून एका बाटलीत घालून सात दिवसपर्यंत बूच लावून ठेवावी. नंतर एक तोळाप्रमाण औषध द्यावें, ह्मणजे कोणत्याही प्रकारचा शूल आणि अजीर्ण यांचा तात्काल नाश होईल.

**परिणामशूल** ( मा. नि. )—स्वकारणांनी वायु कुपित होऊन कफपित्ताजवळ जाऊन त्याना आवृत करून जेव्हां बलवान् होतो तेव्हां शूल उत्पन्न करितो. आहार पचत असतां हा शूल उत्पन्न होतो. व तो शूल कुक्षी, पार्श्व, जठर, नाभी, वस्ति, स्तन, व प्रस्तशूल यांचे ठायी पृथक् पृथक् उत्पन्न होतो किंवा एकेच काळीं सर्व ठिकाणी उत्पन्न होतो, आणि साटक्या साळी, व शीत पदार्थ

यांच्या सेवनानें वाढतो. हा शूळ अन्नरस वाहणाऱ्या मार्गाला विकार करितो. पोट फुगणें, पोटांत गुडगुड शब्द, मळमूत्रांचा अवरोध, स्वस्थपणा, कंप आणि स्निग्धोष्ण पदार्थांनें शांति पावणारा हा वातपरिणाम शूल होय. तृषा, दाह, अस्वस्थपणा, घाम, तिखट, आंबट, आणि खारट रस यांनीं वाढणारा आणि शीत पदार्थांनें शांत होणारा हा पित्तपरिणामशूल होय.—ओकारी, मळमळ, मनाला मोह, हीं ज्यांत फार असतात, व पीडा थोडी असते, शूल फार दिवसपर्यंत राहतो. तिखट व कडू अशा पदार्थांनीं शांति पावतो, तो कफपरिणामशूल जाणावा. मांस, बळ आणि अग्नि हे ज्यांत क्षीण होऊन गेले आहेत असा परिणामशूळ असाध्य जाणावा.

**परिणामशूलावर उपाय**—प्रथम लंघन, नंतर वमन व विरेचन द्यावें, नंतर औषधोपाय करावा. ( १ ) प्रथम पोटभर दूध किंवा उंसाचा रस पिऊन नंतर गेळफळाचें चूर्ण किंवा काढा प्यावा अथवा कडू निंबाचे पाल्याचा किंवा कडू भोपळ्याचा रस पिऊन यथाविधि वमन करावें, ह्मणजे परिणामशूळाचा नाश होतो. (२)तेंड, जेपाळ किंवा एरंडेल यांचें विरेचन तात्काळ पंक्तिशूळाचा नाश करितें. ( ३ ) त्रिफळा व वहाव्याच्या शेंगेंतला मगज याचा काढा मध व साखर घालून द्यावा,ह्मणजे दाह, रक्तपित्त, पित्तशूळ व प्रदर यांचा नाश करतो.(४) पारा, गंधक व बचनाग हीं प्रत्येक चार चार तोळे, सुंठ, मिरी, पिंपळी, हिंग व पादेलोण, हीं प्रत्येक आठ आठ तोळे, मीठ किंवा सैंधव ३२ तोळे, चिंचेचा खार ३२ तोळे आणि शंखभस्म ३२ तोळे, हीं सर्व औषधें निंबूरसांत एक दिवस खलून मध्यम सुपारीएवढी गोळी करून द्यावी; हा शूलदावानल रस नुसता किंवा ऊन पाण्याच्या घोटाबरोबर भक्षण केला असतां सर्व प्रकारचे शूळ, अजीर्ण, सर्व प्रकारचीं उदरें व मंदाग्नि हे रोग असाध्य जरी असले तरी त्याचा नाश होईल. ( ५ ) वडिशेप, देवदार, कोष्ठ, हिंग आणि सैंधव यांचें चूर्ण रुईच्या चिकात मिळवून पोटावर लेप द्यावा. ( ६ ) भुईतरवडाच्या मूळाचें चूर्ण ऊन पाण्याशीं द्यावें. (७) पिंपळी व हिरडेदळ याचें चूर्ण सहा मासे घेऊन त्यांत एक गुंज लोहभस्म घालावें व तें चूर्ण मध व तूप यांत द्यावें; ह्मणजे तत्क्षणीं पंक्तिशूळाचा नाश होईल.

**अन्नद्रवशूळ** ( मा. नि. )—अन्न जीर्ण झालें असतां किंवा जिरत असतां अथवा अजीर्ण असतां ह्मणजे सर्वदां जो शूळ उत्पन्न होतो, तो पथ्यापथ्याच्या योगानें किंवा भोजन केल्यावर किंवा जेवल्यानें अथवा न जेवल्यानें नियमेंकरून शांत होत नाहीं. हा शूळ त्रिदोष विकृतीचाच हा एक प्रकार आहे. परंतु असाध्य आहे असें नाहीं, ह्मणून चिकित्सा सांगितली आहे.

**अन्नद्रवशूळ यांवर उपाय**—हा शूळ जोंपर्यंत तिखट, पिंवळें, आंबट व पातळ असें ओकलें नाहीं तोंपर्यंत चैन पडूं देत नाहीं. याकरिता पित्त पडेपर्यंत वमन व कफ पडेपर्यंत विरेचन द्यावें. ( १ ) कुळिथाचें पीठ अथवा वेखंडाचें चूर्ण,

किंवा चण्याचें पीठ अथवा हरीकाचा भात दह्याबरोबर खावा. व शक्तीपेक्षां किंचित् कमी अन्न भक्षण करीत जावें. (२) गूळ, आंवळकठी व हिरडेदळ, हीं प्रत्येक चार चार तोळे, मंडूर १२ तोळे, मध व तूप यांत कालवून बलाबल पाहून ४ गुंजांपर्यंत जेवणापूर्वी किंवा मध्यें किंवा शेवटी केव्हां तरी सेवन केलें असता अन्नद्रव व परिणामशूळ एक वर्षांचा नाश पावतो. ( ३ ) वाटाणे, सातू, गहूं, सावे, हरीक, चवळ्या, उडीद, कुळिथ, दही, मिसळलेलें दूध, गाईचें व म्हशीचें तूप, चाकवत, कारली, करटोलीं ही अन्नद्रवशूळाला प्रशस्त आहेत. ( ४ ) पाण्यासुद्धां सगळा नारळ घेऊन तोंडास भोंक पाडून त्यांत मीठ भरून बाहेरून माती लावून वाळवून गोंवऱ्यांचे अग्नींत युक्तीनें जाळावा. नंतर वरील माती व करवंटी काढून त्याचें बारीक चूर्ण करून त्यासमान पिंपळीचें चूर्ण आंत मिश्र करून तें चूर्ण ६ मासेपर्यंत बलाबल पाहून द्यावें; ह्मणजे परिणामशूल, वात, पित्त, कफ व सन्निपात यांपासून झालेल्या सर्व शूळांचा नाश होतो. ( ५ ) हिरडेदळ व सुंठ यांचें चूर्ण व लोहभस्म एकत्र करून मध व तूप यांत द्यावें. तें त्रिदोषज परिणामशूलाचा नाश करितें. (६) पिंपळी, हिरडेदळ व लोहभस्म, याचें चूर्ण सुमारें सहा गुंजा मध व तूप यात द्यावें. तें तात्काळ दारुण अशा परिणामशूळाचा नाश करितें. ( ७ ) परिणामशूळावरील औषधें योजावीं.

**शूळावर पथ्य**—वांति, घाम, लंघन, गुदवर्ती, निद्रा, रेच, जुन्या साटक्या साळी, तापलेलें दूध, जंगल-मासांचे रस, पडवळ, शेवगा, कारलें, क्षार, चाकवत, मीठ, हिंग, लसूण, निंब, लघु अन्न, अगस्त्याच्या शेंगा, करटोली, गांजर, चुका, तूप, गाईचें दूध, ऊन पाणी, कोंवळा मुळा, गाईचें लोणी, शेरणी, गोडा सुरण, सैंधव, गूळ, शेपू, मेक्या खारलेल्या, आमसूल, ताक, एरंडेल, महाळुंग, पोकळा, शेळीचें लोणी, गोमूत्र, ही पथ्यें जाणावी.

**शूळावर अपथ्य**—जागरण, विषमाशन, रुक्ष, कडू, तुरट शीतळ, गुरु, या पदार्थांचें सेवन, उद्योग, मैथुन, मद्य, द्विदल धान्यें, तिखट पदार्थ, वेगरोध, शोक, क्रोध, दही, दिवा निद्रा व थंड पाणी हे पदार्थ वर्ज करावे.

---

## श्वास ( दमा ).

॥ महोर्ध्वच्छिन्नतमकक्षुद्रभेदैस्तुपंचधा ॥ भिद्यतेसमहाव्याधिः श्वासएकोविशेषतः ॥

**अर्थ**—महान, ऊर्ध्व, छिन्न, तमक आणि क्षुद्र या भेदानें श्वासरोग पांच प्रकारचा होतो.

**कर्मविपाक**—कर्कराशिस्थ सूर्य असून बुधाची दृष्टि असेल तर नेत्ररोगी,

कफवातरोगी आणि परद्रव्यापहार, विपरीत मति असा होतो. **परिहार**—बुधदृष्ट, सूर्यपीडा, निरसनार्थ सूर्यमंत्राचा जप, दानें होम इ० पूर्वोक्त करावें.

**पूर्वकर्मविपाक**—आपल्यावर जो उपकार करितो, त्यावर उपकार न करणारा, अथवा अपकार करणारा जो त्यास खोकला, दमा, कफ, उष्णज्वर, वातपित्त व अनेक दुःखें प्राप्त होतात. **परिहार**—पिपीलिका मध्य किंवा तीन चांद्रायणें, ब्राह्मणभोजन " अग्निदूत " या सूक्तानें दहा सहस्त्र हवन, विष्णुसूक्ताच्या सहस्त्र आवृत्त्या, मधु, घृत, हिरण्य वस्त्रें यांची दानें इ० करावें. **२ रा प्रकार**—नीचापासून कुरुक्षेत्रादि पवित्रदेशीं सूर्यग्रहणादि महा पर्वणीचे ठिकाणी लवण, कृष्णाजिन, शय्या इ० दानें, ग्रहण करणारा, जन्मांतरीं खरूज, दमा, खोकला, कृमिरोग इत्यादिकेंकरून युक्त असा होतो. **परिहार**—महिषीदान, पुरुषसूक्त आणि विष्णुसहस्त्रनाम याचा जप, हवन, सहस्त्रकलशस्नान, सुवर्णाच्या वरुण मूर्तीचें पूजन पूर्वोक्त दान, इ० दैविक प्रतिकार करावा.

**कारण** ( मा. नि. )—ज्या वेळेस वायु कफयुक्त होऊन प्राणान्नोदक स्रोतसांचा मार्ग रोध करून चोहोंकडे जातो तेव्हां तो श्वास उत्पन्न करितो. श्वास व उचकी ही ज्या योगानें उत्पन्न होतात तीच कारणें श्वास उत्पन्न करण्यास जाणावी.

**पूर्वरूप** ( मा. नि. )—हृदयपीडा, शूल, पोटफुगणें, पोट ताणल्या सारखें, तोंड बेचव, आणि शंखाचे ठायीं टोंचल्या सारखी पीडा हें श्वास रोगाचे पूर्वरूप होय.

**महाश्वासलक्षण** ( मा. नि. )—ज्याचा वायु वर ओढला आहे असा मनुष्य दुःखित होऊन मोठ्यानें शब्दयुक्त श्वास टाकितो. एकाद्या रागावलेल्या व माजलेल्या बैला प्रमाणें रात्रदिवस श्वासानें पीडित होतो. त्याचें ज्ञान वगैरे नष्ट होतें, डोळे चचळ होतात, डोळे आणि तोंड हे वासतात.हागमूत बंद होतें, बोलवत नाही, बोलला तर हळू बोलतो. मन खिन्न होतें, त्या रोग्याचा श्वास दुरून समजतो, हा महाश्वास ज्या पुरुषास होतो तो लवकरच नाश पावतो.

**महाश्वासलक्षण** ( वाग्भट )—महाश्वासांत मनुष्य दीन होतो, त्याच्या श्वासाचा नाद फार मोठा असतो, कण्हतो, खवळलेल्या उन्मत्त बैलाप्रमाणें अतिशय कांपत असतो, त्याचें ज्ञान ( व्यवहारिक ) व विज्ञान (शास्त्रीय) नाहीसें होतें, डोळे व तोंड उन्मत्ताप्रमाणें दिसतात, छाति धडधडते, मलमूत्राचा अवरोध, बोलताना अडखळतो, घसा कोरडा पडतो, वारंवार बेशुद्ध होतो व कान, आंख व डोकें यांत अतिशय वेदना होतात.

**महाश्वासावर उपाय**—( १ ) कुहिलीच्या बियांचें चूर्ण मध व तूप यांत द्यावें. ( २ ) गूळ, मिरी, हाळद, रास्ना, मनुका व पिपळी यांचें समभाग चूर्ण तीळीचे तेलाशीं सेवन केलें असता तीव्र श्वासाचा नाश होईल. ( ३ ) भारंगमूळ व

सुंठ यांचें चूर्ण आल्याच्या रसाशीं सेवन करावें, ह्मणजे मोठ्या कठिणही श्वासाचा नाश होतो.

**ऊर्ध्वश्वासलक्षण** ( मा. नि. )—पुष्कळ वेळपर्यंत श्वास वर घेतो, तो खालीं लवकर सोडीत नाहीं. तोंड आणि दुसरे मार्ग कफानें दाटतात. कुपित वायूनें पीडित होतो, वर डोळे करून चंचल दृष्टीनें इकडे तिकडे पाहतो, मूर्च्छेनें व वेदनेनें अत्यंत पीडित होतो, तोंडाला कोरड पडते, व असमाधान होतें. ऊर्ध्व श्वास कोपला असतां खालचा श्वास बंद होतो ह्मणजे हृदयांतच कोंडून राहतो. अथवा श्वास ह्मणजे वायु तो खालीं उतरत नाहीं. मोह पावणाऱ्या व ग्लान होणाऱ्या अशा पुरुषाचा ऊर्ध्व श्वास प्राण घेतो.

**ऊर्ध्वश्वास लक्षण** ( वाग्भट )—ऊर्ध्वश्वासांत दीर्घश्वास बाहेर टाकितो. परंतु परत श्वास आंत घेत नाहीं. त्याच्या स्रोतसांचीं मुखें कफानें बंद होतात. तो मनुष्य कुपित झालेल्या वायूनें अतिशय पीडित होतो. त्याची दृष्टि वर जाते. डोळे इकडे तिकडे फिरवून बावरल्यासारखें पाहतो. मर्में कांपल्याप्रमाणें त्यांस अतिशय वेदना होतात व त्याचा शब्द खोल जातो.

**ऊर्ध्वश्वासावर उपाय**—( १ ) आडूळशाचा रस व गाईचें लोणी एकत्र कढवून त्यांतून त्रिफळ्याचें चूर्ण घ्यावें. तें श्वासाचें निवारण करितें. ( २ ) दुल्हरी, सैंधव, जटामांसी, मीठ, पादेलोण, त्रिकटू, ब्रह्मदंडी, त्रिफळा व एरंडमूळ यांचें चूर्ण किंवा बिडलवणादि संपूर्ण लवणें बारीक घोटून एक महिनापर्यंत तें चूर्ण ऊन पाण्याशी द्यावें; म्हणजे खोकला आणि ऊर्ध्वश्वास यांचा नाश होतो. ( ३ ) आल्याचा रस मधांत द्यावा म्हणजे कास व श्वासाचा नाश होतो.

**छिन्नश्वास लक्षण** ( मा. नि. )—जो पुरुष राहून राहून शेवटीं शक्ति आहे तेवढ्यानें श्वास टाकितो, अथवा क्लेश पावून श्वास टाकीत नाहीं, हृदय कुऱ्हाडीनें तोडल्याप्रमाणें, वेदनेनें घाबरा होतो, पोट फुगणें, घाम आणि मूर्छा यांणीं बेजार होतो, अथवा बस्ति जळाल्यासारखा होतो, डोळे गरगरा फिरवितो, किंवा ते आसवांनीं भरतात, श्वास टाकता टाकतां अत्यंत क्षीण होतो. ( हें व्याधिप्रभावानें होतें जर दोषानें होतें तर दोन्ही डोळे लाल व्हावेत ) उद्विग्न चित्त होतें. तोंडास कोरड पडतें, वर्ण बदलतो, बडबड करितो, संधिबंधनें सर्व शिथील होतात. या छिन्नश्वासानें तो मनुष्य लवकर प्राण सोडितो.

**छिन्नश्वास लक्षण** ( वाग्भट )—मनुष्य तुटक तुटक श्वास टाकितो. व मर्मावर कापल्यासारख्या वेदनानी तो पीडित होतो. त्यास घाम येतो, मूर्छा येते, पोट फुगतें, बस्तींत दाह होतो, मूत्र बंद होतें, दृष्टि खालीं जाते, डोळे पाण्यानें भरतात, तो बेशुद्ध होतो, डोळे अतिशय लाल होतात,तोंडास कोरड पडते, बडबडतो, दीन होतो, त्याची कांति नष्ट होते व अगदी निचेष्ट पडतो.

**तमकश्वास लक्षण** ( मा. नि. )—ज्याकाळीं वायु मान व डोकें जखडून कफाला उसळीत वर उलटा स्रोतसाप्रत येतो, तेव्हां त्या कफानें रुद्ध होऊन पडसें व गळ्यामध्यें घुरघुर शब्द करितो. आणि अत्यंत तीव्र वेगानें हृदयास पीडा करणारा असा श्वास उत्पन्न करितो. मग त्या योगानें तो पुरुष मूर्छित होतो, त्रासतो, निचेष्ट होतो आणि खोकूं लागला म्हणजे वारंवार मोह पावतो, कफ सुटत असतां फारच पीडा पावतो. कफ सुटला म्हणजे दोन घटका सुख पावतो, गळा खाजवितो, मोठ्या कष्टानें बोलतो, झोंप येत नाहीं, निजला असतां वायूनें त्याच्या बरगड्या धरितात, बसला असतां सौख्य पावतो आणि उष्ण पदार्थापासून सुखी होतो, डोळ्यांस सूज, कपाळास घाम, वेदनायुक्त, तोंडास कोरड, वारंवार श्वास, हत्तीवर बसल्याप्रमाणें सर्व शरीर डोलवितो, हा श्वास, मेघ, पर्जन्य, थंडी, पूर्वेकडचा वारा, आणि कफकारक पदार्थ याणीं वाढतो. हा श्वास दुःसाध्य आहे. किंवा नवा उत्पन्न झाला तर साध्य होतो.

**तमकश्वास लक्षण** ( वाग्भट )—वायु शरीरांत उलट संचार करून कफास चाळवून डोकें व मान हीं धरून ऊर व बरगड्या यात पीडा उत्पन्न करून, खोकला, घरघर, मोह, अरुचि, पडसें, तहान, व अतिशय वेगवान् व जीवास अत्यंत दुःख देणारा असा श्वास उत्पन्न करितो. या श्वासाचा वेग झाला असतां मनुष्य फार तरफडतो, कफाचा बेडका पडल्यानें त्यास अमळ बरें वाटतें, तो निजला असता श्वास टाकण्यास फार कष्ट होतात, व बसला असता त्यांस बरें वाटतें, त्याची दृष्टि वर जाते. कपाळास घाम, अतिशय वेदना, तोंडास कोरड, वारंवार दम, उष्णाची इच्छा, व कंप हीं होतात. ढग आले असतां पाऊस पडत असतां, थंडीनें, पूर्वेकडील वायूनें व कफकारक पदार्थ भक्षण केल्यानें हा श्वास वाढतो. यांस तमकश्वास असें म्हणतात. हा याप्य आहे. सशक्त मनुष्यास झाला असून नवीनच असेल तर मात्र साध्य होतो.

**प्रतमकश्वास** ( मा. नि. )—तमक श्वासालाच पित्ताचा अनुबंध होऊन ज्वरादिकांचा योग झाला असतां तो प्रतमक होतो, यांत ज्वर व मूर्छा हीं दोन लक्षणें होतात. प्रतमकाचें दुसरें लक्षण आणि कारण असें आहे की, उदावर्त, शूळ आमादि अजीर्ण, विदग्ध अन्न, मलमूत्रादि वेगाचा रोग, म्हातारा मनुष्य, या कारणानें झालेला श्वास, अंधारानें किंवा तमोगुणानें अत्यंत वाढतो. आणि शीतोपचारानें झटकन शांत होतो. या श्वासाचे योगानें रोग्यास अंधारांत बुडाल्यासारखें वाटतें. याला प्रतमकश्वास म्हणतात.

**तमक व प्रतमकावर उपाय** ( १ ) रिंगणमूळ, जिरें व आंवळकठी यांचें चूर्ण मधांत द्यावें; म्हणजे ऊर्ध्ववायु, महाश्वास व तमकश्वास हे रोग क्षणांत दूर होतात. ( २ ) बारीक एलचीची पूड ३ मासे, खडीसाखर ६ मासे व दुधाची साय १ तोळा, एकत्र करून प्रातःकाळी प्राशन करावें. याचप्रमाणें ति-

सरा प्रहरीं प्राशन करावें. ( ३ ) सूक्ष्म रेच देऊन दोष पाडावे. ( ४ ) गुळवेल वेलीचें सत्व २ गुंजा, सुवर्णमाक्षिकभस्म १ गुंज, खडीसाखर ६ मासे व गाईचें तूप १ तोळा एकत्र करून द्यावें. (५) सफेतमुसळी २ तोळे, वंशलोचन २ तोळे, एलचीदाणे २ तोळे, ज्येष्टीमध २ तोळे, तुकुमराई २ तोळे, खडीसाखर २ तोळे व गुलाबकळी २ तोळे, हीं सर्व औषधें एकत्र करून चूर्ण करून त्याचे १४ भाग करावे. पैकी १ भाग घेऊन अच्छेर गाईचे दुधांत टाकावा. निमें दूध आटलें ह्मणजे प्यावं. याप्रमाणें सकाळी व तिसरें प्रहरी २ वेळ सेवन करीत जावें; ह्मणजे निश्चयानें तमकश्वासाचा नाश होईल

**क्षुद्रश्वास** ( मा. नि. )—रुक्ष पदार्थ आणि आयास ह्मणजे श्रम, यांपासून उत्पन्न झालेला असा क्षुद्रश्वास वायूला ऊर्ध्व नेतो, हा अत्यंत दुःखदायक नाहीं व शरीरास कांहीं इजाही करीत नाही. जसे ऊर्ध्वश्वासादिक दुःखदायक आहेत तसा हा नाही. व भोजनपानादिकांची योगति बंद करीत नाही. हा सर्व श्वासांत सुसाध्य आहे. याजवर साधारण श्वासावरचे उपाय करावे.

**साध्यासाध्य विचार** ( मा. नि. )—बलवान पुरुपाचे, सर्व महा श्वासादिक अव्यक्त लक्षणें झाली असतां साध्य होतात. त्यांत क्षुद्रश्वास तर अत्यंत साध्य आहे. तमकालाही क्षुद्रश्वास ह्मणतात. महान्, ऊर्ध्व आणि छिन्न हे ३ श्वास संपूर्ण लक्षणानी युक्त आले तर साध्य होत नाहीत. आणि दुर्बळ रोग्याचा तमकही साध्य होत नाही. प्राणहरण करणारे असे सन्निपातज्वरादिक रोग पुष्कळ आहेत खरे, परंतु श्वास आणि हिक्का हे जसें लवकर प्राणहरण करितात, तसें दुसरे रोग करीत नाहीत.

**सर्व श्वासांवर उपाय**—( १ )—खोकला, दमा, क्षयरोग, वांति व उचकी हे रोग एकमेकांच्या औषधानीं बरे होतात. असें वाग्भटाचें मत आहे. ( २ ) मिरीं १, पिपळी १, डाळिंबाच्या फळावरील साल १ व जवखार ॥. याप्रमाणें भाग घेऊन चूर्ण करून त्याचे तिप्पट गूळ त्यांत मिश्र करून ४ माशाची गोळी बाधावी. व एक गोळी मुखांत धरावी; ह्मणजे सर्व प्रकारचे कास व श्वास नाश पावतात. (३)त्रिफळा, सुंठ, देवदार, पिपळी, बचनाग, वाळा, मिरी व धोत्र्याचें बीज ही सर्व माक्याचे रसांत घोटून वालप्रमाण गोळी करावी. तिचें मधांत सेवन केलें असतां श्वास व कफ याचा नाश होतो. ( ४ ) कांडें निवडुंगाचें दूध म्हणजे चीक सुमारें दोन वाल घेऊन सहा मासे गुळाशीं भक्षण करावा; म्हणजे खोकला, श्वास, क्षय आणि हृद्रोग, हे सर्व नाश पावतात. (५) काकडशिंगी, सुंठ, पिंपळी, नागरमोथे, एरंडमूळ, कचोरा व मिरीं, यांचें समभाग चूर्ण करून तें गुळवेल, आडूळसा व लघुपंचमुळें याचा काढा करून त्या काढ्यात तें चूर्ण व साखर घालून प्राशन करावें. याप्रमाणें काढा निकाढा तीन दिवस घेतला असतां मोठा घोररूपी श्वास तीन दिवसांत नाश पावतो. ( ६ ) मनुका, गुळवेल व सुंठ यांचा काढा पिंपळी-

चें चूर्ण घालून द्यावा; म्हणजे श्वास, शूल, खोकला, अग्निमांद्य, जीर्णज्वर आणि तृषा यांचा नाश होतो. ( ७ ) आडूळसा, हाळद, पिंपळी, गुळवेल, भारंगमूळ, नागरमोथे, सुंठ व रिंगणीमूळ यांचा काढा मिऱ्याचें चूर्ण घालून द्यावा; हा फारच उत्तम आहे. (८) आडूळसा १०० तोळे घेऊन आठपट पाण्यांत चतुर्थांश काढा करून त्यात हरीतकीचें चूर्ण ६४ तोळे घालून पुन्हां पचन करावा. दाट झाला ह्मणजे उतरून शीत झाल्यावर त्यांत मध ८ तोळे, व वंशलोचन ८ तोळे, पिंपळीचें चूर्ण ॥ तोळा, व चातुर्जातांचें चूर्ण १ तोळा घालून सारखा करून हा अवलेह बरणीत घालून ठेवावा. व दररोज प्रातःकाळीं दोन तोळेप्रमाण सेवन करीत जावा म्हणजे श्वास, कास, क्षयरोग, रक्तपित्त, कफ, पडसें, हृद्रोग, कृशता, विद्रधि, उरःक्षत, आणि रक्ताची वांति यांचा नाश होतो. ( ९ ) लवंगा, मिरीं व त्रिफळा हीं बाभळीच्या सालीच्या काढ्यांत घोटून दोन वालप्रमाण गोळी करावी व मधांत द्यावी. ह्मणजे श्वास व कफ हे नाश पावतात. ( १० ) काखेपासून खालीं सुमारें बाहूचे अर्ध प्रदेशाचे सुमारानें दोहों बाजूंस बरगड्यांवर लोखंड तापवून डाग द्यावा. किंवा गळ्याचे खालीं डाग द्यावा, म्हणजे श्वास नाश पावतो. ( ११ ) मनशीळ किंवा राळ अथवा गुग्गुळ किंवा काळ्या धोत्र्याचीं सुकलेलीं पानें किंवा तूप लाविलेलें यव यांपैकी एकाचा कोणत्याही रीतीनें धूर प्राशन केला असतां कास, श्वास व उचकी यांचा नाश होतो.

**श्वासावर पथ्य**—विरेचन, स्वेदन, तिक्त, धूमपान, वांति, दिवसास निद्रा, जुन्या साटक्या साळी, कुळीथ, जुने गहूं, यव, दोडकी, जंगलमांसाचे रस, दूध, मध, पडवळ, वांगी, लसूण, तोंडलीं, निंबूं, तांदूळजा, चारोळी, द्राक्षें, बारीकएलची, उन पाणी, व कफवातनाशक अन्नपान, इरसाल आंबा, रोडगे, कवठ, खजूर, नवा गूळ, घोळू, तवकीर, तोंडलीं, काळी द्राक्षें, गाईचें दूध, दोडकी, धणे, उडीद, तांबड्या साळी, बेदाणा, कोवळा मूळा, लोणी, पिठीसाखर, गोडा सुरण, हिंग, अफू, करटोली, कारली, शेळीचें तूप, जायफळ, महाळुंग, लवंगा, शेळीचें दही, व गोमूत्र, हीं पथ्यें जाणावीं.

**श्वासावर अपथ्य**—रक्त काढणें, पूर्वेचा वायु, शेळीचें दूध, तूप, खराबपाणी, मासे, कंद, मोहऱ्या, रुक्ष, व जडान्नपान, जोंधळ्याच्या कण्या, तांबूल, व्यायाम व थंडपाणी, हे पदार्थ वर्ज करावे.

---

## श्लीपद ( वारूळ ).

**कर्मविपाक**—मंगळ, बुध, शुक्र हे तीन ग्रह एक राशिस्थ असून अनिष्ट असतां पंगुपणा, चंचलत्व, धीटपणा, मुखरोग, श्लीपदरोग, इत्यादि प्राप्त होतात. **परिहार**—ग्रहांचीं दानें, जप, होम इत्यादि करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—सगोत्र स्त्रीचेठायीं गमन करणारा श्लीपदरोगी होतो. **परिहार**—चांद्रायणें, सुवर्णदान, ब्राह्मणभोजन, इत्यादि करावीं.

**संप्राप्ति** ( मा. नि. )—जी सूज पहिल्यानें अडसंधीमध्यें उत्पन्न होऊन हळुहळु पायांवर येते व तिच्याबरोबर ज्वर येतो, या रोगाला श्लीपद म्हणजे वारूळ असें ह्मणतात. हें श्लीपद हात, कान, डोळे, शिश्न, ओष्ठ, नाक, यांवर देखील होतें असें कित्येक ह्मणतात.

**वातजश्लीपद** ( मा. नि. )—काळें, खरखरीत, चिरा पडलेलें, तीव्र वेदनायुक्त, कारणावाचून दुखणारें असें असतें,आणि त्यांत बहुशः ज्वर असतो. **उपाय**—( १ ) घाम काढणें, पेंड बांधणें, हे उपाय करून पायांचे घोट्याचे वरतीं चार अंगुळांवर शिरा वेधावी.

**पित्तजश्लीपद** ( मा. नि. )—पिंवळ्या रंगाचें, दाह आणि ज्वर यांनीं युक्त व मृदु असतें. **उपाय**—( १ ) पायांचे घोट्याचे खालीं शीर वेधावी. आणि पित्तार्बुद व विसर्प यांवर जशी पित्तनाशक क्रिया सांगितली आहे, ती करावी. ( २ ) मंजिष्ठ, जेष्टीमध, रास्ना, जटामांसी व पुनर्नवा, हीं औषधें कांजीत वांटून लेप करावा.

**कफजश्लीपद** ( मा. नि. )—तुळतुळीत, पांढरें, गुळगुळे, जड, आणि कठिण असें असतें. **उपाय**—( १ ) पायाचे आंगठ्याची चांगली जाड शीर पाहून वेध करावा. ( २ ) धोत्रा, एरंड, निर्गुडी, पुनर्नवा, शेवगा व शिरस यांचा लेप मोठें दारुण जरी श्लीपद असलें तरी त्याचा नाश करितो. (३) शिरस, शेवगा, देवदार व सुंठ यांचा गोमूत्रांत लेप करावा.

**असाध्यलक्षण** ( मा. नि. )—वारुळासारखें वाढलेलें व कांटे उभारलेलें, एक वर्षाचें मोठें वाढलेलें, व जें श्लीपद कफकारक आहार व विहारांनीं झालेलें, कफ प्रकृतीच्या पुरुषाला झालेलें, व सर्व लक्षणयुक्त, फार उंच वाढलेलें व कंडूयुक्त असतें तें, कफात्मक श्लीपद होय हें असाध्य आहे.

**श्लीपद होण्याचें ठिकाण** ( मा नि. )—पावसाचें पाणी पुष्कळ पडलेलें, असून जमिनीला खळगे असल्यामुळें तें सुकून जात नाही, म्हणून जुनें पाणी सांचलेलें, सर्व ऋतूंमध्यें थंड असणारें, असे जे देश, तेथें बहुतकरून श्लीपद रोग होतो.

**सर्व श्लीपदांवर उपाय**—(१) लंघन, लेप, स्वेद, रेच, रक्त काढणें या उपायांनी आणि प्रायः कफनाशक अशा उपचारानें श्लीपद बरें करावें. यावर सांगितलेल्या तिन्ही प्रकारच्या श्लीपदांत कफाचें आधिक्य असतें. कारण, गुरुत्व व महत्त्व हें कफावांचून होत नाहीं. ( १ ) वरधाऱ्याचें चूर्ण गोमूत्र किंवा कांजींत दिलें

असतां मोठें कष्टसाध्य एका वर्षापलीकडले असें श्लीपद नाश पावतें. (२) बाळहिरड्यांचें चूर्ण गोमूत्रांत द्यावें. ( ३ ) गुळवेल किंवा सुंठ व तेल्या देवदार यांचें चूर्ण गोमूत्रांत द्यावें. ( ४ ) घाणेऱ्या करंजाचे पाल्याचा रस ३ मासे नुस्ता द्यावा. (५) बाळहिरडे एरंडेलांत तळून त्याचें चूर्ण गोमूत्राबरोबर जो प्राशन करील तो ७ दिवसांत श्लीपदापासून मुक्त होईल. ( ६ ) पुनर्नवा, मोहऱ्या व सुंठ यांचा गोमूत्रांत लेप करावा. (७) नुसतें मोहऱ्यांचें तेल बलाबल पाहून प्राशन करावें. (८) हळद व गूळ यांची गोळी करून द्यावी.

**श्लीपदावर पथ्य**—जुन्या साटक्या साळी, सातु, कुळिथ, लसूण, पडवळ वांगें, शेवगा, कारलें, तिखट व कडू हे रस, एरंडेल, गोमूत्र, जोंधळ्याची भाकर, मूग व तुरीचें वरण हे पदार्थ पथ्यास द्यावे.

**श्लीपदावर अपथ्य**—पिठाचें अन्न, दुधाचे पदार्थ, जलवासी प्राण्याचें मांस, गोड व आंबट पदार्थ, फिरणें, गुरु व पातळ पदार्थ, गूळ व चिकट पदार्थ, हे वर्ज करावे.

---

## सूज ( शोफ शोथ ).

॥ सर्वहेतुविशेषैस्तु रूक्षभेदान्नवात्मकम् ॥ दोषैः पृथक् द्वयैःसर्वैरभिघाता द्विषादपि ॥

**अर्थ**—ती सूज कारण भेदानें कार्यभेद होऊन नऊप्रकारची होते. ती अशी-पृथक् दोषांनीं ३, द्वंद्वज ३, सन्निपात १, अभिघातापासू आणि १ विषापासून १ मिळून नऊप्रकारची आहे. ( मा. नि )

**कर्मविपाक**—नीचचा गुरु असून त्याची दशा प्राप्त झाली असतां सूजरोग, कर्णरोग, गुह्यरोग, हे प्राप्त होतात. **परिहार**—बृहस्पतीची दानें, जप, होम इत्यादि करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—मार्ग नदीतीर पर्वत शिखर कवठीचे वृक्षाची छाया पाणी इत्यादि स्थळीं मळमूत्रोत्सर्ग केला असता सूजरोग होतो. **परिहार**—इंद्रवो विश्वतस्परि या मंत्राचा दहासहस्र जप करावा. आपोहिष्टा यामंत्रानें दहासहस्र हवन करावें तसेंच पीतांबराचें दान करावें.

**संप्राप्ति** ( मा. नि. )—*दुष्ट झालेला वायु, स्वकारणांनी दुष्ट झालेल्या रक्त*-पित्त कफास, बाह्य शिरांत नेऊन त्यांनी कोंडला जातो. मग त्याची गति बंद झाली म्हणजे तो त्वचा, आणि मांस यांच्या आश्रयानें सूज उत्पन्न करितो. ती सूज उंचट आणि कठिण असते. इला रक्तासहित त्रिदोषाचा संबंध असतो. म्हणून तिला सन्निपातात्मक असें म्हणतात.

**सुजेचें कारण** ( मा. नि. )—वमन विरेचकादि शोधन ज्वरादि रोग, उपवासानें कृश, व दुर्बळ झालेल्या पुरुषास, खारट, आंबट, तिखट आणि उष्ण व जड अशा पदार्थांचें सेवन, दहीं, अपक्क, मृत्तिका, भाज्या, क्षीरमत्स्यादि विरुद्धान्न, संयोगजविषानें दूषित झालेले अन्नाचें सेवन, मूळव्याध, अव्यायाम, शोधनास योग्य, दोष झाला तरी शोधन न घेणें; हृदयादिमर्मास दोषांनीं केलेला अपघात, आमगर्भपतनादि वाईट प्रसूति, वमनादि पंचकर्माचा मिथ्यायोग, हे सर्व दोषज सुजेला कारण सांगितले आहेत.

**पूर्वरूप** ( मा. नि. )—संताप, शिरा ताणल्यासारखी पीडा, अंगाला जडत्व, हीं लक्षणें झालीं ह्मणजे सूज पुढें उत्पन्न होणार असें समजावें.

**सामान्यलक्षण** ( मा. नि. )—अंगाला जडत्व, चित्त स्वस्थ नसणें, सुजलेला उंचवटा, आणि दाह, शिरा बारीक होणें, रोमांच येणें, आणि अंगाचा रंग बदलणें, हीं लक्षणें होतात.

**वातशोथ** ( मा. नि. )—चंचल, पातळ त्वचा झालेली, खरखरीत, तांबूस, काळी, मेहरलेली, भिणभिण वेदनायुक्त, ती कदाचित् निमित्तावाचूनही ओसरते, दाबली असतां तत्क्षणीं वर येते, आणि दिवसास तिचा जोर अधिक असतो.

**वातशोथ** ( वाग्भट )—चंचल, ( एक जागीं न राहणारा ) रुक्ष, तांबूस, व काळा असून त्यावरील केंस रुक्ष, ( भरड ) होतात. तसेंच आकुंचन, कंप कांटा येणें, ( रोमांच ) वेदना, ठणका, स्फूट व बधिरता, हे प्रकार असतात. तो लवकरच उत्पन्न होतो. दाबला असतां त्याची खळी लवकर बुजते, पातळ असतो व बराही लवकरच होतो. स्निग्ध व उष्ण पदार्थ मर्दन केल्यानें बरा होतो, रात्रीं कमी, दिवसां जास्ती, व त्वचेवर मोहरी वांटून तिचा लेप केल्याप्रमाणें त्वचा चुरचुरते.

**वातशोथावर उपाय**—पूर्वी पंधरा दिवस निशोत्तर उगाळून किंवा काढा करून साखर घालून द्यावा, अथवा एरंडेल द्यावें. दूधभात अथवा मांसरसाबरोबर अन्न सेवन करावें, घाम काढावा. अभ्यंग करावा. पोतंडीनें शेकावें. आणि वातनाशक असे लेप द्यावें. ( १ ) सुंठ, पुनर्नवा, एरंडमूळ, व पंचमुळें याचा काढा मध घालून द्यावा.

**पित्तशोथ** ( मा. नि. )—मऊ, किंचित् गंधयुक्त, काळी, पिपळी आणि तांबूस असते, तिच्या योगानें भ्रम, ज्वर, घर्म तृषा आणि उन्मत्तताही होतात, जळजळते, हात लाविला असतां दुखते, डोळ्याला लाली व तिला अत्यंत दाह व पाक होतात.

**पित्तशोथ** ( वाग्भट )—शोथ लाल व काळसर असून त्यावरील केंसही

तांबूस रंगाचे होतात.हा लवकरच पसरतो व बरा होतो. हा प्रथम मध्यभागीं होतो, पातळ व मऊ असून त्यावर हात लाववत नाहीं, त्यास घाण येते, व थंड पदार्थ लाविला असतां बरें वाटतें. आणि तहान, दाह, ज्वर, घाम, दवथु (नेत्रादिकांतून कढत वाफा निघणें,) क्लेद मद व आयासावांचून श्रम हे प्रकार होतात.

**पित्तशोथावर उपाय**—( १ ) निशोत्तर, गुळवेल व त्रिफळा यांचा काढा मध घालून द्यावा. ( २ ) त्रिफळ्याचें चूर्ण गोमूत्रात देऊन वर दूधभात पथ्यास द्यावा. ( ३ ) कडू पडवळ, त्रिफळा, कडू निंब व दारुहाळद यांचा काढा गुग्गुळ घालून द्यावा; ह्मणजे तृषा व ज्वर यांणीं युक्त पित्तशोथेचा नाश होतो.

**कफजशोथ** ( मा. नि. )—जड, स्थिर, पांडुरवर्ण अशी असते, अन्नद्वेष, लाला स्राव, निद्रा, ओकारी, व अग्निमाद्य ही होतात. तिची उत्पत्ति आणि नाश हे चिरकालानें होतात. ती दाबली असतां वर येत नाहीं. रात्रीस तिचें बळ अधिक असतें.

**कफजशोथ** ( वाग्भट )—या शोफांत कंडू असते, त्वचा व केश पांडुरवर्णाचे असतात, सूज कठिण, थंड, जड, स्निग्ध, स्थिर व घट्ट असतो, त्यापासून झोंप, वांति व अग्निमांद्य हे विकार होतात. तो दाबला असतां खळी पडते. उत्पन्न होतांना व बरा होण्यास फार त्रास पडतो, रात्रीं बळावतो, त्यावर दर्भ व शस्त्र इत्यादिकांनी कांपलें असता फार वेळानें पिच्छा स्रवते, रक्त येत नाहीं व त्यास स्पर्श केल्यानें किंवा उष्ण उपचारानें बरें वाटतें.

**कफशोथावर उपाय**--( १ ) पुनर्नवा, सुंठ, निशोत्तर, गुळवेल, सावे, हिरडेदळ, व देवदार यांचा काढा अथवा एक तोळा कल्क गोमूत्राबरोबर द्यावा. ( २ ) क्षार, गोमूत्र, आंसव, मद्य, चूर्ण, ताक, इत्यादि कफशोथावर योजावी.

**द्वंद्वज व सन्निपातिक शोथ** (मा. नि.)---दोन दोन दोषांची कारणें आणि लक्षणें एकत्र झाली ह्मणजे द्वंद्वज शोथ जाणावा. व सन्निपातापासून जो होतो, त्यांत वातादि तिन्ही दोषांचीं लक्षणें होतात.

**अभिघात शोथ**—ही शस्त्रादिकाच्या वगैरे अनेक अभिघातापासून होते व तिचीं लक्षणें बहुतकरून पित्ताच्या सुजेसारखीं असतात.

**शोथाचीं स्थानें** ( मा. नि. )—आमाशयस्थित दोष वरती ( उरापासून वर ) सूज उत्पन्न करितात. पक्काशयस्थ दोषामध्यें ( ऊर आणि पक्काशय याच्या मध्यें ) सूज करितात. आणि मल स्थानागत दोष खाली ( पायांपर्यंत ) सूज उत्पन्न करितात. आणि सर्व देहांत दोष पसरले ह्मणजे सर्व अंगाला सूज आणितात.

**कष्टसाध्य लक्षण** ( मा. नि. )---मध्य देशावर येते ती, व सर्व अंगावर

येते ती कष्टसाध्य जाणावी. नवीन उपद्रव ( श्वासादि ) रहित असते ती साध्य होते.

**असाध्य लक्षण** ( मा. नि. )—जी सूज खालच्या अंगावर उत्पन्न होऊन वर चढते ती असाध्य होय. अन्य रोगाच्या उपद्रवानें जाहलेली नव्हे अशी सूज पहिल्यानें पायावर येऊन नंतर वर चढते ती उलटी सूज पुरुषाचा नाश करिते. आणि पहिल्यानें तोंडावर येऊन मग खालीं उतरते ती स्त्रियांस घातक जाणावी. आणि गुह्यस्थानीं उत्पन्न होऊन सर्व शरीरभर पसरते ती उभयतांस घातक होते.

**सर्व प्रकारचे सुजेवर उपाय**—[ १ ] काडे किराईत व सुंठ यांचा कल्क उष्ण पाण्यावरोबर प्यावा. किंवा दोहोंचा काढा करून मध घालून द्यावा ह्मणजे फार दिवसांचा त्रिदोषज शोथ असला तरी नाश पावेल. [ २ ] आल्याचा रस किंवा सुंठीचा काढा, गाईचे दुधांत मिश्र करून प्यावा. तो जिरल्यावर त्रिफळ्याचा काढा शिलाजीत घालून द्यावा. ह्मणजे बलात्कारेंकरून त्रिदोषज शोथेचा नाश होईल. [ ३ ] निर्गुडीचें बी, चित्रकमूळ, सुंठ, नागरमोथे, जिरें, रिंगणी, पहाडमूळ, हाळद, पिंपळी, गजपिंपळी, व जटामांसी यांचें चूर्ण मंदोष्ण पाण्यांत कालवून प्यावें. किंवा यांचा काढा करून मध घालून द्यावा. यापेक्षां मनुष्यास सुजेवर दुसरें औषध नाहीं. [ ४ ] आडूळसा, गुळवेल, रिंगणीमूळ व डोरलीमूळ याचा काढा मध घालून द्यावा ह्मणजे दुर्धर सूज, श्वास, ज्वर व ओकारी यांचा नाश होतो. [ ५ ] हिंगूळ, जेपाळ, मिरीं, टांकणखार व पिंपळी यांचा एकत्र बारीक खल करून ती मात्रा एक वाल तुपांत द्यावी, ह्मणजे सर्व प्रकारच्या सुजेचा नाश होतो. [ ६ ] काडेकिराईत व सुंठ यांचा कल्क सुमारें सहा मासेपर्यंत सेवन करून त्यावर पुनर्नव्याचा काढा मध घालून प्यावा; ह्मणजे निश्चयेंकरून सर्वांग सुजेचा नाश होईल. [ ७ ] बेलाच्या पानांचा स्वरस काढून तो सुमारें दोन तोळेपर्यंत किंचित् मध घालून प्राशन केला असतां सर्वांगसूज, मलबद्धता, मूळव्याध, विषूचिका, [ महामारी ] व कांवीळ यांचा नाश होतो. [ ८ ] आडूळसा, गुळवेल व डोरलीमूळ याचा काढा मध घालून प्याला असतां तो कष्टसाध्य अशी सूज, कृमि, श्वास, कास, ज्वर, व ओकारी यांचा नाश करील. [ ९ ] आल्याचा रस जुना गूळ घालून द्यावा. आणि वर चार तोळे शेळीचें दूध प्यालें ह्मणजे सर्व प्रकारच्या सुजेचा लवकर नाश होईल. ( १० ) पुनर्नवा, देवदार, गुळवेल, पाहाडमूळ, सुंठ, गोखरू, हळद, दारुहळद, रिंगणी, डोरली, पिपळी, चित्रक, आडूळसा, यांचें चूर्ण गोमूत्राबरोबर प्यावें; ह्मणजे बहुत प्रकारचा सर्वांग व्यापून राहिलेला शोथ लवकर नाश पावेल. (११) अशक्ततेपासून हातापायांवर सूज आली असतां आडूळशाची दहा बारा पानें तव्यावर थोडी गरम करून तीं ऊन ऊन अशीं सुजेवर बांधलीं असतां एका रात्रीत सूज उतरते. ( १२ ) मोहऱ्या व पादेलोण एकत्र पाण्यांत वाटून त्याचा सुजेवर लेप करावा. ( १३ ) त्रिफळ्याचा काढा ह्मशीचें तूप घालून प्याला असतां सूज, प्रमेह, नाडीव्रण व भगंदर यांचा नाश होतो.

(१४) वाळहिरडे, गुळवेल, भारंगमूळ, पुनर्नवा. चित्रकमूळ, दारुहळद व सुंठ यांचा काढा प्राशन करावा; ह्मणजे उदर, हात,पाय व तोंड यांची सूज जलद नाश पावते.

**सुजेवर पथ्य**—तीक्ष्ण रेच, तीक्ष्ण वमन, लंघन, रक्त काढणें, घाम, जुन्या साटक्या साळी, यव, कुळीथ, मूग, मोर, तितर, कोंवडा इत्यादि जंगलांतील मांसें, जुनें तूप, ताक, मद्य, मध, आंवळे, आंसव, पावटे, करटोलीं, लसूण, दोडकी, कोवळे मुळे, गाजर, पडवळ, क्षार, पांढरा कांदा व तावडा कांदा, घोळ, तोंडली, द्राक्षें, ऊन पाणी, मेंढीचें लोणी, शिंगाडे, एरंडतेल, मनुका, खिरण्या, ब्राह्मी, गोडंवी, माहाळूंग, शेवगा, एरंडेल, कडू व तिखट असे रस व गोमूत्र, ही पथ्यें जाणावी.

**सुजेवर अपथ्य**—ग्राम्य जनावरांचें मांस, जलांतील प्राण्यांचें मांस, मीठ, नवें अन्न, गुळाचे व पिठाचे पदार्थ, दहीं, तीळ, तांदुळाची खिचडी, झऱ्याचें पाणी, मद्य, आंवट पदार्थ, वहुत भक्षण, प्रकृतीस न सोसणारें अन्न, रात्री झोंप घेणें, मैथुन, ह्मशीचें ताक, जडान्न, पालेभाज्या, दाह करणारे पदार्थ वर्ज करावे.

---

## संग्रहणी.

**कर्मविपाक**—जन्मकाळीं सूर्य सप्तमस्थानी आणि चंद्र अष्टमस्थानी किंवा क्षीण असा असेल तर शत्रु, अतुर, अग्निमांद्य रोगी, संग्रहणी रोगी, असा मनुष्य होतो. **परिहार**—चंद्रमंत्राचा जप. तीळ, आज्य ( तूप ) पलाश, समिधा यांचें हवन, शंखदान इत्यादि करावी.

**पूर्व कर्मविपाक**—सुशील, सुरुष, निरापराधी, अशा विवाहित स्त्रीचा अल्पकारणाकरितां त्याग करणारा किंवा बालहत्त्या करणारा, जन्मांतरीं संग्रहणीरोगी होतो. **परिहार**—शिवसंकल्प, सूक्ताच्या अष्टोत्तर सहस्त्रावृत्ति, मधु, हिरण्य यांचें दान, सवत्सगोदान इ० करावी.

**संप्राप्ति** ( मा. नि. )—अतिसार गेला असतांही मंदाग्नि व अपथ्य भक्षण करणाऱ्या पुरुषाचा अग्नि पुनः दुष्ट होऊन ग्रहणीला[१] चोहींकडून दूषित करितो. अतिसार झाला नसला तरी ग्रहणीरोग होतो. आणि अतिसार गेला नसला तरी संग्रहणीरोग होतो. ज्याचा अग्नि प्रखर आहे त्यानें अपथ्य सेवन केलें तरी विकार होत नाहीं. ग्रहणी दुष्ट झाली ह्मणजे अन्नाचे पचन चांगलें होत नाहीं ह्मणून वारंवार आममिश्रित मळ पडतो. हा रोग बहुतकरून मुलास होतो असें पाहण्यांत येतें.

---

१—पित्तधरानामक सहावी कला सांगितली, ती पक्वाशय आणि आमाशय यांच्यामध्ये असते तिला ग्रहणी असे ह्मणतात, अन्नाचें ग्रहण करिते ह्मणून तिला ग्रहणी ही संज्ञा दिली आहे.

**सामान्य लक्षण** (मा. नि.)—अत्यंत दुष्ट झालेले पृथक् पृथक् दोष ह्मणजे वात, पित्त, कफ आणि सर्व त्रिदोष मिळून ती ग्रहणी दुष्ट झाली ह्मणजे खाल्लेलें अन्न अपक्क किंवा पक्क सोडिते, तेव्हां मुरडा होतो. त्या मळाला अत्यंत दुर्गंध असतो. मळ वायूनें वारंवार घट्ट होतो. पित्तानें वारंवार पातळ होतो; ह्मणजे चोथा, पाणी व भसरा होतो. आयुर्वेद जाणणारे लोक या विकारांस संग्रहणी असें ह्मणतात.

**पूर्वरूप** ( मा. नि. )—तृष्णा, आळस, बलनाश अन्नाचा विदाह, ( पाककाळीं जळती लागणें ) आणि अन्नाचा पाक उशिरानें होणें हें या ग्रहणीचें पूर्वरूप आहे असें जाणावें.

**वातग्रहणीचें कारण** ( मा. नि. )—तिखट, कडू, तुरट, अत्यंत रुक्ष आणि संयोगादि विरुद्ध अशा भोजनानें व अत्यंत अल्पभोजन, उपवास, अति मार्गगमन, मलमूत्रादि वेगाचें धारण, अत्यंत मैथुन, या कारणांनीं वायु कुपित होऊन अग्नीला दूषित करून रोगास उत्पन्न करितो.

**वातग्रहणीचें लक्षण** ( मा. नि. )—त्या रोग्याचें अन्न मोठ्या दुःखानें पचतें, पाक आंबट होतो. ( हें अग्निमांद्यामुळें झालेल्या पित्ताच्या विदाहानें होतें ) अंगाला खरखरीतपणा असतो. ( हें वायूनें त्वचेचा स्नेह शोषण केल्यामुळें होतें ) गळा आणि तोंड हीं कोरडीं पडतात. तहान आणि भूक लागते, दृष्टीस मांद्य येतें, कानांत शब्द होतो. बरगड्या, मांड्या, आडसांधि आणि मान, ही दुखतात. आणि वारंवार विषूचिका (दोन्ही द्वारानें आम अन्नाची प्रवृत्ति होते.) हृदयास पीडा, शरीर कृशता, शक्ति नाहीशी होणें, तोंडास अरुचि, गुदाच्या ठिकाणी कातरल्यासारखी पीडा, सर्व मधुरादि रस खाण्याची वासना, (ही गोष्ट व्याधिप्रभावानें किंवा वायूनें अंतःकरण दुष्ट झाल्यामुळें होत असेल) मनाची ग्लानि, अन्न जिरलें असतां पोट फुगतें, आणि कांहीं खाल्लें असतां सुख होतें, आपणास वातगुल्म, हृद्रोग आणि प्लीहारोग झाला आहे अशी त्या मनुष्यास शंका प्राप्त होते. कारण त्या रोग्यासारखी पीडा होत असते. वायूच्या योगानें तो मनुष्य खोकला आणि श्वास यांनीं पीडित होऊन त्याला फार वेळानें, मोठ्या कष्टानें, कधी पातळ, कधी कोरडा, थोडा शब्द आणि फेंसासहित वारंवार मळ होतो.

**वातग्रहणीवर उपाय**—( १ ) आंबट ताक सैंधव घालून द्यावें. ( २ ) सुंठीच्या कल्कांत तूप सिद्ध करून द्यावें. ( ३ ) संग्रहणी दोषावर अजीर्णाप्रमाणें उपाय करावे. ( ४ ) लंघन, दीपन आणि अतिसारावर युक्त असें औषध द्यावें. ( ५ ) अतिसाराप्रमाणेंच दोष आमसहित किंवा आमरहित हें पूर्वी पहावें आणि अतिसारावर युक्त विधि त्या विधीनें आम पक्क करावा.

**पित्तग्रहणीचें कारण व लक्षण** ( मा. नि. )—तिखट, अजीर्ण, विदाह करणारे ( वेळूचे कोंब नेपति इत्यादि ) आंबट, खारट इत्यादि पदार्थ वांटून जसें ता-

पविलेलें पाणी प्रसिद्ध अग्नीला विझवितें तसें हें पित्त जठराग्नीला ( उष्मा ) विझवून टाकतें. त्या मनुष्याच्या शरीराचा वर्ण पिंवळा होतो. त्याला अपक्क, निळ्या, पिंवळ्या रंगाचा आणि पातळ मळ होतो. त्याला धुरकट ढेंकर येतात. उरांत आणि गळ्यांत जळती लागते, अन्नद्वेष आणि तृषा यांनीं फार तो व्याकुळ होतो.

**पित्तग्रहणीवर उपाय**—( १ ) सुंठ, अतिविष, नागरमोथे, धायटीचीं फुलें, रसांजन, कुड्याची साल, इंद्रजव, बेलफळ, पाहाडमूळ, किराईत व कुटकी यांचें चूर्ण तांदुळाच्या धुवणाशी मध घालून द्यावें. तें पित्तसंग्रहणी, रक्तसंग्रहणी, अर्श, हृद्रोग, गुदरोग, शूल व प्रवाहिका, ( पातळ हगवण ) यांचा नाश करितें. ( २ ) गोड ताक साखर घालून द्यावें. ( ३ ) कुटकी, सुंठ, रसांजन, धायटीची फुलें, हरीतकी, इंद्रजव, नागरमोथे, कुड्याची साल आणि अतिविष यांचा काढा मध घालून द्यावा ह्मणजे तो अनेक प्रकारची संग्रहणी, गुदशूल आणि पित्तसंग्रहणी, यांचा नाश करितो.

**कफग्रहणीचें कारण व लक्षण** ( मा. नि. )—जड, अति स्निग्ध, थंड, इत्यादि पदार्थांचें सेवन केल्यानें आणि अतिमात्र भोजन केल्यानें आणि जेवण होतांक्षणींच झोंप घेतल्यानें कफ कुपित होऊन अग्नीचा नाश करितो. त्या रोग्याचें अन्न कष्टानें पचतें. हृदय लसलसतें, वांति, अरुचि, तोंड कफानें सारवल्यासारखें व गोड होतें. खोकला येतो, कफाचा बेडका पडतो, आणि पडसें येतें, हृदय पाण्यानें भरल्यासारखें वाटतें. पोट ताटतें. यामध्यें विकृत आणि मधुर असा ढेंकर येतो. अग्निमाद्य होतें, स्त्रीसंभोगाविषयीं इच्छा नसते, पातळ आणि आमपाकानें मिश्रित आणि जड असा मळ होतो. कृश नसून दुर्बळता ह्मणजे सामर्थ्य नसतें आणि आळस येतो

**कफग्रहणीवर उपाय**—[ १ ] कचोरा, सुंठ, मिरीं, पिंपळी, बाळहिरडे, जवखार, सज्जीखार, पिंपळमूळ व महाळुंग यांचें चूर्ण सैंधव व निंबाचा रस याजबरोबर द्यावें. [ २ ] ताक यवखार व त्रिकटू घालून द्यावें. [ ३ ] गुळवेल, अतिविष, सुंठ आणि नागरमोथे, यांचा काढा आमसंग्रहणीचा नाश करितो. व ग्राहक, अग्निदीपक, व पाचक असा आहे. [ ४ ] ज्याला कष्टानें आणि कठिण असा मळ होतो, त्यानें तुपांत शेंदेलोण घालून प्राशन करावें.

---

**वातकफसंग्रहणी** ( सुश्रुत )—वातकफाचीं लक्षणें जींत असतात ती. **उपाय**—( १ ) कचोरा, पंचलवणें, रास्ना, त्रिकटू, बाळहिरडे, सज्जीखार, यवखार, व महाळुंग, हीं समभाग घेऊन त्यांचें चूर्ण ऊन पाण्याशी द्यावें; ह्मणजे तें बल वर्ण, व अग्नि यांना वाढवून कफवातसंग्रहणीचा नाश करितें.

**कफपित्तसंग्रहणी** ( सुश्रुत )—पित्तकफाचीं लक्षणें जींत असतात तीं. **उपाय**—( १ ) पारा १ भाग व गंधक ३ भाग, यांची कज्जली करून त्या समान

जीवंत क्षुद्रशंख घालून निंबाच्या रसांत एक दिवस मर्दन करावें. आणि मिरीं व मध यांशीं चार मासे द्यावें, ह्मणजे कफपित्तसंग्रहणीचा नाश होतो. ( २ ) सफेतमुसळी ताकांत किंवा तांदुळाच्या धुवणांत वांटून एक तोळा द्यावी. पथ्य—ताकभात ह्मणजे संग्रहणी नाश पावते.

**वातपित्तसंग्रहणी** ( सुश्रुत )—वातपित्ताचीं लक्षणें जींत असतात तीं. **उपाय**—मुंडी, शतावरी, नागरमोथे, कुहिलीचें बीज, दुधी, गुळवेल, जेष्टीमध, व सैंधव, यांच्या चूर्णाच्या दुप्पट, भाजलेली भांग घालून तुपाच्या भांड्यांत दसपट गाईचें दूध मंदाग्नीनें पचन करावें. गोळा होऊं लागला ह्मणजे तितकाच मध घालावा व सारखें करून ठेवावें. यांतून एक तोळा तें औषध व दोन तोळे साखर एकत्र करून भक्षण करावी, ह्मणजे द्वंद्वज, संग्रहणी, वातपित्त, कफपित्त, व पित्तसंग्रहणी यांचा नाश करितें.

**सन्निपातसंग्रहणी** ( सुश्रुत )—वातादिकांचीं पृथक् पृथक् सांगितलेलीं कारणें व लक्षणें एकत्र झालीं असतां त्रिदोषसंग्रहणी रोग जाणावा.

**असाध्यलक्षण** ( सुश्रुत )—जी ग्रहणी दिवसास कुपित होते आणि रात्रीचेठायीं यत्किंचित् शांत होते ती अत्यंत दुर्ज्ञेय आणि दुर्निवार व बहुतकाळ राहणारी अशी जाणावी. ज्या लक्षणेंकरून अतिसार असाध्य होतो, तीं लक्षणें ज्या ग्रहणीचेठायीं झालीं ती असाध्य जाणावी व वृद्ध मनुष्याचीही असाध्य होय.

**घटीयंत्रसंग्रहणी** ( सुश्रुत )—ज्या ग्रहणीचेठायीं अंगास चिमटा घेतला असतां कळत नाही व दोहों कुशींत शूळ, पोटांत गुडगुड, व भडभड असा शब्द होतो ही असाध्य होय.

**सर्व संग्रहणींवर उपाय**—( १ ) संग्रहणीरोग दुःसाध्य आहे तो सहस्र औषधें घेतलीं तथापि शांत होत नाहीं. याकरितां दोष, धातु आणि बल यांच्या इच्छेसाठीं तक्र सेवन करावें. ताकावांचून हा रोग शांत होत नाहीं. संग्रहणी रोग्याला ताक द्यावें. तें ग्राहक, लघु व दीपन आहे. गाईचें ताक त्रिदोषनाशक व हितकारक आहे. तें सुंठीचें चूर्ण घालून द्यावें, आणि अन्न हळु हळु कमी करावें. व ताक वाढवीत जावें. तें इतकेंच की, ताकच अन्नावाचून आहार होईल. अन्न खाऊं नये, भूक व तहान लागली असतां सुंठीचें चूर्ण घालून ताक प्यावें व बहुधा मौन धरावें; ह्मणजे फार भाषण करूं नये. मैथुन व क्रोध हे वर्जावे. याप्रमाणें ताकाचें सेवन केलें असतां शीघ्र संग्रहणीचा रोगाचा नाश होईल. ( २ ) क्षारताम्ररस अनुपान योजून द्यावा. ( ३ ) हिंग, जिरें व सैंधव यांणी युक्त केवळ दही घुसळलेलें ताक प्यावें. तें संग्रहणी, अर्श, अतिसार आणि वायु यांचा नाश करितें. ( ४ ) पारा १ भाग, गंधक २ भाग, त्रिकटू ३ भाग, जिरें, टांकणखार, धणे, हिंग जिरें व ओंवा हीं प्रत्येक पाऱ्याच्या दुप्पट आणि पादेलोण पाऱ्याच्या चौपट व स-

याँबरोबर कवडीभस्म, हीं सर्व एके ठिकाणीं खलावीं. हा ग्रहणीकपाटरस दोन मासे ताकाशीं भक्षण केला असतां संग्रहणीचा नाश होतो. ( ५ ) पारा, हिंगूळ, चित्रकमूळ, अभ्रकभस्म, टांकणखाराची लाही, धोत्र्याचें बीज, अतिविष, त्रिकटू, वाळहिरडे, रानशेणीचें भस्म, ओंवा, बचनाग, बेलफळ, इंद्रजव, कौठ, वाळा, सावरीचा चीक ( मोचरस ) ,डाळिंबाच्या फळावरील साल, धायटीचें फूल, नागरमोथे, सावरीचीं फुलें व आफू, हीं सर्व एकेक भाग, यांचा धोत्र्यांचे पानांचा रसांत खल करून मिऱ्याएवढी गोळी मधात द्यावी; ह्मणजे ज्वरयुक्त संग्रहणी, दुष्ट विषूचिका, अग्निमांद्य, शूल, सर्व प्रकारचें गुल्म, तीव्र पांडुरोग व रक्तस्रावी आम यांचा नाश होतो. ( ६ ) सज्जीखार, जवखार, भांग, अतिविष, ओंवा, पारा व गंधक हीं सर्व औषधें निंबुरसांत खलून चार गुंजांप्रमाण गोळी मधांत द्यावी. मागून थोडी तूपसाखर खावी; ह्मणजे ज्वर, अतिसार, शूळ व सूज यांणीं युक्त संग्रहणीचा नाश करिते. ( ७ ) ग्रहणीगजकेसरी द्यावा. ( ८ ) उदयभास्कर द्यावा. ( ९ ) गाईचें निरसें दूध एकशेर त्यांत एका निंबाचा रस पिळून दोन तोळे पिठीसाखर घालून देणें. याप्रमाणें तीन दिवस घेतलें असतां संग्रहणीचा नाश होतो. (१०) इंद्रजव पावशेर व अजमोदा पावशेर याचें चूर्ण दोनशेर दुधांत पक्व करावें. त्यांत साखर आतपाव घालून करहईचे पात्रांत घालून दररोज एकेक तोळा सेवन करीत जावें. (११) कातांचें वस्त्रगाळ चूर्ण करून उंबराचे चिकांत भिजवून वाल प्रमाण गोळी ह्मशीचे दह्यांत द्यावी. ( १४ ) चवक, चित्रक, बेलफळ, व सुंठ यांचें चूर्ण ताकांत द्यावें; ह्मणजे फार झालेल्या संग्रहणीचा नाश होईल. ( १५ ) बेलफळ, नागरमोथे, इंद्रजव, वाळा, व मोचरसहीं घालून तापविलेलें शेळीचें दूध तीन दिवस जो प्राशन करितो त्याचा संग्रहणीसंबंधीं विकार नाश पावतो व एक महिना घेतलें असतां असाध्य, दुष्ट, रक्ताचाही नाश होतो. ( १६ ) शंखवटी द्यावी.

**संग्रहणीवर पथ्य**—निद्रा, ओकारी, लंघन, जुन्या साटक्या साळी, लाह्यांचा मंड, व मसुरा, तुरी, मूग, लोणी, गाईचें, व शेळीचें दूध, मेंढीचें दूध, लोणी, दहीं, तिळाचें तेल, मध, मद्य, कमलकंद, फणस, खट्टें व गोड डाळिंब, द्राक्षें, केळफूल, जुनें केळें, शिंगाडे, चुका, कवठ, चांगलें ताक, जायफळ, जांभूळ, धणे, आफू, पांढरा भोपळा, ससा, हरीण, तितरपक्षी यांचे मांसरस, संपूर्ण बारीक जातीचे मासे, धेंडसीं, तुरट पदार्थ, आमसूल, काजू, गांजर, ह्मशीचें तूप, दूध, ऊन पाणी, पुदीना, लोणी, शेरणी, ही संग्रहणीवर पथ्यें जाणावीं.

**संग्रहणीवर अपथ्य**—रक्तस्राव, जाग्रण, उदकपान, स्नान, स्त्रीसंग, मलमूत्रादिकांचा वेगधारण, नस्य, अंजन, घाम, धूम्रपान, श्रम, विरुद्धान्न, गहूं; पावटे, वाटाणे, उडीद, यव, चवळ्या, चाकवत, कोहळा, शेवगा, तांबूल, कंद ऊंस, बोरें, आंबा, काकडी, सुपारी, दूध, गूळ, दह्याची निवळी, नारळ, पालेभाज्या, कस्तूरी, क्षार, सारक पदार्थ, आंबट, मीठ, जडान्न, गांजर, थंड पाणी व द्राक्षें, हे पदार्थ वर्ज करावे.

---

# स्वरभेद.

**कर्मविपाक**--जन्मसमयीं वृश्चिक लग्नस्थ क्षीण चंद्र असेल तर कंठस्वरभंग रोग होतो. **परिहार**--चंद्राचा जप, होम, दानें इत्यादि करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—गुरु, पिता, माता, इत्यादिकांच्या वाणीचा प्रतिबंध करणारा, किंवा पुस्तकाची चोरी करणारा स्वरभंग रोगी होतो. **परिहार**—सरस्वतीची सुवर्णाची प्रतिमा करून तिची पूजा करून होमपूर्वक दान करावें. याप्रकारें दैविक प्रतिकार जाणावा.

**स्वरभेदाचें कारण** ( मा. नि. )—फार मोठ्यानें बोलणें, विषभक्षण, उच्चस्वरानें वेदादिक पाठ करणें, कंठादिकांवर काष्ठाचा प्रहार, ह्या कारणानें अत्यंत कोप पावलेले जे वातादि दोष ते स्वर वाहणारी जीं चार स्रोतसें आहेत त्यांत जाऊन किंवा तेथें वृद्धि पावून स्वराचा नाश करितात. हा स्वरभेद सहा प्रकारचा आहे.

**वातज स्वरभेद** ( मा. नि. )—डोळे, तोंड, मूत्र आणि विष्ठा, हीं काळीं होतात व रोगी फुटक्या भांड्याप्रमाणें व गाढवाच्या स्वराप्रमाणें कर्कश बोलतो. **उपाय**—( १ ) वात, कास व श्वास यांवरचे उपाय करावे. ( २ ) जेवण झाल्यावर तूप व मिरपूड खावी. (३) तूप-भातांत गूळ घालून खावा व वर ऊन पाणी प्यावें. ( ४ ) माक्याचा रस व तूप एकजागीं करून अग्नीवर ठेवून रस आटला म्हणजे तूप प्यावें. ( ५ ) कासविंद्याचा रस आणि भारंगमूळ यांचें चूर्ण यांनीं मंदाग्नीवर सिद्ध केलेलें तूप प्यावें.

**पित्तज स्वर०** ( मा. नि. )—नेत्र, तोंड, मूत्र आणि विष्ठा, हीं पिवळीं होतात व बोलते वेळेस गळ्यांत दाह होतो. **उपाय**--( १ ) रेच द्यावे. ( २ ) साखर किंवा दुसरे मधुर पदार्थ घालून तापलेलें दूध प्यावें. ( ३ ) गोड पदार्थांचें चूर्ण मधाबरोबर द्यावें. ( ४ ) जेष्टीमधेचा काढा तूप घालून द्यावा. ( ५ ) कासविंदा, वांगीं, व माका यांचा अंगरस तूप घालून प्यावा व वर दूध प्यावें. ( ६ ) मोठ्यानें बोलून घसा बसल्यास साखर व मध यांनीं मिश्रित आणि कांहीं गोड पदार्थ घालून तापविलेलें दूध प्यावें.

**कफजस्वर०** ( मा. नि. )—कफानें नेहमीं कंठ रोधला असतां हळुहळु सावकाश भाषण करितो, परंतु कफ दिवसास मंद असतो. याकरितां दिवसास भाषणानें सुख होतें व रात्रौ फार क्लेश होतात. **उपाय**—( १ ) पिंपळी, पिंपळमूळ, सुंठ व मिरी, यांचें चूर्ण गोमूत्रांत घालून द्यावें ( २ ) आल्याचा रस, सैंधव, त्रिकटू व महाळुंगाचा रस यांचा गंडूष ह्मणजे चूळ भरून टाकणें, हें कफगजाला सिंव्हासारखें नाश करणारें आहे. (३) कुटकी, अतिविष, पाहाडमूळ, दारुहळद, नागरमोथे व इंद्रजव, हीं गोमूत्रांत वांटून प्यावीं. तीं कंठरोगनाशक आहेत.

**सन्निपातजस्वर०** ( मा. नि. )—यांत पूर्वोक्त तिन्ही दोषांचीं लक्षणें असतात. हा असाध्य आहे. **उपाय**—( १ ) अजमोदा, हळद, आंवळकठी, जवखार व चित्रक यांचें चूर्ण मध व तूप यांत द्यावें. ( २ ) त्रिफळा, त्रिकटू व जवखार, यांचें चूर्ण अथवा कुळिथ किंवा पोखरमूळ, यांचें चूर्ण मध व तूप यांत द्यावें. तें स्वरभेदनाशक आहेत.

**क्षयजन्यस्वरभेद** ( मा. नि. )—तोंडांतून पाणी निघतें त्या वेळेस घशांतून धूर निघाल्याप्रमाणें अनुभवास येतें. आणि वाणी क्षय पावते, म्हणजे स्वर अगर्दी उमटत नाहीं. याजवर क्षयावरचे उपचार करावे. कारण हा धातुक्षयापासून रोग उत्पन्न होतो.

**मेदजस्वर०** ( मा. नि. )—कफ किंवा मेद यांनीं गळा लिप्त होतो. व मेदानें स्रोतोरोध केल्यामुळें तहान फार लागते आणि शब्दोच्चार न होतां खोल स्वर बोलतो. यांवर तिखट, कडू व तुरट इत्यादि औषधांनीं उपचार करावा.

**असाध्य लक्षण** ( मा. नि. )—क्षीण, वृद्ध, कृश, यांचा व बहुत दिवसांचा व जन्मकाळीं देहाबरोबर झालेला, मेदस्वी पुरुषाचा व सन्निपातिक हे सर्व स्वरभेद असाध्य जाणावे.

**सर्व स्वरभेदांवर उपाय** ( १ ) बोरीचे पानाचा कल्क सैंधव घालून तुपांत तळून खावा. ( २ ) शिरसाचे तेलांत कांत भिजवून तोंडांत धरावा. ( ३ ) हिरडा व पिंपळी यांजबरोबर अथवा सुंठीबरोबर कांत तोंडांत धरिला असतां स्वर नीट होतो. ( ४ ) ब्राह्मी, वेखंड, बाळहिरडे, आडूळसा व पिंपळीं याचें चूर्ण मधाशीं द्यावें. ह्मणजे चिन्नरासारखा स्वर होतो.

**स्वरभेदास पथ्य**—घाम काढणें, धूमपान, रेच, नस्य, यव, साटक्या साळीचा भात, रानकोंबडा व मोर यांच्या मांसाचे रस, मध, गोखरू, कावळी, कोंवळे मुळे, द्राक्षें, हरीतकी, महाळुंग, लसूण, मीठ, विडा, मिरीं, तूप, बेदाणा, गाईचें तूप, नागवेल, जुन्या गव्हाची पोळी हीं पथ्यें जाणावीं.

**अपथ्य**—आंबा, कवठ, बकुल, जांबूळ, चारोळ्या, तुरट पदार्थ, वांति, झोंप, वडबड, विरुद्ध अन्न व पान हे वर्ज करावे.

---

## हृद्रोग.

॥ उरोग्रहस्तथाचैको हृद्रोगाः पंचकीर्तिताः ॥

अर्थ—ऊर ओढून घेतल्यासारखें वाटतें त्याला उरोग्रह ह्मणतात. तो एक प्रकारचा जाणावा व हृद्रोग पांच प्रकारचा आहे.

**कर्मविपाक**—जन्मकाळीं चतुर्थस्थानीं शनि अथवा रवि असेल तर हृद्रोग, बंधुसौख्य, अर्थवृद्धि, बाल्यावस्थेंत व्याधी, पुत्रसुख, द्वेष, क्रोध, परस्त्रीसुख, कर्मठपणा इत्यादि प्राप्त होतात. **परिहार**—शनि व रवी यांचीं दानें, जप, हवन इत्यादि करावीं.

**पूर्वकर्मविपाक**—छिद्र काढून जो दुसऱ्याचें मन क्षणोक्षणीं दुखवितो, त्याला हृद्रोग होतो. **परिहार**—प्राजापत्य प्रायश्चित्त, गोप्रदान, सुवर्णदान, सहस्र नामाचा जप, कूष्मांडहोम इत्यादि करावीं.

**हृद्रोगाचें कारण** ( मा. नि. )—अति उष्ण, अति जड, अति आंबट, अति तुरट, आणि अति कडू अशा पदार्थांनीं, श्रम, अभिघात, आणि जेवणावर जेवण, हें नित्य घडल्यानें, काळजीनें, आणि मळमूत्रादिकांचा वेगरोध केल्यानें हृदयाला रोग होतो, तो पांच प्रकारचा जाणावा.

**संप्राप्ति** ( मा. नि. )—कुपित झालेले दोष हृदयांतील रसाला दुष्ट करून हृदयामध्यें नानातऱ्हेची पीडा करितात.

**वातजहृद्रोग** ( मा. नि. )—हृदय ओढल्यासारखें, सुईनें टोंचल्यासारखें, रवीनें घुसळल्यासारखें, दुभाग केल्यासारखें, अरीनें भोंसकल्यासारखें, अथवा कुऱ्हाडीनें फोडल्यासारखें होतें.

**वातजहृद्रोग** ( वाग्भट )—वायूपासून उरांत अतिशय शूल, व टोंचल्यासारख्या वेदना होतात. हृदय फोडल्यासारखें वाटतें, तसेंच तें शुष्क, स्तब्ध आणि रितें ( शून्य ) होतें, तसेंच त्याचें अंतःकरण फार कोमळ होतें, कारणावांचून दैन्य, शोक व भीति उत्पन्न होते, शब्द सहन होत नाहीं. अंग कांपतें, पिळवटतें, मोह होतो, श्वासाचा रोध होतो, व झोंप कमी येते.

**वातजहृद्रोगावर उपाय**—( १ ) पिंपळी, वेलदोडे, वेखंड, हिंग, जवखार, सैंधव, पादेलोण, सुंठ, व ओंवा, यांचें चूर्ण तोळाभर, व अंबील किंवा कुळिथाचें पाणी किंवा दहीं अथवा मद्य अथवा मांसस्नेह यांतून एकावरोबर वमन किंवा रेचन यांनीं शुद्ध झालेल्या मनुष्यास पाजावें म्हणजे वातहृद्रोग शांत होतो.

**पित्तजहृद्रोग** ( मा. नि. )—पित्तजहृद्रोगामध्यें तृषा, किंचित् दाह, मोह आणि हृदयाची ग्लानि, धूर निघाल्यासारखें वाटणें, मूर्च्छा, स्वेद आणि तोंडाला कोरड, हीं लक्षणें होतात.

**पित्तजहृद्रोग** ( वा. भ. )—तहान, भ्रम, मूर्च्छा, दाह, घाम, आंबट ढेंकरा, आम्लपित्ताची ओकारी, घशांतून वाफा निघणें ( जळजळणें ), त्वचा, डोळे, नखें, इत्यादिकास पिवळेपणा व ताप, हीं लक्षणें होतात.

**पित्तजहृद्रोगावर उपाय**—(१) थंड लेप, आणि पाणी शिंपणें व रेचन, हे

उपचार करावे. ( २ ) काळीं द्राक्षें व बाळहिरडे यांचें चूर्ण साखर घालून थंड पाण्यांत द्यावें. ( ३ ) अर्जुनवृक्षाचे सालीचा काढा, लघुपंचमूळ अथवा जेष्ठीमधेचा काढा यांतून एकाबरोबर सिद्ध केलेलें दूध द्यावें.

**कफजहृद्रोग** ( मा. नि. )—कफानें हृदय व्याप्त झालें असतां जडत्व, कफाचा स्राव, अरुचि, हृदय ताठल्यासारखें, अग्निमांद्य, तोंड, गुळचट, हीं लक्षणें होतात.

**कफजहृद्रोग** ( वाग्भट )—हृदय ताठतें, त्यांत दगड ठेविल्याप्रमाणें जड होतें, व खोकला, अग्निमांद्य, थुंकी, झोंप, आळस, अरुचि व ज्वर, हीं लक्षणें होतात.

**कफज हृद्रोगावर उपाय**—( १ ) बारीक वेलदोडे व पिंपळमूळ यांचें चूर्ण तुपांत द्यावें. ( २ ) निशोत्तर, कचोरा, चिकणा, रास्ना, बाळहिरडे, सुंठ व पोखरमूळ यांचा काढा किंवा चूर्ण गोमूत्रांतून द्यावें.

**त्रिदोषजहृद्रोग** ( मा. नि. )—यांत पूर्वोक्त तिन्ही दोषांचीं लक्षणें असतात. यांमध्यें कांहीं अपकार झाला असतां गांठ उत्पन्न होते तीपासून कृमी होतात. चरकानेंहीं असेंच सांगितलें आहे. त्याचें लक्षण–तीव्र पीडेनें व टोंचणीनें व कंडूनें युक्त असा हृद्रोग कृमिजन्य जाणावा. उत्क्लेद ( ओकारी आल्यासारखी वाटणें ) थुंकणें, सुया टोंचल्यासारखी पीडा, शूळ, मळमळ, आंधारी, अन्नद्वेष, डोळ्यांना काळिमा, आणि कोरड, ही लक्षणें कृमिज हृद्रोग, होतात. **जेज्जटाचें** असें ह्मणणें आहे कीं, उत्क्लेदापासून तमापर्यंत त्रिदोषज ज्याचें लक्षण त्यांत तोद, शूळ, हे वायूपासून, उत्क्लेद, हृलास आणि ष्ठीवन हें कफापासून आणि तम हें पित्तापासून होतात. आणि अरुचीपासून कृमिजाचें लक्षण होय. याविषयीं प्रत्येक आचार्यांचीं मतें भिन्न भिन्न आहेत.

**सर्वांचे उपद्रव** ( मा. नि. )—क्लोम ह्मणजे पिपासास्थान त्याची ग्लानि होते, भ्रम व शोष हे त्यांचे उपद्रव जाणावे. व कफज कृमीचे जे उपद्रव सांगितले आहेत ते कृमीज हृद्रोगामध्यें होतात.स्तंभ, घोर ज्वर आणि हृदय, गुरू, रुक्ष, असें असून त्याला स्पर्श सहन होत नाही. आध्मान होतें, कुक्षि, हृदय, अपानवायु, विष्ठा व मूत्र यांचा निरोध, तंद्रा, अरुचि व शूळ, हीं लक्षणें होतात.

**कृमिज हृद्रोगावर उपाय**—( १ ) लंघन व रेचन हीं पूर्वी देऊन नंतर कृमिरोगावर सांगितलेले उपाय करावे. ( २ ) वावडिंग व कोष्ठ यांचें चूर्ण गोमूत्रांत द्यावें; तेणेंकरून हृदयांतील असाध्य कृमिही पडतील.

**सर्व प्रकारचे हृद्रोगांवर उपाय**—( १ ) बकुळीच्या फुलाचा हार घालावा. (२) एरंडमूळाचा काढा जवखार घालून द्यावा; ह्मणजे,हृदय, कुशी व कंबर यांचे

ठिकाणचे शूळाचे विदारणाविषयीं सिंहाचे नखाप्रमाणें होतो. ( ३ ) सुंठीचा काढा गरम असा मध घालून द्यावा; ह्मणजे अग्नि प्रदीप्त होतो. व दमा, खोकला, वायु, हृद्रोग व शूल यांचा नाश करितो. ( ४ ) कुटकी व जेष्ठीमध यांचें चूर्ण ऊन पाण्यांत द्यावें; तें जीर्णज्वर, रक्तपित्त, व हृद्रोग यांचा नाश करितें. ( ५ ) अर्जुनसादाड्याचें चूर्णात गव्हाचें सपीट समभाग मिळवून शेळीचे दुधांत घालून त्यांत गाईचें तूप घालून थोडें शिजवावें आणि मध व तूप यांत देत जावें. ( ६ ) अर्जुनवृक्षाचे सालीचें चूर्ण करून तें तूप, दूध किंवा गुळाचें पाणी यांतून एकाबरोबर सेवन केलें असतां हृद्रोग, जीर्णज्वर, व रक्तपित्त यानें दूर करून चिरंजीव करील. ( ७ ) हरणाचे शिंगाचें भस्म गाईचे तुपांत देत जावें. ( ८ ) सुंठ, पादेलोण, डाळिंबाच्या फळावरील साल, आम्लवेतस, आणि भाजलेला हिंग, यांचें चूर्ण मधांत, किंवा गोमूत्रांत हृद्रोगावर द्यावें.

**हृद्रोगास पथ्य**—वाम, रेच, वांति, लंघन, जुनें तांबडें भात, अरण्यांतील पशुपक्षी यांचें मांस, मूग, आणि कुळीथ, यांचे यूष व रस, पडवळ, केळें, जुना कोहळा, आंबा, डाळिंब, वाहावा, एरंडेल, सैंधव, शेळी व मेंढी यांचें ताक, जुना गूळ, लसूण, हरीतकी, मिरीं, कस्तुरी, तांबूल, आक्रोड, करटोली, कांदा, गाईचें दूध, हिंग, साळी, यव, कारलें, आमसूल, चुका, जायफळ, एरंड तेल, बेदाणा, कबाबचिनी, पावसाचें पाणी, जुन्या गव्हाची पोळी, तुरीचें वरण, गाईचें तूप, ही पथ्यें जाणावी.

**हृद्रोगावर** अपथ्य—तृषा, वांति, मळ, मूत्र, रुदन, खोकला, ढेंकर, श्वास, श्रम यांच्या वेगाचें धारण, मेंढीचें दूध, बिघडलेलें पाणी, तुरट, व खारट रस, जेष्टीमध, दंतकाष्ठ, रक्तमोक्ष, तेलकट, ताक, जडान्न, श्रम, मार्ग चालणें, चिंता, फार भाषण, हे वर्ज करावे.

---

## क्षयरोग.

॥ अनेकरोगानुगतो बहुरोगपुरोगमः ॥ राजयक्ष्माक्षयः शोषोरोगराडितिचस्मृतः ॥

**अर्थ**—क्षयरोग हा पुष्कळ रोगानंतर उत्पन्न होतो व तो झाल्यावर त्यांत पुष्कळ रोग होतात. याला राजयक्ष्मा, क्षय, शोष, व रोगराज असें ह्मणतात.

**कर्मविपाक**—जन्मकाळीं दशमस्थानीं शनि, अथवा चंद्रक्षेत्रीं किंवा शुक्रक्षेत्रीं बुध असेल, तर कुष्ठ, क्षयरोग, गजादिकांपासून भय, व अनेक प्रकारची दुःखें इत्यादि होतात. **परिहार**—बुधपीडा निरसनार्थ जप, होम, दानें, इत्यादिक करावी.

**पूर्वकर्मविपाक**—ब्रह्महत्या, अभक्ष्यभक्षण, परवस्तूचे ठिकाणीं अभिलाष, दुसऱ्याची भूमि हरण करणें, मनुष्यहत्या, शास्त्रज्ञानावांचून विद्वानाच्या सभेमध्यें धर्मशास्त्र, प्रायश्चित्तादि व्यवहार सांगणें, इत्यादि पातकांपासून क्षयरोग होतो. **परिहार**—षडब्दव्रत प्रायश्चित्त करावें; यवमध्य, पिपीलिकाकृच्छ्रचांद्रायणादिक करावें. किंवा एकशेंऐशी निष्कद्रव्याचा उत्सर्ग करावा, ब्राह्मण सहस्रभोजन घालावें, होम सुवर्णाचा कदलीवृक्ष करून त्याचें पूजनपूर्वकदान करावें इत्यादि वीरसिंहावलोकन ग्रंथांत विधि सांगितला आहे.

**क्षयरोगाचें कारण** ( मा. नि. )—वात, मूत्र, पुरीषादि वेगाचा रोध करणें, अति मैथुन, उपवास, ईर्षा, विषाद, इत्यादि धातुक्षयाचीं कारणें, बळवंताशीं झोंबी करणें, अकाली थोडें किंवा फार खाणें, ह्या चार कारणांनीं त्रिदोषांचा कोप होऊन एक यक्ष्मारोग होतो. वेगरोधादिकही वातकोपाचीं कारणें आहेत खरीं परंतु वातकोपानेंच अग्नि दुष्ट होऊन कफपित्तांचाही कोप होतो. या चार हेतूंमध्यें असंख्य हेतूंचा अंतर्भाव होतो. रसादि धातूंचें शोषण करितो, म्हणून ह्या रोगाला शोष ह्मणतात. शरीरांतील पाचनादि सर्व क्रियांचा क्षय करितो, ह्मणून क्षय म्हणतात. वाग्भटानें तर हा सर्व रोगाचा राजा म्हणून याला राजयक्ष्मा नांव दिलें आहे.

**विशेषसंप्राप्ति** (मा. नि.)–(अनुलोम व प्रतिलोमक्षय) केवळ धातुक्षय झाल्यानेंच क्षयरोग होतो असें नाहीं, तर रसादिकांच्या स्रोतसाचा रोध झाला असतांही होतो. तो असा—कफ आहे मुख्य ज्यामध्यें अशा वातादि दोषांनीं रस वाहणाऱ्या धमनी रुद्ध झाल्या असता, येथें हें सुचविलें कीं रसमार्ग बंद झाला ह्मणजे येथेंच तो हृदयांत राहून नासतो आणि तोंडावाटें निघतो. येणेंकरून अनुलोमक्षय दर्शविला ह्मणजे रसापासून शुक्रापर्यंत धातूंचा क्षय होणें तो. आतां प्रतिलोम ह्मणजे शुक्रापासून रसापर्यंत शोष होत जाणें तो; तो क्षय कसा होतो तो दाखवितों. अथवा अति मैथुन करणाऱ्या पुरुषाचें शुक्र क्षीण झालें असतां त्याच्याजवळचे सर्व धातु क्षीण होतात. नंतर तो पुरुष सुकतो, शुक्र क्षीण झालें म्हणजे मज्जा क्षीण होते, मज्जा क्षीण झाली म्हणजे अस्थी क्षीण होतात. याप्रमाणें पूर्व पूर्व धातु क्षीण होत जातात.—आता शुक्र हें कार्यभूत आहे याचा क्षय झाला असतां कारणभूत धातूंचा क्षय कसा होईल? अशी कोणी शंका करील तर सांगतों. शुक्रक्षयापासून वायु कुपित होतो, तो वायु जवळच्या मज्जेला शोषितो याप्रमाणें. पूर्वपूर्व धातूंला शोषित, शोषित रसापर्यंत जातो. जसा अग्नीनें तापवून लाल केलेला लोखंडाचा गोळा ओल्या जमिनीवर ठेविला तर जवळची जमीन सुकून जाते तसा हा दृष्टांत यासमयीं जाणावा.

**क्षयाचें पूर्वरूप** ( मा. नि. )—श्वास, हातपाय गळणें, कफाचा बेडका पडणें, टाळा कोरडा पडणें, वांति, अग्निमांद्य, उन्मत्तता, पडसें, खोकला, आणि झोंप,

हीं लक्षणें धातुशोष व्हावयाचा असला ह्मणजे होतात. आणि त्या मनुष्याचे डोळे पांढरे होतात व त्याला मांस खाण्याची व स्त्रीजवळ रति करण्याची इच्छा फार होते. असें होण्याचें कारण केवळ व्याधिमहिमा होय. व्याधीच्या योगानें मन दुष्ट होऊन अशी इच्छा होते.

**कारण** (वाग्भट)–क्षयरोग होण्यापूर्वीं पुढील लक्षणें होतात पडसें येतें, अतिशय शिंका येतात, लाळ गळते, तोंड गोड होतें, अग्नि मंद होतो, शरीर निशक्त होतें, भांडीं व अन्नपान हीं स्वच्छ असतांही घाणेरी आहेत असें दिसतें, उरांत जळजळतें, वांति होते, तोंडास अरुचि असते, चांगल्या रीतीनें अन्न खात असतांही शक्ति कमी होते, बहुधा अन्नपानादिकांत माशा, गवत व केंश इत्यादि पडतात. रोगी नेहमीं आपल्या हाताकडे पाहतो. पाय व तोंड सुजतात, डोळे पांढरे फटफटीत होतात. हात किती लठ्ठ आहेत हें समजण्याची इच्छा होते. त्याचें शरीर चांगलें असतांही त्यास तें वाईट दिसतें, स्त्री, मद्य व मांस हीं त्यास आवडूं लागतात. त्यास फार दया उत्पन्न होते, तो नेहमी डोक्यावरून कांहीं वस्त्र गुंडाळतो, नखे व केंश अतिशय वाढतात. पतंग, सरडा, साप, नाग, वानर, चतुष्पाद जनावरें व पक्षी हे स्वप्नांत त्याच्या अंगावर येतात. तसेंच तो स्वप्नांत केंस, हाडें, भाताचा कोंडा व राख यांच्या राशीवर चढतो, ओसाड गांव व देश, पाणी आटलेले, पर्वत पडणें, व पेटलेले वृक्ष त्यास स्वप्नांत दिसतात.

**त्रिरूप क्षयाचें लक्षण** ( मा. नि. )—खांदे आणि बरगड्या यांस संताप, हातापायाची जळजळ, आणि सर्वांगांत ज्वर हें राजयक्ष्म्याचें लक्षण होय, हीं तिन्हीहीं लक्षणें अवश्य व्हावयाची ह्मणून चरकानें सांगितलें आहे.

**एकादशरूप षड्रूप आणि त्रिरूप शोषाचें लक्षण** ( मा. नि. )—राजयक्ष्मा हा त्रिदोषोत्पन्न आहे. यांत दोषांचीं ११ रूपें वांटणी वांटणीनें व्याधिप्रभावानें होतात. सन्निपातज्वर लक्षणाप्रमाणें सर्व लक्षणें सर्व दोषांपासून होतात असें नाहीं ह्मणून सांगतों. वायूच्या योगानें स्वरभेद ह्मणजे घसा बसणें. खांदे आणि पार्श्व यांचेठायीं शूळ, खांदे आणि बरगड्या हीं ठेंचल्यासारखी होणें, हीं लक्षणें होतात. पित्तापासून ज्वर, दाह, अतिसार आणि तोंडावाटें रक्त पडणें हीं लक्षणें होतात.—कफकोपानें मस्तक भरल्यासारखें होणें, अन्नद्वेष, खोकला, स्वरभेद हीं होतात. या एकादश लक्षणांनीं किंवा खोकला अतिसार, बरगड्यांत शूळ, स्वरभेद, अरुचि, आणि ज्वर या ६ लक्षणांनी किंवा ज्वर, खोकला आणि रक्तविकार या ३ लक्षणांनीं पीडित झालेला क्षयरोगी बल, मांस, क्षय झाला असतां यश इच्छिणाऱ्या वैद्यानें सोडावा.

**लक्षण** ( वाग्भट )—दोष ऊर्ध्वगत झाला असतां पडसें, श्वास, खोकला, खांदे दुखणें, डोकें दुखणें, अरुचि व स्वरभेद हीं लक्षणें होतात. अधोगत झाला

असतां अतिसार किंवा मलावरोध होतो. कोष्ठगत ह्मणजे आमाशयागत झाला असतां वांति होते. तिर्यग्गत झाला असतां बरगड्या दुखतात. व संधिगत झाला असतां ज्वर येतो. क्षय झालेल्या मनुष्यास अकरा लक्षणें होतात.—घसा दुखणें, उरांत वेदना, जांभया, अंग मोडल्यासारखें वाटणें, कफाचे बेडके पडणें, अग्निमांद्य व तोंडास घाण येणें हे क्षयरोगाचे उपद्रव आहेत.—त्यांत डोक्यांत व बरगड्यांत शूल, खांदे व अंग मोडल्यासारखें होणें, घसा अतिशय दुखणें, व स्वरभ्रंश हे वायूपासून होतात. हात, पाय व खांदे यांचा दाह, अतिसार, रक्ताची वांति, तोंडास घाण येणें, ताप व गुंगी हे पित्तापासून, व अरुचि, ओकारी, खोकला, डोकें व अंग जड होणें, लालास्राव, पडसें, दमा, स्वरभंग व अग्निमांद्य हे विकार कफापासून होतात.—कफप्रधान व चिकट दोषापासून अग्निमांद्यामुळें स्रोतसांचीं तोंडें बंद झालीं असतां व धातूंतील अग्नि मंद झाले असतां आहाररसाचें केवळ स्वस्थानींच पचन होतें. त्यामुळें तो मांसादिकांत न जातां तेथें अनेक प्रकारचे उपद्रव उत्पन्न करितो आणि रक्त वर जाऊं लागतें, केवळ जठराग्नीनें कोठ्यांतच अन्नाचा पाक होतो यासाठीं त्याचा बहुतेक अंशी मळच होत असल्यामुळें तें धातूस पुष्ट करण्यास असमर्थ होतें.—त्याच्या अन्नरसापासून रक्तही तयार होत नाहीं, मग मांस कोठून होईल.—मळाच्याच केवळ आधारावर तो क्षयी पुरुष जीव धरून राहतो.—व्याधि व औषध यांचें बळ ज्यास सहन होत नाहीं व जो क्षीण झाला आहे अशा क्षयी मनुष्याची लक्षणें जरी थोडीं असलीं तरी त्यास वैद्यानें सोडावें.—सर्व लक्षणें जरी झालीं असलीं तरी रोगी क्षीण झाला नसेल व व्याधि आणि औषध यांचें बल त्यास सहन होत असेल तर वैद्यानें उपचार करावे.

**साध्यासाध्यविचार** ( मा. नि. )—स्वरभेदादिक जीं अकरा लक्षणें सांगितलीं त्या सर्व लक्षणांनीं किंवा त्यांपैकीं सहा अथवा तीन लक्षणांनीं युक्त झालेला क्षयरोगी बलमांसाचा क्षय झाला असतां वर्जावा. आणि बळमांसक्षय नसला तर सर्व लक्षणयुक्त असला तरी तो रोगी चिकित्सा करण्यास योग्य आहे.

**असाध्यलक्षण** (मा. नि.)—पुष्कळ आहार करीत असून दिवसेंदिवस क्षीण होणारा, ( हें दुश्चिन्ह आहे ह्मणून असाध्य ) अतिसारानें अत्यंत पीडित झालेला क्षयरोगी असाध्य, कारण क्षयरोग्याचें जीवित मलाधीन आहे, म्हणून सांगितलें आहे. अंडकोश आणि उदर हीं ज्याचीं सुजलेलीं आहेत असा रोगी असाध्य, कारण शोथ हा विरेचनसाध्य असल्यामुळें विरूद्ध चिकित्सा करावी लागते. अशा क्षयरोग्याला वैद्यानें औषध देऊं नये. पांढरें डोळे झालेला, अन्नाचा द्वेष करणारा, ऊर्ध्वश्वासानें पिडलेला आणि कष्टानें पुष्कळ मुतणारा अशा मनुष्याचा क्षयरोग नाश करितो.

**औषध देण्यास योग्य रोगी** ( मा. नि. )—ज्याला ज्वराचा संबंध अगदीं

नाहीं, बलवान्, औष ादि उपचार सोसणारा, इंद्रियें स्वाधीन ठेवणारा, अग्नि प्रदीप्त असणारा, आणि कृश न झालेला, अशा रोग्यास औषध द्यावें.

**क्षयावर उपाय**—बलवान असून ज्याचे दोष फार वाढले आहेत अशा क्षयरोग्यास स्नेह व स्वेदन देऊन स्नेहयुक्त व कर्शन न करणारें, वमन व विरेचन द्यावें. ( १ ) गेळफळ घालून कढविलेलें दूध किंवा मधुर रस पिऊन ओकवावें. अथवा वामक पदार्थांनीं सिद्ध करून तूप घातलेली कण्हेरी देऊन ओकवावें. ( २ ) पांढरें व काळें निशोत्तर आणि बाहाव्याच्या शेंगेंतला मगज यांचा काढा साखर, मध व तूप घालून रेच होण्याकरितां द्यावा. ( ३ ) कोठा शुद्ध झाल्यावर बृंहण, व दीपन चिकित्सा करावी. मनास आवडणारीं वातनाशक व लघु अशीं अन्नें व पानें असावीं. गव्हीं साळी, साटक्या साळी, गहुं सातु व मूग, हीं धान्यें एक वर्षांची जुनी घ्यावी. शेळीचें दूध, तूप व मांसभक्षक प्राण्यांचें मांस हे पदार्थ क्षयरोग्यास द्यावे. ( ४ ) हरणदोडी, जेष्ठीमध, मनुका इंद्रजव पोखरमूळ, कचोरा, पिंपळी, रिंगणी, गोखरु, चिकणामूळ, निळें कमळ, भूयआंवळी, त्रायमाण व धमासा यांच्या कल्कांत तूप सिद्ध करून द्याव हें फारच उत्तम आहे. ( ५ ) पूर्वीं ज्वराच्या शमनार्थ जे उपाय सांगितले आहेत तें संपूर्ण क्षयामध्यें ज्वर व दाह झाल्यास योजावे. ( ६ ) आस्कंदचूर्ण तूप व मधात द्यावें. ( ७ ) सितोपला चूर्ण द्यावें. ( ८ ) द्राक्षादि चूर्ण द्यावें. ( ९ ) पद्मकादि चूर्ण द्यावें. ( १० ) उशीरादि चूर्ण द्यावें. ( ११ ) व्याधिहरण गुटी द्यावी. ( १२ ) क्षयकुठार द्यावा. ( १३ ) हेमगर्भ पोटलीरस द्यावा. ( १४ ) सुवर्णमालिनीवसंत द्यावा. ( १५ ) शुद्धलक्ष्मीविलास द्यावा. ( १६ ) श्लेष्मविध्वंसन द्यावा. ( १७ ) लक्ष्मीविलासरस द्यावा. ( १८ ) रससिंदूर द्यावा. ( १९ ) रत्नगर्भ पोटली रस द्यावा. ( २० ) महापूर्ण चंद्रोदय द्यावा. ( २१ ) महालक्ष्मीविलास द्यावा. ( २२ ) बालसूर्योदयरस दुसरा द्यावा ( २३ ) नारसिंहरस द्यावा. ( २४ ) त्रैलोक्यडंबर रस द्यावा. ( २५ ) त्रैलोक्यचिंतामणिरस द्यावा. ( २६ ) लोकनाथरस द्यावा. ( २७ ) लोणी, खडीसाखर व मध यांशी बलाबल पाहून सोन्याचा वर्ख सेवन केला असतां क्षयाचा क्षय होतो यांत संशय नाहीं. ( २८ ) यव व गहूं याचें पीठ दुधांत शिजवून त्यांत तूप, मध व खडीसाखर घालून सेवन करीत जावें. ( २९ ) साखर, मध, लोणी, दूध व तूप हीं नेहमीं क्षयरोग्यानें सेवन करावीं. ( ३० ) जर रोग्याचें आयुष्य सबळ आहे तर त्याचे रक्तपित्त, श्वास व क्षय हे रोग आडूळशाचा रस मधाशीं घेतला असतां कांहींच प्रचीति देत नाहीं काय ? ( ३१ ) सुवर्णमाक्षिकभस्म, वावडिंगाचें चूर्ण, शिलाजीत व लोहभस्म हीं सर्व एकत्र मर्दन करून बलाबल पाहून मध व तूप यात द्यावें ह्मणजे उग्रक्षयाचा नाश होतो. (३२) मिरी ·, तुरटीची लाही २, बचनाग व नवसागर हीं दोन्ही १ भाग याचें चूर्ण सुमारें एक गुंज साखरेशी द्यावें. हा क्षयगजकेसरी अति उत्तम आहे. ( ३३ ) पारा, गंधक व अभ्रकभस्म हीं समभाग व या तिहींच्या निम्मे हिंगूळ व हिंगुळाचे निमे मनशीळ व या सर्व

औषधांच्या निमे लोहभस्म, हीं सर्व खलांत खलून शतावरीच्या रसाच्या १४ भावना द्याव्या म्हणजे हा कुमुदेश्वर सिद्ध झाला. हा साखर व मिरीं यांजबरोबर बलाबल पाहून दोन गुंजा प्रातःकाळीं इष्टदेवतेचें पूजन करून सेवन करावा, म्हणजे मोठा उग्र क्षय, वात, पित्त, कफरोग, आणि ज्वरादिक संपूर्ण रोगांचा नाश करितो. हा रस सतत सेवन केल्यानें वलीपलित नाश पावतात. ( ३४ ) कवडीभस्म, पारा व गंधक हीं प्रत्येक चार चार तोळे, टाकणखार १ मासा, हीं एकत्र करून निंबाचे रसांत खल करावा. नंतर पुट द्यावें म्हणजे हा लोकेश्वर तयार होतो. वालप्रमाण मात्रा तूप व मध यांत द्यावी. याला लोकनाथही म्हणतात. हा कष्टावांचून रक्तपित्त, क्षय इत्यादि रोगांचा नाश करितो. पुष्टि देतो; शुक्रवीर्यनिर्दोष करितो; उत्तम कांति व सुंदरपणा यांतें देतो. हा रस शंभुमुखापासून निघालेला आहे. याहून दुसरा मनुष्यास सुख देणारा कोण आहे ? ( ३५ ) लोहभस्म दोन गुंजापर्यंत शिलाजितांत द्यावें. ( ३६ ) पिपळी २० तोळे, व गूळ ५ तोळे यांत घृत सिद्ध करून तें पिण्यांत किंवा भोजनांत द्यावें म्हणजे क्षय व राजयक्ष्मा यांचा नाश होतो.

**व्यवायशोषी** ( मा. नि. )—अति मैथुनानें क्षीण झालेल्या पुरुषाच्या शिश्नाला आणि वृषणाला वेदना, मैथुनाविषयीं अशक्तता, बळेंच मैथुन केलें तरी चिरकालानें अल्प शुक्र किंवा रक्त यांचा स्राव, या शुश्रुतोक्त धातुक्षयचिन्हांनीं युक्त होतो आणि देह पांढरा फटफटीत होतो. व त्याचे शुक्रापासून रसापर्यंत उलटे धातु क्षीण होतात. **उपाय**—दूध, मांस, तूप यांणीं युक्त भोजन करावें व संपूर्ण गोड, प्रिय, आयुष्यवर्धक अशा औषधांनीं उपाय करावे.

**शोकशोषी** ( मा. नि. )—हा चिंता करणारा, हातपाय गळालेला, आणि शुक्रक्षय व्यतिरिक्त शोषलक्षणांनीं युक्त असतो. **उपाय**—( १ ) हर्ष उत्पन्न करावा, आश्वासन द्यावें, दूध, स्निग्ध, मधुर, शीतल, दीपन, आणि लघु अशीं अन्नें हीं सेवनास द्यावींत.

**जराशोषी** ( मा. नि. )—वृद्धत्वामुळें धातु क्षीण झालेला पुरुष कृश होतो. त्याचीं वीर्य, बुद्धि, बळ आणि इंद्रियें हीं मंद होतात. कांपतो, अन्नाला रुचि नसते, फुटलेल्या कांशाच्या भाड्यावर काठी वगैरे मारून जसा शब्द होतो तसा याचा स्वर उमटतो. कफावांचून थुंकतो, म्हणजे कफ पडण्याविषयीं यत्न करीत असतांही तो निघत नाहीं, शरीरास भार, आणि अरुचि यांनीं पीडित होतो. तोंड, नाक आणि डोळे याना गळ लागते, मळ कोरडा होतो आणि शरीराची कांति निस्तेज दिसते.

**अध्वशोषी** ( मा. नि. )—अति मार्गगमनानें क्षीण झालेला, त्याचें हातपाय गळतात, व त्याच्या सर्व शरीराचा वर्ण भाजल्यासारखा खरखरीत होतो, सर्व शरीराला मेहरी येते, हृदयांत पिपासास्थान असतें, तें व गळा आणि तोंड हीं कोरडीं पडतात. **उपाय**—एके ठिकाणी बसून सुख घ्यावें, दिवसास निद्रा क-

रावी. शीत, मधुर, पौष्टिक अशीं अन्नें, व मांसाचे रस, हे पदार्थ सेवन करावे.

**व्यायामशोषी** ( मा. नि. )—अत्यंत श्रमानें धातु क्षीण झालेला, हा बहुतकरून अध्वशोष्याच्या स्रस्तांगतादि लक्षणांनीं युक्त होतो ह्मणजे अध्वशोषामध्यें जीं लक्षणें थोडीं थोडीं असतात तीं व्यायामशोषामध्यें मोठीं होतात. आणि तो मनुष्य क्षतावांचून उरःक्षत लक्षणांनीं युक्त होतो. **उपाय**—स्निग्ध, हितकर, व क्षतक्षयावरील सर्व उपाय करावे.

**व्रणशोष** ( मा. नि. )—रक्तक्षयानें, व्रणवेदनांनीं, तसेंच आहार तुटल्यानें व्रणी पुरुषास जो शोष होतो तो अत्यंत असाध्य मानिला आहे. **उपाय**—स्निग्ध, दीपन, गोड, शीतल, किंचित् आंबट व गोड असे यूष, मांसरस, इत्यादिकांनीं व्रणशोषाला जिकावा.

**रसवर्धन**—गुळवेल, आलें व यव यांचा काढा किंवा मिरीं घालून तापविलेलें दूध प्यावें. तें रसधातूची वृद्धि करून शीघ्र रसक्षयाचा नाश करितें.

**रक्तवर्धन**—गहुं, यव, साळी, जंगलांतील प्राण्यांचीं मांसें, तूप, दूध, साखर, मध, मिरी, आणि पिपळी यांचें प्राशन, रक्तवृद्धि करणारें उत्तम आहे.

**मांसवर्धन**—जलवासी प्राण्यांचें मांस, लसूण, हरणदोडी, तूप, दूध, आणि मधुर पदार्थ, हे भक्षण करावे. ते मांस धातूची वृद्धि करणारे उत्तम आहे.

**मेदवर्धन**—तालीसादि चूर्ण, मधुर रस, जंगलांतील प्राण्यांचे मांसरस, सीतोपला चूर्ण, शेळीचें दूध, रानडुकराचें मांस, हे पदार्थ क्षयनाशक असून मेदवृद्धि करितात.

**अस्थिवर्धन**—तुपांत तळलेले पदार्थ, दूध, चंदनादि व द्राक्षादि चूर्णें, जंगलांतील प्राण्यांचे मांसरस, मधुर अन्न, व पान हीं सेवन करावी.

**शुक्रवर्धन**—शुक्रक्षय झाला असतां आम्लानें सिद्ध केलेले पदार्थ विशेषेंकरून सारक पदार्थ, लोणी, दूध, खडी साखर, व सर्व मधुर रस द्यावे किंवा काकडीचें मूळ, दूध, भुईकोहळा व सावरीचा कंद हें साखर व मध घालून प्राशनार्थ द्यावें.

**क्षयाचे वांतीवर उपाय**—( १ ) गुळवेलीचा अंगरस, मध किंवा महाळुंगाचें मूळ, लाह्यांचें चूर्ण, सैंधव व पिंपळी व मध एकत्र करून द्यावी. ( २ ) हाळद, सुपारी, व साखर यांचें चूर्ण साहा मासेपर्यंत तूप व मध यांत द्यावें. ( ३ ) कावळीच्या अर्धे तोळा रसांत टांकणखाराची लाही २ गुंजा द्यावी. ( ४ ) सुगंध पदार्थांचें सेवन करावें. ( ५ ) लाखेचा काढा मध घालून द्यावा. ( ६ ) कावळीचें मूळ पुष्यार्क योगावर आणून गाईच्या दुधांत उगाळून द्यावें तें दाहयुक्त रक्त

च्या वांतीचा नाश करितें. ( ७ ) वाळा, तगर, सुंठ, कंकोळ, चंदन, रक्तचंदन, लवंगा, पिंपळमूळ, पिंपळी, वेलची, नाकेशर, नागरमोथे, आंवळकठी, कापूर, तवकीर, तमालपत्र व कृष्णागरु हीं समभाग व साखर अष्टमांश घालून चूर्ण तयार करावें. तें चूर्ण तूप व मध यांत द्यावें ह्मणजे रक्ताची वांति व हृदयाचा संताप यांचा नाश करितें.

**कफावर**—केळें भाजून मध व मिरीं याशीं द्यावें ह्मणजे कफाचा नाश होतो.

**अरुचीवर**—( १ )तालीमखान्याचें बी, जिरें व जायफळ यांचें चूर्ण गुळाशीं द्यावें.

**उरःक्षत क्षयाचें कारण** ( मा. नि. )—धनुष्य ओढल्यानें, आयास करणारा, अत्यंत जड ओझें वाहणारा, बलवान पुरुषाशीं युद्ध करणारा, उंचावरून पडणारा, बैल, घोडे, हत्ती, उंट, इत्यादिक धांवत असतां त्यांचे मागें धांवून त्यांस धरणारा. मोठी शिळा, लांकूड, धोंडे, निर्घात ( अस्त्रविशेष ) हीं फेकणारा, शत्रूंना मारणारा, मोठ्यानें वेदादिकाचें पठन करणारा, अथवा दूर देशावर शीघ्र चालत जाणारा, अथवा दुथड्यांनी भरून वाहणाऱ्या गंगा, यमुना वगैरे महानदींत पोहणारा, अथवा घोड्यावरोबर धांवत जाणारा, अकस्मात् दुरून उडी मारणारा, अथवा लवकर लवकर नाचणारा, याप्रमाणें दुसऱ्या मल्लयुद्धादि क्रूर कर्मांनीं उरीं फुटलेला, अशा पुरुषाचें हृदय दुखावलें असतां बलवान् उरःक्षतरूप व्याधि उत्पन्न होतो. स्त्रियांचेठायीं अत्यंत असक्त असलेला व रुक्ष, अल्प परिमाण, अन्न वेतावातानें खाणारा, अशा पुरुषाचें ऊर फाटल्यासारखें वाटतें. किंवा फोडून दोन भाग केल्यासारखें वाटतें. व तें अत्यंत वेदनायुक्त होतें. तदनंतर बरगड्या फारच दुखूं लागतात. अंग सुकतें, व थरथरा कांपतें, आणि शक्ति, मांस, वर्ण, रुचि, आणि अग्नि हे क्रमाक्रमानें कमी होत जातात, ज्वर असतो. मनाला अण्खर वाटतें, दीनपणा आणि अग्निनाशामुळें, विड्भेद ( मळ पातळ होणें ) आणि वारंवार खोकतां खोकतां दुष्ट ह्मणजे घाणेरडा, काळसर, अत्यंत दुर्गंधयुक्त, पिवळा, गांठाळलेला, पुष्कळ आणि रक्तमिश्रित असा कफ पडतो. याप्रमाणें तो क्षतरोगी अत्यंत क्षीण होतो. तो केवळ क्षतानें क्षीण होतो असें नाहीं तर स्त्रीसेवादिकेंकरून शुक्र व ओज ( सर्व धातूंचें तेज ) याचा क्षय झाला असतांही क्षीण होतो. त्या उरःक्षताच्या अस्पष्ट लक्षणालाच पूर्वरूप म्हटलें आहे.

**क्षतक्षीणाचें असाध्य लक्षण** ( मा. नि. )—उरास पीडा, रक्ताची वांति, आणि इतर कासापेक्षां विलक्षण कास हीं लक्षणें होतात. व रक्त क्षयाचेठायीं मूत्र आरक्तवर्ण होतें. व पार्श्व, पृष्ठ, कटी, हीं ताठल्यासारखीं होतात.

**उरःक्षताचें साध्यासाध्य लक्षण**—उरःक्षत आणि क्षय यांमध्यें अल्प ल-

क्षणेंकरून युक्त अ॒ । ज्या रोग्याचा जठराग्नि प्रदीप्त आहे व रोगी बलयुक्त आहे तर साध्य जाणावा. जो नूतन उत्पन्न क्षय तोही साध्य जाणावा. आणि ज्यास एक संवत्सर अतिक्रांत झाला आहे, तो दुसाध्य जाणावा. आणि सर्व लक्षणानीं युक्त जो क्षय तो असाध्य जाणावा. हा क्षय झाला असतां परमावधि एक हजार दिवसपर्यंत तो रोगी वांचेल परंतु जर तरुण आहे आणि उत्तम वैद्याचा आश्रय करील तर.

**क्षतक्षयावर उपाय**—याजवर कासप्रकरणांत उरःक्षतकासावर जे उपाय सांगितले आहेत, तेही करावे. तृप्तिकर, शीत, हितकर, व लघु असें अन्नोदक सेवन करावें, आणि स्त्रीसंग, दुसऱ्याच्या गुणावर दोषारोप करणें हें वर्जावें. कथा, पुराण इत्यादि श्रवण करावें. [ १ ] वेलदोडे, तमालपत्र, दालचिनी, मनुका, व पिपळी हीं प्रत्येक दोन दोन तोळे आणि साखर, जेष्टीमध, खजूर, व मनुका ही प्रत्येक चार चार तोळे घेऊन एकत्र करून त्यांत मध घालून खलून एक तोळा प्रमाणाच्या गोळ्या बांधाव्या व दररोज प्रातःकाळीं एक गोळी तुपात सेवन करीत जावी; ह्मणजे उरःक्षतक्षय, ज्वर, कास, श्वास, उचकी, वांति, भ्रम, मूर्छा, मद, तृषा शोष, पार्श्वशूल, अरुचि, प्लीहा, ऊरुस्तंभ, रक्तपित्त व क्षय यांचा नाश होतो. ही एलादिगुटिका वृष्य व तृप्तिकारक आहे. [ २ ] चिकणा, मोठा चिकणा व अर्जुनसादडा यांचे काढ्यांत जेष्टीमधेचा कल्क घालून तूप सिद्ध करावें तें सेवन केलें असतां हृद्रोग, शूल, उरःक्षत, रक्तपित्त, कास, वायु व मूळव्याध हे अति वाढलेले असलेले तरी त्याचा नाश होतो. [ ३ ] लाखेचें बारीक चूर्ण करून तें मध, तूप व दूध यात सेवन केलें असतां क्षयानें वांति होते त्याजवर सिद्ध औषधासारिखें गुण करितें.

**क्षयावर पथ्य**—सुखानें होईल असा मृदु रेच, जुने गहूं,मूग, बकरीचें मांस, लोणी, दूध, तूप, जंगलातील मांसाचा रस, मधुर रस, केळीं, फणस, आंबे, आंवळे, खजूर, चारोळ्या, नारळ, शेवगा, बकूळ, ताडफळ, द्राक्षें, गाई व ह्मशी यांचें तूप, मेंढ्याच्या मुतानें भिजलेल्या मातीचा अंगास लेप, खडीसाखर, मध, कापूर, चंदन, सुगंधी तेलाचे अभ्यंग, मृदु व शीत असा वारा, स्त्रियाचें दर्शन, होम, दान, देवब्राह्मण यांची पूजा, उत्तम अनुपानें, अक्रोड, गव्हाचे विवर, पुरणाची पोळी, साधा भात, कांदा, तवकीर, अफू, कवठ, शेळीचें तूप, उन पाणी, कोंवळा मुळा, पिठीसाखर, सालंमिश्री, लिंबू, लवंगा, शेळीचें दहीं, लसूण, गाईचें दूध, शेळीचे दूध, गाईचें लोणी, शेळीचें लोणी, चांदण्यात बसणें, ही पथ्यें जाणावी.

**क्षयावर अपथ्य**—विरेचन, मलमूत्रादि वेगधारण, श्रम, स्वेदन, अंजन, साहस कर्म, रुक्षान्न, रुक्षपान, विडा, कलिंगड, चिमणापक्षी यांचें मांस, लसूण, हिंग, आंबट, तुरट, तिखट आणि कडू हे रस, पालेभाज्या, क्षार, तोंडली, दाहकारक पदार्थ, जाग्रण हें वर्ज करावें.

---

# क्षुद्ररोगः

**इसब**—( १ ) प्रथम लागोपाठ एकदोन दिवस जळवा लावून नासलेलें रक्त काढावें. ( २ ) पळसपापडी निंबूरसांत उगाळून लेप करावा. फार आग होऊ लागल्यास वर तूप लावावें म्हणजे इसब व गजकर्ण यांचा तात्काळ नाश होईल. ( ३ ) मोरचूत १, मुरदाडशिंग १, कपिला १, व शतधौतघृत १० तोळे एकत्र खल करून हें मलम डबींत भरून ठेवावे व दिवसांतून दोन वेळ लेप करीत जावा. ( ४ ) कापूर १, पांढरा कात १, शेंदूर ॥, व शतधौतघृत १० तोळे एकत्र खलून या मलमाचा लेप करीत जावा.

**उठाणूं**—( १ ) कळीचा चुना व गूळ समभाग घेऊन हातावर मर्दन करून लागलीच उठाणूवर लेप करावा. ( २ ) बचनाग पाण्यांत उगाळून लेप करावा, व खूप शेकावें. ( ३ ) बदावरीलही उपचार उठाणूं फोडण्याकरितां व पिकण्याकरितां करांवे.

**काळपुळी**—ही पुळी पाठीवर होत असते. [ १ ] नवीन उत्पन्न होतांच लसणीच्या पाकळ्या बारीक वाटून त्याचा पेंड वर बसवावा म्हणजे तावडतोब जळून जातें. [ २ ] कडू वृंदावनाचें मूळ थंड पाण्यांत उगाळून वर लेप करावा.

**कंडू**—सर्व अंगास कंडू सुटते त्याजवर उपाय. [ १ ] करंजाचे तेलांत निंबूरस घालून अंगास मर्दन करीत जावें. [ २ ] कडू जिरें व आंबेहाळद समभाग गोमूत्रांत वांटून अंगास मर्दन करीत जावें याप्रमाणें दोन तीन दिवस केलें असतां कंडू शमते.

**खवडे**—[ १ ] कण्हेराचीं पानें जाळून निंबुरसांत खलून लावीत जावीं. [ २ ] एरंड्याचा मगज ४ तोळे, व मोरचुत १ तोळा, त्यांत दहीं घालून तांब्याच्या परातींत तांब्याचे भांड्यानें खलून खवड्यांस लावित जावें.

**गालगुडदे**—[ १ ] काजुची बीं पाण्यांत उगाळून लेप करावा.

**चिखल्या**—पावसाळे दिवसांत पायाच्या बोटामध्यें व्रण पडतात त्यांजवर-[ १ ] पांढऱ्या काताची पूड किंवा संगजिऱ्याची पूड कोरडी दडपीत जावी.

**जळवात**—या रोगानें तळहात व तळपायास जळजळ होते. केव्हां वरील चामडी निघून जाते. [ १ ] गंधाबिरोजा शिरसेल तेलांत खलून लेप करावा.

**टक्कल**—[ १ ] पांढऱ्या गुंजेचें चूर्ण मधांत खलून लेप करीत जावा. [ २ ] हस्तीदंत जाळून त्याची राख व रसांजन हीं शेळीचे दुधात वांटून टक्कल पडलें असेल तेथें लेप करावा म्हणजे केंश उगवूं लागतात. [ ३ ] जेष्टीमध, कमळ व मनुका हीं तीन औषधें तिळाचें तेल, गाईचें दूध व तूप यांत वांटून लेप करावा; म्हणजे इंद्रलुप्त रोग होतो व केंश दाट व बळकट होतात.

**टांचरूं**—[ १ ] ह्मशीचें शेण तव्यावर ऊन करून नित्य नवें बांधीत जावें.

**नखुर्डे**—[ १ ] मोहाचें मेण बोटावर बसवून वर फडकें बांधावें व तीन दिवस सोडूं नये. [ २ ] कडूनिंबाचा पाला बारीक वांटून त्यांत थोडें मीठ घालून तुपांत परतून वर बांधावा.

**नायटे**—[ १ ] पळसपापडी व सुवासिक चंदन, निंबूरसांत उगाळून वर लेप करीत जावा. [ २ ] बचनाग, कुचल्याचें वीं व मोरचूत हें तिन्ही समभाग दह्यांत उगाळून लेप करावा. [ ३ ] इसबावरचेही उपाय करावे.

**पेरें**—[ १ ] शिंपीचा चुना व शेंदूर समभाग लोण्यांत खलून त्याची पट्टी वर बांधावी. [ २ ] जळवा लावून रक्त काढावें.

**मुरमाच्या फुटकुळ्या**—[ १ ] जायफळ दुधांत उगाळून वरचेवर लेप करीत जावा.

**वाघचवडा**—[ १ ] पाणकांदा वर बांधावा. [ २ ] लांकडाची राख व कापूर पाण्यांत खलून फडक्यास लावून त्याची पट्टी वर बांधावी.

**वांग**—[ १ ] रक्तचंदन व दारुहाळद, म्हशीचे दूधांत उगाळून लेप करावा. [ २ ] रुईचे चिकांत हळकुंड उगाळून लेप करावा. [ ३ ] मंजिष्ठाचें चूर्ण मध व लोणी यात कालवून लेप करावा.



# भाग २ रा.

## धातूपधातु, रसोपरस, विषोपविषें, रत्नोपरत्नें इत्यादिकांची शुद्धि व मारण.

**सप्तधातूंची शुद्धि**—सोनें १, रुपें २, तांबें ३, पितळ[1] किंवा जस्त ४, शिसें ५, कथील ६, व पोलाद ७, या सातांना धातु[2] असें ह्मणतात. हे सप्तधातु पर्वतादिकांपासून होतात. यांचें शोधन सोनें, रुपें, पितळ, तांबें, पोलाद याचे पत्रे करून अग्नींत पुन्हां पुन्हां तापवून किंवा मुशीत घालून यांचे रस करून ते तापविलेले पत्रे किंवा रस तेलांत, ताकांत, कांजीत, गोमूत्रांत व कुळिथाचे काढ्यांत पृथक् पृथक् तीन तीन वेळ किंवा सात सात वेळ विझवावे. याप्रकारें सोनें आदिकरून साऱ्या धातूंची शुद्धि करावी. शिसें आणि कथील यांची विशेष शुद्धि करावयाची रीति. या दोहोंला अग्नीवर तापवून रस करून तेल, कांजी, गोमूत्र व कुळीथाचा काढा, हे क्रमेंकरून उखळांत घालून वरती जात्याची तळी ठेवून नंतर तो रस पृथक् तीन तीन वेळां त्यांत ओतावा. व रुईच्या चिकांत तीन वेळ रस करून ओतावे ह्मणजे शुद्ध होतात.

**सप्तधातूंचें मारण**—धातूचे अगदीं पातळ कंटकाविधि पत्रे करून त्याचे चतुर्थांश मनशीळ व गंधक घेऊन रुईच्या चिकांत वांटून पत्र्यांस लेप करून शरावसपुटांत ठेवून मातकापड करून तें वाळलें ह्मणजे गजपुट द्यावें. याप्रमाणें बारा गजपुटें द्यावीं; ह्मणजे संपूर्ण धातूंचें भस्म होतें. अथवा पत्र्याचे चतुर्थांश पारा व गंधक यांची कज्जली घेऊन निंबू अथवा कोरफडीच्या रसांत खल करून पत्र्यास लेप देऊन शरावसंपुटांत घालून मातकापड करून ते वाळले ह्मणजे गजपुट द्यावें, याप्रमाणें बारा गजपुटें दिलीं असतां सर्व धातूंचें भस्म होतें.

**सुवर्णभस्म**—सोन्याचें बारीक चूर्ण १ भाग व शुद्ध पारा २ भाग, दोहोंचा निंबुरसांत खल करून गोळा करावा. नंतर त्या गोळ्यासमान शुद्ध आंवळेसर गंधक घेऊन तो शरावसंपुटांत गोळ्याचे खालवर घालून मातकापड करून वाळल्यावर रानशेणी गोवऱ्यांत गजपुट द्यावें. थंड झाल्यावर बाहेर काढून पुन्हां याच रीतीनें कृति करून चौदा पुटें द्यावी; ह्मणजे सुवर्णाचें उत्तम भस्म होतें. फिरून तें

---

१—पितळेचे स्थानीं जस्त घ्यावें असें असेंही कोणाचें मत आहे. याची विशेष शुद्धि जस्त किंवा पितळ याचा रस करून दुधात ओतावा. याप्रमाणें २१ वेळ ओतिला असतां शुद्ध होतात

२—वृद्धत्व, पांढरेपणा, कृशत्व, बलहीनता व रोग इत्यादिकांतें निवारण करून शरीराचें धारण करितात म्हणून सुवर्णादिकांना धातु असें म्हणतात

जिवंत होत नाहीं. **प्रकार २ रा**—सोन्याचा रस करून त्याचे सोळावा हिस्सा शिसें आंत घालून ढवळून त्याचें चूर्ण करून नंतर निंबूचे रसांत खलून गोळा करून त्याचे समान शुद्ध आंवळेसर गंधक घेऊन शरावसंपुटांत त्या गोळ्याच्या खालवर घालून मातकापड करून तीस गोवऱ्यांत पुट द्यावें. याप्रमाणें अग्नीचीं सात पुटें दिलीं असतां सोन्याचें भस्म चांगलें होतें, पुन्हां जिवंत होत नाहीं.

**रौप्यभस्म**—प्रथम चांदीचे पत्रे करून किंवा मुशींत रस करून हदग्याचे पानांचे रसांत तीन वेळ बुडवावा ह्मणजे रुपें शुद्ध होतें. एक भाग हरताळ घेऊन निंबूचे रसांत एक प्रहर खलून त्या हरताळाचे तीन भाग उत्तम चांदी घेऊन त्याचे पत्रे करून त्यांना त्या हरताळाचे कल्काचा लेप करून शरावसंपुटात घालून मातकापड करून तें वाळलें ह्मणजे तीस गोवऱ्या आणून त्यांत पुट द्यावें. याप्रमाणें चौदा पुटें दिलीं असतां चांदीचें भस्म होतें. **प्रकार २ रा**—एक भाग सुवर्णमाक्षिक घेऊन चूर्ण करून निवडुंगाचे चिकांत एक प्रहर खल करून सुवर्णमाक्षिकाच्या तिप्पट चांदीचे पत्रे घेऊन त्यांना त्या सुवर्णमाक्षिकाचे कल्काचा लेप करून शरावसंपुटांत घालून मातकापड करून वाळल्यावर तीस गोवऱ्यांचा अग्नि द्यावा. याप्रमाणें चौदा पुटें दिली असतां रुप्याचें चांगलें भस्म होतें. पुन्हां जीवंत होत नाहीं.

**ताम्रभस्म**—तांबड्या आघाड्याचीं झाडें मुळासुद्धां उपटून कुटून आच्छेर वजनाचा एक गोळा करावा. त्यामध्यें तांब्याचा पैसा ठेवून त्यास सात मातकापडें करून वाळलीं ह्मणजे गजपुट द्यावें ह्मणजे पांढरें शुभ्र भस्म होतें अथवा याच कृतीनें कांटेमाठांतही भस्म होतें. **प्रकार २ रा**—सैंधव व गंधक यांचा निंबुरसांत खल करून त्यानें ताम्रपत्र्यांना लेप करून शरावसंपुटांत घालून गजपुट द्यावें. **प्रकार ३ रा**—पांच तोळे गंधकाचें चूर्ण घेऊन एक तोळा तांब्याचे तुकडे घ्यावे. व शरावसंपुटांत त्या तुकड्यांचे खालवर गंधक घालून गजपुट द्यावें ह्मणजे भस्म होतें. **प्रकार ४ था**—पारा १ तोळा व गंधक १ तोळा यांची कज्जली करून ती निंबुरसांत खलून एक तोळा तांब्याचे पत्र्यास लेप द्यावा. नंतर शरावसंपुटांत ठेवून मातकापड करून वाळल्यावर गजपुट द्यावें. याप्रमाणें तीन गजपुटें दिली असतां भस्म होतें.

**पितळ व जस्तभस्म**—पितळेचे पत्रे करून तापवून निंबुरसांत सातवेळ अथवा तीनवेळ विझवून शुद्ध करावे. नंतर पत्र्याचे समभाग गंधक घेऊन रुईचे दु-

---

१—ताम्राची शास्त्रोक्त रीतीनें विशेष शुद्धि अशी कीं, गोमूत्र आणून त्यात चिंचेचा कोळ व मीठ यथायोग्य घालून एका मातीचे पात्रात एकत्र करून घालावें. नतर त्यांत ताम्र पत्रें किंवा चूर घालून एक प्रहरपर्यंत तीव्र अग्नीवर उकळून स्वच्छ पाण्यानीं धुवून घ्यावें ह्मणजे ताम्र शुद्ध होतें.

धांत खलून त्या पत्र्याला लेप करावा. नंतर शरावसंपुटांत घालून मातकापड करून रानशेणी गोवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा. याप्रमाणें दोन पुटें दिलीं असतां निश्चयानें पितळेचें भस्म होतें. याप्रमाणें कांशाचेंहि भस्म होतें. तांबें, पितळ व कांसें यांचे मारणांविषयीं **प्रकार २ रा**—यांतून ज्याचें भस्म करावयाचें असेल त्याचे समभाग गंधक रुईचे चिकांत किंवा वडाचे चिकांत किंवा गाईचे दुधांत किंवा निरगुडीचे रसांत वांटून पत्र्यांना लेप करावा आणि शरावसंपुटांत घालून मातकापड करून सुकल्यानंतर गजपुट द्यावें. याप्रमाणें दोन पुटें द्यावीं ह्मणजे निश्चयानें भस्म होतें.

**नागभस्म (शिसें भस्म)**—शिसें अग्नीवर पातळ करून त्रिफळ्याच्या काढ्यांत किंवा कोरफडीचे रसांत सात वेळ ओतलें असतां शुद्ध होतें. नंतर शिसें व मनशीळ यांचे चूर्ण समभाग घेऊन आडूळशाचे रसांत खलून शरावसंपुटांत घालून गज पुट द्यावें. याप्रमाणें तीन पुटें दिली असतां शिशाचें उत्तम भस्म होतें. **प्रकार २ रा.** विड्याचे पानाचे रसांत मनशीळ वाटून त्याचे समान शिशाचे पत्रे करून या मनशिळेचा लेप करावा व शरावसंपुटांत घालून गजपुट द्यावें या प्रमाणें ३२पुटें दिलीं असतां शिशाचें भस्म उत्तम होतें. पुन्हां तें जिवंत होत नाही.

**वंगभस्म ( कथीलभस्म )**—तरटाचा तुकडा घेऊन त्याजवर तीळ व चिंचेच्या झाडावरील खरपुड्याचें चूर्ण हें एकत्र चेंचून तें तरटावर अर्धे अंगूळ जाड पसरून त्यावर वंगाच्या पत्र्याचे तुकडे करून पातळ हांतरावे. नंतर पुन्हां त्यांजवर चूर्ण घालावें व पुन्हां तुकडे हांतरावे. याप्रमाणें चूर्णाचे व तुकड्याचे थरावर थर देऊन नंतर गाईचे शेणाच्या गोवऱ्या खाली वर घालून मध्यम पुट द्यावें. नंतर आंतील भस्म युक्तीनें काढून घ्यावें. ह्मणजे साळीच्या लाह्याप्रमाणें वंगाचे तुकडे फुगुन त्याचें भस्म होतें. हें सर्व कार्य करितें. **प्रकार २ रा**—गव्हाचा भुसा १० तोळे व भांग १ शेर एकत्र करून त्यात वरप्रमाणें कथलाचे पातळ तुकडे चवलीप्रमाणें करून पुट द्यावें ह्मणजे उत्तम भस्म होतें. **प्रकार ३ रा**—कथिलाचे पातळ चवलीप्रमाणें तुकडे करून रानशेणी गोवऱ्या कोरून त्यात खाली व वर चिंचेच्या झाडावरील खरपुड्यांचें चूर्ण घालून प्रत्येक गोवरीमध्यें एक किंवा दोन तुकडे ठेवावे किंवा चिंचेच्या सालीचे ऐवजीं खालीं भांग व वर ओव्याचें चूर्ण थोडें घालून प्रथम सपाट जमिनीवर प्रथम दोन गोवऱ्यांचे थर एकावर एक हांतरावे. नंतर त्यावर कथलाचे तुकडे ठेविलेल्या गोवऱ्या सारख्या बसवाव्या. नंतर त्याजवर तीन गोवऱ्यांचे थर देऊन एकांत ठिकाणीं संध्याकाळी अग्नि द्यावा. व सकाळी स्वांगशीत झाल्यावर मक्याच्या लाह्याप्रमाणें वंगाच्या तुकड्याच्या लाह्या होतात त्या युक्तीनें काढून हातावर चोळून वस्त्रगाळ करून तें भस्म ठेवावें.

---

१—वग अग्नीवर पातळ करून निरगुडीचे रसात हळदीचे चूर्ण घालून त्यांत पृथक् पृथक् तीन तीन वेळ ओतावे ह्म॰ शुद्ध होतें.

**लोहभस्म**—उत्तम पोलादाचा कीस आणून शुद्ध करून त्याचे बारावा हिस्सा हिंगूळ घेऊन कोरफडीचे रसांत दोहोंचा दोन प्रहर खल करून गजपुट द्यावें. याप्रमाणें सात पुटें दिलीं असतां लोहभस्म उत्तम होतें. **प्रकार २ रा**—पारा १ भाग व गंधक २ भाग घेऊन कज्जली करावी. मग त्या कज्जलीचे समान पोलादाचा कीस घेऊन कोरफडीचे रसांत सर्वांचा खल दोन प्रहरपर्यंत करून एक गोळा करावा. नंतर तांब्याचे ताम्हनांत तो गोळा ठेवून त्याजवर सुरती एरंडाचीं पानें दोन अथवा तीन घालून प्रखर उन्हांत चार प्रहर ठेवून नंतर तो गोळा उष्ण झाल्यावर मातीच्या शरावसंपुटांत घालून संधिलेप करून तीन दिवस धान्याच्या राशींत पुरून ठेवावा. चवथे दिवशीं वस्त्रानें गाळून त्याची पूड पाण्यावर टाकावी.ती तरली ह्मणजे भस्म चांगले झाले असें जाणावें. **प्रकार ३ रा**—लोहाचा कीस ४ तोळे, सोरा ४ तोळे, आणि आस्कंद ४ तोळे, घेऊन त्याचा कोरफडीचे रसात एक दिवस खल करावा. नंतर एरंडाचे पानांत तो गोळा घालून मातकापड करून वाळल्यावर गजपुट द्यावें. स्वांगशीत झाल्यावर वरील लेप काढून आंतील भस्म खलून ठेवावें. याचा रंग शेंदराप्रमाणें व पाण्यावर तरणारें असें होईल हें संपूर्ण कार्याचेठायी योजण्यास उत्तम जाणावें. **खुलासा**—या कृतीनें आंतील सोरा व अस्कंद यांचा अंश कधीं कधीं नाहींसा होत नाहीं. याजकरितां कदाचित् अंश राहिल्यास तें सर्व तव्यावर घालून खालीं अग्नि द्यावा. व पळीनें वरचेवर घोटीत जावें म्हणजे थोडेच वेळानें सोऱ्याचा व आस्कंदाचा राहिलेला अंश जळून त्याचा धूर होऊन सर्व निघून जातो व निवळ शेंदराचे रंगाचें भस्म होतें तें खलून ठेवावें.

---

## सप्त उपधातूंची शुद्धि व मारण.

**सुवर्णमाक्षिक**—सुवर्णमाक्षिक ३ भाग, व सैंधव १ भाग घेऊन दोहोंचें चूर्ण करून लोखंडाचे कढईत घालून चुलीवर ठेवावें. नंतर निंबूरस त्याजवर घालून लोखंडाचे पळीनें कढई लाल होईतोंपर्यंत घोटावें. नंतर ती कढई खालीं उतरून थंड

---

१—लोह किंवा पोलाद याचे शुद्धीचा असा एक शास्त्रोक्त प्रकार आहे कीं, ६४ तोळे त्रिफळा घेऊन आठपट पाणी घालून अष्टमाग काढा करावा आणि २० तोळे लोहाचा किस घेऊन प्रथम तो ऊन पाण्यानीं धुवून स्वच्छ करावा नतर कढईत घालून तापवून सात वेळ त्या काढ्यांत बुडवावा; म्हणजे लोह चांगला निर्दोष होतो. नतर त्याचें भस्म करावें.

२—१ सुवर्णमाक्षिक, २—मोरचुत, ३—अभ्रक, ४—सुर्मा, ५—मनशिळ, ६—हरताळ, ७—कलखापरी ह्या सात उपधातु जाणाव्या दुसरा प्रकार असा सुवर्णापासून सुवर्णमाक्षिक, रुप्यापासून रौप्यमाक्षिक, ताम्यापासून मोरचूत, कथिलापासून मुरदाडशिंग जस्तापासून कलखापरी शिशापासून शेंदूर, व लोहापासून लोहकीट, असाही कोठें पाठ आहे हा देशभिन्नतेनें असावा असें वाटतें.

झाल्यावर सुवर्णमाक्षिक बाहेर काढून घ्यावें याप्रमाणें शोधन झाल्यावर त्या सोनामुखीला कुळिथाचा काढा, तिळाचें तेल, ताक अथवा गोमूत्र यांतून एकांत खलून शराव संपुटांत घालून रानगोवऱ्याचें गजपुट द्यावें. तेणेंकरून सुवर्णमाक्षिकाचें भस्म होतें. **प्रकार २ रा**—सुवर्णमाक्षिकाचें वस्त्रगाळ चूर्ण करून कढईंत घालून तापवून त्रिफळ्याचे काढ्यांत तीन वेळ ओतावें ह्मणजे शुद्ध होतें. नंतर शेळीचें मूत्र किंवा तिळाचें तेल अथवा कुळिथाचा काढा किंवा आंबट ताक यांतून एकांत खलून परळांत घालून मातकापड करून एक गजपुट द्यावें; ह्मणजे सुवर्णमाक्षिकाचें उत्तम भस्म होतें. त्याचा रंग जांभळाचे रंगासारखा होतो. हें योगवाही असल्यामुळें अनुपान परत्वें सर्व रोगांवर अमृतासारखें गुण देतें असें जाणावें. **प्रकार ३ रा**—किंवा सुवर्णमाक्षिकाचें चूर्ण करून वरप्रमाणें शुद्ध करावें. नंतर पुन्हां कुटून वस्त्रगाळ करावें. नंतर एका खापराचे परळांत घालून चुलीवर ठेवून खालीं मोठा अग्नि लावून वरचेवर पळीनें हलवीत जावें. आंतील चूर्णाची चकाकी मोडली, व उत्तम गुलाली रंग आला म्हणजे खालीं उतरून निवालें म्हणजे त्याचा चांगला खल करून ठेवावें; म्हणजे उत्तम भस्म होतें.

**मोरचुताची शुद्धि**—मोरचुताचे समभाग मांजराची विष्ठा व दहावा भाग टांकणखार व थोडा मध आंत घालून त्यांचा एकत्र खल करून परळांत घालून मातकापड करून हलकें पुट द्यावें, याप्रमाणें तीन पुटें दिलीं ह्मणजे चांगला शुद्ध होऊन त्यापासून वांति व भ्रांति होत नाही. **प्रकार २ रा**—मोरचूत निंबूरसांत किंवा आंबट ताकांत चांगला भिजवावा. नंतर त्याजवर थोडें तेल शिपडावें. नंतर फडक्यांत पुरचुंडी बांधून दोला यंत्रांत घोड्याचे मूत्रांत एक दिवस पचन करावा ह्मणजे चांगला शुद्ध होतो.

**रौप्यमाक्षिक**—याचें शोधन व मारण सुवर्णमाक्षिकाप्रमाणें करावें.

**अभ्रकाचें शोधन**—काळा वज्राभ्रक[1] कोळशाचे अग्नीवर भात्यानें किंवा फुंकणीनें फुंकून तापवून गाईचें दूध, त्रिफळ्याचा काढा, कांजी व गोमूत्र यांत पृथक् सात सात वेळ तापवून बुडवावें. **प्रकार २ रा**—अभ्रक अग्नीवर तापवून बोरीचे पानाच्या काढ्यांत बुडवावें आणि हातानें चांगलें मर्दन करावें. नंतर वरचें पाणी टाकून खालीं तळास राहिलेलें अभ्रक घेऊन कोरडें करावें. तें धान्याभ्रकाहून चांगलें होतें.

**धान्याभ्रकाची कृति**—कातरलेला काळा अभ्रक घेऊन त्यांत चतुर्थांश साळी मिळवून त्याची कांबळ्यांत पुरचुंडी बांधून परातींत ठेवून त्याजवर पाणी घालून जोंपर्यंत त्या पुरचुंडींतून अभ्रक नाहींसें होईल तोंपर्यंत हातानें चोळीत जावें.

---

१—जें अभ्रक अग्नीवर ठेविलें असतां कांहीं विकार न होतां जसेचे तसेंच वज्राप्रमाणें राहते, ते वज्राभ्रक होय त्याचा रंग काळा असतो.

व युक्तीनें सर्व अभ्रक बारीक होऊन कांबळ्यांतून पाण्यांत येई असें चोळावें. नंतर त्या परातींतून अभ्रकाचें पाणी दुसऱ्या पात्रांत घालून कांहीं वेळ ठेवून वरचें निवळ पाणी टाकून द्यावें, खाली रेतीप्रमाणें अभ्रक राहतें तें वाळवून चूर्ण करून ठेवावें त्याला धान्याभ्रक असें ह्मणतात.

**अभ्रकाचें मारण**—धान्याभ्रक घेऊन केळीचे कांद्याचे रसांत अथवा तांदुळजाचे रसांत एक दिवस मर्दन करून शरावसंपुटांत घालून गजपुट द्यावें. याप्रमाणें दहा पुटें दिलीं असतां अभ्रकाचें उत्तम भस्म होतें. **प्रकार २ रा**—अभ्रकाचे चूर्णासमान कलमी सोरा घेऊन दोहोंचा गोमूत्रांत खल करावा. नंतर शरावसंपुटांत ठेवून गजपुट द्यावें; ह्मणजे अभ्रकाचें पांढरें भस्म होतें. शतपुटी किंवा सहस्रपुटी अभ्रकाचें भस्म करणें झाल्यास कोरफडीचे रसांत खलून शरावसंपुटांत घालून मातकापड करून गजपुटें द्यावीं; ह्मणजे चांगलें रंगदार भस्म होतें. **प्रकार ३ रा**—काळा वज्राभ्रक आणून कोळशाचे अग्नींत घालून भात्यानें किंवा फुंकणीनें फुंकून तापवून गाईचे दुधांत टाकून विझवावें. नंतर त्याचे वेगळे वेगळे पत्रे करून तादुळजाचा रस व निंबुरस हे दोन्ही एकत्र करून त्यांत ते पत्रे आठ प्रहरपर्यंत भिजत ठेवावे म्हणजे अभ्रक शुद्ध होतें. नंतर अभ्रक त्या रसांतून बाहेर काढून त्याचें धान्याभ्रक करून नंतर त्याला रुईचे चिकांत एक प्रहरपर्यंत खलून त्याची वाटोळी वडी करून तिचे भोंवतीं रुईचीं पानें गुंडाळून शरावसंपुटांत ठेवून मात कापड करून रानगोवऱ्यांत गजपुट द्यावें. याप्रमाणें रुईचे चिकांत एक दिवस खलून सात गजपुटें द्यावी. नंतर वडाच्या पारंब्यांचा काढा करून त्यांत तो अभ्रक एकेक दिवस खलून तीन गजपुटें द्यावीं; म्हणजे अभ्रकाचें भस्म चांगलें होतें यांत संशय नाहीं. यापासून संपूर्ण रोग दूर होतात. व मृत्यूचेंही निवारण होतें. जरा दूर होते. पांढरें केंसाचे काळे केंस होतात. हें अभ्रकभस्म योगवाही आहे. याकरितां ज्या ज्या रोगाच्या अनुपानांत द्यावें त्या त्या रोगांचा नाश करितें.

**अभ्रक सत्वपातन**—शुद्ध अभ्रकाचें चूर्ण, लोंकर, राळ, क्षुद्र मासे (लहान मासे) यांचें चूर्ण करून त्याशीं अभ्रकचूर्ण मिळवून बकरीच्या दुधांत लहान लहान गोळ्या करून सुकवून मुशीत घालून कोळशांत ती मूस ठेवून भात्यानें किंवा फुंकणीनें फुंकावें ह्मणजे सत्व निघतें. या रीतीनें सर्व धांतूचीं सत्वें निघतात. **प्रकार २ रा**–गूळ, गुग्गुळ, लाख, पेंड, टांकणखार, लोंकर; राळ, लहान लहान मासे, हीं सर्व वांटून त्यांत अभ्रक मिळवून शेळीच्या दुधांत गोळ्या बांधून उन्हांत सुकवून मुशींत घालून अग्नींत ठेवून भात्यानें किंवा फुंकणीनें फुंकावें; ह्मणजे अभ्रकाचें सत्व निघून तें तळास जाऊन बसतें. या औषधी दगड व माती यांचेंही सत्व काढूं शकतात. तेथें अभ्रकाची काय कथा. **प्रकार ३ रा**—अभ्रकाचें चूर्ण एक दिवस कांजींत व एक दिवस सुरणाचे रसांत ठेवावें. नंतर केळीच्या कांद्याच्या रसाची भावना द्यावी. आणि चतुर्थांश टांकणखार, लहान मासे, याशीं मिळवून ह्मशीच्या शे-

णाशीं मुटकुळी करून सुकवून खापरांत ठेवून खूप अग्नि द्यावा ह्मणजे अभ्रकाचें सत्व पडतें. तें सर्व गोळा करून पंचमित्राशीं ( तूप, मध, गुग्गूळ, गुंजा, टांकणखार, ) मिळवून मुशींत घालून अग्नि द्यावा. ह्मणजे त्याची कांशासारखी लगड होते. तें सत्व पारदाच्या जारणाविषयीं योग्य आहे. व संपूर्ण लोहांपेक्षां गुणांनीं अधिक आहे.

**सुर्म्याची शुद्धि**—सुर्म्याचें चूर्ण निंबूरसांत खलून एक दिवस उन्हांत ठेविलें असतां शुद्ध होतें.

**मनशीळेची शुद्धि**—हळदीचे काढ्यांत किंवा शेळीचे मुतांत दोलायंत्रांत एक दिवस पचन करावें ह्मणजे शुद्ध होतें. किंवा आल्याच्या रसाच्या सात भावना अथवा अगस्त्याच्या पानाच्या रसाच्या सात भावना द्याव्या ह्मणजे शुद्ध होतें.

**हरताळाची शुद्धि**—हरताळीचे बारीक तुकडे करून त्याची फडक्यांत पुरचंडी बांधून दोलायंत्रांत घालून कांजीमध्यें १ प्रहर, कोहळ्याचे रसामध्यें १ प्रहर, तिळाचे तेलामध्यें १ प्रहर व त्रिफळ्याचे काढ्यामध्यें १ प्रहर याप्रमाणें दोलायंत्रात ४ प्रहर शिजविला असतां हरताळ शुद्ध होतो.

**हरताळाचें भस्म**—शुद्ध पत्र्या हरताळ घेऊन कोरफड, कोहळा, आणि दहीं यांत पृथक् तीन तीन वेळ घोटून गोळा करून सुकवावा. नंतर एका मडक्यांत खालीं सहा अंगुळें मीठ भरून त्यावर लोखंडाच्या करंड्यांत हरताळाचा गोळा ठेवून बत्तीस प्रहर क्रमानें अग्नि द्यावा. ह्मणजे हरताळाचें चुन्यासारखें शुभ्र भस्म होतें. तें तांदुळभार साखरेशीं दिलें असतां वातरक्त, व ज्वर यांचा नाश करितें. **प्र० २ रा**—केळीचा कांदा कोरून त्यांत हरताळ ठेवून वरून मातकापड करून गजपुट द्यावें म्हणजे भस्म होतें. **प्र० ३ रा**—तुरटीचें चूर्ण, हरताळीचे खालवर शरावसंपुटांत घालून मातकापड करून एक गजपुट दिलें असतां उत्तम भस्म होतें.

**कलखापरीचें शोधन**—कलखापरी कोळशाचे विस्तवांत तापवून सात वेळ निंबुरसांत बुडवावी ह्मणजे शुद्ध होते. जी कलखापरी जस्ताची उपधातु आहे, तिचें हें शोधन जाणावें. ही कलखापरी उपधातूप्रमाणें चांगली चकाकत असते, ही सत्व पाडण्याविषयीं उत्तम जाणावी. आणि दुसरी ह्मणजे कवलाच्या तुकड्याप्रमाणें मृत्तिकेपासून झालेली ती कलखापरी औषधादिकांमध्यें योजावी तिची शुद्धि येणें प्रमाणें—ती कलखापरी आणून मनुष्याचे व गाईचे मुत्रांत पृथक् पृथक् सात सात दिवस दोलायंत्रानें पचन करावी ह्मणजे शुद्ध होते. किंवा दोलायंत्रांत पचन न करितां तशीच भिजत ठेवली असतां शुद्ध होते. नंतर ऊन पाण्यानीं चांगली धुवून उन्हांत सुकवून ठेवावी.

**मुरदाडशिंगाची शुद्धि**—खलांत घालून सुंठीच्या काढ्याच्या तीन भावना द्याव्या ह्मणजे शुद्ध होतें.

मंडूर—बेहड्याचे लांकडाचे कोळसे करून त्यांत शंभर वर्षांपलीकडील असें जुनें लोहाचें कीट घालून भात्यानें फुकावें. चांगलें लाल झाल्यावर तें गोमूत्रांत विझवावें. याप्रमाणें सात वेळ विझविलें असतां लोहकीटाची शुद्धि होते. १—शुद्ध लोहकीटाचें बारीक चूर्ण करून त्याचे दुप्पट त्रिफळ्याच्या काढा करून मडक्यांत घालून त्यांत तें लोहकीटाचें चूर्ण घालून चांगलें मिळवावें. नंतर तोंडावर एक पणती ठेवून मातकापड करून एक गजपुट द्यावें म्हणजे मंडूर तयार होतो. **प्रकार २ रा**—शुद्ध लोहकीटाचें चूर्ण करून गोमूत्रांत खलून शरावसंपुटांत ठेवून गजपुट द्यावें ह्मणजे मंडूर होतो. **प्रकार ३ रा**—शुद्ध केलेल्या लोहकीटास त्रिफळ्याच्या काढ्याचीं पुटें २१, गोमूत्राचीं २१, कोरफडीच्या रसाचीं २१ व पंचामृताचीं २१ एकूण ८४ पुटें देऊन शेवटीं गोमूत्रांत खलून एक गजपुट द्यावें ह्मणजे मंडूर सर्वोत्कृष्ट होतो.

---

## पारदविधि.

**पारदाची शुद्धि**—निंबूचे रसांत अथवा निंबाचे पानाचें रसांत खड्याचा हिंगूळ एक प्रहर खलून डमरुयंत्रांत घालून खालीं जाळ करून त्यांतील पारा वरती जाऊन जमतो. तो शुद्ध जाणावा. याला संपूर्ण कार्याचेठायी योजावा. डमरुयंत्राचे वरील मडक्यावर ओल्या वस्त्राची घडी ठेवावी व तिजवर वरचेवर पाणी टाकीत जावें. अग्नि चार प्रहर द्यावा. विशेष माहिती करितां डमरुयंत्र पहा.—हिगुळांतून काढलेला पारा व गंधक जारण केलेल्या पाऱ्यासारखा किंचित् काळा निघतो व तो सप्तकंचुक, नागववंग इत्यादि दोषमुक्त होतो तो सर्व कर्मामध्यें योजावा. **प्र० २ रा**—खड्याचा हिंगूळ सात वेळ कडू निंबाचे रसांत आणि सात वेळ निंबूरसांत खलावा. शुष्क ( चागला कोरडा ) करून डमरुयंत्रांत घालून ऊर्ध्वपातन क-

---

१—सुंठ, काळी मुसळी, गुळवेल, शतावरी, गोखरु, यांस पचामृत म्हणतात. यांचा काढा करून पुटें द्यावीं.

२—पारदाला कोठें आठ, व कोठें एकोणवीस सस्कार करावे म्हणून सांगितलें आहे त्यांत जारण वगैरे कांहीं संस्कार जे आहेत ते फक्त ( द्रव्याविषयीं ) किमयाविषयीं आहेत. ( वेध करण्याकरिता ) व आठ सस्कार ह्मणजे स्वेदन, मर्दन, मूर्छन, उत्थापन, पातन रोधन, सशमन, संदीपन‚ हे आठ सस्कार केवळ रसायनाविषयीं सागितले आहेत हे सस्कार जाहल्याशिवाय पारा चागला शुद्ध व मृत होत नाहीं व जसा गुण करावा तसा करीत नाहीं.—परंतु जर पारा हिंगुळांतून डमरुयत्रानें काढला तर त्यास आठ सस्काराचीही पण जरुरी नाहीं. कारण डमरुयत्रातून वर पारा गेला ( डमरुयत्राच्या वरच्या पात्राचें बुडास जाऊन लागला ) म्हणजे तो शिसें, वग, गिरिदोष, मल, शिखी, अग्नि, विष, या दोषापासून मुक्त होतो. डमरुयत्रांतुन पारा काढल्याशिवाय किंवा आठ सस्कार झाल्याशिवाय पाऱ्याचे शोधन व भस्म कधींही चागले निर्दोष होणार नाहीं.

रून घ्यावा. नंतर तो पारा वरच्या रसांत खलून अंधःपातन करावा म्हणजे पारा निर्मळ होतो. तो पारा व समान तांब्याचा चूर आंत घालून सात वेळ निंबूरसांत खलावा व ऊर्ध्वपातन करून थंड झाल्यावर काढून घ्यावा. तो संपूर्ण दोषनाशक, वीर्यवान् व रसायनात योजिला असता उत्तम गुण करणारा असा होतो. वर सांगितल्याप्रमाणें हिंगुळांतून पारा काढून मिठाच्या पाण्यांत दोलायंत्रानें स्वेदन करून घ्यावा आणि यथेच्छ औषधांत योजावा.

**पारदभस्म**—शुद्ध पारा कोरांट्याचे रसांत घालून उन्हांत मर्दन करावा ह्मणजे अग्नीशिवाय पाऱ्याचें भस्म होतें. तें सर्व कर्मामध्यें योजावें **प्रकार २ रा**—शुद्धपारा, गंधक व सैंधव समभाग घेऊन नागवेलीचे पानाचे रसांत खल करून गोळा करावा. नंतर नागवेलीचे पानानीं वेष्टन करावा. आणि ऊर्ध्वपातन यंत्रांत ( डमरुयंत्रांत ) घालून एक दिवस अग्नि द्यावा. नंतर वरच्या पात्राच्या बुडास जें पाऱ्याचें भस्म लागतें तें घेऊन तीन गुंजा विड्याच्या पानाशीं एक महिना सेवन करावा. ह्मणजे सोपद्रवक्षय नाश पावतो. हा चंद्रायुध नामकरस आहे, याचें पथ्य लघुमृगांकाप्रमाणें करावें **प्रकार ३ रा**—शुद्धपारा व शुद्धअभ्रक हे दोन प्रहर वडाचे चिकांत मर्दन करावे आणि डमरुयंत्रांत घालून खालीं वडाचे काष्ठाचा अग्नि द्यावा, म्हणजे पाऱ्याचें भस्म होतें. **प्र० ४ था**—गंधक, घेरोसा व पारा हे तिन्ही समभाग घेऊन निर्गुडी व कोरफडयाचे रसांत खलून शरावसंपुटांत घालून एक गजपुट द्यावें म्हणजे पाऱ्याचें काळें भस्म होतें. **प्र० ५ वा**—शुद्ध पारा १, गंधक २, फटकी ३, सैंधव ३, सोमल ४, बचनाग ५ आणि कापूर पाऱ्याच्या निमा हे सर्व खलांत घालून त्यास रुई व निवडुंग यांच्या चिकाच्या भावना द्याव्या आणि थालीमध्यें मीठ घालून त्यांत तो पाऱ्याचा गोळा ठेवून थालीच्या तोंडापावेतों मीठ भरून त्यावर दुसरी थाली पालथी ठेवून संधिलेप करावा. आणि चुलीवर ठेवून आठ प्रहर अग्नि द्यावा. व वरचे थालीचा बुडावर जलपट ठेवावा, म्हणजे वरचे थालींत सिद्धपार लागेल तो काढून सर्व कर्मामध्यें योजावा. हा भक्षण केला असतां देहसिद्धि होते. हा रस देवदैत्यांस दुर्लभ आहे. **प्रकार ६ वा**—सुवर्ण १, पारा ८, हे लोहपात्रामध्यें घालून चुलीवर ठेवून मृदु अग्नि द्यावा आणि गंधक १६ भाग घेऊन थोडा थोडा त्या पाऱ्यावर देत जावा. व देवदाली व विष्णुक्रांत यांचा रस वारंवार देत जावा. जोंपर्यंत संपूर्ण गंधक जळून जाईल तोंपर्यंत अशी क्रिया करावी ह्मणजे पाऱ्याचें भस्म होतें. तें संपूर्णरोग, वलीपिलत यांचा नाश करितें. आणि तें विद्या व पुष्टि याना देतें. **प्रकार ७ वा**—शुद्ध पाऱ्यांत फटकी सैंधव आघाड्याचें मूळ हे पदार्थ क्रमवृद्धीनें घालून चतुर्थांश कांजी घालून एकत्र घोटावे ह्मणजे पारा बद्ध होतो. नंतर डमरुयंत्रात चुलीवर ठेवून अहोरात्र हलका अग्नि द्यावा ह्मणजे वरच्या पात्रांत कापरासारखें भस्म जमतें तें घेऊन सर्व रोगावर द्यावें. आणि वाजीकरण योगाशीं संपूर्ण कार्य करितें व कांती आणि पुष्टि यातें. देतें. याचें निरंतर सेवन करावें. हा सिद्ध मुखरस याचेहून दुसरें रसायन उत्तम नाहीं.

**पारदगुटि**—धोत्र्याच्या बियांचें तेल पातालयंत्रानें काढून त्यांत सात दिवस पारा मर्दन करावा; ह्मणजे विषनाश होतो. नंतर आंवळेसरगंधक ३ भाग घेऊन धोत्र्याचे तेलांत खलून त्याची मूस करावी. नंतर त्यांत तो पारा ठेवून मुख बंद करावें. नंतर सात मातकापडें करून तो गोळा सुकवावा. पुन्हां सात वेळ मातकापड करून बाहेरून शेणानें लिपून त्या गोळ्याची पूजा करावी. सुकल्यावर तीनहात चौरस खांच खणून त्यांत खालवर गोवऱ्या घालून मध्यें तो गोळा ठेवून पुट द्यावें. शीत झाल्यावर काढावा. आणि त्यांतील गुटिका कौतुक दाखिवणारी काढून घ्यावी. ती रोग्याचे मुखांत धरावयास दिली असतां सुख होतें. जोंपर्यंत ही गुटिका मुखांत आहे तोंपर्यंत संभोगसमयीं वीर्यपतन होत नाहीं. **प्रकार २ रा**—शुद्ध पारा व शुद्ध अभ्रक समभाग घेऊन मर्दन करावें. ह्मणजे पारा तत्क्षणीं बद्ध होतो. नंतर गोळा करून तो कोणत्याही पक्ष्याच्या पोटांत घालून त्यावरून पिठाचा लेप करावा. नंतर सात मातकापडें करून वेष्टन करावा. नंतर त्याजवर शेणाचा लेप द्यावा. आणि सुकल्यावर गजपुट द्यावें. शीत झाल्यावर गुटिका काढून घ्यावी. ही मुखांत धरली असतां खेचरत्व ( पक्षी ) प्राप्त होतें व अदृश्य होतें. हिच्या स्पर्शानें व्याधि जातात, व कामवृद्धि होते. मारुतीप्रमाणें बळ वाढतें. परस्पर सिद्धि होतें. ताम्राचें सुवर्ण होते, शस्त्रादिकांचा स्तंभ होतो. व देह दिव्य होतो. **खुलासा**—ह्या गुटिका करणें झाल्यास त्यास गंधक जारण व सुवर्ण जारण इत्यादि आठरा संस्कार केले पाहिजेत असें वाटतें. कारण ह्या संस्काराशिवाय तांब्याचें सुवर्ण ह्मणजे तांब्यास रंग येणार नाही.

**पाऱ्याचें पात्र**—पारा अर्धा शेर व मोरचूत आडीच पावशेर. मोरचुताचें चूर्ण करून एका कढईत घालावें. मध्यें पारा ठेवून त्याजवर पुन्हां थोडें मोरचुताचें चूर्ण घालावें. पारा चांगला झांकून जाईल असें खालवर चूर्ण घालून त्याजवर तांब्याची, पितळेची, कास्याची अथवा मातीची एक वाटी त्या पाऱ्यावर पालथी घालावी. व त्या वाटीवर दहा शेर वजनाचा धोंडा ठेवावा. नंतर त्या कढईत अदमासानें पाणी घालून चुलीवर ठेवून मंदाग्नि द्यावा. सर्व पाणी आटल्यावर कढई खाली काढून त्यांतील पारा काढून घेऊन पाण्यामध्यें स्वच्छ धुवून घ्यावा, व वस्त्रातून गाळावा. जो पारा वस्त्रातून गळेल, तो कच्चा समजून पुन्हां वरप्रमाणें त्याची क्रिया करावी. व जो वस्त्रातून गळाल्यावांचून राहील तो पक्का झाला असें समजून ज्या सांच्याचें पात्र करणें असेल त्याप्रमाणें कच्चे मातीचा सांचा करून त्यांत तो पारा जमवावा. व त्यांत तुळशीचा अथवा लिंबाचा रस भरून तीन दिवस तसाच ठेवावा. नंतर तो सांचा पाण्यात धुवावा. ह्मणजे लागलीच माती विघरुन जाईल. व पाऱ्याचें पात्र साफ दिसेल. या पात्रांत जो मनुष्य दूध घालून पिईल त्याचे पोटांतील सर्व रोग दूर होतील व कोणताही आजार होणार नाही.

---

# गंधकविधि.

**गंधकाचा प्रकार**—गंधक तांबडा, पिंवळा, पांढरा आणि काळा असा चार प्रकारचा आहे. त्यांत तांबडा सुवर्ण क्रियेविषयीं ( किमया ) व जो पोपट ह्मणजे राघु याचे चोंचीसारखा आरक्त वर्ण तो उत्तम.—पिंवळा मळसर ( आंवळेसर ) हा रसायनाविषयी ( औषधी मात्रा वगैरे ) उत्तम.—पांढरा लेप करण्याविषयीं किंवा लोह मारण्याविषयीं घ्यावा.—आणि काळा गंधक मोठा दुर्लभ आहे तो जरा व मृत्यु यांचा नाश करितो.

**गंधकाची शुद्धि**—गंधक लोखंडाचे कढईत पातळ करून माक्याच्या रसांत ओतावा. याप्रमाणें सात वेळ ओतला असतां तो गंधक भक्षणार्थ शुद्ध होतो. **प्र० रा २**—आंवळेसर गंधकाचें चूर्ण करून पात्राच्या तोंडावर बांधलेल्या शुभ्र फडक्यावर तें पसरावें. त्याजर त्याच्या बेतानें एक खापर ठेवून त्यांत गंधक पातळ होईइतका अग्नि करावा. नंतर बुंदीच्या कळीप्रमाणें पात्रांत गाईचे दुधांत पडलेला गंधक घेऊन पुन्हां पुन्हां तीन वेळ या रीतीनें गंधक दुधांत पाडून घ्यावा ह्मणजे शुद्ध व निर्मळ होतो. हा पाण्यामध्यें घालण्यास योग्य होतो. **प्र० ३ रा**—एक मातीचें पाल घेऊन त्यांत दूध व थोडें तूप घालावें. व त्या भांड्याच्या तोंडावर पांढरें फडकें बांधावें व त्या फडक्यावर गंधकाचें चूर्ण पसरावें. व त्याजवर रुंद मोठें खापर ठेवून संधिलेप करावा आणि तें भांडें खळग्यांत ठेवावें. त्याचें तोंड किंचित् खळग्यावर असावें. नंतर त्या खापरावर गोवऱ्यांचा अग्नि करावा. ह्मणजे गंधक पातळ होऊन भांड्यांतील दुधात शुद्ध होऊन पडतो. नंतर तो थंड झाल्यावर धुऊन वस्त्रावर सुकवून नंतर प्रयोगामध्यें योजावा.

**गंधकाचा दुर्गंध जाण्याची कृति**—गंधकाचें चूर्ण करून तें दुधांत घट्ट होईतोंपर्यंत पचन करावें. नंतर निळ्या माक्याचे रसांत मंदाग्नीवर पचन करावें. आणि त्रिफळ्याच्या काढ्यांत पातळ करून ओतावें. ह्मणजे गंधकाचा दुर्गंध जातो यांत संशय नाही.

**प्रवाळभस्म**—पोंवळी किंवा प्रवाळाच्या कांड्या चार प्रहर निंबूरसांत भिजत ठेवाव्या ह्मणजे शुद्ध होतात. किंवा जयंती ह्म० टाकळीच्या किंवा जाईच्या रसांत दोलायंत्रानें एक प्रहर शिजविल्या असतां शुद्ध होतात. नंतर एक परळ घेऊन त्याचे तळास कोरफडीचा रस घालावा. व त्याजवर पोंवळी अथवा प्रवाळाच्या कांड्या पसराव्या. नंतर त्याजवर पुन्हां कोरफडीचा रस व गीर घालावा. नंतर वर दुसरा परळ पालथा घालून मातकापड करून हलका अग्नि द्यावा. शीत झाल्यावर पांढऱ्या शुभ्र झालेल्या कांड्या खलांत घालून गुलाबपाणी घालून खल करावा. ह्मणजे पांढरें शुभ्र भस्म होतें. याला अग्निपुटी प्रवाळ ह्मणतात. **प्र० २ रा**—पोंवळीं किंवा पोवळ्याच्या कांड्या शुद्ध करून त्याचें वस्त्रगाळ चूर्ण करावें, व तें

गुलाबपाण्यानें भिजवा व थोडें खलून उन्हांत ठेवावें याप्रमाणें गुलाबपाण्याचीं २१ पुटें दिलीं असतां गुलाबी रंगाचें फारच उत्तम भस्म होतें. त्याला सूर्यपुटी प्रवाळभस्म असें म्हणतात. किंवा पोंवळ्याचें मारण सुवर्णमाक्षिकाचे मारणाप्रमाणें करावें.

**मौक्तिकभस्म**—मोत्याची शुद्धि पोंवळ्याप्रमाणें करावी. नंतर पारा व गंधक यांच्या कज्जलीशीं दूध घालून घोटावें. नंतर त्याचा गोळा करून शरावसंपुटांत घालून एक हात घन चौरस खड्डा खणून त्यांत रानशेणी गोवऱ्या घालून पुट द्यावें ह्मणजे भस्म होतें. अथवा मौक्तिकाचें मारण सुवर्णमाक्षिकाप्रमाणें करावें. किंवा सुर्यपुटी प्रवाळभस्माप्रमाणें करावें.

**सर्व रत्नांचें शोधन**—आम्लवर्गांत माणीक, जयंती ( टाकळी ) रसांत मोती.—क्षीरवर्गांत पोंवळी.—गाईच्या दुधांत गरुड पांच.—सैंधव व गुळाच्या काढ्यांत पुष्पराग.—तांदुळजाचे रसांत हिरा.—नागवेलीच्या रसात नीलमणी.—गोरोचनाच्या पाण्यांत गोमेद—आणि त्रिफळ्याच्या काढ्यामध्यें वैडूर्यमणी घालून दोलायंत्रांत एक प्रहर पचन करावीं ह्मणजे शुद्ध होतात.

**सर्व रत्नोपरत्नें यांचें मारण**—सात रत्नें व सात उपरत्नें यांना कुळीथाच्या काढ्यांत सैंधव घालून त्याचीं २१ पुटें उन्हांत द्यावीं ह्मणजे त्यांची अग्निशिवाय भस्में होतात. किंवा सुवर्णमाक्षिक, गंधक, हरताळ, हिंगूळ, मनशीळ, पारा, व टांकणखार, हीं सर्व एकत्र करून त्याबरोबर रत्नांचा खल करून शरावसंपुटांत घालून गजपुट द्यावें, ह्मणजे एकाच पुटानें भस्म होतें.

**हिऱ्याची विशेष शुद्धि व मारण**—हिरा तापवून गाढवाच्या मुतांत बुडवावा याप्रमाणें २१ वेळ केलें ह्मणजे शुद्ध होतो. नंतर हरताळ, ढेकणाशीं वांटून त्या गोळ्यांत हिरा ठेवून अग्नि द्यावा. आणि चांगला तापला ह्मणजे घोड्याच्या मुतानें सेचन करावा. याप्रमाणें २१ वेळ केलें ह्मणजे शंखासारखें पांढरें भस्म होतें. अथवा हिंग, सैंधव व कुळीथ या तिहींचा काढा करून हिरा तापवून त्यांत २१ वेळ विझवावा, ह्मणजे भस्म होतें.

---

१—मौक्तिकभस्म सूर्यपुटीच करावें हें उत्तम कारण अग्निपुट केले असतां त्याचे वीर्य लौकर जातें.

२—बुद्धिमान पुरुषानें हिरे इत्यादिकाचें भस्म करू नये कारण तीं मौल्यवान असतात. त्याच्या मारण्यानें नर्क प्राप्त होतो ह्मणून हिऱ्यादिकाचे खाणींत सापडणारीं व लक्षणांनीं त्या त्या जातीसारखीं अल्प मौल्यवान अशीं रत्नें पाहून त्याचें मारण केलें असता पातक होत नाहीं वैक्रांत, सूर्यकात, चद्रकात, राजावर्त, लाल, पेरोज, आणि नील व पीत वर्ण मणी म्हणजे जे विषनाशक किंवा अग्नि स्तंभक हें परीक्षक लोनी उपरत्नामध्यें गणले आहेत. म्हणून रत्नादिकांच्या अभावीं उपरत्नें घ्यावीं आणि मौक्तिकाच्या अभावीं मोत्याची शींप घ्यावी. म्हणजे ती त्या त्या मूळरत्नाप्रमाणें गुण देतात.

# औषधाची शुद्धि.

**आफूची शुद्धि**—आफू दगडी खलांत घालून आल्याच्या रसाचीं दहा पुटं देऊन सावलींत वाळवावी, म्हणजे शुद्ध होते. किंवा एक तोळा आफूची फडक्यांत पुरचुंडी बांधून, एक शेर दुधांत एक प्रहर शिजवावी. म्हणजे शुद्धि होते.

**एरंडबीजाची शुद्धि**—एरंडाच्या बिया प्रथम पाण्यांत भिजत घालून त्याचे आंतील पांढरे गोळे काढून त्यांची फडक्यांत पुरचुंडी बांधून दोलायंत्रांत नारळाचें पाणी घालून एक प्रहर शिजवावें, ह्मणजे शुद्ध होतात.

**कळलावीची शुद्धि**—( खड्या नाग ) तुकडे करून एकरात्र गोमूत्रांत भिजत ठेवावें म्हणजे शुद्धि होते.

**कवडीचें शोधन व मारण**—तीन दिवस व रात्र ताकांत भिजत घालाव्या म्हणजे शुद्ध होतात. किंवा कांजींत खलल्या असतां शुद्ध होतात. नंतर या कवड्या कोळशाच्या अग्नींत तापवून चांगल्या फुले तोंपर्यंत भाजून शीत झाल्या म्हणजे बारीक खलून औषधांत योजाव्या.

**कण्हेर, रुई, व निवडुंग यांची शुद्धि**—कळलावीप्रमाणें करावी.

**कुचल्याच्या बियांची शुद्धि**—किंचित् तूप लावून निर्धुम अग्नीवर भाजाव्या. किंवा तुपांत तळाव्या; म्हणजे शुद्ध होतात. परंतु त्या जळूं देऊं नयेत.

**गुग्गुळाची शुद्धि**—त्रिफळ्याचे काढ्यांत दोलायंत्रानें एक प्रहर शिजवावा. नंतर जाड वस्त्रानें किंवा तारेच्या चाळणीनें गाळून घ्यावा म्हणजे शुद्ध होतो.

**जेपाळाची शुद्धि**—जेपाळबीज तीन दिवसपर्यंत ह्मशीचे शेणांत पुरून ठेवावें. चौथे दिवशी त्याचीं वरचीं टरफलें व आतील मोख ( मोड ) काढून टाकावे. नंतर त्या पांढऱ्या डाळिंब्या उन पाण्यानें स्वच्छ धुऊन खलात घालून त्याजवर फडकें टाकून मग चांगला खल करून कोऱ्या मडक्याच्या बुडास गोवरीप्रमाणें थापून ठेवावें. एक रात्र गेल्यावर काढून घ्यावें. हा मडक्याचा प्रकार सात आठ वेळ करावा. दरवेळेस खल करून मडकें नवें घेत जावें. असें केल्यानें आंतील तेलाचा अंश अगदीं नाहीसा होतो. नंतर त्या चूर्णाला लिंबाच्या रसाच्या दोन भावना देऊन वाळवून ठेवावें. अथवा साल व आंतील जिव्हा काढून वस्त्रांत पुरचुंडी बांधून दुधांत किंवा गाईचे शेणाचे रसात दोलायंत्रानें एक प्रहर शिजवावें म्हणजे शुद्ध होतें.

---

१—कवडी पिंपळी, पाठीवर गांठळ,लांबट, वजनानें सहा मासे असते ती उत्तम; चार मासे मध्यम आणि तीन मासे असते ती कनिष्ठ जाणावी.

**टांकणखाराची शुद्धि**—टांकणखार निर्धूम अग्नीवर टाकून त्याची लाही केली असतां शुद्ध होतो. अथवा निंबूरसांत खलून एक दिवस उन्हांत ठेविला असतां शुद्ध होतो.

**तुरटीची शुद्धि**—तुरटी निर्धूम अग्नीवर ठेवून लाही केली असतां शुद्ध होते.

**धोत्र्याच्या बियांची शुद्धि**—धोत्र्याच्या बिया एक रात्र किंवा चार प्रहर गोमूत्रांत भिजत घालून थोडें कांडून वरील कोंडा काढून टाकावा ह्मणजे शुद्ध होतात.

**पाषाणभेदाची शुद्धि**—दुधांत दोलायंत्रानें एक प्रहर शिजविला असतां शुद्ध होतो.

**पिंपळीची शुद्धि**—चित्रकाच्या काढ्याची एक भावना देऊन उन्हांत वाळवावी ह्मणजे चांगली शुद्ध होते. ती रसायनांत योजावी.

**बचनागाची शुद्धि**—बचनागाचे बारीक बारीक तुकडे करून गोमूत्रांत अथवा गाईच्या दुधांत दोलायंत्रामध्यें एक प्रहर शिजवावा. नंतर उन पाण्यानें धुऊन स्वच्छ करून वाळवून ठेवावा. **प्र० २ रा**—बचनाग आणून त्याचे बारीक बारीक तुकडे करून नंतर मातीच्या मडक्यांत भरून त्यांत गोमूत्र घालून तीन दिवसांपेक्षां जास्त दिवस उन्हांत ठेवावें. गोमूत्र, नवीन घालीत जावें. नंतर तें काढून वाळवून ठेवावें.

**बचनागाचें मारण**—बचनागाच्या समभाग शुद्धटांकणखार घालून खल करावा; ह्मणजे तो मृत होतो. तो सर्व रोगांवर योजावा. बिलकूल विकार करणार नाहीं.

**भांगेची शुद्धि**—बाभळीचे सालीचे काढ्यांत शिजवून गाईच्या दुधाचीं दोन पुटें द्यावीं; ह्मणजे शुद्ध होते. किंवा तव्यावर घालून नुसती भाजावी. नंतर फडक्यांत घालून स्वच्छ पाणी निघेपर्यंत चोळून धुवावी ह्मणजे शुद्ध होते.

**मिऱ्यांची शुद्धि**—आंबट ताकांत एक प्रहर भिजत घालून कांडून वरील फोल काढून टाकावें. ह्मणजे शुद्ध होतात.

**रसकापराची उत्पत्ति**—पारा, फटकी, हिराकस व सैंधव ही सर्व समभाआणि विसांश नवसागर खलात घालून खलावें. आणि कोरफडीच्या रसाची भाव-

---

१—बचनाग हा पांढरा, आरक्त वर्ण, पिवळा व काळा, असा चार प्रकारचा आहे, पांढरा बचनाग रसायनाविषयीं व रोगनाशनार्थ समर्थ आहे. विषप्रयोगाविषयी किंवा पुष्टीकरिता रक्तवर्ण योग्य-संपूर्ण व्याधि व कुष्ठ हरण करण्याविषयीं पिवळा बचनाग श्रेष्ठ जाणावा. व काळा बचनाग हा सर्पाचे दंशावर किंवा मारणाविषयीं योजावा. शुद्ध केलेला बचनाग लाल शिरसाचे तेलात फडकी भिजवून त्यात बांधून ठेवावा ह्मणजे गुण कमी होत नाहीं.

ना द्यावी आणि डमरुयंत्रांत क्रमानें मोठा अग्नि लावून चार प्रहर पचन करावें ह्मणजे वरील पात्रास लागलेला रसकापूर काढून ध्यावा.

**रसकापराची शुद्धि**—एक तोळा रसकापरास एक शेर गाईचें तूप किंवा एक शेर दूध लोहपात्रांत घालून पचन करावा; ह्मणजे शुद्ध होतो.

**लसणाची शुद्धि**—लसणाच्या पाकळ्या चांगल्या निसून आंबट ताकांत एकरात्र भिजत घालाव्या. नंतर दुसरे दिवशी ऊन पाण्यानें पांच सात वेळ स्वच्छ धुवून सावलीत वाळवावा. ह्मणजे दुर्गंध कमी होऊन शुद्ध होतो.

**शिलाजिताची शुद्धि**—शिलाजीत, गाईचे दुधांत, त्रिफळ्याचे काढ्यांत व माक्याचे रसांत वेगळालें एकेक दिवस खल करून उन्हांत ठेवून कोरडा करावा; ह्मणजे शुद्ध होतो.

**शंखाचें शोधन व मारण**—आम्लवर्ग व कांजी यांत दोलायंत्रानें पचविला असतां शुद्ध होतो. व मारण कवडीप्रमाणें करावें.

**शिंपीचें शोधन व मारण**—मोत्याची शिंप व जलशिंप यांचें शोधन शंखाप्रमाणें आणि मारण कवडीप्रमाणें करावें.

**सोमलाची शुद्धि**—सोमल दोन प्रकारचा एक शंख्या तो श्वेतवर्ण व दुसरा पीतवर्ण असा असतो. त्यांत श्वेतवर्ण तो शंखासारखा असतो. आणि पिंवळा डाळिंबाच्या वर्णाचा असतो. श्वेतवर्ण सोमल कृत्रिम असतो आणि पिंवळा पर्वतापासून होतो. हे दोन्ही विषें आहेत. शंख्या सोमल घेऊन बारीक तुकडे करून तांदुळजाचे रसांत दोलायंत्रानें एक प्रहर शिजवावा. ह्मणजे शुद्ध होतो.

**हिराकसाची शुद्धि**—माक्याचे रसांत एक वेळ पचन करावा.

**हिंगाची शुद्धि**—कमळाच्या पानाच्या रसांत भिजत घालून एक प्रहर उन्हांत ठेवावा.

**हिंगूळ**—अशुद्ध पारा १ भाग, गंधक ४ भाग यांना लोहपात्रांमध्यें कढवून एकत्र करून त्याचे तुकडे करून काचकुपीत भरून तिला एक अंगूळ वस्त्र व माती याचा लेप देऊन छायेंत सुकवून वालुकायंत्रांत एक दिवस मंदाग्नि द्यावा. नंतर पांच दिवस पावेतों क्रमवृद्धीनें अग्नि देऊन सातवे दिवशी काढून घ्यावा. तो हिंगूळ फार सुंदर होतो. हिंगुळ ३ प्रकारचा त्यांत जो जासवंदीच्या फुलासारखा लाल तो अति उत्तम. पिवळा व हिरवट रंगाचा असतो तो हीन जाणावा.

**हिंगुळाची शुद्धि**—हिंगूळ खलांत घालून मेंढीच्या दुधाचीं सात पुटें व निंबुरसाचीं सात पुटें अशी १४ पुटें दिली असतां शुद्ध होतो.

## भस्में करण्यास पुटें देण्याचा प्रकार.

**कपोतपुट**—वीतभर चौरस खांचेंत सात किंवा आठ गोवऱ्यांचें पुट द्यावें.

**कुक्कुटपुट**—वीतभर चौरस खांचेंत गोवऱ्या घालून पुट द्यावें.

**कुंभपुट**—मातीची एक घागर घेऊन तीस करांगुळीप्रमाणें चाळीस पन्नास छिद्रें पाडून ती अर्धी घागर कोळशानें भरून त्यावर मातकापड केलेला शराव अथवा मूस ठेवून वर तोंडापर्यंत दुसरे कोळसे घालून पेटवून चुलीवर अथवा विटावर ठेवावी. त्यांतील अग्नि तिसरे दिवशीं शांत झाल्यावर औषध काढून घ्यावें.

**गजपुट व माहिषपुट**—दीड हात चौरस खांचेंत गोवऱ्या घालून पुट द्यावें.

**गोवरपुट**—जमिनीवर गोवऱ्यांचा चूर निमा घालून त्याजवर शराव इत्यादि ठेवून वर गोवऱ्यांचा चूर दडपून अग्नि द्यावा.

**महापुट**—घन चौरस दोन हात खोल खांच खणून रानशेणीनें ती अर्धी भरून मातकापड केलेला शराव अथवा मूस मध्यें ठेवून वर दुसऱ्या रानशेणी घालून अग्नि द्यावा. स्वांगशीत झाल्यावर औषध काढून घ्यावें.

**वराहपुट**—कोपरापासून करांगुळीच्या शेवटापर्यंत घन चौरस हात खांच खणून त्यांत वरप्रमाणें पुट द्यावें.

---

## रसायनी औषधें तयार करण्याचीं यंत्रें.

**डमरुयंत्र**—खालचें मडकें लहान आणि वरचें दुप्पट मोठें अशीं दोन मडकी आणून त्यांस आंतून व बाहेरून खडूचा किंवा गोपीचंदनाचा पाण्यांत कालवून चांगला लेप करून वाळूं द्यावा. नंतर लहान मडक्यांत हिंगूळ घालून त्यावर मोठें मडकें पालथें घालावें आणि त्याचे तोंडाचे संधीस चुना १ भाग आणि कणीक २ भाग एकत्र कालवून त्याचा संधिलेप मडकें हालेनासा करावा. मग तें चुलीवर ठेवून खालीं चार प्रहर अग्नि द्यावा. वरचे मडक्याचे बुडावर ओली फडक्याची घडी वारंवार बदलून ठेवीत जावी. ह्मणजे चार प्रहरांनीं हिंगुळांतील पारा निघून वरचे मोठे मडक्याचे तळांस जाऊन लागतो. नंतर खालचा अग्नि विझवून तें यंत्र खालीं उतरून वांकडें करून ठेवावें. निवाल्यावर वरचे मडक्याचे बाजूस पारा जमून राहतो तो युक्तीनें काढून घ्यावा.



**ऊर्ध्वनालिका यंत्र**—एक तपेलें आणून त्यांत औषधी घालून त्याचे तोंडावर करंड्यासारखें झांकण मध्यें आंगठ्याप्रमाणें भोंक पाडलेलें असें घट्ट बसवून त्याचे भोंकांत नळी बसवून तें तपेलें चुलीवर ठेवून खालीं अग्नि द्यावा. आणि त्या नळीचे तोंडाखालीं एक भांडें पाण्यानें भरलेलें ठेवावें. ह्मणजे त्या नळीवाटें त्या भांड्यांत अर्क पडतो. त्या अर्कावर जें तेल येतें त्यासच अत्तर असें ह्मणतात.



**वालुकायंत्र**—वाटोळी अग्निशिशी[1] आणून त्या शिशीस सात मातकापडें करावी व मोठे मडक्याचा खालचा अर्धा भाग घेऊन त्याचे बुडास मोठें दाभणाएवढें भोंक पाडावें. आणि जें रसायन तयार करण्याचें असेल त्याचें कज्जलीनें ती शिशी एक तृतीयांश भरावी व शिशीचें तोंड खुलें ठेवावें. आणि ती शिशी त्या खापराचे छिद्रावर ओल्या मातीत छिद्र खुलें ठेवून हालेनाशी सारखी उभी बसवावी. नंतर गोडे पाण्यांतील बारीक रेती त्या शिशीचे तीन भाग बुजेपर्यंत खापरांत भरावी आणि तें खापर चुलीवर ठेवून जसा अग्नि सांगितला असेल तसा खालीं द्यावा ह्मणजे आंतील औषध तयार होतें.



**भूधरयंत्र**—सहा हात चौरस खांच करून तिचे मध्यभागीं वितभर चौरस अशी लहान खळगी करून त्यांत औषध घातलेला शराव ठेवून, दोन अथवा तीन अंगुळें माती वर घालून दडपून त्यावर सागितल्याप्रमाणें गोवऱ्या घालून अग्नि द्यावा.



**दोलायंत्र**—ज्या द्रव्यांत औषध शुद्ध करणें आहे तें द्रव्य मडक्यांत घालावें आणि जें औषध शुद्ध करावयाचें आहे त्याची पुरचुंडी करून मडक्याचे तोंडावर काडी ठेवून तिला मडक्यांतील द्रव्यात किंचित् बुडे अशी ती पुरचुंडी लोंबती बांधावी व मडक्याचे तोंडावर परळ पालथा ठेवून संधीलेप करून तें मडकें चुलीवर ठेवावें व खालीं साधारण अग्नि लावावा. म्हणजे पुरचुंडींतील औषध घटके दोन घटकेंत नुसत्या वाफेनें शिजून शुद्ध होतें.



१—ईस कोणी अतशिशीही ह्मणतात या शिश्या पातळ काचेच्या असून प्रसिद्ध आहेत.

**गर्भयंत्र**—अर्क काढावयाचा तर एका भांड्यांत विट येऊन तिजवर वाटी ठेवावी आणि भोंवतें भांड्यांत द्रव्य घालून त्या भांड्याचे तोंडावर दुसरी घटिकेसारखी वाटी ठेवावी. आणि माती लावून घट्ट करून त्या वाटींत पाणी घालून यंत्राच्या खालीं मंदाग्नि लावावा. नंतर वरचे वाटींतील पाणी कढत झालें म्हणजे काढून दुसरें पाणी घालीत जावें. याप्रमाणें केलें असतां वरचे वाटीचे बुडास वाफ जमून यंत्रांतल्या वाटींत अर्क ( अत्तर ) पडतो.



**पातालयंत्र**—हातभर रुंद व गोल अशी खांच खणून त्या खाचेंत एक पात्र ठेवावें आणि दुसरे पात्रांत पाहिजे तें औषध घालून त्याचे तोंडावर छिद्र पडलेला शराव ठेवून तें भांडें शरावासुद्धां खांचेंतल्या भांड्यावर पालथें ठेवून चुना व कणीक एकत्र कालवून त्याच्या संधीस लेप करून घट्ट करावें. नंतर वरचे बुडाबरोबर माती भरावी. नंतर भांड्यावर अग्नि करावा ह्मणजे आंतील औषधाचें तेल निघून शरावाचे छिद्रावाटें खालचे भांड्यांत पडतें हीं पात्रें मातीचीं घ्यावीं.



**तेजोयंत्र—लंबक**—एक तपेलें उभट गळ्याचें घेऊन त्यांत अर्धे भरेतोंपर्यंत द्रव्य घालून त्यांत सांगितल्याप्रमाणें पाणी घालून त्याचे तोंडावर दोन नळ्याचे लंबक ठेवून त्याचे संधीस चुना व कणिक कालवून लावावी. नंतर चुलीवर ठेवून खालीं मंदाग्नि लावावा. वरचे लंबकांत पाणी घालावें. तें कढत झालें ह्मणजे वरचे नळीनें सोडून पुन्हां दुसरें थंड पाणी घालीत जावें आणि खालचे नळीखालीं मोठें तोंडाचा शिसा ठेवून त्यांत अर्क पडेल तो घ्यावा. ह्या यंत्राला लंबक व कोणी नलिकायंत्रही म्हणतात.



## रसायनें व मात्रा.

१ **अतिसारेभसिंहरस**—पारा १, हिंगूळ १, अभ्रकभस्म १, बचनाग १ व गंधक १ भाग हीं सर्व एकत्र खलून पाहाडमूळ, चित्रकमूळ, कोंवळें बेलफळ व सुंठ यांच्या काढ्याच्या निरनिराळ्या भावना द्याव्या; मात्रा गुंजप्रमाण मधात द्यावी. ह्मणजे सर्व प्रकारच्या अतिसारांचा नाश होतो यांत संशय नाहीं.

२ **अग्निमुखरस**—पारा १, गंधक १, व बचनाग १ भाग हे आल्याच्या रसांत खलून नंतर पिंपळाचा खार १, आघाड्याचा खार १, जवखार १,

सज्जीखार १, टांकणखार १, जायफळ १, लवंगा १, त्रिकटू ३, त्रिफळा ३, शंखभस्म १, जवखार १, पुष्करमूळ १, पळसाचा खार १, तिळाच्या कांड्यांचा खार १ भाग व हिंग आणि जिरें हीं दोन दोन भाग घेऊन निंबाचे रसांत मर्दन करून मात्रा वालप्रमाण नुसती किंवा ऊन पाण्याशीं द्यावी. ती दीपन व पाचन असून अजीर्ण, तरळ, मोडशी, उचकी, गुल्म सर्व प्रकारचीं उदरें यांचा नाश करिते यांत संशय नाहीं.

३ **अग्निकुमार रस**—टांकणखार, पारा व गंधक हे तीन मिळून तीन भाग, वचनाग ३ भाग, कवड्या शंख याचें भस्म २ भाग, मिरीं ८ भाग, हीं सर्व एकत्र करून त्याचा निंबुरस, विड्याच्या पानाचा रस चित्रकाचा काढा, शेवग्याचा मुळाचा रस व महाळुंगाचा रस यांत पृथक् एकेक दिवस खल करावा. व मात्रा वालप्रमाण अनुपान योजून द्यावी (अनुपान प्रकरण पहा); ह्मणजे अजीर्ण, शूल, मंदाग्नि, प्लीहा, पांडुरोग, संपूर्ण वातरोग, मूत्ररोग, खोकला, मूळव्याध, अतिसार, संग्रहणी आणि सन्निपात यांचा नाश होतो.

४ **आरोग्यारिरस**—पारा, गंधक, पिंपळमूळ, वंशलोचन, जेपाळ बीज, त्रिकटू, पंचलवणें व बीडलोण ही सर्व समभाग घेऊन विड्याचे पानाचे रसांत एक दिवस खल करून वालप्रमाण गोळ्या कराव्या. दोन विड्याच्या पानांशीं एक गोळी द्यावी ह्मणजे संपूर्ण ज्वर, व सन्निपात यांचा नाश होतो. हा रस अत्यंत दुर्लभ आहे.

५ **अर्शकुठार**—ताम्रभस्म ३, लोहभस्म ३, सुंठ २, मिरें २, पिंपळी २, कळलावी २, दातीमूळ ३, चित्रकमूळ ३, पिलूचें मूळ २, जवखार ५, टांकणखार ५, सैंधव ५, गोमूत्र ३२ व निवडुंगाचा चीक ३२ भाग, हीं सर्व एकत्र करून गोळा होईपर्यंत मंदाग्नीनें शिजवावें. मात्रा दोन वालप्रमाण कराव्या आणि लोणी व खडीसाखर यांत दोन महिने भक्षण करावी. ह्मणजे अर्शसंबंधी सर्व विकार दूर होतात. पथ्य दूधभात किंवा ताकभात.

६ **अष्टमूर्तीरस**—पारा १, गंधक ६, हिंगूळ २, मनशीळ १, सोमल १, हरताळ १, रसकापूर १, मुरदाडशिंग ·॥·, तुरटी ·॥·, सोन्याचा चूर ·॥· व चांदीचा चूर ·॥· भाग ह्या सर्वांची कज्जली करून मातकापड केलेल्या काचकुपीमध्यें घालून वालुकायंत्रांत पक्क करावी. अग्नि सोळा प्रहर प्रथम दीप्ताग्नि प्रहर चार, मध्यमाग्नि प्रहर आठ, नंतर भडाग्नि प्रहर चार, नंतर स्वांगशीत झाल्यावर कुपीचे कंठी रसायन लागतें तें घेऊन ठेवावें. तें वातरोग, सन्निपातवायू, कफजन्यकास व श्वास इत्यादिकांवर अनुपान योजून तिळमात्र द्यावें. (अनुपान प्रकरण पाहा.)

७ **अर्धनारीनटेश्वर**—पारा, गंधक, बचनाग व टांकणखार, हीं सर्व समभाग एकत्र करून मेलेल्या अस्सल सर्पाच्या तोंडांत घालून त्याचे खालीवर मीठ

घालून मडक्याचें तोंड बंद करून चुलीवर ठेवून चार प्रहरपर्यंत तीव्राग्नि द्यावा. स्वांगशीत झाल्यावर आंतील औषध काढून खलावें. एक गुंज नस्य द्यावें. ज्या नाकपुडींत नस्य केलें असेल त्या अर्ध्या अंगाचा ज्वर जाईल. असा याचा पराक्रम आहे म्हणून हें कौतुकार्थ वैद्यानें करावें.

८ **अपूर्वमालिनीवसंत**—तोरमल्लीचें भस्म, अभ्रकभस्म, ताम्रभस्म, सुवर्णमाक्षिकभस्म, रौप्यभस्म, वंगभस्म, प्रवाळभस्म, पारदभस्म, व लोहभस्म आणि टांकणखार, शंखभस्म, हीं सर्व समभाग घेऊन शतावरी आणि हाळद यांच्या काढ्याच्या सात भावना देऊन हें औषध एकरात्र चांदण्यांत ठेवावें. नंतर हा वसंत एक गुंज मध, व पिंपळींत द्यावा. ह्मणजे जीर्णज्वर व धातुगतज्वर, यांचा नाश होतो. प्रमेहावर गुळवेलीचे सत्वाशीं द्यावा. व अश्मरीस महाळुंगाचे फळाचे रसाशीं द्यावा.

९ **अश्वकंचुकी**—पारा १, गंधक १, आंवळकठी १, पिंपळमूळ १, निरविषी १, पिंपळी १, मिरी १, वावडिंग १, पत्री १, लवंगा १, हाळद १, दारुहळद १, वेखंड १, खुरासनी ओंवा १, साधा ओंवा १, आल्याचा रस १, कोरफडीचा गीर १, मालकांगोणी १, गुळवेलीचें सत्व १, जेपाळबीज १, मनशीळ १, पांढरा चंदन १, कुहिरीच्या बीजाचे गोळे १ लसूण १, व जेष्टीमध १ भाग हीं सर्व औषधें कुटून वस्त्रगाळ करून शेळीचे दुधांत भिजवावीं. नंतर निर्गुडीच्या रसाचीं तीन पुटें देऊन गोळ्या मिऱ्याप्रमाणें करून अनुपान योजून द्याव्या. त्याचा प्रकार—१ वातशूळ, खोकला, श्वास व क्षय यांस आल्याचा रस, मध व पिंपळी यांत किंवा मुळ्याचे पाल्याचे रसांत द्यावी.—केश काळे होण्यास मधांत अथवा दुधीचे रसांत द्यावी.–ज्वर व पोटशूळ यांस शेवग्याचे मुळाचा रस व गाईचें तूप यात.—अजीर्णास दह्याचे निवळीत अथवा निर्गुडीचे रसांत.—पांडुरोगास पुनर्नव्याचे काढ्यांत.–पित्तज्वरास जिरें व खडीसाखर यांत.–विषास तांदुळाचे धुवणात—अस्थिगत वायूस वेखंड, देवदार व कोष्ठ यांचे काढ्यांत—पुरुषत्व येण्यास गोमूत्रांत—विरेचनास आल्याचा रस व मध यांत–मूळव्याधीस जायफळांत–कंबरेच्या वायूस वेखंड आणि ओंवा यांत—श्वास व खोकला यांस आडूळशाचा रस व मध यांत—अजीर्णज्वरास माक्याचे रसांत—पित्तास व पित्तज्वरास आंवळकठींत—वातरक्तास पिंपळमूळांत–कर्णरोग, मस्तकशूळ व अर्धशिशी यांस जायफळांत—प्रसूतीवायूस तुळशीचा रस व मध यांत—अतिसारास दह्यात—वांति होण्यास एरंडबीजाबरोबर—मंदाग्नीस टांकणखारांत–ऊर्ध्वश्वासास त्रिफळ्यांत–कांति वाढण्यास विड्यांत–शीतज्वरास धोत्र्याचें बीज आणि जिरें यांत–सन्निपातास ओंव्यांत—गुल्मास दुधीचे रसात अथवा चुन्याचे निवळींत—वायूस तुपांत अथवा शेळीचे दुधांत किंवा त्रिफळ्याचे काढ्यात अथवा माक्याचे रसांत–प्रमेहास गाईचे दुधांत–धातुविकारास गोखरूचे काढ्यांत–धातुवृद्धीस तुपांत—पूयम्यास निर्गुडीचे रसांत–तीडिकपर्म्यास सुपारीचे काढ्यांत—ढाळ होण्यास एरंडेलांत—विंचवाचे विषास आल्याचे र-

सांत—घाम फार येत असल्यास माक्याचे रसांत—खर पडत असल्यास शेळीचे दुधांत—उदरास त्रिफळेचा काढा व एरंडेल यांत—ज्वर व मूत्रकृच्छ्र यांस उटकटारीचे मुळाचे काढ्यांत—सुजेस कांद्याचे रसांत—सर्व उदरास पिलूचे रसांत—पित्तवायूस जिरें व मध यांत—गर्भधारणास गोपीचंदन, तवकीर व सुंठ यांत किंवा गोखरूचे चूर्णांत—मूळव्याधीस जाईचे पाल्याचे रसांत—कुत्र्याचे विषास तांदुळजाचे रसांत—कुष्ठास गुळवेलीचे काढ्यांत अथवा गोमूत्रांत—उन्मत्त वायूस आंवट चुक्याचे रसांत-सर्पाचे विषास गाईचे तुपांत किंवा तांदुळजाचे रसांत अथवा लिंबाचे रसांत उगाळून दंशस्थानीं लेप करावा—ज्वरास तुळशीचे रसांत—रातांधळयास स्त्रीचे दुधांत उगाळून अंजन करावें. लुंतीस माक्याचे रसांत उगाळून सर्व अंगास लेप करावा.—दांताचे किडीस वावडिंगांत गोळी करून दाताखाली धरावी.—भूतसंचारास निंबाचे रसांत अथवा निर्गुडीचे रसांत अंजन करावें—खरजेस गोमूत्रांत उगाळून लेप करावा.

१० **अश्विनीकुमार रस**—वचनाग १, मिरीं १, सुंठ १, त्रिफळा ३, पिंपळमूळ १, पिंपळी १, अफू १, जेपाळाचें बीज १, हरताळ १, टांकणखार १ व लंवगा एक भाग, या औषधाचें चूर्ण करून त्यांत पारा १ व गंधक १ भाग यांची कज्जली मिळवून खलावें. नंतर गाईचे अर्धाशेर दुधांत खलावें. घट्ट झालें ह्मणजे त्यांत अर्धाशेर गोमूत्र घालून पुनः खलावें. याप्रमाणेंच माक्याच्या रसाची भावना द्यावी. नंतर चण्याएवढ्या गोळ्या कराव्या. हें रसायन सर्व रोगांवर अनुपान योजून द्यावें. (अनुपान प्रकरण पहा.)

११ **आनंदभैरवी**—वचनाग १, त्रिकटू ३, टांकणखाराची लाही १, ताम्रभस्म १, धोत्र्याचें बीज १, हिंगूळ, १ व गंधक १, हीं सारी औषधें एक प्रहर खलून मग भांगेचा काढा व आलें याचे रसांत एक दिवस भावना द्यावी. नंतर चण्याप्रमाणें गोळ्या कराव्या. आणि रुईचे मुळाचे काढ्यात त्रिकटूची पूड घालून त्यांत ती एक गोळी द्यावी ह्मणजे शीतगात्र सन्निपात दूर होतो.

१२ **इच्छाभेदीरस**—पारा १, गंधक १, टांकणखार १, मिरी १, सुंठ १ व जेपाळ २ भाग, निंबाचे रसात खल करून वालप्रमाण गोळी चिमूटभर साखरेंत द्यावी. वर जितक्या गुळण्या कराव्या तितके ढाळ होतील. हें रेचक ज्वरादिकांवर फारच चांगलें आहे.

१३ **उदयभास्कर**—पारा १, गंधक २, ताम्रभस्म ८, शिलाजीत ३, हरताळभस्म २, त्रिकटू ३ व वचनाग २ भाग, हीं एकत्र करून निर्गुडी, आलें, माका, आणि टाकळा या प्रत्येकाच्या रसांत सात सात दिवस मर्दन करून गुंजप्रमाण गोळ्या कराव्या. एक गोळी आल्याचा रस व त्रिकटूचें चूर्ण यांत द्यावी, ह्मणजे पांडुरोग, कामला, सूज, अग्निमांद्य, त्रिदोषज्वर, प्रमेह, प्लीहा, जलोदर, संग्रहणी, कोड व धनुर्वात यांचा नाश होतो.

१—सर्व अंगावर कोरड्या खर्जेप्रमाणें दादर उठतो आणि त्यास फार खाज सुटत असती.

१४ **उदयादित्य रस**—पारा १ भाग व गंधक २ भाग घेऊन कोरफडीचे रसांत दोहोंना एक दिवस खलून त्यांचा गोळा करून मडक्यांत ठेवून पाऱ्याचे दुप्पट शुद्ध केलेलें तांबें घेऊन त्याची वाटी करून त्या गोळयावर उपडी घालून त्याचे सधीला गोवऱ्यांची राख दडपून गाईचें शेण व पाणी एका जागीं कालवून त्या वाटीला थोडा लेप करून तें मडकें चुलीवर ठेवून त्या खाली मोठ्या अग्नीचा जाळ दोन प्रहरपर्यंत करावा. मग थंड झाल्यावर बाहेर काढून खलांत घालून त्याला पुटें द्यावयाची औषधें. काळा उंबर, चित्रक, त्रिफळा, वहाव्याच्या शेंगेंतला मगज, वावडिंग, बांवच्या, या आठ औषधांचा निरनिराळा काढा करून प्रत्येकात एकेक दिवसपर्यंत खल करून तें रसायन कोरडें करावें. हा रस दोन गुंजाप्रमाण बांवच्या एक तोळा व खैराची साल दोन तोळे घेऊन त्याचा काढा करून त्यात बावच्यांचें चूर्ण ४ मासे घालून त्यांत द्यावा. अथवा गाईचे दूधांत अथवा त्रिफळ्याचे काढ्यांत द्यावा; तेणेंकरून विचर्चिका रोग, दाह, कुष्ठ, वातरक्त, हे रोग दूर होतात. हा उदयादित्य रस तीन दिवस घेतल्यानंतर यापासून चवथे दिवशीं अथवा सातवे दिवशीं ज्या मनुष्याला पांढरें कुष्ठ आहे त्याचे अंगावर फोड उत्पन्न होतात. ते बरे होण्याविषयीं काळी निर्गुडी, गुंजा, हिराकस, धोतरा, हंसपादि, सूर्यफूल व चुका, या सात औषधांच्या मुळया समभाग घेऊन बारीक वांटून त्यांचा त्या फोडाला सात दिवसपर्यंत लेप नित्य करीत जावा. तेणेंकरून फोड बरे होऊन पांढरें कोड साध्य किंवा असाध्य असलें तरी दूर होतें, यात संशय नाही. लेपाचा दुसरा प्रकार असा आहे की, गुंजा व चित्रकमूळ यांचें बारीक चूर्ण करून पाण्यांत कालवून अंगाला लाविलें असता अथवा मनशीळ आणि आघाड्याची राख हीं, दोन्ही पाण्यांत खलून अंगाला लेप केला असतां पांढरें कोड दूर होतें.

१५ **उन्मत्तरस**—पारा १ भाग, गंधक १ भाग, व त्रिकटू दोहोंचे समभाग घेऊन सारी एक जागीं धोत्र्याचे फळाचे रसांत एक दिवस खलून वाळवून पूड करावी. याची पूड ज्या मनुष्यास सन्निपात होतो त्या मनुष्याचें नाकांत फुंकावी. व दोन गुंजा प्रमाण आल्याचे रसांत भक्षणास ही द्यावी तेणें करून सन्निपात दुर होतो.

१६ **एकांगवीर**—गंधक, पारदभस्म, लोहकांतभस्म, वंगभस्म, नागभस्म, ताम्रभस्म, अभ्रकभस्म, तिख्याचें भस्म व त्रिकटू, हीं सर्व एकत्र करून त्याला त्रिफळ्याचा काढा, त्रिकटूचा काढा, निर्गुडीचा रस, आल्याचारस, चित्रकमुळाचा काढा, शेवग्याचे सालीचा रस, कोष्ठाचा काढा, आंवळकठीचा काढा, कुचल्यांचे बियांचा काढा, रुईचे मुळाचा काढा, आणि काडवेलीचा काढा या प्रत्येकाच्या तीन तीन भावना द्याव्या व मात्रा गुंज प्रमाण आल्याचा रस व मध यांत द्यावी; ह्मणजे पक्षाघात, धनुर्वात, अर्धांगवायु, गृध्रसी, विश्वाची, अवबाहुक आणि सर्व प्रकारचे वातरोग यांचा नाश होतो. यात संशय नाही.

---

१—लाल लाजाळू.

**१७ कल्पतरु**—पारा १, गंधक २, रौप्यभस्म १, सुवर्णमाक्षिकभस्म १, ताम्रभस्म २, लोहभस्म २, टांकणखार १, हिंगूळ १ व मनशीळ २ भाग, हीं सर्व औषधें एकत्र करून निंबाचे रसांत खल कारावा. आणि सूर्यपुटें तीन द्यावीं. मात्रा गुंज प्रमाण तीन मासे बावंचीचे चूर्णात द्यावी व वर थोडें उष्णोदक प्यावें; ह्मणजे नाना प्रकारचीं कुष्ठें जातात क्षय, ज्वर, धातुगतज्वर यावर मध पिंपळींत द्यावी. हिरडेदळ व गूळ यांत दिली असतां शूळ, आमवात, सूतिकावात, उन्माद व पांडुरोग यांचा नाश होतो. याशिवाय सर्व रोगांवर आल्याचा रस किंवा दुसरें एखादें अनुमान योजून द्यावी. ही योगवाही आहे. ( अनुपान प्रकरण पहा. )

**१८ कनकसुंदररस**—पारा, बचनाग, गंधक, टांकणखार, सुंठ, मिरीं, पिंपळी व जायफळ ही सर्व औषधें समभाग घेऊन त्यांचें बारीक चर्ण करावें व त्यास माक्याचे रसाचीं २१ पुटें द्यावीं व गुंज प्रमाण गोळी बांधावी व अनुपान योजून द्यावी. संग्रहणीस साखरेंत—प्रमेहास शेळीचे दुधांत—पिशाच बाधेस निंबाचे रसांत पित्तज्वरास आल्याचे रसांत—बद्धकोष्ठास गुळांत—अजीर्णास सोनामुखीचे चूर्णात.—उन्हाळ्या लागल्यास चिंचेचे पाण्यांत.—वलिपलितरोगास दुधीचे रसात.—विषास निंबाचे रसांत उगाळून अंजन करावें.—पुष्टतेस मधांत.—मस्तकशूळास लिकटूचे काढ्यांत.—पोटशूळास शेवग्याचे सालीचा रस व तूप यांत. विंचवाचे विषास लिंबाचे रसांत अंजन करावें.—अजीर्ण व पोट फुगत असल्यास रात्रीं १ गोळी विड्यांत खावी.—श्वासास जिऱ्याचे चूर्णात देणें.—अतिसारास ह्मशीचे शेणाचे रसांत.—बहुमूत्रास खैराचे काढ्यांत.—तिडीक प्रमेहास सुपारीचे काढ्यांत.—सर्व प्रकारचे वायूस मोचरसाचे चूर्णात देणें.

**१९ कामेश्वर**—जायफळ, अक्कलकाला, काळ्या धोत्र्याचें बीज, जाईचीं फुलें, अफू, बचनाग, व हिंगूळ ही औषधें समभाग घेऊन चूर्ण करून खसखशीच्या काढ्यांत खल करावा. गुंजप्रमाण गोळी साखरेशीं द्यावी. व वर थोडें आटीव दूध प्यावें; ह्मणजे शतस्त्रियांशीं रति करण्याचें सामर्थ्य येतें.

**२० कालकूटरस**—बचनाग ११, पारा ३, गंधक ९, मनशीळ ६, ताम्रभस्म ४, टांकणखार ६, हरताळभस्म ९, चित्रक ९, त्रिकटू १२, त्रिफळा १२, हिंग १, आणि वेखंड १ भाग, या सर्वांची कज्जली करून आल्याचा रस, चित्रकमूळाचा काढा, निंबाचा रस, लसुनीचा रस, भारंगमूळाचा रस अथवा काढा, रुईचे मुळाचा काढा, कळलावी कंदाचा काढा, धोत्र्याच्या मुळाचा रस, विड्याचे पानाचा रस, शेवग्याचे सालीचा रस, पंचकोलाचा काढा आणि पंचमूळाचा काढा याप्रमाणें काढे व रस यांच्या निरनिराळ्या भावना द्याव्या. गोळी गुंजप्रमाण आल्याचा रस व मध यांत द्यावी; ह्मणजे सर्व प्रकारचे ज्वर, मोठाही सन्निपातज्वर यांचा नाश होतो. ज्वरांत तांबूल खावा, स्नान करावें, थंडगार पाणी प्यावें चंदनाची उटी अंगास लावावी, दहीभात खावा. असा या कालकूटाचा परा-

क्रम आहे. ही मात्रा भक्षण केल्यावर थंड पाणी व शीत उपचार बाधत नाहीत.

२१ कुसुमाकररस—सुवर्णभस्म १, अभ्रकभस्म १, रौप्यभस्म १, प्रवाळभस्म १, मौक्तिकभस्म १, सुवर्णमाक्षिकभस्म २, व रससिंदूर ७ भाग यांचा खल करून गाईच्या दुधाच्या भावना दोन दिवस आणि माक्याच्या भावना दोन दिवस देऊन मात्रा गुंजप्रमाण प्रातःकाळी व गुंजप्रमाण रात्रीं अनुपान योजून द्यावी; ह्मणजे नानाप्रकारचे मेह, व्रण, भगंदर, अनेक प्रकारचे ज्वर, मूत्रकृच्छ्र व ८० प्रकारचे वातरोग यांचा नाश होतो. हा रस कश्यपऋषीनें सांगितला आहे. ( अनुपान प्रकरण पाहा.

२२ कुमुदेश्वर रस—पारा, गंधक, व अभ्रकभस्म हीं समभाग; त्याचे निमा हिंगूळ, त्याचे निमें—मनशीळ व सर्व औषधाचे निमें लोहभस्म हीं सर्व खलांत घालून शतावरीच्या रसाच्या चवदा भावना द्याव्या; ह्मणजे हा रस सिद्ध झाला, हा साखर व मिरें याबरोबर दोन किंवा तीन गुंजा प्रातःकाळीं इष्ट देवतेचें पूजन करून अनुपान योजून घ्यावा. ह्मणजे उग्रक्षय, वात, पित्त, कफरोग; आणि ज्वरादिक संपूर्ण रोगांचा नाश करितो. जसा विष्णु दैत्यास मारतो तसा, हा रस संपूर्ण रोगांचा नाश करितो. या रसाचें सतत सेवन केल्यानें वलीपलित नाश पावतें. ( अनुपान प्रकरण पहा. )

२३ गर्भपालरस—सुंठ १, मिरीं १, पिपळी १, दालचिनी १, तमालपत्र १, वेलची दाणे १, धणे १, जिरें १, शहाजिरें १, चवक १, मनुका १, देवदार १, शिसेंभस्म १, वंगभस्म १, हिंगूळ १, व लोहभस्म ॥. भाग या सर्व औषधांचा विष्णुक्रांताचे रसांत सात दिवस खल करावा; मात्रा गुंजप्रमाण मनुकाचे काढ्याशीं गर्भिणीला प्रथम मासापासून नऊ मासपर्यंत द्यावी; म्हणजे गर्भिणीचे सर्व रोग दूर होतात. व गर्भाचें उत्तम रीतीनें पोषण होतें; यांत संशय नाहीं.

२४ क्रव्यादरस—पारा ४, गंधक ८, ताम्रभस्म २, लोहभस्म २ भाग हीं सर्व एकत्र खलून लोखंडी कढईत घालून ती चुलीवर ठेवावी. पाणी झालें म्हणजे एरंडाच्या पानावर पर्पटी ओतावी, निवाल्यानंतर ती पर्पटी खलून निंबाचे रसाची भावना द्यावी; नंतर पंचकोलाचे काढ्याची भावना द्यावी; नंतर टांकणखार, बिडलोण, मिरीं, हीं तोळा तोळा घालून सर्व एकत्र करून हरबऱ्याच्या आंबीच्या सात भावना द्याव्या, गोळ्या दोन माशाच्या बाधाव्या. त्या सैंधव आणि ताक यात द्याव्या ह्मणजे कसेंही गुरुअन्न भक्षिलें असलें तरी चार घटिकांत जिरून जातें. व अजीर्ण आणि मोडशी यांचा त्वरित नाश होतो.

२५ गलतकुष्ठारीरस—पारा, गंधक, ताम्रभस्म, लोहभस्म, गुग्गुळ, चित्रक, शिलाजीत व कुचल्याच्या बिया, ही सर्व एकेक भाग, त्रिफळा तीन भाग, अभ्रक

चार भाग, व करंजाच्या बिया चार भाग या सर्व औषधांचा एकत्र खल करून त्यास मधाची भावना एक व तुपाची भावना एक देऊन तुपाचे रावलेले मडक्यांत भरून ठेवावें. सहा मासे प्रमाण दररोज मधात घेत जावें. याला पथ्य. शाल्योदन, दूध, मध, साखर आणि तूप. याप्रमाणें औषध घेऊन पथ्य केलें असतां ज्याचे कान, नाक, बोटें वगैरे गलत्कुष्ठानें सडली असलीं तरी मदनासारखा सुंदर होईल. स्त्रीसंग वर्ज्य करावा. व कुष्ठव्याधि फार असला तर पथ्य नुस्ता भात व पाणी, दुसरें कांहीं खाऊं नये.

२६ **ग्रहणीगजकेसरी**—पारा, गंधक, अभ्रकभस्म, लोहभस्म, हिंगूळ, वाळवेल, बचनाग, त्रिकटू, भांग, नागरमोथे, डाळिंबाची साल, इंद्रजव, जायफळ, मोचरस, अतिविष, धायटीचें फुल, कवठ, ओंवा, चित्रक, टांकणखार, सागरगोट्याचा मगज, हीं सर्व समभाग व अफू व सर्वांच्या समान धोत्र्याच्या रसांत भावना देऊन गोळ्या तुरीप्रमाणें बांधाव्या व एक गोळी द्यावी. तेणेंकरून अतिसार, संग्रहणी, अग्निमांद्य, शूळ, पांडु, इत्यादि रोग बरे होतात. अनुपान ताक किंवा दधिमंड.

२७ **ग्रहणीवज्रकपाटरस**—माक्षिकभस्म १, मौक्तिकभस्म १, सुवर्णभस्म १, गंधक २ पारा ३ भांग यांचा केवठाच्या रसांत खल करावा. नंतर तें औषध हरिणाच्या शिंगांत भरून मध्यम पुट द्यावें, मग त्यांतून काढून चिकण्याच्या काढ्यांत किंवा रसांत सात दिवस भावना द्याव्या, आघाड्याच्या रसाच्या भावना तीन, लोध्र, अतिविष, नागरमोथे, धायटीचें फूल, इंद्रजव, गुळवेल, या प्रत्येकांच्या तीन तीन भावना द्याव्या; त्याची उडदाएवढी गोळी करावी. मिरपूड आणि मध यांत द्यावी, तेणेंकरून सर्व प्रकारचा अतिसार आणि संग्रहणी बंद होऊन अग्नि प्रदीप्त होतो.

२८ **गुंजागर्भरस**—पारा १ तोळा, गंधक ४ तोळे, गुंजा, बचनाग, लिंबोळ्या, व भांग हीं प्रत्येक तीन तीन मासे आणि जेपाळ १ मासा, हीं एकत्र करून जाई, लिंबू, धोत्रा व भांग यांच्या रसांत एकेक दिवस खलावें. नंतर वालप्रमाण गोळ्या करून ठेवाव्या. एक गोळी तूप, हिंग व सैंधव यांच्याबरोबर सेवन केली असतां ऊरुस्तंभाचा नाश करिते. याला दहीं आणि भात हें पथ्य द्यावें.

२९ **गंधक रसायन**—शुद्ध गंधक घेऊन त्यास गाईचें दूध, चातुर्जाताचा काढा, गुळवेलीचा अंगरस आणि काढा, सुंठीचा काढा, त्रिफळ्याचा काढा व माक्याचा रस यांची पृथक् पृथक् एकेक भावना द्यावी. शेवटीं आल्याचे रसाची एक भावना देऊन गुंजप्रमाण गोळी साखरेंत द्यावी; म्हणजे मंदाग्नि, कंडू, पामा, विषदोष, पाडु, अंडवृद्धि, जीर्णज्वर सर्व प्रकारचे प्रमेह, वातामय, धातुक्षय, शूल, कोष्ठगतवात, अठरा प्रकारचीं कुष्ठें, व क्षयरोग हे दूर होऊन धातूची वृद्धि होते व बल प्राप्त होतें.

३० घोडाचोळी—पारा, बचनाग, गंधक, हरताळ, टांकणखार, व जायफळ बीज ही एकेक भाग आणि त्रिकटू व त्रिफळा तीन तीन भाग घेऊन त्यांचा माक्याच्या रसांत २१ दिवस खल करून दोन गुंजाप्रमाण गोळ्या कराव्या. ह्या अनुपान प्रकरणांतील अनुपान योजून द्याव्या.

३१ चंद्रप्रभावटी—पारा, सुवर्णभस्म, ताम्रभस्म, कांत व मोचरस, हीं समभाग कांटेसावरीचे मुळाचे रसांत दोन प्रहर खल करावा. मात्रा अर्ध गुंजप्रमाण करावी. ती ३ मासे जिऱ्याचे चूर्णात द्यावी; म्हणजे त्रिदोषापासून जरी अतिसार असला तरी त्याचा व ज्वराचा नाश होतो.

३२ चंद्रकला—पारा १, गंधक १, अभ्रकभस्म १, हिंगूळ १, कुटकी १, गुळवेलींचें सत्व १, पित्तपापडा १, पिंपळी १, चंदनचूर १, कावळी १, वाळा १, व मनुका १ भाग या सर्वांची कज्जली करून नागरमोथे, दाळिंब साल, दूर्वा, केवड्याचें कणीस, दूध, सहदेवी, कोरफड, पित्तपापडा, सबजा, आणि शतावरी इतक्यांचे यथासंभव रस व काढे करून त्याच्या निरनिराळ्या भावना द्याव्या मात्रा वालप्रमाण जिरें, खडीसाखर व दूध किंवा रोग अवस्था पाहून अनुपान योजून द्यावी. म्हणजे नवज्वर, दाहपूर्वकज्वर, विषमज्वर, प्रदर, मेह, भ्रम व वांति इत्यादिकांचा नाश होतो.

३३ चिंचाशंखवटी—चिंच, निवडुंग, व रुई यांचे क्षार चार चार तोळे, शंखभस्म आठ तोळे, हिंग भाजलेला २ तोळे, सैंधव ४ तोळे, पादेलोण ४ तोळे, कांचलोण ४ तोळे, बीडलोण ४ तोळे, सांबरमीठ ४ तोळे, द्रोणीचें मीठ ४ तोळे, नुस्तें मीठ ४ तोळे, सोरा ४, सज्जीखार २, जवखार २ तोळे, याप्रमाणें भाग घेऊन चूर्ण करावें. आणि इडनिंबाच्या रसांत खलावें. नंतर चित्रकमुळाच्या काढ्यात तीन दिवस खलावें. नंतर माका, निर्गुडी, गोखरमुंडी व आलें यांचे रसांत एकेक दिवस निराळें खलावें. नंतर बोराच्या आठीप्रमाणें गोळी करून प्रातःकाळी नुस्ती एक भक्षण केली असतां पांच प्रकारचे गुल्म, सर्व प्रकारचे शूल, अजीर्ण, विषूचिका, मंदाग्नि व संग्रहणी याचा शीघ्र नाश होतो.

३४ ज्वरराज रस—पारा १, सुवर्णमाक्षिक १, मनशीळ २, गंधक ३, मुसळी १०, ताम्रभस्म ९ भाग व ३ बिबवे, या सर्वांचा एक जागीं खल करून निवडुंगाचे रसांत भिजवून शरावांत ठेवून मातकापड करून वाळल्यावर चार प्रहर अग्नि द्यावा. स्वांगशीत आल्यावर चांगलें खलून ठेवावें. चार गुंजा विड्याचे पानांशीं द्यावें; म्हणजे अष्टविध ज्वर शांत होतात. प्रातःकाळी औषध घेऊन पथ्य ताकभात खावा, ह्या वरच्या औषधांत एक भाग मोर्चूत घालून तयार केलें तर चातुर्थिक ज्वरावर उपयोगीं पडतें. हें औषध सेवन केल्यावर थंड पाणी सेवन केलें असतां बाधत नाही.

३५ **ज्वरांकुश**—पारा, गंधक, बचनाग, काळ्या धोत्र्याचें बीज, सुंठ, मिरीं, पिंपळी हीं सर्व समभाग घेऊन एकत्र चूर्ण करून त्यांस निवडुंगाच्या चिकाच्या ३ भावना द्याव्या. नंतर त्रिकटूच्या काढ्याच्या ३ भावना देऊन गोळी गुंजप्रमाण बांधावी. अनुपान आल्याचा रस व मध याप्रमाणें ३ गोळ्या ३ दिवस दिल्या असतां ऐकाहिक, द्व्याहिक, त्र्याहिक, चातुर्थिक व सर्व विषमज्वरांचा नाश होतो. यांत संशय नाहीं.

३६ **ज्वरांकुशरस**—हरणाचें शिंग आणून त्याचे बारीक तुकडे करून मडक्यांत ठेवून त्यांत भार[1]जांभळीचा रस घालून त्याचे तोंडावर दुसरें लहान मडकें उपडें घालून कापडमाती करून चुलीवर ठेवावें आणि दोन प्रहरपर्यंत अग्नि द्यावा. मग थंड झाल्यावर त्या तुकड्याचें भस्म होतें तें बाहेर काढून त्याचा आठवा हिस्सा सुंठ मिरे व पिंपळी, याचें चूर्ण करून त्या भस्मांत तें मेळवून तें चूर्ण चार मासे विड्याच्या पानाच्या रसातून घ्यावें; तेणेंकरून सर्व ज्वर दूर होतात. परंतु विशेषेंकरून वातपित्तज्वर दूर होतो.

३७ **जीर्णज्वरांकुश**—पाऱ्याचें भस्म, अभ्रकभस्म, शिशाचें भस्म, ताम्रभस्म, कांतलोहभस्म, वैक्रात मण्याचें भस्म, हिंगूळ, टांकणखार, गंधक, बचनाग, कोष्ठ, व कुळिजन हीं औषधें समभाग घेऊन त्रिकटू, त्रिफळा, व नागरमोथे, यांचा काढा व माका आणि निर्गुडी यांच्या रसाच्या तीन तीन भावना द्याव्या. मात्रा गुंजप्रमाण अनुपानाशीं द्यावी; ह्मणजे जीर्णज्वर, क्षय, खोकला, त्रिदोष, मंदाग्नि, पांडुरोग, हालीमक, गुल्म, उदर, आर्दितवायु, संग्रहणी, शूल, व अरुचि यांचा नाश होतो. व कांति, तेज, बलपुष्टि, वीर्यवृद्धि यांना वाढवितो. व असाध्य जरी रोग असले तरी त्यांचा नाश करितो. (अनुपान प्रकरण पहा.)

३८ **तालकेश्वररस**—ज्या हरताळाचे अभ्रकासारखे पत्रे सुटतात तो पत्र्या हरताळ घेऊन पुनर्नव्याच्या स्वरसात एक दिवस खल करावा. दाट झाला ह्मणजे त्याची वडी करावी ती उन्हांत चांगली वाळवावी. नंतर पुनर्नव्याचे पंचांगांची राख घेऊन तिनें मडकें गळ्यापर्यंत भरावें. नंतर त्याजवर ती चक्रिका ठेवून वर दुसरी पुनर्नव्याची राख घालावी आणि तोंड बंद करून सुकवावें. नंतर चुलीवर ठेवून खाली पांच अहोरात्र तीव्राग्नि द्यावा; स्वांगशीत झाल्यावर तें भस्म काढून घ्यावें. व बलाबल पाहून गुंजप्रमाण गुळवेलीच्या काढ्याशी द्यावें; ह्मणजे उपद्रवासहित वातरक्त, अठरा प्रकारची कुष्ठें, फिरंगोपदंश, विसर्प, मंडल, कंडू, व खरूज यांचा नाश होतो. क्षार, आंबट, तिखट, शेक व ऊन घेणें. हे वर्ज करावे व पथ्य वातरक्तावरची करावी.

३९ **त्रिपुरभैरव**—गंधक १०, पारा १०, हिंगूळ १०, नवसागर १, र-

---

१—कटूरी जाभळ जिला लहान लहान वाटोळीं जाभळें येतात तीं.

सकापूर १०, व तुरटी ९ भाग, घेऊन सर्वांची कज्जली करून पूर्णचंद्रोदयाप्रमाणें एक भट्टी लावून रसायन तयार करावें. अग्नि सोळा प्रहर द्यावा. स्वांगशीत झाल्यावर मात्रा गुंजप्रमाण आल्याचा रस व मध यांत किंवा नुस्ते तुपांत द्यावी; ह्मणजे पक्षाघातादि सर्व प्रकारचे वायू व उपदंश यांचा नाश होतो.

४० **त्रैलोक्यचिंतामणी**—पारदभस्म, हिऱ्याचें भस्म, सुवर्णभस्म, रौप्यभस्म, कांतभस्म, अभ्रकभस्म, गंधक, मौक्तिकभस्म, शंखभस्म, प्रवाळभस्म, हरताळभस्म, मनशीळ हीं सर्व औषधें शुद्ध व समभाग घेऊन चित्रकाचे मुळाच्या काढ्यांत सात दिवस चांगला खल करावा. नंतर रुईच्या चिकांत तीन दिवस खल करावा. आणि पिवळ्या कवड्या घेऊन त्यामध्यें तें औषध भरावें. नंतर रुईच्या चिकामध्यें टांकणखार खलून त्या कवडयांचीं तोंडें लिपावीं. नंतर त्या शरावांत ठेवून मातकापड करून गजपुट द्यावें, स्वांगशीत झाल्यावर त्या कवड्यांसकट खलून चूर्ण करावें. त्या चूर्णाबरोबर रससिंदूर व रससिंदुराच्या चतुर्थांश वैक्रांत मण्याचें भस्म घालून, शेवग्याच्या मुळाच्या रसाच्या सात भावना द्याव्या. नंतर चित्रकमुळाच्या काढ्याच्या एकवीस भावना द्याव्या. मग आल्याच्या रसाच्या सात भावना द्याव्या आणि त्याची बारीक कज्जली करून त्याच्या चतुर्थांश टांकणखार घालावा. टांकणखाराच्या चतुर्थांश वचनाग घालावा. आणि मिरेंही वचनागाबरोबर घालावीं. नंतर लवंगा, सुंठ, बाळहिरडे, पिंपळी, जायफळ, हीं प्रत्येक औषधें बचनागाचे चतुर्थांश टाकावीं. आणि तें सर्व औषध महाळुंग आणि आलें यांच्या रसांत खलावें. या औषधाची मात्रा चार गुंजाप्रमाण मात्र अनुपान योजून भक्षावी. मागून मध व पिंपळी चाटावी; म्हणजे रोगाची शांति होते. अग्नि प्रदीप्त होतो. बळ वाढतें, कांति व वीर्य याची वृद्धि होते. विषरोग शमतो, वायू, विद्रधि, पांडु, शूळ, प्रदर, रक्तातिसार, मेह, प्लीहा, जलोदर, मूतखडा, सूज, हलिमक, उदर, मूत्रकृच्छ्र, भगंदर, ज्वर, मूळव्याध, कुष्ठ,इत्यादि साध्य व असाध्यरोग हे दूर होतात. ( अनुपान प्रकरण पहा. )

४१ **त्रैलोक्यडंबर**—पारा, गंधक, ताम्रभस्म, लोहभस्म, अभ्रकभस्म, बचनाग, टांकणखार, सज्जीखार, हिंगूळ, कवडीचें भस्म, हीं सर्व समभाग घेऊन रुई, व निवडुंग यांचा चिक, निर्गुडी, माका व आलें यांच्या रसाच्या निरनिराळ्या भावना द्याव्या. मात्रा वालप्रमाण अनुपान योजून द्यावी; ह्मणजे गुल्म, जलोदर, सूज, पांडुरोग, क्षय, शूळ, विषूचिका, यांचा २१ दिवसांत नाश होतो. ( अनुपान प्रकरण पहा. )

४२ **दरदसिंदूर**—पारा ९, रसकापूर ९, हिंगूळ ४॥, गंधक ९॥ भाग या सर्वांची कज्जली करून काचकुपीत भरून वालुकायंत्रांत क्रमवृद्धीनें सोळा प्रहर अग्नि द्यावा. स्वांगशीत झाल्यावर काढून ठेवावी. मात्रा गुंजप्रमाण ताकांत द्यावी; ह्मणजे सर्व प्रकारचे वातरोग, ज्वर व सन्निपातादिरोग हे शांत होतात.

**४३ दुर्जलघ्नीरस**—बचनाग २, कवडीभस्म ४, व मिरें ९ भाग यांचा, आल्याच्या रसांत खलकरून मात्रा वालप्रमाण अनुपान योजून द्यावी,ह्मणजे अजीर्ण, पोट फुगणें, मलावष्टभ, शूल, दमा, खोकला व दुर्जलापासून उत्पन्न झालेले ज्वर हे दूर होतात. ( अनुपान प्रकरण पहा. )

**४४ धातुज्वरांकुश**—लोहभस्म, अभ्रकभस्म, ताम्रभस्म, पारा, गंधक, बचनाग, त्रिकटू, त्रिफळा, कोष्ठ, व कोळिंजन, हीं सर्व समभाग एकत्र खलून माका, आलें व निर्गुंडी यांच्या रसांच्या तीन तीन भावना द्याव्या. मात्रा गुंजप्रमाण रोगोक्त अनुपानाशीं द्यावी म्हणजे सर्व रोगांचा नाश होतो. विशेषेंकरून अजीर्ण, वातकास, आणि सर्व धातुगतज्वर यांचा नाश होतो. हा दीपन असून रुचि वाढविणारा असा आहे. (अनुपान प्रकरण पहा.)

**४५ नारसिंह रस**—शिसें भस्म ४, वंगभस्म ३, पारा १४, गंधक १५, व बचनाग ४ भाग घेऊन यांचा माक्याचे रसांत खल करावा. नंतर चित्रकाचा काढा व आल्याचा रस यांत पृथक् एकेक दिवस खल करावा. नंतर त्याचा गोळा करून शरावसंपुटांत ठेवून वालुकायंत्रीं दोनप्रहर पक्व करावा. मात्रा एक वालप्रमाण अनुपान योजून द्यावी ( अनुपान प्र० पहा ) म्हणजे क्षय, बहुमूत्रता, विद्रधि, श्वास, कास, कास, विषमज्वर, वाळांतरोग, शूल, प्रमेह, सूज, पांडुरोग, व गळरोग यांचा नाश होतो. यांत संशय नाही.

**४६ नित्योदि रस**—अभ्रकभस्म १, लोहभस्म १, ताम्रभस्म १, पारा १ गंधक १ व बिबवे ५ भाग हीं सर्व एकत्र करून सुरणाच्या कांद्याच्या रसांत ३ दिवस खल करावा. मात्रा वालप्रमाण तुपांत द्यावी; म्हणजे असाध्य जरी मूळव्याध असली तरी तिचा नाश होतो व सूज ओसरते.

**४७ नृसिंहवडवानल रस**—पिपळमूळ, त्रिकटू, चित्रक, लसूण, सज्जीखार, जवखार, पापडखार, त्रिफळा, ओंवा, पुनर्नवा, अजमोदा, कोष्ठ, उन्हाळी, पहाडमूळ, गोडा सुरण, खारा सुरण, कांडवेल, किराईत, रेवाचिनी, जिरें, व गजपिंपळी, ही सर्व समभाग आणि दांतीचें मूळ या सर्वांच्या बरोबर, पंचलवणें, तेड, इंद्रजव, हीं सर्व समभाग व जेपाळबीज सर्वांबरोबर आणि सर्वांच्या दुप्पट गूळ घालून गोळ्या बोराच्या आठोळीप्रमाणें बांधाव्या. दररोज एकेक गोळी उष्ण पाण्याशीं द्यावी; म्हणजे आठ प्रकारचीं उदरें, पांच प्रकारचे गुल्म, पांडूरोग, सूज, कावीळ, ३०० प्रकारचे शूल, ८० प्रकारचे वातरोग, १८ प्रकारची कुष्ठें, २० प्रकारचे प्रमेह, अश्मरी, उदावर्त, मूत्रकृच्छ्र, मूळव्याध, अंडवृद्धि, अजीर्ण, ज्वर, कृमि, व विषमज्वर यांचा नाश होतो.

**४८ पंचामृतपर्पटी**—लोहभस्म, अभ्रकभस्म, ताम्रभस्म, व पारदभस्म ही प्रत्येक एक एक तोळा आणि गंधक सर्वांच्या दुप्पट एकत्र खल करून लोखंडाच्या

कढईंत घालून चुलीवर ठेवून खालीं बोरीच्या लांकडाचा मंदाग्नि द्यावा. त्याचा रस झाला ह्मणजे गाईचे शेणावर केळीचें पान पसरून त्याजवर तो रस ओतावा. व लागलींच त्याजवर दुसरें पान बसवावें. थंड झाल्यावर वड्या कापून ठेवाव्या. बलाबल पाहून संग्रहणी, क्षय, अतिसार, ज्वर, स्त्रीरोग, पांडुरोग, कृत्रिम विषजन्यविकार, आम्लपित्त, मूळव्याध व अग्निमांद्य यांचा नाश होतो. हिंग, सैंधव व जिरें याचे चूर्णात संग्रहणीवर द्यावी. पांडु व पित्तजन्य विकार यास नुसत्या जिऱ्याचे चूर्णात द्यावी. व इतर रोगांवर अनुपानें आपले युक्तीनें योजावी. ( अनुपान प्रकरण पहा )

**४९ पुष्पधन्वा रस**—पारदभस्म, नागभस्म, लोहभस्म, अभ्रकभस्म, हीं एकेक भाग धोत्र्याचें बीज ३ भाग ही खलात घालून जेष्टीमधेच्या व कांटेशेवरीचा काढा करून भावना द्यावी. तशीच उसाचे रसाची भावना आणि दुधाची भावना देऊन वालप्रमाण गोळ्या करून तूप, साखर आणि मध यांत द्याव्या आणि वर दूध प्यावें म्हणजे अनेक स्त्रिया संभोगाचें सामर्थ्य येतें. शरीराची कांति चांगली होते. व मेह दूर होतात.

**५० प्रमेहवद्धरस**—पाऱ्याचें भस्म, कांतलोहाचें भस्म, लोहाचें भस्म, शुद्ध केलेला शिलाजीत, सुवर्णमाक्षिकभस्म, मनशीळ, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडे, बेहेडेदळ, आंवळकठी, अंकोल बीज, कवठीच्या फळाचे आंतील बिया, हाळद हीं पंधरा औषधें समभाग घेऊन भस्म खेरीज जीं औषधें आहेत त्यांचें चूर्ण करून तीं भस्में व तें चूर्ण एका जागी करून माक्याचे रसांत खलून वाळवून फिरून माक्याचे रसांत खलून वाळवावें याप्रमाणें माक्याचे रसाचीं २० पुटें द्यावी.—याला प्रमेहवद्ध रस असें ह्मणतात. दोन मासे प्रमाण हा रस मधांत घेतला असतां महान प्रमेह धूर होतात. व बकाण निंबाच्या बिया सहा आणून चूर्ण करून तांदुळाचें धुवण चार तोळे घेऊन त्यांत तें चूर्ण व चार मासे तूप व दोन मासे वरील रस मिळवून घेतला असतां वहुत दिवसांचे प्रमेह असले तरी दूर होतील.

**५१ प्रमेहगजकेसरी**—कातभस्म १, शिशाचें भस्म १, वंगभस्म ३, अभ्रकभस्म ४, शिलाजीत ५, व तरवडाच्या फुलाचें केशर ६ भाग, सर्व एकत्र करून निंबाचे रसात मर्दन करावें. मात्रा गुंजप्रमाण खडीसाखर, तूप, व मध यांशीं द्यावी म्हणजे प्रमेह, सर्व, अंगदाह, मूत्रकृच्छ्र, अश्मरी, साद्रमेह, लालामेह, पित्तमेह, इत्यादि प्रमेह व मूत्रविकार तात्काळ बंद होतात.

**५२ प्रमेहदर्पहारी रस**—रससिंदूर १, रौप्यभस्म १, वंगभस्म १, कांतभस्म १, व अभ्रकभस्म १ भाग, हीं सर्व औषधें खलांत घालून नागरमोथे, आणि त्रिफळा यांचे काढ्यांत खल करावा. सर्व प्रमेहांवर दोन वाल मात्रा खडीसाखर आणि मध यांत द्यावी.

**५३ प्रतापअग्निकुमाररस**—पारा, ताम्रभस्म, गंधक, वचनाग, सुंठ, त्रि-

क्षार, पंचलवणें, यांचा आल्याचे रसांत खल करून कांचेच्या कुपीमध्यें भरून वालुकायंत्रांत मंदाग्नीनें एक दिवस पचवावें. स्वांगशित झाल्यावर त्यांत दशांश बचनाग घालून खलून एक गुंजप्रमाण आल्याच्या रसाशीं सन्निपातावर द्यावा. हा सर्व वातविकार दूर करितो.

५४ प्रलयकालाग्निरस—हिंगुळांतील पारा १, शुद्ध गंधक २, अभ्रकभस्म २॥., गोदंती हरताळ २॥. मनशीळ ३, टांकणखार २, कलखापरी ६, जेपाळ १, बचनाग २, हिंगूळ २, लोहभस्म १, ताम्रभस्म १, हीं सर्व औषधें खलांत घालून रुईच्या चिकानें खलावी. नंतर निर्गुंडी, चित्रक, कोष्ठ, निंबूं, कारलीं यांच्या काढ्यांनीं एक एक भावना द्यावी, नंतर त्या औषधांचा गोळा करून तांब्याच्या करंड्यांत घालून मातकापड करून वालुकायंत्रांत ठेवून दोन प्रहर आंच द्यावी. निवाल्यावर काढून खलून ठेवावें. नंतर त्यांत गंधक, हरताळ, बचनाग, आणि हिंगूळ, ही एकेक भाग घालून पंचकोलाच्या काढ्यानें दोन प्रहर मर्दन करावें. मग दशमुळाच्या काढ्यानें तीन दिवस मर्दावें. मात्रा वालप्रमाण करावी. अनुपान खारकेच्या बीमध्यें विषमज्वरावर, सामान्य ज्वरावर आल्याचा रस, इतर ज्वरावर अनुपान योजून द्यावें. फार दाह झाला तर दूधभात, दहीभात, ताकभात खावा. ताबूल भक्षावा, चंदनाची उटी लावावी, विहिरी, तळीं यांत स्नान करावें. थंडगार पाणी प्यावें, तरी अपाय होणार नाहीं.

५५ प्रवालपंचामृत—मोत्यें, शंख, मोत्याची शिंप, व कवड्या, हीं समभाग, व प्रवाळ दुप्पट व सर्वांबरोबर रुईचा चीक घालून सर्व एकत्र करून बोळक्यांत भरून वर झांकण ठेवून मातकापड करून गजपुट द्यावें, स्वांगशीत झाल्यावर अनुपान योजून द्यावें म्हणजे पोटाची फुगवटी, गुल्म, उदर, प्लीहा, कास, श्वास, अग्निमांद्य, कफवातसंबंधी व्याधि, अजीर्ण, हृद्रोग, संग्रहणी, अतिसार, प्रमेह, मूत्ररोग, मूत्रकृच्छ्र व अश्मरी यांचा नाश होतो. पथ्य चांगलें ठेवून चित्तवृत्ति निर्मळन ठेवावी. ( अनुपान प्रकरण पहा. )

५६ बालज्वरहरचंद्रशेखररस—अभ्रकभस्म, लोहभस्म, ताम्रभस्म, मंडूर, रससिंदूर, टांकणखार, व गोरोचन, हीं समभाग गोकर्णीच्या रसांत एक प्रहर खलून उडदाएवढी गोळी बांधावी. अनुपान परत्वें नानाप्रकारचे ज्वर व लहान बालकाचे सर्व ज्वर नाश पावतात. ( अनुपान प्रकरण पहा. )

५७ बालसूर्योदयरस—पारा १, गंधक १, बचनाग १, ताम्रभस्म २, लोहभस्म २, कवडीभस्म ४, अभ्रकभस्म ५, व मिरीं ६ भाग यांचा दह्याचे पाण्यांत खल करून मात्रा गुंजप्रमाण आल्याचा रस वगैरे अनुपान योजून द्यावी, म्हणजे सन्निपातज्वर, कास, श्वास, वांति, पांडुरोग, प्लीहा, प्रमेह, प्रदर, व मूत्रकृच्छ्र, यांचा नाश होतो. ( अनुपान प्रकरण पहा. )

५८ बालसूर्योदयरस दुसरा—पारा १, हिंगुळ २, गंधक ३, कलखापरी ८, शिसेंभस्म २०, व अभ्रकभस्म ४, हीं सर्व खलांत घालून कोरफडीच्या रसाची शंभर व आल्याच्या रसाची शंभर पुटें देऊन गुंज प्रमाण गोळी दूध, तूप व मध यांतून एकाशी द्यावी ह्मणजे सन्निपातज्वर, जीर्णज्वर, पांडुरोग, वांति एकादशक्षय, भगंदर, मूळव्याध, अपस्मार, उन्माद व कावीळ, यांचा नाश होतो. ( अनुमान प्रकरण पहा.)

५९ बोलबद्धरस—गुळवेलीचें सत्व १, पारा १, गंधक १, व रक्तचाबोळ ३ भाग, यांचा कांटे शेवरीच्या सालीच्या काढ्यांत खल करून मात्रा वालप्रमाण अनुपानपरत्वें द्यावी; ह्मणजे रक्तार्श, पित्तार्श, पित्तविद्रधि, रक्तप्रमेह, रक्तपित्त आणि स्त्रियांचे प्रदर व भगंदर याचा नाश होतो. ( अनुपान प्रकरण पहा. )

६० बृहच्छंखवटी—निवडुंग, रुई, चिंच, आघाडा, केळ, तीळ व पळस, यांचे क्षार चार चार तोळे, मीठ ४, टांकणखार ४, सैंधव ४, बिडलोण ४, व संचळ ४ तोळे, सज्जीखार, यवखार व टांकणखार हे तिन्ही मिळून चार तोळे हे सर्व ६४ तोळे निंबाचे रसांत टाकून नंतर चार तोळे शंखाचे तुकडे तापवून त्यांत टाकावे असे पुन्हां पुन्हां तापवून सात वेळ टाकल्यावर ते त्यांत मिळून जातात. नतर सुंठ १२ तोळे, मिरीं ८ तोळे, पिंपळी ४ तोळे, भाजलेला हिंग २ तोळे, पिंपळमूळ, चित्रकमूळ, ओंवा, जिरें जायफळ व लवंगा ही प्रत्येक दोन दोन तोळे, पारा, गंधक, वचनाग, टाकणखार व मनशीळ ही प्रत्येक एकेक तोळा, याप्रमाणें सर्व एकत्र करून त्यांत सोळा तोळे आंबट चुक्याचा रस किंवा आम्लवेतसाचा रस घालून खलून बोराचे आठीप्रमाणें गोळी बाधावी व सुमारें एक मासा द्यावी; ह्मणजे अजीर्ण, शूळ, विषूची, अलसक यांचा तात्काळ नाश होतो यांत संशय नाही. हें औषध माहामारीवर फारच चांगलें आहे.

६१ भूतभैरव रस—पारा, हरताळभस्म, मनशीळ, लोहभस्म, सुर्मा, ताम्रभस्म व गंधक ही सर्व समभाग शेळीचे मुतांत खलून सर्वाच्या दुप्पट गंधक लोहपात्रांत घालून त्यात पचन करावें नंतर एक मासा तुपात द्यावें; म्हणजे अपस्मार व उन्माद यांचा नाश होईल. हें औषध सेवन केल्यावर त्रिकटू व हिंग यांचें चूर्ण तुपाबरोबर सेवन करावें अथवा मनुष्याचे मूत्रांत पादेलोण घालून द्यावें; सर्व भूतोन्मादांवर धोत्र्याच्या १० बिया आणि तूप यांत द्यावें.

६२ मृगांकरस—सोन्याचे भूर्जपत्रासारखे पातळ पत्रे करून त्याचे समभाग शुद्ध पारा घेऊन एका जागीं काचनाचे रसांत अथवा भारजांबळीचे रसांत जोंपर्यंत एक जागी चागलें मिळून पीठ होईतोंपर्यंत खल करावा. नंतर सोन्याचें चतुर्थांश टाकणखार व सोन्याचे दुप्पट मोत्याचें खल केलेलें चूर्ण व सोन्याचे बरोबर गंधक घेऊन सारी एका जागी खलून एक गोळा करून त्याचे भोंवतें फडकें गुंडाळून त्यांजवर मातीचा लेप करून शरावसंपुटांत घालून मातीचे मडक्यांत मीठ घालून

त्यांत तो शराव ठेवून वरतीं दुसरें मीठ घालून मडक्याचे तोंडावर दुसरें लहानसें मडकें उपडें घालून त्याचे संधीला कापडमाती करून गजपुट अग्नीपेक्षां कांहीं अधिक अग्नि द्यावा. थंड झाल्यावर बाहेर काढून फिरून त्या पाऱ्याचे बरोबर गंधक घेऊन सारें औषध खलांत घालून वरील वनस्पतींचे रसांत पुन्हां खलून गजपुट अग्नि द्यावा. थंड झाल्यावर बाहेर काढून हा पोटलीरस दोन गुंजाप्रमाण आठ मिऱ्यांशीं अथवा ३ पिपळ्यांशी द्यावा. दोषांचें तारतम्य पाहून एक गुंजही द्यावा. जशी दोषांची उपेक्षा असेल तसा तुपांत अथवा मधांत द्यावा. अंतःकरण स्वस्थ करून शुचिर्भूत होऊन लोकनाथासारखें पथ्य करावें. याप्रमाणें आचरण केलें असतां या रसायनापासून कफरोग, संग्रहणी, कास, श्वास, क्षयरोग, आवढणें, शरीराची कृशता व बलहानी, हे रोग दूर होतात.

६३ **मृतसंजीवनीरस**—हिंगूळ ३ भाग, बचनाग २ भाग, टांकणखार, व जेपाळ एकेक भाग, यांचा आल्याच्या रसांत दोन प्रहर खल करावा. नंतर रुईचा चिक व शतावरीचा रस याची एकेक भावना द्यावी. वालप्रमाण मात्रा अनुपान योजून द्यावी; म्हणजे वातरोग व ऊरुस्तंभ, आमवात, संग्रहणी, अर्श, व आठ प्रकारचें ज्वर यांचा नाश होतो. याला कोणी रससागरही म्हणतात. ( अनुपान प्रकरण पहा. )

६४ **मृतसंजीवनीरस दुसरा**—पारा व गंधक यांची कज्जली, लोहभस्म, बचनाग, हरताळ, मुरदाडशिंग, मनशीळ, हिंगूळ, चित्रक, इंद्रवारुणी, अतिविष, त्रिकटू, सुवर्णमाक्षिक, भांग, जेपाळ व पळसाची साल, ही औषधें सर्व समभाग घेऊन नंतर आल्याचा रस व भांगेचा काढा या प्रत्येकांत तीन तीन दिवस खलावीं; तशीच लिंबू व चुका यांच्या रसांत एकेक दिवस मर्दन करून कांचकुपींत भरून वालुकायंत्रांत दोन प्रहर पचन करावी. नंतर आल्याच्या रसात एक दिवस घोटावी. म्हणजे शंकरोक्त मृतसंजीवनीरस तयार झाला. तो तीन गुंजा प्रमाण आल्याचे रसांत दिला असता सन्निपातानें आसन्नमरण झालेल्या रोग्यासही वांचवितो. यावर दूधभात पथ्य द्यावें.

६५ **महालक्ष्मी विलास**—सुवर्णभस्म, रौप्यभस्म, अभ्रकभस्म, ताम्रभस्म, वंगभस्म, मंडूर, कांतभस्म, लोहभस्म, नागभस्म व मौक्तिकभस्म ही सर्व समभाग व या सर्वांबरोबर पाऱ्याचें भस्म किंवा रससिंदूर घेऊन एकत्र करून मधांत खलावी. नंतर त्याचा गोळा करून तीन दिवस प्रखर उन्हांत वाळवावा. आणि शरावांत घालून पुट द्यावें; नंतर चित्रकाच्या काढ्यानें आठ प्रहर खल करावा; म्हणजे हा रस तयार झाला. मात्रा गुंजप्रमाण अनुपान योजून द्यावी. म्हणजे त्रिदोषजन्य क्षय, पांडुरोग, कामला, सर्व प्रकारचे वायू, सूज, प्रमेह, नष्टवीर्य शूल, कुष्ठ, अग्निमांद्य, ज्वर, श्वास, कास हे रोग दूर होऊन तारुण्य प्राप्त होतें. ( अनुपान प्रकरण पहा. )

६६ **महापूर्णचंद्रोदय रस**—पारा, गंधक, ताम्रभस्म, टांकणखार, शिसेंभस्म, सुवर्णभस्म, रौप्यमाक्षिकभस्म, सुवर्णमाक्षिकभस्म, मौक्तिकभस्म, कांतभस्म, वंगभस्म, अभ्रकभस्म, कस्तूरी, पोलादभस्म, केशर, चंदन व कापूर, हीं सर्व समभाग घेऊन मालतीच्या रसांत एक प्रहर खल करावा. गुंजप्रमाण मात्रा आल्याच्या रसांत द्यावी; ह्मणजे कास, श्वास, प्रमेह, कुष्ठ, रक्तदोष व राजयक्ष्मा हे रोग दूर होऊन धातूची वृद्धि होते.

६७ **महाज्वरांकुश**—पारा ३ मासे, गंधक, ३ मासे, बचनाग ३ मासे, धोत्र्याचें बीज ९ मासे, चोख म्हणजे पिसोळ्याचें मूळ अथवा कांटेधोतऱ्याचें मूळ हीं सर्वांच्या दुप्पट घेऊन बारीक करून आल्याचा रस व निंबाचा रस यात पृथक् एकेक दिवस खल करावा. मात्रा वालप्रमाण आल्याचा रस व मध यांत द्यावी. तेणेंकरून त्रिदोषापासून जो ज्वर येतो तो, दिवसां व रात्रीं दोन वेळ येतो तो, एक दिवसाआड येतो, व चवथ्या दिवशीं येतो तो, हे सारे ज्वर दूर होतात. हा रस विषमज्वराविषयींही फारच प्रशस्त आहे.'

६८ **मार्तंडोदय रस**—हिंगूळ २, जेपाळ १॥, टांकणखार १, व बचनाग ॥ भाग, हीं सर्व एकत्र खलून दोन गुंजाप्रमाण रस द्यावा. हा ज्वर, श्वासोदर, आध्मान, पांडू, अजीर्ण, इतक्याचे ठायीं अनुपान योजून दिला असतां प्रशस्त आहे. पथ्य—ताकभात, सुंठ, मिरीं, पिपळी, आल्याचा रस, साखर, यांच्या बरोबर दारुणज्वर, अग्निमांद्य, गुल्म, कफ. वायु, शूळ, शोफोदर, वातरक्त, स्वरभेद, व्रण, कुष्ठ व मूळव्याध इत्यादि सर्व रोगांवर प्रशस्त आहे. असा हा मार्तंडोदय नामक रस विश्वजनाचें पालन करतो. (अनुपान प्रकरण पहा.)

६९ **मालिनीभाग्वसंत**—सुवर्णाचा चूर किंवा वर्ख, मौक्तिक (कच्चें मोती) प्रवाळभस्म, रौप्यमाक्षिकभस्म, सुवर्णमाक्षिकभस्म, वंगभस्म, नागभस्म, लोहभस्म व बचनाग ही सर्व औषधें समभाग खलात घालून गुलाबपाणी, कांटेसेवरीचा रस, उसाचा रस, नागरमोथे, यांच्या काढ्याच्या सात सात भावना द्याव्या, नंतर कापराची एक भावना देऊन गुंजप्रमाण गोळ्या बांधाव्या आणि अनुपान योजून द्याव्या ह्मणजे पित्तप्रमेह, उग्रताप, बहुमूत्रता, मूतखडा, वांति, तृषा, मूत्राघात, व सर्व प्रकारचे प्रमेह हे रोग दूर होऊन वीर्य, पुष्टि, श्रुति व दृष्टि यांस तेज येतें. (अनुपान प्र० पहा.)

७० **मेहांतकरस**—सुवर्णभस्म, शिसेंभस्म, लवंगा व हिंगूळ हीं एक, दोन, तीन व सहा याप्रमाणें भाग घेऊन खजुराचे रसात तीन दिवस खल करावा. गुंजप्रमाण मात्रा हळदीचें चूर्ण व मध यांत द्यावी; ह्मणजे सर्व प्रकारचे प्रमेह नाश पावतात यांत संशय नाहीं.

७१ **रससिंदूर**—पारा ८ तोळे, गंधक २ तोळे, व नवसागर ॥ तोळा,

यांची कज्जली करून निंबूरसांत खलावी. आणि सात मातकापडें केलेल्या कांचकुपींत भरून वाळल्यावर वालुकायंत्रांत ठेवून आठ प्रहर अग्नि द्यावा. स्वांगशीत झाल्यावर हिंगुळासारखा देवदैत्यांना दुर्लभ असा रससिंदूर काढून घ्यावा. आणि रोगोक्त अनुपानाशी एक वाल द्यावा हा रतिकाळीं स्त्रियांना कौतुक दाखिवणारा, वीर्यवर्धक स्त्रीयाचा मदनाशक असा आहे. आणि अग्निमांद्य, राजयक्ष्मा, क्षय, पांडुरोग, मूज, उदर, गुल्म, प्रमेह, शूल, प्लीहा, ज्वर, दुष्टव्रण, मूळव्याध, संग्रहणी, भगंदर, ओकारी, आणि त्रिदोप, यांचा नाश करितो. ( अनुपान प्रकरण पहा. )

७२ राजमृगांकरस—सुवर्णाचा चूर १ भाग, रससिंदूर .॥. भाग, ताम्रभस्म .॥. भाग, लोहभस्म .॥. भाग, वंगभस्म .॥. भाग, अभ्रकभस्म .॥. भाग, नागभस्म .॥. भाग, मौक्तिक ( कच्चें ) २ भाग, प्रवाळभस्म २ भाग, व हिऱ्याचें भस्म २ भाग, या सर्वांची कज्जली करून रससिंदुराच्या चतुर्थांश टांकणखार घालून कांचकुपीत भरून कुपीला मातकापड करावें. नंतर एका डेऱ्यांत मीठ भरून त्यांत ती कुपी ठेवावी. आणि दोन प्रहरपर्यंत खैराच्या लांकडाचा मंदाग्नि द्यावा. स्वागशीत झाल्यावर बारीक खलून सुंदर डब्यांत किंवा कुपींत घालून त्याची पूजा करावी. अनुपान तूप व मध, आणि त्रिकटूचें चूर्ण घालून दोन गुंजा मात्रा, खोकला, श्वास, मंदाग्नि, शोफ, पांडुरोग, कफ, क्षयरोग इत्यादिकावर द्यावी.

७३ रामबाणरस—पारा, गंधक, वचनाग, लवंगा, हीं एकेक भाग, मिरीं २ भाग, व जायफळ .॥. भाग एकत्र करून चिंचेच्या रसांत खल करावा. हा रस वालप्रमाण अनुपानपरत्वें द्यावा; म्हणजे संग्रहणी, आमवात, मंदाग्नि, कफ, दमा, खोकला, वांति, आणि कृमि यांचा नाश होतो. ( अनुपान प्रकरण पहा. )

७४ लघुमालिनीवसंत—घोड्याच्या मुतांत कलखापरीचें चूर्ण २१ दिवस घालून ठेवावें आणि उन्हांत ठेवून सुकवावें, नंतर तें चूर्ण ८ तोळे व पांढरें मिऱ्याचें चूर्ण ४ तोळे व हिंगूळ ८ तोळे, या सर्वांचें एकत्र चूर्ण करून त्यांत गाईचें लोणी २ तोळे घालून खलावें. नंतर १०० निंबांचे रसांत खल करावा. मात्रा दोन वालप्रमाण मध पिंपळींत द्यावी; म्हणजे संग्रहणी, अतिसार, ज्वर, क्षय, अर्श, ताप, शूल, अग्निमांद्य, वातविकार, प्रदर, रक्तार्श, विषमज्वर, व नेत्ररोग यांचा नाश होतो.

७५ लघुवातविध्वंसन—पारा, टांकणखार, गंधक, पाषाणभेद, वचनाग, कवडीभस्म, हरताळभस्म व त्रिकटू, ही सर्व समभाग एकत्र करून धोत्र्याच्या रसाशीं खल करावा. मात्रा गुंजप्रमाण अनुपान योजून द्यावी. म्हणजे सन्निपात, कफ, वायु, शीत, अग्निमांद्य, श्वास, संग्रहणी, शूल, आणि खोकला, यांचा नाश होतो. ( अनुपान प्रकरण पहा. )

७६ **लघुसूचिकाभरणरस**—बचनाग ४ तोळे, व पारा ३ मासे घेऊन एक जागीं खल करावा. नंतर मातीचे प्याल्यास कांच वांटून लेप करून सिद्ध केलेले असे कांचेचे मोठे मोठे दोन प्याले आणून त्या एकांत तें चूर्ण घालून मातकापड करून वाळल्यावर चुलीवर ठेवून हलका हलका अग्नि दोन प्रहर द्यावा. नंतर खालीं उतरून त्या प्याल्याची मुद्रा काढून आंतील औषध युक्तीनें काढून कुपीत भरून ठेवावें. नंतर कुपीत सुई घालून जितका अग्राला पारा येईल तितका बाहेर काढून ज्या मनुष्याला सन्निपात येऊन मूर्च्छा येते त्या मनुष्याचे मस्तकाचेठायीं ताळूचे जाग्यावर वस्ताऱ्यानें चांगले केश काढून त्या जाग्यावर फांसण्या द्याव्या व तें औषध त्या जाग्यावर लावून जोंपर्यंत औषध रक्ताला मिळेतोंपर्यंत बोटानें चोळावें. मग रक्ताचा व औषधाचा संबंध झाल्यावर मनुष्याची मूर्च्छा दूर होऊन सावध होतो. तसाच मनुष्याला सर्प चावून मूर्च्छा येऊन मरणावस्थेप्रत होतो. तोच मनुष्य या उपायेंकरून वांचतो. तेणेंकरून विशेष दाह होऊं लागला असतां गुलकंद, डाळिंब, व द्राक्षें इत्यादि मधुर पदार्थ भक्षण करावे. तेणेंकरून दाह शांत होतो. हा प्रयोग मात्र मोठ्या युक्तीनें तयार केला पाहिजे. प्याल्यास संधिलेप चागला करावा, नाहींतर पारा उडून जाईल.

७७ **लक्ष्मीनारायण रस**—टांकणखार, बचनाग, हिंगूळ, वाळहिरडे, अतिविष, काळा कुडा, अभ्रकभस्म, व सैंधव हीं औषधें समभाग घेऊन खलांत बारीक करावीं. आणि दातीचे मुळाचे काढ्यांत व त्रिफळ्याचे काढ्यांत ३ दिवस खल करावा. आणि गुंजप्रमाण मात्रा आल्याच्या रसांत द्यावी; ह्मणजे ज्वर, सन्निपात, तरळ, विषमज्वर, अतिसार, संग्रहणी, आमाश, रक्तातिमार; प्रमेह, शूळ, आणि सूतिकावात यांचा नाश होतो. पथ्य—मिष्टान्न भक्षण करावें. अभ्यंग, स्नान, कापूर लावलेलें थंड पाणी, फुलांचे हार, चंदन, नारळाचें पाणी व स्त्रीसंग हीं यथेउच्छ केलीं असतांही गुण येतो. असा या औषधाचा पराक्रम आहे.

७८ **लक्ष्मीविलास रस**—पारा १, गंधक १, लोहभस्म १, अभ्रकभस्म १, मनशीळ ।· व सोन्याचा चूर किंवा वर्ख ।· तोळा यांची कज्जली करून त्रिफळा व भुईकोहळा याचे रसात खल करावा. नंतर जेष्टीमध व कांटेशेवरीची साल, यांच्या काढ्याची एकेक भावना देऊन गोळा करावा. तो एरंडाचे पानात गुंडाळून ३ दिवस तांदुळाचे राशींत पुरून ठेवावा. चौथे दिवशीं काढून घ्यावा. मात्रा गुंजप्रमाण मध आणि त्रिफळा कींवा मध पिंपळी यांत द्यावी. ह्मणजे क्षय, कास, पांडुरोग, चकी, व्रण, हालीमक व अपस्मार यांचा नाश होतो.

७९ **लोकनाथ**—पारा २, व गंधक २ भाग यांची कज्जली करून पाऱ्याचे चौपट कवड्या घेऊन त्यांत ती कज्जली मरावी. नंतर टांकणखार १ भाग घेऊन गाईच्या दुधांत खलून त्यानें त्या कवड्यांची तोंडें बंद करावीं. नंतर शंखाचे तुकडे आठ तोळे घेऊन त्यांतील अर्धे तुकडे पणतींत घालून वर त्या कवड्या ठेवून

वर दुसरे अर्धे तुकडे घालून वर दुसरी पणती घालून मातकापड करून गजपुट द्यावें. स्वांगशीत झाल्यावर त्या कवड्या व शंखाचे तुकडे एकत्र खलून कुपींत भरून ठेवावे. त्याला अनुपानें अनुपानप्रकरणांत लिहिलीं आहेत तीं पहा.

८० **लोहरसायन**—पारा १, व गंधक २ भाग हीं दोन्ही खलांत घालून कज्जली करावी, तिचे समभाग तिख्याचें चूर्ण घेऊन त्या कज्जलींत घालून एक प्रहरपर्यंत खल करून कोरफडीचे रसांत तीन दिवसपर्यंत खल करावा. नंतर त्या औषधांतून गरम गरम मोठा धूर निघतो, तसें झाल्यावर त्याचा घट्ट गोळा करून तांब्याचे भांड्यांत ठेवून साळीचे भातामध्यें ३ दिवस पुरून ठेवावा. चौथे दिवशीं तो गोळा बाहेर काढून खलांत घालून उन्हांत ठेवून रानतुळशीचे रसाचीं ३ पुटें द्यावीं; नंतर सुंठ, मिरी व पिंपळी याचे वेगवेगळे काढे करून एकेकाचीं तीन तीन पुटें द्यावीं. नंतर आडुळसा, गुळवेल, व चित्रक या तिहींचे रस वेगवेगळे काढून क्रमेंकरून एकेकाचीं तीन तीन पुटें द्यावीं. हें रसायन लोखंडाचे कढईत घालून बेहेडा, आंवळकठी, हिरडा, निर्गुडी, डाळिंबसाल, कमलाचा देंठ, माका, पिंवळा कोलिस्ता, पळस, केळीचा कांदा, त्रिवळा अथवा असाणा, नीलपुष्पी, मुंडी व बाभळीचे शेंगांचा रस या चौदा औषधांचे वेगवेगळे रस काढून एकेकाची तीन तीन पुटें द्यावीं. मग तें रसायन एका मिऱ्याइतकें मध व तूप एक जागीं करून त्यांत घालून द्यावें. त्यांजवर लागलींच त्रिफळ्याचा काढा ४ तोळे ध्यावा याप्रमाणें तीन महिने हें रसायन घेतलें असतां अंगाच्या वळकट्या मोडून पांढरे केंशाचे काळे केंस होतात. मध पिंपळी बरोबर घेतलें असतां अग्निमांद्य, श्वास, कास, पांडुरोग व कफवायू हे रोग दूर होतात.—गुळवेलीचे सत्वाबरोबर घेतलें असतां वातरक्त, मूत्रदोष, पाण्यापासून झालेली संग्रहणी, अंडवृद्धि हे रोग दूर होतात. हें रसायन बल देणारें, कांति देणारें स्त्रीगमनाविषयीं इच्छा देणारें व आयुष्याची वृद्धि करणारें आहे. हें रसायन घेणारानें कोहळा, तिळाचें तेल, उडीद, मोहऱ्या, मद्य, व आंबट पदार्थ हें सारें वर्ज्य करावें.

८१ **वसंतकुसुमाकर**—प्रवाळभस्म, पारदभस्म, मौक्तिक (कच्चें), व अभ्रकभस्म हीं चार चार तोळे; रौप्यभस्म, सुवर्णचूर, हीं दोन दोन तोळे; लोहभस्म, शिसेंभस्म, व वंगभस्म ही तीन तीन तोळे, ही सर्व एकत्र खलून आडूळशाचा रस, हळदीचा काढा, व उंसाचा रस, कमळ व मोगरा यांचे फुलाचा रस, व केळीचे कांद्याचा रस, कृष्णागरु व चंदन यांचा काढा या प्रत्येकाच्या सात सात भावना द्याव्या. मात्रा गुंजप्रमाण द्यावी. क्षयास मध व मिरी यांचें चूर्णांत, प्रमेहास हळदीचें चूर्ण, मध व साखर यात. रक्तपित्तावर चंदनाचा काढा व साखर किंवा साखर, मध व आडूळशाचा रस यांत. दालचिनी, तमालपत्र, वेलची यांचे चूर्णांत दिला असतां तुष्टि व पुष्टि देऊन कामोद्दीपन करितो. शंखाहुलीचे रसाशी वातीवर द्यावा. शतावरीचा रस, साखर व मध यांत आम्लपित्तावर द्यावा. हा

योगवाही आहे, म्हणून संपूर्ण रोगांवर आपल्या युक्तीनें अनुपान योजून द्यावा. ( अनुपान प्रकरण पहा. )

८२ **वन्हिरस**—पारा ४ भाग व गंधक ८ भाग, हाळद, हिरडेदळ, बेहेडेदळ, आंवळकठी व बाळहिरडे हीं पांच औषधें दोन दोन भाग, जेपाळ व चित्रक हीं तीन तीन भाग, सुंठ, मिरीं, पिंपळी, दांतीमूळ व जिरें हीं पांच औषधें आठ आठ भाग या साऱ्या औषधांचें चूर्ण करून लहान ऐरणीचे रसांत खलून वाळवावें. याप्रमाणें त्याच रसाचीं सात पुटें, माक्याच्या रसाची सात पुटें, चित्रकाचे रसाची सात पुटें, एरंडेल तेलाचीं सात पुटें याप्रमाणें पुटें देऊन चांगला खल करून चार चार माशांच्या गोळ्या बांधाव्या व दररोज प्रातःकाळीं एक गोळी उष्ण पाण्याबरोबर सेवन करावी. तेणेंकरून ढाळ होतात. पथ्य ताकभात, मिठाचेऐवजी सैंधेलोण द्यावें. व सर्वकाळ उष्ण पाणी द्यावें. या रसायनापासून सर्व प्रकारचीं उदरें व दुसरे संपूर्ण रोग नाश पावतात. ज्या रोगाला ढाळक देऊं नये त्यास मात्र हें औषध उपयोगी नाही.

८३ **वन्हिकुमाररस**—टांकणखाराची लाही, पारा, गंधक, शंखभस्म, व कवडीभस्म, ही सर्व समभाग व बचनाग एका औषधाचे तिप्पट आणि मिरीं आठ भाग यांचा माक्याचे रसांत खल करून मात्रा वालप्रमाण अनुपान योजून द्यावी. म्हणजे संपूर्ण वातरोग, श्वास, अग्निमांद्य, कफ, प्लीहा, खोकला, आणि शूल याचा नाश होतो. ( अनुपान प्रकरण पहा. )

८४ **वातनाशनरस**—पारदभस्म, सुवर्णभस्म, हिरेभस्म, ताम्रभस्म, लोहभस्म, सुवर्णमाक्षिकभस्म, हरताळभस्म, शुद्ध केलेला सुर्मा, मोरचूतभस्म व अफु, हीं दाहा औषधें समभाग सैंधव, संचळ, बिडलोण, बांगडखार समुद्रमीठ हीं प्रत्येक एकेक भाग म्हणजे वरील सर्व औषधांचे समान एक एक भाग, याप्रमाणें सारी एक जागीं करून निवडुंगाचे चिकांत एक दिवस खलून मातीचे शरावसंपुटात घालून मातकापड करून भूधरयंत्रांत ठेवून अग्नि द्यावा, स्वांगशीत झाल्यावर बाहेर काढून त्यांतील औषध काढून घ्यावें. हा रस एक मासाप्रमाण आल्याच्या रसांत द्यावा. त्याजवर लागलाच पिंपळमुळाचा काढा करून त्यांत पिंपळीचें चूर्ण घालून द्यावा, तेणेंकरून संपूर्ण आक्षेपकादिवायू दूर होतात.

८५ **वातविध्वंसनरस**—पारा १, गंधक १, बचनाग २, ताम्रभस्म १, लोहभस्म १, सुवर्णमाक्षिकभस्म १, जेपाळ १, हरताळभस्म १, सुंठ, मिरीं व पिंपळी मिळून १ भाग, ही सर्व औषधें एकत्र करून त्याला निर्गुडी, सुरण, रुई, टाकळी, माका, आणि धोत्रा या प्रत्येकाच्या काढ्याच्या किंवा रसाच्या सात सात भावना द्याव्या, मात्रा गुंजप्रमाण मिऱ्याचे चुर्णाशी द्यावी; ह्मणजे मांड्या, गुडघे, कंबर, पोटऱ्या, पाठीचा कणा, पाय, घोटे, ओंठ, मस्तक आणि मान यांचा स्तंभ, हनुस्तंभ, त्रिकस्तंभ, शुष्कवात, जिव्हास्तंभ, बाहुस्तंभ, पादस्तंभ, व अधो-

भागीं होणारा वायु आणि सर्वांगांत संचार करणारे वायु अशा सर्व प्रकारचे वायूंचा नाश होतो यांत संशय नाहीं.

८६ **वातारी**—बचनाग १, टांकणखार २, व मिरीं ४ भाग यांचा एकत्र आल्याचे रसाशीं खल करून मात्रा वालप्रमाण मिऱ्याचें चूर्ण व मध यांत द्यावी, ह्मणजे सर्व प्रकारचे वायूंचा नाश होतो.

८७ **व्याधिगजकेसरी**—पारा, गंधक, हरताळ, बचनाग, सुंठ, मिरीं, पिंपळी, त्रिफळा, व टांकणखार, हीं प्रत्येक अर्धा तोळा व जेपाळबीज १ तोळा घेऊन सर्वांचें सूक्ष्म चूर्ण करून त्यास माका, कावळी व निर्गुंडी यांच्या रसाच्या सात सात भावना द्याव्या आणि गुंजप्रमाण गोळ्या कराव्या, त्या देण्याचा प्रकार. आठ प्रकारचे ज्वरांवर दुधाशीं, ८० प्रकारचे वायूवर निर्गुंडी व नागरमोथा यांचे काढ्याशीं, ४० प्रकारच्या पित्तव्याधीवर जुन्या गुळाशीं, आणि सर्व रोगांवर रोगोक्त अनुपान योजून दिली असतां त्या त्या रोगाचा नाश होतो. ( अनुपान प्रकरण पहा. )

८८ **वांतिहृद्रस**--लोहो, शंखभस्म, गंधक व पारा हीं समभाग औषधें खलांत घालून, कोरफड, धोत्रा आणि चुका याच्या रसांत पृथक् पृथक् खलावीं. नंतर गोळा करून त्याला सात मातकापडें करून लहानसें पुट द्यावें. नंतर खलून ठेवावें. दोन वाल औषध अजमोदा आणि वावडिंग यांच्या चूर्णाशीं मध घालून द्यावें. मागून पिंपळाच्या क्षाराचें पाणी प्यावें; ह्मणजे कृमि व वांति हे रोग बंद होतात.

८९ **विद्याधररस**--गंधक, हरताळभस्म, सुवर्णमाक्षिकभस्म, ताम्रभस्म, मनशीळ व शुद्ध केलेला पारा, हीं सहा औषधें समभाग घेऊन खलांत घालून पिंपळीचे काढ्यात एक दिवसपर्यंत खल करून नंतर एक दिवस निवडुंगाचे चिकात खल करावा. हा रस एक मासाप्रमाण मधांत द्यावा. नंतर लागलेंच गोमूत्र प्यावें; तेणेंकरून गुल्म व प्लीहादिक रोग दूर होतात.

९० **शरभेश्वररस**—पारा, गंधक, बचनाग, हिंगूळ व टांकणखार हीं सर्व समभाग घेऊन चित्रकाच्या काढ्याची भावना द्यावी; सुकल्यावर शरावांत घालून वालुकायंत्रांत ठेवून दोन प्रहर अग्नि द्यावा; नंतर चूर्ण करून त्रिकटूची भावना द्यावी; ह्या मात्रेनें वात, पित्त व कफ जनितज्वर व सन्निपातज्वर हे नाश पावतात.

९१ **शंखवटी**--चिंचेचा खार २१ तोळे, मीठ ४ तोळे, सैंधव ४ तोळे, पादेलोण ४ तोळे, बीडलोण ४ तोळे, टांकणखार ४ तोळे, यांचें चूर्ण करून १२८ तोळे निंबाचे रसांत टाकून नंतर ४० तोळे शंखाचे तुकडे तापवून त्या रसांत विझवावे. याप्रमाणें सात वेळ विझवून शुष्क करून त्यांत तें शंखाचें चूर्ण आणि हिंग भाजका ४ तोळे, सुंठ ४ तोळे, मिरी ४ तोळे, पिंपळी ४ तोळे, गंधक ४ तोळे, पारा २ तोळे व बचनाग २ तोळे हीं सर्व एकत्र करून लिंबाचे रसांत ३ दिवस खल

करावा आणि बोराच्या आठीप्रमाणें एक गोळी प्रातःकाळीं भक्षण करावी व वर उन पाणी थोडें प्यावें. तेणेंकरून नानाप्रकारचे शूल, सर्व प्रकारचीं गुल्में, अजीर्ण, परिणामशूल, अतिसार आणि संग्रहणी यांचा नाश होतो.

**९२ शंखवटी प्र० २ रा**--शंखभस्म, सुंठ, मिरीं, पिंपळी, गंधक, बचनाग, मीठ, टांकणखार, सैंधव, बीडलोण व संचळ. हीं सर्व औषधें समभाग घेऊन निंबाचे रसांत सात दिवस खल करावा. गोळी वालप्रमाण बलाबल पाहून द्यावी; म्हणजे शूल, पान्थरी, गुल्म, अग्निमांद्य, खोकला व श्वास यांचा नाश होतो.

**९३ शंखद्राव रस**—सैंधव ५, संचळ ९, बीडलोण ९, सांबरमीठ १८, मीठ ९, मोरचूत २०, फटकी ९, नवसागर ४॥, हिराकस २।. टांकणखार २।. सज्जीखार १९, व सोरा २० भाग हीं सर्व एकत्र करून ऊर्ध्व नलिकायंत्रानें अर्क काढावा. तो शंखद्राव, गुल्म, उदर, अश्मरी, मूत्रकृच्छ्र, अग्निमांद्य, संग्रहणी, इत्यादिकांवर योजावा. यांत मांसनाशक गुण आहेत. आगपाणी आणि हा एकच आहे.

**९४ शंखद्राव प्र० २ रा** —सोरा २०, तुरटी ९, आणि शंखाचें चूर्ण ४॥ भाग घेऊन मडक्यांत घालून त्याच्या तोंडाला सरपोस बसवून अर्क काढावा. अथवा एका कुपींत भरून तिला दुसरी कुपी जोडावी. आणि कणकीनें दोन्ही कुप्यांचीं तोंडें संधींत भरावी. अग्नि प्रहरभर द्यावा. तडतड वाजूं लागलें म्हणजे चुलीवरून उतरावें. हा शंखद्राव सुंठीचे चूर्णात किंवा पाण्यांत द्यावा म्हणजे वरप्रमाणेंच गुण होतात.

**९५ शीतारिरस**—हरताळ १ भाग, शंख १ भाग, आणि मोरचुत नवमांश ( दीड मासा ) या तिहींचें चूर्ण कोरफडीचे रसांत खलून गजपुट द्यावें. शीत झाल्यावर दोन गुंजा मात्रा खडीसाखरेबरोबर द्यावी; म्हणजे ऐकाहिक, द्व्याहिक, त्र्याहिक, चातुर्थिक व वेलाज्वर[१] यांचा नाश होतो.

**९६ शीतारिरस २ रा**--ताम्रभस्म, गंधक, टांकणखाराची लाही, बचनाग, मोरचूत, पारदभस्म, कलखापरी, व हरताळभस्म, हीं औषधें समभाग घेऊन कारलीच्या पानाच्या रसांत एक घटिका खलावी. नंतर त्याच्या गुंजेप्रमाणें गोळ्या कराव्या. ह्या जिरें व खडीसाखर याबरोबर द्याव्या; म्हणजे ऐकाहिकादिक ज्वर शांत होतात. या मात्रेचें नांव शिवानें ठेविलें आहे.

**९७ शीतारिरस ३ रा**--मोरचूत ३, शंखभस्म ९ व हरताळ ६ भाग यांचा कोरफडीचे रसांत खल करून शरावांत घालून कुक्कुटपुट द्यावें. मात्रा गुंजप्रमाण पिठीसाखरेबरोबर द्यावी.--ओकारी आली तर दूध प्यावें.—पथ्य दूधभात, महिनाभर गूळ वर्ज करावा. म्हणजे ऐकाहिकादिक सर्व ज्वर शांत होतात.

---

१—अत.काळींचा ज्वर यास वेलाज्वर असें म्हणण्याचा पूर्वीचा प्रघात आहे.

९८ **शीतारीरस ४ था**—पारा १, टांकणखार १, गंधक १, जेपाळ २, सैंधव १, व मिरें १, चिंचेच्या टरफलाची राख १ भाग, हीं साखरनिंबाच्या रसांत एक दिवस खलून २ गुंजा उष्णोदकांत द्यावी, ह्मणजे शीतज्वर दूर होतो.

९९ **शीतज्वराररिस**—हरताळ १, मोरचूत २, ताम्रभस्म ३, पारा ४, गंधक ५ व मनशीळ ६ ही सहा औषधें समभाग घेऊन त्रिफळ्याचे काढ्यांत खलून गोळा करून मातीचे शरावसंपुटांत घालून कापडमाती करून रानगोवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा थंड झाल्यावर बाहेर काढून खलांत घालून रुईचे चिकाचीं सात पुटें, व निवडुंगाचे चिकाची पुटें सात व दांतीचे मुळाचा काढा करून त्याचीं पुटें सात व निशोत्तराचे काढ्याचीं पुटें सात याप्रमाणें पुटें देऊन गुंजप्रमाण गोळ्या बांधून मिऱ्याचे दाणे ५, गूळ सहा मासे, व तुळशीचीं पानें तीन, अशीं सारीं एकाजागीं करून त्यांत एकेक गोळी शक्ति पाहून तीन दिवस घ्यावी. पथ्यास दूधभात घ्यावा. तेणेंकरून शीतपूर्वक विषमज्वर, दाहपूर्वकज्वर, तृतीयकज्वर, चातुर्थिकज्वर, व अहोरात्रांत दोन वेळ येतो तो, द्व्याहिकज्वर व एकसारखा बसून राहतो तो ज्वर व विलक्षणज्वर हे सारे दूर होतात.

१०० **श्वासकुठार**—पारा, गंधक, बचनाग, टांकणखार आणि मनशीळ, हीं एकेक तोळा, मिरीं ८ तोळे, व त्रिकटू ६ तोळे यांचा सूक्ष्म खल करावा. मात्रा वालप्रमाण अनुपान योजून द्यावी. म्हणजे श्वास व ज्वर हे दूर होतील. (अनुपान प्रकरण पहा.)

१०१ **श्लेष्मविध्वंसनरस**—पारा १, हरताळ १, ताम्रभस्म १ व गंधक ३ भाग यांचा कारलीचे पानाचे रसांत खल करून नंतर गोळ्या करून वाळवून कांचकुपींत भराव्या आणि कुपीस मातकापड करून तोंड बंद करून वालुकायंत्रांत तीन प्रहर अग्नि द्यावा. स्वांगशीत झाल्यावर आंतील औषध काढून घ्यावें. नंतर त्याच्या समान मिऱ्याचें चूर्ण आणि बचनाग अष्टमांश घालून माक्याच्या रसांत चांगला खल करावा. मात्रा वालप्रमाण अनुपान योजून द्यावी, म्हणजे कफ, श्वास, कास, वातरोग, शूल, विषूचिका, अग्निमांद्य, ज्वर, क्षय, संग्रहणी व अतिसार यांचा नाश होतो.

१०२ **सन्निपातचिंतामणीरस**—पारा, गंधक, अभ्रकभस्म, ताम्रभस्म, सुंठ, मिरीं व पिपळी, हीं सर्व समभाग घेऊन त्रिफळ्याचा काढा व द्रोणपुष्पीचा रस याच्या तीन तीन भावना द्याव्या, मात्रा गुंजप्रमाण अनुपान योजून द्यावी, ह्मणजे आठ प्रकारचे ज्वर, शूल. अजीर्ण व हलीमक याचा नाश होतो.

१०३ **सन्निपातविध्वंसनरस**—पारा, गंधक, हरताळ, सुवर्णमाक्षिकभस्म, ताम्रभस्म, अभ्रकभस्म, रक्तचात्रोळ, बचनाग, धोत्र्याचें बीज, वांज करटोलीचा कांदा, कडू निंबाचीं पानें, वकाण निंबाची पानें व कढी निंबाची पानें किंवा या नि-

न्ही निंबाच्या साली व कळलावीचा कांदा हीं सर्व समभाग घेऊन निर्गुडीचे रसांत व निबुरसांत एक दिवस खल करून चण्याप्रमाणें गोळ्या कराव्या. एक गोळी दशमुळाचे किंवा रुईचे मुळाचे काढ्यांत द्यावी. पथ्य दहीभात. म्हणजे कर्णकसन्निपात दूर होतो.

१०४ **समीरपन्नग**—अभ्रकभस्म, गंधक, बचनाग, सुंठ, मिरीं, पिंपळी, पारा व टांकणखार हीं सर्व समभाग घेऊन त्याला माक्याच्या रसाच्या सात भावना द्याव्या. मात्रा वालप्रमाण आल्याचा रस किंवा खडीसाखर व त्रिकटूचें चूर्ण यांत द्यावी ह्मणजे मोठ्याही वायूला क्षणांत जिंकील. नाकांत याचें चूर्ण फुंकिलें असतां रोगी तात्काळ शुद्धीवर येतो.

१०५ **सर्वेश्वररस**—पारा १, गंधक २, टांकणखार ४, व जेपाळ ८ भाग हीं सर्व औषधें एकत्र करून तीन दिवस खल करावा. मात्रा वालप्रमाण अनुपान योजून द्यावी, ह्मणजे नवज्वराचा नाश होतो. हिरडेदळाशीं वातज्वरावर द्यावा. कफावर दोन वाल मध व खडीसाखर यात द्यावा एक गुंज जीर्णज्वरावर खडीसाखरेंत द्यावा. एक वाल मध पिंपळीशीं बाळंतरोगावर द्यावा. पांच वर्षाचे मुलांस यवप्रमाण मात्रा द्यावी. गुंजावृद्धीनें विषमावर द्यावा, म्हणजे चातुर्थादिकांचा नाश होतो. कृमीवर एक वाल वावडिंगाचे काढ्याशी द्यावा.

१०६ **सिंदूरभूषणरस**—अभ्रकभस्म, रससिंदूर, गंधक व टांकणखार हीं सर्व समभाग घेऊन धोत्र्याचे पानाचे रसांत खल करावा. मात्रा गुंजप्रमाण मधांत द्यावी ह्मणजे अठरा प्रकारचीं कुष्ठें, वातरोग, शूळ, प्रमेह, व महाव्याधि यांचा नाश होतो. हा गर्भिणीसही प्रशस्त आहे.

१०७ **सन्निपातगजांकुश**—पारदभस्म, ताम्रभस्म, हरताळभस्म, सुवर्णमाक्षिकभस्म, हीं सर्व एकेक भाग यांच्या सर्वांसमान भाजलेला हिंग घेऊन आल्याचे रसांत खल करावा. नंतर वांझ करटोलीं, कडूपडवळ, निर्गुडी, रास्ना, कडुनिंब, चित्रक, धोत्रा, कळलावी, पाहाडमूळ, भांग, व निंबू यांच्या रसांत तीन तीन दिवस खल करून त्यांत सज्जीखार, टाकणखार, जवखार, सैंधव, रक्तचाबोळ, बचनाग, व जेष्टीमध हीं प्रत्येक औषधें पारदासमान घेऊन यांचें चूर्ण करून त्यांत मिळवून चांगलें खलून कुपींत भरून ठेवावें. ही मात्रा उडदाएवढी मधांत किंवा आल्याचे रसांत द्यावी; ह्मणजे चित्तविभ्रम सन्निपात दूर होतो.

१०८ **समीरगजकेसरी**—उंची अफू, कुचल्याचें बीज व मिरीं हीं सर्व समभाग घेऊन त्यांचें फार बारीक चूर्ण करून ठेवावें. आणि एक गुंज अनुपान योजून द्यावें वर तांबूलभक्षण करावें. ह्मणजे कुब्जवात, खंजवात, सर्वांगवात, गृध्रसी, अवबाहुक, सूज, कंपवायु, प्रतानकवायु, मोडशी, अरुचि आणि अपस्मार याचा नाश होतो.

१०९ **सिद्धलक्ष्मीविलास**—सुवर्णभस्म, रौप्यभस्म, ताम्रभस्म, कांतभस्म, पोलादभस्म, मंडूर, अभ्रकभस्म, वंगभस्म, नागभस्म, मौक्तिकभस्म व प्रवाळभस्म, हीं सर्व समभाग व सर्वाबरोबर रससिंदूर घालून जायपत्री, त्रिकटू, त्रिफळा, चातुर्जात, केशर आणि कस्तूरी या प्रत्येकाच्या सात सात भावना द्याव्या. मात्रा उडदाएवढी खडीसाखर मध यांत द्यावी. ह्मणजे क्षय, पांडु, कास, श्वास, जीर्णज्वर, गुल्म व मेह इत्यादि रोग दूर होऊन शरीर पुष्ट होतें.

११० **सुवर्णमालिनीवसंत**—सोन्याचा चूर किंवा वर्ख १ तोळा, मोत्याचा चूर २ तोळे, हिंगूळ ३ तोळे, पांढरीं मिरीं ४ तोळे, आणि कळखापरी ९ तोळे, या सर्वांचा एकजागी खल करून त्यांत गाईचें लोणी २॥. तोळे घालून एक दिवस चांगला खल करावा. नंतर निंबूचा रस घालून ४२ दिवस खल केला असतां हा वसंत उत्तम होतो. हा एक किंवा दोन गुंजा मधपिंपळींत दिला असतां पुष्टि येते, आणि जीर्णज्वर, क्षयरोग, कास, श्वास, शैत्य, गुदामयवायु व गुल्मरोग हे दूर होऊन धातुगतज्वर, रक्तविकार, कृशत्व, वातरोग, वृद्ध मनुष्याचे रोग, गर्भिणीचे रोग, बाळात रोग, हेही त्वरीत नाश पावतात. पथ्य दूधभात.

१११ **सूचिकाभरणरस**—सुवर्णभस्म, रौप्यभस्म, ताम्रभस्म, प्रवाळभस्म, अभ्रकभस्म, पारा, गंधक, हरताळ, मनशीळ, त्रिकटू व बाळहिरडे, हीं सर्व समभाग घेऊन रुईचे चिकांत खल करून चित्रकाचे काढ्याची एक, व पुनर्नव्याचे रसाची एक अशा दोन भावना देऊन भूधरयंत्रांत गजपुट द्यावें; मात्रा बलाबल पाहून अनुपान योजून द्यावी, ह्मणजे कसाही बालरोग असला, तरी त्याचा नाश होईल. विशेषेंकरून धनुर्वात, व त्रिदोषापासून झालेले, वातव्याधि यांचा नाश होतो.

११२ **सूतशेखर**—पारा, सुवर्णाचा चूर किंवा वर्ख, टाकणखार, बचनाग, सुंठ, मिरीं, पिंपळी, धोत्र्याचें बीज, गंधक, ताम्रभस्म, चातुर्जात, शंखभस्म, बेलफळाचा मगज, व कचोरा ही सर्व औषधें समभाग घेऊन आल्याचे रसांत एक दिवस खल करून गुंजप्रमाण गोळी मध व तूप यांत द्यावी, म्हणजे आम्लपित्त, वांति, शूल, पांच प्रकारची गुल्में, पांच प्रकारचा खोकला, संग्रहणी, त्रिदोषजनित अतिसार, अग्निमांद्य, उचकी, उदावर्त आणि इतर असाध्य व्याधी याचाही चाळीस दिवसात नाश होतो. हा सूतशेखर सपूर्ण रोग आणि क्षय याचा नाश करितो. म्हणून हा योगवाही आहे असें जाणावें. ( अनुपान प्रकरणांतील अनुपान योजून द्यावा. )

११३ **स्वयमाग्निरस**—शुद्ध पारा १ भाग व गंधक २ भाग घेऊन एकत्र कज्जली करावी. त्यासमान शुद्ध पोलादाचें चूर्ण करून त्यांत मिळवून कोरफडीचे रसांत दोन प्रहर खलून त्याचा गोळा करून तो तांब्याचे ...

त्यावर सुरतीएरंडाचीं तीन चार पानें झांकण घालून तें ताम्हन एक दिवस उन्हांत ठेवावें. नंतर तो गोळा एक रात्र धान्याचे राशींत पुरून ठेवावा. दुसरे दिवशीं त्याचा बारीक खल करून फडक्यानें गाळून तें भस्म पाण्यावर टाकिलें असतां निश्चयेंकरून वर तरतें. नंतर त्या भस्मास खलांत घालून कोरफडीचीं सूर्यपुटें सात, माक्याच्या रसाचीं सात, कांगोणीच्या रसाचीं सात, कोरंट्याच्या रसाचीं सात, मुंडीच्या रसाची सात, पुनर्नव्याचे रसाची सात, सहदेवीचीं सात, गुळवेलीचीं सात, निर्गुडीचीं सात, व चित्रकाच्या काढ्याची सात, याप्रमाणें निरनिराळीं पुटें देऊन खलून ठेवावें. हा रस प्रख्यात आहे. महान महान सिद्ध पुरुषांनीं सांगितला आहे. यास्तव त्याचा अनुभव घेऊन येथें घेतला आहे. हा रस चार गुंजांपर्यंत घेऊन त्रिफळ्याचें चूर्ण व मध यांत दिला असतां सर्व प्रकारचे रोग दूर होतात. त्रिफळा, त्रिकटू, एलची, जायफळ व लवंगा हीं नऊ औषधें समभाग घेऊन चूर्ण करून त्यासमान ही मात्रा आंत मिळवून आठ गुंजांप्रमाण मधांत दिला असतां क्षय व कास हे जातात. रसायनाचे रीतीनें सुवर्णादिक धातूंचें लोहासारखें चूर्ण करून भस्में केलीं असतां होतात.

११४ **हेमगर्भरस**—पारा ४ तोळे, शुद्ध सुवर्णाचा चूर १ तोळा व गंधक ४ मासे, सर्व एकत्र करून त्याचें बारीक चूर्ण करावें. आणि घट्ट वस्त्रांत बांधून त्या वस्त्राच्या बाहेरून पाऱ्याइतका गंधक घालून दुसरे वस्त्रानें चांगली गोळी बांधावी. नंतर शरावसंपुटांत ठेवून मातकापड करावें. आणि भूमीला खळगा खणून त्यांत शराव ठेवून त्यावर थोडी माती लोटून त्यावर अग्नि देऊन पचन करावा. थंड झाल्यावर काढून जळका गंधक टाकून द्यावा. पुन्हां त्याचें चूर्ण करून घट्ट गोळी बांधून पूर्ववत् गंधक बाहेरून बांधून भूधरयंत्रांत पुन्हां पचन करावें. याप्रमाणें सात वेळ पुटें द्यावी, ह्मणजे हेमगर्भाची मात्रा तयार होते. हा श्वास, कास, व शूळ यांचा नाश करितो. व योग्य अनुपानाशी दिला असतां नानाप्रकारचे वायूचे रोग व इतर सर्व रोग यांचा नाश करितो, हा योगवाही आहे. ( अनुपान प्रकरण पहा. )

११५ **हेमगर्भपोटलीरस**—शुद्ध पारा ३ भाग, लोहभस्म ३ भाग, गंधक १ भाग, सुवर्णाचा चूर ·॥· भाग, यांची खलांत कज्जली करून तिला निर्गुडीच्या रसात सात दिवस भावना द्यावी. आणि धोत्र्याच्या रसांत खलून गोळी करावी. ती विरळ वस्त्रांत बांधावी आणि ती मातीच्या भांड्यांत गंधक घालून मध्यें गोळी ठेवून वर गंधक घालावा आणि तोंड बंद करावें व निवांत जाग्यात वितभर खळी खणून तींत तें पात्र ठेवून त्यावर एक अंगूळ माती लोटावी. त्यावर एक प्रहर लाकडाचा अग्नि द्यावा ह्मणजे हेमगर्भपोटलीरस सिद्ध होतो. हा अनुपानाशी सर्व रोगांवर द्यावा. ( अनुपान प्रकरण पहा. )

११६ **हेमगर्भपोटलीरस २ रा.**—शुद्ध पारा १ भाग, व त्याचे चौथा

हिस्सा सोन्याचा चूर व दोहोंचे दुप्पट गंधक. तिन्हीही कांचनाचे रसांत खलून त्याचा गोळा करून मातीचे शरावसपुटांत घालून मातकापड करून भूधरयंत्रांत तीन दिवस अग्नि द्यावा. स्वांगशीत झाल्यावर बाहेर काढून त्याचे समभाग गंधक घेऊन दोहोंचा आल्याच्या रसांत खल करून नंतर चित्रकाचे रसांत खल करावा. मग मोठ्या पिंवळ्या कवड्या घेऊन त्यांत तें औषध भरून सारे औषधाचे आठवा हिस्सा टांकणखार व टाकणखाराचे निम्मे वचनाग घेऊन दोहोंचा निवडुंगाचे रसांत खल करून ह्यांनीं त्या कवड्यांचीं तोंडें बंद करावी. नंतर एका मडक्याचे बुडाला चुना सारवून त्यांत त्या कवड्या ठेवून मडक्याचे तोंडावर दुसरें मडकें पालथें घालून त्याचे संधीला मातकापड करून रानगोवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा. स्वांगशीत झाल्यावर आंतील औषध काढून घ्यावें, व खलून पूड करून ठेवावी. हा हेमगर्भरस लोकनाथरसाचे अनुपानाप्रमाणें देत जावा. पथ्य आळणी केल्यास फार उत्तम. या औषधापासून ओकारी येऊं लागली, तर गुळवेलीचा काढा मध घालून द्यावा. कफप्रकोप झाला असतां गूळ व आलें एक जागीं करून द्यावें. ढाळ होऊं लागल्यास थोडी भांग भाजून दह्यांत देत जावी. या रसापासून खोकला, क्षय, श्वास, संग्रहणी, व अरुचि हे रोग दूर होऊन अग्नि प्रदीप्त होतो. व कफवायूचा नाश होतो.

११७ **क्षयकुठार**—पारा, गंधक, शिशाचें भस्म, लोहभस्म, कांतभस्म, पोलादीभस्म, अभ्रकभस्म, मंडूर, वंगभस्म, हरताळभस्म, कवडीभस्म, टांकणखार व पिपळी, हीं सर्व समभाग घेऊन कांटेसेवरीच्या काढ्यात खल करून नंतर निंबूरसांत सात दिवस खल करावा. नंतर नागरमोथे व देवदार यांच्या काढ्यांत तीन दिवस खल करून गुंजप्रमाण गोळ्या बांधाव्या. एक गोळी खडीसाखर, मध व तूप यांत द्यावी म्हणजे क्षयरोग, पांडुरोग, कामला, मधुमेह, इक्षुमेह, वातमेह, उदर, श्वास, कास, रक्तप्रदर, गुल्म, व शूल यांचा नाश होतो. सूचना—येणेंप्रमाणें रसायनें व मात्रांचा यथायोग्य खुलासा करून यांत जरी दाखविला आहे तरी हें तयार करण्याचे हें तूनें ग्रंथ वाचून औषधी रसायन क्रिया आपले मतानें करूं नये. सुज्ञ वैद्याचे साह्यानें च तयार करून ठेवाव्या. व ते जितकी जुनीं होतील तितका गुण अधिक होतो. असें समजून योजना फार विचारानें करावी म्हणजे रोगाचा परिहार हटकून होईल. सर्वांस सुलभ रीतीनें योजना करितां यावी म्हणून ही गुटिका चूर्णें वगैरे औषधी व त्यांची क्रिया पुढें दिली आहे.

---

## गुटिका ( गोळ्या. )

१ **अजमोदादिवटी**—ओंवा, पानींपपळी, वावडिंग, बडिशेप, नागरमोथे, मिरीं व सैंधव, ही प्रत्येक एकेक भाग, बाळहिरडे ९ भाग, सुंठ १० भाग, वरधारा

१० भाग व भारंगमूळ ३६ भाग, या सर्वांचें एकत्र वस्त्रगाळ चूर्ण करून त्याचे दुप्पट गुळाचा पाक करून त्यांत हें चूर्ण मिश्र करून सुपारीएवढ्या गोळ्या कराव्या. व बलाबल पाहून एक गोळी उष्णोदकाशीं द्यावी, ह्मणजे संधीवात, आमवात, सर्व प्रकारचे वात, ऊरुस्तंभ, हनुस्तंभ, शिरोवात, अपतानक वात, व भ्रुकुटी, आंख, कान, नाक, डोळे व जीभ याचा स्तंभ, कलायखंज, पंगुवात, सर्वांगवात, एकांगवात, आर्दितवायु, पादहर्षवात आणि पक्षाघातवायु यांचा नाश होतो.

**२ अजमोदादि वटी २ री**--अजमोदा, दालचिनी, जायपत्री, वेलची दाणे, वेखंड, भाजका हिंग, बेलफळाचा मगज, कडूनिंबाची साल, इंद्रजव, पिंपळी, जवखार, अतिविष, कुटकी, सैंधव, पिपळमूळ, पहाडमूळ, व चवक, ही सर्व औषधें समभाग घेऊन त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून एरंडेलांत खलून गोळ्या मध्यम सुपारीएवढ्या कराव्या. दुवक्त एकेक गोळी उष्णोदकाशी द्यावी. याप्रमाणें १४ किंवा २१ दिवस सेवन केलें असतां आठ प्रकारचे गुल्मरोग, सर्व प्रकारच्या मूळव्याधी, सर्व प्रकारचे वायगोळे, प्लीहा, ( पान्थरी ) जलोदर, संग्रहणी, सर्व प्रकारचे वायुरोग, सूज, सर्व प्रकारचे पोटशूळ, ज्वर, अंडवृद्धि, व भगेंद्र या रोगांचा नाश होतो. स्त्रियांचे आगांतील वायूचें हरण होऊन गर्भसंभव होतो व पुरुषाचा धातुविकार जाऊन शुक्रधातूची वृद्धि होते.

**३ अमरसुंदरगुटी**--त्रिकटू, त्रिफळा, पिंपळमूळ, रेणूकबीज, चित्रकमूळ, लोहभस्म, दालचिनी, तमालपत्र, एलची, नाकेशर, पारा, गंधक, बचनाग, वावडिंग, अक्कलकाला व नागरमोथे, हीं सर्व समभाग व सर्वांच्या दुप्पट गूळ घालून तीन माशांची गोळी करावी. व अनुपान योजून द्यावी, ह्मणजे अपस्मार. सन्निपात, श्वास, खोकला, मूळव्याध, उन्माद, व ऐंशी प्रकारचे वातरोग याचा नाश होतो. ( अनुपान प्रकरण पहा. )

**४ आमलक्यादिगुटी**--आंवळकठी १ तोळा, रंगारी हिरडेदळ १ तोळा, वावडिंग १ तोळा, तेड ३ तोळे, यां सर्वांसमान गुळाचा पाक करून त्यांत चूर्ण मिळवून सहा मासे प्रमाणाची गोळी करावी. साजसकाळ एकेक गोळी उष्णोदकांत सेवन केली असता पांढरें कोड, सर्व प्रकारच्या मूळव्याधी, गुल्म, उदर, जंतविकार, खोकला, श्वास व व्रण यांचा तात्काळ नाश होतो.

**५ एलादिगुटी**--एलची, तमालपत्र, दालचिनी, मनुका, व पिंपळी हीं सर्व दोन दोन तोळे, शिलाजीत, जेष्टीमध, खजूर व मनुका ही प्रत्येक चार चार तोळे सर्व एकत्र करून मधाशीं दहा माशांची गोळी बांधावी. सांजसकाळ एकेक गोळी अनुपानपरत्वें सेवन करीत जावी ह्मणजे श्वास, कास, ज्वर, उचकी, वांति, मूर्च्छा, उन्मत्तता, भ्रम, तोंडांतून रक्त पडणें, तहान, पार्श्वशूल, अरुचि, शोष, प्लीहा, मूढवात, स्वरभंग, क्षतक्षय, आणि रक्तपित्त याचा नाश होतो. ही गोळी वृष्य, आणि तृप्ति देणारी अशी आहे. ( अनुपान प्रकरण पहा. )

६ **कांकायनगुटी**—ओंवा, जिरें, धणे, मिरीं, विष्णुक्रांत, अजमोदा, काळें लहान जिरें, हीं प्रत्येक एकेक तोळा, हिंग भाजून दीड तोळा, जवखार, सज्जीखार, सैंधव, संचळ, बीडलोण, समुद्रमीठ, बांगडखार, व निशोत्तर हीं आठ औषधें, दोन दोन तोळे, दांतीमूळ, कचोरा, पोखरमूळ, वावडिंग, डाळिंबाचे फळावरील साल, बाळहिरडे, चित्रकमूळ, आम्लवेतस व सुंठ हीं नऊ औषधें चार चार तोळे, याप्रमाणें सर्व औषधाचें वस्त्रगाळ चूर्ण करून महाळुंगाच्या रसांत खल करून तीन मासे प्रमाणाच्या गोळ्या कराव्या. ही गोळी तुपांत अथवा गाईचे दुधांत किंवा आंबट मद्यांत अथवा उन पाण्यांत दिली असतां गुल्मरोग दूर होतो. वातगुल्मास मद्यांत, पित्तगुल्मास गाईचे दुधात, कफगुल्मास गोमूत्रांत, त्रिदोष गुल्मास दशमुळाचे काढ्यात किंवा उंटिणीचे दुधांत दिली असतां रक्तगुल्म दूर होतो. व हृद्रोग, संग्रहणी, शूल, जंतविकार व मूळव्याध हे सारे रोग दूर होतात.

७ **चंद्रप्रभागुटी**—कचोरा, वेखंड, नागरमोथे, किराईत, गुळवेल, देवदार, हळद, अतिविष, दारुहळद, पिपळमूळ, चित्रक, धणे, त्रिफळा, चवक, वावडिंग, गजपिंपळी, त्रिकटू, सुवर्णमाक्षिकभस्म, जवखार, सज्जीखार, सैंधव, संचळ व बीडलोण व सोनामुखी ही अठ्ठावीस औषधें तीन तीन मासे व निशोत्तर, दांतीमूळ, तमालपत्र, दालचिनी, एलची, व वंशलोचन हीं सहा औषधें एकेक तोळा एकंदर सर्वाचें चूर्ण करावें. त्यांत लोहभस्म २ तोळे, खडीसाखर ४ तोळे, शिळाजीत ८ तोळे गुग्गूळ ८ तोळे, हीं सर्व औषधें एक जागीं खलून १ तोळा प्रमाणाच्या गोळ्या बांधाव्या. ही चंद्रप्रभावटी सर्व रोग दूर करण्याविषयीं प्रख्यात आहे. इजपासून वीस प्रकारचे प्रमेह, मूत्रकृच्छ्र, मूत्राघात, मुतखडा, मलबद्धरोग, शूल, पीटिका. अर्बुद, अंडवृद्धि, पांडुरोग, कांवीळ, हालीमक, अंतर्गलवायु, कंबरेचा शूल, श्वास, कास, व पायास भेगा पडतात तो रोग, विचर्चिकारोग, कुष्ठ, मूळव्याध, कंडू, कवलु, भगंदर, दंतरोग, नेत्ररोग, प्रदररोग, पुरुषाचे धातुगत विकार, अग्निमांद्य, अरुचि व वात, पित्त, आणि कफ याचा प्रकोप हे सर्व रोग दूर होतात.

८ **त्रिफळादिगुटी**—त्रिफळा, पंचलवणें, कोष्ठ, कुटकी, देवदार, वावडिंग निंबोळ्या, थोर चिकणा, लहान चिकणा, हाळद, दारुहळद, व सज्जीखार, हे सर्व पदार्थ एकत्र मिळवून करंजाचे सालीचे काढ्यात घोटून बोराच्या आठीएवढी गोळी करावी ती गोळी अनुपानपरत्वें अनेक रोगावर द्यावी. ती अशी—अर्शावर ताकाशीं—गुल्मावर निंबूच्या रसाशीं—मंदाग्नीवर उन पाण्याशी—जंतावर वावडिंगाचे काढ्याशीं—मूत्रकृच्छ्रावर पाण्याशीं—हृद्रोगावर तिळाचे तेलाशीं—संपूर्ण ज्वरांवर कुड्याचे स्वरसाशीं—शूलावर महाळुंगाचे रसाशी—संपूर्ण विषांवर टेंभूरणीचे रसाशीं—सर्व कुष्ठावर इंद्रगोप ( बीरबोटी नामक मृगक्रीडा ) याबरोबर—जलोदरावर पिपळीचे काढ्याशी. व भोजन जिरण्याकरिता भोजनोत्तर घ्यावी. संपूर्ण नेत्ररोगांवर मधा-

१—बारीक फोडाची खरूज.

शीं अंजन करावें. सर्व प्रकारचे प्रदरांवर पाण्यांत उगाळून योनीस लेप करावा. या गुटीला स्पर्श करून गेलें असतां किंवा जवळ ठेविली असतां व्यवहार द्यूत, युद्ध व शिकार यांचे ठायीं विजयी होतो असें पूर्वीचें वचन आहे. ( अनुपान प्रकरण पहा. )

९ **पिप्पल्यादिगुटी**—पिंपळी २ तोळे, खडीसाखर ४ तोळे, बिया काढलेल्या मनुका ४ तोळे, बिया काढलेल्या खारका ४ तोळे व तमालपत्र, दालचिनी, मोहाचीं फुलें, व एलची दाणे हीं प्रत्येक अर्धा अर्धा तोळा, घेऊन सर्वांचें चूर्ण मधांत खलून मध्यम सुपारीएवढ्या गोळ्या कराव्या. आणि सकाळीं नुस्ती एक गोळी सेवन करावी. ह्मणजे शुक्रधातूची वृद्धि होते. आणि उचकी, श्वास, खोकला, वांति, ज्वर, अग्निमांद्य, कफाचा, व रक्ताचा वेडका पडणें, उरःक्षतकास, रक्तपित्त, वात, तृषा, अरुचि, पान्थरी, बरगड्यांतील शूल, क्षय आम्लपित्त इतक्या रोगांचा नाश होऊन रक्तशुद्धि चांगली होते. असा याचा पराक्रम आहे.

१० **पिप्पल्यादिमोदक**—मधाच्या दुप्पट तूप, तुपाच्या दुप्पट पिंपळीचें चूर्ण, पिंपळीच्या दुप्पट खडीसाखर, खडीसाखरेच्या चौपट दूध, व दालचिनी, तमालपत्र, वेलदोडे, व नाकेशर या प्रत्येकाचें चूर्ण मधासमान घेऊन पाक करून दोन दोन तोळे प्रमाण लाडू बांधून ठेवावे. प्रातःकाळीं एक लाडू भक्षण करावा. म्हणजे धातुगतज्वर, श्वास, खोकला, पांडुरोग, धातुक्षय व अग्निमांद्य यांचा नाश होतो.

११ **वचनागादिगुटी**—तेल्या बचनाग शुद्ध केलेला १ तोळा, पारा १ तोळा, हरताळ १ तोळा, गंधक १ तोळा, सुंठ १ तोळा, सुपारी १ तोळा, हिरडेदळ १ तोळा, कोष्ठ १ तोळा, सोनामुखी १ तोळा, जेपाळाचे गोळे १ तोळा, पिंपळी १ तोळा व आंवळकठी ·||· तोळा या सर्व औषधांचें चूर्ण माक्याचे रसांत तीन दिवस खलून वालप्रमाण गोळी अनुपान योजून द्यावी. १—जीर्णज्वरास कुटकीचें चूर्ण ३ मासे घेऊन त्यात एक गोळी द्यावी. २—साधारण ज्वरास तीन मासे जिरे व तीन मासे खडीसाखर यांत द्यावी. ३—प्रमेहास निर्गुडीचे पानाचे रसांत. ४—भूतबाधेस निंबूरसांत उगाळून अंजन करावें. ५—कोठ्यांतील उष्णता जाण्यास आल्याच्या रसांत. ६—विंचवाचे विषास आल्याच्या रसांत उगाळून अंजन करावें. ७—संग्रहणीस ताकांत. ८—पोटशूल, हृदयशूळ, व मूत्रस्थानींची तिडीक यास तुपांत द्यावें. ९—सर्पदंशास पाण्यात उगाळून अंजन व दशस्थानीं लेपही करावा. १०—मुखदुर्गंधास गुळांत व वर त्रयोदशगुणी विडा खावा. ११—दाह होत असल्यास आवळ्याचे रसांत उगाळून अंजन करावें. १२—शक्ति वाढण्यास मधांत. १३—स्त्रियांचे अंग ठणकत असल्यास आल्याचा रस, मध व पिंपळी एकत्र करून त्यात एक गोळी द्यावी. १४—मस्तकशूळास ताकांत उगा-

कून लेप करावा. १५—श्वासास खडीसाखरेंत. १६—पोटशूळास ओंव्याचें चूर्ण व एक गोळी उष्णोदकांत द्यावी. १७—गुदद्वारानें रक्त पडत असल्यास एक मासा मोचरस व दोन मासे गूळ एकत्र करून त्यांत द्यावी. १८—रातांधळ्यास पारोशा थुंक्यांत उगाळून अंजन करावें, १९—नपुंसकत्वास कोंबड्याचे अंड्यांतील बलकात. २०—पोटांतील वायूस उष्णोदकात. २१—नेत्र आरक्त झाल्यास गोळी पाण्यांत उगाळून अंजन करीत जावें. ह्मणजे नेत्र साफ होतील. असा गोळीचा पराक्रम आहे.

**१२ बृहत्सूरणादिवटी**—सूरण १६, वरधारा १६, सफेत मुसळी ८, चित्रक ८, हिरडेदळ ४, बेहेडेदळ ४, आंवळकठी ४, वावडिंग ४, सुंठ ४, पिंपळी ४, भिलावे ४, पिंपळमूळ ४, तालीसपत्र ४, दालचिनी २, एलची २ व मिरीं २ भाग, हीं सारी औषधें कुटून त्याचे दुप्पट त्यांत जुना गूळ घालून अर्ध तोळ्याची गोळी करून द्यावी. ह्मणजे अग्नि प्रदीप्त होतो. व मूळव्याध, वातकफापासून झालेली संग्रहणी, श्वास, खोकला, क्षय, कवळू, श्लीपद, सूज, उचकी, प्रमेह, भगंदर, व वलीपलितरोग हे सर्व दूर होतात. व या गोळ्या स्त्रीगमनाविषयीं इच्छा देतात. व शरीराची जरा दूर करितात.

**१३ भृंगराजगुटी**—माका, निर्गुंडी, गुळवेल, सुरवारी हिरडेदळ, बेहेडेदळ, आंवळकठी, चिचोके, सोनामुखी व दालचिनी, हीं औषधें समभाग घेऊन चूर्ण करून त्या समान जुना गूळ आंत मिळवून सहा मासे प्रमाणाच्या गोळ्या बांधाव्या व चांगला दिवस पाहून रोज प्रातःकाळीं एकेक गोळी सेवन करून वर थंड पाण्याचा घोट घेत जावा. पहिले महिन्यास औषध घेण्यास कठिण जाईल; दुसरे महिन्यांत अंगांत शक्ति येऊन अंग बळकट होईल, तिसरे महिन्यांत सर्व कुष्ठें जातील, चवथे महिन्यांत सर्व रोग जातील पांचवे महिन्यांत पांढरे केश काळे होतील, सहावे महिन्यांत अंगांत हुशारी येईल; सातवे महिन्यांत जिवास अतिशय शांतता वाटेल; आठवे महिन्यांत पुष्टता येईल; नववे महिन्यांत दिव्यदृष्टि होईल; दहावे महिन्यात सर्व सिद्धि होईल, हें औषध मोठें रामबाण आहे.

**१४ यवान्यादिगुटी**—ओंवा, धणे, जिरें, मिरीं, शिलाजीत, किरमाणी ओंवा व कडु जिरें, हीं चार चार तोळे, हिंग ६ तोळे, पंचलवणें एकेक तोळा, तेड ८ तोळे, जेपाळ, कचोरा, पोखरमूळ, वावडिंग, डाळिंबसाल, आवळकठी, पिंपळी, आम्लवेतस व सुंठ, हीं प्रत्येक सोळा सोळा तोळे, एकत्र करून महाळुंगाच्या रसांत त्याचा खल करून सहा माशांची गोळी बांधावी. व तूप, दूध, आम्लरस, किंवा उन पाणी यांतून एकाशीं द्यावी, ह्मणजे गुल्मनाश होतो. वातगुल्मावर मद्याशीं द्यावी. पित्तगुल्मावर गोखरूशीं, कफगुल्मावर गोमूत्राशीं, त्रिदोषगुल्मावर गोमूत्राचे काढ्याशीं, स्त्रियांच्या रक्तगुल्मावर उंटिणीचे दुधाशीं आणि हृद्रोग, संग्रहणी शूल, कृमि आणि अर्श यांवर स्वबुद्धीनें अनुपान योजून द्यावें. ( अनुपान प्रकरण पहा. )

१५ लघुशिलागुटी—शिलाजीत ३२ तोळे घेऊन त्याचा कुड्याची साल, त्रिफळा, कडूनिंब, कडू पडवळ, नागरमोथे व सुंठ यांच्या काढ्यांत एक महिना खल करावा. नंतर त्यांत खडीसाखर ३२ तोळे, वंशलोचन, पिंपळी, आंवळकठी व कटटोलीकंद, हीं प्रत्येक चार चार तोळे, रिंगणीचें पंचांग ८ तोळे, दालचिनी, तमालपत्र, वेलची आणि मध हे १२ तोळे यांचा खल करून त्याची १० माशांची गोळी करावी. ती भक्षण केल्यावर डाळिंबाचें सार, दूध, रस, यूप, मद्य किंवा आसव यांतून कोणतेंही प्राशन करावें. वर हितकारक भोजन करावें. इ० पांडुरोग, कुष्ठ, ज्वर, प्लीहा, तमकश्वास, अर्श, भगंदर, मूत्रकृच्छ्र व मूत्रसंबंधी रोग व मूत्रावरोध यांचा नाश होतो. या गोळ्यांत कोणी कांतलोहभस्म आणि अभ्रकभस्म हीं चार चार तोळे मिळवितात. तेव्हां इचे गुण काय वर्णावे. पांडुरोग, सर्व प्रकारचे प्रमेह, क्षय व अनेक व्याधि यांचा नाश होतो यांत संशयें नाहीं.

१६ व्याधिहरगुटी—शुद्ध हरताळ, अतिविष, टांकणखार, हिरडेदळ, पिंपळी, आवळकठी, चित्रक, शुद्ध जेपाळबीज, शुद्ध गंधक, अक्कलकाला, समुद्रफळ, जेष्ठीमध, एरंडमूळ, वावडिंग, पिंपळमूळ, दारुहळद, पांढरा बचनाग, खुरासनी ओंवा, वेलची दाणे, जायपत्री, अफू, जायफळ, शेंदेलोण, कोष्ठ, हिंग व लसूण, हीं सर्व औषधें समभाग घेऊन ३ दिवस माक्याचे रसांत खल करावा. गोळी वालप्रमाण बांधावी. अनुपान योजून द्यावी ती येणेंप्रमाणें—१ मोडशीस लिंबाचे रसांत. २ वातव्याधीस मधांत. ३ क्षयरोगास गूळ व पिंपळीचें चूर्ण यात. ४ विंचवाचे व सर्पाचे विषास गोळी उगाळून पाण्यांत अंजन करावें. ५ दाढेचे किडीस वावडिंगाचे दाणे व गोळी दाढेंत धरावी. ६ मुखदुर्गंधीस मधेंत ७ कृमीस साखरेंत. ८ निर्गुडीच्या रसाशीं घेतली असतां धातुस्राव व स्वप्नावस्था बंद होईल. ९ सर्वांगाचीं हाडें दुखत असल्यास गोमूत्रांत. १० वायगोळ्यास कोरफडीच्या रसांत. ११ चित्तशुद्धीस ह्मशीचे दुधांत. १२ खरजेस दह्यांत. १३ रक्तपित्तास आडूळशाचा रस व मध यांत. १४ शरीर घट्ट होण्यास जिरें व वेखंड यांचे चूर्णांत. १५ फार घाम येत असल्यास अक्कलकाला व गोळी पाण्यांत उगाळून अंगास लेप करावा. १६ मुरड्याचे हगवणीस धोत्र्याचे पाल्याचे रसांत. १७ जतविकारास बाभळीचे रसांत. १८ अर्धशिशीस गोळी पाण्यात उगाळून नाकांत घालावी. १९ मूळव्याधीस जायफळाचे चूर्णांत. २० सर्व प्रकारचे विषांस तोंडलीच्या रसांत. २१ प्रमेहास जुन्या गुळांत. २२ खोकल्यास आडुळशाचे रसांत. २३ क्षयास शेळीच्या दुधांत. २४ साधारण ज्वरास साखरेंत. २५ दाह झाल्यास निंबाचा रस व नवसागर यांत उगाळून अंगाला लावावी. २६ निंबाच्या रसांत धावड्याचा डिंक व ही गोळी उगाळून लेप केला असता अंगावर पडलेले कोडाचे पांढरे ठिपके जातील.

१७ सूर्यप्रभागुटी—दारुहळद, त्रिकटू, वावडिंग, चित्रक, वेखंड, हळद, करंज, गुळवेल, देवदार, अतिविष, तेड, कुटकी, धणे, ओंवा, यवखार, टांकणखार

सैंधव, बिडलोण, कांचलोण, गजपिंपळी, चित्रक, बिबवे, तालीसपत्र, पिंपळमूळ, पुष्करमूळ, किराईत, भारंगमूळ, पद्मकाष्ठ, जिरें, जायफळ, कुड्याची साल, दांतीमूळ व नागरमोथे, हीं प्रत्येक एकेक तोळा व त्रिफळा २० तोळे, शिलाजीत २० तोळे, गुग्गुळ ८ तोळे, लोहभस्म २८ तोळे, सुवर्णमाक्षिक भस्म ८ तोळे, खडीसाखर २० तोळे व वंशलोचन, दालचिनी, तमालपत्र, एलची हीं चार चार तोळे घेऊन सर्व एकत्र करून चूर्ण करावें. नंतर तूप मध यात खलून १ तोळ्याची गोळी बांधावी व सेवन करावी; ह्मणजे मुखशोष, खोकला, उरःक्षत, तमकश्वास, पांडुरोग कामला, गुल्म, विद्रधि, पार्श्वशूल, उदर, स्त्रियांचा क्षय, कृमि, कोड, मूळव्याध, विषमज्वर, संग्रहणी व मूत्रावरोध यांचा नाश करते. या पृथ्वीतलामध्यें सूर्यप्रभागुटीसारखी गुण करणारी दुसरी गोळी नाही. ही प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें आपल्या स्वमुखानें सांगितली आहे.

---

## चूर्ण.

१ **अग्निमुखचूर्ण**—हिंग भाजलेला १, वेखंड २, पिंपळी ३, सुंठ ४, ओंवा ५, बाळहिरडे ६, चित्रक ७ व कोष्ठ ८ भाग या औषधांचें चूर्ण, चार माशांपासून सहा माशांपर्यंत मद्य, दह्याची निवळी किंवा गरम पाणी यांजबरोबर द्यावें; ह्मणजे उदावर्त, अजीर्ण, प्लीहा, उदर, अंगपाक, भक्षिलेलें विष, मूळव्याध, शूल, गुल्म, कास, श्वास व क्षयरोग, या सर्वांचा नाश होतो. हें अग्नि प्रदीप्त करणारें असून कधींही पराभव पावत नाही.

२ **आस्कंदचूर्ण**—आसकंद ४० तोळे, सुंठ २० तोळे, पिंपळी १० तोळे मिरीं चार तोळे व चातुर्जात, जाडी दालचिनी, भारंगमूळ, तालीसपत्र, कचोरा, ओंवा, कायफळ, जटामांसी, कंकोळ, नागरमोथे, रास्ना, कुटकी, जीवंती व कोष्ठ, हीं एकेक तोळा घेऊन चूर्ण करावें. व त्यासमान साखर घालून सर्व एकत्र करावें. १० माशांपर्यंत बलाबल पाहून प्रातःकाळीं द्यावें. कफक्षयावर मधाशी, प्रमेहावर लोण्याशीं, शिरोभ्रमण व पित्तव्याधि यास गोखरूशीं द्यावें. हें विशेषेंकरून क्षतक्षीण व क्षीणदेह, यांचे बलाची वृद्धि करितें व ऊन पाण्याशी मेद, उदर, मंदाग्नि, कुक्षिशूल यांचा सर्व व रोगाचा नाश करितें

३ **उदरावर चूर्ण**—जवखार, ओंवा, सैंधव, आम्लवेतस, हिरडेदळ, वेखंड, व हिंग भाजलेला, याचें चूर्ण कोंबट पाण्याशीं द्यावें, म्हणजे सात दिवसात गुल्म ( वायगोळा ) शुलयूक्त होऊन सर्व उदर व्यापिलें असलें तरी त्याचा नाश होऊन अग्नि प्रदीप्त होतो, यांत संशय नाहीं. आम्लवेतसाच्या अभावी आंबटचुका घ्यावा परंतु आम्लवेतसाचे गुण अधिक आहेत.

४ उशीरादिचूर्ण—काळा वाळा, पांढरा वाळा, तमालपत्र, कोष्ठ, कोळिंजन, आंवळकठी, सफेत मुसळी, वेलदोडे, रेणुकबीज, मनुका, केशर, नाकेशर, कमळांतील केशर, कापूर, चंदन, रक्तचंदन, त्रिकटू, साळीच्या लाह्या, आस्कंद, शतावरी, गोखरु, काकडशिंगी, जाई, कंकोळ व गठोणा ही सर्व औषधें समभाग घेऊन चूर्ण करावें. आणि १ भाग चूर्ण, दोन भाग तूप, व साखर याप्रमाणें एकत्र करून सेवन करावें. अथवा खडीसाखर व मध यात सेवन करावें, म्हणजे क्षय, रक्तपित्त, पाददाह, प्रदर, मूत्राघात, मूत्रकृच्छ्र, रक्तस्राव, ८० प्रकारचे वायू व विशेषेंकरून मेह यांचा नाश होतो.

५ कट्फलादि चूर्ण—कायफळ, नागरमोथे, कुटकी, कचोरा, काकडशिंगी, व पुष्करमूळ यांचें चूर्ण ६ मासेपर्यंत मधाशीं किंवा आल्याचे रसाशीं द्यावें. म्हणजे जीर्णज्वर, खोकला, श्वास, अरुचि, वायु, शूल, ओकारी व क्षय यांचा नाश होतो.

६ कट्फलादि चूर्ण २ रें—कायफळ, पोखरमूळ, पिंपळी, काकडशिंगी, नागरमोथे, सुंठ, मिरें, पिंपळी, कचोरा, हीं आठ औषधें समभाग घेऊन वस्त्रगाळ चूर्ण करावें. व आल्याचे रसांत अथवा मधांत द्यावें, तेणेंकरून कफ दूर होतो. शूळ, वायु, अरुचि, ओकारी, कास, श्वास, व क्षयरोग हे दूर होतात.

७ खांडवचूर्ण—तालीसपत्र, चवक, मिरी, सैंधव व नाकेशर ही एकेक भाग, पिंपळी, पिपळमूळ, जिरें, चिंच, चित्रक व दालचिनी हीं प्रत्येक दोन दोन भाग नागरमोथे, वाळलेलें बोरकूट, धणे, एलची, अजमोदा, आम्लवेतस व सुंठ ही प्रत्येक तीन तीन भाग, साखर १९ भाग व डाळिंबाची साल ५॥ भाग, या सर्व औषधांचें चूर्ण करून बलाबल पाहून अनुपान योजून द्यावें. म्हणजे अतिसार, कृमि, वांति. अरुचि, अजीर्ण, गुल्म, पोट फुगणें, अग्निमांद्य, मुखरोग, उदररोग, गलरोग, मूळव्याध, हृद्रोग, मृत्तिकाभक्षणजन्यरोग, श्वास आणि खोकला यांचा नाश होतो.

८ गोरोचन चूर्ण—गोरोचन, मिरें, रास्ना, कोष्ठ व पिंपळी यांचें चूर्ण गरम पाण्याशीं घेतलें असतां तें संपूर्ण ज्वरांचा नाश करील.

९ चित्रकादि चूर्ण—चित्रक, सुंठ, भाजका हिंग, पिंपळी, पिंपळमूळ, चवक, अजमोदा व मिरें, ही प्रत्येक एकेक तोळा, सज्जीखार, जवखार, सैंधव, सचळ, बीडलोण, समुद्रमीठ व बागडखार हीं प्रत्येक सहा सहा मासे या साऱ्या औषधांचें चूर्ण करून महाळुंगाच्या रसाचीं कांहीं पुटें द्यावीं, अथवा डाळिंबाच्या फळाच्या रसाची काहीं पुटें द्यावीं. मग उन्हांत वाळवून हें चूर्ण घेतलें असतां गुल्म, संग्रहणी व आव ही दूर होतात. व अग्नि प्रदीप्त होतो. तोंडास रुचि येते.

१० चित्रकादि चूर्ण २ रें—चित्रकमूळ सावलींत वाळवून चूर्ण करावें तें तूपाबरोबर किंवा मधतुपाबरोबर चाटावें अथवा दुधाबरोबर अगर पाण्याबरोबर

घ्यावें व हितकारक अन्न खावें, ब्रह्मचर्य असावें. एक महिना औषध घेतलें असतां काहींएक रोग न होतां शंभर वर्षें वांचतो. व धारणा, बळ, सौंदर्य, पुष्टता व जठराग्नीची प्रखरता ही प्राप्त होतात. एक महिनापर्यंत चित्रकाचें चूर्ण तिळाचे तेलांत कालवून चाटलें असतां मोठमोठे वातरोग दूर होतात. गोमूत्राबरोबर प्यालें असतां कोड व कुष्ठें हे विकार दूर होतात. आणि ताकाबरोबर प्यालें असतां मूळव्याध नाहींशी होते.

११ **चंदनादि चूर्ण**—चंदन, वाळा, कोष्ठ, नागरमोथे, आंवळकठी, कचोरा, कमळाचें फूल व मनुका, हीं सर्व औषधें समभाग घेऊन चूर्ण करावें. त्यासमान अंतरवडीसाखरेचें चूर्ण मिळवून दहा मासेपर्यंत हें चूर्ण थंड पाण्याशी सेवन करावें. म्हणजे रक्तपित्त, गुल्म, पित्त, अंगदाह, मस्तकाचा भ्रम, प्रमेह, पित्तज्वर तमकश्वास व शीतपित्त यांचा नाश होतो.

१२ **त्रिफलाचूर्ण**--हिरडेदळ, १, बेहेडेदळ २, आणि आंवळकठी ४, भाग घेऊन चूर्ण करावें याला त्रिफळा असें म्हणतात. ही त्रिफळा घेतली असतां प्रमेह, सूज, विषमज्वर, कफ, पित्त व कुष्ठ हे दूर होतात. अग्नि प्रदीप्त होतो. हीं त्रिफळा रसायनी आहे. म्हणजे शरीराची जरा व व्याधी दूर करिते. हीं तूप आणि मध ही दोन विषम भागानें एकत्र करून त्यांत घेतली असतां सारे नेत्ररोग दूर होतात.

१३ **द्राक्षादिचूर्ण**—मनुका, साळीच्या लाह्या, खडीसाखर, जेष्टीमध, खजूर, उपळसरी, वंशलोचन, वाळा, आंवळकठी, नागरमोथे, चंदन, तगर, कंकोळ, जायफळ, दालचिनी, तमालपत्र, एलची, नाकेशर, पिपळी व धणे ही सर्व समभाग व या सर्वांसमान साखर घालून बलाबल पाहून एक तोळापर्यंत प्रातःकाळीं हें चूर्ण सेवन केलें असतां पित्त, दाह, मूर्छा, ओकारी, अरुचि, पांडुरोग, कांवीळ, रक्तपित्त, उदर, दाह, राजयक्ष्मा, रक्तप्रमेह, योनिदोष, रक्तार्श, अंडवृद्धि व विद्रधि यांचा नाश होऊन शरीराला कांति देतें. हें चूर्ण सर्व चूर्णांत उत्तम आहे. हें चूर्ण सेवन करून वर थंड पाण्याचा घोट घ्यावा.

१४ **द्राक्षादिचूर्ण २ रें**—बिया काढलेल्या मनुका, चंदन, कोष्ठ, नाकेशर, वंशलोचन, जायफळ, कंकोळ, सफेत पुनर्नवा, सफेत मुसळी, आंवळकठी, व आस्कंद, यांचें चूर्ण सहा मासेपर्यंत खडीसाखर व तूप यांत द्यावें. म्हणजे धातुक्षीणता, शक्तिक्षय, मूतखडा, रक्तपित्तापासून श्रम होतात ते दूर होऊन मनुष्य हुशार होतो.

१५ **नाराचचूर्ण**—शेपा, वेखंड, कोष्ठ, बाळंतशेपा, जिरें, धणे, टांकणखार, यवखार, पिपळी, पिपळमूळ, कचोरा, ओंवा, काळें जिरें, पिसोळा, आस्कंद, कडू वृंदावन, व चित्रक ही एकेक भाग, व तेड २, जेपाळ ३, व शेरणी ३, भाग यांचें

चूर्ण करावें. सहा मासेपर्यंत ऊन पाण्याशीं द्यावें, म्हणजे गुल्म, आनाह, विष, अजीर्ण, दमा, खोकला, गलग्रह, सूज, मूळव्याध, संग्रहणी, आणि पांच प्रकारचे गुल्म यांचा नाश होतो, हें रेचनाविषयीं फार प्रसिद्ध आहे.

१६ **नाराचचूर्ण २ रें**—चित्रकमूळ, त्रिफळा, त्रिकटू, जिरें, शेरणी, वेखंड, अजमोदा, पिंपळमूळ, बडीशेप, रानतुळस, ओंवा, कचोरा, धणे, वावडिंग, काळें जिरें, चोख, पोखरमूळ, सज्जीखार, जवखार, सैंधव, संचळ, बिडलोण, समुद्रमीठ, बागडखार, व कोष्ठ, हीं सत्तावीस औषधें एकेक भाग, कौंडळीचें मूळ २ भाग, निशोत्तर ३ भाग, दांतीमूळ ४ भाग, कांडे निवडुंगाचें मूळ ९ भाग यांचें चूर्ण करून तें बलाबल पाहून सहा मासेपर्यंत ढाळक होण्यास द्यावें. तेणेंकरून सर्व रोग दूर होतात. हृद्रोग, पांडुरोग, श्वास, कास, भगंदर, अग्निमांद्य यांजवर योग्य अनुपान योजून द्यावें. पोटफुगीवर मधांत, गुल्मावर बोरीचे काढ्यांत, मलबद्धास दह्याचे निवळींत, अजीर्णास उन पाण्यांत, गुदाचेठायीं कातरल्यासारखी पीडा होते तीस चिंचेच्या सालीच्या काढ्यांत, उदररोगास उंटिणीचे दूधांत अथवा गाईचे ताकांत, वातरोगास मधांत, मूळव्याधीस डाळिंबाचे पाण्यात. स्थावर व जंगम विषास तुपांत द्यावें. या चूर्णानें सर्व दुष्ट रोग दूर होतात. ( अनुपान प्रकरण पहा. )

१७ **नवायसचूर्ण**—चित्रक, त्रिफळा, त्रिकटू, नागरमोथे, व वावडिंग, हीं समभाग घेऊन चूर्ण करून त्याचे समान लोहभस्म घेऊन चूर्णांत मिळवावें. मग तें चूर्ण मध व तूप यांत अथवा गोमूत्रांत किंवा गाईचे ताकांत द्यावें. तेणेंकरून मोठा उग्र असा पांडुरोग, त्रिदोष, भगंदर, सूज, कुष्ठ, उदररोग, मूळव्याध, अग्निमांद्य, अरुचि, व जंतविकार हे रोग दूर होतात.

१८ **पंचनिंबचूर्ण**—पान, मूळ, फळ, फूल व साल अशीं पांच अंगें कडू निंबाची ६० तोळे घेऊन, लोहभस्म, बाळहिरडे, टाकळ्याचें बीज, चित्रक, बिबवे, वावडिंग, साखर, आंवळकाठी, हळद, पिंपळी, मिरें, सुंठ, वावच्या, बहाव्याच्या शेंगेंतील मगज, व गोखरु,हीं पंधरा औषधें चार चार तोळेप्रमाणें घेऊन सान्यांचें चूर्ण करावें. मग निंबाचें चूर्ण व हें चूर्ण एकजागीं करून माक्याचे रसाचें पुट देऊन वाळवावें. मग खैराच्या सालीचा काढा करून त्याचें एक पुट द्यावें. मग तें बिवळ्याचे सालीचा अथवा असाण्याच्या सालीचा काढा करून त्याचें एक पुट चूर्णास देऊन वाळवावें. मग तें चूर्ण ३ मासेप्रमाण खैराच्या सालीचे काढ्यांत द्यावें. अथवा बिबळ्याच्या सालीचे काढ्यात किंवा तुपांत अथवा गाईचे दुधात द्यावें, तेणेंकरून एक महिन्यांत सारीं कुष्ठें दूर होतात, हें चूर्ण रसायन आहे.

१९ **पंचसमचूर्ण**--सुंठ, हिरडेदळ, पिंपळी, निशोत्तर व संचळ, हीं औषधें समभाग घेऊन बारीक चूर्ण करावें. हें चूर्ण घेतलें असतां शूळ, पोटफुगी, अग्निमांद्य, मूळव्याध, आमवायु, हे रोग दूर होतात.

२० **पत्रकादिचूर्ण**—तमालपत्र १, दालचिनी ४, एलची ६, तगर ८, चंदन १०, सांवे १२, सुंठ १४, जेष्टीमध १६, कमळ १८, आंवळकठी २०, व आडूळसा २२ भाग, या औषधांचें द्विगुणोत्तर भागाप्रमाणें चूर्ण करून दहा मासेपर्यंत साखर व मध याशीं द्यावें; ह्मणजे ज्वर, रक्तपित्त, खोकला, क्षय, रक्तकृच्छ्र, रक्ताची वांति, गात्रें गळतात तो रोग, स्मृतिनाश, ऊर्ध्ववात, दमा, खोकला, हृद्रोग, मनसंताप, अंगताप, योनिरोग, प्रदररोग, मुख, गुद, नाक, शिश्न, व योनि यांपासून पुष्कळ रक्त स्रवतें तें, आणि रक्तपित्त यांचा नाश होतो.

२१ **पिप्पलीचूर्ण**—पिंपळी १ तोळा, निशोत्तर ४ तोळे व साखर ४ तोळे, यांचें चूर्ण एकजागीं करून मधांत घेतलें असतां पोटफुगी दूर होते. व मलबद्धता, उदररोग, कफ, पित्तशूळ, हे ूर होतात.

२२ **मरिच्यादिचूर्ण**—मिरी १, चित्रक २, पादेलोण ३, या तीन औषधांचें चूर्ण ताकांत नित्य प्यालें असतां संग्रहणी, उदर, पान्थरी, मंदाग्नि, गुल्म, व मूळव्याध, ही दूर होतात.

२३ **यवानीखांडव चूर्ण**—अजमोदा, डाळिंबसाल, सुंठ, चिंचेची साल, आम्लवेतस व आंबट बोर, हीं प्रत्येक चार चार भाग, मिरें २॥ भाग, पिंपळी १० भाग, दालचिनी, संचळ, धणे, जिरें, ही चार औषधें दोन दोन भाग व साखर ६४ भाग घ्यावी. ही सर्व एकत्र करून चूर्ण करावें. हें चूर्ण अनुपानपरत्वें घेतलें असता पांडुरोग, हृद्रोग, संग्रहणी, ज्वर, ओकारी, शोप, अतिसार, पोटांत डावेकडेस कवलुरोग होतो तो. मलबद्ध, अरुचि, शूळ, मंदाग्नि, मूळव्याध, जिभेचे रोग, कंठरोग, हे सारे रोग दूर होतात. ( अनुपान प्रकरण पहा. )

२४ **लघुगंगाधर चूर्ण**—नागरमोथे, इंद्रजव, कोंवळें बेलफळ, लोध्र, मोचरस व धायटीची फुलें, यांचें चूर्ण करून ताकांत गूळ मिळवून त्यांत तें चूर्ण टाकून द्यावें म्हणजे सारे अतिसार दूर होतात. व पातळ हगवणही बंद होते.

२५ **लवणत्रितयादि चूर्ण**—सैंधव, संचळ, बिडलोण, सज्जीखार, यवखार, बडीशेंप, वेखंड, अजमोदा, रानतुळस, शेरणी, जिरें, शहाजिरें, मिरें, पिंपळमूळ, पिंपळी, गजपिंपळी, हिंग भाजका, बाफळ्या, कचोरा, पहाडमूळ, काळीं द्राक्षें, सुंठ, चित्रक, चवक, वावडिंग, आम्लवेतस, डाळिंबसाल, चिंचेची साल, निशोत्तर, दातीमूळ, शतावरी, कडू वृंदावन, भारंगमूळ, देवदार, अजमोदा, धणे, चिरफळ, पोखरमूळ, बोरें व बाळहिरडे, हीं औषधें समभाग घेऊन चूर्ण करावें. मग त्या चूर्णास आल्याच्या रसाचें १ पुट व महाळुंगाचे रसाचें १ पुट देऊन वाळवावें. मग हें चूर्ण तुपांत अथवा जुन्या मद्यांत अथवा उन पाण्यांत अथवा बोरीचे काढ्यात अथवा गाईचे ताकांत किंवा उंटिणीचे दुधात किंवा दह्याचे निवळीत घालून द्यावें. याप्रमाणें ज्या अनुपानाचा ज्या रोगास उपयोग पडेल तसें अनुपान योजून द्यावें तेणेंक-

रून पोटांत उजवेकडे यकृतरोग होतो तो, डावीकडे कवलुरोग होतो तो, व कंबरेचा शूळ, गुदरोग, कुशीचा शूळ, हृद्रोग, मूळव्याध, मळाचा अवरोध, अग्निमांद्य, गुल्म, अष्ठीला या नांमेकरून वायूचा रोग होतो तो, व उदररोग, उचकी, पोटफुगी, श्वास व कास हे रोग दूर होतात. अथवा याच औषधांचा काढा करून त्यांत तूप घालून तूप शेष राहितोंपर्यंत पचन केलें असतां तें घेतल्यानें वर सांगितलेले रोग दूर होतात.

२६ **लवंगादिचूर्ण**—लवंगा, जायफळ व पिंपळी, हीं प्रत्येक अर्धा तोळा मिरीं २ तोळे, व सुंठ १६ तोळे, यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून त्या चूर्णासमान साखर घालून एकत्र करून बलाबल पाहून द्यावें; म्हणणें प्रवळरोग, खोकला, ज्वर, अरुचि, प्रमेह, गुल्म, श्वास, अग्निमांद्य आणि संग्रहणी रोग याचा नाश होतो.

२७ **लवंगादिचूर्ण दुसरें**—लवंग, शुद्ध, कापूर(भीमसेनी कापूर) विलायची, दालचिनी, नागकेशर, जायफळ, वाळा, सुंठ, शहाजिरें, कृष्णागर, वशलोचन, जटामांसी, निळें कमळ, पिंपळी, पांढरा चंदन, तगर, काळावाळा व कंकोळ, हीं औषधें समभाग घेऊन चूर्ण करून त्याचे अर्धी साखर घेऊन एक जागी मिळवावीं. हें चूर्ण राजास देण्याविषयीं योग्य आहे. अनुपानपरत्वें द्यावें ह्मणजे अग्नि प्रदीप्त होतो. तोंडास रुचि येते, शरीर पुष्ट होतें, स्त्रीविषयीं इच्छा होते, वात, पित्त, कफ, यांचा प्रकोप दूर होतो. शक्ति येते आणि हृद्रोग, कंठरोग, श्वास, उचकी, पडसें क्षय, तमकश्वास, अतिसार, उरःक्षतरोग, प्रमेह, अरुचि, गुल्म व संग्रहणी हे रोग दूर होतात. ( अनुपान प्रकरण पहा. )

२८ **वडवानल चूर्ण**—सैंधव, संचळ, जवखार, सज्जीखार, पापडखार, टांकणखार, कांचलोण, बिडलोण, समुद्रमीठ, नवसागर, फटकी व हिराकस हे सर्व क्षार प्रत्येक अडीच अडीच तोळे घेऊन बारीक चूर्ण करावें. नंतर एका लाखलेटे मडक्यांत शेळीचें मूत्र ३ शेर व वरील खाराचें चूर्ण त्यांत घालावें नंतर त्यासमान कोरफडीचा रस घालावा. व तें मडकें चुलीवर ठेवावें व खाली खैराचे किंवा बाभळीचे लांकडाचा अग्नि द्यावा. मधून मधून पळीनें ढवळून सारखें करीत जावें. आंतील औषधास पांढरा रंग येई तोंपर्यंत कढवून नंतर खाली उतरून खलात घालून बारीक सारखें करावें. नंतर तें औषध कुपींत भरून ठेवावें. दररोज प्रातःकाळी एक तोळापर्यंत निंबाच्या रसात किंवा गोमूत्रात देत जावें याप्रमाणें औषध पचल्यास दोन्ही सांज देत जावें. हें औषध १४ किंवा २१ दिवस सेवन केलें असतां सर्व प्रकारचीं उदरें, विशेषेंकरून पांथरी, यकृत्, उदरशूळ व इतर पोटांतील लहानसहान रोग नाहीसे होऊन अग्नि प्रदीप्त होतो.

२९ **विजयादि चूर्ण**—त्रिकटू, त्रिफळा, त्रिसुगंध, वेखंड, हिंग, पाहाडमूळ, सैंधव, संचळ, हळद, दारुहळद, चवक, कुटकी, इंद्रजव, शतावरी, पंचलवणें, पिंपळमूळ, कोंवळें बेलफळ व अजमोदा, हीं सर्व समभाग घेऊन चूर्ण करून दहा

मासेपर्यंत ऊन पाण्याशीं किंवा एरंडेल तेलाशीं द्यावें. ह्मणजे सर्व प्रकारच्या मूळव्याधि, श्वास, शोष, भगंदर, हृदयांतील शूळ, पार्श्वशूल, वातगुल्म, उदर, उचकी, पांडुरोग, प्रमेह, कामला, आमवात, उदावर्त, अंडवृद्धि, कृमि व संग्रहणी यांचा नाश करितें. हें चूर्ण सर्व व्याधिनाशक आहे. व महाज्वर, भूतबाधा व वंध्या स्त्रियांना हें औषध हितकारक आहे.

३० **वृद्धगंगाधरचूर्ण**—सुंठ, नागरमोथे, टेंटू, धायटीचीं फुलें, लोध्र, वाळा, कोंवळें बेलफळ, मोचरस, पाहाडमूळ, इंद्रजव, कुड्याची साल, आंब्याची कोय, अतिविष व लाजाळू, यांचें चूर्ण सहा माशांपर्यंत मध व तांदुळाच्या धुवणांत द्यावें. ह्मणजे प्रवाहिका, ( पातळ हगवण ) व सारे अतिसार आणि संग्रहणी हे रोग दूर होतात; हें चूर्ण फारच उत्तम आहे.

३१ **सितोपलाचूर्ण**—खडीसाखर ८, वंशलोचन ४, पिपळी २, एलची १, दालचिनी ·॥· भाग, यांचें चूर्ण दहा मासेपर्यंत मध व तूप यांत द्यावें. ह्मणजे श्वास, खोकला, क्षय हातापायांचा व डोळ्यांचा दाह, अग्निमांद्य, व जीभ शून्य पडते ती, पाठीचा शूळ, अरुचि, ज्वर, मस्तकांतील रक्तविकार व पित्तविकार, हे दूर होतात.

३२ **सुदर्शनचूर्ण**—त्रिफळा, दारुहळद, हळद, रिंगणी, मोतरिंगणी, कचोरा, त्रिकटू, पिंपळमूळ, मोरवेल, गुळवेल, धमासा, कुटकी, पित्तपापडा, नागरमोथा, त्रायमाण, काळा वाळा, कडू निंब, पुष्करमूळ, जेष्टीमध, कुड्याचें मूळ, अजमोदा, इंद्रजव, भारंगमूळ, शेवग्याचें बिज, तुरटीची लाही, वेखंड, दालचिनी, पद्मकाष्ठ, वाळा, पांढरा चंदन, अतिविष, चिकणामूळ, रानगाजा, रानभाल, वावडिंग, तगर, चित्रक, देवदार, चवक, कडू पडवळ, भुईकोहळा, लवंगा, वंशलोचन, पांढरें कमळ, जेष्टीमध, जायपत्री, व तालीसपत्र, ही सर्व औषधें समभाग घेऊन त्या सर्वांच्या निम्मे किराईताचें चूर्ण, आंत मिळवून हें चूर्ण दहा मासेपर्यंत थंड पाण्यांत द्यावें; तेणेंकरून वात, पित्त, कफ, व सारे पुराणे ज्वर दूर होतात यांत संशय नाहीं. वातपित्तज्वर, वातकफज्वर, आगांतुकज्वर, धातुगतज्वर, विषमज्वर, सन्निपातज्वर, मानसज्वर, शीतज्वर, व ऐकाहिकज्वर हे दूर होतात. मोह, डोळ्यांवर झांपड पडते ती, भ्रम, तृषा, श्वास, खोकला, पांडुरोग, हृद्रोग व कांवीळ हे रोग दूर होतात. पाठीचा माज, पाठ, कंबर, गुडघे, व कुशी यांचा शूळ दूर होतो. यास दृष्टांत जसें दानवांचा नाश करणारें सुदर्शन चक्र आहे तसेंच या साऱ्या ज्वराचा नाश करणारें हें सुदर्शन चक्र आहे असें जाणावें.

३३ **हरिद्रादिचूर्ण**—हाळद, कडू निंबाचीं पानें, मिरीं, नागरमोथे, वावडिंग, सुंठ, सैंधव, चित्रक, कोष्ठ, अतिविष, पहाडमूळ, आणि हरितकी ही सर्व समभाग घेऊन शेळीचे मुतात घोटावी. व हे चूर्ण गोमूत्रात मिळवून नस्यार्थ द्यावें. व रक्ताबरोबर याचें अंजन करावें. व रसांजनाचे काढ्यात खाण्यास द्यावें. ह्मणजे

विषमज्वर जातो. सन्निपातावर मध व त्रिकटूचें चूर्ण यांत; शीतज्वरावर गोमूत्राशीं किंवा मधाशी. रक्तपित्तावर आडूळशाचे रसात, क्षय, श्वास, कास यांस दूध व आस्कंदाचें चूर्ण यांत; संग्रहणीस ताकांत; मूत्रकृच्छ्रास तांडुळाचे धुवणांत; प्रमेहावर मधाशीं; गुल्म व शूळ यांस गुळाचें पाण्यांत; वायूवर उन पाण्यांत, व शूळावर आल्याचे रसांत; उदरावर लेप करावा.

३४ **हिंग्वादिचूर्ण**—भाजका हिंग, पाहाडमूळ, वाळहिरडे, धणे, डाळिंबाची साल, चित्रक, कचोरा, अजमोदा, सुंठ, मिरीं, पिंपळी, शेरणी, आम्लवेतस, रानतुळस, चिंचेची साल, जिरें, पोखरमूळ, वेखंड, चवक, सज्जीखार, जवखार, सैंधव, संचळ, बिडलोण, समुद्रमीठ व बागडखार, ही सव्वीस औषधें समभाग घेऊन चूर्ण करून बलाबल पाहून भोजनाच्या आधीं अथवा भोजनामध्यें द्यावें; तेणेंकरून वातकफापासून झालेलें गुल्म नाश पावतात. गाईचे ताकात अथवा उन पाण्यात दिलें असतां अष्ठीला नामें पोटांत वायु होतो तो, हृदय, वस्ति व कुशी यांचा शूल, योनिशूल, मूत्रकृच्छ्र, मलबद्धता, पांडुरोग, अरुचि, उचकी, यकृत्, श्वास, कास, कंठरोग, संग्रहणी व मूळव्याध हे रोग दूर होतात.

---

## गुग्गुळ.

१ **कैशोरगुग्गुळ**—नवीन उत्पन्न झालेल्या टोणग्याचे डोळ्याचे पोटाप्रमाणें ज्याचा रंग लाल असेल असा गुग्गुळ ६४ तोळे घेऊन त्याबरोबर ६४ तोळे गुळवेल व त्रिफळा घेऊन त्यास पाण्यांत टाकून काढवावें. अर्धें पाणी आटेपर्यंत पक्कीनें ढवळावें. नंतर उतरून गाळून घ्यावें. आणि पुन्हा कढत ठेवावें. चांगलें दाट झाल्यावर उतरून ठेवावें आणि थंड झाल्यावर त्यांत हिरडेदळ ८, सुंठ २, मिरी २, पिपळी २, वावडिंग ४, तेड १, व गुळवेल ८ तोळे, याप्रमाणें टाकून फार वेळ सर्वांचा एकजीव होईतोंपर्यंत खल करावा. नंतर गाईचे तुपानें रावलेलें मडकें घेऊन त्यांत भरून तोंड बांधून ठेवावें. नंतर देवता, अतिथि यांची पूजा करून अग्निबळ, व व्याधीचें बलाबल पाहून मात्रा अनुपानपरत्वें द्यावी यथेच्छ इच्छेस येईल त्याप्रमाणे आहार करावा. पाहिजे त्यावेळेस औषध द्यावें. हें औषध शरीर व्यापणारें असें वातरक्त एक, दोन किंवा तीन दोपानें व्याप्त असें फार दिवसाचें, स्राव बंद झालेलें, शुष्क व फुटलेलें, आणि व्रण, कास, गुल्म, कुष्ठ, सूज, उदर, पांडुरोग, मेद, मंदाग्नि, पोट फुगणें व प्रमेह याचा नाश करितें. आणि सतत सेवन केलें असतां कालेंकरून सर्व रोगाचा नाश होतो. आणि जरा दूर करून तारुण्य प्राप्त होतें. ( अनुपान प्रकरण पहा. )

२ **गोक्षुरादि गुग्गुळ**—गोखरु ९६ तोळे घेऊन थोडे कुटून त्यात सहापट पाणी घालून त्यात अर्धें पाणी राहितोंपर्यंत आटवावें. नंतर शुद्ध केलेला गुग्गुळ

१४ तोळे घेऊन चांगला कुटून अथवा वांटून त्या काढ्यांत घालून फिरून गुळाच्या पाकासारखा दाट होईतोंपर्यंत पाक करावा. आणि त्यात त्रिकटू, त्रिफळा व नागरमोथे, ही सात औषधें दोन दोन तोळे घेऊन चूर्ण करून त्या पाकांत मिळवून त्याच्या बोराच्या आठीएवढ्या गोळ्या कराव्या. १ गोळी अनुपान योजून द्यावी. तेणेंकरून मूत्रकृच्छ्र, प्रमेह, स्त्रियांस धुपणी लागते ती, मूत्राघात, वातरक्त, वातरोग, धातूचा विकार व मूतखडा हे रोग दूर होतात. ) अनुपान प्रकरण पहा. )

३ त्रयोदशांग गुग्गुळ—बाफळीचें बी, आस्कंद, शेरणी, गुळवेल, शतावरी, गोखरु, रास्ना, पिपळी, वडशेप, कचोरा, ओंवा व सुंठ या सर्वांची चूर्णे समभाग घेऊन त्या सर्वांबरोबर शुद्ध केलेला गुग्गुळ व गुग्गुळाचे निम्में तूप घालावें; म्हणजे सिद्ध झाला. हा १ तोळा प्रातःकाळी सुरा, यूप, मद्य, कोंबट पाणी, दूध किंवा मांसरस यातील एकाबरोबर द्यावा; म्हणजे त्रिकातील ग्रह, जानुग्रह, भुजस्थवात, चरणस्थितवात, स्नायूगतवात, कोष्ठगतवात, व वातापासून झालेले व्याधी, वातापासून हृदयशूळ, योनिदोष, भग्नास्थि ( फुटलेलें हाड ) खंजवात, गृध्रसी व पक्षाघात यांचा नाश होतो.

४ द्वात्रिंशक गुग्गुळ—त्रिकटू, त्रिफळा, नागरमोथे, वावडिंग, चवक, चित्रक, दालचिनी, वेलदोडे, पिंपळमूळ, शेरणी, देवदार, चिरफळ, पोखरमूळ, कोष्ठ, कोळिंजन, अतिविष, दारुहाळद, हाळद, बाफळी, जिरें, सुंठ, कांटेसेवंती, धमासा, पादेलोण, वावडिंग, जवखार, टांकणखार, गजपिंपळी व सैंधव, ही एकेक भाग व सर्वांबरोबर गुग्गुळ घेऊन चालीप्रमाणें सिद्ध करावा. बोराच्या आठोळीएवढी गोळी करून मध किंवा तूप यांत प्रातःकाळीं द्यावी; म्हणजे आम, उदावर्त, अंडवृद्धि, गुदकृमि यांचा नाश होतो. व महाज्वर, भूतबाधा, अनाह, उन्माद, कुष्ठ, पार्श्वशूल हृद्रोग, गृध्रसी, हनुस्तंभ, पक्षाघात, अपतानक, सूज, प्लीहा, कामला व अपची याचा नाश होतो. हा गुग्गुळ धन्वंतरीकृत फार चागला आहे. म्हणून अनुपानपरत्वें सर्व रोगांचा नाश करितो. ( अनुपान प्रकरण पहा. )

५ पथ्यादिगुग्गुळ—हिरडेदळ ५०, बेहेडेदळ ५०, आंवळकठी ५०, कणगुग्गुळ ३२ तोळे, ही सर्व ५१२ तोळे पाण्यात रात्री भिजत घालून प्रातःकाळीं कढवून अर्धें शेष उरलें म्हणजे गाळून घेऊन पुन्हा लोखंडाचे पात्रात शिजवावें. थोडें दाट झालें म्हणजे खाली उतरून त्यात वावडिंग, दांतीमूळ, त्रिफळा, गुळवेल, पिंपळी, निशोत्तर, सुंठ व मिरीं या प्रत्येकाचें एक एक तोळा चूर्ण करून टाकावें; म्हणजे हा सिद्ध झाला, हा यथेष्ट आचरण व यथेष्ट भोजन करणाऱ्या मनुष्यानें सेवन केला असता रोगनाश करील. हा गृध्रसी, नूतन खंजवात, प्लीहा, उग्रजठर, पंगुत्व, पांडुत्व, कंडू, वांति, व वातरक्त याचा नाश करितो. हा पृथ्वीवर अप्रतिम सामर्थ्यवान् असा प्रसिद्ध आहे. बळेंकरून हत्तीसारखा, व वेगेंकरून घोड्यासारखा मनुष्यास करितो. हा आयुष्य, चक्षुर्बल, व पुष्टिबल यातें देतो. व

विषनाशक असून क्षतही बरें करितो. हा अनुपानपरत्वें सर्व रोगांवर द्यावा. ( अनुपान प्रकरण पहा. )

**६ योगराजगुग्गुळ**—सुंठ, पिंपळी, चवक, पिंपळमूळ, चित्रक, भाजलेला हिंग, अजमोदा, शिरस, जिरें, शहाजिरें, रेणूकबीज, इंद्रजव, पाहाडमूळ, वावडिंग, गजपिंपळी, कुटकी, अतिविष, भारंगमूळ, वेखंड व मोरवेल, हीं औषधें चार चार मासे व या औषधांचे दुप्पट त्रिफळा घ्यावा. मग सर्वांचें चूर्ण करून समभाग शुद्ध गुग्गुळ घ्यावा. व बारीक वांटून गुळाच्या पाकासारिखा पातळ करून त्यांत हें चूर्ण घालावें. मग त्यांत वंगभस्म, रौप्यभस्म, नागभस्म, लोहभस्म, अभ्रकभस्म, मंडूर व रससेंदूर हीं प्रत्येक चार चार तोळे त्या गुग्गुळांत घालून साऱ्याचा एक गोळा करून चार चार माशांच्या गोळ्या करून तुपानें रावलेल्या मडक्यांत ठेवाव्या. हा गुग्गुळ घेतला असता त्रिदोष दूर होतो, हें रसायन आहे. याला मैथुन व खाणें पिणें यांचा निषेध नाहीं. पथ्य केल्यावांचून गुण येतो. यापासून सारे वायूचे रोग, कुष्ठ, मूळव्याध, संग्रहणी, प्रमेह, वातरक्त, नाभीचा शूल, भगंदर, उदावर्त, क्षय, गुल्म, फेंफरें, उरोग्रह, अग्निमांद्य, कास, श्वास, अरुचि, हे रोग दूर होतात. पुरुषाचा धातुविकार दूर होतो. स्त्रियांचा विटाळाचा दोष दूर होतो. पुरुषाची धातू वाढवून पुत्र देणारा होतो. वांझोट्या स्त्रियाना गर्भ देतो. रास्नादि काढ्यांत घेतला असतां नानाप्रकारचे वायुरोग दूर होतात. मेदास मधांत—कुष्ठास कडू निंबाचे काढ्यांत—वातरक्तास गुळवेलीचे काढ्यांत—शूळ व सूज यास पिंपळीचे काढ्यांत—उंदराचें विषास कडू पडवळीचे काढ्यांत—डोळ्याचे रोगास त्रिफळ्याचे काढ्यांत—सर्व प्रकारचे वायुरोगांस पुनर्नव्याचे काढ्यांत द्यावा.

**७ योगराज गुग्गुळ २ रा**—चित्रक, सुंठ, मिरीं, पिंपळी, वावडिंग, सैंधव, नागरमोथे, दालचिनी, तालीसपत्र, चवक, वेलची, देवदार, कोष्ठ, कलखापरी, वाळा, ओंवा, किरमाणी ओंवा, रास्ना, गोखरू, धणे, जिरें, जवखार, अजमोदा, शतावरी व बडीशेप, हीं सर्व औषधें समभाग व या सर्वांबरोबर शुद्ध केलेला गुग्गुळ घ्यावा. नंतर सर्व एकत्र तुपांत खलून एकेक तोळ्याच्या गोळ्या करून, त्या गोळ्या तुपानें रावलेल्या मडक्यांत ठेवाव्या व त्यांतील एकेक गोळी भक्षण करावी आणि यथेच्छ आहारविहार करावा. याप्रमाणें केलें असतां हा गुग्गुळ दुष्ट आमवाताचा बलात्कारानें नाश करितो. सर्व वातरोगांचा नाश करणारा हा योग राजगुग्गुळ भूतलावर प्रसिद्ध आहे. हा मूळव्याध, गुल्म, उदर, आमवात, कवळु, अग्निमांद्य, आणि व्रण यांचा नाश करितो

**८ सप्तविंशति गुग्गुळ**—सुंठ, मिरीं, पिंपळी, हिरडा, बेहडा, आंवळकठी, नागरमोथे, वावडिंग, गुळवेल, चित्रकमूळ, चवक, एलची, पिंपळमूळ, हपुषा, ( राजहंस किंवा शेरणी ) देवदार, चिरफळ, पुष्करमूळ, चवक, कडूवृंदावन, हाळद, दारुहाळद, बिडलोण, पादेलोण, सैंधव व गजपिंपळी हीं सर्व समभाग व या सर्वां-

च्या चूर्णाच्या चौपट गुग्गुळ घालून २ माशांची गोळी करावी. ती मधाशीं द्यावी; म्हणजे खोकला, दमा, सूज, मूळव्याध, भगंदर, हृदयशूळ, पार्श्वशूळ, कुक्षीशूळ, बस्तिशूळ, अश्मरी, मूत्रकृच्छ्र, अंडवृद्धि, जंत, फार दिवसांचा ज्वर, आनाहवात, उन्माद, कुष्ठ, उदरें, नाडीव्रण, दुष्ट व्रण, प्रमेह व श्लीपद यांचा नाश करितो.

९ **सिंहनाद गुग्गुळ**—बारीक केलेला गुग्गुळ ३२ तोळे, शिरसेल २ तोळे तूप २ तोळे, हिरडेदळ ३२ तोळे, वेहेडेदळ ३२ तोळे, आंवळकठी ३२ तोळे हीं सर्व एकत्र करून ७६८ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून गाळून घ्यावा. नंतर पुन्हां तो चुलीवर ठेवून त्यांत सुंठ, मिरीं, पिंपळी, हिरडा, वेहेडा, आंवळकठी, नागरमोथे, वावडिंग, देवदार, गुळवेल, चित्रक, तेंड, दांतीमूळ, चवक व सुरण हीं प्रत्येक एक एक तोळा, पारा १ तोळा व गंधक १ तोळा, यांची कज्जली करून ती व जेपाळाच्या १०० बियांच्या अंतरजिव्हा काढून टाकाव्या व त्या बियांचें चूर्ण करून तें त्यांत घालावें. तयार झाल्यावर २ माशांची गोळी करून द्यावी व वर ऊन पाणी प्यावें. म्हणजे हा गुग्गुळ अग्नीला प्रदीप्त करितो. धातु, बुद्धि व बल यांना वाढवितो. आमवात, शिरोवात, वातग्रंथि, वातभगंदर, कंबर, मांड्या, गुडघे व अस्थि यांतील वायु व अश्मरी. मूत्रकृच्छ्र, अस्थिभंग, बस्तिवात, पोटांतील जाड्य, आम्लपित्त, कुष्ठ, घाण येते तो महारोग, पांच प्रकारचा खोकला, श्वास, क्षय, विषमज्वर, श्लीपद, पंक्तिशूळ, पांडुरोग, कांवीळ सूज, अंडवृद्धि, शूळ व अर्श, यांचा नाश करितो. हा गुग्गुळ अमृतासारखा आहे.

---

## घृतें.

**सूचना**—तुपाचें मान २ तोळेपर्यंत ३ दिवस द्यावें. स्नेहविधि प्रकरण पहा.

१ **अमृतादि घृत**—गुळवेल, जेष्ठीमध, मनुका, त्रिफळा, सुंठ, चिकणामूळ, अडूळसा, वाहाव्याचे शेंगेंतील मगज, पुनर्नवा, देवदार, गोखरू, कुटकी, पिंपळी, शिवणीचें फळ, रास्ना, तालीमखाना, एरंडमूळ, दारुहळद व कमळ, हीं औषधें समभाग घेऊन त्याच्या ६४ तोळे कल्काबरोबर ६४ तोळे तूप घालून त्यांत आंवळ्याचा रस तुपाबरोबर आणि दूध तुपाच्या तिप्पट घालून चांगलें घृत सिद्ध करावें. तें भोजनांत किंवा प्राशनार्थ द्यावें; म्हणजे अनेक दोषापासून उत्पन्न झालेली मूर्च्छा, रक्त, उत्तान किंवा गंभीर, माकडहाड, गुडघे व मांड्या यांचेठायीं झालेलें असें रक्तपित्त व कोष्टुशीर्ष आणि महाशूल, दारुण आमवात, महारोगानें पीडिताच्या वेदना, मूत्रकृच्छ्र, उदावर्त, प्रमेह व विषमज्वर, हे सर्व रोग व वात, पित्त, कफ यांपासून आलेले व्याधि यांचा नाश करितो. हें अति उत्तम घृत अश्विनीकुमारानें उत्पन्न केलें आहे.

२ कल्याणघृत—त्रिफळा, हळद, दारुहळद, रेणूकबीज, काळी उपळसरी व पांढरी उपळसरी, वाघांटीमूळ किंवा राळेचा वृक्ष, रानगांजा, रानभाल, देवदार, एलवालुक, तगर, इंद्रवारुणी, दांतीमूळ, डाळिंबाच्या फळावरील साल, नाकेशर, निळें कमळ, एलची, मंजिष्ठ, वावडिंग, कोष्ठ, पद्मकाष्ठ, जाईचीं फुलें, पांढरा चंदन, तालीसपत्र व रिंगणीमूळ, हीं सर्व एकेक तोळा घेऊन त्यांचा कल्क करून त्याचे चौपट पाणी घालून त्यात तो कल्क एकशेर तूप घालून तूप शेप राहींतोंपर्यंत कढवावें. नंतर तें तूप गाळून ठेवावें व बलाबल पाहून रोग्यास द्यावें; ह्मणजे फेंपरें, क्षय, ज्वर, उन्माद, वातरक्त, खोकला, अग्निमांद्य, पडसें, तृतीयकज्वर, चातुर्थिकज्वर, मूत्रकृच्छ्र, इसब, कंडू, पांडुरोग, सर्पादिकाचा विपविकार, वचनागादिकांचा विपविकार व प्रमेह हे रोग दूर होतात. हें तूप वांझ बायकास पुत्र देतें. व यापासून भूतबाधाही दूर होते.

३ काशीसघृत—हिराकस, हळद, दारुहळद, नागरमोथे,हरताळ, मनशीळ कपिला, गंधक, वावडिंग, गुग्गुळ, मेण, मिरें, कोष्ठ, पांढरें शिरस, रसांजन, शेंदूर, गंधाबिरोजा, रक्तचंदन, खैराची साल, कडुनिंबाची पानें, करंजबीज, उपळसरी, वेखंड, मंजिष्ठ, जेष्टीमध, जटामांसी, शिरस, लोध्र, पद्मकाष्ठ, बाळहिरडे व टाकळ्याचें बीज, ही सर्व एकेक तोळा घेऊन चूर्ण करून ती सर्व १२० तोळे तुपानें भरलेल्या ताब्याचे भांड्यांत घालून तें तूप सात दिवस उन्हांत ठेवून नंतर अंगास लावावें; ह्मणजे कुष्टें, दाह, खरूज, विचर्चिका ( बारीक फोडांची खरूज ), शुकरोग, विसर्प, विस्फोट, खवडे, उपदंश, नाडीव्रण, दुष्ट व्रण, सूज, भगंद्र व लुता हे विकार दूर करून व्रणाचें शोधन करितें व व्रण आंतून भरून आणितें.

४ चित्रकादि घृत—चित्रक, उपळसरी, चिकणामूळ, लहान उपळसरी, मनुका, गुळवेल, पिपळी, त्रिफळा, जेष्टीमध, आंवळकठी, या प्रत्येकाचा एकेक तोळा कल्क घेऊन त्यांत २५६ तोळे तूप व १०२४ तोळे दूध व तितकेंच पाणी घालून घृत सिद्ध करावें. थंड झाल्यावर त्यांत २५६ तोळे साखर व तितकेच तोळे वंशलोचन घालून मिश्र करावें. नंतर दोप व बल पाहून द्यावें; ह्मणजे मूत्रग्रंथि, मूत्रसाद, उष्णवात, रक्तप्रदर, मूत्राघात, बस्तिकुंडलिका याचा नाश करितें. हें घृत प्राशन करणाऱ्या स्त्रियांला गर्भधारण होतो. आणि रक्तदोप, योनिदोष व मूत्रदोप यावर हें घृत योजावें.

५ जात्यादि घृत—जाईचीं पानें, कडुनिंबाची पानें, कडू पडवळीचीं पानें, हळद, दारुहाळद, कुटकी, मंजिष्ठ, जेष्टीमध, मेण, करंजबीज, वाळा, उपळसरी, व मोरजूत, ही सर्व औषधें एकेक तोळा घेऊन कल्क करून त्याचे चौपट तूप आंत मिळवून उन्हात एक दिवस ठेवून पचवून नतर त्या तूपाचा, सूक्ष्म जे नाडीव्रण, त्यांस लेप करावा. व मर्मस्थळीं असून पुत्रादिकानें ओले खोल असतील त्यांस लेप करावा. तेणेंकरून व्रण भरून येतात.

६ पिप्पल्यादि घृत—पिंपळी, चंदन, नागरमोथे; वाळा, कुटकी, इंद्रजव, आंवळकठी, उपळसरी, अतिविष, सालवण, मनुका, आंवळ्याच्या बिया, त्रायमाण व रिंगणमूळ यांच्या काढ्यांत किंवा कल्कांत घृत सिद्ध करावें. तें जीर्णज्वराचा तात्काळ नाश करितें. व क्षय, कास, मस्तकशूळ, पार्श्वशूल, अरुचि, अंगाची तप्तता यांचाही नाश करितें.

७ पंचतिक्तघृत—कडू निंब, गुळवेल, कडू पडवळ, रिंगणी व आडूळसा हीं प्रत्येक ४० तोळे घेऊन १०२४ तोळे पाण्यांत घालून अष्टमांश उतरून गाळून घ्यावा. आणि त्यांत तूप ६४ तोळे घालून त्यांत रास्ना, वावडिंग, देवदार, गजपिंपळी, यवखार, टांकणखार, सुंठ, हाळद, बडीशेप, चवक, कोष्ठ, कोळिंजन, मालकांगोणी, मिरें, कुड्याची साल, ओंवा, चित्रक, कुटकी, पोखरमूळ, वेखंड, पिंपळमूळ मंजिष्ठ, अतिविष, निशोत्तर व किरमाणी ओंवा. हीं प्रत्येक एकेक तोळा घेऊन त्यांचा कल्क करून त्या तुपांत घालावा. व त्यांत गुग्गुळ ५ तोळे घालून सिद्ध करावें. तें सेवन केलें असतां अति वाढलेला वायु, संधि, अस्थी व मज्जा यांतील वायु कुष्ठ, नाडीव्रण, अर्बुद, भगंदर, गंडमाला जत्रूच्या वरील भागाचे वायूरोग, गुल्म, अर्श, मेह, क्षय, श्वास, कास, पीनस, सूज, पांडू, विद्रधि व वातरक्त या व्याधींचा नाश होतो.

८ फलघृत—हिरडा, वेहेडा, आंवळकठी, जेष्ठीमध, हाळद, दारुहाळद, कुटकी, वावडिंग; पिपळी, नागरमोथे, कौडळीचें मूळ, कडू पडवळ, वेखंड, मेदा, महामेदा या दोहोंचे अभावीं जेष्ठीमध, काकोळी, क्षिरकांकोळी; यांचे अभावीं आस्कंद, पांढरी उपळसरी; काळी उपळसरी, वाघांटीचें मूळ अथवा राळेचा वृक्ष, बडीशेप, भाजलेला हिंग, रास्ना, पांढरा चंदन, रक्तचंदन, जाईचीं फुलें, वंशलोचन, कमळ, साखर, अजमोदा, दांतीमूळ, ही सर्व औषधें एकेक तोळा घेऊन त्यांचा कल्क करून ज्या गाईला वांसरूं होऊन एक वर्ष झालें आहे अशा गायीचें तूप ६४ तोळे घेऊन त्यांत तो कल्क तुपाचे चौपट गाईचें दूध व दुधाचे चौपट पाणी घालून ते सर्व पदार्थ तांब्याच्या भांड्यांत अथवा मडक्यांत घालून ज्या दिवशी उक्त तिथि व पुण्य नक्षत्र असेल त्या दिवशीं रानगोंवऱ्यांचा अग्नि देऊन तूप शेष राहीतोंपर्यंत पाक करावा. नंतर तूप गाळून घ्यावें. हें तूप पुरुषानें घेतलें असतां काम वाढून नित्य स्त्रीसंग करील. त्याला पुत्र होतील ते बुद्धिमान होतील. वंध्या स्त्रीनें घेतलें असतां पुत्र होतील ते बुद्धिमान होतील. ज्या स्त्रीस मूल होऊन लागलेंच मरतें, पुनः दुसरें होतें तेंही मरतें अशा स्त्रीस मूल होईल. तें १०० वर्षें जगेल व बुद्धिमान होईल. या तुपांत लक्ष्मणामूळ नाहीं; परंतु हें गर्भ धारणारें आहे असें जाणावें.

९ विंदुघृत—चित्रक, शंखपुष्पी, कपिला, पांढरें निशोत्तर, काळें निशोत्तर, वरधारा, बहाव्याच्या शेंगेंतला मगज, दांतीमूळ व तिचें फळ, जेपाळ, कडु दोडकी,

देवडांगरी, नील विष्णुक्रांत, पिंवळा निवडुंग, पिंपळमूळ, वावडिंग, कुटकी व चोख हीं एकेक तोळा घेऊन कल्क करून त्यांत एक शेर तूप घालून त्यांत मिळवून नंतर निवडुंगाचें दूध २४ तोळे, त्यांत टाकून कल्काचा पाक चांगला होण्याकरितां तुपाचे चौपट पाणी घालून तूप शेष राहितोंपर्यंत पाक करून गाळून घ्यावा. हें तूप बलाबल पाहून पोटांत घेतलें असतां गुल्म, कुष्ठ, शूल, उदावर्त, वायु, सूज, आध्मान, भगंदर, आठ प्रकारचीं उदरें व सारे रोग दूर होतात. गाईचें किंवा उंटीणीचें दूध अथवा कुळिथाचा काढा किंवा उन पाणी या अनुपानांतून रोग तारतम्य पाहून तुपाचे जितके बिंदू पोटांत द्यावे तितके ढाळ होतात. व या तुपाचा नाभीस लेप केला असतांही ढाळ होतात.

१० **रोहितकघृत**—रक्तरोडा २०० व बोरे १२८ तोळे प्रमाणें घेऊन त्याचा ५१२ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून त्यांत ३२ तोळे तूप, १२८ तोळे शेळीचें दूध व सुंठ, मिरीं, पिपळी, हिरडा, बेहडा, आंवळकठी, हिंग, ओंवा, धणे, बिडलोण, वावडिंग, चित्रक, शेरणी, चवक, वेखंड, जिरें, सांवरमीठ, डाळिंब, देवदार, पुनर्नवा, कडूवृंदावन, यवखार व पुष्करमूळ, हीं प्रत्येक एकेक तोळा घेऊन कल्क करून त्यांत तूप पचन करून बाटलींत भरून ठेवावें. चार तोळेपर्यंत दूध किंवा गोमूत्र यांजबरोबर द्यावें; ह्मणजे यकृत, प्लीहा, उदर, शूल, अग्निमांद्य, कुक्षिशूल, पार्श्वशूल, कटीशूल, अरुचि, मलबद्धता, शूल, पांडुरोग, कांवीळ, वांति, अतिसार, तंद्रा, कृमि आणि ज्वर यांचा नाश करितें.

११ **लघुफलघृत**—तालीमखाना, हिरडा, बेहडा, आंवळकठी, गुळवेल, पुनर्नवा, टेटू, हळद, दारुहळद, रास्ना, मेदाचे अभावीं जेष्टीमध, व शतावरी हीं औषधें एकेक तोळा घेऊन कल्क करून ६४ तोळे तूप घेऊन त्या कल्कांत मिळवून गाईचें दूध तुपाचे चौपट, व तुपाचे चौपट पाणी घालून तूप शेष राहितोंपर्यंत पाक करावा. नंतर गाळून घ्यावें. हें तूप स्त्रियाचा योनिशूळ, मैथुनानें पीडित होणारी योनि, चलन झालेलें योनिपुष्प, अंग बाहेर आलेली योनि, व ज्या योनींचें तोंड मोठें झालें ती, पित्तयोनि, विभ्रांतयोनि, शठयोनि, जीपासून गर्भधारण होत नाही, अशा स्त्रियेला हें तूप दिलें असतां सारे योनिरोग दूर होऊन योनि ठिकाणीं येऊन गर्भधारण लवकर करितें. हें तूप योनींचे दोष हरण करण्याविषयीं समर्थ आहे.

१२ **वाजीकरणघृत**—पांढऱ्या कण्हेराच्या मुळ्या दोन शेर आणून ठेंचून आठ शेर पाण्यांत काढा करावा. चतुर्थांश उरवून त्यांत दोन शेर दूध घालून त्यांत २ तोळे सोमल, २ तोळे जायपत्री, २ तोळे केशर, १ तोळा कस्तूरी घालून दूध आठवावें. नंतर त्याजला विरजण घालून दही करावें. तें घुसळून लोणी काढून त्याचें तूप काढून ठेवावें. व हें तूप विड्याच्या पानाशी बिंदू मात्र लावून विडा खावा. तेणेंकरून अंगांत हुशारी येऊन मंदवीर्य पुरुष असला तरी सतेज होतो.

आणि वीर्यवान् होतो, असें जाणावें. हा प्रयोग करतेवेळीं फार जपून करावा; दूध व दहीं कुलपांत ठेवावें व ताक झाल्यावरोबर मातींत पुरून टाकावें.

१३ शतावरीघृत—शतावरीच्या मुळ्याचा कल्क १ भाग, दूध ४ भाग, गाईचें तूप ४ भाग, साखर १ भाग, हीं सर्व एकत्र करून तूप शेष राहितोंपर्यंत पचन करावें. त्यांतून दोन तोळे तूप भक्षण करावें ह्मणजे रक्तपित्त, आम्लपित्त, क्षय व श्वास, यांचा नाश होतो.

१४ शुंठ्यादिघृत—सुंठ, पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक व यवखार, हीं प्रत्येक चार चार तोळे घेऊन त्यांचा काढा करून त्यांत तूप १ शेर आंल्याचा रस १ शेर व दह्याची निवळी १ शेर, हीं सर्व एकत्र करून घृत सिद्ध करावें. तें घृत विषमज्वर, जीर्णज्वर व एक वर्षाचा ज्वर, यांचा नाश करितें.

१५ सूर्यपाकघृत—हिराकस, हळद, दारुहळद, नागरमोथे, हरताळ, मनशीळ, कपिला, वावडिंग, गुग्गुळ, मेण, मिरें, कोष्ठ, मोरचूत, पांढरें शिरस, रसाजन, शेंदूर, गंधाविरोजा, रक्तचंदन, खैराची साल, कडुनिंबाची पानें, करंजबीज, उपळसरी, वेखंड, मजिष्ठ, जेष्टीमध, जटामांसी, शिरस, लोध, पद्मकाष्ठ, बाळहिरडे व टाकळ्याचें वीज, हीं सर्व औषधें एकेक तोळा घेऊन १२० तोळे तूप तांब्याचे भांड्यांत घालून त्यांत तें चूर्ण मिळवून सात दिवस उन्हांत ठेवून नंतर तें तूप अंगास लावावें; ह्मणजे कुष्ठ, दाद, खरूज, विचर्चिका ( बारीक फोडाची खरूज ) शुकरोग, विसर्प, विस्फोट, उपदंश, नाडीव्रण, दुष्टव्रण, भगेंद्र व लूता हे रोग दूर होतात.

---

## तेलें.

**सूचना**—सिद्ध करण्याचीं जितकीं तैलें आहेत त्यांत तिळाचें तेल घालावें. या तिळास दक्षणप्रांतीं मराठे तीळ असें ह्मणतात. यांचा संक्रांतीचे वेळीं उपयोग करितात. या तेलाचें प्राशन, अभ्यंग व नस्य जशी रोगाची स्थिति असेल त्याप्रमाणें योजना करीत जावी. या तेलाची मात्रा २ तोळेपर्यंत बलाबल पाहून ४ दिवसपर्यंत देत जावी. विशेष माहितीकरितां स्नेहविधि प्रकरण पहा.

१ इरिमेदादि तेल—काळ्या खैराची साल ४०० तोळे घेऊन थोडी कुटून त्यांत पाणी २०४८ तोळे घालून चतुर्थांश काढा करून गाळून घ्यावा. त्यांत तिळाचें तेल १२६ तोळे घालावें व त्यांत चूर्ण करून टाकावयाचीं औषधें येणेंप्रमाणें—काळ्या खैराची साल, लवंगा, गेरु, अगरु, पद्मकाष्ठ, मंजिष्ठ, लोध, जेष्टीमध, लाख, नागरमोथे, वडाची साल, दालचिनी, जायफळ, कापूर, कंकोळ, पांढरे खैराची साल, पतंग, धायटीचें फूल, एलची, नाकेशर व कायफळ, हीं २१ औषधें तोळा तोळा प्रमाण घेऊन कल्क करून त्या तेलांत घालून तेल शेष राहितोंपर्यंत

पाक करून तें तेल गाळून ठेवावें. व मुखसंबंधी पीडेवर, दांताचें मांस दुष्ट झालें असेल त्याजवर, दांत हालत असतां व दांताचे हिरड्यांना भेगा पडून दुखत असतात त्यांवर, दांताच्या हिरड्यांना सूज येऊन लाळ पडते त्याजवर, शावदंतरोगावर, दांतांना शीतळ, रुक्ष, आंबट पदार्थ व मोठा वायु, सहन होत नाहीं. असा प्रहर्ष ह्मणून दंतरोग आहे त्याजवर, व दंतविद्रधीवर, दंतसंबंधीं रक्त व कृमि हे दुष्ट होऊन हिरड्यांना काळीं छिद्रें पडून पूवादिकेंकरून वाहतात त्यांजवर, कृमिदंतरोगावर, दंतस्फुटनरोगावर, दातांना दुर्गंध येतो त्याजवर, व जीभ, टाळू, ओंठ याचेही रोगांवर हें तेल लाविलें असतां ते ते विकार दूर होतात.

२ **करंज तेल**—करंजसाल, चित्रकमूळ, जाईचा पाला, व पांढऱ्या कण्हेराचें मूळ, हीं औषधें समभाग घेऊन कल्क करून त्याचे चौपट तिळाचें तेल घेऊन त्यांत तो कल्क घालून कल्काचा पाक चांगला होण्याविषयीं तेलाचे चौपट पाणी त्यांत घालून तेल शेष राहितोंपर्यंत पाक करून तें तेल गाळून ठेवावें. व ज्या मनुष्याचे मस्तकाचे अथवा मिशाचे अथवा दाढीचे केश झडून जातात त्यांस इंद्रलुप्तरोग ह्मणतात. त्या जाग्यावर लावावें तेणेंकरून लवकर केश येतात.

३ **करवीरादि तेल**—कण्हेराचेंमूळ, दांतीमूळ, निशोत्तर व कडू दोडक्याचें फळ या चार औषधांचा कल्क करून त्याचे चौपट तिळाचें तेल घेऊन त्यांत तो कल्क घालून केळीचे कांद्याची राख करून त्याचा क्षार काढून त्या क्षाराचें पाणी तेलाचे चौपट त्यांत घालून तेल शेष राहितोंपर्यंत पाक करून तेल गाळून ठेवावें. ज्या जागेवरचे केंस काढावयाचे आहेत त्या जागेवर लावावें. ह्मणजे सर्व केंस आपोआप निघून जातात.

४ **कुष्ठादि तेल**—पांढरें कोष्ठ १, हिंग १, यवखार १, व लिफळ्याचें चूर्ण १० भाग, यांचा गोमूत्रांत कल्क करून त्यांत तेल व निवडुंगाचा चीक घालून तेल शेष राहितोंपर्यंत पचन करावें. तयार झाल्यावर उतरून त्यांतून १ तोळा द्यावें. रेच झाल्यावर ताक भाताचें लघु भोजन द्यावें. याप्रमाणें चार चार दिवशीं रेचन द्यावें, रोज देऊं नये, हें कुष्ठादि तेल गुल्म, जलोदर, प्लीहा, शूल आणि सूज यांचा नाश करितें. स्नेह तयार करण्याचा प्रयोग पहा ह्मणजे औषधाचीं मानें समजतील.

५ **चंदनादि तेल**—चंदन, पद्मकाष्ठ, कोष्ठ, वाळा, देवदार, नाकेशर, तमालपत्र, वेलची, दालचिनी, जटामांसी, तगर, वाळा, जायफळ, घोटफळ, केशर, जायपत्री, नखला, गुग्गुळ, कस्तूरी, ओंवा, दगडफूल, आल्याचा रस, पतंग, पुष्करमूळ, नागरमोथे, रक्तचंदन, उपळसरी, कचोरा, कापूर, मंजिष्ठ, लाख, जेष्टीमध, कुटकी, वडशेप, शतावरी, मोरवेल, आस्कंद, सुंठ, कमळाचें केशर, विशेषधूप, पाहाडमूळ, कृष्णागर, रेणूकबीज, श्वेतलाजाळू, लवंगा आणि कंकोळ ही प्रत्येक औषधें एकेक तोळा घेऊन त्यांच्या काढ्यांत दशमुळाचा काढा ६ भाग, दूध ६ भाग व यव, बोरें, कुळीथ आणि चिकणामूळ हे एकेक भाग, आणि काढ्याच्या चौदावा भाग तेल

याप्रमाणें एकत्र मिळवून तेल शेष राहीतोंपर्यंत कढवावें. नंतर ज्या पात्रांत तेल ठेवणें असेल त्या पात्रास धूप वगैरेचा चांगला वास देऊन नंतर त्यांत घालून ठेवावें. हें चंदनादि तेल सुकुमार, श्रीमंत व सुखी अशा लोकाना व स्त्रियांचे गर्भ याविषयीं उत्तम आहे. हें वातरोग, वातरक्त, बाळंतीण, बालक, मर्मघात, अस्थि मोडलेला आणि क्षीण, अशा मनुष्यास हितकारक आहे. व जीर्णज्वर, दाहपुर्वकज्वर, शीतज्वर, विषमज्वर, शोष, अपस्मार व कुष्ठ यांचा नाश करितें. व वांझ स्त्रियांना पुत्र देतें. याचा सर्वकाळ उपयोग केल्यानें लावण्य आणि पुष्ठि यांना देतें. व मानेच्या वरचे भागाचे सर्व रोग व जरा, हीं कधींही प्राप्त होणार नाहींत. याचें प्राशन, अभ्यंग व नस्य करावें.

६ चंदनबलातेल—चंदन, चिकणामूळ, लाख व वाळा, हीं चार औषधें निराळीं ३२ तोळे घेऊन ५१२ तोळे पाणी घालून चौथा हिस्सा काढा राहिला ह्मणजे ६४ तोळे तेल आंत घालावें. नंतर चंदन वाळा, मोहाचें फूल, शेपा, कुटकी, देवदार, कोष्ठ, हळद, मंजिष्ठ, अगर, काळा वाळा, आस्कंद, चिकणामूळ, दारुहळद, मोरवेल, नागरमोथे, एलची, दालचिनी, नाकेशर, रास्ना, लाख, निर्गुडी, चांपा, शिलारस, उपळसरी, शेंदेलोण व पादेलोण, हीं सर्व औषधें समभाग घेऊन त्यांचा कल्क करावा. व तो कल्क आणि दूध १२८ तोळे मिळवून पहिल्या काढ्यावरोबर शिजवावें. आणि तेल सिद्ध करावें. त्या तेलाचा अभ्यंग केला असतां सप्तधातु वाढून चांगली कांति होते. व कास, श्वास, क्षय, ओकारी, प्रदर, रक्तपित्त, कफदाह, कंडू, कोड, मस्तकशूळ, नेत्रांचा दाह, अंगदाह व वायु याचा नाश होतो. व क्षीण, धातुक्षीण, बाल, तरुण व वृद्ध यांना हितकर आहे व सूज, कांवीळ, पांडुरोग व ज्वर इत्यादिकांचा नाश करितें.

७ दशमूलादि तेल—दशमूळांचा काढा व दूध, हीं समभाग, मोठा चिकणा, नागरमोथे, तालीसपत्र, एलची, चंदन, दारुहळद, मालकांगोणी, वाळा, मंजिष्ठ, लाख, कोष्ठ, कोळिंजन, वेखंड व तगर यांचा कल्क व तिळाचें तेल, हीं एवं एकत्र करून पचन करावीं, ह्मणजे तेल सिद्ध झालें. तें तेल आपल्या बलानें संपूर्ण वातरोगांला जिंकितें. आणि बल, धातु, कांति, रुचि व अग्नि यांना वाढवितें. व राजे, वृद्ध, बालक आणि स्त्रिया यांना हितकारक होतें.

८ नारायणतेल—बेल, ऐरण, टेटू, पहाडमूळ, कडुनिंब, चांदवेल, आस्कंद रिंगणमूळ डोरलीमूळ, चिकणामूळ, मोठा चिकणा, गोखरू व पुनर्नवा, हीं प्रत्येक औषधें दहादहा तोळे घेऊन१०२४तोळे पाण्यात चतुर्थांश काढा करून गाळून घेऊन दोनशेर तेलाचे पात्रांत टाकावा. नंतर त्यात बडिशेप, देवदार,जटामासी, शिलाजीत, वेखंड, चंदन, तगर, कोष्ठ, कोळिंजन, वेलदोडे, सालवण, दालचिनी, तमालपत्र, नाकेशर, रास्ना, आस्कंद, सैंधव व श्वेतपुनर्नवा, या प्रत्येकाचें ४।४ तोळे चूर्ण किंवा कल्क घालावा व तेलाच्या बरोबरीनें शतावरीचा रस किंवा अष्टमांश काढा करून घाला-

वा. शेळीचें किंवा गाईचें दूध तेलाचे चौपट घालावें. नंतर तेल शेष राहितोंपर्यंत मंदाग्नीनें कढवावें. सिद्ध झाल्यावर गाळून बाटलींत भरून ठेवावें. नंतर त्या तेलाचें प्राशन, बस्ति, अभ्यंग, भोजनाचे पदार्थांशीं सेवन व नस्य याविषयीं योजिलें असतां घोडे, हत्ती, मनुष्य, हे पांगळे किंवा हातांपायांत मोडले असले तरी बरे होतात. व अधोभागींचे वात, शिरांमधील वात, दंतमूळ, हनुस्तंभ, मन्यास्तंभ, अपतंत्रक, एकांगवात, सर्वांगवात, क्षीणेंद्रिय, नष्टशुक्र, क्षीणज्वर, रक्तजिव्हा, बहिरेपणा, विस्वर, अल्पबुद्धि, अल्पप्रजा स्त्री, वंध्यास्त्री, वृषणवात, अंडवृद्धि, इतक्यांवर हें नारायणतेल अति प्रशस्त आहे.

९ **नारायणतेल २ रें**—आस्कंद, चिकणामूळ, बेलमूळ, पाहाडमूळ, रिंगणमूळ, मोतारिंगणी, गोखरूं, अतिबला, कडू निंब, टेटू, पुनर्नवा, चांदवेल, व एरंड, हीं तेरा औषधें दहा दहा तोळे घेऊन थोडीं कुटून त्यांत सहा शेर पाणी घालून चतुर्थांश काढा करून गाळून घ्यावा. त्यांत तिळाचें तेल १ शेर शतावरीचा अंगरस १ शेर, गाईचें दूध ४ शेर, हे तेलांत घालून त्यांत कल्क करून टाकावयाचीं औषधें—कोष्ठ, एलची, पांढरा चंदन, मोरवेल, वेखंड, जटामांसी, सैंधव, आस्कंद, चिकणामूळ, रास्ना, बडीशेप, देवदार, रानगांज्या, रानभाल, रानमुगी, रानउडीद, व तगर हीं सतरा औषधें २।२ तोळे घेऊन कल्क करून त्या तेलात घालून मंदाग्नीनें तेल शेष राहितोंपर्यंत कढवून तें तेल गाळून ठेवावें. या तेलाचें नस्य, अभ्यंग, बस्तिविधि, व प्राशन करावें. यापासून अर्धांगवायु, हनुस्तंभ, मन्यास्तंभ, गलग्रह, मांड्या, पोटऱ्या, पाय इत्यादिकांचेठायीं खल्ली या नामेंकरून वायु होतो तो. व ज्या वायूनें बहिरेपणा येतो तो वायु, गतिभंगवायु, कटिग्रह, हस्तपादादि गात्रांचे शोषण करणारा वायु, नेत्रादिक इंद्रियाचा नाश करणारा वायु, रक्तविकार, धातुक्षय, अंडवृद्धि, वृषणवायु, दंतरोग, मस्तकाचा वायू, पार्श्वशूल, व जेणेंकरून मनुष्य पांगळा होतो तो पंगुवायू, बुद्धिभ्रंश करणारा वायु, कंबरेपासून पायापर्यंत गृध्रसी या नामेंकरून वायु होतो तो. हे सारे वायु दूर होतात. याशिवाय दुसरे विषमवायु, लहान मोठे, सर्वांगाचेठायीं, अथवा अर्ध्या अंगाचेठायीं जे वायूचे रोग असतील तेही दूर होतात. व या तेलाचे प्रभावेंकरून वांझोट्या स्त्रीला मुलें होतात व हें तेल अंगास लाविलें असतां मनुष्यास सुख होतें. हत्तीचे व घोड्याचे अंगास लाविलें असतां त्यानाही सुख होतें. यास दृष्टांत जसा नारायणदेव दुष्ट दैत्यांचा नाश करितो, तसें हें तेल सर्व वायूंचा नाश करितें.

१० **निर्गुंड्यादितेल**—निर्गुडीचे पाल्याला पाण्याचा हाबका देऊन एक शेर रस काढावा. धोत्र्याचे पाल्याचा रस १ शेर, माक्याचा रस १ शेर, गोमूत्र १ शेर, व वेखंड, कोष्ठ, धोत्र्याचें बीज, तेजबळ अथवा मालकांगोणीचें बीज, हीं प्रत्येक दोन दोन तोळे, आणि वचनाग ८ तोळे, यां सर्व औषधांचीं चूर्णें करून ते सर्व रस एकत्र करून त्यांत टाकावें. नंतर तिळाचें तेल एक शेर आत घालून मंदाग्नीनें तेल शेष राहितोंपर्यंत कढवावें. नंतर तें गाळून कुपींत भरून ठेवावें. आणि

शरीराच्या ज्या भागावर वायूचा क्षोभ झाला असेल तेथें मर्दन करीत जावें. ह्मणजे त्या वायूचा तात्काळ नाश होतो.

११ पुनर्नवादि तेल—पांढऱ्या पुनर्नव्याचें मूळ १०० तोळे घेऊन तें काळ्या गाईच्या ६४ तोळे तुपांत व दुधांत वाटावें. व १०० तोळे तिळाचें तेल व ४ तोळे धूप, मिरीं, राळ, कचोरा, वाळा, काळा वाळा, मंजिष्ठ, कात, चंदन, रक्तचंदन, कृष्णागर व रुद्राक्ष, या प्रत्येकाचें एकेक तोळा चूर्ण त्या तेलांत घालून त्रिफळ्याचे[1] काष्ठाचा अग्नि लावून मंदाग्नीनें तेल सिद्ध करावें व त्या तेलानें अंग मर्दन करावें; ह्म० सर्वांगशूल, अंगदाह, नेत्ररोग, पडसें, पांडुरोग, कांवीळ, उष्णवात, बाळंतरोग, सन्निपात, हात व पाय यांचा दाह, झांपड, कटीवात, क्षय, मूत्रकृच्छ्र, कंडू, गजकर्ण, मस्तकरोग, भ्रम, पित्त, दृष्टिरोग, जीर्णज्वर, अस्थिगतज्वर, व मेदोगतज्वर यांजवर हें सर्वांगाला मर्दन करून मंगलस्नान करावें. हें तेल फारच उत्तम आहे.

१२ प्रसारणी तेल—मुळें, पानें व फुलें यांसुद्धां व जींत सत्व झालें आहे अशी चांगली जून प्रसारणी ( चांदवेल ) १०० तोळे कुटून एका कढईंत शिजवावी. त्यांत ६४ तोळे दहीं व १२८ तोळे आंबट कांजी घालून नंतर सुंठ ५ तोळे, रास्ना २ तोळे, चांदवेल १॥ तोळा, जेष्टीमध २ तोळे, यांचे कल्क करून त्यांत टाकून सर्व एकत्र करून त्यांत तिळाचें तेल १०० तोळे घालून तेल शेप राहितोंपर्यंत कढवावें. नंतर गाळून कुपींत भरून ठेवावें. हें तेल संपूर्ण वायूंवर नस्य करण्यास प्रशस्त आहे. एकांगवात, सर्वांगवात, अपस्मार, उन्माद, विद्रधि, अग्निमांद्य, त्वचा, मस्तक, शिर, अस्थि, शुक्र व स्त्रियांचें रज इतक्या ठिकाणचे वात, याशिवाय इतर सर्व वातरोग, यांचा निश्चयेंकरून नाश होतो. घोडा, मनुष्य, हत्ती, यांतून कोणी जरी वायूनें जर्जर झाला तरी तात्काळ हें तेल आरोग्य करील यांत संशय नाहीं. इंद्रियजनक, वंध्या स्त्रीला प्रजा देणारें, वृद्ध, बालक, स्त्रिया व राजे याना हितकारक आहे व पागळा किंवा काखेंत कुबड्या धरून चालणारा, असा मनुष्य, हें तेल पिऊन धावूं शकेल.

१३ प्रसारणी तेल दुसरें—चांदवेल १०० तोळे घेऊन त्यांत चौपट पाणी घालून चतुर्थांश काढा उरवावा. नंतर त्यांत तिळाचें तेल, दहीं व कांजी हीं काढ्याचे सममाग घालून त्यांत काढ्याचे चौपट गाईचें दूध घालावें व जेष्टीमध, पिंपळमूळ, चित्रक, सैंधव, वेखंड, चांदवेल, देवदार, रास्ना, गजपिंपळी, भिलावे, बडिशेप व जटामांसी, हीं १२ औषधें सममाग तेलाचे अष्टमांश घेऊन त्यांचा कल्क करून तेलांत घालून तेल शेप राहितोंपर्यंत पक्व करून नंतर गाळून तें तेल अंगास लावावें. तेणेंकरून वात, कफजन्यविकार, मनुष्य जेणेंकरून कुबडा होतो तो वायु, गृध्रसी-

---

१—हिरडा, बेहडा व आवळकाठी यांतून एका लांकडाचा अग्नि लावावा.

वायु, आर्दितवायु, हनुस्तंभ, कांख, पृष्ठ, शिरा, ग्रीवा व कटी यांचा स्तंभ करणारा वायु, हे सर्व वायु दूर होतात. याशिवाय दुसरे वायु, लहान मोठे असतील तेही दूर होतात असें जाणावें.

१४ **महाबलातेल**—चिकण्याच्या मुळाचा काढा, दशमुळाचा काढा, यव, बोरें, कुळिथ यांचे काढे आणि दूध हीं ८।८ भाग, तेल १ भाग, मधुरगण[1], सैंधव, आगरू, राळ, सरळ, देवदार, ( सुरूच्या आंतील नार ) मंजिष्ठ, पद्मकाष्ठ, कोष्ठ, कोळिजन, एलची, उपळसरी, नागबला, जटामांसी, शिलाजीत, तमालपत्र, तगर, लघु उपळसरी, वेखड, शतावरी, आस्कंद, शेपा व पुनर्नवा, ही सर्व औषधें एकेक तोळा घेऊन त्यांचा काढा करून आंत घालावा. आणि तेल मंदाग्नीनें लावून सिद्ध करावें. या तेलानें जलद संपूर्ण आक्षेपकवायु व वातव्याधि यांचा नाश होतो. व उचकी, श्वास, आधिमंथ, गुल्म व खोकला यांचा नाश होतो. ६ महिने सारखें लाविलें असतां अंडवृद्धीचा नाश होतो. बाळंतिणीला बलाबल व काळ पाहून तेल द्यावें ह्मणजे हितावह होतें. जिला गर्भाची इच्छा असेल तिला व क्षीणधातु अशा पुरुषाला, वायूनें क्षीण झालेला, मर्माचे ठायी ताडन झालेला, मोडलेला व श्रमलेला यास द्यावें. हें तेल राजानें किंवा श्रीमान राजमान्य, सुखी व सुकुमार पुरुषानी यांचें सेवन, अभ्यंग व नस्य करावें.

१५ **महाविषगर्भतेल**—धोत्रा, निर्गुडी, कडू भोंपळा, पुनर्नवा, एरंडमूळ, आस्कंद, काळ्या टाकळ्याचें मूळ, चित्रकमूळ, शेवग्याचें मूळ किंवा साल, कावळी, वेखंडा, कडुनिंब, निवारा, वांझ करटोली, दशमुळें, शतावरी, लघु कारली, पांढरी उपळसरी, मुंडी, भुईकोहळा, कांडे निवडुंग, रुई, मेढशिंगी, तावडी व पांढरी कण्हेर, वेखंड, कावळी, आवाडा, चिकणा, अतिबला, नागबला, रिंगणी, महाबला, आडूळसा, सोमवेल्ली व चांदवेल, ही प्रत्येक चार चार तोळे घेऊन १०२४ तोळे पाण्यांत चतुर्थांश काढा करून त्यांत त्रिकटू, कुचला, रास्ना, कोष्ठ, कोळिजन, अतिविष, नागरमोथे, देवदार, बचनाग, जवखार, टांकणखार, सैंधव, बिडलोण, पादेलोण, मीठ, मोरचूत, कायफळ, पाहाडमूळ, नवसागर, मेंदी, धमासा, जिरें व कौडळ यांचें चूर्ण १६ तोळे घालून त्यात ६४ तोळे तेल मंदाग्नीवर पक्क करावें. हें तेल सर्व वातरोगाचा नाश करितें. आणि ऊर, मांड्या, कंबर, जंघा व संधि या ठिकाणचा वायु, आढ्यवात, गृध्रसी, महावात, सर्वांगवात, दंडापतानक, कर्णनाद व शून्यता यांचा नाश करितें. अरण्यांत सिंहापासून जसे मृग भिऊन पळतात, त्याप्रमाणें अश्व व गजा वरून पडून भग्न झालेले किंवा नर अथवा पशु यांच्या व्याधीचा नाश करील यांत संशय नाहीं.

---

१—शतावरी, बला, अतिबला, नागबला, सालवण, पीठवण, मोहाचीं फुलें, जेष्ठीमध, भुईकोहळा, गोखरू, मनुका इत्यादि.

२—जिला शुक्लपक्षीं पानें फुटतात व कृष्णपक्षीं पाने गळतात ती.

१६ **महासुगंध तेल**—उत्तम सुवासिक चंदन, केशर, वाळा, गव्हला, कचोरा, गोरोचन, शिलारस, अगरु, कस्तूरी, कापूर, जायपत्री, जायफळ, कंकोळ, सुपारी, लवंगा, गुळछत्र्याचा काढा, काळा वाळा, कोष्ठ, कोळिंजन, रेणूकबीज, तगर, लहान नागरमोथे, नखला, कांडे निवडुंग, पाच, पिंवळा वाळा, दवणा, पुंडरीक वृक्ष, व कापूरकाचरी, ही प्रत्येक चार चार मासे घेऊन चूर्ण करून तिळाचे पावशेर तेलांत घालावीं. तेलाचा चांगला पाक होण्याकरितां एकशेर पाणी घालावें आणि मंदाग्नीनें तेल शेष राहितोंपर्यंत कढवावें. नंतर गाळून ठेवावें. या तेलानें जो नित्य अभ्यंग करील तो सत्तर वर्षांचा वृद्ध जरी असला तथापि तरुण, अति वीर्यवान व स्त्रियास प्रिय, चांगला पुष्ट, देखणा, शंभर स्त्रियांजवळ गमन करणारा असा होईल. वंध्या स्त्रीला पुत्र प्राप्त होतो. अपुत्राला पुत्र होतो. १०० वर्षे वाचतो. अंगाचा घाम, दुर्गंध, कंडू व कुष्ठ याचाही नाश होतो. असे या तेलाचे अंगीं गुण आहेत असें जाणावें.

१७ **माषतेल**—उडीद ६४ तोळे घेऊन ते २५६ तोळे पाण्यांत पचन करावे, चतुर्थांश शेष राहिला म्हणजे त्यांत चौपट दूध व तिळाचे तेल ६४ तोळे व जीवनीय गणाची आठ औषधें, बडीशेप, सैंधव, रास्ना, कुहिलीच्या बिया, जेष्ठीमध चिकणामूळ, त्रिकटू, व गोखरु, ही प्रत्येक एकेक तोळा घेऊन त्यांचा कल्क करून आंत घालावा. व मंदाग्नीनें तेल सिद्ध करावें. तें पक्षाघात, आर्दितवायु, कर्णशूल, बहिरेपणा, तिमिररोग, सन्निपातजरोग, हस्तकंप, शिरःकंप, बाहुशोष अवबाहुक, व कलायखंज, यांजवर पोटात घेणें, किंवा अंगास लावणें, बस्तीकर्म याविषयीं योजावें. हें तेल ऊर्ध्वजगत रोगनाशनाविषयी श्रेष्ठ आहे.

१८ **लक्षादि तेल**—बोरीची अथवा कुड्याची लाख १२८ तोळे घेऊन त्यांत चौपट पाणी घालून चतुर्थांश काढा करून गाळून घ्यावा. त्यांत तिळाचें तेल ३२ तोळे व गाईच्या दह्याची निवळी १२८ तोळे, बाळांतशेपा, आस्कंद, हाळद, देवदार, कुटकी, रेणुकबीज, मोरवेल, कोष्ठ, जेष्ठीमध, श्वेतचंदन, नागरमोथे व रास्ना, हीं प्रत्येक औषधें अर्धा अर्धा तोळा घेऊन कल्क करून त्यांत घालावा. नंतर तेल शेष राहितोंपर्यंत मंदाग्नीनें कढवून गाळून अंगास लावावें. तेणेंकरून सर्व विषमज्वर दूर होतात. व श्वास, कास, पडसें, कंबरेचा व पाठीचा शूळ, वातप्रकोप, पित्तप्रकोप, फेंपरें, उन्मादवायु, क्षय, राक्षसबाधा, कंडू, अंगाची दुर्गंधी व शरीराच्या तिडका हे सारे रोग दूर होतात. व गरोदर स्त्रीनें अंगास लाविलें असतां गर्भ चांगला पुष्ट होतो.

१९ **वारुण्यादि तेल**—कडु इंद्रावणीचें उत्तरदिशेचें मूळ १२ तोळे घेऊन कुटून कल्क करून त्यात ४८ तोळे तिळाचें तेल घालावें. व मंदाग्नीनें तेल सिद्ध करावें. तें तेल सुमारें २ तोळे भाताबरोबर सेवन करावें, म्हणजे हस्तकंप, शिरःकंप, मानेचा कंप इत्यादि दूर होतात.

२० विषगर्भ तेल—वचनाग, पुष्करमूळ, कोष्ठ, वेखंड, भारंगमूळ, शतावरी, सुंठ, हाळद, लसूण, वावडिंग, देवदार, आस्कंद, अजमोदा, मिरीं, पिंपळमूळ, चिकणा, रास्ना, लाजाळू, शेवग्याची साल, गुळवेल, हंसपादी, तांबडें लाजाळूं, हरीतकी, दशमुळें, निर्गुडी, वडीशेप, पहाडमूळ, कुहिलीचें वीज, कडू वृंदावन, व शेपा, हीं प्रत्येक चार चार तोळे घेऊन १६ पट पाणी घालून चतुर्थांश काढा करून त्यांत वचनाग ४ तोळे चूर्ण करून टाकावा. आणि तेल घालून ( स्नेहपाकविधि पहा. ) सिद्ध करावें त्याचें संपूर्ण वातरोगांवर अभ्यंग करावें. म्हणजे संधिवात, सन्निपात, त्रिकग्रह, पृष्ठग्रह, कटीग्रह, पक्षाघात, अर्धांगवायु, कंपवायु, कुब्जत्व, धनुर्वात, गृध्रसी व अपतानकवायु यांचा नाश करितें.

२१ विजयभैरव तेल—पारा,गंधक, मनशीळ व हरताळ हीं सर्व समभाग घेऊन त्याचें बारीक चूर्ण करावें आणि कांजीत वांटून त्या कल्कानें बारीक वस्त्रास लेप करून त्याची वात करावी. ती पारदादि द्रव्याच्या चौपट तिळाचे तेलांत बुडवून उंचावर लोंवती धरावी. तिचे खालीं पात्र ठेवून ती वात पेटवावी. तिजपासून तेल खालचें पात्रांत पडेल तें अंगास मर्दन करावें किंवा भक्षणार्थ द्यावें. म्हणजे अनेक वातव्याधी, बाहुकंप, शिरःकंप, जंघाकंप व एकांगवात यांचा नाश करितें.

२२ शतावरी तेल—दूध १२८ तोळे, तेल ६४ तोळे व शतावरीचा रस ६४ तोळे व वेखंड, कोष्ठ, चंदन, देवदार, कावळी, घेटोळीमूळ, रास्ना, मंजिष्ठ, एलची, रुदंती, शिलाजीत, आस्कंद, जटामांसी व चिकणामूळ, ही प्रत्येक दोन दोन तोळे घेऊन त्यांचे काढे किंवा कल्क २।२ तोळे घालून मंदाग्नीवर तेल सिद्ध करावें. तें एकांगवात; सर्वांगवात, भग्नास्थि, संधिभंग, तृषा, कुब्जवात, वामनत्व व पंगुवात; या तेलाचे प्राशनानें व अभ्यंगानें नाश पावतात. हें तेल अनेक प्रकारच्या वायूंचा नाश करितें.

---

## आसवें व अरिष्टें.

उदकादि द्रव पदार्थामध्यें औषधें घालून मृत्तिकापात्रें घेऊन त्या पात्राचे तोंडाला मुद्रा देऊन म्हणजे तोंड बंद करून मासपक्षपर्यंत जमिनींत अथवा धान्याचे राशीत पुरून ठेवावें म्हणजे उत्कृष्ट औषध होतें. तें आसव आणि अरिष्टें या भेदेंकरून २ प्रकारचें आहेत. उदक व औषधें यांचा पाक केल्यावांचून वरप्रमाणें सिद्ध करितात त्याला आसव म्हणतात. व काढा सिद्ध करून त्यांत औषधें घालून पूर्वोक्त रीतीनें सिद्ध करितात त्याला अरिष्ट म्हणतात. या दोहोंचें पोटांत ध्याव-

१—वर्णी किंवा पक्कें लाखलोटें असे मडकें किंवा चिनीमातीचें पात्र याची योजना करावी म्हणजे भूमीदोष औषधीस संसर्ग करणार नाहींत.

याचें प्रमाण ४ तोळेपर्यंत जाणावें. ज्या अरिष्टादि प्रयोगाचेठायीं जलादिकांचे मान सांगितलें नाहीं त्या प्रयोगांत जलादिद्रव ( पातळ पदार्थ ) १०२४ तोळे, प्रमाण घेऊन त्यांत गूळ ४०० तोळे प्रमाण घालून व गुळाचे अर्ध मानानें मध घालावा. व त्यांत औषधाचें चूर्ण गुळाचे दशमांश घालून अरिष्ट सिद्ध करावा.

१ **उशीरासव**—पांढरा वाळा, काळा वाळा, तांबडें कमळ, शिवण, निळें कमळ, वाघांटीचें मूळ, अथवा राळेचा वृक्ष, पद्मकाष्ठ, लोध्र, मंजिष्ठ, धमासा, पाहाडमूळ, किराईत, कुटकी, वडाची साल, उंबराची साल, कचोरा, पित्तपापडा, पांढरें कमळ, कडू पडवळ, कांचनवृक्षाची साल, जांभळीची साल, सावरीचा डिंक, हीं बावीस औषधें चार चार तोळे व द्राक्षें ८० तोळे, धायटीचीं फुलें ६४ तोळे, साऱ्यांचें चूर्ण करून त्यांत २५॥· शेर पाणी घालून साखर ५ शेर, मध ५ शेर असे सर्व पदार्थ आंत घालून लाखलेटे मडक्यांत किंवा बरणीत सर्व पदार्थ घालण्यापूर्वी जटामांसी व मिरी यांची त्या पात्रास धुरी देऊन नंतर हीं सारीं औषधें त्यांत घालून पात्राचें तोंड चिखल वगैरे लावून अगदीं बंद करावें. तें पात्र तसेंच एक महिनाभर जमिनींत किंवा धान्याचे राशींत पुरून ठेवावें. नंतर पात्राचे तोंडाची मुद्रा काढून आतील आंसव गाळून बाटल्यांत भरून ठेवावें. व बलाबल पाहून रोज एक वेळा किंवा दुवक्त चार तोळेपर्यंत प्राशन करीत जावें; ह्मणजे रक्तपित्त, पांडुरोग, सर्व प्रकारचीं अंगावर आलेलीं कुष्टें, सर्व प्रकारचे प्रमेह रोग, सर्व प्रकारच्या मूळव्याधी, जंतविकार, व पाण्याचा शोप, हे रोग दूर होऊन मल व मूत्र हीं साफ होतात.

२ **कुमारीआसव**—कुमारी ह्मणजे कोरफडीचा रस १०२४ तोळे, गूळ २०० तोळे, सुरवारी अथवा रंगारी हिरडेदळ ५० तोळे व पाणी ५१२ तोळे घेऊन त्यांचा चतुर्थांश काढा करावा. व गाळून घेऊन १२६ तोळे मध, ३२ तोळे धायटीच्या फुलाचें चूर्ण, आंत घालून तुपानें राबलेल्या मडक्यांत किंवा बरणींत घालून त्यांत जायफळ, लवंगा, कंकोळ, कबाबचिनी, जटामांसी, चवक, चित्रक, जायपत्री, काकडशिंगी, बेहेडेदळ, व पोखरमूळ, या प्रत्येकाचा कल्क ह्मणजे पाण्यांत वांटून केलेला गोळा दोन दोन तोळे, ताम्रभस्म १ तोळा, लोहभस्म १ तोळा त्यांत घालून सर्व एकजागी करून त्याचें तोंड बंद करून जमिनींत किंवा धान्याचे राशींत २० दिवसपर्यंत पुरून ठेवावा. नंतर बाहेर काढून गाळून ठेवावा. रोग्याचे अग्नि, बळ पाहून चार तोळेपर्यंत प्राशन करण्यास देत जावा; ह्मणजे पांच प्रकारचे कास, पांच प्रकारचे श्वास, भयंकर क्षयरोग, आठ प्रकारचीं उदरें, सहा प्रकारच्या मूळव्याधी, वातरोग, अपस्मार आणखीही इतर रोग यांचा नाश करितो. अग्नि प्रदीप्त होतो. शूळ नाहींसा होतो. आठ प्रकारचे गुल्मरोग व स्त्रियांचें नष्ट पुष्प हीं पंधरा दिवसात नाश पावतात. हा कुमारीआसव लोककल्याणार्थ बृहस्पतीनें निर्माण केला आहे. व तो वाग्भटानें प्रसिद्धीस आणला आहे. हें आसव

तयार करण्याचे दोन पाठ आहेत. ते असे कीं एक आसवरुपानें काढा केल्या- वांचून व एक अरिष्टरुपानें काढा करून सिद्ध करितात.

३ **द्राक्षासव**—द्राक्षें ४०० तोळे घेऊन ४०९६ तोळे पाण्यांत भिजत घालून चतुर्थांश काढा करून गाळून घ्यावा. नंतर त्यांत खडीसाखर ४०० तोळे, मध ४०० तोळे, धायटीचीं फुलें ६४ तोळे, जायफळ, मिरी, लवंग, दालचिनी, वेलची, कंकोळ, तमालपत्र, नाकेशर, पिंपळी, चित्रक, चवक, पिंपळमूळ, व रेणूक- बीज हीं औषधें चार चार तोळे प्रमाण घेऊन कुटून वस्त्रगाळ करावीं. नंतर चं- दनाची धुरी दिलेल्या तुपाच्या मडक्यांत तीं सर्व एकत्र करून पंधरा दिवस ठेवावें. नंतर काढून शुद्ध कापुराचा वास देऊन भक्षण करावें. ह्मणजे संग्रहणी रोग, मूळव्याध, उदावर्त, गुल्म, उदर, कृमि, कुष्ठ, व्रण, नेत्ररोग, शिरोरोग आणि ग- लरोग हे रोग दूर होतात.

४ **पिप्पल्यासव**—पिंपळी, मिरीं, चवक, हळद, चित्रक, नागरमोथे, वावडिंग, सुपारी, लोध्र, पहाडमूळ, आंवळकठी, एलवाळूक, पांढरा चंदन, कोष्ठ, लवंगा, तगर, जटामांसी, एलची, तमालपत्र, वाघाटीमूळ अथवा राळेचा वृक्ष व ना- केशर, ही २२ औषधें दोन दोन तोळे घेऊन चूर्ण करावें. २५॥ शेर पाणी घेऊन त्यांत चूर्ण घालावें. १९ शेर गूळ, धायटीची फुलें अर्धा शेर, द्राक्षें ३ शेर हीं दोन्ही बारीक करून, लाखलोटे मडक्यांत किंवा बरणींत घालून त्याचे तोंडास चिखलादिकाचा लेप करून एक महिनाभर तसेंच जमिनीत किंवा धान्याचे राशींत पुरून ठेवावें. नंतर आंतील औषध काढून गाळून बाटल्यांत भरून ठेवावें. या- च्या सेवनानें क्षयरोग, सर्व प्रकारचे गुल्म, उदररोग, शरीराची कृशता, संग्रहणी, पांडुरोग, व मूळव्याध हे सारे रोग लवकर दूर होतात.

५ **लोहासव**—लोहभस्म, जलतर, सुंठ, मिरी, पिंपळी, हिरडेदळ, बेहेडे- दळ, आंवळकठी, अजमोदा, वावडिंग, नागरमोथे व चित्रकमूळ, हीं अकरा औषधें सोळा सोळा तोळे, धायटीचीं फुलें १ शेर, या सर्वांचें चूर्ण करावें.नंतर ३ शेर मध, गूळ ५ शेर, पाणी २५॥ शेर, सर्व एक ठिकाणीं करून तुपाचे रावलेले मडक्यांत किंवा बरणींत घालून एक महिनाभर जमिनींत किंवा धान्याचे राशीत पुरून ठे- वावें, व चार तोळेपर्यंत प्राशन करीत जावें, तेणेंकरून जठराग्नि प्रदीप्त होतो. व पांडुरोग, सूज, गुल्म, मूळव्याध, सर्व प्रकारचीं कुष्ठें, कृवलु, म्हणजे पान्थ- री रोग, कंडू, खोकला, श्वास, भगंदर, अरुचि, संग्रहणी, व हृद्रोग, यांचा नाश होतो.

१ **कुटजाद्यरिष्ट सर्व ज्वरांवर**—कुड्याचें मूळ ५ शेर, मनुका २॥ शेर, मोहाचीं फुलें ।॥ शेर, शिवणमूळ ।॥ शेर, हीं औषधें थोडीं कुटून ५१ शेर पाणी घालून त्याचा काढा करावा. चतुर्थांश राहिला ह्मणजे गाळून घ्यावा. नंतर त्यात धायटीच्या फुलांचें चूर्ण १ शेर, जुना गूळ ५ शेर घालून सर्व एक जागी करून

लाखलोटे मडक्यांत किंवा बरणींत घालून त्याचे तोंडास चिखल वगैरे लाऊन तोंड चांगलें बंद करून जमिनींत किंवा धान्याचे राशींत पुरून एक महिना बाजूस ठेवावें. नंतर तोंडाची मुद्रा काढून तें अरिष्ट ४ तोळे प्रमाण प्राशन करावें ह्मणजे सर्व प्रकारचे ज्वरांचा नाश होऊन अग्नि प्रदीप्त होतो.

२ खदिराद्यरिष्ट—खैराची साल २॥ शेर, देवदार २॥ शेर, बावंच्या ४८ तोळे, दारुहळद १ शेर, हिरडेदळ -॥ शेर, आंवळकठी -॥ शेर, हीं सारीं औषधें घेऊन थोडीं कुटून त्यांत ५१ शेर पाणी घालून चौथा हिस्सा शेष राहितोंपर्यंत काढा करून गाळून थंड झाल्यावर त्यांत मध १० शेर, साखर २॥ शेर, धायटीचीं फुलें १ शेर, कंकोळ ४ तोळे, नाकेशर ४ तोळे, जायफळ ४ तोळे, लवंगा ४ तोळे, एलची ४ तोळे, दालचिनी ४ तोळे व तमालपत्र ४ तोळे व पिपळी १६ तोळे या सर्वांचें चूर्ण करून त्या काढ्यात मिळवून तुपानें रावलेल्या पात्रांत घालून त्याचें तोंड चिखल वगैरे लावून अगदीं बंद करावें. नंतर एक महिनापर्यंत जमिनींत अथवा धान्याचे राशींत पुरून ठेवून, नंतर तोंडाचा लेप काढून गाळून बाटल्यांत भरून ठेवावा. याचें सेवन केलें असतां महा कुष्ठ, हृद्रोग, पांडुरोग, अर्बुद, गुल्म, ग्रंथी, जंतविकार, श्वास, खोकला व पान्थरी हे सारे रोग दूर होतात.

३ दशमुळाद्यरिष्ट—रानगांज्या ( सालवण ) रानभाल ( पिठवण ) रिंगणी, मोतरिंगणी, गोखरु, बेलाचें मूळ, ऐरणीचें मूळ, शिवणमूळ, पाहाडमूळ व टेंटूमूळ हीं प्रत्येक दोन दोन तोळे, चित्रकमूळ १। शेर, पोखरमूळ १। शेर, लोध्र १ शेर, ओले गुळवेलीचे तुकडे १। शेर, आंवळकठी ६४ तोळे, धमासा ४८ तोळे, खैराची साल ३२ तोळे, विवळ्याचे झाडाची साल ३२ तोळे, हिरडेदळ ३२ तोळे, कोष्ठ, मंजिष्ट, देवदार, वावडिंग, जेष्टीमध, भारंगमूळ, कवठ, बेहेडेदळ, पुनर्नवा, चवक, जटामांसी, वाघाटीचेंमूळ, अथवा राळेचा वृक्ष, उपळसरी, शहाजिरें, निशोत्तर, रेणूकबीज, रस्ना, पिपळी, सुपारी, कचोरा, हाळद, बडीशेप, पद्मकाष्ठ, नाकेशर, नागरमोथे, इंद्रजळ, काकडाशिंग, जिवक, ऋषभक, या दोहोंच्या अभावी विदारीकंद ह्मणजे भुईकोहळा, मेदा, व महा मेदा यांचे अभावी जेष्टीमध, कंकोळी व क्षीरकांकोळी याचे अभावी आस्कंद, ऋिद्धि व सिद्धि याचे अभावीं वाराहीकंद ( डुकरकंद ) हीं प्रत्येक औषधें आठ आठ तोळे घेऊन थोडीं कुटून नंतर त्यांत ८० शेर पाणी घालून चतुर्थांश काढा राहितोंपर्यंत कढवून नंतर गाळून बरणींत घालून ठेवावें. नंतर ४ शेर मनुका घेऊन त्यांत चौपट पाणी घालून तिसरा हिस्सा पाणी राहितोंपर्यंत कढवून गाळून तें वरील काढ्यांत मिळवावें. नंतर दीड शेर मध व २० शेर जुना गूळ, धायटीचीं फुलें १॥ शेर, कंकोळ, वाळा, पांढरा चंदन, काळा वाळा, लवंगा, दालचिनी, वेलची, तमालपत्र, नाकेशर व पिपळी, हीं दहा औषधें प्रत्येक आठ आठ तोळे घेऊन साऱ्यांचें चूर्ण करून त्या काढ्यात मिळवावें. नंतर चार मासे कस्तुरीचें बारीक चूर्ण करून त्यांत टाकावें व सर्व एकसारखें करून त्या पात्राचे तोंडाला चिखल वगैरे लावून चांगलें बंद करून एक महिना ज-

मिनींत पुरून ठेवावें. नंतर वरील तेल काढून त्यांत निर्मळीच्या बियांचें चूर्ण थोडें टाकावें ह्मणजे तें औषध निर्मळ होतें. नंतर गाळून बाटल्यांत भरून ठेवावें. हें औषध चार तोळेपर्यंत बलाबल पाहून सेवन केलें असतां संग्रहणी, अरुचि, श्वास, खोकला, गुल्म, भगंदर; सर्व प्रकारचे वायूचे रोग, क्षय, ओकारी, पांडुरोग, कामला, सर्व प्रकारचीं कुष्ठें, मूळव्याधि, सर्व प्रकारचे प्रमेह, अग्निमांद्य, सर्व प्रकारचे उदररोग, मूतखडा, मूत्रकृच्छ्र, धातुक्षय, हे सारे रोग दूर होतात. दुर्बळ मनुष्य पुष्ट होतो. व तेज, धातु, बळ याना वाढवून मलमूत्र साफ होते.

४ **द्राक्षाद्यरिष्ट**—द्राक्षें ( बिया काढलेल्या मनुका ) २॥. शेर घेऊन त्यांत २५॥. शेर पाणी घालून चतुर्थांश काढा करून गाळून थंड झाल्यावर त्यांत गूळ १ शेर, दालचिनी ४ तोळे, वेलची ४ तोळे, तमालपत्र ४ तोळे, नाकेशर ४ तोळे, वाघांटीचें मूळ ४ तोळे, मिरीं ४ तोळे, पिंपळी ४ तोळे, व वावडिंग ४ तोळे, या सर्वांचें चूर्ण करून त्या काढ्यांत घालून चांगलें ढवळून एकजागीं मिळवावें. नंतर एका बरणीत घालून तोंड अगदीं बंद करून एक महिना जमिनींत पुरून ठेवावें. नंतर गाळून बाटल्यात भरून ठेवावें. ४ तोळेपर्यंत नित्य सेवन करीत जावें; ह्मणजे उरःक्षतरोग, क्षय, खोकला, श्वास, व कंठरोग हे सर्व रोग दूर होऊन मलमूत्र साफ होते.

५ **देवदार्व्याद्यरिष्ट**—देवदार २॥. शेर, आडूळसा १।. शेर, मंजिष्ठ, इंद्रजव, दांतामूळ, तगर, हाळद, दारुहाळद, रास्ना, वावडिंग, नागरमोथे, शिरस, खैराची साल, व अर्जुनसादड्याची साल, हीं प्रत्येक अर्ध अर्ध शेर, अजमोदा, कुड्याची साल, पांढरा चंदन, गुळवेल, कुटकी व चित्रक, हीं प्रत्येक औषधें ३२ तोळे घेऊन थोडी कुटून त्यांत १०० शेर पाणी घालून अष्टमांश काढा करून गाळून घ्यावा. थंड झाल्यावर त्यांत धायटीची फुलें पाऊणशेर, मध १५ शेर, त्रिकटूचें चूर्ण ८ तोळे, दालचिनी ४ तोळे, एलची ४ तोळे, तमालपत्र ४ तोळे, वाघाटीचें मूळ १६ तोळे, नाकेशर ८ तोळे, या सर्व औषधांचें चूर्ण करून तें चूर्ण व मध काढ्यांत घालून एकत्र करावीं. नंतर बरणींत घालून तोंड चागलें बंद करून एक महिना जमिनींत किंवा धान्याचे राशींत पुरून ठेवावें. नंतर तें गाळून बाटल्या भरून ठेवाव्या.चार तोळ्यांपर्यंत बलाबल पाहून सेवन करीत जावें ह्म० मोठा दुर्घट प्रमेह दूर होतो. सर्व प्रकारचे वायूचे रोग, संग्रहणी, मूळव्याध, मूत्रकृच्छ्र, कंडू व सर्व प्रकारचे रोग दूर होतात.

६ **बब्बुल्यादीरिष्ट**—बाभळीची साल एकशेर घेऊन थोडी कुटून त्यांत ९ शेर पाणी घालून चतुर्थांश काढा उरला ह्मणजे गाळून थंड झाल्यावर त्यांत गूळ १॥ शेर, धायटीची फुलें ६ तोळे, पिंपळी ९ मासे, जायफळ, कंकोळ, विलायची, दालचिनी, तमालपत्र, नाकेशर, लवंगा व मिरीं हीं प्रत्येक अर्ध अर्ध तोळा घेऊन साऱ्यांचें चूर्ण त्या काढ्यांत मिळवून तुपानें रावलेल्या मडक्यांत किंवा बरणीत तो काढा

घालून त्याचें तोंड चिखल वगैरे लावून बंद करून १ महिनाभर जमिनींत अथवा धान्याचे राशींत पुरून ठेवून नंतर वरील लेप काढून गाळून बाटल्यांत भरून ठेवावें व ४ तोळे प्रमाण सेवन केलें असतां क्षय, कुष्ठ, अतिसार, सर्व प्रकारचे प्रमेह, खोकला व श्वास हे रोग दूर होतात.

७ **रोहितादीरिष्ट**--रक्तरोडा २॥ शेर घेऊन थोडा थोडा कुटून त्यांत २५ शेर पाणी घालून चतुर्थांश काढा उरवून गाळून थंड झाल्यावर त्यांत गूळ ५ शेर, धायटीचीं फुलें ३२ तोळे, पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, दालचिनी, तमालपत्र, एलची, हिरडेदळ, बेहेडेदळ, आंवळकठी, ही प्रत्येक दोन दोन तोळे घेऊन चूर्ण करून त्या काढ्यांत मिळवून वरणींत घालून तोंड चागलें बंद करून एक महिनापर्यंत जमिनींत किंवा धान्याचे राशीत पुरून ठेवावें. नंतर गाळून बाटल्यांत भरून ठेवावें. ४ तोळे प्रमाण बलाबल पाहून प्राशन करीत जावें, म्हणजे मूळव्याध, संग्रहणी, पांडुरोग, हृद्रोग, पानूथरी, गुल्म, सर्व प्रकारचीं उदरें व सर्व प्रकारचीं कुष्ठें, सूज व अरुचि हे रोग दूर होतात.

८ **विडंगाद्यरिष्ट विद्रध्यादिकांवर**---वावाडिंग, पिंपळमूळ; रास्ना, कुड्याची साल, इंद्रजव; पहाडमूळ; एलवालुक, व आंवळकठी ही औषधें प्रत्येक वीस वीस तोळे घेऊन थोडीं कुटून १०२ शेर पाणी घालून अष्टमांश काढा राहिल्यावर गाळून थंड करून त्यांत १५ शेर मध घालावा. धायटीच्या फुलांचें चूर्ण १ शेर, दालचिनीचें चूर्ण ४ तोळे, एलचीचें चूर्ण ४तोळे,तमालपत्राचें चूर्ण ४ तोळे, त्रिकटूचें चूर्ण ३२ तोळे, हीं सर्व औषधें त्या काढ्यांत मिळवावी. नंतर रावलेल्या तुपाचे मडक्यांत किंवा वरणीत घालून त्याचे तोंडाला चिखल वगैरे लावून चांगलें बंद करून १ महिना जमिनींत किंवा धान्याचे राशीत पुरून ठेवावें. नंतर तोंडाची मुद्रा काढून तें अरिष्ट ४ तोळे प्रमाणें प्राशन करावें, म्हणजे विद्रधि, ऊरुस्तंभ, मूतखडा, सर्व प्रकारचे प्रमेह, नाभीचेखाली प्रत्यष्ठीला नामें रोग होतो तो,गंडमाळा, हनुस्तंभ, वायु व सारे वायूरोग दूर होतात.

---

## धातुपुष्टीचीं औषधें.

( १ ) सुवर्णमाक्षिकभस्म २ गुंजा व खडीसाखरेची पूड सहा मासे, पावशेर गाईचे दुधांत घालून तें दूध सेवन करीत जावें. याप्रमाणें चौदा किंवा एकवीस दिवस एकसाज किंवा दोहींसांज जसें सोसेल तसें सेवन केलें असतां धातुस्थानची कडकी म्हणजे उष्णता शांत होऊन धातु पुष्ट होते. व वीर्यपतन होत असल्यास बंद होऊन चांगलें कामोद्दीपन होतें. ( २ ) बाभळीचा डिंक ॥ शेर, पिठीसाखर ॥ शेर, बदामाचे गोळे ॥ शेर, इसबगोल ५ तोळे, बीजबंद १ तोळा, तालीमखाना ६ तोळे, दालचिनी १ तोळा, मदनमस्त १ तोळा, लसणी सालममिश्री

१ तोळा, सफेत मुसळी १ तोळा, पंजाबी सालम १ तोळा, उडदाच्या पांढऱ्या दाळींचें भाजलेलें पीठ २ तोळे, कुहिरींचें बिचा मगज एक तोळा, व खारकेचीं टरफलें ·।|· शेर ही सर्व औषधें एकत्र कुटून वस्त्रगाळ करून ठेवावी. दररोज प्रातःकाळी गाईचें तूप २ तोळे, त्यांत या औषधाचें चूर्ण एक तोळा मिश्र करून सेवन करीत जावें. व वर गाईचें दूध सोसेल इतकें पित जावें. याप्रमाणें सात, चौदा, किंवा एकवीस दिवस सेवन केलें असतां धातुपुष्ट होते यांत बिलकूल संदेह नाहीं. ( ३ ) नागरमोथे ५ मासे, वंशलोचन ६ मासे, वेलदोड्याचे दाणे ३ मासे, कचोरा ५ मासे, कमळबीज ५ मासे, केशर १ मासा, कंकोळ २ मासे, आंवळकठी ३ मासे, पांढरीं मिरी १ मासा, सुंठ २ मासे, पाढरा सुवासिक चंदन १ मासा, व खसखस ३ मासे, या सर्वांचें वस्त्रगाळ चूर्ण करून ठेवावें व सहा मासेपर्यंत थंड पाण्यात किंवा गाईचे दुधांत अथवा मधात सात, चौदा किंवा एकवीस दिवस सेवन केलें असतां धातूची वृद्धि होते. व ज्याची झोंप उडाली असेल त्या मनुष्यास चांगली झोंप येऊं लागते व सर्व अंगांतील रक्ताची शुद्धि होते असें जाणावें. ( ४ ) कोहळ्याची साल सावलींत सुकवून चूर्ण करून ठेवावें. तें चूर्ण ६ मासे व खडीसाखर ६ मासे, गाईचे पावशेर दुधात मिश्र करून दररोज प्रातःकाळी सेवन करीत जावें याप्रमाणें चौदा किंवा एकवीस दिवस सेवन ठेविलें असतां शुक्रधातूचे दोष दूर होऊन धातूची पुष्टि व वृद्धि होते शरीर पुष्ट होऊन चांगली कांति दिसू लागते. (५) उटकटारीचे मुळावरील साल सावलीत वाळवावी ती, गोखरु व कुहिलीचें बीज ही सर्व समभाग घेऊन चूर्ण करून ठेवावें. तें चूर्ण सहा मासे व खडीसाखर सहा मासे, गाईचे पावशेर दुधांत घालून तें दूध मंदाग्नीवर थोडें आटलें म्हणजे प्रातःकाळी सेवन करीत जावें. याप्रमाणें सात किंवा १४ दिवस केलें असतां शुक्रधातूंचे सर्व विकार जाऊन धातुपुष्ट होते. ( ६ )—इसब गोल १ तोळा, खडीसाखर १ तोळा व एलची दाणे ३ मासे ही तिन्हीं बारीक कुटून रात्रौ कल्हईचे किंवा काचेच्या पालांत पावशेर पाण्यात भिजत ठेवावीं. प्रातःकाळी हातानें चांगलें कोवळून तें पाणी प्राशन करीत जावें. म्हणजे धातू पुष्ट होऊन वीर्यपतन बंद होतें. ( ७ ) आस्कंद व वरधारा या दोहोंचें समभाग चूर्ण करून ठेवावें व तें चूर्ण १ तोळा व खडीसाखरेची पूड ६ मासे सोसेल इतकें गाईचें दूध ऊन करून त्यांत तें मिश्र करून प्रातःकाळी सेवन करीत जावें. याप्रमाणें चौदा किंवा २१ दिवस सेवन केलें असतां वहुत स्त्रियांशी संभोग केला असतांही तृप्ति होत नाहीं व स्त्री जवळ नसतां हें चूर्ण सेवन केलें तर अंगाच्या सुरकुत्या साफ होऊन पांढरे केसाचे काळे केंस होतात यांत संशय माही. ( ८ ) उटकटारीचे मुळावरील साल सावलींत वाळवून वस्त्रगाळ चूर्ण करून ठेवावें व मोगली बेदाणा १ तोळा रात्रीं पावशेर पाण्यांत भिजत घालून प्रातःकाळी हातानें कुसकरून तें पाणी गाळून घेऊन त्यांत खडीसाखरेचें चूर्ण १ तोळा व त्या सालीचें चूर्ण सहा मासे घालून प्राशन करावें, म्हणजे धातुपुष्ट होऊन स्वप्नावस्था बंद होईल.

---

# अनुपान प्रकरण.

**सर्व साधारण अनुपानें**—जीं औषधें योगवाही आहेत किंवा ज्या औषधांत अनुपान न सांगतां अमुक औषध अनुपान योजून द्यावें असें जेथें सांगितलें आहे, तेथें या पुढील अनुपानाची योजना करीत जावी. कारण अनुपानाचे योगानें मूळ औषधांस जोर येऊन तें उत्तम गुण करितें. ( १ ) अजीर्णास बाळहिरडे किंवा वडीशेप अथवा निंबूरस यांत द्यावें. (२) अतिसारास बेलाचा मुरांबा किंवा कोवळे बेल फळाचा मगज अथवा कुड्याचा रस किंवा शेळीचें दूध किंवा साखर अथवा ताक किंवा मध यांत द्यावें. ( ३ ) अपस्मारास वेखंड अथवा अक्कलकाला, किंवा मध अथवा गाईचें दूध यांत द्यावें. ( ४ ) अरुचीस आल्याचा रस व मध किंवा महाळुंगाचा रस अथवा डाळिंब यात द्यावें. ( ५ ) अश्मरीस गोखरूचा काढा किंवा शिलाजीत यांत द्यावें. ( ६ ) अस्थिभंगास मध, अथवा गाईचें तूप किंवा हाडजोडीचा रस यांत द्यावें. ( ७ ) अंडवृद्धीस गोमूत्र अथवा एरंडेल तेल यांत द्यावें. ( ८ ) आनाहवायूस आस्कंद व सुंठ यांचे चूर्णांत किवा रेचक औषधांत द्यावें. ( ९ ) आमवायूस एरंडेल, निंबूरस अथवा गोमूत्र यांत द्यावें. ( १० ) आर्दितवायूस उडदाचे वडे व लोणी यांत द्यावें. ( ११ ) आम्लपित्तास द्राक्षें किंवा आंवळकठी अथवा गाईचें तूप व साखर यात द्यावें. ( १२ ) उचकीस तुळशीचा रस किंवा महाळुंगाचे फळाचा रस अथवा मध यांत द्यावें. ( १३ ) सर्व उदररोगांस त्रिफळा व कुटकी यांचे काढ्यांत किंवा रेच करणारे औषधांत द्यावें. ( १४ ) उदावर्तास बाळहिरडे, बाहाव्याचा मगज व शेंदेलोण यांत द्यावें. ( १५ ) उन्मादास अक्कलकाल्याचें चूर्ण किंवा जुनें तूप यांत द्यावें. ( १६ ) उपदंशास कोरफडीचा गीर व गाईचें तूप यांत अथवा गोखरूचे चूर्णांत द्यावें. ( १७ ) कामलेवर पांढरे वसूचें चूर्ण व गाईचें दूध किंवा मनुकाचें काढ्यांत द्यावें. ( १८ ) कासास आडुळशाचा रस अथवा त्रिकटू किंवा रिंगणमूळ अथवा वेहेडेदळ यांत द्यावें. ( १९ ) सर्व प्रकारचे कुष्ठांस पांढऱ्या पांगाऱ्याचे सालीचे चूर्णांत अथवा खैराच्या सालीचे काढ्यांत द्यावें. ( २० ) कृमीस वावडिंग अथवा चाकवत किंवा निंबूरस अथवा सागरगोठ्याचे आंतील गोळे भाजून ते व सैंधवाचें चूर्ण यांत द्यावें. ( २१ ) गुल्मास एरंडेल किंवा निंबूरस आणि गाईचें दूध यांत किवा चुक्याचे रसांत द्यावें. ( २२ ) ज्वरास मध व पिपळी यांत. ( २३ ) उलटलेल्या ज्वरास किराईत आणि नागरमोथे किंवा पित्तपापडा यांत द्यावें. ( २४ ) तृषेस व दाहरोगास साखर आणि दूध किंवा डाळिंबाचे सरवत किंवा गुलकंद यांत द्यावें. ( २५ ) धातुपुष्टीस वदामाचे आंतील गोळे, किंवा दूध व साखर यांत द्यावें. ( २६ ) नेत्ररोगास त्रिफळ्याचा काढा किंवा पांढरे वसूचें चूर्ण अथवा तूप व खडीसाखर यांत द्यावें. ( २७ ) पांडुरोगास लोणी व खडीसाखर अथवा दूध किंवा पुनर्नव्याचे काढ्यांत द्यावें. ( २८ ) प्रदरास लोध्र किंवा केळीचे कांद्याचें रसांत द्यावें. ( २९ ) सर्व प्रकारचे प्रमेहांस आंवळकठीचें चूर्ण

किंवा हळदीचें चूर्ण किंवा मध यांत द्यावें. ( ३० ) भगंदरास मध व तूप यांत किंवा गाढवाचे रक्ताचा लेप करावा. ( ३१ ) मस्तकशूळास तूपसाखर किंवा दुधाचा खवा यांत द्यावें. ( ३२ ) मूर्च्छेस तांदुळाचें धुवण किंवा द्राक्षाचें सरबत अथवा गुलकंद यांत द्यावें. ( ३३ ) मुखरोगास कात किंवा गाईचें दूध व तूप यांत. ( ३४ ) मूत्रकृच्छ्रास गोखरूचे काढ्यांत किंवा तांदुळाचे धुवणांत. ( ३५ ) मूत्राघातास साखर आणि दूध अथवा हाजरतीबोराचे चूर्णांत द्यावें. ( ३६ ) मूळव्याधीस चित्रक अथवा भिलावा किंवा लोणी व खडीसाखर यांत द्यावें. ( ३७ ) मेदास मध व उन पाण्यांत द्यावें. ( ३८ ) रक्तपित्तास आडूळशाचे पानाचा रस किंवा धमाशाचे काढ्यांत. ( ३९ ) रक्तपितीस गुळवेलीचा काढा किंवा एरंडेल यांत. ( ४० ) वातव्याधीस लसणाचा रस व तूप किंवा निर्गुडीचा रस व तूप आणि गुग्गुळ यांत. ( ४१ ) वांतीस साळीच्या लाह्या किंवा मनुकांचा काढा आणि मध अथवा साखर यांत. ( ४२ ) विषास तांदुळजाचा रस किंवा तांदुळाचें धुवण अथवा सोनें किंवा मध यांत. ( ४३ ) शीतपित्तास पिलूचे पाल्याचा रस अथवा मिरपूड व तूप यांत. ( ४४ ) व्रणास त्रिफळा किंवा गुग्गुळ यांत ( ४५ ) शूळास हिंग व तूप अथवा निंबूरस यांत द्यावें. ( ४६ ) श्वासास आडुळशाचा रस किंवा भारंगमूळ अथवा त्रिकटूचें चूर्ण किंवा आल्याचा रस व मध यांत. ( ४७ ) सन्निपातास आल्याचा किंवा तुळशीचा रस यांत. ( ४८ ) सुजेस मधांत. ( ४९ ) संग्रहणीस ताकांत. ( ५० ) स्वरभेदास बडीशेप व खडीसाखर यांचे चूर्णांत. ( ५१ ) हृद्रोगास बेहेडेदळ यांत. ( ५२ ) क्षयास आडूळशाचे पिकलेल्या पानाचा रस व मध यांत अथवा लोणी, खडीसाखर व मध किंवा शिलाजितांत द्यावें. याप्रमाणें अनुपानानें जाणावीं. अनुपानाचे योगानें मूळ औषधास अधिक तेज येऊन त्वरित गुण येतो. अनुपानाशी एकाच पदार्थाचा किती रोगांवर कसा उपयोग होतो. तें खालीं दाखविलें आहे.

( अस्थि ) हडाची अनुपानें ( १ ) **नाडीव्रण व भगंदरावर**—तरसाचें हाड पाण्यांत उगाळून प्यावें व लेपही करावा. ( २ ) **पिनसावर**—तरसाचें हाड पाण्यांत उगाळून नस्य द्यावें ( ३ ) **जलोदरावर**—माणसाची कपाळकरंवटी पाण्यांत उगाळून प्यावी; ह्मणजे सूज लवकर उतरते. ( ४ ) **हाड्याव्रण व सडलेल्या कुष्ठावर**—माणसाचें हाड बारीक वांटून वस्त्रगाळ करून, तें क्षतावर लावीत जावें; ह्मणजे क्षतें लवकर भरून येतात. ( ५ ) **पिसाळलेल्या कोल्ह्याचे व कुत्र्याचे विषावर**—कुत्र्याचा सुळादांत व कपाळाच्या करवंटीचें हाड पाण्यांत उगाळून द्यावें अथवा वाघाचा सुळा दात व वाघाच्या कपाळाच्या करवंटीचें हाड पाण्यात उगाळून द्यावें. (६) **सर्पाचे विषावर**—गरूड पक्षाची चोंच पाण्यांत उगाळून द्यावी. ( ७ ) **गुराचे घशांत हाड अडकल्यास**—तरसाच्या नाकाचें हाड पाण्यांत उगाळून, तें पाणी वरचेवर पाजवावें. ( ८ ) **भगंदरावर**—त्रिफळ्याचे काढ्यांत मांजराचें हाड उगाळून लेप द्यावा. ( ९ ) **नासुरावर**—ख-

वल्या मांजराचें हाड, कांसवाची करवंटी व तरसाचें हाड उगाळून लावावें. (१०) **मुलाच्या पोटांतील डव्यावर**—कांसवाची कपाळकरवंटी उगाळून पाजवावी. (११) **भगंदरावर व दुष्ट व्रणावर**—मांजराच्या व कुत्र्याच्या हाडांचें भस्म करून तुपांत खलून लेप करावा. (१२) **उंदराचे विषावर**—खवल्या मांज-राचें हाड पाण्यात उगाळून लावावें.

२ **अर्जुनसादडा**—(१) विंचवा उतल्यास याची साल व पानें कुटून त्या ठिकाणीं लेप करावा. (२) पित्त व हृद्रोगावर याचे सालीचा काढा दुधांत करून तें दूध खिरीसारखें आटवून प्यावें. (३) हृद्रोगावर याचे अंतरसालीचा कल्क करून त्याच्या चौपट तूप व तुपाच्या चौपट याचे पानाचे सालीचा रस त्यांत घालून तूप शेप राहितोंपर्यंत मंदाग्नीवर कढवावें. त्या तुपाच्या सेवनानें सर्व प्र-कारचे हृद्रोग नाश पावतात. (४) अस्थिभंगावर याचें चूर्ण दुधांत द्यावें. (५) व्रण भरून येण्यास याच्या काढ्यानें व्रण धुवावा ह्मणजे लवकर भरून येतो, व त्यांत कृमि वगैरे पडत नाहींत. (६) हृद्रोग, रक्तपित्त व जीर्णज्वर यां-जवर याच्या सालीचें चूर्ण मधांत द्यावें.

३ **अभ्रकभस्म**—एक गुंजेपासून चार गुंजांपर्यंत अनुपान योजून द्यावें. (१) प्रमेहास मधपिपळींत. (२) श्वासास मधपिंपळींत. (३) विषास मध-पिपळींत. (४) कुष्ठास मधपिंपळींत. (५) वायु, पित्त व कफ यास मधपिंप-ळींत. (६) खोकल्याचे क्षीणतेस मधपिंपळींत. (७) क्षतक्षयास मधपिंपळींत. (८) संग्रहणीस मध, पिपळींत. (९) पांडुरोगास मधपिपळींत. (१०) भ्रमास मधपिंपळींत. (११) कामलेस मधपिंपळींत. (१२) गुल्मास मधपिंपळींत द्यावें. (१३) मधपिंपळी व शिलाजीत यांत दिलें असतां वीस प्रकारच्या प्रमेहांचा नाश होईल यांत संशय नाहीं. (१४) क्षयावर लोणी व सुवर्णवर्खाशीं. (१५) धातुवृद्धीस रौप्य व सुवर्ण याचे वर्खाशीं, किंवा यांच्या भस्माबरोबर अथवा लवं-गाचें चूर्ण व मध यांत. (१६) पित्तास गाईचें दूध व साखर यांत. (१७) वलीपालितरोगास त्रिफळ्यांत. (१८) त्रिकटूचें चूर्ण व तूप यांत दिलें असतां क्षय, पांडुरोग, संग्रहणी, कुष्ठ, सर्व प्रकारचे श्वास, प्रमेह, अरुचि, मोठा दुस्तर खोकला, अग्निमांद्य, पोटशूळ, व शोष याचा नाश होतो. (१९) रक्तपित्तास हरीतकी, गूळ, किंवा एलची दाणे व साखर यांत. (२०) क्षय, पांडुरोग व मूळव्याध यांस त्रिकटू, किंवा त्रिफळा अथवा चातुर्जात अथवा साखर किंवा मध यांत. (२१) प्रमेह व मूत्रकृच्छ्र यांस एलचीदाणे, गोखरू, भूयआंवळी, खडीसाखर व गाईचें दूध, यांतून एकांत द्यावें. (२२) प्रमेहास गुळवेलीचें सत्व व खडीसाखर यांत. (२३) जीर्णज्वरास मधपिपळींत. (२४) नेत्ररोगास व धातुपुष्टीस त्रिफळा चूर्ण तूप व मध यांत. (२५) व्रणरोगास मोरवेलीचें सत्व व त्रिकटूचें चूर्ण यांत (२६) बलवृद्धीस गाईचें दूध आणि पांढऱ्या भुईकोहळ्याचा रस यांत. (२७) मूळव्याधीस लोणी, खडीसाखर व विंचवा यांत. (२८) वायुरोगास सुंठ, पुष्कर-

मूळ, भारंगमूळ, व आस्कंद यांपैकीं एकाचे चूर्णांत मध घालून त्यांत अभ्रकभस्म देत जावें. ( २९ ) कफास कायफळ, पिंपळी व मध यांत. ( ३० ) जठराग्नि प्रदीप्त होण्यास व मूत्राघात, मूत्रकृच्छ्र व मूतखडा यांस सर्व क्षारांबरोबर द्यावें. (३१) धातुस्तंभनास भांगेचें चूर्णात. याखेरीज जे दुसरे रोग राहिले आहेत त्यांस आपल्या युक्तीनें अनुपान योजून द्यावें. हें अभ्रकभस्म शीतवीर्य असून योगवाही आहे. हें मृत्यूचेंही निवारण करितें. या अभ्रकभस्मावांचून जरा व व्याधी याला दूर करणारें दुसरें औषध नाहीं असें जाणावें. **अशुद्ध अभ्रकदोष**—कच्चें अभ्रकभस्म सेवन केलें असतां अनेक प्रकारच्या पीडा, कुष्ठ, क्षय, पाडुरोग, सूज, हृद्रोग व कुशी यांना पीडा, अग्निमांद्य, उदररोग, रक्तस्राव हे रोग उत्पन्न होऊन प्राणहरण करितें. व कफ आणि वायु याना वाढवील असें जाणावें. अभ्रकसेवन करणारानें खारट, आंबट, सर्व प्रकारच्या दाळी, काकड्या, कारलीं, वांगीं, कलिंगड, आणि तेल हे पदार्थ वर्ज करावे.

**४ अक्रोड**—( १ ) मूळव्याधीस अक्रोडाचे तेलांत काकडा भिजवून गुदांत घालून नेहमी ठेवीत जावा; ह्मणजे मोड गळून पडतात. ( २ ) अपस्मारावर निर्गुडीच्या रसांत अक्रोड उगाळून अंजन अथवा नस्य द्यावें. ( ३ ) वायूपासून आलेल्या सुजेवर अक्रोड कांजींत उगाळून लेप करावा. ( ४ ) स्तनांत दूध उत्पन्न होण्यास गव्हाचा रवा व अक्रोडाचीं पानें समभाग एकत्र करून त्याच्या पुऱ्या करून गाईच्या तुपाशीं सात दिवस खाल्ल्या असतां स्त्रियाचे स्तनांत फार दूध वाढतें. ( ५ ) अर्श, कृमि, इत्यादिकांवर कच्च्या अक्रोडाचा रस काढून तो द्यावा. म्हणजे मूळव्याध, कृमि, गुल्म, व संग्रहणी, हे रोग दूर होतात. (६) रेच होण्यास सालीचा काढा करून द्यावा. अथवा याचें तेल दोन तीन तोळे प्राशन करावें.

**५ आगस्ता**—( १ ) सर्दी, मस्तकशूळ व चातुर्थिक ज्वरावर आगस्त्याचे पानाचा रस काढून नाकांत घालावा. ( २ ) अर्धशिशीवर ज्या बाजूचें कपाळ दुखत असेल त्याच्या विषम बाजूच्या नाकपुडींत अगस्त्याचे पानाचा अगर फुलाचा रस पिळावा, म्हणजे कफ पडून अर्धशिशी बरी होत. ( ३ ) चित्तविभ्रमावर आगस्त्याचे पाल्याचे रसांत सुंठ, गूळ व पिंपळी ही औषधें उगाळून त्याचें नस्य द्यावें. ( ४ ) फुरशाच्या विषानें पोटांत गट्टा धरल्यास पांढरे अगस्त्याची साल, रिठ्याच्या पाण्यांत उगाळून द्यावी. रोग निस्तोष झाल्यावर तांदुळाच्या पेजेंत तूप घालून ती सुमारें पावशेर द्यावी. ( ५ ) कफविकारावर तांबड्या आगस्त्याचे मुळीचा अथवा सालीचा अंगरस काढून दोन तोळेपर्यंत बलाबल पाहून द्यावा. ( ६ ) सुजेवर तांबड्या आगस्त्याची मुळी व काळ्या धोत्र्याची मुळी या दोन्ही उन पाण्यांत समभाग उगाळून अंगास लेप करावा. म्हणजे सर्व प्रकारची सूज व नळगुद ही तांबडतोब बरीं होतात. (७) वायुबद्ध शरीर असल्यास तांबड्या आगस्त्याच्या मुळीवरील साल ४ गुंजापर्यंत विड्याचे पानात दररोज देत जावी, म्हणजे वातविकार कमी होतात.

६ अश्विनीकुमार—गोळी वालप्रमाण देत जावी. ( १ ) तिडीक परम्यास ओव्यांत. ( २ ) पिवळे परम्यास हळदींत. ( ३ ) पुरुषत्व येण्यास मधांत. ( ४ ) ज्वरास सुंठींत. ( ५ ) साधारण परम्यास तुळशीच्या रसांत. ( ६ ) शीतज्वरास कापशीच्या पाल्याच्या रसांत. ( ७ ) वायु व शैत्य यांस पिंपळमूळांत. ( ८ ) ऐकाहिक ज्वरास सुंठ, साखर आणि तुळशीचा रस यांत. ( ९ ) त्र्याहिक ज्वरास जिरें, मिरी व तुळशीचा रस यांत. ( १० ) चातुर्थिक ज्वरास माक्याच्या रसात. ( ११ ) सर्व उदरास इंद्रवारुणीचे मुळाचे रसांत. ( १२ ) जीर्णज्वरास खडीसाखरेंत. ( १३ ) खोकल्यास सैंधवांत. ( १४ ) बुद्धि वाढण्यास ब्राह्मीच्या रसांत ( १५ ) पुष्टीस बदामाचे गिरांत. ( १६ ) बाळंतरोगास हळद, बाळंतशोळ व तूप यांत. ( १७ ) अस्थिगतज्वरास पिठीसाखरेंत. ( १८ ) शूळास केळीच्या कांद्याचे रसांत. ( १९ ) नेत्रास तेज येण्यास जायफळांत. ( २० ) पंगुवायूस चित्रकचूर्णांत. ( २१ ) मूळव्याधीस टांकणखारांत. ( २२ ) पित्तरोगास बाळहिरडे, सुंठ व साखर यांव द्यावी. ( २३ ) पिशाचपीडेस गोळी उदवून गळ्यांत बांधावी. ( २४ ) मस्तकशूळास निंबाचें रसांत उगाळून मस्तकावर लेप द्यावा.

७ आघाडा—( १ ) विंचवाचे दंशावर आघाड्याचे तुरे अथवा मुळी पाण्यांत वांटून दंशावर लेप करावा. अथवा मुळी पाण्यांत उगाळून पाण्यांत कालवून तें पाणी कडू लागेपर्यंत थोडें थोडें प्यावयास द्यावें. पाणी कडू लागलें म्हणजे विप उतरेल. ( २ ) उंदराचे विषावर आघाड्याच्या कोंवळ्या तुर्‍यांचा रस काढून तो मधाशीं सात दिवस द्यावा. अथवा याचें बीज मधाशीं द्यावें. ( ३ ) कुतर्‍याचे विषास याचें मूळ १ तोळा कुटून मधाशीं द्यावें. आणि कोरफडीचें पान व सैंधव दंशावर बांधलें ह्मणजे ३ दिवसात विष उतरतें. ( ४ ) दंतशूळावर याचा रस लावावा. ( ५ ) कर्णनादावर याचे क्षाराचें पाणी व याचा कल्क यांत तिळाचें तेल सिद्ध करावें. तें कानांत घातलें असतां कर्णनाद व बधिरता हे रोग दूर होतात. ( ६ ) डोळे येतात त्याजवर याच्या मुळाचें चूर्ण व थोडें सैंधव तांब्याच्या भांड्यात घालून दह्याच्या निवळीत खलावें व त्याचें अंजन करावें. ( ७ ) डोळ्यांतील फूल झडण्यास याचें मधांत उगाळून अंजन करावें. (८) रातांधळ्यावर संध्याकाळी भोजनानंतर याच्या मुळ्या सुमारें १ तोळा खाण्यास देऊन निद्रा करावयास सांगावें याप्रमाणें ३ दिवस करावें. ( ९ ) पित्तावर याचें बीं ताकांत रात्रीं भिजत घालून सकाळीं वांटून द्यावें म्हणजे पित्त पडेल किंवा शमेल, त्यांवर तूपभात खावा. ( १० ) कफावर झाडें मुळासकट आणून त्याची राख करावी व ती १ पासून २ वालपर्यंत मधात द्यावी. हीच राख पाणी व गूळ घालून दिली असतां जलोदराचा नाश होतो. ( ११ ) चातुर्थिक ज्वरावर कुमारीनें कालेल्या सुतानें रविवारी याची मुळी हातात बांधावी. ( १२ ) रक्तार्शावर याचें बी तांदुळाचे धुवणांत वांटून प्यावें. ( १३ ) मस्तकरोगांवर बियांची दुधांत खीर करून खाण्यास द्यावी. ( १४ ) मोडशीवर मूळ पाण्यांत उगाळून प्यावें. अथवा

बियांचा कल्क करून तो तांदुळाच्या धुवणांत द्यावा. ( १५ ) कांविळीवर मुळी ताकांत उगाळून प्यावी. ( १६ ) पुष्पावरोधावर मूळ गुह्यामध्यें धारण केलें असतां पुष्पावरोध व योनिशूल यांचा नाश होतो. ( १७ ) शिब्यावर याच्या क्षाराच्या पाण्यांत मालकांगोणीचें तेल घालून तेल सिद्ध करावें व तें लावावें ( १८ ) उपदंशावर झाडें उपटून आणून मुळीं कापून टाकून ४ तोळे रस काढावा व त्यांत जिऱ्याची पूड पाऊण तोळा घालून प्यावयास द्यावा. याप्रमाणें सात दिवस घ्यावें. यास उतार बोरीचे अथवा जासवंदीचे पाल्याचा रस द्यावा ह्मणजे आग शमन होईल. ( १९ ) पोटदुखीवर चार पांच पानें चावून खावीं. ( २० ) लवकर प्रसूत होत नसल्यास रविवारीं पुष्य नक्षत्रावर स्नान करून याची मुळी काढून आणावी. व ती आधांत्री टागून ठेवावी व अडलेल्या स्त्रीचे वेणीस बांधली असतां लवकर प्रसूत होते. प्रसूत झाल्याबरोबर तावडतोब ती काढून वाहत्या पाण्यांत सोडून द्यावी. उशीर केल्यास गर्भाशय बाहेर पडण्याचा संभव आहे. ( २१ ) कंठकुब्ज सन्निपातावर याचा रस व पिंपळी याचें नस्य द्यावें.

८ आडूळसा—( १ ) श्वास, कास व कफक्षय यांजवर याचे पानांचा फुलासहित रस काढून मधाशीं द्यावा, ह्मणजे कितीही दिवसांचा श्वास व खोकला असला तरी तो व कफक्षय यांचा नाश होतो.(२) कफपित्तज्वर, रक्तपित्त व कांवीळ, यांजवर याचे पानांचा फुलासहित रस काढून त्यांत साखर व मध घालून द्यावा. ( ३ ) रक्तपित्तावर आडूळशाच्या रसाच्या सात भावना हरीतकीस देऊन तिचें सेवन करावें. अथवा मध व याचा रस समभाग घेऊन तो सेवन करावा. ( ४ ) सुखप्रसूतीस आडूळशाचें मूळ उगाळून नाभी व योनी यांस लेप करावा. व केळीचा कांदा चिरून एक फाक कंबरेस बांधावी. म्हणजे स्त्री लवकर प्रसूत होते. ( ५ ) श्वासावर याचा रस व गाईचें लोणी एकत्र कालवून त्यांतून त्रिफळेचें चूर्ण द्यावें. ( ६ ) खरजेवर कोंवळीं पानें व आंबेहळद, ही गोमूत्रांत बारीक वांटून त्याचा खरजेवर लेप द्यावा. ( ७ ) पित्तजनित प्रदरावर आडूळशाचा रस मध घालून द्यावा. ( ८ ) श्वेतप्रदरावर याचे मुळीचा रस द्यावा. ( ९ ) खोकला क्षय, श्वास व रक्तपित्त यांजवर याचे पानांला वाफ देऊन हातावर चोळून रस काढावा त्यात खडीसाखर घालून मधासारखा दाट होईतोंपर्यंत पाक करावा. नंतर त्यांत बेहेडेदळाचें चूर्ण व थोडें हळदीचें चूर्ण घालून ठेवावें व लेह दिवसांतून पांच चार वेळ चाटीत जावा. ( १० ) कफ फार दाट असला तर गरम चहात याचा रस, खडीसाखर, मध व दोन गुंजा पादेलोण हीं घालून द्यावा. ( ११ ) कासश्वासावर याच्या काढ्यांत साखर व मध घालून द्यावा किंवा याचे रसांत मध व सैंधव घालून द्यावें. ( १२ ) कफज्वरावर आडूळसा, नागरमोथे, धमासा, सुंठ व भारंगमूळ, यांचा काढा द्यावा

९ अळूं—( १ ) फुरशाच्या विषावर याचा पाला व मिरीं वांटून खाण्यास द्यावीं. व भारंगीचा रस पोटांत द्यावा. आणि डोकीस व दंशस्थानीं चोळावा. (२)

खडकावरील कोळी डसल्यास झाडावरील राजाळूच्या मुळ्या भाजून वांटून त्याची बोराएवढी गोळी पोटांत द्यावी. उतार तूप. ( ३ ) काळपुळीस झाडावरील कासाळूचा कांदा पाण्यांत उगाळून पुळीवर लेप करावा. पथ्य अळणी करावें. (४) गठ्ठ्याचावायु ह्मणजे अंग आंखडतें त्यावर काळ्या कासाळूचा कांदा व बेंदरीच्या वेलीचा कांदा हे दोन्ही एकत्र किसून या किसाच्या चार पोटळ्या बांधाव्या. व तापलेल्या तव्यावर त्या पोटळ्या करून सोसवेल तितका आंखडलेल्या अंगास शेक द्यावा. ( ५ ) नळवायु व तिडीक यांस याचे पाल्याचा रस ३ दिवस द्यावा. (६) संधिवायूस काळ्या कासाळूची देंठी मंदाग्नींत भाजून त्याचा रस सहा मासे गाईच्या दह्यांत घालून उन करून द्यावा. दिवस ७. यानें कफ व लाळ गळेल. उतार तूपभात ( ७ ) वायगोळ्यास अळवाची देंठी पाना सुद्धां शिजवून त्याचें माणी तूप घालून द्यावें. ( ८ ) पित्तास याचे पाल्याचा रस जिऱ्याची पूड घालून द्यावी. ( ९ ) स्तनांत दूध जास्त वाढण्यास अळवाची भाजी नित्य खात जावी.

१० आलें—( १ ) अजीर्णादिकांवर आल्याच्या रसांत निंबूरस व सैंधव हीं घालून तें प्राशन करावें; ह्मणजे अजीर्ण दूर होऊन अग्नि प्रदीप्त होतो. व वायु, मलवद्धता, आमवात यांचा नाश होतो. ( २ ) वायूचा झटका येतो त्याजवर सुंठ उगाळून अंजन करावें. ( ३ ) योनिशूळावर सुंठीची पूड एरंडेलात कालवून योनीस लेप करावा. ( ४ ) अजीर्णावर सुंठ व जवखार यांचें चूर्ण तुपांत अगर उन पाण्यांत द्यावें. ( ५ ) आमवातावर एरंडमुळाच्या रसात सुंठीचें चूर्ण कालवून गोळा करून त्यावर एरंडाचीं पानें गुंडाळून वर चिकण मातीनें सारवून पुटपाक कृतीनें फोपाट्यात भाजून नंतर तो गोळा बाहेर काढून पिळून रस काढून त्यांत मध घालून द्यावा. ( ६ ) आमवात व पोटशूळ याजवर सुंठीच्या काढ्यांत एरंडेल घालून द्यावें; ह्मणजे आमवात, कंबर व पाठ या ठिकाणचा शूळ, सर्वांगशूळ व पोटशूळ यांचा नाश होतो. ( ७ ) संग्रहणी व आमवातादिकांवर सुंठ पाण्यांत गंधाप्रमाणें उगाळून त्यांत समभाग तूप घालून शिजवावी. त्याचें सेवन केलें असतां प्लीहा व आमवातही दूर होतात व वायूचें अनुलोमन होतें, व संग्रहणीरोग बरा होतो. ( ८ ) कासश्वासावर आल्याचा रस मध घालून द्यावा. ( ९ ) वृषणवायूवर आल्याचा रस मध घालून द्यावा. ( १० ) अतिसारावर आल्याचा रस नाभीस चोळीत जावा. ( ११ ) उदरावर आल्याचा रस पाण्यांत घालून द्यावा. ( १२ ) अग्निमांद्यावर आल्याचा रस व निंबूरस समभाग घेऊन त्यांत तितकेंच सैंधव मिश्र करून भोजनापूर्वी प्राशन करावें. ह्मणजे अग्निमांद्य दूर होऊन जिव्हा, कंठ व हृदय याची शुद्धि होते. व स्वरभेद, सूज, मलावष्टंभ, श्वास, कफ, खोकला व वायु, यांचा नाश होतो व धातूची वृद्धि होते. ( १३ ) गर्भिणीच्या विषमज्वरावर दोन किंवा तीन मासे सुंठ शेळीच्या दुधांत वांटून द्यावी. ( १४ ) खोकल्यावर आल्याचा रस निंबूरस व मध समभाग घेऊन त्यांत पिंपळीचें चूर्ण घालून दिवसांतून दोन तीन वेळ सेवन करीत जावें. ( १५ ) जीर्णज्वरास ताकाच्या नि-

वळींत सुंठ उगाळून देत जावी. ( १६ ) आम्लपित्तास सुंठ बारीक कुटून त्यांत समभाग खडीसाखर घालावी. व त्याचा अतिशय बारीक खल करून सहा मासेपर्यंत प्रातःकाळीं घेत जावी. व वर थंड पाण्याचा घोट घ्यावा.

११ अफू—( १ ) अतिसार व मोडशी यांजवर अफू व केशर समभाग खलून गुंजप्रमाण गोळी मधात द्यावी; ह्मणजे मोडशी व सर्व प्रकारचे अतिसार दूर होतात. ( २ ) सर्व प्रकारचे अतिसारांवर एक गुंज अफू शेळीचे दुधांत द्यावी. ( ३ ) मोडशीवर ( महामारी ) एक खोबऱ्याचा तुकडा घेऊन त्यास छिद्र करून त्यांत दोन गुंजा अफू घालून तो तुकडा अंमळ निखाऱ्यावर भाजावा व निवाल्यावर त्याचें सेवन करावें; ह्मणजे मनुष्य सहसा दगावणार नाहीं. ( ४ ) पडशावर कागदास थोडी अफू लावून त्याची विडी करून ओढावी. ( ५ ) डोकें दुखत असल्यास दुधात अफू खलून मस्तकावर लेप करावा. ( ६ ) अंगास कंड सुटली असतां खोतें तेल, मेण व अफू हीं एकत्र घोटून अंगास मर्दन करावें ( ७ ) डोळे येतात त्यांवर अफू व दातवण याचा लोखंडी पात्रांत निंबुरसांत खल करून डोळ्यावर लेप करावा व गोवऱ्यांच्या विस्तवानें शेकावें. (८) अतिशय घाम येत असल्यास किंचित् अफू खावयास द्यावी. ( ९ ) अफू ही स्तंभक आहे. स्तंभनार्थ ही जायफळ कोरून त्यांत घालून तें जायफळ उंबराच्या किंवा वडाच्या अथवा बाभळीच्या झाडास भोंक पाडून त्यांत ठेवावें. त्याजवर त्याच लांकडाचा चुरा बसवून नंतर त्याजवर चिखल वगैरे लावून भोंक बंद करावें. आठ पंधरा दिवसांनीं तें जायफळ बाहेर काढून त्या अफूसुद्धां त्याचा खल करून गुंजप्रमाण गोळ्या कराव्या, एक गोळी प्राशन करून वर खडीसाखर युक्त आटीव दूध प्राशन करावें. ( १० ) पक्वातिसारावर खापरांत मंदाग्नीवर अफू भाजून गुंजप्रमाण नुस्ती खावी; म्हणजे पक्वातिसार असला तरी त्यांचा नाश होतो. ( ११ ) लहान मुलास पडसें सर्दी झाली असेल तर अफू दुधांत उगाळून डोक्यावर व नाकावर तिचा लेप करावा.

१२ आंवळी—( १ ) पांढऱ्या धुपणीवर आवळकठींतील बिया पाण्यांत वांटून त्यांत साखर मध घालून ध्यावें. ( २ ) पित्तावर आंवळ्यांचा मुरांबा प्रवाळभस्म घालून द्यावा. (३) खरजेवर आंवळकठी जाळून ती राख तेलांत खलून लावावी. (४) स्वरभेदावर गाईच्या दुधांत आंवळकठीचे चूर्ण द्यावें. (५) अशुद्ध अभ्रकभक्षणापासून होणाऱ्या विकारावर आंवळ्यांचा रस अथवा आंवळे पाण्यांत टाकून ३ दिवस खावे ह्मणजे सर्व विकार शांत होतात. ( ६ ) उचकी व श्वासावर आंवळ्याचा अंगरस मध व पिंपळी घालून द्यावा. ( ८ ) रक्तपितीवर आंवळकठी एरंडेलांत तळून साखरेबरोबर सांज-सकाळ तिची फक्की मारून वर ऊन पाण्याचा घोट ध्यावा. ( ८ ) ओकारीवर आवळकठीचें चूर्ण चंदनाच्या गंधांत कालवून मधांत द्यावें. ( ९ ) प्रमेहावर आंवळ्याचा रस काढून अथवा आवळकठीचा काढा करून त्यांत २ मासे हळदीची पूड व मध घालून द्यावें. ( १० ) जरा न येण्यास आंवळकठी पाण्यांत वांटून अंगास लावून नंतर कांहीं वेळानें स्नान करीत जावें. याप्र-

माणें नित्य क्रम ठेविल्यास वृद्धपण येणार नाहीं. व केश पांढरे होणार नाहींत. ( ११ ) डोळ्यांची आग शांत होण्यास आंवळकठी आणि तीळ रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं वांटून डोळ्यांस लावावें. नंतर तासानें स्नान करावें; ह्म० डोकें हमेश थंड राहून आग होणार नाहीं. ( १२ ) ज्वरांत शोष पडतो त्यावर आंवळकठी आणि द्राक्षें वांटून तुपाशीं मिळवून तोंडांत चोळावें व याचीच गोळी तोंडांत धरावी; ह्मणजे जिव्हा, तालू व गळा यांचा शोष शांत होतो. ( १३ ) ज्वरांत अरोचक झाल्यास आंवळकठी, द्राक्षें व साखर यांचा कल्क करून तो तोंडांत धरावयास द्यावा. ( १४ ) मूत्रकृच्छ्र ह्मणजे उन्हाळीवर आंवळ्याचा व उसाचा रस एकत्र करून द्यावा. ( १५ ) आम्लपित्तावर आंवळकठीचें चूर्ण केळीच्या कांद्याचे रसांत द्यावें. ( १६ ) नाकांतून रक्त पडतें त्यास तुपांत आंवळकठी भाजून वांटावी व तिचा मस्तकास लेप करावा. ( १७ ) योनिदाहावर आंवळ्याचा रस साखर घालून द्यावा. ( १८ ) बहुमूत्रावर आंवळीच्या पाल्याचा रस तोळाभर काढून त्यांत दारुहळद उगाळावी व त्यात एक तोळा खडीसाखर घालून प्यावें. ( १९ ) अंगावर पित्त उठतें त्यास आंवळकठी रात्रीं गोमूत्रांत भिजत घालून ठेवावी व सकाळीं वांटून त्यांत नारळाचा अंगरस मिळवून अंगास चोळावें. ( २० ) शरीराची कांति चांगली होण्यास आंवळकठी अगर भाजलेले आंवळे व गोडे तीळ एकत्र बारीक वांटून दररोज अंगास चोळावे व कांहीं वेळानें ऊन पाण्यानें स्नांन करावें. ( २१ ) वीर्यवृद्धीवर आंवळ्याचा रस व तूप एकत्र करून द्यावें. ( २२ ) जरा दूर होण्यास आंवळकठीचें चूर्ण व तिळाचें चूर्ण समभाग एकत्र करून तूप व मध यांत २० दिवस सकाळीं घ्यावें. ( २३ ) दिव्य देह होण्यास आंवळकठीचें चूर्ण व आस्कंदाचें चूर्ण समभाग तूप व मध यांबरोबर शिशिरऋतूंत द्यावें. ( २४ ) नाकांतून रक्त पडतें त्यास आंवळकठी तुपांत भाजून कांजीत वांटून मस्तकास लेप करावा.

१३ **आंबा**—आमातिसार व मोडशी यांवर आंब्याची कोय दह्यांत वांटून द्यावी. (२) जंतावर आंब्याचे कोईचें चूर्ण द्यावें. (३) गर्भिणीच्या अतिसारावर आंब्याची कोय भाजून खावयास द्यावी. (४) रक्तार्श व प्रदर यांवर आंब्याच्या कोईचें चूर्ण मधांतून द्यावें, ह्मणजे रक्तमूळव्याध व धुपणी त्यांचा नाश होतो. ( ५ ) घामोळ्यावर आंबा भाजून यांचा कल्क अंगास लावावा. ( ६ ) थंडीनें पाय फुटतात त्यास आंब्याचा चीक लावावा. ( ७ ) रांजणवाडीस आंब्याच्या डेखाचा अगर आंब्याचें पान तोडलें असतां जो चीक येतो तो लावावा. ( ८ ) तिडक्या प्रमेहावर आंब्याच्या अंतरसालीचा रस ४ तोळे व चुन्याची निवळी १ तोळा यांचें मिश्रण करून तें तावडतोब प्यावें. याप्रमाणें ७ दिवस प्यावें. ( ९ ) नाकांतून रक्त पडतें त्यावर आंब्याच्या कोईचा रस काढून तो नाकांत पिळावा. ( १० ) दाहपूर्वक ज्वरावर आंब्याचें मूळ शेंडीस अथवा हातास बांधावें. ( ११ ) दाह व अतिसार यांवर आंब्याची अंतरसाल दह्यांत वाटून १ तोळापर्यंत द्यावी. ( १२ ) रक्तातिसारावर आंब्याचे पानांचा अंगरस २ तोळे, मध १ तोळा, तूप ·॥· तोळा व गा-

ईचें दूध १ तोळा घेऊन सेवन करावें. ( १३ ) अतिसारावर आंब्याचे चिकापासून राळ होते, तिचें चूर्ण साखर व तूप यांत द्यावें. ( १४ ) उपदंशावर आंब्याचे सालीचा अंगरस शेळीचे दुधांत मिश्र करून द्यावा ह्मणजे उपदंशवतसंबंधीं व्रण हे दूर होतात. ( १५ ) रक्तातिसारावर आंब्याचे कोईतील गीर ताकांत अथवा तांदुळाचे धुवणांत द्यावा. ( १६ ) रक्ताचे वांतीवर आंब्याचें कोईचा रस काढून त्याचें नस्य द्यावें. ( १७ ) मूळव्याधीवर आंब्याच्या वाळल्या पानांचें चूर्ण चिलमींत घालून ओढावें. ( १८ ) सर्व प्रकारच्या उष्णतेवर आंब्याची अंतरसाल, उंबराच्या मुळावरील साल, व वडाच्या पारंब्यांचा रस काढून त्यांत जिरें व खडीसाखर घालून द्यावें.

१४ **उंदराच्या लेंड्या ( १ ) मुलाची लघवी व परसाकडे बंद झाल्यास**—उंदराच्या लेंड्या पाण्यांत कालवून बेंबीवर लेप द्यावा. ( २ ) **प्रदरावर**—उंदराच्या लेंड्या तांदुळच्या धुवणांत वांटून द्याव्हा. ( ३ ) **प्रमेहावर**—उंदराच्या ३।४ लेंड्या दुधांतून द्याव्या. ( ४ ) **लहान बालकास रेच होण्यास**—उंदराच्या लेंड्या व एरंड्या यांचें चूर्ण निंबाच्या रसांत खलून त्याचा गुदावर व बेंबीवर लेप द्यावा. ( ५ ) **कातकुरटीस**—उंदराच्या लेंड्या पाण्यांत उगाळून लावाव्या. ( ६ ) **उंदराच्या विषावर**—उंदराची लेंडी उगाळून लावावी.

१५ **एरंड**—( १ ) शूळावर एरंडमूळाचा काढा हिंग व पादेलोण घालून द्यावा. ( २ ) कुक्षिशूळावर एरंडमूळाचे काढ्यांत जवखार घालून द्यावा, ह्मणजे कुक्षिशूळ, कफशूळ, उरांतील व पाठींतील शूळ हे बरे होतात. ( ३ ) कामलेवर एरंडाचे पानांचा रस काढून त्यांत पिपळी उगाळून नस्य द्यावें. ( ४ ) डोळे येतात त्याजवर एरंडेल तेलाचा जुलाब द्यावा. ( ५ ) गळवें होतात त्यास एरंडमूळ तेलांत किंवा तुपांत उगाळून लेप द्यावा. ( ६ ) विसर्प व नायटे यांजवर एरंडेल तुपांत द्यावें. ( ७ ) लहान मुलाची टाळू पडते त्यास एरंडाचें पान तूप लावून टाळवेवर बसवावें. ( ८ ) रेच होण्यास चांगलें एरंडेल २ तोळेपर्यंत उष्ण उदकातून अगर सुंठीच्या काढ्यांतून द्यावें. ( ९ ) अंगांतील उष्णतेवर एरंडेल तेल टाळूवर चोळावें म्हणजे मस्तकांतील कडकी निघून डोळ्यांस तेज येतें. ( १० ) हातापायांचा दाह व नायट्यासारखे चट्टे अंगावर उठल्यास एरंडेल थंड पाण्यांत मिश्र करून चोळावें. ( ११ ) मस्तकांतील उष्णता निघण्यास एरंडाचे पानास लोणी अगर साजूक तूप लावून तें मस्तकावर बांधावें. ( १२ ) धोत्र्याचे विषावर लालएरंडाचें मूळ पाण्यांत वाटून प्राशनार्थ द्यावें. ( १३ ) संधिवातावर एरंडेल खूप चोळावें. ( १४ ) डोळ्यातील सारा व फुलें झडण्यास लालएरंडाचा चिक डोळ्यांत घालावा. . ( १५ ) वृषणरोगावर एरंडेल दुधांतून अथवा गोमूत्रांतून द्यावें. ( १६ ) महारोगावर एरंड्या, आडूळसा व गुळवेल याचा काढा करून त्यांत एरंडेल घालून द्यावा. ( १७ ) पोटातील वायूवर एरंडेल सुंठीचे काढ्यांतून द्यावें.

( १८ ) गृध्रसी वायूवर ह्मणजे पाठ, कंबर, मांड्या, गुडघे, पाय, यांचे ठिकाणीं शूळ व पीडा होते त्यांजवर, एरंड्यांतील गोळे वांटून दुधांत कालवून आटवून खवा करून द्यावा अथवा एरंडेल नुसतेंच किंवा गोमूत्रांतून द्यावें. ( १९ ) मुलाचे सणसणीवर विड्याच्या पिकल्या पानांस एरंडेल लावून शेकून तीं कोंबट कोंबट अशीं पोटावर ठेवावीं व तशा पानानें पोट शेकावें. ( २० ) जंतावर व मुलाचे कृमीवर एरंडेल ऊन पाण्यांत द्यावें. ( २१ ) मस्तकरोगास दुधांत अथवा तुपांत एरंडेल द्यावें. ( २२ ) श्वासावर २॥ तोळे एरंडेल ५ तोळे मधांत मिश्र करून ठेवावें. त्यांतून सांज-सकाळ एक तोळापर्यंत प्राशन करीत जावें. ( २३ ) सर्पदंशावर एरंडाच्या पानांचा रस २ तोळे एक तोळा पाणी घालून द्यावा व दंशावर पाला वांटून बांधावा ह्मणजे वांति होऊन विष उतरेल. (२४) झोंप येत नसल्यास एरंडाचा मोहोर बारीक वांटून थोडें दूध आंत घालून कपाळास व कानसुळास थोडा वेळ चोळावें ह्मणजे झोंप येते. ( २५ ) गंडमाळेवर एरंडमूळ व पळसाचें मूळ, हीं दोन्ही समभाग तांदुळाचे धुवणांत उगाळून लेप द्यावा. ( २६ ) सुखप्रसूतीस एरंडमूळ तुपांत उगाळून प्राशन करावें व त्याचा योनीसही लेप द्यावा.

१६ कडू इंद्रावण—( १ ) सर्पदंशावर इंद्रावणीचें मूळ विड्यांत द्यावें. ( २ ) खोकल्यावर कडूइंद्रावणीचे फळांत मिरीं भरून तें फळ सावलींत सुकवावें. व त्यांतील नित्य सात मिरी मधपिपळींशीं सेवन करीत जावी. ( ३ ) दांतांचे कृमीवर इंद्रावणीचें पिकलेलें फळ तापलेल्या तव्यावर टाकून त्याचा धूर दांतांस द्यावा, ह्मणजे तावडतोब दांतांतील किडे बाहेर येऊन पडतात. (४) मुलाचे डब्यावर इंद्रावणीचें फळ ह्मशीच्या मुतांत उगाळून थोडें पाजावें अथवा ह्मशीच्या मूत्रांत शिजवून त्या मूत्रासुद्धां खलून त्यांतील औषध एक वाल व पापडखार १ गुंज अशीं मधांत सात दिवसपर्यंत द्यावीं. (५) ऋतुप्राप्तीस कडू इंद्रावणीचें मूळ योनींत ठेवावें. (६) स्तनरोगावर इंद्रावणीचें मूळ पाण्यांत उगाळून त्याचा लेप करावा. (७) शूलावर इंद्रावणीचें मूळ त्यांत त्रिकटूचें चूर्ण ३ मासे घालून द्यावें. ( ८ ) संधिवातावर इंद्रावणीचें मूळ पिपळी व गूळ हीं एकत्र करून द्यावीं. ( ९ ) अंडवृद्धीवर इंद्रावणीचें मूळ, एरंडेलांत गाळून गाईचे दुधाशीं मिश्र करून ठेवावें व सेवन करीत जावें. ( १० ) योनिशूळावर इंद्रावणीचें मूळ तुपांत उगाळून योनीस लेप करावा. ( ११ ) मुलाचें पोट मोठें होतें त्यास इंद्रावणीचें मूळ पाण्यांत उगाळून पोटावर लेप द्यावा आणि समुद्रफळ गाईच्या दुधांत उगाळून बलाबल पाहून पाजावें ह्मणजे वांति होऊन पोटांतील सर्व विकार निघून जातात. ( १२ ) गंडमाळेवर इंद्रावणाच्या मुळाची साल व कडू शेवग्याची साल समभाग एकत्र करून ती भुकटी चिलमींत घालून ओढावी. ( १३ ) ढास व उह्मासा यांजवर इंद्रावणीचें फळ कोरून त्यांत अर्ध तोळा वाव्हहिरड्याचें चूर्ण दहा दिवस भरून ठेवावें, आकरावे दिवशीं एक वाल चूर्ण मधांत देत जावें.

१७ कडूनिंब ( बाळंतनिंब )—( १ ) कडूनिंबाचा पाला जखमेवर मोठा

वस्ताद आहे. (२) नाडीव्रणादि भयंकर व्रण दररोज निंबाचा पाला चांगला पाण्यांत उकळून त्या पाण्यानें धुवून टाकावें. ह्मणजे त्यांचें शोधन होऊन तें आंतून भरून येतात. (३) जे व्रण फुटून वाहतात ते बरे होण्यास कडू निंबाचा पाला वांटून मधांत कालवून लावीत जावा ह्मणजे ते बरे होतात. (४) खरजेवर कडुनिंबाचा पाला जाळून खाते तेलांत किंवा करंजेल तेलांत खलून लावीत जावा. (५) सर्पाच्या विषास विष उतरेपर्यंत कडुनिंबाचा पाला खावयास द्यावा. किंवा पाल्याचा अथवा सालीचा रस काढून द्यावा ह्मणजे विष उतरेल. जोंपर्यंत अंगांत विष आहे तोंपर्यंत त्यास कडू लागणार नाहीं. कडू लागूं लागलें ह्मणजे विष उतरलें असें जाणावें. (६) पित्त पडण्यास कडू निंबाच्या पाल्याचा रस पाणी घालून काढावा. व तो शक्ति पाहून पिण्यास द्यावा ह्मणजे उलटी होऊन पित्त पडतें. (७) कडू निंबाच्या पाल्याचा रस खडीसाखर घालून सांज सकाळ अथवा ७ दिवस सेवन केला असतां कसलीही उष्णता कोठ्यांत असली तरी ती अगदीं निर्दोष होईल. (८) महारोगावर हा पाला मोठें उत्तम औषध आहे. आंघोळीच्या पाण्यांत हा पाला कढवून त्यानें नित्य स्नान करीत जावें. आणि हा पाला वांटून त्याचा अंगरस किंवा हा पाला गाईच्या दुधांत वांटून तो रस नित्य सेवन करावा. याप्रमाणें २।३ महिने केले असतां महारोग व कुष्ठ हीं निश्चयेंकरून नाश पावतात. पथ्य—अळणी पदार्थ खावें. (९) दाहयुक्त सुजेवर पानें वांटून लावावीं. ह्म० दाह कमी होतो व रक्तदोष नाहींसा होतो. (१०) पित्तज्वरांत जो अतिशय दाह होतो त्यावर निंबाच्या पाल्याचा रस फेनयुक्त करून अंगास चोळावा; ह्मणजे दाह कमी होतो. (११) उष्णज्वरावर कडू निंबाच्या काडच्या, कुटकी व किराईत या तिन्हींचा काढा मध घालून द्यावा. (१२) कांवीळ रोगावर कडू निंबाच्या अंतरसालीचा रस काढून त्यांत मध व थोडें सुंठीचें चूर्ण घालून द्यावें. (१३) खरजेवर जुनाट निंबाचा वाळलेला लांकडाचा तुकडा आणून तो पाण्यात उगाळून लावावा. (१४) विषमज्वरावर ह्मणजे हिंवतापावर कडू निंबाच्या सालीच्या काढ्यामध्यें धणे व सुंठ यांचें चूर्ण घालून द्यावें म्हणजे तावडतोब गुण येतो. हें औषध कोयनेलापेक्षांही उत्तम असून गुणानेंही त्यापेक्षां श्रेष्ठ आहे. (१५) कडू निंबाची कोंवळीं फळें भक्षावीं ह्मणजे प्रमेह, मूळव्याध व कृमि यांचा नाश होतो. (१६) कडू निंबाच्या बिया गोमूत्रांत वांटून अंगास मर्दन केल्या असतां खरूज जाते व डोकीस मर्दन केल्या असतां उवा जातात. (१७) मूळव्याधीवर कडु निंबाच्या बिया तेलांत तळून त्यांतच खलाव्या व थोडी मोरचुताची लाही घालून हें मलम मोडास लाविलें असतां मोड गळून पडतात. (१८) मूळव्याधीवर कडू निंबाचीं पानें बारीक वांटून मुगाच्या वांटलेल्या डाळींत मिश्र करून त्याचे घारगे गाईच्या तुपांत तळून गाईच्याच तुपाशीं एकवीस दिवस सेवन केलें ह्मणजे गुदांतील सर्व मोड गळून पडतात. (१९) बाळंतीण फार आडली तर कडू निंबाचें मूळ तिचे केंसांस बांधावें म्ह० लवकर प्रसूत होते. नंतर लागलींच सोडून टाकावें.

१८ **कांतणीचें घर—( १ ) नारूवर**—कांतणीचें घर बारीक करून, शक्त्यनुरूप विड्यांतून अ० गुळांतून खावयास द्यावें. संध्याकाळपर्यंत कांहीं खाऊं नये. संध्याकाळीं जेवावें. **पथ्य**—अळणी ३ दिवस करावें. ( २ ) **आगंतुक जखमेवर**—कांतणीचें घर लावावें. ( ३ ) **गुरांस कांहीं लागून जखम पडून किडे पडतात त्यास**—कांतणीचें घर भाकरीत द्यावें ह्मणजे पांच चार दिवसांत सर्व किडे नाहींसे होऊन जखम भरून येते. ( ४ ) **वाळंतरोगावर**—कांतणीचें घर बारीक करून त्याची गुळांत कुटून गोळी करून सात दिवस द्यावी. पथ्य करावें. [ ५ ] **चातुर्थिकज्वरावर**—कांतणीचें घर गुळांत कालवून द्यावें. ( ६ ) **कंठसर्पावर**—कातणीचें घर व अगरुचंदन, हीं समभाग बारीक करून चिलमींत घालून ओढावीं.

१९ **केळें**—[ १ ] विपास केळीच्या काल्याचा रस पाजावा. [ २ ] पिसाळलेल्या कुत्र्याच्या विषावर पिकलेल्या रानकेळीचें बीज खावयास द्यावें व दंशावरही वांटून लावावें. [ ३ ] श्वासावर केळाच्या आंतील केशरयुक्त भाग पोखरून त्यांत मिऱ्याचें चूर्ण भरून रात्रीस ठेवावें. प्रातःकाळीं तें केळ मंदाग्नीवर भाजून खावें ह्मणजे श्वास लवकर दूर होतो. [ ४ ] सुखप्रसूतीस केळीचा कांदा चिरून ती फांक कंबरेस बांधावी आणि प्रसूत झाल्याबरोबर सोडून टाकावी. [ ५ ] उचकीवर रानकेळीच्या पानाची राख एक मासा एक तोळा मधांत द्यावी. [ ६ ] सुजेवर गव्हाची कणीक व पिकलेलें केळें पाण्यांत कालवून ऊन करून सुजेवर लेप द्यावा. [ ७ ] सोमलाचे विषावर केळीचे सोपाचा रस पावशेरपर्यंत पिण्यास द्यावा. [ ८ ] जिभेस खरे पडतात त्यांस पिकलेलें केळें गाईच्या दह्याबरोबर सूर्योदयापूर्वीं खावें. [ ९ ] कामलेवर पिकलेलें केळें मधांत कालवून खावें. [ १० ] भस्मकरोगावर केळाची शिखरण तुपांत करून खावी अथवा केळीच्या काल्याचें पाणी काढून प्यावें. [ ११ ] प्रदर व सोमरोग यांवर पिकलेलें केळें आवळयाच्या मुरांब्याच्या रसांत कालवून द्यावें. [ १२ ] मूत्रकृच्छ्रास गाईच्या शेणाचा रस व केळीचे कांद्याचा रस एकत्र करून द्यावा. [ १३ ] दाहशमनार्थ केळीच्या व कमळाच्या पानांवर निजावें. [ १४ ] मुलास दंतोद्भव रोग होतो त्याजवर केळफुलांतून जी बारीक बाळकेळें गळून पडतात तीं बारीक वांटून त्याचा रस काढावा. त्यांत थोडी जिऱ्याची पूड व खडीसाखर घालून मुलाच्या शक्तीप्रमाणें नित्य एक वेळ४ माशांपासून ६ माशांपर्यंत क्रमानें सतत सात दिवस द्यावें व हेंच औषध दहावीस वेळ हिरड्यांस लावीत जावें; म्हणजे ज्वर वगैरे उपद्रव त्वरित शमतात. [ १५ ] देवी हलक्या येण्यास रानकेळीच्या बिया ह्मशीच्या दुधांत वांटून कपडछान करून तें दूध पाजीत जावें. [१६]मूत्राघात ह्मणजे मूत्र बंद होतें, त्याजवर केळीच्या सोपाचें पाणी बलाबल पाहून ३ किंवा ५ तोळे घेऊन त्यांत पातळ केलेलें तूप एक किंवा २ तोळे मिश्र करून पाजावें. याचा असा चमत्कार आहे कीं, केळीच्या पाण्याशीं तुपाचा संयोग होऊन पोटात गेलेलें तूप मूत्रद्वारें फार त्वरित निघून जातें. व त्या योगानें द्वार मोकळें होतें आणि लघवी सुटते. पुरुषाहून स्त्रियांस तर फारच लवकर लागू पड-

तें. [ १७ ] प्रदर व धातुविकारावर पिकलेलें एक केळें अर्धा तोळा तुपाबरोबर दररोज सकाळीं व सायंकाळीं खात जावें. याप्रमाणें सतत आठ दिवस सेवन केलें असतां वरील विकार शमन होतात. या औषधानें कोणास थंडी झाली असें वाटल्यास यांतच मधाचे ४ थेंब घालून हें औषध घेत जावें. [ १८ ] गुरास सोमल घातल्यास केळीचा रस एकशेर काढून त्यांत तुरटी दहा तोळे, पांढरा कात १ तोळा घालून ३ दिवस पाजावें. [ १९ ] पित्तरोगावर पिकलेलें केळें व तूप भक्षण करावें. [ २० ] गुरांच्या मूत्रावरोधावर केळीच्या सोपाचें पाणी एकशेरपर्यंत काढून त्यांत सोनकाव एक तोळा उगाळावी व थोडें सोरामीठ आणि मिरपूड पांच गुंजांपर्यंत घालून पाजावें. [ २१ ] केळी खाऊन अजीर्ण झाल्यास वेलदोडे खावे. [ २२ ] केळीं लवकर पिकण्यास लोंगराचा दांडा ४।६ बोटें ठेवून बाकीचा कापून टाकावा. नंतर त्यास खिळ्यानें ठेंचून भोंक पाडून त्यांत वेलदोड्याची पूड भरावी. म्हणजे केळी लवकर पिकतात. लोंगरांत कापूस घातला असतांही केळी लवकर पिकतात. पुष्कळ केळ्यांत जर थोडीशी वेलदोड्याची पूड टाकली तर तीं केळीं नासून जातात, असा वेलदोड्याचा गुण आहे.

**कस्तूरी**—हरिणाच्या नाभीपासून कस्तूरी उत्पन्न होते. नेपाळ देशांत कस्तूरीमृग होतात. कस्तूरी अत्यंत सुगंधी असून फार महाग असते. ती फार नसल्यामुळें, तींत भेळही पुष्कळ होते. दुसरी जवादी मांजरापासूनही कस्तूरी मिळते; ती हलकी आहे. कस्तूरी रंगानें काळसर व तांबूस अशी असते. कस्तूरी फार उष्ण आहे. अस्सल कस्तूरी हुंगल्याबरोबर नाकांतून रक्त निघतें. कस्तूरी उघडी राहिल्यास तिचा सर्व सुगंध हवेंत निघून जातो. याजकरितां तीस फार बंदोबस्तानें ठेवावी लागते. **कस्तूरी**—चक्षुष्य, तिखट, कडू, सुगंधि, उष्ण, शुक्रपद, गुरु, वृष्य, क्षार, रसायन अशी आहे, व किलासकुष्ठ, मुखरोग, कफ, दुर्गंध, अलक्ष्मी, मल, वायु, तृषा, वांति, शोष व विष यांचा अनुपानपरत्वें नाश करिते. ही कामरुप देशांत उत्पन्न झालेली कृष्णवर्ण, ती उत्तम, नेपाळांत होणारी ताम्रवर्ण ती मध्यम, व काश्मिरांत होणारी कपिशवर्ण [ काळा–तांबडा वर्ण ] ती कनिष्ठ जाणावी. **लताकस्तूरी**—स्वादु, वृष्य, शीतळ, लघु, नेत्रांला हितकारक, कडु, छेदक, तीक्ष्ण, बस्तिशुद्धी करणारी आहे. आणि बस्तिरोग, कफ, तृषा, मुखरोग, लालास्राव, वांति, वायु, दुर्गंध, मद व अलक्ष्मी यांचा नाश करिते. ही दक्षिणदेशांत होते. **जवादीकस्तूरी**—चक्षुष्य, उष्ण, सुखावह, सुगंधि, स्निग्ध, वायूवर प्रशस्त, वांतिकर, शुक्रवृद्धिकारक अशी आहे व कंडू, किटिभकुष्ट, घाम, दुर्गंध, विष, कंठरोग, व कुष्ठ याचा नाश करिते. ( १ ) **कान फुटतो त्यास**—थोडी कस्तूरी कापसांत गुंडाळून कानात ठेवावी. ( २ ) **नारूवर**—१ गुंजपासून २ गुंजा कस्तूरी तुपांत घालून प्राशन करावी; म्हणजे मोठा वाढलेला जरी नारू असला तरी तो बरा होतो. ( ३ ) **सन्निपातज्वरांत तंद्रा [ मूर्च्छा ] येते त्यावर**—कस्तूरी व मिरें हीं घोड्याच्या लाळेंत उगाळून मध घालून द्यावीं. ( ४ ) **ज्वरांत शोष पडतो**

**त्यावर**—पाण्यांत कस्तूरी घालून द्यावी. ( ५ ) **शीतांगसन्निपातावर**—कस्तूरी द्यावी. ( ६ ) **कस्तूर्यादिगुटीका**—कस्तूरी व शुद्ध कापूर एकेक तोळा, लवंगा २ तोळा, मिरी, पिंपळी, वेहडा व कोळिंजन, ही अर्धा तोळा आणि दाळिंबाची साल ४ तोळे, हीं सर्व काताच्या पाण्यांत खलून, गोळ्या मुगाएवढाल्या बांधाव्या. ही गोळी तोंडांत धरल्यापासून कफ दूर होतो. इच्या सेवनानें श्वासाचें निवारण होतें. ( ७ ) **पुरुषत्व कमी झाल्यास**—कस्तूरीचें सेवन विड्यांत करावें. ( ८ ) **वीर्यवृद्धि व पुष्टतेस**—तीन भार सुवर्णभस्म व एक भार कस्तूरी, हीं एकत्र करून, त्याचें १ पासून २ गुंजा चूर्ण, मध, साखर, व तूप, यांशीं सेवन करावें. यापासून शरीरांत प्रफुल्लितपणा येऊन, कंवरदुखी वगैरे आजारही दूर होतात. पुष्कळ श्रीमान लोक याचें नित्य सेवन करतात. ( ९ ) बहुत दिवसांचा **निद्रानाश दूर होण्यास**—स्त्रीच्या अथवा गाईच्या दुधांत कस्तूरी वांटून अंजन करावें.

२१ **गुळवेलीचें सत्व**—हें चार गुंजांपासून आठगुंजांपर्यंत अनुपान योजून देत जावें. [ १ ] वायूस तूपांत. [ २ ] पित्तास साखरेंत. [ ३ ] कफास मधांत. [ ४ ] वातरक्तास एरंडेलांत. [ ५ ] आमवायु, उदर व गुल्म यांस सुंठीचे काढ्यांत. [ ६ ] बद्धकोष्ठास गुळात. [ ७ ] सर्व मर्मस्थानचे रोगांस ताकांत. [ ८ ] नेत्ररोगास म्हशीचे तुपांत. [ ९ ] सर्व व्याधींस थंड पाण्यांत. [ १० ] काळे केंश होण्यास माक्याचे रसांत. [ ११ ] ज्वर, वातरक्त, पांडुरोग, जीर्णज्वर, ओकारी, अरुचि, मूळव्याध, कांवीळ, पित्त, प्रमेह, कास, श्वास, उचकी, क्षय, दाह, मूत्रकृच्छ्र, रक्तप्रदर व श्वेतप्रदर या रोगांवर रोगोक्त अनुपान योजून द्यावें. [ १२ ] वलीपलित रोगावर गुळवेलीचें चूर्ण नित्य सकाळीं सहा मासे व रात्रीं सहा मासे अनुपान योजून घेत जावें. [ अनुपानप्रकरण पहा. ]

२२ **गंधक**—गंधक शुद्ध करून त्याचें चूर्ण करून ठेवावें तें एक माशापासून दहा मासेपर्यंत अनुपान योजून देत जावें. [ १ ] मस्तकाचे व्रणास व मस्तकशूळास यवाचे कांजीत वांटून लेप करावा. [ २ ] नेत्ररोगास त्रिफळ्यांत. [ ३ ] व्रणरोगास तुपांत. [ ४ ] डोळ्यांत फूल पडल्यास गंधक मधांत अथवा तुपांत खलून अंजन करावें. [ ५ ] कासास गाईचें तूप व मिरी किंवा गाईचें तूप व पिंपळी यांत. [ ६ ] श्वासास रिंगणीचें फळ व तूप यांत. [ ७ ] स्वरभंगास मध पिंपळींत. [ ८ ] पार्श्वशूळ व बरगड्याचा शूल यास नागवेलीचे रसांत. [ ९ ] विषूचिकेस निंबूचे रसांत. [ १० ] प्रमेहास गुळांत. [ ११ ] अजीर्णास आंवळकठीचे चूर्णांत. [ १२ ] खरजेस तिळाचे तेलांत. [ १३ ] संग्रहणीस सुंठीचें चूर्ण व तूप यांत. [ १४ ] कुष्ठरोगास कडूनिंबाचें पंचांगात. [ १५ ] वातरोगास तुळशीचा रस व तूप यांत. [ १६ ] पित्तास गाईचे तुपांत. [ १७ ] कफास सुंठ व गूळ यांत. [ १८ ] अश्वमूत्र, बकरीचें मूत, गाईचें दूध तूप व सुंठ यांबरोबर ४ माशांपासून एक तोळ्यापर्यंत एक वर्ष सेवन केलें असतां जरा व व्याधि यांपासून मुक्त

होऊन शंभर वर्षें वांचेल. [ १९ ] जरा दूर होण्यास त्रिफळा व माका यांचें समभाग चूर्ण करून यांत एक वर्षपर्यंत घ्यावें. [ २० ] कुष्ठ व विषविकार यांस निगुडीचे रसांत पारा व गंधक याची कज्जली खलून लेप करावा. [ २१ ] गंधक २० तोळे, माक्याचा रस २० तोळे, यांचा एकत्र खल करून सुकवावें व त्या सर्वांच्या निम्मे हिरड्यांचें चूर्ण आंत मिळवावें.नंतर तें चूर्ण मध व तूप यांत दोन महिनेपर्यंत सेवन केलें असतां वृद्धपणा दूर होऊन शक्तिवंत व वीर्यवंत होईल. [ २२ ] कुष्ठास तिळाचे तेलांत प्राशन करावा. व अंग थंड पाण्यानें शिपडावें. [ २३ ] गधकानें विकार झाल्यास गाईचे दुधांत तूप घालून प्यावें; म्हणजे गंधकविकार दूर होतो.[२४]त्वग्दोषास केळांत.[२५]वलवृद्धीस त्रिफळ्याचे काढ्यांत.[२६]क्षयकासास आडूळशाचे रसात[२७]मंदाग्नीस त्रिफळ्याचे काढ्यांत. [२८] ऊर्ध्ववायूस त्रिफळ्याचे काढ्यांत[२९]नाकांत कोंब येतात त्यास गंधकाचा अर्क लावावा. [३०] डोळ्यांतील फुलास केळीचे कांद्याचे रसांत अंजन करावें. [ ३१ ] ज्वरास वावंचीचे काढ्यांत. [ ३२ ] श्वास कासास आल्याचा रस व मध यांत. [ ३३ ] ऋतुप्राप्तीस कोरफडाचें मूळ व तूप यांत. [ ३४ ] महा रोगास एक महिना गुळवेलीचा काढा अथवा एरंडेल द्यावें [३५] गलत्कुष्ठास गंधकाचें तेल लावावें. [ ३६ ] त्रिविध विषास पुनर्नव्यावरोवर. [ ३७ ] पिपळी किंवा हरीतकीचें चूर्ण यात सेवन केलें असतां धातुपुष्टि व वृद्धि होते, आणि नेत्र व शरीराची कांति हीं चांगलीं होतात. [ ३८ ] एरंडेल, त्रिफळा, गुग्गुळ, गंधक आणि पारा हीं सर्व समभाग घेऊन खल करावा. आणि एक महिना वलाबल पाहून द्यावा ह्मणजे मूळव्याध, भगंदर, कफजनित संपूर्ण व्याधी यांचा नाश होतो. [ ३९ ] सहा महिने घेतला असतां मनुष्य देवासारखा होईल. आणि पिकलेले केंश, अंगाच्या सुरकुत्या लोंबतात त्या, दांत हालणें, दृष्टिमांद्य, वल व शुक्र यांचा क्षय या सर्वांस जिंकून तयार होतो केश भ्रमरासारखे काळे व दिव्य दृष्टि होते. कर्णानें डुकरासारखा तीक्ष्ण होतो. नेत्रानें गरुडासारखा, बळानें बळिरामासारखा, दांत घट्ट होऊन वज्रदेही, व दुसरा शंकरच की काय असा दिसतो. व त्याच्या मळमूत्रानें निश्चयेंकरून तांब्याचें सुवर्ण होईल. [ ४० ] शुद्ध गंधकाचा सोळावा भाग त्रिकटूचें चूर्ण घेऊन एकत्र मर्दन करून एक हात लांब रुंद पांढरें स्वच्छ फडकें घेऊन त्यावर तें चूर्ण सारखें पसरून त्याची गुंडाळून वात करावी. तिला सूत गुंडाळून एकप्रहर तिळाचे तेलांत भिजत ठेवावी. नंतर चिमट्यांत धरून पेटवून खाली कांचेच्या पात्रामध्यें त्या पेटल्या काकड्याचे बिंदू पडतील ते कुपींत भरून ठेवावे. नंतर त्यातील तीन बिंदू व शुद्ध पारा एक वाल एकत्र मर्दन करून गोळी करावी. ती भक्षण केली असतां मोठा दुर्धर खोकला, श्वास, शूल व संग्रहणी व आमवायु यांचा नाश होऊन देहाला हलकेपणा येतो. [ ४१ ] सर्व रोगांस रुईचा व निवडुंगाचा चीक यांत वस्त्र भिजवावें. नंतर गंधकाचें चूर्ण लोण्यांत खलून त्या वस्त्राला लेप करून काकडे करावे. मग एक काकडा दिव्यावर पेटवून कांचेच्या पात्रांवर उलटा धरावा. पात्रांत जें

तूप पडेल तें अनुपान योजून द्यावें, हें योगवाही होतें. म्हणून ज्या ज्या अनुपानांत द्यावें त्या त्या रोगांचा नाश होईल. [ ४२ ] अशुद्ध गंधक सेवन केला असतां कुष्ठें, ताप, भ्रम व पित्तव्याधी हे विकार दूर होतात आणि अंगकांति, सुख बल व वीर्य यांचा नाश होतो. [ ४३ ] गंधक सेवन करणारानें खारट, आंबट, सर्व प्रकारच्या भाज्या, सर्व प्रकारच्या दाळी, स्त्रीसंग, घोडा, इत्यादिकांवर बसणें व पायानें फार चालणें हें वर्ज्य करावें.

२३ गांडूळ [सं. भूनाग.]—गांडुळास ' वाळा ' ' केचवे ' असेंही ह्मणतात. पावसाळ्यांत यांची उत्पत्ति होते. यांचा रंग तांब्याप्रमाणें लाल असून, हे वीतभर लांब असतात. यांच्या अंगांत तांबें असल्यामुळें यांचा रंग लाल असतो. भूनाग ह्मणजे गांडूळ हा नाना विज्ञानकारक आहे. पाऱ्याच्या जारणाविषयीं याचें सत्व सांगितलें आहे, याचें सत्व जरा, व्याधि दूर करणारें आहे. हें स्वर्णादि-खनिज भेदानें चार प्रकारचे आहेत. त्यामध्यें स्वर्णाच्या खाणींतले दुर्लभ आहेत. **भूनागसत्व**—गांडूळ, हळद, गूळ, गुग्गुळ, लाख, लोंकर, मच्छ, पेंड व टांकणखार, हे एकत्र करून खल करावा, व मुशीत घालून अग्नीवर फुंकावें, ह्मणजे तांब्यासारखें सत्व निघतें. हें शीत आहे व संपूर्ण कुष्ठ, व्रण, स्थावर व जंगमविषाचा नाश करितें. याचा पाऱ्याशीं योग केला असतां, पारा अग्नींत स्थिर होतो; अडलेल्या बाळंतिणीची सुटका लवकर होते. तसेंच पाण्यांत आंगठी धुवून, पुढें लिहिलेल्या मंत्रानें तें पाणी मंत्रून दिलें असतां, मोठा, शूळ, त्रिदोषाची पीडा, भूतबाधा, ग्रहबाधा, यांचा नाश होतो. आणि सद्यःस्त्रीला प्रसूत करितें. व्रणाला भरून काढितें, व नेत्ररोग्यानें नेत्रामध्यें घातलें असतां हित होतें असें भालुकीनें सांगितलें आहे. मंत्रः " रामवत्सोमसेनावीमुद्रितेतितथाक्षरं । हिमालयोत्तरेपार्श्वेस्वकर्णश्चमरुद्रुम । तत्रशूलंसमुत्पन्नंतत्रैवविलयंगतः ॥ " ही आंगठी तेलांत टाकून तेल कढवून, तें तेल, जेथें शूल किंवा पीडा होत असेल तेथें लावावें; ह्मणजे तत्काळ पीडा दूर होते. [ १ ] **नारूवर**—गांडूळ सुकवून ठेवून प्रत्येक दिवशीं सुमारें एक वालभर गुळांत गोळी करून द्यावी. याप्रमाणें तीन दिवसपर्यंत घेऊन पथ्य आळणी करावें, ह्मणजे शरीरांतील सर्व नारू जळून जातात. [ २ ] **सर्पाचे विषावर**—गांडूळ व काळीं मिरीं हीं पाण्यांत वांटून द्यावीं; ह्मणजे तात्काळ विष दूर होतें. [ ३ ] **पुरुषत्व येण्यास**—दोन शेर गांडूळ आणून ताकांत धुवून, मग तें वाळवून नलिकायंत्रानें अर्क काढावा. हा पानाचे विड्याशीं बिंदुमात्र लावून ३ दिवस खावा.

**२४ गाढवाची लीद. [ १ ] पांढरा उंदीर अंगावर पडूनगांठी उत्पन्न होतात त्यावर**—गांठी शस्त्रानें फोडून त्यांवर गाढवाची लीद बांधावी. दिवस ८. [ २ ] **इसबावर**—गाढवाच्या लिदीचा पाताळयंत्रानें अर्क काढून, तो इसबावर लावावा. [ ३ ] **कांच, माती व गेरु**—इत्यादिकांच्या विषावर—गाढवाचे लिदीचें

पाणी प्यावें. [ ४ ] मधुऱ्यावर—गाढवाची लिद पाण्यांत कोंळून तें पाणी पिण्यास द्यावें.

२५ गोरोचन—गाईच्या अथवा बैलाच्या पित्ताशयांत एका जातीचा खडा उत्पन्न होतो, त्यास ' गोरोचन ' असें ह्मणतात. हा खडा जायफळाएवढा असतो. याचे थरावर थर झालेले असतात. गोरोचन—अतिशय रुचिकर, मंगळदायक, वशकर, कांतिकारक, वृष्य, कडू व पिशाच्च बाधा, ग्रहपीडा, विषदोष, कुष्ठ, कृमि, अलक्ष्मी, उन्माद, गर्भस्राव, क्षत, रक्तविकार, व नेत्ररोग यांचा नाश करितें. [१] उडती, ससणी [ सुशी ] वगैरे बालकांचे अनेक रोगांवर—गोरोचन व हळद ही विड्याचे पानाचे रसांत द्यावीत. [२] मधुऱ्यावर—मधुरा झालेल्या मनुष्यांस दुसरे दिवशीं फक्त एकवेळ दोन तोळे, ह्मशीच्या दुधांत उडदाइतकें गोरोचन कालवून द्यावें. या योगानें मधुरा पोटी न पडतां बाहेर पडतो. [ ३ ] मुलांस देवी हलक्या येण्यास—गोरोचन, गाईच्या दुधांत उगाळून पोटांत द्यावें; ह्मणजे देवी अंगावर तत्काळ उठतात. [ ४ ] खरजेवर—गोरोचन व चंदन उगाळून लेप करावा.

२६ घोड्याची लीद [ १ ] शूळावर—घोड्याची लीद पाण्यांत कालवून, तें पाणी गाळून घेऊन त्यांत थोडें भाजलेल्या हिंगाचें चूर्ण टाकून तें प्यावें; ह्मणजे कठिणही शूळ त्वरित शमेल. दुसरा प्रकार—घोड्याच्या लिदीचा अर्क काढून तो द्यावा. [ २ ] उचकीवर—घोड्याच्या लिदीची धुरी द्यावी; ह्मणजे कठिणही उचकीचा नाश होईल. [ ३ ] मोडशीवर—घोड्याची लीद ताकाचे निवळींत कोंळून वस्त्रगाळ करून ओंवा ६ मासेपर्यंत बारीक वांटून, पुनः वस्त्रगाळ करून त्यास छमका मारून ( ठिकरी देऊन ) पाजावें.

२७ घोडाचोळी—[१] वातशूळ, खोकला, श्वास व क्षय यांस आल्याचा रस पिंपळी व मध यांत अथवा मुळाचे पाल्याच्या रसांत. [ २ ] ज्वर व पोटशूळ यांस शेवग्याच्या मुळाचा रस व गाईचें तूप यांत. [ ३ ] अजीर्णास दह्याचे निवळींत किंवा निर्गुडीच्या रसांत. [ ४ ] पांडुरोगास पुनर्नव्यांत. [ ५ ] पित्तज्वरास जिरें व साखर यात. [ ६ ] विषास तांदुळाचे धुवणात. [७] अस्थिगत वायूस वेखंडांत [ ८ ] पुरुषत्व येण्यास गोमूत्रांत. [ ९ ] विरेचनास आल्याच्या रसांत. [ १० ] कंबरेच्या वायूस वेखंड आणि ओंवा यांत [ ११ ] श्वास व खोकला यांस आडूळशाचा रस व मध यांत. [ १२ ] जीर्णज्वरास माक्याच्या रसांत. [ १३ ] पित्तास, पित्तज्वरास व आंवळकठींत. [१४] महाव्याधीस पिंपळमूळांत. (१५) कर्णरोग, मस्तकशूळ, अर्धशिशी व मूळव्याध यांस जायफळांत. [१६] प्रसूतिवायूस तुळशीचा रस व मध यांत. [ १७ ] अतिसारास दह्यांत. [ १८ ] वांति होण्यास एरंडबीजाबरोबर. [ १९ ] मंदाग्नीस टांकणखारांत. [ २० ] ऊर्ध्वश्वासास त्रिफळा यांत. [ २१ ] काळे केश होण्यास दुधीच्या रसांत अथवा मधांत. [ २२ ] कांति

वाढण्यास विड्यांत. [२३] शीतज्वरास धोत्र्याचें बीं अथवा जिरें यांत. [२४] सन्निपातास ऑत्र्यांत. [२५] गुल्मास दुधीच्या रसांत किंवा निर्गुडीच्या रसांत अ० चुन्यांत. [२६] वायूस तुपांत अथवा शेळीच्या दुधांत किंवा त्रिफळ्यांत अ० माक्याच्या रसांत. [२७] प्रमेहास गाईच्या दुधांत. [२८] धातुविकारांस गोखरूंत. [२९] धातुवृद्धीस दुधात. [३०] पूपरम्यास निर्गुडीच्या रसांत. [३१] तिडीक परम्यास सुपारींत. [३२] ढाळकास एरंडेलांत. [३३] विंचवाचे विषास आल्याच्या रसांत. [३४] घाम फार येत असल्यास माक्याच्या रसांत. [३५] खर पडत असल्यास शेळीच्या दुधांत. [३६] उदरास त्रिफळा व एरंडेल यांत. [३७] ज्वरास व मूत्रकृच्छ्रास उटकटारीचे मुळाचे काढ्यांत. [३८] सुजेस कांद्याच्या रसांत.[३९] सर्व उदरांस पिलूचे रसांत. [४०]पित्तवायूस जिरें व मध यांत. [४१] गर्भधारणास गोपीचंद, तवकीर व सुंठ किंवा गोखरू यांत. [४२] मूळव्याधीस जाईच्या पाल्याचे रसांत. [४३] कुत्र्याचे विषास तांदुळाचे रसांत. [४४] कुष्ठास गुळवेलीच्या काढ्यांत अ० गोमूत्रांत. [४५] उन्मादवायूस आंबट चुक्याच्या रसांत द्यावें. [४६] सर्पाचे विषास गाईच्या तुपात किंवा तांदुळजाचे रसांत लेप करावा. [४७] ज्वरास तुळशीच्या रसांत. [ ४८ ] रातांधळ्यांस स्त्रीचे दुधांत उगाळून अंजन करावें. [ ४९ ] दांताचे किडीस वावडिंगांत गोळी करून दांताखालीं धरावी. [ ५० ] भूतसंचारास लिंबाचे रसांत आणि निर्गुडीचे रसांत अंजन करावें. [ ५१ ] लुतीस माक्याचे रसांत उगाळून मर्दन करावें. [ ५२ ] खरजेस गोमूत्रांत लेप करावा.

२८ **जस्तभस्म**—हे दोन गुंजांपर्यंत अनुपान योजून द्यावें. ( १ ) नेत्ररोगास गाईचे जुने तुपांत. ( २ ) प्रमेहास विड्यांत. ( ३ ) अग्नि प्रदीप्त होण्यास टाकळ्याचे रसांत. ( ४ ) त्रिदोषास त्रिसुगंधात. ( ५ ) कफास आडूळशाचे पानाचे रसांत. ( ६ ) पित्तास आंवळकठीचे चूर्णात. ( ७ ) पांडुरोगास मधपिपळींत. ( ८ ) प्रमेहास जिरें व खडीसाखर किंवा हशीचे लोण्यांत. ( ९ ) श्वासास त्रिकटूचे चूर्णांत. ( १० ) हें भस्म शीत आहे असें जाणावें.

२९ **जायफळ**—( १ ) डोकें दुखत असल्यास जायफळ दुधांत उगाळून मस्तकावर लेप करावा. ( २ ) झोंप लागत नसल्यास जायफळ तुपांत उगाळून डोळ्यांवर लेप करावा. ( ३ ) झोंप येत नसल्यास व अतिसार, वांति आणि तृषा, यांजवर जायफळ नुसतें खाण्यास द्यावें. ( ४ ) मुलास थंडीनें हगवण लागते त्यांस गाईच्या तुपांत सुंठ व जायफळ समभाग उगाळून चाटण द्यावें. ( ५ ) पडशावर गाईचे दुधांत आफू उगाळून त्यांतच जायफळ गंधाप्रमाणें उगाळून नाकावर व मस्तकास लेप द्यावा. अथवा जायफळ दुधांत उगाळून गरम करून मस्तकास लावावें. ( ६ ) उचकीवर जायफळ तांदुळाचे धुवणांत उगाळून द्यावें. ( ७ ) मोडशीवर तीन मासे जायपत्री दुधांत उगाळून द्यावी. ( ८ ) मुखावर मुरमाच्या पुळ्या येतात

त्यास जायफळ दुधात उगाळून लावावें. ( ९ ) मोडशीवर जायफळ १ तोळा चूर्ण करून समभाग गुळांत मिळवून तीन माशांच्या गोळ्या कराव्या. एकेक गोळी अर्ध अर्ध तासांनीं देत जावी, व वर गरम पाणी थोडें प्यावें; ह्मणजे जुलाब बंद होतात. ( १० ) आमातिसार व अतिसार यांजवर जायपत्रीचें तीन मासे चूर्ण दह्याचे सायींत किंवा गाईचे दह्यांत कालवून सात दिवस द्यावें; ह्मणजे असाध्य जरी असला तरी त्याचा नाश होतो.

३० जास्वंद—जास्वंदींत पांढरी, तांबडी, पिवळी, भगवी, शेंदरी अशा पुष्कळ जाती आहेत. परंतु पांढरी जास्वंद अधिक गुणावह आहे. तांबड्या जास्वंदीच्या फुलाचा रस चाकूच्या पानास लावून त्यानें निंबू कापलें असतां आंतून रक्तासारखें तांबडें पाणी निघतें. ( १ ) वायगोळ्यास जास्वंदीचे पाल्याचा रस सात दिवस पोटांत द्यावा. ( २ ) पित्तशमनास पांढरे जास्वंदीचे पाल्याचा रस साखर घालून द्यावा. ( ३ ) गर्भधारणास पांढऱ्या जास्वंदीचें मूळ एकवर्णी गाईचे दुधांत उगाळून त्यांत महाळुंगीच्या बिया बारीक वांटून घालाव्या व तें ऋतुकाळीं पिण्यास द्यावें. ( ४ ) गर्भस्राव होण्याची खोड असल्यास पांढऱ्या जास्वंदीचें मूळ, कुंभारणीचे[१] घराची माती, कुंभाराचे चाकास डकून राहिलेली माती व गोपीचंदन दुधांत उगाळून द्यावें. ( ५ ) टक्कल पडतें त्यास जास्वंदीचें फूल अगर पाला तेथें चोळावा. ( ६ ) धुपणीवर पांढऱ्या जास्वंदीच्या ४।५ कळ्या तुपांत तळून खडीसाखरेबरोबर खाव्या. व वर गाईचें दूध प्यावें. संध्याकाळींही वरप्रमाणें कळ्या खाव्या. दिवस सात. [ ७ ] मूळव्याधीवर पांढऱ्या जास्वंदीच्या कळ्या तुपांत तळून खाव्या. [ ८ ] धातुविकार व पुष्टतेस जास्वंदीच्या कळ्या ४।५ घेऊन तुपांत तळून खडीसाखरेबरोबर खाव्या. व वर गाईचें दूध प्यावें. याच प्रमाणें संध्याकाळीं वरप्रमाणें कळ्या खाव्या. [ ९ ] थंडच्या प्रमेहावर पांढऱ्या जासवंदीची मुळी आणि गोमेटीची मुळी या दोन्ही मुळ्या समभाग गाईचे तुपांत उगाळून घ्याव्या. [ १० ] प्रदर, धातुविकार, रक्तमूळव्याधि, व प्रमेह यांजवर जासवंदीचें मूळ सुमारें ६ मासेपर्यंत घेऊन गाईच्या निरशा आतपाव दुधांत उगाळून त्यांत थोडी खडीसाखरेची पूड घालून दुवक्त सात दिवस सेवन करावें. तेलकट, तिखट, आंबट व उष्ण पदार्थ हे पदार्थ वर्ज्य करावे. [ ११ ] उदकमेहावर जासवंदीचीं पानें अथवा फुलें १ तोळा समभाग खडीसाखर घालून खावी. [ १२ ] प्रदर व धातुविकार यांजवर पांढऱ्या जासवंदीच्या मुळ्या, कमळकंद, पांढऱ्या सावरीचा कंद अथवा साल हीं सर्व समभाग घेऊन चूर्ण करून ठेवावें. दररोज सहा मासेपर्यंत गाईचें दूध व खडीसाखर यांत सेवन करीत जावें.

३१ जांभूळ—( १ ) घामोळ्यावर जांभळीची अंतरसाल पाण्यांत उगाळून लावावी. ( २ ) रक्तातिसारावर जांभळीची साल दुधांत वांटून मध घालून द्यावी.

---

१—जो मडकीं घडतो तो कुंभार नव्हे तर कुंभारिण म्हणून एक प्राणी भिंतीवर असतो तो.

किंवा जांभळीचे पानाचे रसांत मध, तूप व दूध मिळवून द्यावें. ( ३ ) विंचवाचे विषावर जांभळीचे पानाचा रस लावावा. ( ४ ) पित्तावर जांभळीचे पानाचा रस १ तोळा व गूळ एक तोळा एकत्र करून उन्हांत ठेवून वर निवळ येईल ती प्यावी. ( ५ ) गर्भिणीचे अतिसारावर जांभळीची व आंब्याची साल घेऊन तिचा काढा करून त्यांत एक तोळा साळीचे लाह्याचें पीठ व एक तोळा सातूचें पीठ घालून चाटावयास द्यावें. किंवा पिकलेलीं जांभळें नुस्तीं खावीं. ( ६ ) मधुमेहावर जांभळीच्या सालीचें चूर्ण एक तोळापर्यंत मधांत खावें. किंवा नुस्तीं पिकलेलीं जांभळें खावीं. अथवा जांभळीच्या बियांचें चूर्ण करून मधांत सेवन करीत जावें. ( ७ ) मुखरोगावर जांभूळ, बाभळ, बोर व बकूळ यांपैकीं कोणत्याही झाडाचे अंतरसालीचें थंड पाणी काढून त्यानें गुळण्या कराव्या. व यांच्या काष्ठानें नेहमीं दंतधावन करीत जावें ह्मणजे कधीही मुखरोग होत नाहीं. व दांत बळकट होतात. ( ८ ) अतिसारावर जांभळीचे सालीचा रस द्यावा. ( ९ ) बचनागाचे विषावर जाभळीच्या अंतरसालीचा अंगरस २ तोळेपर्यंत काढून त्यांत तितकीच भाताची पेज घालून द्यावें.

३२ **जिरें**—हें वातहारक, क्षुधा प्रदीप्त करणारें, रुचिकर व थंड असें आहे. ( १ ) रातांधळ्यास जिरें, आंवळकठी व कापशीचा पाला समभाग घेऊन शिळ्या पाण्यांत वांटून त्याचा पेंड २१ दिवस डोकीवर बांधावा. ( २ ) जीर्णज्वरास जिरें व जुना गूळ एकत्र करून द्यावें. ( ३ ) श्वेतप्रदरास जिरें व खडीसाखर यांचें चूर्ण तांदुळाचे धुवणांत द्यावें. ( ४ ) परिणामशूळास जिरें, हिंग व सैंधव यांचें चूर्ण मध व तूप यांत द्यावें. ( ५ ) हरताळाचें विषास जिरें व साखर ७ दिवस द्यावी. ( ६ ) जीर्णज्वरास जिरें गाईचे दुधांत शिजवून सावलींत वाळवून चूर्ण करून समभाग खडीसाखर घालून द्यावें. ( ७ ) मुखरोगावर जिरें कुटून त्याचे पाण्यांत सुवासिक चंदन उगाळून त्यांत एलचीची पूड व तुरटीची लाही मिळवून गुळण्या कराव्या. ( ८ ) शीतज्वरावर एक तोळा जिरें कारलीचे रसांत द्यावें.

३३ **ताम्रभस्म**—हें १ गुंजेपासून २ गुंजांपर्यंत अनुपान योजून द्यावें. [ १ ] सर्व प्रकारचे कुष्ठांस खैराचे सालीचे काढ्यांत किंवा त्रिफळ्यांत द्यावें. [ २ ] प्लीहेवर त्रिफळ्याचे काढ्यांत द्यावें. [ ३ ] ज्वर, कफ, वायु, श्वास व खोकला यांस आल्याचा रस मध व पिंपळी यांत द्यावें. [ ४ ] पोटशूळास तुपांत. [ ५ ] उदररोगास रेचक औषधांत. [ ६ ] कृमीस वावडिंगाचे काढ्यात. [ ७ ] वांति होत असल्यास मधांत. [ ८ ] पांडुरोगास गाईचें दूध व खडीसाखर यात. [ ९ ] मूळव्याधीस लोणी व खडीसाखर यांत. [ १० ] अतिसारास मध व साखर यात. [ ११ ] गुल्मास गाईचें दूध किंवा निंबुरसांत. [ १२ ] क्षयास लोणी व खडीसाखर किंवा आडूळशाच्या पानाचा रस व मध यात. [ १३ ] भ्रम झाल्यास गाईचें दूध व खडीसाखर यांत. [ १४ ] मस्तकशूळास माक्याचे रसात. [ १५ ] प्रमेहास आंवळकठीचें चूर्ण किंवा त्रिफळ्याचे काढ्यांत. ( १६ ) अग्निमांद्यास मध पिंपळीत.

(१७) सुजेस तुळशीचा रस व मिरपूड यांत. (१८) व्रणास त्रिफळ्याचे काढ्यांत. (१९) मलबद्धरोगास त्रिफळ्याचे काढ्यांत. (२०) महाव्याधीस आल्याचा रस व खडीसाखर यांत. (२१) परिणामशूळास साखर, मध व तूप यांत. (२२) रेच होण्यास त्रिफळ्याचे काढ्यांत. (२३) बलवृद्धीस गाईचे धारोष्ण दुधांत. (२४) वलीपलित रोगास आंवळकठीचें चूर्ण तूप व खडीसाखर यांत द्यावें. (२५) कच्चें ताम्रभस्म सेवन केलें असतां वाति, रेच, संताप, मूर्छा, आयुष्यनाश, भ्रम, मोह, शुक्रनाश, व मेह याना उत्पन्न करितें. याशिवाय संपूर्ण धातूंचा शोष, नानाप्रकाचे रोग, यांना उत्पन्न करितें, कांतीचा नाश व कुष्ठ, विषमज्वर, आणि अनेक व्याधि उत्पन्न करितें. व प्राणनाश करितें. याकरितां कच्चें ताम्रभस्म सेवन करूं नये.

३४ **त्रिफळा**—हिरडेदळ, बेहेडेदळ व आंवळकठी हीं तिन्ही समभाग घेऊन त्यांचें एकत्र चूर्ण करून वावडिंग व खैर यांचे काढ्यांत व माक्याचे रसांत पृथक् पृथक् सात सात भावना देऊन तें चूर्ण सावलींत वाळवून ठेवावें. (१) नेत्ररोगास मध व तूप यांत. (२) वातरोगास तिळाचे तेलांत. (३) पित्तास तूप व साखर यांत. (४) कफास मधांत. (५) प्रमेहास थंड पाण्यात. (६) विषमज्वर व मंदाग्नि यांस उष्ण पाण्यांत. (७) सर्व प्रकारचे कुष्ठांस खैराचे काढ्यांत द्यावें. (८) काळे केंश होण्यास एक महिना आणि दिव्य देह होण्यास सहा महिनेपर्यंत अनुपान योजून देत जावें.

३५ **तीळ**—तिळांत पांढरे व काळे अशा दोन जाती आहेत. त्यास दक्षिणप्रांतीं मराठे तीळ असें ह्मणतात. व पांढऱ्या तिळांस हौऱ्या असें ह्मणतात, [ १ ] मूत्राघात ( मूत्र बंद होणें ) व दाह यावर तिळाच्या काड्याची अथवा पिंडीची राख गाईच्या दुधांत कालवून त्यांत थोडा मध घालून द्यावी. [ २ ] मुरमाच्या पुळ्यांवर जुनी तिळांची पेंड गोमूत्रांत उगाळून लेप द्यावा. [ ३ ] अग्निदग्धव्रणावर तिळाचें तेल, चुन्याची निवळीबरोबर मिश्र करून त्याची पट्टी बांधावी व वारंवार त्या पट्टीवर त्या मिश्र केलेल्या तेलाचे थेंब सोडीत जावे ह्मणजे तात्काळ रोग्यास सुखावह होतें. किंवा त्या मिश्रणाचा मोराचे पिसानें लेप करावा. [ ४ ] ऋतुप्राप्तीस तीळ, भोकर व वडीशेप यांचा काढा थंड करून गूळ घालून तीन दिवस द्यावा. अथवा नुसत्या काळे तिळांचा काढा गूळ घालून द्यावा. [ ५ ] दांत हालतात ते घट्ट होण्यास तिळाचे तेलांत सैंधवाची पूड घालून त्यानें गुळण्या कराव्या. [ ६ ] अपस्मारावर तिळाच्या तेलात मेलेली गोम तळून काढावी व तें तेल एकेक थेंब नाकांत व कानांत घालीत जावें ह्मणजे मस्तकांतील किडा पडून रोग बरा होतो. [ ७ ] अर्धशिशीवर गूळ व तूप एकत्र करून प्रातःकाळीं खावें. व दुधांत तीळ अथवा तीळ व वावडिंग वांटून त्याचा लेप मस्तकावर करावा, ह्मणजे तीन दिवसांत अर्धशिशी राहते. [ ८ ] कुत्र्याच्या विषावर तिळाचें तेल, तिळाचें चूर्ण, गूळ व रुईचा चीक, हीं सर्व समभाग घेऊन एकत्र करून प्यालें असतां विष उतरतें. [ ९ ] धो-

ऱ्याच्या विषावर तिळाचें तेल व उन पाणी एकत्र करून प्यावें. [१०] पित्तापासून सर्वांगावर फोड येतात त्यांस तिळाचें तेल २ पैसेभार, आफू १ पै भार व खारा साबण पांच मोहऱ्यांइतका, हीं सर्व औषधें एकत्र ऊन करून फोडांस लावावें.[ ११ ] वीर्यपतनावर तिळाची पानें पाण्यांत कुसकरून तें पाणी खडीसाखर घालून त्वरित पिण्यास देत जावें. अवकाश लागेल तर तें पाणी घट्ट होऊन व्यर्थ जाईल. [१२] गर्भस्राव होण्याची खोड असल्यास तीळ व पद्मकाष्ठ, समभाग एकत्र वांटून साखरेंतून द्यावें. [ १३ ] रक्तमूळव्याधीवर तीळ वांटून लोण्यांत कालवून खावे. [१४] गर्भिणी व बाळांतणीचे रक्तस्रावावर तीळ, जव व साखर यांचें चूर्ण मधांत द्यावें. [ १५ ] अश्मरी व शुक्राश्मरी यांजवर तिळांच्या काड्यांची राख मधांत द्यावी. [ १६ ] मुलाच्या रक्तसंग्रहणीवर लोण्यांत थोडी तिळाची पूड व खडीसाखर घालून द्यावी. [ १७ ] तिडिक प्रमेहावर तिळाची ताजीं फुलें सायंकाळीं आणून आछेर पाण्यांत सुमारें पन्नास फुलें भिजत घालून ठेवावीं. प्रातःकाळी तीं फुलें काडीनें ढवळावीं. ह्मणजे पाण्याचा दाट बोळ होईल. मग त्यातील फुलें काढून टाकावीं. व तो बोळ सुमारें ४ तोळे घेऊन त्यात खडीसाखर घालून प्यावा. [ १८ ] तीडिक प्रमेहावर रानतिळाचा पाला वाळवून ठेवावा. आणि नित्य रात्रौ सहा मासे चूर्ण कांचेच्या भांड्यांत भिजत घालून दुसरे दिवशी सकाळीं त्यांतच तो पाला कोंळून वस्त्रगाळ करून तें पाणी सुमारें ५ तोळे घ्यावें. नंतर त्यांत ३ मासे जिऱ्याची पूड व ६ मासे खडीसाखर घालून रोज सकाळी याप्रमाणें ७ दिवस सेवन करावें.

३६ **नागभस्म [ शिसेभस्म ]**—नागभस्म हें उष्णवीर्य आहे. हें एक गुंजेपासून दीड गुंजेपर्यंत अनुपान योजून द्यावें. हें भस्म शंभर हत्तींचें बळ देतें. व सर्पाप्रमाणें पराक्रम करितें. आणि जीवित्व वाढवितें. परंतु पित्त करणारें असें आहे. [ १ ] क्षयास खडीसाखर व मध यांत. [ २ ] वायूस आल्याचा रस व मध यांत. [ ३ ] गुल्मास शेवग्याचे सालीचा रस किंवा लसणीचा रस यांत द्यावें. [ ४ ] पांडुरोगास मध व तूप यांत द्यावें. [ ५ ] भ्रम झाल्यास गाईचें तूप व खडीसाखर यांत द्यावें. [ ६ ] कृमीस वावडिंगाचे काढ्यांत द्यावें. [ ७ ] कफास आडुळशाचा रस, मध, व खडीसाखर यांत द्यावे. [ ८ ] पोटशूळास हिंग व तूप यांत द्यावें. [ ९ ] प्रमेहास हाळदीचें चूर्ण व मध यांत द्यावें. [ १० ] खोकल्यास मध पिपळीत द्यावें. [ ११ ] संग्रहणीस ताकांत द्यावें. [ १२ ] अग्निमांद्यास आल्याचा रस मध व पिंपळी यांत द्यावें. [ १३ ] आमवातास एरंडेल तेलांत द्यावें. [ १४ ] वातव्याधीस निर्गुडीचे पानाचे रसात द्यावें. [ १५ ] कुष्ठास त्रिफळ्याचे चूर्णांत द्यावें. [ १६ ] मूळव्याधीस लोणी व खडीसाखर यांत द्यावें. [ १७ ] अशुद्ध शिशाचें भस्म सेवन केलें असतां प्रमेह, क्षय, कामला, कुष्ठें, गुल्म, पांडुरोग, कफ, रक्तविकार, मूत्रकृच्छ्र, ज्वर, अश्मरी, शूळ आणि भगंदर यांतें उत्पन्न करितें.

३७ **पारव्याची विष्ठा**—पारवा व खबुतर हीं एक जातीचीं आहेत, सबब दो-

होंतून कोणाचीहि विष्ठा घ्यावी. [ १ ] **पिकलेला व्रण फुटण्यास**—पारव्याची विष्ठा आणून लेप द्यावा. [ २ ] **नारूवर**—२।३ मासे पारव्याची विष्ठा मधांत कालवून गोळी करून गिळून जावी. ती मोठ्या वाढलेल्याही नारूचा नाश करिते. [ ३ ] **मूतखड्यावर**—पारव्याची विष्ठा व कांकडीचें बीं, तांदुळाचे धुणांत वांटून द्यावें, ह्मणजे खडा झरून पडेल. [ ४ ] **डव्यावर**—पारव्याची विष्ठा मधांत चाटावी.

३८ **पेद्रुवाजार**—बकऱ्याचे पोटांत एका जातीचा खडा उत्पन्न होतो, त्यास "पेद्रुवाजार" असें ह्मणतात. **पेद्रुवाजार**—धातुवर्धक, संपूर्ण मेह, विष, कफ, पित्तरोग, नेत्ररोग, मेदोरोग व वातशूल, यांचा अनुपानपरत्वें नाश करितो. हा कस्तूरी, केशर, तूप, आल्याचा रस, किंवा यथोक्त अनुपानाशीं अथवा पिंपळी, जायफळ, मध यांशी भक्षण केला असतां, ह्मातारा मनुष्य तरुण पुरुषाप्रमाणें होईल. **श्वासावर**—[ १ ] गुंज पेद्रुवाजार मध पिंपळीशी घ्यावा.

३९ **बिरवरोटी. [ सं. इंद्रगोप ]**—मृग नक्षत्रांत तांबड्या रंगाचे बारीक किडे उत्पन्न होतात; त्यांस उरदू भाषेंत "बिरवरोटी" असें ह्मणतात. पावसाळ्यांत या किड्यांच्या रांगाच्या रागा लागलेल्या असतात. वैद्य वगैरे लोक हे किडे जमा करून आणून विकतात. यांस "बिरवाहुटी" असेंही ह्मणतात. [१] **डव्यावर**—काळ्या तुळशीचे पाल्याचा अंगरस चार मासे व मध ४ मासे एकत्र करून,. त्यांत बिरवोटीचे किडे, एक अगर दोन, बारीक उगाळून चाटण तयार करून, इतकें सर्व चाटण प्रथमारंभी एकदम चाटवावें. याप्रमाणें ३।५।७ दिवस द्यावें; परंतु जसजसा रोगाचा जोर कमी होत जाईल, तसतसें औषधाचें मानही कमी करीत जावें. यानें तीन दिवसांत गुण समजतो. [ २ ] **सर्व प्रकारच्या उदरांवर**—डव्यावर व लहान मुलाच्या पोटांतील सर्व रोगांवर—काळ्या तुळशीच्या पाल्याचा रस व माक्याचा अंगरस १ तोळ्यापर्यंत घेऊन, त्यांत ४ पर्यंत बिरवोटीचे किडे उगाळावे आणि अर्धा गुंज गोरोचन उगाळून मध घालून द्यावें. मुलास $\frac{1}{2}$ बिरबरोटी द्यावी. [ ३ ] **दमा, खोकला व सुशीवर**—बिरवरोटी विड्यांतून द्यावी. [४] **मूळव्याधींवर**—बिरवरोटी व पांढरा कात यांची राख मधांत खलून लेप करावा. [ ५ ] **अर्धांग, पक्षाघात, अर्दित व इतर वायूंवर**—बिरवरोटी विड्यांत द्यावी. [ ६ ] **पोटशूळावर**—जायफळ व बिरवरोटी याचें १ वाल चूर्ण द्यावें. [ ७ ] **सुजेवर**—बिरवरोटी मेणांत मिळवून लेप करावा. [ ८ ] **पडलेले स्तन कठिण होऊन वर येण्यास**—बिरवरोटी दुधांत वांटून स्तनावर लेप करावा.

४० **पारदभस्म**—शुद्ध पारदभस्म १ गुंजपासून दोन गुंजांपर्यंत मिरपूड तूप अथवा पिंपळी व मध किंवा तूप व मध यांत द्यावें, ह्मणजे सर्व रोग दूर होतात. [१] पित्तास आंवळकठीचें चूर्ण किंवा धुवासाखर अथवा गाईचें दूध व साखर यांत द्यावें. [ २ ] वायूस पिंपळीचे चूर्णांत. [ ३ ] कफास आल्याचे रसांत. [ ४ ] ज्वरास

निंबूरसांत. [ ५ ] रक्तविकारास मधांत. [ ६ ] रक्तस्राव, प्रवाहिका व अतिसार यांजवर तांदुळजाचे रसांत. [ ७ ] अतिसारास दह्यांत. [८] कास, श्वास, तस, व शूळ यांस त्रिकटू व भारंगमूळ यांचें चूर्ण व मध यांत. [ ९ ] रक्तविकारास हाळद व साखर यांत. [ १० ] कामला, पांडुरोग व अग्निमांद्य यास त्रिकटू त्रिफळा, यांचें चूर्ण व आडूळशाचा रस यांत. [ ११ ] मूत्रकृच्छ्रास शिलाजीत, वेलची व खडीसाखर यात. [ १२ ] धातुवृद्धीस लवंगा, केशर, पत्री, शुद्ध हिंगूळ, आक्कलकाला पिपळी व भांग याचे चूर्णात. [ १३ ] सर्व प्रकारचे ज्वरांवर—सैंधव, लवंगा, किराईत व हरीतकी यांचे चूर्णात. [ १४ ] रेच होण्यास सैंधव, त्रिफळा, लवंगा, केशर व हिंगूळ यांचे चूर्णात. [ १५ ] धातुवृद्धीस विडयात किंवा भुईकोहळ्याचे चूर्णात. [ १६ ] वांतिनाशनार्थ भांग व ओंवा यांचे चूर्णात. [ १७ ] उदररोगावर सैंधव, हाळद, बाळहिरडे, व ओंवा यांचे चूर्णात. [ १८ ] कृमीवर पळसपापडी व गूळ यांत द्यावें. [ १९ ] सर्व प्रकारचे अतिसारांस आफू, लवंगा, हिंगूळ व भांग याचे चूर्णात. [ २० ] अग्निमांद्यास सैंधव व ओंवा यांचे चूर्णात. [ २१ ] सर्व प्रकारचे रोगांस गुळवेलीचे सत्वाबरोबर द्यावें. [ २२ ] पडसें व कफ यांस मिरपूड, तूप व गूळ यांत द्यावें व पथ्य स्निग्ध, उष्ण असें अन्न व दहीभात भक्षण करावा. [ २३ ] कामोत्पत्तीस व धातुस्तंभनास उडदाचें पीठ, भुईकोहळ्याचें चूर्ण, जेष्टीमधेचें चूर्ण ही तिन्हीही चूर्णें एकत्र करून त्यांत साखर आणि दूध घालून हे भस्म द्यावें. [ २४ ] मेदोरोगास शिळें पाणी व मध यांत. किंवा भाताचे पेजेंत. [ २५ ] ऋतुप्राप्त होण्यास व पोटशूळास आणि रक्तगुल्मास काळे तिळांचा काढा करून त्यांत भारंगमूळ, त्रिकटू व भाजका हिंग यांचें चूर्ण व गूळ घालून त्यांत हें भस्म द्यावें. [ २६ ] कफास सुंठीचे काढ्यांत. [ २७ ] खोकला, श्वास, कफ व पित्त यांस मौक्तिकभस्म, गुळवेल, चंदन, धणें, काळा वाळा, व सुंठ, यांचा काढा करून त्यांत मध व साखर घालून प्रातःकाळीं द्यावा. [२८] सर्व रोगावर कचोरा, कुटकी, रिंगणमूळ, पुदीना, भारंगमूळ, पित्तपापडा, शतावरी, धमासा, हरीतकी, जिरें, मंजिष्ठ, वेखंड, गुळवेल, त्रायमाण, दालचिनी व कावळी, यांचें चूर्ण करून त्यांत पारदभस्म सेवन केलें असतां संपूर्ण रोग नाश पावतात. किंवा हें भस्म नागवेलीचे रसांत घेतलें असतां तत्क्षणीं सर्व रोगाचा नाश होतो. [ २९ ] अशुद्ध पारा सेवन केला असतां त्याला अनेक विकार होतात. आणि मरण आणि कोड हे विकार उत्पन्न होतात.

४० **पारदभस्मसेवकास पथ्य**—पारदभस्म सेवन करणारानें नित्य गाईचें दूध समभाग पाणी घालून पाणी जळून जाईपर्यंत कढवावें आणि थंड झाल्यावर आंत साखर घालून बलाबल पाहून पीत जावें. याशिवाय सैंधव, तूप, धणे, जिरें, आलें, तांदुळजा, वांगी, पडवळ, लाह्याचे पदार्थ, जुन्या साळीचा भात, गाईचें दूध, तूप, दही, नदीचें कोऱ्या मडक्यांत उन्हांत व चांदण्यांत ठेविलेलें पाणी, मुगाचा यूष, अभ्यंग, सुगंध पदार्थ, पुष्पांच्या माळा, शालजोडी, नारायणादि तेल, मस्त-

कावर शीत पाण्याचें सिंचन, तहान लागली असतां साखर घालून नारळाचें पाणी, किंवा मुगाचा यूष, द्राक्षें, डाळिंब, व खजूर यांचें पाणी प्यावें, ह्मणजे हित होतें. पारदभस्म प्रातःकाळीं भक्षण करावें आणि दोन प्रहर गेल्यावर पथ्यास द्यावें. परंतु तीन प्रहर जाऊं देऊं नये, शेळीचें दूध, साळीचा भात, पुनर्नवा, चाकवत, कोंवळे मुळे, हे पदार्थ भक्षण करावे, आणि आत्मज्ञान, कथा, पुराण, व शिवाची पूजा हे नियम करावे.

अपथ्य--पारदभस्म सेवन करणारानें अति भोजन, फार पाणी पिणें, अति निद्रा, अति जागरण, अति स्त्रीगमन, अति मार्ग चालणें, अति कोप, अति हर्ष, अति दुःख, कोणतेही पदार्थांची अति इच्छा करणें हीं सर्व अतिशय करूं नयेत. राघूशी बोलणें, जलक्रीडा, कोहळा, काकडी, कारलें, करटोली, कलिंगड, करडई, काकवी, केळें हे ककाराष्टक आणि चतुष्पादावर आरोहण करणें ह्मणजे घोडा, बैल, हत्ती, इत्यादिकांवर बसणें, मलमूत्राचा वेग धारण करणें, कुळीथ, आळशीचें तेल, तीळ, उडीद, मसुरा, पारव्याचें मांस, काजी, ताकभात, कोंबड्याचें मांस, कडू, आंबट, तिखट, मीठ, पित्तकर पदार्थ, तेलकट पदार्थ, पिंवळे पदार्थ, बोर, नारळ, आंबे, जवखार, सुंठ, शेवगा, फार भाषण करणें, वादविवाद करणें, नैवेद्य भक्षण, कापूर, माळा धारण करणें, अंगास उटी लावणें, जमिनीवर उगीच निद्रा करणें, मुलाला मारणें, भांग, रानवांगीं, मोहऱ्या, वातूळ पदार्थ, उपाशी राहणें, अजीर्णकारक भक्षण, भोजनावर लागलेंच भोजन, बेलफळ, वेळूचे कोंब, उडीद, पावटे, तीळ, जलांतील प्राण्यांचें मांस, केळीच्या पानावर भोजन करणें, कांस्यपात्र, जड व विष्टंभकारक पदार्थ, उष्ण पदार्थ, कुडा, करवंद, व नेमीची भाजी हे सर्व पदार्थ वर्ज करावे.

४१ पित्तलभस्म--एक गुंजेपासून २ गुंजांपर्यंत द्यावें. ( १ ) सर्व प्रकारचे प्रमेहास शुद्ध शिलाजीत व मध यांत. ( २ ) सर्व प्रकारचे वायूंस लसुणीचा रस व तूप किंवा निर्गुंडीच्या रसांत. ( ३ ) मूळव्याधीस लोणी व खडीसाखर यांत. ( ४ ) संग्रहणीस ताकांत. ( ५ ) कफास त्रिकटूचे चूर्णात. ( ६ ) पांडुरोगास पुनर्नव्याचे काढ्यात. ( ७ ) श्वासास त्रिकटूचे काढ्यात. ( ८ ) खोकल्यास मध व पिंपळीत. ( ९ ) कामलेस गोमूत्रात. ( १० ) पोटशूळास तूप व हिंग यात द्यावें. ( ११ ) कच्चें पितळ भस्म सेवन केलें असतां नानाप्रकारचे रोग, भ्रम, मूळव्याध, सर्व प्रकारचे प्रमेह, नानाप्रकारचे ताप उत्पन्न करितें व मृत्यु देतें.

४२ प्रवाळभस्म--प्रवाळभस्म हें बलाबल पाहून १॥ गुंजेपासून ३ गुंजांपर्यंत एक वेळ किंवा दोही सांज रोग नाहीसा होईपर्यंत खालील अनुपानांत देत जावें. ( १ ) जीर्णज्वरास १॥ मासा पिंपळीचें चूर्ण व सहा मासे मध यांत द्यावें. ( २ ) उष्णकासावर वरप्रमाणें मध व पिंपळीत. ( ३ ) श्वासास वरप्रमाणें मध व पिंपळींत. ( ४ ) उचकीस वरप्रमाणें मध व पिंपळींत. ( ५ ) साधारण ज्वरावर

कडू किराईत चार मासे, कुटकी सहा मासे व बाळहिरडे एक तोळा, यांच्या अष्टमांश काढ्यांत द्यावें. ( ६ ) पित्तास गाईचें दूध आतपाव व खडीसाखर ६ मासे यांत द्यावें. ( ७ ) धातुक्षयास केळांत. ( ८ ) तिडीक प्रमेहास सहा मासे पिठीसाखरेबरोबर किंवा हिरडेदळ, बेहडेदळ व आंवळकठी, ही प्रत्येक एकेक तोळा थोडीं कुटून पावशेर पाण्यांत रात्रीं भिजत घालावीं. प्रातःकाळीं त्याच पाण्यांत चांगलीं कुसकरून तें पाणी गाळून त्यात सहा मासे मध व प्रवाळभस्म घालून देणें. ( ९ ) प्रदरास गाईच्या धारोष्ण दुधांत. ( १० ) वायूस तुळशीचा रस चार मासे व मध सहा मासे एकत्र करून त्यात द्यावें. ( ११ ) रातांधळ्यास उंदराची लेंडी तुळशीच्या रसांत उगाळून त्यांत हें भस्म घालून अंजन करून घालीत जावें. ( १२ ) मस्तक हलकें पडल्यामुळें भ्रमिष्टपणा व पित्तप्रकोपामुळें चक्कर व घेरी येत असल्यास आंवळ्यांचे मुरांब्यांत किंवा गाईचें दूध आतपाव, त्यांत सहा मासे खडीसाखरेची पूड त्यांत हें भस्म घालून देणें. ( १३ ) आम्लपित्तामुळें छातीत व गळ्यांत जळजळ लागते तिला गाईचें दूध अतपाव व त्यांत एक तोळा बत्ताशाचें चूर्ण घालून प्रातःकाळीं व तिसऱ्याप्रहरीं हें भस्म घालून देत जावें,किंवा आंवळकठीचें चूर्ण चार मासे, खडीसाखर ६ मासे व साजूक तूप एक तोळा एकत्र करून त्यांत देत जावें. ( १४ ) उष्णतेमुळें लघवीचे वेळी मूत्रमार्गास आग होते व मूत्र पिंवळें होतें, आणि धोतराला पिंवळे डाग पडतात त्यास ६ मासे पिठीसाखर व २ तोळे केळीचे कांद्याचें किंवा सोपाचें पाणी एकत्र करून त्यांत द्यावें.(१५)ज्याला रात्री नेहमीं जागरण होतें त्या मनुष्याला कालेंकरून पुढें कांहीं दिवसांनीं मूळव्याध, उन्हाळी, धातु पातळ होणें, आम्लपित्त, डोळ्यांला कमतरपणा इ० भयंकर रोग उत्पन्न होतात व धातु पातळ झाल्यानें संततीला प्रतिबंध होतो व स्वप्नावस्था किंवा दुसरे कोणत्याही तरी रीतीनें धातूचें पतन होतें. त्यामुळें कंबरेंत अशक्तता, हातपाय व डोळे यांचा दाह व हातपाय गळून जाणें, निद्रा न येणें, वगैरे विकार होतात त्यावर—गाईचें किंवा म्हशीचें दूध अतपाव त्यांत खडीसाखर ६ मासे व प्रवाळभस्म घालून दुवक्त कांहीं दिवस घेत गेल्यास वरील सर्व रोग शमतात यात संशय नाहीं. किंवा वरील रोग होण्यापूर्वी जाग्रण करणाऱ्या मनुष्यांनीं अधीच सावधगिरी ठेवून मधून मधून कांहीं दिवस वरप्रमाणें या भस्माचें सेवन केल्यामुळें पुढें जाग्रणापासून कोणतेच रोग उत्पन्न न होतां चित्ताला सुप्रसन्नता येऊन चित्त स्थिर राहून धातु पातळ होत नाहीं व मस्तक थंड राहून अंगात हुपारी वाढत जाते. ( १६ ) आतपाव अथवा पावशेर [ शक्ति पाहून ] गाईचें किंवा तें नच मिळालें तर म्हशीचें दूध घेऊन त्यांत सहा मासे खडीसाखरेची पूड व एक तोळा गाईचें अथवा म्हशीचें तूप घालून एकत्र करून त्यांत वरप्रमाणें प्रवाळभस्म एक वेळ किंवा दोन्ही साज घेतल्यास धातु घट्ट होते. यासारखा धातुवर्धक, तेजोबळ, पौष्टिक व कामोद्दीपन असा दुसरा प्रयोग नाहीं असें समजावें.

४३ **बचनाग**—बचनाग हा योगवाही आहे. कुष्ठरोग्यांनीं गुंजप्रमाण मात्रा

द्यावी व दररोज चढवीत आठ गुंजांपर्यंत द्यावी, ही मोठी मात्रा होय. शुद्ध पांढरा बचनाग घेऊन त्यासमान शुद्ध टांकणखार व दुप्पट पांढरीं मिरीं या सर्वांचा चांगला एकत्र खल करावा ह्मणजे शुद्ध आणि मृत असा होतो. नंतर २।२ गुंजांपर्यंत बलाबल पाहून ती मात्रा देत जावी; ह्मणजे वायु, कफविकार, कुष्ठें, महारोग, अग्निमांद्य, श्वास, कास, प्लीहा, उदर, भगंदर, गुल्म, पांडुरोग व त्रिदोष, यांचा नाश करितो. हा युक्तायुक्त सेवनानें बल देणारा, रसायनी, पौष्टिक आणि वीर्यवर्धक असा आहे. परंतु वृद्ध, बाल, क्रोधिष्ट, पित्तप्रकृतीचा, नपुंसक, क्षयरोगानें व्याप्त, गर्भिणी व श्रमित इतक्यांस देऊं नये, बचनागभक्षकानें तूप, मध, साखर, दूध, गहूं, तांदूळ, मिरीं, सैंधव, द्राक्षें, मनुका, मधुर आणि शीत अशीं पथ्यें, ब्रह्मचर्य आणि थंड देश, थंड काळ व थंड पाणी, यांची योजना करावी.

४४ **मौक्तिकभस्म**—हें एक गुंजपर्यंत द्यावें. हें शीतवीर्य आहे. (१) वीर्यवृद्धीस विड्यांत किंवा गाईचे तुपांत. (२) बलप्राप्तीस दूध व खडीसाखरेंत. (३) नेत्ररोगास तूपसाखरेंत. (४) विषास तांदुळाचे धुवणांत. (५) श्वास व कफ यांस त्रिकटूचे चूर्णांत किंवा आडूळशाचे पानाचे रसांत. (६) अग्निमांद्यास आंवळ्याचे रसांत. (७) क्षयास आडूळशाचे पानांचा रस व मध यांत. (८) पित्तास आंवळकठीचें चूर्ण, खडीसाखर व साजूक तूप यात. किंवा मोरआंवळ्यांत. (९) खोकल्यास आल्याचा रस व मध यांत द्यावें.

४५ **मंडूर**— हा दोन गुंजांपासून चार गुंजांपर्यंत देत जावा.(१) पुनर्नव्याचे काढ्यांत किंवा चूर्णा बरोबर दिल्यास पांडुरोगाची सूज, सूज, हलीमक, कामला, आणि कुंभकामला यांचा नाश होतो. (२) ताकांत संग्रहणीवर द्यावा.

४६ **रससिंदूर**—एक गुंजपासून दोन गुंजांपर्यंत देत जावा. (१) वायूवर मधपिंपळींत. (२) कफास चित्रक व त्रिकटूचें चूर्ण यांत. (३) पित्तास एलची व साखर यांत. (४) व्रणास रिंगणमूळ, सुंठ व तुळवेलीचा अंगरस यांत. (५) पुष्टीस किंचित् हाळद किंवा केशर याबरोबर. (६) वातप्रमेहास मधपिंपळींत. (७) पित्तप्रमेहास त्रिफळा व साखर यात. (८) कास, श्वास व शूल यांस त्रिकटू, व भारंगमूळ यांचें चूर्ण व मध यात. (९) रक्तविकारास हाळद व साखर यांत. (१०) पांडुरोग, कामला व अग्निमांद्य यांस त्रिकटू व त्रिफळा यात. (११) अग्निमांद्य, बद्धकोष्ठ व हृद्रोग यांस पिंपळी, चित्रकमळ, हरितकी व संचळ याचे चूर्णात (१२) मूत्रकृच्छ्रास शिलाजीत, एलचीदाणे व खडीसाखर यांत. (१३) सर्व ज्वरांस लवंगा, संचळ, कीराईत व हरितकी यात. (१४) रेच होण्यास संचळ व त्रिफळा यात (१५) धातुवृद्धीस लवंगा, केशर व तांबूल यात. किंवा भुईकोहळ्याचे चूर्णात (१६) ओकारीस भाग व अजमोदा यांत. (१७) पोटशूळास संचळ, बाळहरितकी व अजमोदा यांचें चूर्णांत. (१८) कृमीस पळसपापडी व जुना गूळ यांत (१९) सर्वातिसारांस अफु, लवंगा व भांग यांत.

( २० ) या शिवाय जे दुसरे रोग राहिले आहेत त्यांजवर रोगोक्त अनुपान योजून द्यावा. ह्मणजे सर्व रोगांचा नाश होतो असें जाणावें. हा योगवाही आहे ( अनुपान प्रकरण पहा )

४७ **मध—सामान्य मध**—शीत, लघु, स्वादु, रुक्ष, स्वर्य, ग्राहक, नेत्राला हितावह. अग्निदीपक, व्रणशोधक, नाडीची शुद्धि करणारा, सूक्ष्म, रोपण, मृदु, वर्णकारक, मेधाकर, विशद, वृष्य, रुचिकारक, आनंदकारक, तुरट, अल्प वातकारक व कुष्ठ, अर्श, खोकला, पित्त, रक्तदोष, कफ, मेह, क्षय, उचकी, त्रिदोष, आध्मान वायु, विष आणि मलबद्ध यांचा अनुपानपरत्वें नाश करितो. सर्व जातीचा मध, व्रणरोपण, शोधक, अस्थीला सांधणारा असा आहे. मध तापविला असतां किंवा उष्ण काळामध्यें उष्ण पदार्थांशीं भक्षण केला असतां विषासारखा संताप करतो. औषधांत जुना मध घालावा. जसा जसा तो जुना होत जाईल तसतसा तो गुणकारी होतो. तूप व मध ही समभाग घेऊं नयेत, घेतल्यास विषासमान होतो. रंगानें गाईच्या तुपासारखा, रुचिकर, सुगंधी, असा मध उत्तम जाणावा. [ १ ] **कान फुटतो त्यास**—पोंव्या मोहाचा ( झाडाच्या पोकळींत बारीक माशाचें मोहळ असतें त्याचा ) मध कानांत घालावा. [ २ ] **कानांत गोमाशी वगैरे गेल्यास**—मध कानांत घालावा. [ ३ ] **विंचवाचे विषावर**—दंशावर मध लावावा. [ ४ ] **मेदोरोगावर**—प्रातःकाळीं ऊन पाणी ४ तोळे घेऊन त्यांत २ तोळे मध घालून तें प्यावें. [ ५ ] **मुखरोगावर**—मधांचे गंडूष ( तोंडांत मध घेऊन तो कांहीं वेळ ठेवून चूळ भरून टाकणें ) धारण करावे ह्मणजे तोंडांतील व्रण, चट्टे आणि दाह, तृषा हे रोग दूर होऊन मुखाला स्वच्छता येते अथवा मध व पाणी एकत्र करून त्याच्या गुळण्या कराव्या. [६] **अग्निदग्ध व्रणावर**—पोंव्या मोहाचा मध पिसानें लावावा. [ ७ ] **गोम [ घोण ] कानांत गेल्यास**—मध व तेल कानांत घालावें [ ८ ] **रक्तपित्तावर**—मध व साखर ही बकरीचे दुधांत घालून द्यावी. [ ९ ] **तृष्णारोगावर**—थंड पाणी व मध एकत्र करून तें शेरभर पाजावें, वमन झालें ह्मणजे तृष्णा व दाह शमेल. [ १० ] **शेराचे विषावर**—पाण्यात मध घालून द्यावा. [ ११ ] **कुचल्याचें विषावर**—मध, तूप व साखर ही द्यावीं.

४८ **मोहाचें मेण**—पिच्छिल ( चिकट ) स्वादु, तिखट, स्निग्ध, मृदु, अस्थिसंधानकारक, व्रणाला हितकर व वायु, कुष्ठ, विसर्प, रक्तदोष, वातरक्त, भूतदोष व लेपानें त्वचा फुटते तिचा नाश करितें. [ १ ] **नखुर्ड्यावर**—कढविलेल्या मेणाची लुगदी ( गोळी ) नखावर बसवून बोट बांधावें, चार पांच दिवसांत गुण येतो. [ २ ] **पाय फुटतात त्यास**—कढविलेलें मेण लावावें. [ ३ ] **व्रणावर**—तुपांत मेण कढवून तें लावावें. [ ४ ] **रक्तप्रदरावर**—मेणांत विटकरीचें चूर्ण खलून द्यावें.

४९ **ह्मशीचें शेण [ १ ] नखुरडें झाल्यास**—ह्मशीचें ताजें शेण गरम कं-

रून बोटावर बांधावें. [ २ ] मधुऱ्यावर---ह्मशींचें शेण पाण्यांत कालवून कोंपरापर्यंत व ढोंपरापर्यंत पायांस चोळून धुवावें. [ ३ ] तिडीक परम्यावर---ह्मशींचें शेण पाण्यांत गाळून घेऊन त्यांत साखर घालून तें प्यावें.

५० रसकापूर---हा वाल किंवा अर्धा वाल जुन्या गुळाशीं किंवा रोगोक्त अनुपानाशीं द्यावा, वर विडा खावा, व दुधभात पथ्यास द्यावा; ह्मणजे सर्व रोगांचा नाश होतो. हा रस फिरंगोपदंशरूप हत्तीला सिंहासारखा व संपूर्ण कुष्ठाला कल्पांत अग्नीप्रमाणें आणि संपूर्ण व्रणांला नाशक असून कामोत्पत्तिकर सुवर्णासारखी कांति, बल, अग्नि, व तेज, यांना करणारा व संपूर्ण रोगांला हरण करणारा असा आहे. हा संधिरोगाचाही नाश करितो. [ अनुपान प्रकरण पहा. ]

५१ रौप्यभस्म—हें शीतवीर्य आहे. हें एक गुंजेपासून तीन गुंजापर्यंत अनुपान योजून द्यावें. [ १ ] दाहशमनास साखरेंत. [ २ ] वात व पित्त यांस त्रिफळ्यांत. [ ३ ] प्रमेहास त्रिसुगंधात. [ ४ ] रुपयाचें भस्म, अभ्रकभस्म, व ताम्रभस्म यां सर्वांचे समान त्रिकटूचें चूर्ण आत मिळवून प्रातःकाळीं बलाबल, पाहून दोन गुंजांपासून चार गुंजांपर्यंत दिलें असतां क्षय, पांडु, उदर, मूळव्याध, श्वास, खोकला, तीमीर रोग व पित्त यांचा नाश करितें. ( ५ ) त्रिदोषास आडूळशाचे पानांचा रस व मध किंवा तुळशीचे पानांचा रस व मध यात द्यावें. [ ६ ] सर्व प्रकारचे विषास मधांत द्यावें. [ ७ ] क्षयास शिलाजीत व खडीसाखर यांत. [ ८ ] अपस्मारास वेखंडाचे चूर्णांत. [ ९ ] पोटशूळास हिंग तूप यांत. [ १० ] पांडुरोगास पुनर्नव्यांत. [ ११ ] प्लीहारोगास त्रिफळ्याचे काढ्यांत. [ १२ ] ज्वरास मध पिंपळींत. [ १३ ] कांति वाढण्यास धारोष्ण दुधांत. [ १४ ] गुल्मास निंबुरस किंवा गाईचें दूध यांत. [ १५ ] सुजेस मधात. [ १६ ] रौप्यभस्म रोग समुद्रांतून पार नेणारे, देहाला सौख्य देणारें व वलिपलीत आणि विषदोष याचे नाशक आणि वृष्य, तरुणपणा देणारें व आयुष्य वाढ विणारें असें आहे. [ १७ ] अशुद्ध रौप्यभस्म सेवन केलें असता संताप, मलबद्धता, शुक्रनाश, अशक्तता, वीर्य व बल, यांचा नाश होतो. आणि मेह व नानाप्रकारचे रोग उत्पन्न होतात.

५२ रौप्यमाक्षिकभस्म—दोन गुंजांपासून चार गुंजापर्यंत द्यावें. ( १ ) प्रमेहास त्रिफळ्यात. ( २ ) कुष्ठास रानतुळशीचे रसात. ( ३ ) कृमीस वावडिंगांत. ( ४ ) सुजेस मधांत. ( ५ ) पांडुरोगास पुनर्नव्याचे काढ्यांत. ( ६ ) अपस्मारास वेखंड किंवा अक्कलकाढा यांचें चूर्ण व मध यांत. ( ७ ) अश्मरीस गोखरूचे काढ्यांत किंवा जुनें तूप व केशर यात द्यावें. बाकी रौप्यमाक्षिकाचे गुण सुवर्णमाक्षिकाप्रमाणें आहेत. ( ८ ) अशुद्ध रौप्यमाक्षिक भक्षण केलें असा पांडुरोग, कंडू, गलग्रह, मलबद्ध, वीर्यनाश, बलहानी, आणि मस्तकशूळ यांना उत्पन्न करितें. हें योगवाही आहे, अनुपानपरत्वें सर्व रोगांवर चालतें. ( अनुपान प्रकरण पहा. )

५३ **लोकनाथ**—एकोणतीस मिऱ्यांचे चूर्णात ही मात्रा ६ गुंजा मिळवून ठेवावी आणि एक गुंजेपासून ४ गुंजांपर्यंत देत जावी. (१) वायूस तुपांत. (२) पित्तास लोण्यांत (३) कफास मधांत. (४) ज्वरास धणे व गुळवेल यांच्या काढ्यांत. (५) रक्त-पित्त, कफ, श्वास, खोकला व स्वरभेद यांस वाळा व अडुळसा यांच्या काढ्यांत मध व साखर घालून त्यांत द्यावी. (६) पोटशूळ व अजीर्ण यास संचळ, बाळहिरडे व पिंपळी यांच्या चूर्णात द्यावी व वर ऊन पाण्याचा घोट घ्यावा. (७) ज्वरास मध व पिंपळींत. (८) कवलु, रक्तपिती, ओकारी व मूळव्याध यांस डाळिंबफुलाच्या र-सांत. (९) ओकारी व उचकीस बोराचा गीर, पिपळी, मोराच्या पिसांचें भस्म व ही मात्रा एकत्र करून त्यांत मध व साखर घालून देत जावी. (१०) नाकांतून रक्त पडतें त्यास दूर्वांच्या रसांत नस्य करावें. (११) अतिसार, क्षय, अरुचि, संग्रहणी, कृशता, अग्निमांद्य, खोकला, गुल्म इत्यादि सर्व रोगांस ही मात्रा अनुपान योजून द्यावी..

५४ **लोपभस्म**—एक गुंजेपासून दोन गुंजांपर्यंत अनुपान योजून द्यावें. (१) पोटशूळास हिंग व तूप यांत. (२) जीर्णज्वरास मध व पिपळींत. (३) वात-व्याधीस लसूण व तूप यांत. (४) श्वासावर त्रिकटू व मध यांत. (५) सर्दी झा-ल्यास मिरीं व विड्ययाचीं पानें यांत. (६) प्रमेहास त्रिफळा व खडीसाखर यांत. (७) त्रिदोषावर आल्याचा रस व मध यांत. (८) वातज्वरास तुपांत. (९) पित्तज्वरास मधांत. (१०) कफपित्तावर आल्याचे रसांत. (११) ८० प्रकारचे वाथूंवर निर्गुडी-च्या रसांत. (१२) वातावर सुंठीत. (१३) पित्तावर साखरेंत. (१४) कफावर मध व पिंपळींत. (१५) संधिरोगावर दालचिनी, एलची व तमालपत्र यांचे चूर्णांत. (१६) वलीपलितरोगास त्रिफळ्यांत. (१७) रक्तपित्तास खडीसाखर व चातुर्जात यांत. (१८) बलवृद्धीस पुनर्नव्याचें चूर्ण व गाईच्या दुधांत. (१९) पांडुरोगास पुनर्नव्याचे रसांत. (२०) वीस प्रकारचे प्रमेहांस हाळद व मध किंवा पिपळी व मध यात. (२१) मूत्र-कृच्छ्रास शिलाजीत यांत. (२२) पांच प्रकारचे खोकल्यांस अडूळशाचे पानाचा रस पिपळी, मनुका व मध यांत गोळी करून द्यावी. (२३) अग्निमांद्यास तांबूलांत. (२४) कृमीवर वावडिंगांत. (२५) क्षीणतेस गाईचें धारोष्ण दूध व खडीसाखर यांत. (२६) मेहास मध व पाणी यांत. (२७) मूळव्याधीस लोणी व खडीसाखरयांत. (२८) संग्रहणीस ताकांत. (२९) सुजेवर मधांत. (३०) गुल्मास वायवर्ण्याचे साली-चें चूर्ण अथवा शेळीचे दुधांत. (३१) पांथरीस त्रिफळ्याचा काढा व पिपळीचें चूर्ण यांत. (३२) आमवायूस करंज किंवा गोमूत्र अथवा एरंडेल यांत. (३३) विषास म-धांत. (३४) कुष्ठास खैराचे सालीचे काढ्यांत. (३५) महारोगास गुळवेलीचा काढा किंवा एरंडेल यात. (३६) कामलेवर लोणी व हळद यांत. (३७) क्षयास लोणी व खडीसाखर यांत. (३८) बलवृद्धीस व कांति चांगली होण्यास गाईचें दूध, तूप व साखर यांत. (३९) कुंभकामलेवर आल्याचा रस व मध यात. (४०) हलीमकास मध व तूप यांत. (४१) भ्रमावर गाईचें दूध व खडीसाखर यांत. (४२) वांतीवर

आंवळ्याचे मुरांब्यांत. (४३) अरुचीवर आल्याचा रस व मध यांत. ( ४४ ) लोहभस्म हें बल आणि वीर्य यांस वाढविणारें, रोगांचा नाश करणारें, काम उत्पन्न करणारें, अशा या लोहभस्मासारखें दुसरें रसायन नाहीं. (४५) कच्चें लोहभस्म सेवन केलें असतां षंढत्व, कोड, मृत्यु, हृद्रोग, शूळ, अश्मरी, नानाप्रकारचे रोग, अशक्तपणा, हृदयाचेठायीं दारुण व्यथा यांना उत्पन्न करितें.

५५ **लोहदोष चिकित्सा**—लोहापासून अंगात विकार झाला असतां आगस्त्याचे पानाचा रस एक तोळा, व वावडिंगाचें चूर्ण चार किंवा सहा मासे एकत्र करून प्राशन करावें आणि उन्हांत फार वेळ राहावें, ह्मणजे पोटांतील दोष पातळ होऊन मलद्वारानें पडून जातात, लोहापासून कृमि झाल्यास बहाव्याचा मगज द्यावा. फार रेच होऊं लागल्यास दूध प्यावें आणि औषध बंद करावें.

**अपथ्य**—लोह भक्षण करणारानें कोहळा, तिळाचें तेल, उडीद, मोहऱ्या, मद्य, आंबट पदार्थ, तिखट पदार्थ, वांगीं, कारली, व जविक शाक, हे पदार्थ वर्ज्य करावे.

५६ **वंगभस्म**—एक गुंजपासून दोन गुंजांपर्यंत अनुपान योजून द्यावें.( १ ) मुखदुर्गंधीस कापरांत. ( २ ) पुष्टीस जायफळांत किंवा धारोष्ण दुधांत. ( ३ ) प्रमेहास तुळशीचे रसांत. ( ४ ) पांडुरोगास तुपांत. ( ५ ) गुल्म व प्लीहा यांस टांकणखाराचे लाहीबरोबर. ( ६ ) रक्तपित्त व ऊर्ध्वश्वास यांस हळदीचें चूर्णांत. (७) बलवृद्धीस मधांत. ( ८ ) पित्तास तूप व खडीसाखर यांत. ( ९ ) धातूस्तंभनास नागवेलीचे पानांत अथवा कस्तूरीबरोबर. ( १० ) अग्निमांद्यास मध पिंपळींत. ( ११ ) दाह झाल्यास निंबूचे रसांत अथवा निंबाचे सरबतांत. ( १२ ) मुखदुर्गंधीस चांप्याचें फुलाबरोबर. ( १३ ) अजीर्णास सुपारीचे चूर्णांत. ( १४ ) अस्थिगत ज्वरांत लोण्यात. ( १५ ) वायुरोगास लसणीचा रस व तूप यात. ( १६ ) कुष्ठास समुद्रफळांत अथवा निर्गुडीचे रसांत. ( १७ ) खंजत्ववायूस आघाड्याचे रसात. ( १८ ) लिंगवृद्धीस लवंगा, समुद्रफळ, व वंगभस्म हीं नागवेलीचे पानाचे रसांत मर्दन करून लिंगास लेप द्यावा. ( १९ ) मोहनास ( वशीकरण ) गोरोचन व लवंगा पाण्यांत उगाळून त्यात वंगभस्म कालवून त्याचा कपाळीं तिलक द्यावा. ( २० ) अर्धशिशीस एरंडमूळ व लवंगा याजबरोबर पाण्यांत उगाळून मस्तकास लेप करावा. ( २१ ) वायूस ओंव्याचे चूर्णांत. ( २२ ) जलोदरास बकरीचे दुधात. ( २३ ) मुलें होण्यास कातावरोबर अथवा गाढवीचे दुधांत. ( २४ ) नामर्दाचा मर्द होण्यास आघाड्याचे रसांत अथवा काढ्यांत. ( २५ ) मस्तकरोगास आघाड्याचे रसांत. ( २६ ) धातुविकृतीस जायफळ, पत्री व लवंगा यांत. ( २७ ) कंबरेचे व्यथेस जायफळ व आस्कंदचूर्ण यांत. ( २८ ) नाडीव्रणास नागवेलीचे रसांत. ( २९ ) पोटांतील पीडेस हरीतकीबरोबर. ( ३० ) वातगुल्मास ताकांत. ( ३१ ) मूळव्याधीस लोणी व खडीसाखर यात. ( ३२ ) अपस्मारास लसणीचे रसांत मिळवून नस्य द्यावें.

( ३३ ) श्वासास, जायफळ, लवंगा व मध यांत. ( ३४ ) हाडें ताजीं होण्यास व पुष्टीस दुधांत. ( ३५ ) वीर्यस्तंभास भांगेचे चूर्णाबरोबर. ( ३६ ) उरःक्षतरोगास तूप व संगजिरा यांत. ( ३७ ) बुद्धि वाढण्यास ब्राह्मीचे रसांत किंवा वेखंडाचे चूर्णांत. ( ३८ ) कांति चांगली होण्यास गाईचें धारोष्ण दूध, तूप व खिचडी यांत. ( ३९ ) सर्व प्रकारचे प्रमेहांस त्रिफळ्याचे काढ्यांत. ( ४० ) वंग भक्षण करणारें पुरुषाच्या स्वप्नामध्येंही शुक्रक्षय होणार नाहीं असें जाणावें. ( ४१ ) कच्चें वंग-भस्म सेवन केलें असतां कुष्ठ, गुल्म, महाव्याधि, पांडुरोग, प्रमेह, अपची, हृद्रोग, शूल, मूळव्याध, श्वास व खोकला यांना उत्पन्न करितें. आणि बलाचा नाश करितें.

५७ **शिलाजीत**—शुद्ध शिलाजिताचें चूर्ण बलाबल पाहून ८ गुंजांपर्यंत देत जावें. ( १ ) एलची व पिंपळी यांत दिलें असतां मूत्रकृच्छ्र, मूत्रावरोध, प्रमेह आणि क्षय यांचा नाश होतो. हें उष्णवीर्य आहे असें जाणावें. ( २ ) कंपवायुवर निर्गुंडीचा रस किंवा आल्याचा रस अथवा वेखंडाचें चूर्ण यांत. ( ३ ) प्रमेहावर मध व पिंपळींत. ( ४ ) अश्मरीस कुड्याची साल दह्यांत उगाळून त्यांत, किंवा मेंढीचे दुधांत द्यावें ( ५ ) श्वासास त्रिकटूचे चूर्णांत. ( ६ ) वायूस निर्गुंडीचे रसांत. ( ७ ) मूळव्याधीस लोणी व खडीसाखर यांत. ( ८ ) पांडुरोगास पुनर्नव्याचे काढ्यांत. ( ९ ) अपस्मारास वेखंडचूर्णांत. ( १० ) उन्मादास बेहेडेदळ व अक्कलकाला यांचे चूर्णांत. ( ११ ) सुजेस मध किंवा बाळहिरड्याचे चूर्णांत. (१२) कुष्ठास खैराचे सालीचे काढ्यांत. ( १३ ) उदररोगास त्रिफळ्याचे काढ्यांत. (१४) या भूमितलावर शिलाजितानें जाणार नाही असा असाध्य व बलवान व्याधी कोठेंही नाहीं. युक्त अनुपानाशीं दिलें असतां सर्व रोगांचा नाश होतो. म्हणजे शिलाजीत फार दिवस घेतल्यानें ते रोग निःसंशय जातात. जे गुण रस, उपरस व रत्नोपरत्नें आणि लोह यांमध्यें आहेत ते सर्व मृत्यूला जिंकणारे गुण शिलाजितांत आहेत असें जाणावें. ( १५ ) अशुद्ध शिलाजीत सेवन केला असतां दाह, मूर्छा, भ्रम, रक्तपित्त, रक्तविकार, अग्निमांद्य आणि मलबद्धता हे विकार उत्पन्न होतात. शिलाजीत सर्व रोगांवर देण्याकरितां अनुपान प्रकरण पहा.

**अपथ्य**—शिलाजीत सेवन करणारानें व्यायाम, ऊन, वायु, चित्ताचा संताप, व जड आणि दाह करणारे पदार्थ जितके दिवस औषध घेईल त्याचे दुप्पट दिवसपर्यंत अगदी सेवन करूं नये. आणि जो बलवान व्याधि या शिलाजीतानेंच गेला असेल त्या रोग्यांनीं झऱ्याचें पाणी, व कुळीथ आणि पारव्याचें मांस हें सर्वकाल वर्ज करावें.

५८ **समुद्रफळ**—( १ ) कृमींस अक्कलकाल्याशीं. ( २ ) उष्णतेस कथल्या गोंदाशीं. ( ३ ) विषास आंवळ्याचे रसांत. ( ४ ) पुरुषत्व येण्यास आघाड्याचे रसांत. ( ५ ) मूळव्याधीचे मोडांस काळे धोत्र्याचे रसात उगाळून लेप करावा. ( ६ ) प्रमेहास गोमूत्रांत. ( ७ ) अजीर्ण व मोडशीस शिळे पाण्यांत. (८)

डोळ्यांस चिपडे येतात त्यास ह्मशीचे दुधांत उगाळून अंजन करावें. ( ९ ) खोकल्यास हळदींत. ( १० ) अंगाचे दुर्गंधीस मधांत. ( ११ ) पुष्टतेस साखरेंत. ( १२ ) कृमीस भाजका हिंग व ओंवा यात. ( १३ ) उष्णवातास ह्मशीचे ताकांत. ( १४ ) साधारण ज्वरास तुळशीचे रसांत. ( १५ ) संधीगत वायूस नागवेलीचे रसांत. ( १६ ) रक्तपित्तास आघाड्याचे रसांत. ( १७ ) प्रमेहास मधांत. ( १८ ) आळशास गुळांत. ( १९ ) बहिरेपणास महाळुंगाचे रसांत उगाळून कानांत घालावें. ( २० ) डोळ्यांतील फुलास शेळीचे मुतांत उगाळून अंजन करावें. ( २१ ) अर्धशिशीस शेळीचें मुतांत उगाळून नस्य द्यावें. ( २२ ) सर्पाचे विषास लसुणीचे रसांत उगाळून अंजन करावें. ( २३ ) वातास निंबुरसांत. ( २४ ) फेंपऱ्यांस लसुणीचे रसांत उगाळून अंजन करावें. ( २५ ) पोटशूळास निंबुरसांत. ( २६ ) कुष्ठास तुळशीचे रसांत उगाळून लेप करावा. व पोटांतही द्यावें. ( २७ ) मस्तकशूळास निर्गुडीचे रसांत उगाळून लेप करावा; व पोटांतही द्यावें.

५९ **समुद्रफेंस**—समुद्रफेंस हा, एका जातीच्या माशाच्या पोटातील हाडांचा पिंजरा आहे. हा सफेत रंगाचा असून यावर बारीक छिद्रें असतात. हा बसऱ्याकडून इकडे येतो. **समुद्रफेंस**—रुचिकर, लेखन, तुरट, लघु, चक्षुष्य, शीतल, पटलादि दोषनाशक, सारक, विषघ्न व कर्णशूल, कफ, कंठरोग, व पित्त यांचा नाश करितो. अशुद्ध समुद्रफेंस, अंगभंग करितो, याकरिता शोधावा. **शोधन**—समुद्रफेंस व निंबूरसाशी खलावा ह्मणजे शुद्ध होतो. [ १ ] **रातांधळें व अहिरा यांवर**—समुद्रफेंस व खडीसाखर यांची पूड सकाळ संध्याकाळ डोळ्यांत घालावी, ह्मणजे अहिरा, रातांधळें, लाली, गळ, कंडू वगैरे विकार त्वरित दूर होतात. [ २ ] **कर्णशूळावर**—समुद्रफेंसाची वस्त्रगाळ पूड करून कानांत घालावी आणि त्यावर निंबाचा रस पिळावा. [ ३ ] **कर्णस्राव, व्रण व चिकटा यांवर**—समुद्रफेंसाचें चूर्ण नुस्तें कानांत घालावें. [ ४ ] **कंडूवर**—समुद्रफेंस पाण्यांत वांटून लावावा.

६० **सांवरशिंग [१] सूज, जखम व वायूनें अंग ठणकतें त्यास**—सांबरशिंग उगाळून लेप द्यावा. [ २ ] **डोकें दुखत असल्यास**—दुधांत सांबरशिंग उगाळून लेप द्यावा. [ ३ ] **मुलाची टाळू पडल्यास**—सांवरशिंग गाईचे दुधांत किंवा तुपांत उगाळून टाळवेवर लेप द्यावा व त्यावर गोड्या एरंडाचें पान बसवावें, तसेंच गाईच्या दुधात सांवरशिंग उगाळून पाजावें. [ ४ ] **रक्तातिसार व आमांशावर**—सांवरशिंग तूपांत उगाळून द्यावें. [ ५ ] **वातशूळावर**—सांवरशिंगाचें अर्धमासा भस्म १ तोळा तुपाशी द्यावें. ( ६ ) **धातुवृद्धीवर**—सांबरशिंगाचें भस्म दुधातून घ्यावें ह्मणजे धातुवृद्धि होऊन धातुस्थानची कडकी निघून जाते. [ ७ ] **खोकला, दमा, क्षय, ग्रंथी, अपची, व अंडवृद्धि**

यांवर—१ वाल सांबरशिंगाचें भस्म मधांत द्यावें. **सांबरशिंगाचें भस्म करण्याची कृति**—शिताफळीचा पाला बारीक गंधाप्रमाणें वांटून, त्याचा लांबट गोळा करून त्यांत सांबरशिंगाचा तुकडा मध्यभागीं ठेवावा आणि त्यास रानशेणी गोवऱ्यांचें पुट द्यावें. ह्मणजे त्याचें भस्म होतें. याच रीतीनें रुईच्या चिकांत सांबरशिंग घालून पुट दिल्यास भस्म होतें

६१ **हस्तीदंत**—[१] **केंश येण्यास**—हस्तिदंताची मशेरी (काळी) दारुहळदीचे रसांत खलून भावना द्याव्या व ती लावावी. [ २ ] **सूज फुटण्यास**—हस्तीदंत उगाळून, त्याचा सुजेच्या तोंडावर एक बिंदु द्यावा. [ ३ ] **मूळव्याधीवर**—हस्तीदंताची धुरी द्यावी. [ ४ ] **खरूज, गजकर्ण, वगैरेवर**—हस्तीदंताचा चूर जाळून, ती राख तुपांत खलूल लेप करावा. [ ५ ] **दंतवर्ती**—हस्तीदंत, डुकराचा दात, उंटाचा दात, बैलाचा दांत, बोकडाचा दांत, गाढवाचा दांत, शंख, मोती व समुद्रफेंस याचें चूर्ण करून पाण्यात वातीसारखी लांबोळी गोळी करावी. ही पाण्यांत उगाळून डोळ्यांत अंजन करावें, ह्मणजे डोळ्यांतील फूलें फार त्वरित दूर होतात. हा प्रयोग फुलें दूर होण्यास फार उत्तम आहे.

६२ **सुवर्णभस्म**—हें एक गुंजेपासून दोन गुंजांपर्यंत बलाबल पाहून द्यावें. हें शीतवीर्य आहे. [ १ ] कुटकीशी दिलें असतां तात्काळ दाहनाश होतो. [ २ ] माक्याचे रसाशी दिलें असता स्त्रीप्रसंगीं हितावह होतें. [३] बलवृद्धीस दुधांत. [४] नेत्ररोगास पुनर्नव्याचे काढ्यांत. [ ५ ] जरा व व्याधि यांच्या नाशनार्थ तुपात. [ ६ ] बुद्धि वाढण्यास वेखंडाचे चूर्णात. [ ७ ] कांति चांगली होण्यास केशरांत. [ ८ ] क्षयास गाईच्या धारोष्ण दुधांत. [ ९ ] सर्व प्रकारचे विषास निर्विषीचे रसांत किंवा चूर्णात. [ १० ] त्रिदोषास सुंठ, लवंगा व मिरीं यांत. [ ११ ] उन्मादास सुंठ, मिरीं व लवंगा याचे चूर्णात. [ १२ ] आयुष्य वाढण्यास शंखपुष्पीचे रसांत. [ १३ ] प्रजा उत्पत्तीस भूयकोहळ्याचे रसांत किंवा चूर्णात, [१४] प्राणसंकटास आवळकठीचें चूर्ण व मध यांत. [ १५ ] त्रिकटू व तूप यातून घेतलें असतां क्षय, अग्निमांद्य, श्वास, खोकला, आणि अरुचि यांचा नाश करितें. आणि ओजधातूला वाढवितें व बल देतें. [ १६ ] पांडुरोगास गाईचे दुधांत. [ १७ ] संग्रहणीस ताकात. [ १८ ] वांतीस साखर किंवा द्राक्षाचे रसांत. [ १९ ] सर्व प्रकारचे प्रमेहांस आंवळकठीचे चूर्ण अथवा हळदीचें चूर्ण किंवा त्रिफळ्याचे काढ्यांत. [ २० ] रक्तपित्तास आडूळशाचे काढ्यांत. [ २१ ] क्षीणतेस साखरेंत. [२२] रक्तविकारास हळदीचे चूर्णात. [ २३ ] प्रदरास तांदुळाचें धुवण व मध यांत. [ २४ ] रेच होण्यास त्रिफळ्याचे काढ्यांत [ २५ ] अपस्मारास मध अथवा गाईचें दूध यांत. [ २६ ] शूळास तुपांत. [ २७ ] ज्वरास मध व पिपळीत. [२८] पुष्टीस दूध, तूप व साखर यांत. [ २९ ] अग्निमांद्यास आल्याचा रस व मध यांत. [ ३० ] **अरुचीस आल्याचा रस व मध किंवा डाळिंबाच्या रसांत.** [ ३१ ] पि-

त्तास खडीसाखरेंत. [ ३२ ] वायूस आल्याचा रस, तुळशीचा रस व मध यांत. [ ३३ ] वातव्याधीस लसूण अथवा तूप यांत. [ ३४ ] अतिसारास कुड्याचा रस अथवा शेळीचें दूध यांत. [ ३५ ] कुष्ठास बावंचीचें चूर्णात. [ ३६ ] षंढत्व जाण्यास दूध, साखर बदामाचे गोळे यात. [ ३७ ] मूळव्याधीस लोणी व खडीसाखर यांत. [ ३८ ] कामलेस द्राक्षाचा रस किंवा मनुकांत. [ ३९ ] क्षय, प्रमेह, मूळव्याध, पांडुरोग, कामला, व्रण, आणि उष्णवात यांजवर बाळहिरड्याचे चूर्णात. नित्य सुवर्णभस्म भक्षण केलें असतां जरा व मृत्यु यांचा नाश करितें. व देहाला दृढ करितें. आणि अनुपान योजून दिलें असतां संपूर्ण रोगांचा नाश करितें. हें योगवाही आहे. असें जाणावें [ अनुपान प्रकरण पहा. ]

६३ **केवळ सुवर्णगुण** ( सोन्याचा वर्ख )—[ १ ]सोन्याचा वर्ख एक गुंजपासून दोन गुंजांपर्यंत लोणी व खडीसाखर व मध यांशी सेवन केला असतां क्षयाचा नाश होतो, यांत संशय नाहीं. [ २ ] आम्लपित्तास आवळकठीचे चूर्णात साखरेंत किंवा तूप व दूध यांत. [ ३ ] शूळास सुंठीचें चूर्णात द्यावें. [ ४ ] पुष्टीस धारोष्ण गाईचे दुधात द्यावें. [ ५ ] व्रणास त्रिफळ्याचे काढ्यांत द्यावें. [ ६ ] अग्निमांद्यास आल्याचा रस व मध आणि पिंपळीं यांत द्यावें. [ ७ ] उचकीस तुळशीचा रस किंवा मध यात द्यावें. [ ८ ] आनाह वायूवर एरंडेल अथवा त्रिफळा किंवा आल्याचा रस यांत द्यावें. [ ९ ] नेत्ररोगास त्रिफळ्यांत. [ १० ] सर्व प्रकारचे विषांस मधांत. [ ११ ] सोन्याचा वर्ख कोणतेही रोगावर अनुपान योजून दिला असतां संपूर्ण व्याधींचा नाश करितो. [ अनुपान प्रकरण पहा. ]

६४ **अशुद्धसुवर्णदोष**—कच्चें सुवर्ण भस्म सेवन केलें असतां बल आणि वीर्य याचा नाश करितें. शरीरामध्यें रोगाचे समुदाय उत्पन्न करितें. आणि असुख आणि मरण याना देतें.

**पथ्यापथ्य**—दूध, साखर यानीं युक्त, स्निग्ध व चिकट असें अन्न वलीपलित नाश होण्याकरिता सुवर्णभक्षकाला पथ्यें योजावी. आणि ककार ज्या नांवाच्या पूर्वी आहेत अशी अन्नें, भाज्या आणि मांसें हीं सुवर्णभक्षकानें सोडावी. ह्मणजे कवठ, करवंद, काकडी, काकवी, इत्यादि.

६५ **सुवर्णमाक्षिकभस्म**—एक गुंजेपासून चार गुंजांपर्यंत अनुपान योजून सर्व रोगांवर द्यावें; हें योगवाही आहे असें जाणावें. त्रिफळा, त्रिकटू, मिरीं व तूप ही याची विशेष अनुपानें आहेत. [ १ ] प्रमेहास वंशलोचन व पिठीसाखर यांत किंवा २ गुंजा चंदनी तेल घेऊन थोडी खडीसाखर घालून त्यात घेत जावें. [ २ ] मूळव्याधीस लोणी व खडीसाखर यात सेवन करावें व सुवर्णमाक्षिकभस्म व गेरु तांदुळाचे धुवणांत मिळून गुदद्वारास लेप करावा व रानशेणी गोवऱ्यांचा शेक द्यावा. [ ३ ] क्षयास मध व आडुळशाचे पिकलेल्या पानाचा रस यांत द्यावें. [ ४ ] कु-

श्वास पांढऱ्या पांगाऱ्याचें चूर्ण सहा मासे, बनारसी साखर सहा मासे, व लोणी सहा मासे एकत्र करून त्यात द्यावें. [ ५ ] कफास मधपिंपळींत द्यावें. [ ६ ] पित्तास आंवळ्याचा मुरंबा यांत किंवा आंवळकठीचें चूर्ण खडीसाखर व तूप यांत द्यावें. [ ७ ] मस्तकरोगास गाईचें तूप व खडीसाखर यांत द्यावें. [ ८ ] कंठरोगास तूप व खडीसाखर यांत द्यावें. [ ९ ] पाडुरोगास पुनर्नव्याचे काढ्यांत द्यावें. [ १० ] विषास तांदुळाचें धुवणात द्यावें. [ ११ ] उदररोगास त्रिफळ्यांत द्यावें. [ १२ ] सुजेस निर्गुंडीच्या किंवा पुनर्नव्याचे रसांत द्यावें. आणि त्रिदोष झाला असतां आल्याचा रस, तुळशीचा रस व मध यांत द्यावें. हें योगवाही आहे[ अनुपान प्रकरण पहा. ]

६७ **सोनामुखी**—भुईतरवड म्हणजे सोनामुखी. ती घेण्याचीं अनुपानें. सोनामुखीचें वस्त्रगाळ चूर्ण करून बलाबल पाहून तीन माशांपासून सहा माशांपर्यंत किंवा समयविशेषीं काढा किंवा हिम करून घेत जावें. [ १ ] मधाशीं सेवन केलें असतां इंद्रियें बळकट होतात. [ २ ] पुष्टि, बळ, व पित्त यास खडीसाखरेंत. [ ३ ] दाहास लोण्यांत. [ ४ ] अग्निमांद्यास खजुरांत. [ ५ ] डोळ्यांस तेज येण्यास द्राक्षाचे रसांत. [ ६ ] माक्याचे रसाशीं घेतल्यास वृद्ध पुरुषही तरुण होईल. [ ७ ] वायूनें कळा लागल्यास निर्गुंडीच्या रसाशी. [ ८ ] पोटशूळास निंबूचे रसात. [ ९ ] शैत्यास ओंव्यांत. [१०] अर्धशिशीस पिंपळीचे काढ्यांत. [ ११ ] कामोद्दीपनास लवंगांबरोबर. [ १२ ] शक्ति येण्यांस शेळीचे दुधांत. [ १३ ] सर्पाचें विषास तिळाचे तेलाशीं. [ १४ ] चपलता प्राप्त होण्यास हरणीच्या दुधाशीं. [ १५ ] उरःक्षतास डाळिंबाच्या रसांत. [ १६ ] वीर्यस्तंभनास भुईतरवडाची मुळी मधांत उगाळून लिंगास लेप करावा. [ १७ ] अंगाचे दुर्गंधीस गुळांत. [१८] अंग बळकट होण्यास जायपत्रींत. [ १९ ] दाह झाल्यास ताक व खडीसाखर यांत. [ २० ] गर्भधारणास सराट्याचे रसाशीं किंवा काढ्यांत. [२१]तोत्रेपणा जाऊन वाणी शुद्ध होण्यास गाईच्या दुधाशीं. [ २२ ] पुष्टतेस उटिणीच्या दुधाशीं. [ २३ ) शक्ति येण्यास व पोटदुखीस मधात. [ २४ ] शरीरांतील उष्णता, दाह व सुस्ती यांस साखरेंत. [ २५ ] उष्णतेस गुलकंदाशी. [ २६ ] सर्व तऱ्हेच्या सर्दीस गुळांत. [२७] वीर्यस्तंभन होऊन पुष्टतेस गाईचें तूप व साखर यांत. [२८] भस्मकास उंबराचे सालीच्या चूर्णांत. [ २९ ] शक्ति येऊन धातु विशेष पुष्ट होण्यास मेंढीच्या दुधाशी. [ ३० ] वृद्धपणापावेतों केंश पांढरे न होण्यास माक्याचे रसात [ ३१ ] मस्तकरोगास आवळ्याच्या रसाशीं. [ ३२ ] अजीर्णास आल्याचे रसांत. [ ३३ ] रक्तशुद्धीस डाळिंबाचे रसांत. याप्रमाणें सोनामुखीचीं अनुपानें जाणावीं.

६८ **हरताळभस्म**—हरताळभस्म निर्धूम अग्नीवर टाकलें असतां धूर निघत नाहीं तें भस्म चांगलें जाणावें. आणि धूर निघाल्यास कच्चें आहे असें जाणावें. हें

भस्म एक गुंजेपासून २ गुंजांपर्यंत अनुपानपरत्वें घेत जावें. [ १ ] खडीसाखरेशीं घेतलें असतां ८० प्रकारचे वायु, कफ, पित्त, कुष्ठ, प्रमेह आणि मूळव्याध, यांचा नाश होतो. [ २ ] महाव्याधीस गुळवेलीचे काढ्यांत. [ ३ ] १८ प्रकारचे कुष्ठांस गुळवेलीचे काढ्याशीं द्यावें. [ ४ ] अपस्मारास बचनाग व जिरें याचे चूर्णांत. [५] रक्तविकारास आवेहळदीचे चूर्णात. [ ६ ] जलोदरास समुद्रफळाशीं. [७] भगंदर, फिरंगोपदंश, विसर्प, मंडल, कंडू, खरूज आणि वातरक्तसंबंधी विकार यांस देवडांगरीच्या रसांत. [ ८ ] पांडुरोग, ज्वर व क्षय यांस खडीसाखर यांत [ ९ ] पथ्यास—गाईचें दूध व भात, धुवा साखर, अल्पभोजन, पाणी फार पिऊं नये, तांदुळाचे कण्हेरींत दूध घालून प्यावें. सायंकाळी अळणी खिचडी खावी. पाहिजे असल्यास खडीसाखर खावी. [ १० ] वायु, शूळ व बाळंतरोग यास आल्याचे रसांत द्यावें. पथ्य—तूप व खिचडी अथवा गाईचें दूध. मात्रा घेतल्यावर चार घटिका पाणी पिऊं नये. अशक्त प्रकृतीस तापवून निवालेलें पाणी द्यावें. [ ११ ] अर्धांगवायु व वायगोळा, यांस याच अनुपानात द्यावें. [ १२ ] बलवृद्धीस जायफळांत. [१३] रक्तपित्तास हळदीबरोबर. [ १४ ] क्षयास विड्यात. [ १५ ] वीर्यवृद्धीस विड्याचे पिकलेल्या पानांत. [ १६ ] ऊर्ध्वश्वासास हिरडेदळांत. [ १७ ] सूस्तीस सुंठीबरोबर. [ १८ ] दुर्गंधीस चांफ्याचे फुलाबरोबर अथवा सुगंधी पदार्थाबरोबर. [ १९ ] वायूस आल्याचे रसांत. [ २० ] प्रमेहास तुळशीचे रसांत. [ २१ ] जलोदरावर शेळीचे मुताशीं. [ २२ ] शैत्यास केशर व जायपत्रीबरोबर. [ २३ ] अग्निमांद्यास मध पिंपळींत. [ २४ ] कासक्षयावर खडीसाखरेंत. [ २५ ] धातुस्तंभनास लवंगा, दालचिनी व कापूर यांत, उतार निंबू [२६] अष्टादशकुष्ठांस निर्गुडीचे रसांत.[२७] कामवृद्धीस गाईचें दूध व खडीसाखरेंत द्यावें

६९ **हिंगूळ**—शुद्ध हिंगूळ एक गुंजेपासून दोन गुंजांपर्यंत अनुपान योजून द्यावा. [ १ ] बाळंतरोगास गोमूत्रात. [ २ ] पुष्टीस मध व तूप यांत. [ ३ ]घाम फार येत असल्यास साखरेंत. [ ४ ] क्षयावर दोन गुंजा जायपत्री, दोन गुंजा केशर आणि ४ मासे साखर यांत द्यावें. सर्व रोगांस आपले युक्तीनें अनुपान योजून द्यावें. ( अनुपान प्रकरण पहा. )

७० **हिराकस**—हिराकस अति प्रशस्त आहे. हिराकसाचें भस्म उष्ण आहे. याचें भस्म एक वालपर्यंत देत जावें. ( १ ) नेत्ररोगावर तूप व साखरेंत. (२) विषावर तांदुळजाचा रस व तांदुळाचे धुवणांत. ( ३ ) वायूवर आंवळ्याचा रस व मध यांत. ( ४ ) कफावर बेहडेदळ व पिंपळीचे चूर्णांत. ( ५ ) पांढरे कोडावर खैराच्या सालीचे काढ्यांत. ( ६ ) मूत्रकृच्छ्र व मूतखडा यांस रानतुळशीचे बीजाचे काढ्यांत. ( ७ ) पांडुरोग, क्षय, गुल्म, प्लीहा,शूळ आणि संपूर्ण मूत्ररोग यांस हिराकस भस्म, त्रिफळा व मिरी हीं एकत्र करून तें चूर्ण सुमारें ३ किंवा ४ मासे तूप व मध यांत एक महिना द्यावें.

७१ हिरेभस्म—हें एक गुंजेपर्यंत द्यावें. ( १ ) कुष्ठास खैराचे सालीच्या काढ्यांत. ( २ ) सर्व प्रकारचे वातव्याधी व महारोग यांवर आंवळ्याचा रस आणि मध यांत. ( ३ ) खोकला, कफ व दमा यांस अडूळशाचे पिकलेल्या पानाचा रस, मिरीं, दालचिनी व पिपळी यांजबरोबर. (४) पित्त व दाह यांजवर खडीसाखरेंत. (५) सर्व प्रकारचे ज्वरांवर गुळवेल, किराईत, यांच्या काढ्यांत. ( ६ ) संपूर्ण रोगांवर आपले युक्तीनें अनुपान योजून द्यावें. हें योगवाही आहे म्हणून सर्व रोगांवर योजावें. [ अनुपान प्रकरण पहा. ]

---

## गुणदोषवर्ग.

**वातकर वर्ग**—आगस्त्याचें फूल, गव्हाची खीर, साव्याचा भात, लाखाचें वरण, मुगाचे वडे, टरकाकडी, पांढरा घेवडा, जांबूळ, दोडकी, चवळ्या, पांढऱ्या तुरी, पावटे, कडवे वाल, मटक्या, मूग, राळे, लाख, वाटाणे, सावे, हरबरे, तळ्याचें पाणी, नद्यांचें पाणी, पेरू, बकूळ, म्हशीचें लोणी; वऱ्या, मोठीं वांगीं, शिंगाडे, सिताफळ, ऊंस, पुरणपोळी, तोंडलीं, मटक्या, व मसुरा हे पदार्थ वाताला उत्पन्न करणारे आहेत.

**वातघ्न वर्ग**—अक्रोड, आमसूल, पांढरें आळु, आळुबुखार, आफू, आहाळीव, आलें, आवईच्या शेंगा, ताकाची कढी, करंज्या, कुळीथ, खाज्या, नारळाची खीर, गव्हाचें खिवर, चिरोटे, तांदळाचे पापड, मसालेदार चण्याच्या पाटवड्या, गव्हाची पोळी, वेळलेला भात, साधा भात, हरकाचा भात, साखरभात, मोहोन भोग, गव्हाची रोटी, बुंदीचे लाडु, उडदाच्या दाळीचें वरण, उडदाचे वडे, शेवया, पांढरा उंस, काळा उंस, ओंव्या, आंजीर, करटोली, पिकलेलें कवठ, तांबडा व पांढरा कांदा, म्हसीकेळें, काजू, कोबी, गांजर, खरबूज, सातपुती, घोसाळीं, चिंच, चुका, जवस, तांबड्या तुरीचें वरण, आळु, कारलें, बाजरी, लसूण, घारगे, करडी, खसखस, नवा गूळ, गाईचें तूप, म्हशीचें तूप, घोळ, फुटाणे, मूग, उडीद, नागवेल, नारिंग, लिंबू, ऊन पाणी, पिस्ते, गाईचें दूध व म्हशीचें दहीं, हे पदार्थ वाताचा नाश करणारे आहेत.

**पित्तकर वर्ग**—अगस्त्याच्या शेंगा, ताकाची कढी, मोड आलेलें धान्य, उडदाचें वरण, उडदाचे वडे, मोठी एलची, हिरवें कवठ, करडईची भाजी, तांबडा कांदा, गाजर, नवा गूळ, घोळू, चुका, टरबूज, तांबूल, तीळ, तिळाचें तेल, दोडकी, उडीद, कुळीथ, चवळ्या, पांढऱ्या तुरी, बाजरी, नारिंग, मीठ, मोठीं वांगी, गोडा सूरण, हिंग, दूषित नाल्याचें पाणी, एरंडतेल, जून मुळा, पिस्ते, लसूण, भांग, हे पदार्थ पित्ताला उत्पन्न करितात.

**पित्तघ्नवर्ग**—तांबड्या जुन्या साळी, अन्याचें पाणी, पोकळा, नद्यांचें पाणी, तापून निवालेलें पाणी, ताजें पाणी, बेदाणा, मसुरा, मूग, लाख, वाटाणे, यव, हरबरे; नारळ, मोहाचा नारळ, निंबू, तळ्याचें पाणी, खोल आडाचें पाणी, माठाची भाजी, मुसळी, मुरंबा, रामफळ, राजगिरा, अगस्त्याचें पुष्प, अननस, अमसूल, आबईच्या शेंगा, इरसाल आंबा, करंज्या, गव्हाची खीर, गव्हाचे घिवर, चिरोटे, चण्याच्या पाटवड्या, जुन्या गव्हाची पोळी, मोहोनभोग, बुंदीचे लाडू, चुरम्याचे लाडू; साळीच्या लाह्या, वाटाण्याचें वरण, शेवया, पांढरा व काळा ऊंस, ओंव्या, सफेतमुसळी, भुईकोहळा, गोडंबी, ब्राह्मी, दोडकी, तापवून निवालेलें पाणी, अंजीर, टरकाकडी, काकवी, केळफूल, केळें, ह्मशी केळें, कोबी, खर्बुज, खिरण्या, गोवारीच्या शेंगा, सातपुतीघोसाळीं, चाकवत, चारोळ्या, जवस, जांभूळ, तवकीर, तांदुळजा, तोंडलीं, ह्मशीचें दहीं, द्राक्षें, काळीं द्राक्षें, दुधा भोंपळा, ह्मशीचें दूध, दुधाची मलई, धणे, हरीक, जुने गहूं, तुरी, नाचण्या, मटक्या, अक्रोड, अमसूल, पक्कें उंबर, ऊंस घारगे, करटोलीं, करवंदें, पांढरा कांदा, कारली, तालीमखाना, गाईचें तूप, ह्मशीचें तूप, मनुका, तांबड्या तुरी, शिंगाडे, ह्मशीचें लोणी, सिताफळ, गाईचें दूध व लोणी, थंड पाणी, कबाबचिनी, लवंगा, सालंमिश्री व खडीसाखर, हे पदार्थ पित्ताचा नाश करितात.

**कफकरवर्ग**—अक्रोड, अळू, पाडाचा आंबा, इरसाल आंबा, दुधाची खीर, गव्हाची खीर, गव्हाचे घिवर, तांदुळाचे पिठाचे पदार्थ, उडदाचे पापड, चण्याच्या पाटवड्या, गव्हाची पोळी, साखरभात, मोहोनभोग, गव्हाची रोटी, चुरम्याचा लाडू, वडे, उडदाचें वरण, मुगाचें वरण, सिताफळ, पांढरा ऊंस, ओंव्या, टरकांकडी, काकवी, खसखस, दोडकी, तिळाचें तेल, ह्मशीचें दही, एरंडेल, तांबडा भोंपळा, गाईचें दूध, खडीसाखर, धणे, पांढरा कांदा, कांजी, केळें, गोवारीच्या शेंगा, पांढरा घेवडा; घोसाळी, ह्मशीचें ताक, तीळ, तूप, दुध्या भोंपळा, दूध, ह्मशीचें दूध, दुधाची मलई, दोडके, गहूं, चवळ्या, शाळू, कडवे वाल, नारळ, मोहाचा नारळ, नारिंग, पोहे; बोरें, भोंपळा, माठ, राजगिरा, रामफळ, मीठ, लोणी, मोठीं वांगीं, शिंगाडे, पिठीसाखर, अळु बुखार, उंबर, ऊंस, मोहनभोग, काकवी, कोहळा, आबईच्या शेंगा, ह्मशीचें तूप, भुईकोहळा, सफेतमुसळी, बदाम, गिलकी व थंड पाणी, हे पदार्थ कफाला उत्पन्न करितात.

**कफघ्नवर्ग**—मुळ्याच्या शेंगा, सफेतमुसळी, मेथीची भाजी, अगस्त्याचें फूल, व शेंगा, अमसूल, भांग, पांढरें अळू, अफू, आलें, ताकाची कढी, कुळीथ, तांदुळाचे पापड, वेळलेला भात, साधा भात, लवंगा, भाजक्या तांदुळाचा भात, हरकाचा भात, मुगाचा यूष, रोडगे, दोडकी, बुंदीचे लाडू, साळीच्या लाह्या, तुरीचें वरण, वाटाण्याचें वरण, एलची, करटोली, पक्कें कवठ, करडईची भाजी, कारलें, तांबडा कांदा, काजू, केळफूल, सोनकेळें, कोबी, कोंवळा मुळा, गांजर, खजूर, खर्बूज, खिरण्या, चिंच, चुका, जवस; जांभूळ, पिकलेलें टरबूज, तवकीर, हिंग, तांबूल, तांदुळजा, शेळीचें तूप,

काळीं द्राक्षें, हरीक, जुने गहूं, मटक्या, महाळुंग, मसुरा, मूग, राळे, लाख, वाटाणे, यव, सावें, हरवरें, नारळाचें दूध, निंबू, साखरनिंबू, पडवळ, अडाचें पाणी. तळ्याचें पाणी, खोल अडाचें पाणी, लसूण, झऱ्याचें पाणी, नद्यांचें पाणी, पुदीना, टाकळा, फणस, फुटाणे, कोंवळा मुळा, अफू, वेळलेला भात, सोजी करडई, कारलें, नवा गूळ, गाईचें ताजें लोणी, गाईचें तूप, शेळीचें तूप, घोळ, चुका, जांभूळ, जायफळ, तवकीर, ताक, गोडा सुरण, सावे, नागवेल, उष्णोदक, पिस्ते, व ब्राह्मी, हे पदार्थ कफाचा नाश करितात.

**शुक्रकरवर्ग**—भुईकोहळा, अक्रोड, बदाम, पिस्ते, बाठाळलेला आंबा, पाडाचा आंबा, अळवड्या, उंडऱ्या, गव्हाची खीर, तांबड्या साळी, चिरोटे, चण्याच्या पाटवड्या, साधा भात, चुरम्याचे लाडू, मुगाची उसळ, मुगाचें वरण, केळें, नवागूळ, चाकवत, गाईचें तूप, एरंडेल, ह्मशीचें दहीं; दूध, ह्मशीचें दूध, दुधाची मलई, उडीद, काळे मूग, पेरू, फुटाणे, सफेतमुसळी, पांढरें रताळूं, थंड पाणी, लसूण, लोणी गाईचें लोणी, शिंगाडे, पिठीसाखर, राब, अफू, ऊंस, घृतयुक्त खिचडी, उडदाचें वरण, मोहोनभोग, अळू, घारगे, बुंदीचे लाडू, जिलबी, करंज्या, गुळाची पोळी, अनारसे, मोदक, कानवले, पिकलेलें कवठ, हे पदार्थ शुक्राला उत्पन्न करणारे आहेत.

**शुक्रघ्नवर्ग**—गाजर, जवस, टरबूज, कुळिथ, पावटे, बाजरी, मेथी, मेथीची भाजी, ताक, गांज्या, माजूम, याकुती, मोठी घोळ, करडई, कांकडी, कारलीं, बोळ, धणे, रक्त्याबोळ, कात, कडू निंब व गांजराचें बीज, हे पदार्थ तत्काळ शुक्रधातूचा नाश करितात.

**धातुवृद्धिकरवर्ग**—भुईकोहळा, आलुबुखार, इरसाल आंबा, करंज्या, खाज्या, घृतयुक्त खिचडी, दुधाची खीर, गव्हाचे घिवर, जिलबी, तांदुळाचे पापड, बासुंदी, पेढे, बर्फी, गव्हाची पोळी, खापरपोळी, साखरीभात, मोहोनभोग, रोडगे, गव्हाची रोटी, बुंदीचे लाडू, सोलीव उडदाचें वरण, काळा ऊंस, पक्के कवठ, काकवी, पांढरा कांदा, भाजलेले काजू, खजूर, खैराचा व बाभळीचा डिंक, तवकीर, तूप, शुद्धतिळाचें तेल, डाळिंब, दुध्या भोपळा, ह्मशीचें दूध, पिस्ते, दुधाची मलई, गहूं, राळे, यव, साळी, साखरनिंबूं, फणस, बदाम, सालंमिश्री; ताबडें रताळूं, सैंधव, लोणी, गाईचें लोणी, ह्मशीचें लोणी, मोठी वांगीं, शिंगाडें, खडीसाखर, चांदवेल, अक्रोड, नारळाची खीर, गुळाची पोळी, चिरोटे, कोहळा व सफेतमुसळी, हे पदार्थ सप्तधातूला उत्पन्न करणारे आहेत.

**कामोद्दीपकवर्ग**—आळवड्या, शुद्ध केलेली अफू, आलें, आंवळे, इरसाल आंबा; अनारसे, करंज्या, खाज्या, शिंगाडे, घृतयुक्त खिचडी, नारळाची खीर, घारगे, गव्हाचे घिवर, चिरोटे, जिलबी, तांदुळाचे पापड, बासुंदी, पेढे, बर्फी, खापरपोळी, साधा भात, मांडे, मोहोनभोग, खडीसाखर, भुईकोहळा, सफेतमुसळी, गोडंबी, पिस्ते, लवंगा, सालंमिश्री, गाईचें ताजें लोणी, ह्मशीचें लोणी, जोंधळे, बुंदीचे लाडू,

उडदाचे दाळीचें वरण, पांढरा ऊंस, काळा ऊंस, ह्मशीचें दूध, पांढरा व तांबडा कांदा, गहूं, केळें, सोनकेळें, कोबी, खजूर, खरबूज नवा गूळ, घोसाळी, चारोळ्या, नागवेल, तांबूल, ह्मशीचें दहीं, द्राक्षें, काळी द्राक्षें, उडीद, खपले गहूं, चवळया, जोंधळे, पिठीसाखर, शाळू, राळे, वाटाणे, नारळ, नारळाचें दूध, मोहाचा नारळ, साखरनिंबूं, थंड पाणी, पडवळ, परवेंर, पेरू, फणस, वेदाणा, भेंडया, कुहिरीचे बियांचा मगज, बदाम, खसखस, गाईचें तूप, शेळीचें तूप, लसूण, गिलकी, जायफळ, तवकीर, तांबूल, तिळाचें तेल, एरंडतेल व मनुका हे पदार्थ कामोद्दीपक आहेत.

**पौष्टिकवर्ग**—भुईकोहळा, पाडाचा आंबा, इरसाल आंबा, उंडऱ्या, नारळाची खीर, घारगे, गव्हाचे घिवर, चण्याच्या पाटवड्या, बासुंदी, पेढे, बर्फी, गव्हाची पोळी, साखरभात, थंड पाणी, मांडे, रोडगे, गव्हाची रोटी, उडदाचे वडे, मुगाचे वडे, पांढरा ऊंस, खजूर, गाईचें दूध, खरबूज, जुना गूळ, टरबूज, तवकीर, तूप, गाईचें दहीं दुध्या भोपळा, गहूं, ह्मशीचें दूध, उडीद, शाळू, पावटे, मसुरा, काळे मूग, वाटाणे, तांबड्या साळी, नारळ, मोहाचा नारळ, साखरनिंबूं, फणस, बदाम, मुरंबा, बटाटे, तांबडें रताळें, गाईचें लोणी, सिताफळ, कुहिरीचे बियांचा मगज, ऊंस, नारळाची खीर, कडबुळी, जिलबी, कोहळा, गोडंबी, महाळुंग, सफेतमुसळी व सालंमिश्री, हे पदार्थ पुष्टिकारक आहेत असें जाणावें.

**बलकरवर्ग**—दोडकी, अक्रोड, अळू, शुद्ध अफू, बाठाळलेला आंबा, पाडाचा आंबा, इरसाल आंबा, अळवड्या, उंडऱ्या, दुधाची खीर, गव्हाची खीर, घारगे, गव्हाचे घिवर, चिरोटे, नागवेलीची पानें, जिलबी, तांदुळाचे पापड, उडदाचे पापड, चण्याच्या पाटवड्या, बासुंदी, पेढे, बर्फी, नाचण्या, गव्हाची पोळी, साळीचा भात, मांडे, मोहोनभोग, रोडगे, गव्हाची रोटी, सफेतमुसळी, साळीच्या लाह्या, उडदाचें वरण, मुगाचे वडे, शेवया, काळा ऊंस. ओंब्या, पांढरा व लाल कांदा, पिस्ते, केळें, सोनकेळें, खजूर, खर्बुज, घोसाळी, चाकवत, जवस, टर्बूज, थंड पाणी, खैराचा डिंक, तवकीर, तीळ, तूप, तिळाचें तेल, करडईचें तेल, गाईचें व ह्मशीचें दही, बदाम, दाळिंब, दूध, दुधाची मलई, उडीद, गहूं, जोंधळे, शाळू, तुरी, पावटे, बाजरी, मसुरा, साळी, तांबड्या साळी, नारळाचें दूध, भुईकोहळा, मोहाचा नारळ, सरोवराचें पाणी, पोकळा, फणस, फुटाणे, कोंवळा मुळा, मुरंबा, गाईचें दूध, मेथीची भाजी, तांबडें रताळू, लोणी, ह्मशीचें लोणी, पिठीसाखर, खडीसाखर, सिताफळ, अफू, दुधाची खीर, कडबुळी, घारगे, कोहळा, तालीमखाना, आबईच्या शेंगा, खसखस, गाईचे तूप, शेळीचे व ह्मशीचे तूप, गिलकी, चाकवत, चंदनबटवा, तवकीर, ताक, एरंडेल, पावटे, तांबड्यातुरी, महाळुंग, लसून व शेळीचें लोणी. हे पदार्थ बलकारक आहेत.

**गुरुवर्ग**—आक्रोड, आननस, आळू, इरसाल आंबा, उंडऱ्या, करंज्या, खाज्या, घृतयुक्त खिचडी, नारळाची व गव्हाची खीर, घारगे, गव्हाचे घिवर, चिरोटे, जोंधळ्याच्या कण्या, तांदळाच्या पिठाचे पदार्थ, उडदाचे पापड, चण्याच्या

पाटवड्या, गव्हाची पोळी, खापरपोळी, साधा भात, माहोनभोग, मोड आलेलें धान्य, दोडकी, चुरम्याचे लाडू, उडदाचें वरण, मुगाचे वडे, शेवया, अंजीर, ऊंस, पक्कें कवठ, करडईची भाजी, टरकाकडी, काकवी, पांढरा व तांबडा कांदा, कालें, एरंडतेल, केळफूल, केळें, सोनकेळें, खजूर, गोवारीच्या शेंगा, नवा गूळ, घोसाळीं, जवस, टरबूज, ह्मशीचें ताक, तीळ, तूप, करडईचें तेल, तांबडा भोपळा, तोंडलें, ह्मशीचें दही, द्राक्षें, काळी द्राक्षें, दुध्या भोपळा, ह्मशीचें दूध, उडीद, राळे, हरीक, गहूं, चवळ्या, शाळू, पांढऱ्या तुरी, पावटे, कडवे वाल, लाख, यव, नारळ, साखरनिंबूं, पुदीना, पेरु, पपया, पोहे, बकूळ, शेरणी, भोपळा, माठ, मुसळी, मुरंबा, राजगिरा, रताळूं, मीठ, घोळ, ह्मशीचें लोणी, मोठीं वांगीं, चांदवेल, अळुबुखार, उंबर, दुधाची खीर, आवईच्या शेंगा, नारळाची खीर, कडबुळीं, गुळाची पोळी, ह्मशीचें तूप, मोदक, कावाले, करडी, कोहळा, तालीमखाना, खसखस, खजूर, गाईचें तूप, तिळाचें तेल, मनुका, खिरण्या, पिस्ते, भुईकोहळा, सफेत मुसळी, लसूण, शिंगाडे, सालमिश्री, गाईचें दूध, व ह्मशीचें दूध, हे सर्व पदार्थ गुरु ह्मणजे जड आहेत असें जाणावें.

**लघुवर्ग**—कबाबचिनी, अगस्त्याच्या शेंगा, आलें, आंब्याची पोळी, ताकाची कढी, तांदुळाचे पापड, मुगाचे पापड, तांबड्या साळी, तांदुळाची कण्हेरी, वेळलेला भात, भाजक्या तांदुळाचा भात, मांडे, रोडगे, ब्राह्मी, धणे, बुंदीचे लाडू, साळीच्या लाह्या, मुगाचें वरण, ओंब्या, कवठ, काकडी, काजू, कोबी, नाचण्या, जुना गूळ, चाकवत, चुका, तवकीर, तांदुळजा, डाळिंब, धणे, कुळीथ, मटक्या, मसुरा, नागवेल, काळे मूग, वाटाणे, सावे, साळी, निंबूं, पडवळ, परवरें, आडाचें पाणी, सरोवराचें पाणी, तांदुळजा, नद्यांचें पाणी, फुटाणे, बोरें, मेथीची भाजी, लोणी, कोंवळीं वांगीं, थंड पाणी, तवकीर, खडीसाखर, गोडा सुरण, आमसूल, वेळलेला भात, सोजी, कोंवळा मुळा, ताक, पुरणाची पोळी, करटोली, काकडी, कारलीं, चाकवत, चुका, जायफळ, भाग, लवंगा, हिंग, शेळीचें दूध, शेळीचें दहीं, व शेळीचें लोणी, हे पदार्थ लघु ह्मणजे हलके असून सहज पचन होणारे असे आहेत.

**मलस्तंभकवर्ग**—आक्रोड, आळूं, इरसाल आंबा, दुधाची खीर, टर्बूज, तिळाचें तेल, करडईचें तेल, तोंडलीं, तळ्याचें पाणी, पुदीना, मेथीची भाजी, राजगिरा, शेरणी, गोडा सुरण, शिंगाडे, खसखस, अफू, अजमोदा, आवईच्या शेंगा, आळूबुखार, दुधाची खीर, मोदक, कानोले, तालीमखाना, जांभूळ, नारळ, निंबू व हिंग, हे पदार्थ मलाचा स्तंभ करणारे असे आहेत.

**रुक्षवर्ग**—आमसूल, आळूं, आलें, भाजक्या नवे तांदुळांचा भात, सावे, बुंदीचे लाडू, साळीच्या लाह्या, तुरीचें वरण, वाटाण्याचें वरण, एलची, कच्चें कवठ, करडईची भाजी, गाजर, गोवारीच्या शेंगा, नागवेल, चिंच, जांभूळ, तांदुळजा, तिळाचें तेल, दुध्या भोपळा, कुळीथ, हारीक, चवळ्या, पावटे, बाजरी, मटक्या, तेल,

लाख, वाटाणे, यव, हरबरें, नद्याचें पाणी, माठ, मेथीची भाजी, भुईकोहळा, वऱ्या, गोडा सूरण, अगस्त्याच्या शेंगा, करडईची भाजी, कोहळा, घोळ, ताक, तांदुळजा, मसुरा व कबाबचिनी, हे पदार्थ रुक्ष आहेत असें जाणावें.

**अग्निदीपकवर्ग**—परवरें, आमसूल, आळू, आलें, निंबू, इरसाल आंबा, आळवडच्या, ताकाची कढी, कुळीथ, तांदुळाची कण्हेरी, लवंगा, ब्राह्मी, करटोलीं, करडइची भाजी, काकडी, तांबडा कांदा, केळफूल, सोनकेळें, कोबी, गांजर, लसूण, नागवेल, गोवारीच्या शेंगा, नवा गूळ, काळा घेवडा, चाकवत, गोडा चुका, गाईचें ताक, तांबूल, तांदुळजा, शेवगा, एरंडतेल, तीळ, तूप, तिळाचें तेल, दोडकी, बाजरी, यव, साळी, तांबडच्या साळी, मोहाचा नारळ, भांग, आडाचें पाणी, अऱ्याचें पाणी, नद्याचें पाणी, सैंधव, मीठ, लोणी, शेरणी, हिंग, महाळुंग, गूळ, मध, काकवी, पांढरा कांदा, काकडी, कारलीं, दोडकी, कोंवळा मुळा, गाईचें तूप, घोळू, चाकवत, चुका व ताक, हे पदार्थ अग्नीला प्रदीप्त करणारे असे आहेत.

**सारकवर्ग**—सैंधव, मेंढीचें लोणी, साखर, अगस्त्याच्या शेंगा, आलें, आंब्याची पोळी, उष्णोदक, आंवळे, घोळ, ऊंस, करज्या, गव्हाची पोळी, नारळ, पोहे, करडइची भाजी, कोहळा, नवा गूळ, गिलकी, चाकवत, चुका, तांदुळजा, तिळाचें तेल, एरंडतेल, मनुका, पावटे, कुळीथ, नागवेल, खिरण्या, पिस्ते, ब्राह्मी, कोंवळा मुळा, लसूण, शेवगा, पिठीसाखर, खडीसाखर, व हिंग, हे पदार्थ सारक ह्म० शौच्यास साफ करणोर असे आहेत.

**वीर्यस्तंभकवर्ग**—आफू, धोत्र्याचें बीज, सर्व मादक पदार्थ, जायफळ, भांग, अटीव दूध, व खसखस हे पदार्थ वीर्याचा स्तंभ करितात.

**बुद्धिप्रद**—अगस्त्याच्या शेंगा, वेखंड, गाईचें तूप, तांबूल, तिळाचें तेल गोड डाळिंब, थंड पाणी, गोमूत्र, ब्राह्मी, अक्कलकाला, व गाईचें दूध, हे पदार्थ बुद्धि देणोर असे आहेत.

**बुद्धिनाशक**—तोंडलीं, पानाच्या शिरा, शिळें अन्न, व कदान्न, हे पदार्थ तात्काळ बुद्धीचा नाश करणोरे असे आहेत.

**त्रिदोषघ्नवर्ग**—अगस्त्याच्या शेंगा, अफू, आंवळे, बुंदीचे लाडू, करटोली, कवठ, करवंद, गाईचें तूप, चाकवत, चंदनबटवा, ताक, तांदुळजा, डाळिंब, धणे, तांबडच्या साळी, जोंधळे, नाचण्या, निंबू, परवरें, पडवळ, उन पाणी, खिरण्या, पिस्ते, कोंवळा मूळा, शिंगाडे, शेळीचें दहीं, व दोडकी, हे पदार्थ त्रिदोष नाशक असे आहेत.

**रेचकवर्ग**—बाहावा, कपिला, कुटकी, कंकोळ, काळा बोळ, कडू वृंदावन, दंती, तेड, रेवाचिनी, सोनामुखी, जेपाळ, हिरडे, गोमूत्र, निशोत्तर, एरंडेल, काटे

धोत्र्याचें मूळ, निवडुंगाचें दूध, त्रिफळा, पादेलोण, सैंधव, गुलाबकळी, हे पदार्थ रेचक करणारे असे आहेत.

**वामकवर्ग**—गेळफळ, कडू दुध्या भोपळा, कडू निंब, कडू तोंडलीं, वेखंड, सैंधव, कडू वृंदावन, कडू काकडी, कुडा व देवडांगरी हे पदार्थ वांति करणारे असे आहेत.

**योगवाहीवर्ग**—मध, पाणी, तेल, तूप, पारा, शिलाजीत, बचनाग, सुवर्णमाक्षिकभस्म व हिरेभस्म, हे पदार्थ योगवाही आहेत असें जाणावें.

---

## पोतविधि.

पोत घेण्याचा असा प्रकार आहे कीं, एक हळकुंड पेटवून गुडघ्यांचे डोळ्यांपासून चार अंगुळांवर डाग द्यावा. नंतर त्या डागावर लोणी लावून त्याजवर हळदीची गोळी बसवावी आणि दहाघडीवस्त्र त्याजवर घालावें. आणि दुसरे फडक्यानें बांधावें आणि त्या घडीचे आंत कसलें तरी मऊ पान बांधावें म्हणजे तो डाग वाहूं लागतो. याप्रमाणें सहा तीन किंवा दोन महिने तो डाग वाहूं द्यावा. गुण आला ह्मणजे सोडून टाकावें. पोत घेतल्यावर इच्छेस येईल तो पदार्थ भक्षण करावा. व जितके वावडे पदार्थ आहेत, तितके खावे अंतीं रेच द्यावें. पोत पुरुषाच्या बाहूला व पायाला द्यावा. आणि स्त्रियांना पायाचे नळीचे पोटरीवर द्यावा, रोगी सशक्त असो किंवा अशक्त असो त्यानें विचारानें पोत घ्यावा. ह्मणजे आरोग्यसिद्धि होते. अग्निमांद्य, अजीर्ण, वायुरोग, गलग्रह, पोटाची फुगवटी, बाहु, कंबर पाय यांचा वातरोग नाशनार्थ पायावर पोत द्यावा. व कान, नेत्ररोग, आख, नाक, तोंड यांचे व्याधीवर हात व मान यांस पोत द्यावा.

---

## पारा वगैरे रसायन उतरणें[1].

**उपाय १ ला**—गाईचें तूप१तोळा, मधाचें मेण१तोळा, खड्याचा हिंगूळ ॥ तोळा, वावडिंग ।· तोळा, व ओंवा । तोळा हे पदार्थ घेऊन प्रथम तूप ऊन करून त्यांत मेण टाकावें. खालीं उतरून बाकीचे जिनसांचें वस्त्रगाळ चूर्ण करून त्यांत

---

१—रसायन ह्मणजे पारा वगैरे जर मारून चांगलें भस्म केलें नाहीं व तें कच्चें भस्म राहिल्यास त्यापासून तें रसायन अंगात मुरून त्यापासून नानाप्रकारचे विकार उत्पन्न होतात. ते नाहींसे करण्याचे प्रयोग. पारा न मारतां नुस्ता कच्चा भक्षण केला तर त्यापासून विकार होत नाहीं कारण तो पोटांत ठरत नाहीं, असें जाणावें.

टाकावें. नंतर तें मिश्रण सहा बोटें लांब व चार बोटें रुंद अशा पांढऱ्या स्वच्छ, बारीक वस्त्राचे ७ तुकडे तयार करून त्यांजवर लावून त्याच्या वाती कराव्या. आणि दररोज एका पंतींत थोडेंसें तूप घालून ती वात पेटवून त्याची धुरी रोग्यास द्यावी. याप्रमाणें ७ दिवस केलें असतां त्या रोग्याचें तोंड वाहूं लागतें. या योगानें सर्व प्रकारचे पारदविकार, रक्तदोष, उपदंशजन्यरोग, चांदी, ( चट्टे ) गंभीर व्रण, ( नाडीव्रण, नासरूं, ) भगंदर, जुनाट, बहुत दिवसांचें नासरु व रक्तविकारापासून अंगाला आलेली मेहरी ह्मणजे चिमटा घेतला असतां न समजणें हे रोग हटकून बरे होतात. आठवे दिवशी तुरीच्या घुगऱ्यांची वाफ द्यावी. आणि घाम येऊन गेल्यावर थोड्याशा घुगऱ्या खाव्या. फार अशक्त रोगी असल्यास हें औषध देऊं नये.

**उपाय २ रा**—मातीचें एक चांगलें निरडलेलें मडकें घेऊन त्यांत नागवेलीचे पानाचा रस, माक्याचा रस, , तुळशीचा रस आणि मेंढीचें दूध, हीं प्रत्येक अर्धा अर्धा शेर घेऊन एकत्र करून प्रहर दिवस आला ह्मणजे उन्हांत बसून तें मिश्र केलेलें औषध अंगास लावून सर्व जिरवावें ह्मणजे सर्वांगामध्यें असलेला पारा गळून पडतो. आणि शरीर निर्दोष होतें. याप्रमाणें तीन, पांच किंवा सात दिवस दररोज अंगाला लावून नंतर सोसेल त्या पाण्यानें स्नान करीत जावें.

**उपाय ३ रा**—पारठ्या ह्मशीचें शेण मडक्यांत घालावें व तें मडकें चुलीवर ठेवून खालीं रानशेणीचा अग्नि लावावा. पुढें शिजलें ह्मणजे त्याचा रस गाळून काढावा. त्यासमान गाईचें लोणी एकत्र मिळवून सर्व अंगास मर्दन करून थोडा वेळ उन्हांत बसावें. नंतर स्नान करावें. याप्रमाणें पांच चार दिवस केलें असतां अंगांतील पारा मूत्रमार्गानें निघून जातो.

**उपाय ४ था**—काळी मिरीं पाण्यांत घालावीं, भिजलीं ह्मणजे पाण्यासुद्धां घुसळावीं, जो फेंस निघेल तो सांधोसांधीं मर्दन करीत जावा.

**उपाय ५ वा**—बिबवे दुफोड केलेले आछेर व हरबरे आडीच शेर एकत्र पाणी घालून उकडावे व नित्य तुपाबरोबर पावशेर खात जावे. व ऊन पाणी पीत जावें. म्हणजे पाण्याच्या योगानें अंगांतील तिडका शमतील.

---

## क्षार काढण्याची रीति.

ज्या झाडाचा क्षार काढावयाचा असेल त्याचीं लांकडें आणून वाळवून जाळून त्याची राख करून मडक्यांत घालून त्या राखेचें चौपट पाणी मडक्यांत घालून दोन्ही एक जागीं कालवून सारी रात्र तें मडकें तसेंच ठेवावें. आणि प्रातःकाळी वरची निवळी काढून तें पाणी लोखंडी कढईत घालून त्या कढईखाली जाळ लावून सारें

पाणी आटल्यावर कढईचे बुडास पांढरा सफेत चूर्णासारखा खार लागून राहतो तो काढून घ्यावा. याप्रमाणें एक चूर्णासारखा व दुसरा पातळ असे क्षाराचे दोन प्रकार आहेत.

---

## तेलें काढण्याचा प्रकार.

जितकीं ह्मणून तेलें काढणें असतील तितकीं पाताळयंत्रांनें काढावीं. पाताळयंत्र व त्याची कृति वाचून पहा ह्मणजे सर्व ध्यानांत येईल.

---

## गुळवेलीचें सत्व काढण्याचा प्रकार.

कितीएक ठिकाणीं असें पाहण्यांत येतें कीं, गुळवेलीचें सत्व दहीं घुसळून जसें लोणी काढतात तसें काढतात. परंतु त्याहीपेक्षां एक सुलभ युक्ति अशी आहे कीं, निंबावरची किंवा आंब्यावरची चांगली जाड गुळवेल आणून तिचे चार चार बोटाएवढे तुकडे करून पाण्यानें स्वच्छ धुवून टाकावी. नंतर तें दगडानें चांगलें चेंचून एका कल्हईच्या भांड्यांत स्वच्छ पाणी घालून त्यांत तो कुटलेला कल्क सुमारें चार घटका भिजत घालावा. नंतर त्याच पाण्यात चांगला हातानें कुसकरून त्याचा चोथा पिळून टाकून द्यावा, व खालीं राहिलेलें पाणी दुसऱ्या कल्हईच्या पात्रांत वस्त्रगाळ करून ठेवावें ह्मणजे एक प्रहरानें तें सर्व सत्व तळास जाऊन बसतें नंतर वरचे पाणी युक्तीनें ओतून काढून खालीं राहिलेलें सत्व सावलीत वाळवून ठेवावें. जसजशी जाड गुळवेल असेल तसतसें अधिक सत्व निघतें असें जाणावें. या कृतीनें काढिलेलें सत्व स्वच्छ व गुणावह होतें.

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| १ | टीप ३ | मानला | मानेला. |
| २ | १५ | स्यानें | स्थानें. |
| १० | २७ | मरतो | पावतो. |
| १२ | ६ | करणार | करणारा. |
| २९ | २२ | चालीप्रनाणें | चालीप्रमाणें |
| ३१ | २८ | वरा | वारा. |
| ४३ | ७ | आहेस | आहेत. |
| ५९ | १ | घालाव | घालावें |
| ६९ | ३ | प्रकति | प्रकृति. |
| ८१ | २१ | ह्मणजे २वेळ | ह्मणजे. |
| ८३ | ३३ | खराव्या | कराव्या. |
| ८६ | १० | आंत्रुळें | आगुळें. |
| १०५ | १८ | फिरावितात | फिरवितां. |
| १०६ | १८ | होनात | होतात. |
| ११६ | ४ | रास | राख. |
| १२१ | १ | केल | केलें. |
| १३३ | १० | अतिसवन | अति सेवन. |
| १३४ | १३ | करारच्या | प्रकारच्या. |
| १३३ | १४ | लाड | लाडू. |
| १३५ | २२ | अग्निप्रियांचा | अग्निक्रिया. |
| १३६ | २८ | ओम | आम |
| १३७ | टीप १—१ | वेकफळ | वेलफळ |
| १५० | ४ | मनानाला | मनाला. |
| १६९ | २४ | गुजप्राण | गुजप्रमाण. |
| १७४ | १ | ढकर | ढेंकर. |
| २०१ | टीप १—४ | कावे | कोंव. |
| २०८ | २७ | वर | बरें. |
| २१५ | ८ | नोळा | तोळा |
| २२५ | ९ | उदीद | उडीद. |
| २३७ | १७ | मुळयाच्या | मुळयाचा |
| २४० | २२ | तोन | दोन |
| २४० | २५ | घेऊल | घेऊन |
| २४१ | १६ | सांचा | यांचा |
| २४८ | १३ | केलेकी | केलेली |
| २६५ | १९ | पिपळी | पिंवळी |
| २७३ | १ | आल्यच्या | आल्याच्या. |
| २७६ | १५ | पित्तज्वररा-वरील | पित्तज्वराव-रील. |
| २७७ | १६ | पित्तवज्राव-रील | पित्तज्वराव-रील. |
| २७७ | २८ | त्रीव्र | तीव्र. |
| २८२ | २९ | षित्त | पित्त. |
| २८३ | १ | हाऊन | होऊन |
| २८४ | १५ | शिपीशें | शिंपीचें. |
| २८८ | १ | त्राम्रभस्म | ताम्रभस्म. |
| २८९ | २२ | यांचा २ वेळ | यांचा. |
| २९४ | ३१ | व्यामाम | व्यायाम. |
| २९५ | २१ | तीन | ती न |
| ३०० | ३० | काळा,वाळा | काळावाळा. |
| ३०४ | ३१ | होतास | होतात. |
| ३०७ | २८ | चावल्यासा-रणें | चावल्यासा-रखें. |
| ३१२ | ९ | पपार्थ | पदार्थ. |
| ३१३ | ३३ | न करिते | करिते. |
| ३२१ | २३ | रोग्याय | रोग्यास |
| ३२६ | २८ | ललक्षें | लक्षणें. |

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध. | शुद्ध. |
| --- | --- | --- | --- |
| ३३२ | ३ | सारख | सारखें. |
| ३३२ | ३१ | वगंभस्म | वंगभस्म. |
| ३३२ | ३४ | वगंभस्म | वंगभस्म. |
| ३३३ | २ | प्रमहे | प्रमेह. |
| ३३३ | ४ | पाऊन | पाहून |
| ३३७ | २२ | मशेमध्यें | दशेमध्यें. |
| ३४४ | २९ | उवाय | उपाय. |
| ३४५ | १२ | ओट | ओठ. |
| ३६६ | १३ | दोतात | होतात. |
| ३७० | १ | दाक | पाक. |
| ४०० | ७ | तूर्ण | चूर्ण. |
| ४०५ | ९ | चारकरून | करून |
| ४१७ | २२ | करून २वेळ | करून |
| ४१८ | १ | उउपेक्षा | उपेक्षा. |
| ४३४ | १८ | पुनर्ववा | पुनर्नवा |
| ४३६ | २७ | पिपळी | पिवळी. |
| ४३८ | १७ | होंते | होतो. |
| ४३९ | १८ | सुरुप | पुरुप. |
| ४५४ | २८ | करूल | करून |
| ४७१ | टीप१–१ | पिपळी | पिवळी. |
| ४७२ | टीप १ | रोननाशनार्थ | रोगनाशना. |
| ४७६ | १ | येऊन | ठेऊन. |
| ४९४ | २० | रक्तातिमार | रक्तातिसार. |
| ५०४ | २ | दुपप्ट | दुप्पट. |
| ५१० | २१ | औदधाचें | औषधाचें. |
| ५१३ | १० | हे ूर | हे दूर. |
| ५३० | २० | वामनत्व. | वमनत्व. |
| ५४३ | १० | माणी | पाणी. |
| ५६२ | २२ | पित्तलभस्म | पितलभस्म. |
| ५६४ | २३ | तुळवेलीचा | गुळवेलीचा. |
| ५६७ | १३ | लोपभस्म | लोहभस्म |
| ५७२ | २० | वीर्ण | वर्ण. |